# प्रार्थनासमाजाचा इतिहास.



लेखक व संपादक

द्वारकानाथ गोविंद वैद्य.

प्रकाशक—

प्रार्थनासमाज—मुंबई.



१९२७.

# आभार.

—०—

प्रार्थनासमाजाच्या इतिहासपर हा ग्रंथ आज प्रार्थनासमाजाच्या ६० व्या वार्षिकोत्सवाच्या दिवशीं जो प्रसिद्ध होत आहे त्याचें श्रेय कर्नाटक छापखान्याचे मालक रा. रा. मंगेशराव कुळकर्णी ह्यांस आहे. कारण, अवघ्या दोन महिन्यांच्या अवधींत त्यांनीं इंग्रजी व मराठी दोन पुस्तकें छापून दिलीं आहेत. १८९८ सालीं कर्नाटक छापखान्याचा व प्रार्थनासमाजाचा संबंध जडला तो आजपर्यंत कायम आहे. मंगेशरावांनीं उत्सवाच्या वेळीं दोन्हीं पुस्तकें देतों असें आम्हांला दिलेलें आश्वासन पूर्ण केलें ह्याबद्दल प्रथम त्यांचे आभार मानतों. त्याचप्रमाणें ज्ञानोदयपत्राचे हल्लींचे इंग्रजी बाजूचे संपादक रे. जे. एफ. एडवर्डस् ह्यांनीं आपल्या पत्राच्या अगदीं जुन्या फायली कृपा करून आम्हांस वाचावयास दिल्या ह्याबद्दल प्रार्थनासमाजाच्या वतीनें आम्ही त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. इतिहास लिहितांना वारंवार आम्हांला ज्ञानोदयाच्या फायलींचा पुष्कळ उपयोग झाला हें येथें कृतज्ञ बुद्धीनें आम्ही नमूद करून ठेवितों.

आमचे तरुण मित्र, न्या. मू. रानडे ह्यांच्या चरित्राचे लेखक, रा. रा. नरहर रघुनाथ फाटक ह्यांचे आभार किती व कसे मानावयाचे हेंच कळत नाहीं. जुन्या पत्रांच्या दुर्मिळ फायली आमच्या बरोबर वाचण्यांत त्यांनी वेळ घालविला, एवढेंच नव्हे, तर कांहीं महत्त्वाची माहिती त्यांनीं आमच्यासाठीं उतरूनही घेतली. इतिहास लिहितेवेळीं सुबोध पत्रिकेवरील लेखाचा उत्तर भाग लिहून अडचणीच्या प्रसंगांतून त्यांनीं आम्हांला सोडविलें ह्या त्यांच्या निरपेक्ष साहाय्याबद्दल त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानून इतकेंच म्हणतों कीं, परमेश्वर त्यांस दीर्घायु करो व त्यांच्या हातून आपली सेवा अधिकाधिक करवून घेवो. मुंबईच्या समाजाचे अध्यक्ष रा. रा. वासुदेव गोपाळ भांडारकर व रा. रा. बाबण बापू कोरगांवकर ह्यांनीं इतिहासाचा पुष्कळसा भाग वाचून पाहिला व वेळोवेळीं सूचना केल्या, नवी माहिती सांगितली त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें.

शेवटीं दयाघन परमेश्वरानें हें कार्य माझ्या हातून तडीस नेलें, त्यानेंच लिहिण्याचें सामर्थ्य दिलें म्हणून त्यास अनन्यभावें शरण जाऊन ही अल्पकृति वाचकांपुढें ठेवितों.

द्वारकानाथ गोविंद वैद्य.

# प्रस्तावना.

प्रार्थनासमाज ह्या धर्मसंस्थेचा कोणी जगद्विख्यात गुरु नाहीं, किंवा त्यास सर्वांशीं मान्य असा धर्मग्रंथही नाहीं. "हृदयींच देव हृदयींच भक्त। हृदयींच होत पूजा" असा त्याचा आराधनेचा प्रकार आहे. साधारण लोकांच्या मनांत ठसणारी षोडशोपचारयुक्त पूजा तीही समाज करीत नाहीं. काम्य कर्में त्यास मान्य नाहींत; त्याची धांव अंतरींच्या सुखाकडे. तें भाव व भक्ति ह्यांच्यायोगें साध्य व्हावयाचें. परमेश्वराची गांठ घालून देण्यासाठीं दक्षिणा घेणाऱ्या अगर न घेणाऱ्या ब्राम्हणाचें त्यास कारण पडत नाहीं. असा हा प्रार्थनासमाज साठ वर्षांपूर्वी कांहीं तरुण विद्वानांनीं स्थापन केला. त्याचा मुख्य हेतु हा कीं, ज्या प्रचंड भेदभावावर हिंदुसमाजाची घटना आहे तो घातक आहे, त्याचप्रमाणें मूर्तिपूजेचा प्रकार जो प्रचलित आहे तो उन्नतिकारक न होतां अवनतीप्रत लोकांस नेतो. ह्यापासून सुटका होणें असेल तर फक्त परात्पर परमेश्वराची एकनिष्ठ भक्ति केल्यानें होणार आहे, अशा दृढ भावनेनें त्यांनीं ह्या समाजाची स्थापना केली. आपला अधिकार अल्प आहे हें ते ओळखून होते. म्हणून त्यांनीं नवीन धर्मपंथाचें द्योतक असें एखादें नांव न देतां प्रार्थनासमाज हें साधें नांव ह्या संस्थेस दिलें. परंतु तिच्यामध्यें चार व्यक्ति एकजूट होऊन राहतील असें आकर्षक कांहीं साधन नसल्यामुळें, चार जणांच्या चार वाटा होऊन ह्या साठ वर्षांच्या अवधींत ती नष्ट झाली असती तर त्यांत कांहीं नवल नव्हतें. परंतु तसें कांहीं न होतां ती तीन पिढ्या टिकली व अजून ती जोमदार आहे हें आश्चर्य होय. हें कसें घडून आलें त्याची साद्यंत हकीकत देण्यासाठीं या समाजाचे अत्यंत आस्थेवाईक सभासद व सुबोधपत्रिकेचे मराठी बाजूचे संपादक रा. रा. द्वारकानाथ गोविंद वैद्य ह्यांनीं फार परिश्रम करून, उपलब्ध होण्यासारखी सर्व माहिती मिळवून हा चित्तवेधक ग्रंथ तयार केला आहे.

ह्या ग्रंथांतील हकीकतीवरून सहज लक्षांत येईल कीं, सुरुवातीला ह्या संस्थेला जरी मजबूत पाया नव्हता तरी तिच्या पुढाऱ्यांच्या अव्याहत श्रमानें तसा पाया बांधण्यांत आला व त्यावर एक मजबूत इमारत उभारण्यांत आली आहे. ज्या पुढाऱ्यांनीं अव्याहत श्रम केले त्यांपैकीं कोणीही आपल्याला गुरु म्हणविलें नाहीं. तथापि त्यांची योग्यता मोठी होती यांत संशय नाहीं. त्यांनीं हें जाणिलें कीं, परमेश्वर परमात्मा अनंत आहे, पण तो मनुष्याचें रूप धारण करितो हा बुद्धि-

प्रमाद होय; तथापि तो आपल्या विषयींची जागृति मनुष्यमात्रामध्यें करीत असतो व त्यांचीं अंतःकरणें आपल्याकडे ओढीत असतो. विवेक ही त्याची वाणी आहे. प्रेम, दया, क्षमा, शांति ह्या त्याच्या देणग्या आहेत व सर्व विश्व त्याची साक्ष मनुष्यांस पटवीत आहे. जगताच्या उद्धारार्थ तो निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या काळीं, थोर अधिकारांचे पुरुष निर्माण करून आपलें स्वरूप मनुष्यमात्रापुढें त्यांच्या द्वारा मांडीत असतो. हे सर्व आपले गुरु. त्यांच्या उक्तींमधून खऱ्या शाश्वत धर्माचे द्योतक जसे आपल्या विवेकास पटतील असे जे विचार त्यांचा संचय हा आपला धर्मग्रंथ असें त्यांनीं ठरविलें. तसेंच परमेश्वराच्या ज्ञानाविषयीं ऊहापोह करून, भाव स्थिर करण्याकरितां परस्परांत चर्चा करून समाजाचीं धर्ममतें निश्चित केलीं व त्यांस शास्त्रांचा आधार दाखविला. पुढें मोठ्या परिश्रमानें एक भजनसंग्रह तयार केला. याशिवाय आपला स्वतःचा धर्मानुभव ते वेळोवेळीं प्रकट करीत गेले. त्यांपैकीं कांहीं एकत्र करून पुस्तकरूपानें छापण्यांत आले आहेत. शेवटीं आपलें आचरण शुद्ध ठेवून उन्नत विचारांच्या जागृतींत नेहमीं राहून धैर्याचा, निश्चयाचा, व भक्तीचा उत्तम कित्ता मागें ठेवून परलोकवासी झाले. हें त्यांचें चरित्र किती नमुनेदार आहे तें हा ग्रंथ वाचल्यावर स्पष्ट होणार आहे. ह्या रीतीनें श्रवण, मनन व भजन यांची उत्तम सामग्री तयार करून परोपकाराचीं कामें करणें हें परमेश्वर सेवेचें फार महत्त्वाचें अंग आहे हें जाणून त्यांची सुरवात केली.

प्रथम धर्म व नीति यांचा ऊहापोह करण्याकरितां व नित्य घडून येणाऱ्या व्यावहारिक गोष्टींचा धर्माच्या दृष्टीनें विचार करून तो लोकांपुढें मांडण्याकरितां सुबोधपत्रिका हें वर्तमानपत्र सुरू केलें. त्याच दृष्टीनें पंढरपूर येथील बालहत्याप्रतिबंधक गृह व अनाथ बालकाश्रम व इतर संस्था मोठ्या कळकळीनें चालविल्या. तसेंच रात्रींच्या शाळा, रविवारचे धर्मशिक्षणाचे वर्ग व अलीकडील इंग्रजी मराठी शाळा इ० संस्था स्थापण्यांत आल्या. साप्ताहिक उपासना प्रथमपासून सुरू होत्याच, त्यांत वेळोवेळ सुधारणा होत गेली आहे. मधून मधून कीर्तनें करण्याची पद्धतही सुरू केली. संस्थेस कायमपणा आणण्यास स्वतःच्या मंदिराची जरूर आहे हें जाणून पुष्कळ लोकाश्रय मिळवून एक भव्य इमारत तयार करविली. येणेंकरून ह्या संस्थेस विशिष्टरूप प्राप्त झालें आहे. ह्यामुळें प्रस्तुतचें कार्य काय तें नक्की होऊन पुढील कार्याची दिशा ठरविण्यांत आली आहे. आतां ही संस्था चिरायु झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. शेवटीं, जरी विशिष्टरूप या संस्थेस प्राप्त झालें आहे, तरी या देशांत

जे शेकडों पंथ चालू आहेत त्यांत भर पडली असें मात्र समजावयाचें नाहीं. जो भेदभाव जनसमूहांतून नष्ट व्हावा असा हेतु या संस्थेचा आहे त्या भेदभावाला या संस्थेपासून बळकटी येऊं नये अशी खबरदारी ठेवणें आमचें काम आहे. दुसऱ्या कोणत्याही धर्मांचा अथवा पंथाचा या संस्थेच्या सभासदांनीं द्वेष, मत्सर, अगर तिरस्कार करावयाचा नाहीं. सर्वांनीं आमचीं मतें स्वीकारावीं ही आमची इच्छा खरी. परंतु ती लोकांस उन्नत धर्मपंथाची जाणीव करून देऊन तो आपण होऊन त्यांनीं स्वेच्छेनें स्वीकारावा अशी उमेद बाळगिली पाहिजे. साक्षात् परमेश्वरच जर आपल्याविषयीं लोकांत जागृति उत्पन्न करीत आहे तर जे धर्मांचे भिन्न प्रकार प्रचारांत आढळतात ते त्या त्या लोकांच्या पूर्व इतिहासाचा, संस्कृतीचा व ग्राहकतेचा परिणाम आहे, असें मानणें जरूर आहे. तसेंच परमेश्वर नित्य आपलें स्वरूप साधुसंतांच्या द्वारें प्रकट करीत आहे. ज्याप्रमाणें पूर्वींच्या काळीं केलें त्याप्रमाणें पुढेंही करील असें मानणें रास्त होईल व तसें झाल्यास या समाजाच्या अनुयायांवरही नवीन प्रकाश पडून धर्ममताचा जास्त विकास होण्याचा संभव आहे. कारण सर्व सृष्टीच विकासवान आहे. यासाठीं कोणत्याही धर्मांच्या लोकांना आपल्यास एकंदर सर्व ज्ञान झालें आहे असें म्हणतां येणार नाहीं. म्हणून सर्वांनीं स्वतःच्या मतांचा गर्व न वाहतां विनयपूर्वक नवीन ज्ञान प्राप्त झालें तर तें स्वीकारण्याची तयारी ठेवून इतरांच्या धर्मांची हेळणा न करितां आपआपल्या परी ते परमेश्वराचे भक्त आहेत असें मानून त्यांस बंधुत्वाच्या नात्यानें वागविणें हा या संस्थेचा रोख नेहमीं कायम ठेविला पाहिजे. त्यांत अंतर पडतां कामा नये. परमेश्वर करो आणि ही आमची मनाची स्थिति कायम ठेवो व पुढें जेव्हां शतसांवत्सारिक उत्सव करण्याचा प्रसंग येईल त्या वेळीं लिहावयाच्या वृत्तांत हें आमचें इतर धर्मांशीं बंधुत्वाचें नातें जास्त दृढ होत जात आहे असें लिहिण्याचा प्रसंग येवो.

प्रार्थनामंदिर,<br>ता. २० मार्च १९२७. } वासुदेव गोपाळ भांडारकर.

## अनुक्रमणिका.

पृष्ठ.



## धर्मानुष्ठान व ध्येयपालन.



## सुबोधपत्रिका.

( पूर्व भाग )



## सुबोधपत्रिका.

( उत्तरभाग. )



## ग्रंथपरिचय.

पृष्ठ.



## इतर समाज.

# चरित्रात्मक लेख.



प्रार्थनासमाजाचे जुने सभासद

# प्रार्थनासमाजाचे कांहीं जुने सभासद

१८७८ सालीं घेतलेला फोटो.

**पुढें बसलेली रांग डावीकडून:—**१ महादेव गोविंद रानडे; २ भास्कर हरि भागवत; ३ दीनानाथ पांडुरंग मिटकर; ४ नानाभाई रघुनाथ भांडारे; ५ बाळ मंगेश वागळे; ६ माधवराव नारायण शिरगांवकर; ७ कान्होबा रणछोडदास कीर्तिकर; ८ बाबू बिपिनचंद्र पाल.

**मध्यें बसलेली रांग डावीकडून:—**९ मोरोबा विनोबा संझगिरी; १० बाबू अक्षयकुमार मित्र; ११ रामकृष्ण गोपाळ भांडारकर; १२ भिकोबा लक्ष्मण चव्हाण; १३ बाबू प्रतापचंद्र मुझुमदार; १४ डॉ. आत्माराम पांडुरंग तर्खंड; १५ गोपीनाथ सदाशिव हाटे; १६ नारायण महादेव परमानंद.

**पाठीमागें उभी असलेली रांग डावीकडून:—**१७ विश्वनाथ गोविंद चोळकर; १८ भगवंत मंगेश वागळे; (१९ नांवाचा शोध लागत नाहीं) २० वासुदेव बापुजी कानिटकर; २१ नानाजी वासलेकर; २२ मुकुंद रामचंद्र एनजिनीअर; २३ बाळकृष्ण गोविंदजी भाटोडीकर; २४ सदानंद बाळकृष्ण पालेकर; २५ रामचंद्र विष्णु माडगांवकर; २६ पांडुरंग भिवराव; २७ वासुदेव बाबाजी नवरंगे; २८ बाळकृष्ण निळाजी पितळे; २९ बाळकृष्ण मोरोबा धात्रे; ३० आनंदराव हरिशंकर.

# प्रार्थनासमाजाचा इतिहास.

## परमहंस सभेच्या पूर्वी व नंतर.

मुंबईच्या " प्रार्थनासमाज " ह्या संस्थेची स्थापना ता. ३१ मार्च सन १८६७, फाल्गुन वद्य एकादशी, म्हणजे पापमोचनी एकादशीच्या दिवशीं, झाली व मूळ स्थापकांची संख्या पंधरासोळा पर्यंतच होती हें आतां पुष्कळांस माहीत झालें आहे. तथापि ज्या मूठभर लोकांनीं, सर्व बाजूंनीं प्रतिकूल स्थिति असतांना, ह्या समाजाची स्थापना केली, त्यांनीं ती करण्यास काय कारणें झालीं, त्या पूर्वी येथें लोकस्थिति कशी काय होती, लोकांच्या विचारांस कोणत्या प्रकारचें वळण होतें ह्यांविषयीं कांहीं माहिती ह्या भागांत देण्याचा विचार आहे.

बंगाल्यांत ब्राह्मसमाजाची स्थापना राजा राममोहन राय ह्यांनीं सन १८२८ सालीं केली. त्यावेळीं तेथें लोकांची स्थिति सर्व प्रकारें उद्वेगजनक होती. पैसा होता, पण त्याचा दुरुपयोग होत होता; नीतिबंधनें शिथिल झालीं होतीं; व्यसनासक्ति हा दुर्गुण न समजण्याइतकी दुरवस्था समाजास प्राप्त झाली होती; निरुद्योगीपणामुळें नानाप्रकारचे चैनीचे प्रकार राजरोसपणें चालू ठेवण्याचा कल वाढत्या प्रमाणावर होता; धर्माच्या नांवावर अनेक दुष्ट प्रकार चालू होते; अघोर पंथी प्रकारांना भरती आलेली होती; खाण्यापिण्याचे धरबंध सुटले होते, अशा वेळीं राजा राममोहन रायांनीं ब्राह्मसमाजाची स्थापना करून लोकांमध्यें विचारजागृति करण्याचें काम चालविलें.* प्रार्थनासमाज व ब्राह्मसमाज ह्या संस्था

---

* ब्राह्मसमाजाचा इतिहास पंडित शिवनाथ शास्त्री ह्यांनीं लिहिलेला आहे व तो आतां बराच प्रसिद्धीस आलेला आहे. तथापि त्याच ग्रंथांत मि. लिआनार्ड, बंगालच्या एशियाटिक सोसायटीचे दुय्यम सेक्रेटरी, ह्यांनीं लिहिलेल्या ब्राह्मसमाजाच्या इतिहासाचा उल्लेख झालेला आहे. हें पुस्तक आतां दुर्मिळ आहे. ह्यांत मि. लिआनार्ड ह्यांनीं म्हटलें आहे:—

At the period immediately preceding the era of Brahmic Reformation, we find that the unsettled state of the country,

बहुतेक सारखींच तत्त्वें प्रतिपादणाऱ्या असल्यामुळें प्रार्थनासमाजाच्या स्थापनेस कोणतीं कारणें झालीं असावीं याची माहिती बोधपर होण्यासारखी आहे. तथापि प्रथमतःच हें कबूल केलें पाहिजे कीं, बंगालप्रमाणेंच मुंबईची सर्वसाधारण स्थिति होती म्हणून प्रार्थनासमाज, अगर तत्सम संस्थांची स्थापना झाली असेंच कांहीं म्हणतां येणार नाहीं.

मुंबई शहरांत शिक्षणाचा जसजसा प्रसार होऊं लागला तसतसे लोकांच्या विचारांमध्यें फेरफार होत गेले. खरें पहातां मुंबई शहरांतील पुष्कळशी वस्ती बाहेरून आलेली; आणि शहराची भरभराट होऊं लागतांच ही वस्ती वाढत गेली होती. उद्योगधंदे, व्यापार, सट्टे, या सर्वांच्या द्वारें शहरामध्यें धनाची विपुलता झालेली होती. विद्येचा थोडाच प्रसार झाला होता; त्याबरोबरच संपत्तीच्या रेलचेलीमुळें लोकांमध्यें अनेक प्रकारचे छानछोकीचे† प्रकार आले होते. मुंबईचें वर्णन नामक १८६३ सालीं प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत म्हटलें आहे "वेश्यांचे नाच हें तर

the degraded condition of the Hindus, as regards their social, religious, and civil concerns required the energies and talents of highly gifted minds for the introduction of order and reform. The reform so necessary and important, had no doubt, been hindered in its execution by the then existing state of things in almost every department. (p. 3)

† धनाची विपुलता झाली व त्याचा सद्व्यय कसा करावा हें कळत नसलें, म्हणजे त्याचा व्यय भलत्याच मार्गांनीं होऊं लागतो, हा नेहमींचा अनुभव आहे. नाचरंगामध्यें पैसा कसा जात होता याची माहिती पुढें आहेच. परंतु आणखी कांहीं प्रकार जे दृष्टोत्पत्तीस आले तेही तेथें नमूद करितोंः—

(१) १८६१ सालीं "एका पळशा जोशी गृहस्थानें" तुळशीचें लग्न मोठ्या समारंभानें केलें. ह्या गृहस्थास मूलबाळ नव्हतें. कन्यादानाचें श्रेय प्राप्त करून घ्यावें व लोक मुलांचीं लग्नें करून व्याही विहिणी घरीं आणून खेळवितात व अनेक सोहाळे करितात, तो प्रकार आपल्या घरींही व्हावा अशी त्याला पुष्कळ दिवसांपासून हौस होती. ती पुरविण्यासाठीं त्यानें हा लग्नसमारंभ केला. ह्या लग्नांत उपाध्ये हे मुलाचे म्हणजे बाळकृष्णाच्या मूर्तीचे बाप व यजमान हे कन्येचे (तुळशीचे) बाप कल्पून हा समारंभ मोठ्या दबाजानें गेला. वास्तविक लग्नास जसें आमंत्रण फिरतें तसें फिरवून वरातीबरोबर गृहस्थ बोलावून आणिले होते; व वाद्येंगायें लावून रस्त्यांतून मिरवीत वर नेला. इतर लग्नें लावितात त्याप्रमाणें

भरतखंडास एक ग्रहणच लागलें आहे. यांपासून प्रत्येक शहरांत किती नासाडी होते याचें अनुमान करवत नाहीं. दुराचरणी स्त्रिया सर्व मुंबईभर पसरल्या आहेत. त्यांची संख्या उत्तरोत्तर वाढत जात्ये. आनंदाच्या दिवशीं श्रीमंत गृहस्थांस आगतस्वागताविषयीं सन्मान देणें असल्यास ह्या प्रकारच्या एक दोन स्त्रिया आणून सभेंत उभ्या केल्यानें ते संतुष्ट होतात ! अशा कर्मणु-

---

हें लग्न लावून ब्राह्मणांस दक्षिणा व गृहस्थांस नारळ, पानसुपारी तुरे वगैरे दिले. व्याही व विहिणींचें गौरव वगैरे सर्वप्रकारें मोठ्याच तारतम्यानें ठेविलें होतें. वधूप्रवेशसुद्धां शास्त्रोक्त विधीप्रमाणें केला.

( २ ) कांहीं वर्षांमागें ( १८६१ हें लिहिलें आहे ) एका गृहस्थानें मांजराची सटी केली होती. ह्या गृहस्थाच्या घरीं मांजर व्याली असतां तिच्या सहाव्या दिवशीं ब्राह्मणाकडून षष्ठीपूजन करवून दक्षिणा वांटली, आणि मिष्टान्नाचा जेवण-समारंभ करून कित्येक लोकांस बोलाविलें होतें.

( ३ ) एका शेणवी गृहस्थानें पिंपळाची मुंज बांधिली होती.

( ४ ) गणपतराव गायकवाड महाराजांनीं बाहुल्यांचा लग्नसमारंभ पंचवीस हजार रुपये खर्च करून केला व हा लग्नसमारंभ खऱ्या लग्नाप्रमाणें पंधरा दिवस चालला होता.

( ५ ) एका सधन परभू गृहस्थाच्या मुलीनें थोड्या वर्षांमागें बाहुलीचें लग्न केलें, त्यास मुलीच्या बापानें हजार पांचशें रुपये खर्च केला. कित्येक लोकांस आमंत्रण करून वरघोडा देखील रस्त्यांतून मिरवीत नेला होता.

( ६ ) सन १८६२ सालीं कार्तिक मासीं शिंदे महाराजांनीं एका दिवसांत एक लक्ष दक्षिणी ब्राह्मणांस भोजन घातलें व दर ब्राह्मणास एकेक रुपया दक्षणा दिली. ही संख्या पुरी होण्यासाठीं जेथेंजेथें दक्षिणी ब्राह्मणांची संख्या होती तेथें तेथें भोजनसमारंभ झाले. कोठें किती ब्राह्मण जेवावयास बसले त्याची बातमी तारायंत्रानें महाराजांस मिळण्याची व्यवस्था झाली होती. एकंदर खर्च तीन लाख रुपये झाला.

मुंबईच्या लोकांस द्रव्याची तमा नाहीं, इतकेंच नाहीं, परंतु कधीं कधीं ते अव्यवस्थित खर्च करितात. एकानें दोन हजार रुपये खर्चून वरघोडा काढला, तर दुसरा तीन हजार खर्च करून मामसाळें काढील आणि तिसरा चार हजार रुपये लावून केळवण म्हणून करील व चवथा सीमांतपूजनाची वरात काढून

कीशिवाय दुसरी प्रतिष्ठित कर्मणूक भरतखंडांत सांपडणें दुर्लभ असा मुंबईतील बहुतेक लोकांचा समज आहे. ह्यामुळेंच ह्या क्रिया सधन होऊन कोणासच मानीत नाहींशा झाल्या आहेत. आठदाहा वर्षांमागें (१८५२ अजमासें) डानबी सीमोर ह्या नांवाचे एक प्रख्यात इंग्रज गृहस्थ लंडन शहरांतील पार्लमेंट सभेचे सभासद, ह्या देशाची स्थिति पहाण्यास आले होते. त्या वेळीं आमच्या लोकांनीं त्यांच्या सन्मानार्थ असा एक नाच केला होता." ह्यावरून एकंदर सुखवस्तु लोकांचा कल दिसून येतो.*

---

त्याप्रीत्यर्थ पांच हजार रुपये खर्चील. कोणी हजारों रुपये खर्च करून श्राद्ध घालील. कोणी दोन लक्ष रुपये खर्च करून लग्नसमारंभ करतील, परंतु देश दरिद्री होत चालला आहे व अज्ञानसागरांत बुडत आहे याजकडे लक्ष देऊन लोकांस सन्मार्गास लावावयाच्या उद्योगांत कोणी पडायाचे नाहींत.

ही सर्व माहिती मुंबईच्या वर्णनांतून घेतली आहे.

" कलकत्ता नजीक नडिया गांवीं (चैतन्याचें जन्मस्थान) राजा ईश्वरचंद्र नामक जमीनदारानें १७९० त हिंदु रीतीप्रमाणें मोठा समारंभ करून दोन माकडांचें लग्न केलें, त्यास एक लाख रुपये खर्च लागला. जेव्हां वऱ्हाड निघालें तेव्हां हत्ती, घोडे, पालख्या, उंट, शृंगारलेल्या घोड्यांची जिलीब, व हजारों मशाली वगैरे शोभा केली होती, आणि त्या नवऱ्यास (माकडास) रत्नजडित पालखींत बसविलें होतें. पुढें लग्नही **मोठ्या विद्वान्** ब्राह्मणांनीं सुमुहूर्तावर लाविलें." मुंबईचें वर्णन ३८६.

* सुमारें चार वर्षांपूर्वी सर दिनशा वाच्छा ह्यांनीं मुंबई शहराच्या दाहा वर्षांच्या (१८६५–१८७५) आठवणींचें एक पुस्तक लिहिलें आहे. ह्यांत वेश्यांच्या नाचासंबंधानें पुढील माहिती आहेः—

Though the fifties were an epoc-making period in many respects including social reform, it may not be out of place to refer here to one social feature which a handful of the far-sighted of those days had greatly deplored. Nautch parties were exceedingly common. Dancing girls, both Hindu and Mohomedan, were invited to enliven every important domestic entertainment of a joyous character. They were all professionals and, from their point of view did their best in order to advance their own prosperity. With dancing girls were singing girls also. Generally these professionals combined those two arts. And

त्यावेळीं सरकारी व मिशनरींच्या शाळा स्थापन झाल्या होत्या. लोकांना शिक्षण देऊन त्यांस ज्ञानाची गोडी लावण्याचे प्रयत्न पाहून त्या वेळच्या पुढाऱ्यांच्या मनांत मिशनरींविषयीं आदरभाव वसूं लागला होता. वस्तुतः मिशनरी लोक ह्या देशांत आपल्या धर्माचा प्रसार करण्यासाठीं आले, परंतु त्यांच्या मार्गांतील अडचणी, त्यांस न जुमानतां त्यांनीं केलेले प्रयत्न व त्यांस आलेलें यश याचा विचार केला म्हणजे त्यांच्या उद्योगाविषयीं मनांत आदर उत्पन्न झाल्यावांचून रहात नाहीं. १८०७ सालीं मि. टेलर नांवाच्या एका गृहस्थांनीं मुंबई शहरांत प्रवेश करण्याचा प्रयत्न केला होता; परंतु सरकारची त्यास परवानगी न मिळाल्यामुळें त्यानें सुरतेस तळ दिला. नंतर १८११ मध्यें तीन मिशनरी आले. प्रथम ते कलकत्त्यास गेले, तेथून त्यांना खुद्द सरकारनेंच हाकून लावलें ! त्यामुळें ते कोचीस गेले. तेथेंही त्यांचें कांहीं वळेना. मग त्यांना मुंबई बंदर बरें आहे असें वाटून ते मुंबईस आले. परंतु बंदरावर पाऊल टाकण्यासही त्यांना अडचणी आल्या. तरी ते धक्यावर आले, तों प्रत्यक्ष गव्हरनर साहेबांचा त्यांस हुकूम आला कीं, अठ्ठेचाळीस तासांच्या आंत तुम्ही मुंबई बेटांतून निघून गेलें पाहिजे ! ह्या लोकांना येथें राहूं दिल्यानें ते येथील लोकांच्या धर्माविरुद्ध उपदेश करूं लागतील व त्या योगें लोकांत असंतोष माजेल, करितां प्रत्यक्ष कोर्ट आफ डायरेक्टर्सचाच त्यावेळीं हुकूम होता कीं, खिस्ती धर्मोपदेशकांस येथें राहूं देऊं नये. अशा अडचणींशीं ते सतत तीन वर्षें झुंजले व १८१४ पासून मुंबई शहरांत त्यांनीं आपलें जाळें राजरोसपणें पसरावयास सुरुवात केली. ह्या तीन वर्षांच्या अवधींत त्यांनीं सरकारची परवानगी वगैरे आणविली होती. अशा प्रकारें

---

those who excelled in singing were, therefore, most in requisition. On festive occasions, no entertainment would be deemed complete where a nautch party had not been provided. Indeed it was held to be shabby on the part of the few who from motives of saving money failed to observe the universal custom. Such was indeed the deep hold of that custom that it was impossible to evade it, as impossible as to evade resorting to the temple for divine service....Even the Parsis were not behind in the fifties in giving nautch parties on festive occasions. At many a Parsi rich country house, during Pateti, Diwali and Holi and other holidays it was the *sine qua non* that a nautch party should include the day's entertainment....The Parsis were the first in the field in the abandonment of nautch parties.

ख्रिस्ती मिशनरींचा मुंबई शहरांत प्रवेश झाल्यावर एकदम धर्मप्रसाराच्या कार्यास त्यांनीं सुरवात केली नाहीं. त्यांनीं प्रथम शिक्षणाचा प्रसार करावयाचें मनांत आणिलें. जिकडे तिकडे शाळा उघडल्या, मुलांना पुस्तकें वगैरे ते आपल्या खर्चानें देऊं लागले. तरी पण १८५२ सालीं स्वधर्माचा त्याग करून ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केलेल्यांची संख्या १,१२,४२५ होती.

१८६१–६२ सालामध्यें मिशनरींनीं शिक्षणाचें काम कसें चालविलें होतें तें पुढील माहितीवरून दिसून येईल:—

| नांव | शाळांची संख्या. | युरोपियन शिक्षक | हिंदी | मुलें |
|---|---|---|---|---|
| चर्च मिशनरी मंडळी | ७८१ | १२ | ८४६ | २७००० |
| लंडन मिशनरी ,, | ३१९ | – | ५८९ | १५००० |
| वेसलियन मिशन | ५३ | | १०० | ३००० |
| फ्रीचर्च मिशन | – | – | | ९,१३२ |
| बॅपटिस्ट | | | | २५०० |
| इतर मिशनें | अजमासें | | | ४५३६८ |

अशाप्रकारें ख्रिस्ती मिशनरी व सरकारी शाळा ह्यांच्या द्वारें शिक्षणाचा प्रसार ज्यावेळीं होत होता त्यावेळीं मुंबई शहरांत विशेषतः हिंदु लोकांत तीन प्रकार दिसून येत होते. एक जुन्या लोकांचा. ह्यांच्या विचारांमध्यें कांहीं फरक होत होता असें नाहीं. जो कांहीं सभोंवतालच्या परिस्थितीचा परिणाम होत असेल तेवढाच. मात्र यांच्यांत नवीं व्यसनें पसरूं लागलीं होतीं. सर्वत्र पसरलेल्या नाचांचें वर वर्णन आलेंच आहे. मुंबई शहरांत चिनी लोकांचा बराच सुळसुळाट झाल्यावर त्यांनीं अफु व चंडोल यांचा खप येथें वाढविला. मुंबईतील सर्व धर्मांच्या व सर्व जातींच्या लोकांमध्यें ह्या व्यसनाचें बंड माजलें होतें. तें किती याचें हृदयभेदक वर्णन रा. रा. गोविंद नारायण माडगांवकर ह्यांनीं आपल्या पुस्तकांत केलें आहे. त्यांत ते म्हणतात, "चंडोल म्हणून अफीणीच्या तयार केलेल्या गोळ्या असतात. त्या चिलमींत घालून ओढतात, ह्या चिलमी व गुडगुड्या एक तऱ्हेच्या असतात. ह्या चिलमींत विस्तव घालीत नाहींत, परंतु तुपांत बुडविलेला काकडा पेटवून डाव्या हातांत घेतात आणि ह्या चिलमीवर जी गोळी ठेवलेली असते तीस लावून मोठ्यानें झुरका घेतात. चंडोल पितेवेळीं आडवें पडावें लागतें. म्हणून ह्या जागेंत जिकडे तिकडे ओबडधोबड बांक, खाटा, व चोपाया घातलेल्या असतात. आणि जाड्याभरड्या हांतऱ्या घालून

त्यांवर मुसलमान, ब्राह्मण, परभू, शेणवी, सोनार, भाट्ये, असे अठरापगड जातींचे चंडोलउपासक हातपाय ताणून पडलेले असतात. कोणी डोळे वटारलेले असतात, कोणी ओकतात, कोणाच्या तोंडावर माशा बसलेल्या असतात, कोणी खोकतात, कोणी तोंडें वेडींवाकडीं करितात, कोणी उसाची गंडेरी चोखितात, कोणी सिताफळाच्या बिया तोंडांत घालितात, कोणी केळीं खातात, कोणी घेरी येऊन पडले आहेत असें दृष्टीस पडतें. ह्या जाग्यांत जिकडे तिकडे केर व कचरा पडलेला असून सर्व गोष्टींनीं मळीन असतात. आणि जे लोक ह्या कैफाच्या स्वाधीन झालेले असतात ते निस्तेज व भयंकर दिसतात······ह्या स्थळांत डोकावून पाहिलें असतां अंगीं कंप सुटतो. एथें अनेक जातींचे लोक चंडोल पिऊन गुंगींत येऊन प्रेतासारखे चटईवर पडलेले असतात. तेव्हां ह्यांस पाहून यमयातनेविषयींचें जें पुराणांतरीं वर्णन केलें आहे त्याचें स्मरण होतें. यांत भेद इतकाच कीं हे लोक येथें सुखवस्तु जाऊन पडतात. मनुष्य आडमार्गानें जाऊं लागला म्हणजे त्यास नरक देखील प्रिय होतो." हें व दुसरीं व्यसनें ज्याप्रमाणें जुन्या समाजामध्यें पसरलीं होतीं त्याचप्रमाणें नवें शिक्षण मिळालेली कांहीं मंडळी त्यास बळी पडत होती. त्यांना थोडेंसें तुटपुंजें शिक्षण मिळाल्यामुळें त्या वेळीं व्यापारधंदा, नोकरी-चाकरी ह्यांविषयीं चांगली अनुकूलता होती. त्यामुळें जुनें वळण जसजसें सुटत चाललें व त्या ठिकाणीं नवें चांगलें वळण अगर नवे विचार ह्यांचें ठाणें बसलें नाहीं, तसतसा ह्यांच्या आचरणांत ढिलेपणा अधिकाधिक दिसूं लागला. हा अनुभव सर्वत्र येत होता.* हा दुसरा वर्ग

* मि. लिआनार्ड आपल्या इतिहासांत म्हणतातः—

At the time of its ( Brahma Samaj ) foundation European education had just begun to make some progress among the Natives, and although its influence was speedily felt in helping to remove the deep rooted prejudices and superstitious notions of the people, yet still numerous proofs can be adduced that its first introduction greatly tended to create among members of the educated and intelligent classes of people a **lamentable atheism** and indifference to religion in general. This was the natural result to be expected from the English Education afforded in Government Schools, which while sapping the foundation of the Hindu Religon, substituted nothing in its place; hence a race of unbelievers sprang up and these would have increased a hundredfold but for the intervention of Brahmoism. ( p. 3 ).

दिवसेंदिवस वाढूं लागला. एकीकडे कुटुंबांतील सर्व जुने आचारविचार चालू असावे, व दुसरीकडे एखाददुसऱ्या व्यसनानें ठाणें दिलेलें असावें, असा प्रकार दिसत होता. बाहेर विचारजागृतीचे प्रयत्न होत होते, नाहींत असें नाहीं. मिशनरी लोक स्वस्थ बसले नव्हते; त्याचप्रमाणें स्टूडंटस लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी, गुजराथी व मराठी ज्ञानप्रसारक सभा, ज्ञानप्रसारक मासिक, कित्येक वर्तमानपत्रें, लोकशिक्षणाचें कार्य करीत होतीं. तथापि ह्या मंडळीवर ह्या सर्व प्रयत्नांचा कांहींही परिणाम झालेला नसावा. परंतु तिसरा जो वर्ग होता व ज्यास व्यवस्थित रीतीनें शिक्षणाचा लाभ झालेला होता, तो जागृत होऊं लागला होता. आपली घडी बिघडली आहे याविषयीं त्यांतील लोकांत जागृति उत्पन्न झाली होती. आपल्यावर जे लोक राज्य करीत आहेत त्यांचे गुण त्यांच्या लक्षांत येऊं लागले होते. आपल्या समाजांतील अनेक दुष्ट चाली, अन्यायमूलक रीतिरिवाज ह्यांनीं आपल्या समाजाचें किती नुकसान होत आहे हें त्यांस दिसून येऊं लागलें होतें. धर्माच्या बाबतींत वेडगळ समजुती, वेडगळ आचार ह्यांनीं ठाणें केल्यामुळें धर्माचा कसा खेळखंडोबा होत आहे हें ते पहात होते. लहानपणीं लग्नें झाल्यामुळें, बालविधवांची वाढती संख्या पाहून पुनर्विवाहाची असलेली बंदी अन्याय्य होय असें त्यांस वाटूं लागलें होतें. सर्व गोष्टींत आमच्यांतील सोंवळेपणा, उच्चनीच भाव आमच्या उन्नतीच्या आड येत आहे याचा प्रत्यहीं त्यांस अनुभव येत होता. ह्यासाठीं जातिभेद नष्ट झाला पाहिजे असें ह्या मंडळीस वाटूं लागलें होतें. आमच्या देशाच्या उन्नतीस ह्या सर्व गोष्टी बाधक आहेत असें त्यांस स्वानुभवानें कळूं लागलें होतें. नव्या शिक्षणाचा थोडासा आस्वाद मिळाल्यामुळें पुष्कळांच्या विचारांत व आचारांत झालेला फरक त्यांच्या लक्षांत आला होता. जुन्यावरील विश्वास उडाला, पण त्याच्या ऐवजीं नवीं धर्मबंधनें न आल्यामुळें नास्तिकतेकडे लोकांचें मन वळत होतें, देवधर्मावरील विश्वासच नष्ट होत होता; तसेंच चोहींकडे ख्रिस्ती धर्माचें पसरलेलें जाळें ते पहात होते, तरी ख्रिस्ती धर्म त्यांस पसंत नव्हता, तथापि हे आपले सर्व विचार उघडपणें बोलून दाखवून ते मान्य असणारांची एक संस्था स्थापण्याचें धैर्यही त्यांस नव्हतें. हे व अशा प्रकारचे विचार विशेषतः दादोबा पांडुरंग, राम बाळकृष्ण, मोरोबा विनोबा, डा. आत्माराम पांडुरंग, तुकाराम तात्या, बाळाभाऊ शिंत्रे, सखारामशास्त्री, लक्ष्मण शास्त्री हळबे, भिकोबा लक्ष्मण व सखाराम लक्ष्मण चव्हाण वगैरे गृहस्थांच्या

मनांत घोळत असतांना, पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांचा व राम बाळकृष्णांच्या भेटीचा योग मुंबई शहरीं आला. ईश्वरचंद्र हे केवळ विधवाविवाहाच्या चळवळीचे पुढारी नव्हते. आपल्या समाजाची सर्वांगीण उन्नति व्हावी अशी तळमळ त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली होती. ईश्वरचंद्राची आस्था, विद्वत्ता व सत्यनिष्ठा, विचारगांभीर्य व पावित्र्य यांचा राम बाळकृष्णांच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला. पंडितजींनीं जातांना आपली तसबीर त्यांस बक्षिस दिली, तिच्या मागें राम बाळकृष्णांनीं पुढील ओळी लिहून ठेविल्या आहेतः—

" माझे परमपूज्य मित्र पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांचेंच नांव मीं माझ्या दुसऱ्या मुलास ठेविलें आहे. पंडितजींच्या अंगीं संस्कृत व इंग्रजी वाक्पटुत्व उत्तम प्रकारचें असून आपल्या देशबांधवांची सर्वांगीण सुधारणा व्हावी, एतदर्थ त्यांच्या अंतर्यामीं वसत असलेली तळमळ, आस्था व उत्साह यांजबद्दल ज्यांना म्हणून त्यांच्या सत्समागमाचा लाभ घडला आहे ते सर्व त्यांचें फार कौतुक करितात. आपल्या देशबांधवांच्या शिक्षणोन्नतीप्रीत्यर्थ त्यांचा उद्योग अविश्रांत चालू आहे. आणि तें शिक्षण सुलभ व्हावें म्हणून त्यांनीं स्वतः परिश्रमपूर्वक वंग भाषेंत विद्यार्थ्यांस उपयुक्त अशीं अनेक सुंदर पुस्तकें लिहिलीं आहेत. विधवापुनर्विवाहाच्या प्रचारास कलकत्त्यांत प्रथम त्यांनींच सुरुवात केली व तन्निमित्त त्यांनीं स्वार्थत्यागपूर्वक अमित द्रव्यव्यय केला आहे व फार झीज सोशिली आहे. पंडितजींच्या अंतःकरणाचें औदार्य अनुपम आहे. माझ्या पहाण्यांत तरी पंडितजींसारखा स्वदेशबांधवांवर शुद्ध सात्विक प्रेम करणारा भूतदयात्मक* आणि उदार पुरुष दुसरा नाहीं. " पंडित ईश्वरचंद्र महर्षि देवेंद्रनाथांच्या तत्त्वबोधिनी सभेचे सभासद होते. परमहंस मंडळींत त्यांचें त्यावेळीं ब्राम्हसमाजा संबंधानेंही संभाषण झालें असावें. शेवटीं कलकत्त्याप्रमाणेंच चळवळ सुरू न करितां अल्प प्रमाणावर येथें चळवळ सुरू करण्याचा निश्चय होऊन १८४०† च्या सुमारास परमहंस मंडळीची

---

* ही माहिती रा. रा. गोविंद मल्लिनाथ ठेंगे ह्यांनीं लिहिलेल्या व मासिक मनोरंजनांत प्रसिद्ध झालेल्या चरित्रपर लेखांतून आम्हीं घेतली आहे.

† परमहंस मंडळीचे पहिले व शेवटले अध्यक्ष जरी राम बाळकृष्ण हे होते, तरी रा. ब. दादोबा पांडुरंग ह्यांनीं मंडळीची स्थापना केली असें परमहंस मंडळीच्या दोन सभासदांनीं लिहून ठेविलें आहे. परमहंस मंडळीच्या सभेंत दादोबांनीं लिहिलेल्या प्रार्थना वाचीत असत. परंतु दादोबा व प्रभाकर पत्राचे

स्थापना झाली. प्रथमतः ही एक गुप्त मंडळीच होती. नंतर तीस परमहंस मंडळी असें नांव देण्यांत आलें असें डा. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या चरित्रांत म्हटलें आहे. रा. रा. रामचंद्र बाळकृष्ण जयकर (वरील राम बाळकृष्ण) हे ह्या सभेचे पहिले व शेवटचे अध्यक्ष होते. परमहंस सभेच्या बैठकी बहुतकरून त्यांच्याच येथें भरत असत† व ज्यावेळीं कांहीं अडचण असेल त्यावेळीं डा. आत्माराम पांडुरंग यांच्या येथें सभा भरत. ह्या संस्थेसंबंधानें आज असावी तशी माहिती उपलब्ध नाहीं. जी माहिती आम्हांला मिळाली आहे तिच्या आधारें आम्हीं पुढील विवेचन केलें आहे. ह्या संस्थेनें धर्मविषयक सिद्धान्त जरी ठरविले नव्हते, तरी प्रतिमापूजन व जातिभेदत्याग हे सभेचे मुख्य उद्देश होते ह्याविषयीं कांहीं संशय नाहीं. राम बाळकृष्णांच्या चरित्रपर लेखांत आमचे मित्र रा. रा. गोविंद मल्लिनाथ ठेंगे ह्यांनीं म्हटलें आहे कीं "मूर्तिपूजेचा तीव्र निषेध व एकेश्वरी मताचा अंतःकरणपूर्वक पुरस्कार, त्याचप्रमाणें ईश्वराचें पितृत्व व मानवांचें बंधुत्व या तत्त्वांच्या भक्कम पायावर प्रेमसाम्राज्याची उभारणी, अर्थात ह्या तत्त्वास विघातक व हिंदुसमाजाच्या नाशास सर्वस्वी कारणीभूत झालेल्या द्वेषमूलक जातिभेदाचा समूल उच्छेद हे या सभेचे मुख्य उद्देश होते. शिवाय, विधवाविवाह धर्मशास्त्रसंमत आहे म्हणून शक्य त्या सर्व उपायांनीं त्यास उत्तेजन देऊन तो समाजांत रूढ करण्याचा प्रयत्न करणें हाहि ह्या सभेचा एक उद्देश होता." ईश्वराचें पितृत्व व मनुष्याचें भ्रातृत्व ह्यावर मंडळीचा जोर होता व हें प्रत्येकास सभासद होतांना आपल्या आचरणानें पटवावें लागे. परंतु जातिभेद उघडपणें मोडण्यास लागणारें संख्याबळ आपल्यापाशीं तूर्त नाहीं अशी वस्तुस्थिति असल्यामुळें सभेचें काम गुप्तपणें चालत असावें. त्याचप्रमाणें जातिभेद मोडल्याची साक्ष म्हणजे पावरोटी सर्वांसमक्ष खाणें. सभेस प्रारंभ होतांना

---

चालक रा. रा. भाऊ महाजन हे सभेमध्यें प्रसिद्धपणें भाग घेत नसत व सर्वांत मिसळत नसत. उलटपक्षीं राम बाळकृष्ण उघडपणें पुढाकर घेत असत म्हणून त्यांची योजना अध्यक्षपदीं झालेली असावी.

† डा. भांडारकरांच्या उद्गारांत (पृ. १८) फणसवाडींतील दुमेळ्याच्या चाळीचा उल्लेख आहे. यावरून इतकेंच होतें कीं, परमहंस मंडळीचे सभासद सभेच्या मुख्य ठिकाणींच व्हावें लागत नसावें.

व ~~सभेचें काम संपलें म्हणजे देवाची प्रार्थना करण्याचा प्रघात~~ असे. ह्या प्रार्थना बहुतकरून रा. ब. दादोबा पांडुरंग ह्यांनीं लिहिलेल्या असत. परमहंस सभेच्या शाखा पुष्कळ ठिकाणीं होत्या. सभेचे नियम वगैरे साधे होते, तरी ते प्रसिद्ध झालेले नव्हते. तथापि दादोबा पांडुरंग ह्यांनीं लिहिलेला हा ग्रंथ मंडळीस संमत होता व कोणीही नवीन सभासद झाला, म्हणजे त्यास तो वाचावयास देत असत. त्या वेळीं हा निबंध छापलेला नव्हता. तरी त्याची लेखी प्रतच सभासद वाचीत असत. ह्यांत विशेषतः ब्राह्मधर्माचेंच प्रतिपादन केलेलें आहे. कोणताही केवळ एकच धर्म ज्याप्रमाणें ईश्वरदत्त नाहीं, त्याचप्रमाणें कोणताही एकच धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत व ईश्वरदत्त नाहीं असें यांत प्रतिपादन केलें होतें. त्याच प्रमाणें दादोबांनीं "**पारमहंसिक ब्राह्मधर्म**" ह्या नांवाचें एक ओवीबद्ध प्रकरण तयार केलें होतें. ह्या ओंव्या सुंदर व निश्चित सिद्धांतप्रतिपादक आहेत. ह्या निबंधांतील व ओंव्यांतील कांहीं उतारे पुढें दिले आहेत त्यांवरून त्यांतील विवेचनाची वाचकांस कल्पना होईल.

**धर्मविवेचन**

---

## धर्मविवेचन.

माझ्या अल्पमतीनें तर मला असें वाटतें कीं, जसे दया शांति क्षमा इ० मानसिक विकार मनुष्यमात्रास न्यूनाधिकपणें साधारण होत, तद्वत धर्मवासना म्हणजे पारमार्थिक बुद्धि ही पण एक मनुष्याची परमकल्याण करणारी मानसिक वृत्ति होय. अर्थात जें परमकल्याणकारक त्यास ईश्वरदत्त म्हणावयास चिंता नाहीं, म्हणून पूर्ण निर्णयाच्या ठायीं सांगितलेला जो धर्म तोच ईश्वरदत्त धर्म होय. तद्व्यतिरिक्त जो पारमार्थिक धर्म म्हणून मानितात तें शुद्ध लोकांचें अज्ञान होय, यांत संशय नाहीं. या संसारांत नीतिपूर्वक चालणें; काम, क्रोध, मोह, मद, मत्सर, आलस्य इत्याद्यनेक मानसिक मळ काढून आपलें मन पवित्र राखण्याचा, तसेंच ज्ञान, दया शांति, क्षमा, सत्य, न्याय, परोपकार, सदुद्यम, लीनता इत्याद्यनेक सद्गुण आपल्या ठायीं संपादन करण्याचा अभ्यास ठेवणें; आणि इतकें करून या नाशवंत प्रपंचाच्या ठायीं आसक्त न होतां अहर्निश सर्वांचा आदिमध्यावसानरूप जो एक परमेश्वर त्यानें आपणावर दया करावी म्हणून त्यास अनन्यभावें शरण जाणें, हाच सर्व पृथ्वींतील पारमार्थिक धर्मांचा सिद्धांत होय, यांत कांहीं संशय नाहीं.

परंतु बहुधा सर्व लोक हें धर्माचें मुख्य तात्पर्य सोडून, सोंगासारख्या बाहेरील आचरणास भुलून अज्ञानेंकरून आणि दुराग्रहेंकरून परंपरागत आलेल्या आपल्या वडिलांच्या चालीसच धर्म मानून व्यर्थ निरनिराळे पडले आहेत. हा मनुष्यांमध्यें एक शोचनीय चमत्कार आहे. बरें, नुसते देशभाषापरत्वें निराळे पडून आपआपल्या समजुतीनें निमूटपणानें चालते तरी त्यांत फारसा अनर्थ न होता. परंतु मनुष्याचा किती अज्ञानपणा व दुष्टपणा सांगावा कीं, ज्या वस्तूंत कांहीं सार नाहीं, जो परमार्थ नव्हे, असें सर्वांच्या शास्त्रांत संमत असतां व परमार्थ म्हणून सर्वांच्या शास्त्रांत एकच संमत असतां, निःसार वस्तूविषयीं मोठमोठे वाद, कलह आणि शेवटीं रणें करून त्यांत लक्षावधि गरीब जीवांच्या हत्या करून लोक आपआपलीं निरनिराळीं दुकानें काढून बसले आहेत. वस्तुतः सर्वांच्या दुकानीं सारवस्तु म्हणून एकच विकण्याची आहे; परंतु तें लहानसें असल्यास या दुकानाच्या पसाऱ्यांत कोणी-कडेस पडून गेलें आहे तें कोणी जाणतच नाहीं; आणि त्याचे ग्राहकहि फार थोडे. बहुधा सर्व व्यवहार गारमण्यांशींच चालला आहे. वाण्यासही माहीत नाहीं कीं मी काय विकतों आणि गिऱ्हाइकासही माहीत नाहीं कीं मी काय घेतों. ज्यास खऱ्या रत्नाची परीक्षा आहे, तो मात्र ह्या बाजारांत जो अंधळा व्यवहार चालला आहे तो जाणतो. परंतु असे परीक्षक फार विरळा, म्हणून हा खोटा व्यवहार मोडण्यांत त्यांचें कांहीं चालत नाहीं.

* * *

परमार्थास मुख्य स्थानापन्न करून केवळ तदर्थ साधनभूत ज्या क्रिया असतील त्यांचें अवलंबन करणें अथवा त्याग करणें यांत कांहीं अर्थ नाहीं व तो आमचा धर्म नव्हे, असें समजून त्याविषयीं मनांत किमपि दुराग्रह न धरितां सर्वांनीं परस्परांशीं अत्यंत स्नेहभावानें चालावें. वैदिक धर्मानुयायी पाटावर बसून गीतापाठ करून भगवंताची स्तुति करितो, महमदधर्मानुवर्ती कुराणाचें आवर्तन करून नमाज पढतो आणि येशुमार्गावलंबी बैबल वाचून गुडघे टेंकून आपले भाषेंत सर्वांचा अंतःकरणसाक्षी जो भगवान त्याची प्रार्थना करितो; इतक्या-वरून हा धर्म आपल्या धर्माहून फार निराळा होय असें मानून एकमेकांनें एकमेकांचा द्वेष करूं नये. त्यांत आणखी मला तर असें वाटतें कीं, असंस्कृत अर्भकाप्रमाणें निरभिमानी होत्साता मनुष्यांनीं परस्परांचीं मतें व त्यांचे मूळ तात्पर्यें यांचें नीट विवेचन व समतोलन केलें व ज्या मताची व विचाराची जी न्यूनाधिक योग्यता ती त्यास यथायोग्य दिली म्हणजे बहुधा कोठेंच विरोध

दिसणार नाहीं, अथवा दिसला तर फार अल्प, गणायाजोगा नाहीं, इतका दिसेल इतकेंच नाहीं, परंतु मला तर असें वाटतें, आणि सर्वांनीं जर परस्परांचे धर्मासंबंधीं विचार पाहिले आणि एकमेकांनीं एकमेकांचे ग्रंथ वाचले, तर त्यांसही वाटूं लागेल कीं, शुद्ध आत्मज्ञान व आत्मकल्याण एतत्संबंधीं विचारांत तर परस्परांची एक-वाक्यता केली असतां व्हावयास फार मोठी अडचण पडणार नाहींच, परंतु ज्या बाहेरील धर्मसंबधीं क्रिया, ज्यांतून कित्येकांस बालचेष्टा म्हणून वर म्हटलें आहे त्यांचीही एकार्थता मानावयास फारसें अवघड पडणार नाहीं.

*   *   *

मुळीं प्रत्येक मनुष्यानें आपल्या मनांत असा विचार करावा कीं, मी जो आपल्या धर्माविषयीं इतका आग्रह धरतों तो कशावरून बरें, याचें मूळ काय; असा आपल्या मनाशीं विचार करून तो ह्या आग्रहाचें मूळ शोधूं लागला म्हणजे त्याच्या अनुभवास येईल कीं, जन्मादारभ्य संपादित जो मनास संसर्ग तोच ह्या दुराग्रहाचें कारण होय. ज्या लोकांत माझा जन्म झाला आहे, आणि ज्या विचारांत बाळपणापासून माझें अंतःकरण रंगून गेलें आहे, आणि इतरांच्या विचारांशीं आणि माझ्या विचारांशीं तुलना करावयास मला सोय सांपडली नाहीं, हींच सर्व माझ्या दुराग्रहाचीं मुळें. हा जो मी आज एखाद्या गोष्टीविषयीं इतका आग्रह धरितों तोच मी ज्या कुळांत ह्या गोष्टीचा आग्रह नाहीं त्यांत जन्मलों असतों तर असा आग्रह धरून बसलों नसतों. तस्मात कोणत्या एखाद्या ग्रंथाविषयीं अथवा पुरुषाविषयीं आज माझी श्रद्धा बसून गेली आहे, हें बहुतकरून सर्व माझ्या संसर्गाचेंच फळ. या संसर्गाची सत्ता अल्प समजूं नये. यामुळें जे जे विचार प्राप्त होतात ते कालेंकरून मनुष्याच्या मनांत इतके दृढमूल होतात कीं पुढें त्यांस तेथून उपटणें फार कठिण पडतें ! ही सत्ता व्यापकही तशीच आहे. मला तर सारी पृथ्वी ह्या सत्तेखालींच लीन दिसती. ह्या पृथ्वीच्या पृष्ठावर ज्या लोकांत आपला जन्म झाला आहे त्यांच्या मंडळांत वागून अंतःकरण आरशासारखें निर्मळ ठेवणारे व सर्व पृथ्वी हें आपलें घर होय, तिजवर राहणारीं सर्व मनुष्यें आपण एका कुटुंबांतील मुलें होत. जें त्यांचें तें माझें आणि जें माझें तें त्यांचें. वेद, कुराण, एंजील आणि इतर धर्मपुस्तकें, ह्यांच्या ठायीं समानबुद्धि ठेवणारे, म्हणजे ही सर्व पौरुषकृति– अर्थात अविवेकी पुरुष जसें मानितात कीं हे ग्रंथ साक्षात ईश्वरानें आम्हांकरितां लिहून स्वर्गांतून पाठविले, तसें नाहीं; मनुष्याचे मनांत जे सद्विचार व सद्वासना

उत्पन्न होतात ती मात्र ईश्वरी प्रेरणा होय. म्हणून ह्या ग्रंथांत जे पारमार्थिक सद्विचार व सदुपदेश आहेत ते ईश्वरप्रेरित असा अर्थ–त्यांत ग्राह्य वस्तु कोठें कां असेनात, त्यांचें मला ग्रहण करण्यास बाध नाहीं, तसाच त्याच वस्तूचा त्याग करावयासही मला प्रतिबंध नाहीं अशी असंस्कृत ( ? ) निर्मळ वृत्ति ठेवून सर्व मनुष्यमात्राशीं बंधुत्वाच्या नात्यानें वागणारे असे पुरुष फार विरळा. म्हणून जगांत राहून जगांतील जे परमज्ञानी त्यांच्या कोटींतले हे सुज्ञ पुरुष.

---

## पारमहंसिक ब्राम्हधर्म.

सर्व या पुस्तकीं । एकही वचन । पदरींचें ज्ञान । नसे माझें ॥
पहा तुम्ही सर्व । ज्ञानियांचे ग्रंथ । मुख्य तो भावार्थ । हाचि असे ॥
पहा भागवत । गीता शास्त्र तत्त्व । उपनिषत्तत्त्व । पहा तुम्ही ॥
सर्व देशीं झाले । साधु व महंत । वाक्यें व सिद्धान्त । पहा त्यांचे ॥
सिद्धान्ताचीं वाक्यें । जरी निवडाल । विरोध पहाल । न तो एक ॥
पाखंडी व स्वार्थी । असे ग्रंथ रेळ । तिशीं तो न मेळ । मिळे माझा ॥
कसें तें मिळावें । पाण्यानीं तेलानीं । तैसें वचनांनीं । माझ्या त्यांच्या ॥
ग्रंथें ह्या अज्ञांचें । विशेषेंकरून । भिक्षुकांचें मन । खवळेल ॥
कसा क्रोध ये ना । वर्ना पारध्यांना । त्यांच्या सावजांना । हुस्कावितां ॥
कोणी क्षेत्रग्रामीं । सर्व पुण्यदेशीं । ज्ञानगुणराशी । असाल जे ॥
दया भक्तिशील । मनाचे मवाळ । करिती हळहळ । देशाची या ॥
घ्यावें हातीं त्याणीं । संकल्पाचें जल । मार्ग हा प्रांजळ । चालवाया ॥
ब्राम्ह मंडळींत । कीं एका समोर । बोलावा विचार । आपला हा ॥
प्रविष्ट पुस्तकीं । स्वनाम लिहून । द्यावें आलिंगन । ब्राम्हांस तैं ॥
तिथेंच करावें । प्रीतीचें भोजन । विधि हा संपूर्ण । होय तेव्हां ॥
वृद्धिंगत होई । स्नेह एकमेकीं । ऐशा वागणुकी । चालवाव्या ॥
उघडें सांगावें । आहों ब्राम्ह आम्ही । असा जर तुम्ही । पुजूं तुम्हां ॥
आदर आतिथ्य । करावें तुमचें । कर्तव्य आमुचें । प्रसंगीं या ॥
भोजनास त्यास । पाचारावें घरीं । अनुकूल जरी । पडे त्यांना ॥
ब्राम्हधर्म प्रीति । वाढवावी लोकीं । विनाप्रीति एकी । कैशी व्हावी ॥
असे घट्ट लोकीं । प्रीतीचें बंधन । नसताती जाण । फोल सर्व ॥

पांडुरंगात्मज । विनवी हा दादो । हृदयीं या नांदो । ब्राम्हप्रीति ॥
कराल न थोडें । जगीं तुम्ही पाप । जरीं नाम लोप । करा माझा ॥
यांतील वचना । जरी पुष्टी द्याल । प्रसन्न कराल । जगदीशा ॥

---

मन द्या देवाला । सोडा अभिमान । शुद्ध करा मन । ब्राम्हधर्मे ॥
करा किंवा टाका । बाह्य धर्म सोंग । ठेवा अंतरंग । शुद्ध तरी ॥
परी नका होऊं । स्पष्ट मी सांगतों । इतोभ्रष्टस्ततो । भ्रष्ट तुम्ही ।
बोला अल्प किंवा । नका कांहीं बोलूं । सत्कर्मी द्या चालूं । हातपाय ॥
क्रियावान तोचि । पंडित म्हणोन । सांगे गीतेंतोन । कृष्ण तुम्हा ॥
कर्मेचि देताति । फलें सर्व लोकीं । सांगे बुद्ध नाकीं । देव सारे ॥
म्हणोनिया दावा । सदाचरणांत । ज्ञानाचा तो अंत । दादो म्हणे ॥
अर्पितों विनयें । सत्य हीं वचनें । निरभिमानानें । घ्याल जरी ॥
जरी आज तुम्ही । तुच्छ हीं कराल । भागास येतील । घ्याया उद्यां ॥
काल चक्रगती । पाहतों सकल । लाविती लावील । याच पंथा ॥
परी न हो त्यांत । तुमचा गोंधळ । तुटल्यानें मेळ । एकेकाचा ॥

---

या पुस्तकांत (१) ईश्वरभक्ति व भूतदया (२) आचार (३) उपनयन (४) विवाह (५) उत्तरक्रिया (६) भक्ष्याभक्ष्य (७) शुद्धाशुद्ध-पापपुण्य (८) दैविक ग्रंथ व महद्वाक्यें (९) धर्मबंड (१०) दांभिकाचार इत्यादि प्रकरणें आहेत. हें पुस्तक रा. ब. दादोबा पांडुरंग यांनीं केव्हां लिहिलें तें माहीत नाहीं; परंतु तें १८८१ मध्यें त्यांनीं प्रसिद्ध केलें होतें.

परमहंस मंडळीचे स्थापक व अध्यक्ष राम बाळकृष्ण हे एक थोर व विवेक-संपन्न गृहस्थ होते. हे वयाच्या ४० व्या वर्षीच जर मृत्युमुखीं पडले नसते, तर परमहंस सभेच्या अस्तानंतर हे स्वस्थ बसले नसते व निराळयाच रीतीनें मागील अनुभव लक्षांत घेऊन त्यांनीं आपल्या विचारानुसार संस्था काढिली असती. त्यांच्या चरित्रविषयक लेखांत त्यांच्या विचारांची जी पुढें माहिती दिली आहे त्यावरून त्यांच्या थोर योग्यतेची कल्पना होते.

" राम बाळकृष्ण हे एकेश्वर मताचे असून जातिभेदाचे कट्टे दुष्मन होते. आपल्या आचरणांत देखील त्यांनीं कोणत्याही प्रकारचे जातिनिर्बंध पाळले नाहींत

व आपल्या मतांच्या प्रसारार्थ शक्य तितका प्रयत्न करण्यांत केव्हांहि कसूर केली नाहीं. हे विधवाविवाहाचे कट्टे कैवारी असून स्त्रीजातीविषयीं, स्त्रीजातीच्या शिक्षणाविषयीं व स्वातंत्र्याविषयीं त्यांचीं मतें फार उदार व प्रागतिक होतीं....स्त्रियांसंबंधीं बेपर्वाईची वृत्ति धारण करून हिंदुसमाजानें आपलें महत्वाचें अंग लुलें पाडून स्वतःचें अनहित करून घेतलें आहे. ही समाजाची बिघडलेली घडी नीट बसविल्याशिवाय त्याचें पाऊल प्रगतीच्या मार्गांत वेगानें पुढें पडणें अशक्य आहे, हें पाऊणशें वर्षांपूर्वी ज्यांना दिसून आलें व ज्यांनीं त्यासंबंधीं उपाययोजना केली असे हाताच्या बोटांवर मोजतां येण्या एवढे जे सुधारक होऊन गेले त्यांत राम बाळकृष्णांची गणना केली पाहिजे.......समाजसुधारणेच्या, राष्ट्रसुधारणेच्या कार्यक्रमांत स्त्रीवर्गाच्या सर्वांगीण उन्नतीच्या प्रश्नास अग्रस्थान देणें अवश्य आहे अशा प्रकारचे अत्यंत प्रगल्भ व उदार विचार राम बाळकृष्णांचे होते.......त्या प्रतिकूळ काळांत देखील समाजाच्या इतराजीची बिलकुल परवा न बाळगतां राम बाळकृष्णांनीं आपल्या नेहमींच्या खंबीर वृत्तीनें स्त्रीशिक्षणाचा पुरस्कार केला, एवढेंच नव्हे तर त्याचा उत्तम लाभ त्यांनीं आपल्या मुलींस घडवूनही दिला."

परमहंस मंडळी केवळ मुंबई पुरतीच नव्हती. हिच्या शाखा पुणें, अहमदनगर, सातारा, बेळगांव, रत्नागिरी इ० स्थळीं होत्या. एकंदर सभासद जवळ जवळ एक हजारपर्यंत असावेत असें १८८५ सालीं Political Rishi अशी सही करणारांनीं जाहीर केलें होतें. तथापि ह्या मंडळीच्या कामकाजासंबंधानें एकंदर समाजांत बरीच चर्चा सुरू झाली. कोणी एक नवीन तरुण गृहस्थ नियमाप्रमाणें शपथ वगैरे घेऊन मंडळीचा सभासद झाला व नंतर त्यानें मंडळीचें दप्तरच लांबविलें. मि. नारायण रघुनाथ ह्यांनीं सभा मोडण्याचें कारण असें दिलें आहेः—

"I do not know exactly who betrayed the secret of the Society. Some members of the Prabhu community, I believe, spread some reports as to what they eat and as to who the enlisted members of the Sabha are. People began making minute enquiries. This disheartened most of the members and the attendance gradually thinned and ultimately the Sabha became a thing of the past."

मंडळीचें दप्तरच ज्यानें लांबविलें तो तितकें करून स्वस्थ बसला नाहीं. त्यानें सभासदांचीं नांवें प्रसिद्ध केलीं व सभेच्या हेतूंचा विपर्यास करून अद्वातद्वा टीका सुरू झाली. दप्तर चोरून नेणारानें ही सर्व सभासद मंडळी लवकरच ख्रिस्ती होणार व त्यांचा बाप्तिस्माही अमुक दिवशीं होणार अशी भुमका उठविली ! याचा परिणाम असा झाला कीं शाळेंत जाणाऱ्या मुलांना कोणत्याही सभेस जाण्याची बंदी आईबापांनीं केली. कित्येकांनीं मिशनरी शाळांतून आपलीं मुलें भराभर काढलीं व कांहींनीं आपल्या मुलांना बाहेरगांवीं पाठवून दिलें. एका अशा विद्यार्थ्यानें बाबा पदमनजींना लिहिलें कीं, "मला आपल्या धन्य शाळेपासूनच दूर राहणें प्राप्त झालें आहे असें नाहीं, तर कोणत्याही गुप्त किंवा प्रसिद्ध सभेसही जाण्याची मला मनाई आहे." दुसऱ्या एका टीकाकारानें ह्याही पलीकडे मजल नेली. ह्याचा धंदा कसबिणींस लावण्या व पदें शिकविण्याचा होता. ह्यानें परमहंसमतप्रशंसा नांवाचें एक चोपडें प्रसिद्ध केलें व त्यांत मंडळीसंबंधानें धडधडीत खोटीं विधानें करून लोकांमध्यें खळबळ उत्पन्न केली. परंतु लोकांमध्यें जें प्रतिकूळ मत झालें त्याचा प्रतिकार करण्याचे प्रयत्न फारसे झाले नाहींत. नाहीं म्हणावयास प्रभाकर पत्राचे संपादक रा. रा. भाऊ महाजन ह्यांनीं स्पष्ट अभिप्राय देऊन लोकांस वस्तुस्थिति निवेदन करण्याचा प्रयत्न केला, व शेवटीं रागानें असेंही म्हटलें कीं, " हा कवि तर चावट आहे हें सर्व मुंबईंत प्रसिद्ध आहे; आणि याच्या कवनाची वास्तविक किंमत लोक जाणतच आहेत. परंतु आधीं ह्या लोकांस विद्येची अभिरुची नाहीं, आणि तशांत अज्ञ लोकांच्या मनास सुकर्मापासून भ्रष्ट करावयास हा पहात आहे; परंतु आम्हांस मोठें आश्चर्य वाटतें कीं, एकापेक्षां अधिक बडे लोकांनीं ह्या चोपड्यास आश्रय दिला आहे अशी जी गांवांत बातमी उठली आहे, ती जर खरीच असली, तर ह्या असल्या नीच व बीभत्स कवनास एकापेक्षां अधिक बडे लोकांनीं आपला आश्रय द्यावा. येणेंकरून त्यांस त्रिवार धिक्कार असो. "

परमहंससभेच्या संबंधानें एकवाक्यता आढळत नाहीं ही फार दिलगिरीची गोष्ट* आहे. सभेचा व्यवहार गुप्तपणें चालत असे असें बहुतेकांचें म्हणणें आहे,

---

*परमहंस सभेच्या हकीकतींत एकवाक्यता नाहीं असें वर आम्हीं म्हटलें आहे. त्यामुळें वाचक थोडा बुचकळ्यांत पडतो. डा. रामकृष्णपंत भांडारकर परमहंस सभेचे सभासद होते किंवा नाहीं त्याची आम्हांला माहिती नव्हती; ते सभासद असले तरी कोणत्या प्रकारचे सभासद होते हेंही ऐकिवांत नव्हतें. परंतु वरील

ह्यावरून कांहींशी मेसानिक पद्धत सभेच्या चालकांनीं योजिली असावी असें वाटतें. मुंबईचें वर्णनकार म्हणतात "ह्यांचे प्रयत्न एवढेच होते कीं, सोवळ्याओवळ्याचा व खाण्यापिण्याचा जो हिंदु लोकांस मोठा प्रतिबंध आहे, तो मोडून टाकून सर्व एकमय करावें. हे त्यांचे आंतून प्रयत्न होते. परंतु बाहेरून ते आपलें मत एकाएकीं कळवीत नसत. ह्यांचा बेत असा होता कीं, पुष्कळ समुदाय जमला, म्हणजे मग प्रगट होऊन आपला कृतसंकल्प सिद्धीस न्यावा. ह्याच्या शाखा कलकत्ता मद्रास काशीपर्यंत गेल्या होत्या असें सांगतात." यावरून असें होतें कीं, फक्त हिंदूंचीच ही संस्था होती. परंतु खरा प्रकार तसा नव्हता. अहमदनगर येथील शाखेचे मि. कासमभाई महमदजी ढालवाणी हे सभासद होते.

---

सर्व मजकूर लिहून गेल्यानंतर परमहंस सभा व तत्कालीन स्थिति ह्या संबंधानें त्यांनीं स्वतः लिहिलेली हकीकत आमच्या हातीं आली. दुसऱ्या आर्यन ब्रदरहूड कान्फरन्ससाठीं त्यांनीं जें भाषण लिहून काढिलें होतें त्यांत ते म्हणतातः—

इंग्रजी शिक्षणामुळेंच आपल्यामध्यें राष्ट्रविषयक भावना जागृत झाली आहे यांत कांहीं संशय नाहीं. ह्या शिक्षणामुळेंच आमच्यांतील वैगुण्याचा विचार जागृत होऊन, राजकीय, सामाजिक, नैतिक व धर्मविषयक सुधारणा कशा करितां येतील त्याच्या विचारास आपण लागलों. हेच खरे राष्ट्रीय प्रश्न होत, व राष्ट्राच्या उन्नतीचाच आपण विचार करीत आहों. स्त्रीशिक्षणाच्या प्रश्नाकडे आपल्या लोकांचें लक्ष्य प्रथम वेधलें. नंतर बालविवाहाचा प्रश्न पुढें आला; विधवाविवाहाचा प्रश्न त्यानंतरचा आहे. सुमारें १८५० सालीं जातिभेद हा राष्ट्रघटनेच्या आड येत असतो हा विचार लोकांच्या पुढें विशेषरूपानें आला, आणि त्याच वेळीं रा. ब. दादोबा पांडुरंग हे नारमल क्लासांतील आपल्या विद्यार्थ्यांस जातिभेदापासून किती अनिष्ट परिणाम होत आहेत ते सांगून जातिभेद नष्ट झाला पाहिजे असें प्रतिपादीत असत. त्यांनीं परमहंस सभा स्थापन केली होती. ह्या परमहंस सभेची हळुहळू सारखी भरभराट होत गेली. मंडळीमध्यें कोणासही सभासद करून घेते वेळीं त्यास प्रथम एक प्रार्थना वाचावयास सांगत; नंतर जातिभेद न मानण्याची तयारी झाली आहे असें पटवून देण्यासाठीं किरिस्तावानें तयार केलेल्या पावाचा एक तुकडा खावयास देत असत. वर्षांतून एकदां, किंवा कधीं अनेक वेळां, निरनिराळ्या जातींच्या लोकांचें मिळून सहभोजन होत असे. परंतु

ह्या सर्व माहितीवरून पुढील अनुमानें निघतातः—

( १ ) परमहंस सभा स्थापन करणारांत रा. ब. दादोबा पांडुरंग व राम बाळकृष्ण ह्यांचें मुख्य अंग होतें व पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांच्या विचारांचा राम बाळकृष्णांच्या मनावर विशेष परिणाम झाल्यानंतर परमहंस सभा स्थापन करण्यांत आली.

( २ ) प्रतिमापूजनत्याग, एका परमेश्वराची प्रार्थना करणें ह्या गोष्टी जरी सभासदांस मान्य असाव्या लागत, तरी ब्राह्म समाजाप्रमाणें केवळ धार्मिक उन्नतीस महत्त्व देऊन सामाजिक सुधारणा ही आध्यात्मिक उन्नतीचा साहजिक परिणाम होय इतकी विचारांस निश्चितावस्था आलेली नव्हती.

---

हें सर्व गुप्तपणें होत असे. नांवें उघडकीस आलीं तरी हरकत नाहीं असें कोणासही वाटत नसे. नारमल क्लासचे विद्यार्थी फणसवाडींत दुमेढ्याच्या चाळींत दुसऱ्या मजल्यावर रहात असत. हेच विद्यार्थी परीक्षा पास झाले म्हणजे शिक्षक म्हणून बाहेरगांवीं जेथें जेथें जात तेथें तेथें परमहंस सभेच्या मतांचा प्रसार व प्रचार करीत असत. ह्यांपैकीं एक विद्यार्थी रत्नागिरीस मास्तर होता. येथेंच १८५२ पर्यंत मी होतों. ह्या मास्तरानें पुष्कळांना परमहंसमताची दीक्षा दिली होती. माझ्या बरोबरीच्या एक विद्यार्थ्यानें परमहंसमताचा स्वीकार केला होता व तो मला वळविण्याचा प्रयत्न करीत असे. आम्ही संध्याकाळच्या वेळीं दूर दूर फिरावयास जात असूं व तेथें जातिभेद हा कसा घातक आहे, उच्चनीच भेदामुळें आपलें कसें नुकसान होत आहे व जातिभेद घालविल्यावांचून राष्ट्राची खरी उन्नति होणें कसें अशक्य आहे ह्या विषयांवर संभाषणें होत. हीं सर्व मतें माझ्या विचारांस पटलीं होतीं, परंतु त्यावेळीं मला सभासद करून घेतलें नव्हतें. पुढें १८५३ सालीं एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें मी अभ्यास करीत असतां वयाच्या १६ व्या वर्षी मी परमहंस सभेचा सभासद झालों. हा विधि वर म्हटलेल्या दुमेढ्याच्या चाळींत एका खोलींत झाला. ज्या वेळीं मला पावाचा तुकडा खावयास दिला व मी तो खाऊं लागलों त्यावेळीं माझ्या अंगावर शहारे उभे राहिले, जणूं काय मीं कांहीं तरी गैर केलें आहे असेंच वाटलें. अशा प्रकारें सुमारें १८६० पर्यंत परमहंस सभा चालू होती. नंतर कोणी तरी सभासदांच्या नांवाचेंच पुस्तक लांबविलें व त्यामुळें सर्वांचें धाबें दणाणलें व आपापल्या जातींकडून आपल्याला त्रास होणार असें ज्याला त्याला वाटूं लागलें. अशा प्रकारें परमहंस सभा मोडली व जातिभेदाचा प्रश्न दुसऱ्या संस्थेकडे सहज रीतीनें गेला.

( ३ ) परमहंस सभेच्या कार्यक्षेत्राला व्यवस्थित स्वरूप येण्यापूर्वीच तिचा बोभाटा झाला व ती संस्था लयास गेली. दर आठवड्यास जेव्हां सभा भरत त्या वेळीं व्यवस्थितपणें एखाद्या विषयावर वाद होत नसे. तथापि निरनिराळ्या विषयांवर कधींमधीं वाद होत असावेत. बाबा पदमनजी ह्यांनीं एका सभेंत अक्रूरानें गोपींस शिकविलेलें ब्रह्मज्ञान अशा विषयावर एक निबंध वाचल्याचा उल्लेख आढळतो. दर खेपेस आदीं व अंतीं प्रार्थना वाचल्या जात असत.

( ४ ) परमहंस सभेचीं कार्यें गुप्तपणेंच चालत होतीं. आपलीं मतें जाहीर करण्याची वेळ अद्याप आलेली नाहीं असें वाटून ही पूर्वतयारी चालू होती.

---

पुढें परमहंस सभेच्या कांहीं सभासदांस असें वाटूं लागलें कीं, सामाजिक सुधारणा ही जर चिरस्थायी व एकंदर समाजाच्या कल्याणास पोषक व्हावयास हवी तर तिचा पाया धार्मिक सुधारणा हा झाला पाहिजे. म्हणून त्यांनीं कलकत्त्याच्या ब्राह्मसमाजाच्या नमुन्यावर येथें प्रार्थनासमाजाची स्थापना केली. ( They organised the theistic body of the Prarthana Samaj on the model of the Bramha Samaj of Calcutta ) ईश्वराचें पितृत्व व मनुष्याचें भ्रातृत्व हीं दोन मुख्य तत्त्वें ह्या संस्थेचीं आहेत. जातिभेद नाहींसा करणें हें तत्त्व ह्यांत अंतर्गत असूनही त्यांत आणखी एक असा भाव आहे कीं, उच्चनीच भाव मनांत आणावयाचाच नाहीं. सर्व एका परमेश्वराचीं लेंकरें, सर्वांचा अधिकार समान इतकी मजल मारावयास इतर धर्मसंस्था तयार नसतात.

पूर्वीं असें वाटलें होतें कीं इंग्रजी शिक्षणामुळें जातिभेदाचें खूळ नाहींसें होईल, परंतु आज तसा अनुभव येत नाहीं हें उघड आहे. आणि जो निर्धार, जी निष्ठा व जो उत्साह जातिजातींतील उच्चनीच भाव घालवून, राष्ट्राच्या उद्धारासाठीं, सर्व लोकांमध्यें जागृत ऐक्य उत्पन्न करण्यास अवश्य आहे तो उत्पन्न करण्याचें सामर्थ्य इंग्रजी शिक्षणांत आहे कीं नाहीं याचीच मला कधीं कधीं शंका वाटूं लागते.

*सगळ्या एम्पायरचें हिंदुस्थान जर एक दोस्त व्हावयास पाहिजे, तर हिंदुस्थान एक झालें पाहिजे; अखिल भारतवर्षाचें अंतःकरण जणू काय एक असावयास पाहिजे, आणि हें हिंदूंतील जातिभेद नष्ट झाल्यावांचून व हिंदु व मुसलमान ह्यांच्यांत प्रेमभाव वाढल्यावांचून व्हावयाचें नाहीं. आतां आमचे प्रयत्न ह्या दिशेनें व्हावयास पाहिजेत.*

त्यामुळें कित्येक सभासदांतही असमाधान पसरूं लागलें होतें. कांहीं सभासदांचा अज्ञेयवाद अगर नास्तिक मत ह्यांकडे कल होता. कांहींचा ओढा ख्रिस्ती धर्माकडे होता हें बाबा पदमनजी, कासमभाई ढालवाणी, शाहूराव कुकडे इ० पुढें ख्रिस्ती झाले यावरून सिद्ध होतें. तथापि सामाजिक विषयांकडे यांचें विशेष लक्ष असे, हें ' वर्णसंकरा ' संबंधानें एका सभासदानें प्रदर्शित केलेल्या पुढील विचारावरून स्पष्ट होत आहे " वर्णसंकर व्हावा, म्हणजे कोणी कोणाचा द्वेष करूं नये, ब्राह्मणांनीं महारास तुच्छ मानूं नये व महारांनीं ब्राह्मणांशीं वैर करूं नये; शूद्रांनीं ब्राह्मणांस हात दाखवीन असें म्हणूं नये; हिंदूंनीं सर्व पृथ्वींतील देशांत व्यापारास जावें, तेथील लोकांशीं सख्यत्व करावें, त्यांची विद्या, कसबें शिकावीं, अडाणी समजुती सोडाव्या व स्वदेशांत परदेशांतील यंत्रें व हरएक हुन्नर आणावे. काशीपासून लंकेपर्यंत सर्वांच्या मनांत वर्तमानपत्रद्वारें एक सूत्र खेळत असावें. एकाचें दुःख तें सर्वांचें व एकाचें सुख तें सर्वांचें असें सर्वांनीं मानीत जावें. याप्रमाणें फार चांगला वर्णसंकर झाला म्हणजे सर्वांस सुखप्राप्ति होईल. अशा वर्णसंकराचीच सर्व सुज्ञ लोक मार्गप्रतीक्षा करीत आहेत. ( ज्ञानोदय-बाबा पदमनजी १८५१ )

(५) मि. नारायण रघुनाथ ह्यांच्या पत्रावरून असें होतें कीं, भिकोबा दादा चव्हाण, त्यांचे बंधु सखाराम लक्ष्मण, लक्ष्मण शास्त्री हळबे, सखाराम शास्त्री, बाळ भास्कर शिंत्रे, हे गृहस्थ परमहंस मंडळीची माहिती देणारे, लोकांच्या शंका निवारण करणारे, घरोघर जाऊन संभाषण वगैरे करून उदार विचारांचा प्रसार करणारे होते. कोणासही मंडळीचा सभासद करून घेत नसत. त्याच्या विचाराची खात्री झाली, मंडळीच्या विचारांवरील त्याची निष्ठा पटली म्हणजे त्यास मंडळीच्या बैठकींत सादर करण्यांत येत असे. *त्यावेळीं उमेदवारास सर्वांपुढें उभें करून त्याच्या हातावर

---

*When he gave his unqualified assent water was poured in his hand and he was told to throw it on the ground which was a token of his having broken caste and other religious prejudices. To test the sincerity of the newcomer, bread was cut into slices and all the members took of the same. The blessing of God was invoked on the candidate that He should bless him and inspire him with courage to continue faithful to the Paramhansa Mandali. Bhicoba Laxuman officiated on such occasions.

—*Narayan Raghunath.*

पाणी ओतून त्याचें संतर्पण करावयास सांगत, सर्व जुन्या व हानिकारक समजुतींवर पाणी सोडलें ह्याचें दर्शक हा विधि असे. नंतर हा निश्चय कायम राखण्याविषयीं भिकोबादादा चव्हाण परमेश्वराची प्रार्थना करीत असत.

अशा प्रकारें चालणाऱ्या ह्या सभेचा एकाएकीं अंत झाल्यानंतर बराच बोभाटा झाला; सभेचें काम बंद पडलें, तरी लोकांची टीका बंद झाली नाहीं; प्रभाकर पत्रासारख्या पत्रानें परमहंस मंडळीची बाजू राखण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याचा म्हणण्यासारखा परिणाम झाला नाहीं. मंडळीचे एक उत्साही सभासद व स्मालकाज कोर्टाचे जज्ज रा. मदन श्रीकृष्ण दुसऱ्या टोकाला गेले, म्हणजे परमहंस सभेचा त्याग करून ते देव मामलेदारांचे शिष्य बनले ! लक्ष्मण शास्त्री हळबे, सखाराम शास्त्री, ह्यांचा उत्साह जागच्या जागींच निवाला व हे जुन्या समाजांत मिळून गेले; बाबा पदमनजी ख्रिस्ती झाले; दुसरे कित्येक सभासदांचा उत्साह निवाला; पण राम बाळकृष्ण, डा. आत्माराम पांडुरंग*, तुकाराम तात्या,

---

* डा. आत्माराम पांडुरंग ह्यांचें अल्प चरित्र १८९८ सालीं प्रसिद्ध झालें होतें त्यांत परमहंस सभेसंबंधानें पुढील उल्लेख आहेः—

“ पूर्वीपासूनच स्वतंत्ररीतीनें उघडपणें लोकांस अरुचिकर अशा विषयांचा ऊहापोह करण्याची वहिवाट ह्या लोकनायकांनीं घातली असती, व विचारास योग्य वाटणारें आचरण गुप्त मंडळीच्या खोलींत मात्र व्हावयाचें ह्या प्रकारास जर त्यांनीं टाळा दिला असता, तर पुढें परमहंस सभेंतील सभासदांच्या नांवाचें पुस्तक लांबविल्याबरोबर जी तारांबळ उडाली ती उडाली नसती व नंतर तीं मतें मान्य असूनही उघडपणें एकेश्वरी धर्माप्रमाणें वर्तणाऱ्यांतून निघून जाण्याचा प्रसंग कांहीं लोकांवर आला नसता. ह्या संबंधाचे हे आमचे विचार डा. आत्माराम ह्यांस एके प्रसंगीं आम्हीं सांगितले. त्यावेळीं त्यांच्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें शांतपणें आमचें म्हणणें ऐकून घेतल्यावर ते म्हणाले, “ होय तुम्ही म्हणतां तें एकार्थी खरें आहे. त्याच वेळीं ह्या गुप्त मंडळीच्या किंवा परमहंस पक्षाच्या भानगडींत न पडतां, उघडपणें विचाराप्रमाणें आचारास जर आम्ही सुरुवात केली असती तर बरें झालें असतें खरें. पण, आमची ती जरी चूक झाली असली तरी ती सुधारणें तुमच्यासारख्या तरुणांच्या हातीं आहे ! आम्हीं जी चूक केली तीच तुम्हीं पुन्हा न केलीत म्हणजे सर्व वाद मिटणार आहे.”

भिकोबादादा चव्हाण, * बाळ भास्कर शिंत्रे इ० कित्येक मंडळींचे विचार कायम होते व त्यांस व्यवस्थित स्वरूप येत होतें. दुर्दैवानें राम बाळकृष्ण १८६५ सालीं ऐन उमेदींत असतांना परलोकवासी झाले. मध्यंतरीं मुंबईत पुष्कळ स्थित्यंतर झालें. व्यापार उदीम वाढला. त्यांत शेअर बाजारांत बऱ्याच उलाढाली होऊन शहरांत पैसा मुबलक झाला. १८६४ सालीं ब्राह्म समाजाचे प्रसिद्ध प्रचारक केशवचंद्र सेन ह्या शहरीं आले. त्यांचीं व्याख्यानें झालीं. पुष्कळ लोकांना तीं फार आवडलीं. परंतु धनाच्या विपुलतेमुळें लोकांचीं डोकीं फिरून गेलीं आहेत व सामाजिक व धार्मिक उन्नतीकडे लोकांचें लक्ष नाहीं ही गोष्ट त्यावेळीं स्वतः केशवचंद्र सेन यांच्याही लक्ष्यांत येऊन चुकली होती. असें जरी होतें तरी उदार धर्मविचार अगदींच नष्ट झाला नव्हता, हें पुढील गोष्टीवरून स्पष्ट होत आहे. ह्याच वर्षी केशवचंद्र मद्रास येथेंही गेले होते. १८६५ सालीं मद्रास येथें वेद-समाज नामक एक संस्था स्थापन झाली, तो केशवचंद्र सेन ह्यांच्या भेटीमुळेंच. ह्या समाजाचीं तत्त्वें व हेतु ह्यांसंबंधानें पुढें विवेचन येईलच. परंतु ह्या समा-जाच्या स्थापनेची बातमी देतांना इंदुप्रकाशाच्या इंग्रजी बाजूकडे एक संपादकीय सुंदर लेख प्रसिद्ध झाला होता. त्यांत संपादकांनीं मनुष्यास दुसऱ्या सर्व गोष्टी मुबलक असल्या, तरी त्यास नैसर्गिकरीत्याच धर्माची तहान कशी लागते, धर्माच्या आधारावांचून त्यास समाधान कसें प्राप्त होत नाहीं, अंतीं मनुष्याच्या व्यग्र चित्ताला धर्मच कसा शांति देऊं शकतो; ज्या वेळीं संचित ऐश्वर्याचा, आप्त स्वकीयांचा, मित्र बांधवांचा कांहीं उपयोग होत नाहीं त्यावेळीं धर्मच कसा हात देतो; मनामध्यें अनेक प्रकारचे विचारतरंग उत्पन्न झाले असतां मन चिंतेनें व्यग्र होतें तेव्हां, अगर पापपुण्याचे विचार मनांत येतात त्यावेळीं धर्मच व्यथित मनाचें कसें समाधान करूं शकतो; निरनिराळ्या परस्परविरोधी विचारांचा सुळसुळाट झाला, अज्ञेयवाद, नास्तिकवाद, वस्तुवाद वगैरे नव्या-नव्या विचारांनीं देव, धर्म, पापपुण्य एतद्विषयक विचारांस दाबून टाकण्याचा कितीही कडेकोट प्रयत्न केला, तरी अंतीं धर्माची आवश्यकता मनुष्यास भासतेच व धर्माचा आश्रय केल्यावांचून त्यास समाधान प्राप्त होत नाहीं, अशा धोर-

---

* प्रार्थनासमाजाची स्थापना झाल्यानंतर प्रथम रा. शिंत्रे हेच पद्यें म्हणत असत. हे पद्यें उत्तम म्हणत असत असें समाजाच्या विरुद्ध टीका करितांना एकानें वर्तमानदीपिकेंत म्हटलें होतें.

णाचें विवेचन केलें आहे. व त्यावेळीं हे सर्व विचार सुचण्याचें कारण दूरच्या मद्रास देशीं वेदसमाजनामक शुद्ध धर्मप्रतिपादक संस्था स्थापण्यांत आली हें होतें आणि मुंबईसारख्या ठिकाणीं तशा प्रकारची कांहीं चळवळ सुरू होऊं नये ह्याबद्दल त्यावेळीं संपादकांनीं मनःपूर्वक खेद प्रदर्शित केला होता. असें कां झालें ह्याचें कारण इंदुप्रकाशकारांच्या शब्दांत येथें देणें बरें:—

**वेदसमाज**

" This is the normal condition of the human mind. And we are extremely grieved to see that no signs as yet appear of an approach to that condition of the Hindu mind of Western India. Our great prosperity has in this respect been our bane. It has stifled in part the higher cravings of our nature. It has prolonged the date of their fulfilment. We have grown rich. But how vain are riches without the balm, the consolation which religion only can administer. We, therefore, respectfully ask our Educated Hindus whether it is right to starve our higher aspirations.... We call upon our brethren to exert and save themselves before they are wrecked."

अशा प्रकारें ज्या संस्थेच्या स्थापनेमुळें इंदुप्रकाशकारांमध्यें विचारजागृति झाली, व जी संस्था पुढें मुंबई शहरांतील वृत्तपत्रांची टीकाविषय झाली ती संस्था तरी काय होती, तिचे उद्देश, तिचीं तत्त्वें व नियम ह्याविषयीं येथें थोडी माहिती देणें महत्वाचें आहे. कारण त्या योगें त्यावेळीं विचारांचा ओघ कोणत्या दिशेस वहात होता त्याची कल्पना वाचकांस करतां येईल. सन १८६५ सालीं फेब्रुआरी महिन्यांत वेदसमाजाच्या स्थापनेची बातमी मुंबई शहरांत प्रथम आली. म्हणजे त्याच सुमारास मद्रास येथें त्याची स्थापना झाली असावी. वेदसमाजाचें पहिलें तत्त्व अशा अर्थाचें होतें:—

परमेश्वर सृष्टीचा उत्पन्न व लयकर्ता, तोच तिचा संरक्षक व सर्वांस तारण देणारा आहे. तो सर्वज्ञ, सर्वगामी, व आनंदस्वरूप, आकारहीन, एक अद्वितीय असा आहे. मी भक्तीनें, प्रेमानें व त्यास प्रिय अशींच कार्यें करून त्याचें पूजन करीन व कोणत्याही सृष्ट वस्तूचें पूजन करणार नाहीं.

वेदसमाजाची तत्त्वें एवढींच जर असतीं तर ह्या समाजांत व कलकत्त्याच्या ब्राह्मसमाजांत पुष्कळ साम्य आहे असें सहज म्हणतां आलें असतें. परंतु आमच्या मद्र देशीय बंधूंना एका परमेश्वराची उपासना प्रचारांत तर आणावयाची होती, प्रतिमापूजनाचा त्यागही करावयाचा होता, परंतु हें कार्य सावकाश परिस्थितीची नाडी पहात पहात आणि अनेक धोरणें संभाळून करावयाचें होतें, म्हणून पुरवणी दाखल कित्येक नियम सभासद होतेवेळीं प्रत्येकास मान्य करावे लागत, त्यांतील कांहीं पुढें दिले आहेतः—

१ जे विधि शुद्ध एकेश्वरी धर्मास अनुकूल आहेत, ज्यांत कोणतेही धर्मभोळेपणा दाखविणारे आचार नाहींत असे तयार करण्याचा व हळुहळु ते आचारांत आणण्याचा मी प्रयत्न करीन.

२ तोंपर्यंत मी हल्लींचे जे आहेत तेच विधि करीन. मात्र विवाह, अंत्येष्टि श्राद्ध व जे न पाळल्यानें हिंदु जनतेस एकदम धक्का बसेल व गोंधळ माजेल असलेच विधि मी करीन. ज्यावेळीं असे विधि मी करीन त्यावेळीं हे विधि निर्जीव आहेत, हे कांहीं खरे धर्मविधि नाहींत, केवळ चालू रूढीस अनुसरून आहेत असें समजून मी ते करीन.

३ प्रचलित आचारविचार संमत असणाऱ्या लोकांस न दुखविण्यासाठीं एवढा स्वार्थत्याग जरी मी करीन, तरी मी माझीं धर्ममतें केव्हांही लपवून ठेवणार नाहीं, अगर मानप्रतिष्ठा मिळविण्यासाठीं किंवा लोकाराधना करण्यासाठीं हीं माझीं मतेंच नाहींत असें कधीं प्रतिपादणार नाहीं.

४ निरनिराळे पक्षभेदांस मी उत्तेजन देणार नाहीं व कोणत्याही पक्षास मी जाऊन मिळणार नाहीं.

५ आपल्याच जातींतील तट व भेद हळुहळु मोडण्याचा प्रयत्न करणें ही मी पहिली पायरी समजेन.

६ मी नाच करविणार नाहीं, नाच होत असेल तेथें हजर रहाणार नाहीं अगर कोणत्याही रीतीनें नाच ह्या संस्थेस उत्तेजन देणारें आचरण ठेवणार नाहीं.

७ मी बालविवाहास विरोध करीन व विधवाविवाहास शक्य त्या रीतींनीं उत्तेजन देईन.

८ मी एक बायको जिवंत असतांना, अगर एक नवरा जिवंत असतांना दुसरें लग्न करणार नाहीं.

९ मी स्त्रीशिक्षणाच्या सर्वसाधारण कार्यास साहाय्य करीन व विशेषेंकरून माझ्या स्वतांच्या व निकटच्या कुटुंबांतील स्त्रियांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष्य पुरवीन.

संस्कृत भाषेचा अभ्यास करणें, लहान लहान पुस्तकांच्या व एका मासिकाच्या प्रसिद्धीस मदत करणें, इ. गोष्टींबद्दलही अटी घालण्यांत आल्या होत्या. इतकें झाल्यानंतर अशीं जीं वेदसमाजाचीं मतें त्यांचा आज मी स्वीकार करितों व मी माझी सही करितों असें म्हणावें लागत असे.

हा समाज वरील स्वरूपांत फार दिवस टिकला नाहीं. आणि त्याची एकंदर रचना पाहिली तरी तो फार दिवस टिकून राहणें शक्य नव्हतें असें आजही म्हणतां येतें. प्रथम दर्शनीं ह्या समाजास वेदसमाज हें नांव कां देण्यांत आलें असावें त्याचाच कोठें उल्लेख कसा नाहीं याचें आश्चर्य वाटतें. कारण, वेदांविषयीं विशेष आदरभाव व्यक्त करणारा एकही नियम अगर वाक्य कोठें आढळत नाहीं. नाहीं म्हणावयास

I shall study the Sanskrit language and its literature ( especially theological ) and promote the cultivation of it by means not calcalated to promote superstition.

असें एक कलम आहे, पण त्याचा व वेदवेदांगें यांचा कांहींच संबंध नाहीं. ज्यांस वेद अशी संज्ञा आहे त्याविषयीं ह्या समाजास आदर आहे असाही कोठें उल्लेख नाहीं; आणि पुढें समाजाचा मुख्य हेतु पार पाडण्यासाठीं उपाययोजना करण्याऐवजीं तो हेतु नेहमीं मागें कसा राहील याची मात्र विल्हेवाटीनें योजना केलेली दिसते. कारण, समाजाचा जो मुख्य सिद्धान्त त्यास अनुरूप असे सर्व महत्त्वाचे विधि असले पाहिजेत हें तत्त्व जरी मान्य केलें, तरी ते विधि तयार करण्याचा ( compose ) मी प्रयत्न करीन अशी प्रतिज्ञा प्रत्येकाजवळून करून घेण्यांत काय अर्थ आहे ? प्रत्येक व्यक्तीनें स्वतंत्र विधि बनविले तर सगळाच गोंधळ होईल. बरें असे विधि जरी तयार झाले तरी ते सावकाश अमलांत आणावयाचे म्हणजे ते केव्हांच आणावयाची सभासदास आवश्यकता भासावयास नको अशी व्यवस्था पुढील कलमांत करून ठेविलीच होती. विधि तयार होऊन ते राजरोसपणें आचारांत येत तों काय करावयाचें ? तोंपर्यंत सभासदांनीं अवश्य तेवढे सर्व विधि चालू वहिवाटीप्रमाणें राजरोस करावे ! श्राद्धासारखे विधि जर केले

नाहींत तर लोकांना जबरदस्त धक्का बसेल, तर तेही करावे, परंतु ते धर्मविधि न मानतां निर्जीव, कसरतीचे प्रकार म्हणून करावे अशी नियमांनींच मोकळी वाट केल्यावर लोकांच्या समजुतीच्या विरुद्ध जावयाची कोणाला इच्छा होणार ? नवीं मतें स्वीकारून तीं आचारांत आणण्याच्या प्रत्येक वेळीं आपल्या आचरणानें आसपासच्या जुन्या समजुतीच्या लोकांना किती लहान अगर मोठा धक्का बसणें शक्य आहे, याचाच जर शोध चालविला तर ह्या धक्क्याची लांबोरुंदी प्रत्येक वेळीं वाढत जावयाची व प्रत्येक वेळीं असला जबरदस्त धक्का सहन न होणारीं माणसें निकटच्या आप्तांमध्यें सांपडावयाचींच ! नाहीं तरी दूरचे आप्त, आप्तांतील अतिवृद्ध माणसें, आणि तींही नसलीं तरी दोन पिढ्या वावरणारा एकाद दुसरा नोकर तरी सांपडल्यावांचून रहावयाचा नाहीं ! माझीं अमुक अमुक मतें आहेत, पण तुमच्यासाठीं म्हणून मी जुने विधी आचरणांत आणीत आहें असें सभासदास प्रत्येक वेळीं सांगण्याची मुभा मिळाली तर मग स्वमतानुसार वागण्याचा प्रसंग त्यास केव्हांच येणार नाहीं हें उघड आहे. परमेश्वरास प्रिय अशीं कृत्यें आचरणांत आणून तद्वारा जर त्याची उपासना करावयाची, तर मग त्या मार्गांत इतक्या अडचणी उभ्या करण्याची काय आवश्यकता होती ? दुसरें असें कीं, ईश्वराचें पितृत्व व मनुष्याचें भ्रातृत्व ह्या संबंधानें तत्वांत कोठेंही उल्लेख नसल्यामुळें जरी केशवचंद्र सेन ह्यांच्या भेटीनंतर ह्याची स्थापना झाली तरी हा समाज ब्राह्मसमाजाच्या धोरणावर उभारला होता असें म्हणतां येत नाहीं. म्हणूनच ह्याचीं अनेक मतांतरें होऊन अखेरीस ह्यास ब्राह्मसमाज हें नांव मिळालें. जातिभेद मोडणें हें कांहीं ब्राह्मसमाजाचें ब्रीदवाक्य नव्हतें, तर ईश्वराचें पितृत्व व मनुष्याचें भ्रातृत्व आचरणांत आणणें म्हणजेच जातिभेद आपल्या ह्या व्यवहाराच्या आड येऊं न देणें असें परिणामरूपानें ब्राह्मसमाजाच्या पुढाऱ्यांनीं दाखविलें. परंतु इकडे मी सावकाश माझ्याच जातींतील पोटभेद नाहींसे करण्याचा प्रयत्न करीन असें कबूल केल्यामुळें जातिभेद कायम ठेवण्याचा खास परवाना सभासदांस मिळाल्यासारखाच होता. असो. अशा रीतीनें ह्या समाजाच्या मुख्य तत्वांचें व बाकीच्या नियमांचें परीक्षण केल्यास तो ब्राह्मसमाजाच्या नमुन्यावर उभारलेला नव्हता हें उघड होतें. परंतु ब्राह्मसमाजाच्या स्थापनेमुळेंच ह्या समाजाची स्थापना झाली ह्यांत कांहीं संशय नाहीं. सन १८६४ सालीं केशवचंद्र सेन तेथें गेल्यानंतर तेथें जी चळवळ झाली त्याचें तात्कालिक फळ वेदसमाजाची स्थापना असें जरी कबूल केलें, तरी ब्राह्मसमाजाच्या ध्येयांतील कांहीं भाग

त्यांनीं उचलून फार सावधगिरीनें आपल्या संस्थेची स्थापना करण्याचें ठरविलें असावें. १८६४ सालीं वेदांसंबंधानें ब्राह्मसमाजाची दृष्टि पंडित विद्यावागीश ह्यांच्या वेळची नव्हती. असें असतां वेदांचें ईश्वरप्रणीतत्व न मानणाऱ्या संस्थेचो ‘ वेदसमाज ’ ही प्रतिकृति असें मानणें वस्तुस्थितीस सोडून आहे. असो. बाकी मुंबईतील सुशिक्षित तरुणांचें धर्माकडे लक्ष्य नव्हतें अशी कल्पना करून त्यांचें लक्ष तिकडे वेधण्यासाटीं वेदसमाजाच्या स्थापनेच्या निमित्तानें इंदुप्रकाश-कारांनीं जी जागृति उत्पन्न केली ती फुकट गेली नसावी. कारण, परमहंस मंडळींतील कांहीं सभासदांस धर्माचीच अत्यंत आवश्यकता वाटत होती. डा. आत्माराम पाडुरंग, भिकोबा दादा चव्हाण इ० मंडळी एकमेकांपासून दूर झालेली नव्हती. पुढें कोणत्या मार्गाचें अवलंबन करावें, याचा खल ह्या मंडळींत वारंवार होत असावा. अशा रीतीनें वर्ष दीड वर्ष गेल्यानंतर १८६७ सालच्या आरंभीं एक विशेष गोष्ट घडली. रा. सा. मंडलिकांनीं १८६५ सालीं नेटिव्ह ओपिनिअन नांवाचें एक साप्ताहिक प्रसिद्ध करावयास सुरवात केली व इंग्रजी बाजूचें संपादकत्व रा. रा. नारायण महादेव ऊर्फ मामा परमानंद यांकडे सोंपविलें. मामा परमानंद प्रार्थनासमाजाच्या संस्थापकांपैकीं जरी एक होते, तरी ते एकेश्वरविषयक विचार मुद्दाम आपल्या पत्रांत आणीत नसत. तथापि १८६७ सालीं प्रार्थनासमाजाच्या स्थापनेपूर्वी नेटिव्ह ओपिनिअन पत्राच्या ता. १३ ज्यानुआरीच्या अंकांत ‘ मूर्तिपूजा ’ ह्या विषयावर एक अग्रलेख मराठी बाजूला प्रसिद्ध झाला. हा लेख कोणीं लिहिला हें कळावयास मार्ग नाहीं, तथापि तो आज ज्याप्रमाणें प्रार्थना अगर ब्राह्मसमाजाचा सभासद लिहील त्याप्रमाणें लिहिलेला होता, त्यामुळें त्याची बरीच चर्चा झाली. ज्ञानप्रकाश पत्रांत त्याच्या विरुद्ध विचार कडव्या भाषेंत प्रसिद्ध झाले. वस्तुतः त्या वेळचे ज्ञानप्रकाशकार धर्माविषयीं औदासिन्य बाळगणारे होते. तरी सुद्धां त्यांनीं विरोधभाव प्रगट केला. स्वतः नेटिव्ह ओपिनिअनमध्यें एक प्रतिकूल व एक अनुकूल लेख आला होता.

ह्या लेखांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहेः—

## मूर्तिपूजा.

ह्या देशांत मूर्तिपूजा बहुतकरून जिकडे तिकडे चालू आहे. आणि ह्या प्रकारच्या धर्माच्या ठिकाणीं लोकांची श्रद्धा इतकी बसून गेली आहे कीं, त्या-

विषयीं अंमळ झटकून लिहिलें किंवा बोललें असतां लोकांस कदाचित् राग येईल, परंतु आमच्या सुज्ञ वाचकांजवळ आमचें इतकेंच मागणें आहे कीं त्यांनीं ह्या दोन ओळी चित्त देऊन वाचाव्या; आणि ह्या विषयावर विचार करावा. इतकें त्यांनीं केलें म्हणजे आम्हांस निःसंशय वाटतें कीं कांहीं वेळानें आमचे विचार त्यांस पसंत होतील.

परमेश्वर निराकार आणि अदृश्य आहे असें सर्वांनीं मानलेलें आहे. त्याचें वास्तविक कसें स्वरूप आहे ह्याविषयीं खात्रीपूर्वक कांहीं सांगवत नाहीं. ह्याविषयींचे आपले विचार सर्व कल्पनेवर बांधलेले आहेत. जो पदार्थ दिसत नाहीं, व ज्याविषयीं समर्पक विचार करतां येत नाहीं तो पदार्थ मनांत आल्याशिवाय बहुतकरून कोणत्याही मनुष्याचा एक दिवस किंबहुना एक प्रहरही जात नाहीं ही केवळ आश्चर्य वाटण्याचीच गोष्ट आहे असें नाहीं. ह्यापासून विचारी पुरुष असें खचित समजेल कीं, परमेश्वर आहे हें केवळ थोतांड नाहीं. जरी त्याविषयीं आपलें ज्ञान कल्पनेवर रचिलें आहे तरी त्या मूळ वस्तूला आधार कल्पनाच आहे असें नाहीं. त्या वस्तूला साक्षात् अस्तित्व आहे व कांहीं गूढ आपणास न समजण्यासारख्या कारणांमुळें मनुष्याचे मनास हरएक प्रसंगीं या वस्तूचा आश्रय घेणें भाग पडतें. ह्यामुळें पुनः पुनः ती वस्तु मनुष्याच्या मनांत लहान मोठ्या प्रसंगीं येते असें वाटल्याशिवाय रहाणार नाहीं.

परमेश्वराविषयीं विचार मनांत वारंवार येतात असें वर लिहिलेंच आहे. आणि मनुष्याचें त्याशीं कोणत्या प्रकारचें नातें असावें ह्याचा विचार केला म्हणजे त्याचें स्मरण वारंवार व्हावें हें अतिशय अवश्य आहे. परंतु निराकार व अदृश्य वस्तूचा विचार सर्व मनुष्यांस सर्वकाळ सुलभ जाईल असें नाहीं. त्यापासून मनांत कदाचित कांहीं प्रकारचा गोंधळ उत्पन्न होऊन परमेश्वर ही केवळ एक मनःकल्पित वस्तु आहे असा भास पडण्याची भीति आहे, असें जाणून कोणी सुज्ञ मनुष्यानें परमेश्वराविषयीं चिंतन करणें हें सुलभ जावें या हेतूनें मूर्तीची योजना केली असावी. आणि वास्तविक या योजनेपासून एवढाच परिणाम झाला असता तर ती योजना अति उत्तम व ग्राह्य झाली असती. परंतु तीपासून लाभापेक्षां तोटे फार उदयास आले आहेत. खरोखरच त्या योजनेपासून मोठे अनर्थ होऊन मूळचा हेतु एकीकडेस राहिला असें म्हटलें असतां चालेल.

लोकांत साधारण अशी समजूत आहे ( आणि ही समजूत आम्हांस कांहीं दोषास्पद दिसत नाहीं. ) कीं ज्या रीतीचा मनुष्यास सहवास होतो त्याप्रमाणें त्याची बुद्धि व विचार होतात. ह्याच कारणास्तव मनुष्यास लहानपणापासून चांगला सहवास व चांगल्या मनुष्यांचा समागम असावा असें सर्व लोक इच्छितात. समागमाप्रमाणें मनुष्याच्या मनाची प्रवृत्ति होते, ह्यामुळें परमेश्वराबद्दल जी मूर्ति तुम्ही त्यापुढें ठेवाल तो मूर्ति पूज्य मानून तदनुसार त्याच्या मनाचे कल व्हावयाचे. मूर्ति, पाषाण, लहान किंवा मोठें झाड, गाय किंवा बैल, मनुष्य किंवा स्त्री इत्यादि कोणत्या तरी पदार्थाला परमेश्वर मानून लोक भजतात. परंतु ह्यांतून कोणाएकाची तरी योग्यता परमेश्वराबरोबर आहे काय ? मनुष्याची अतिशय मोठी इच्छा ही कीं, आपण कांहीं तरी उपायांनीं परमेश्वराप्रमाणें व्हावें, परंतु वर सांगितलेल्या कोणत्या पदार्थांकडे पाहिलें असतां ईश्वराच्या अंगीं ज्या शक्ति व गुण आहेत असें आपण समजतों त्या शक्तींचा अथवा गुणांचा महिमा आपल्या मनांत उत्पन्न होतो ? ह्या मूर्तीपासून खरोखर कांहीं तसें घडून येत नाहीं. उलटी ईश्वराविषयीं आपल्या मनाची समजूत फारच फार हलक्या प्रकारची होते. कोणी म्हणतील कीं, ह्या मूर्तीकडे पाहून ईश्वराचें स्मरण मात्र व्हावें इतकेंच तिचें काम. आणि त्या विषयांचे विशेष विचार मनांतून आणावयाचे, परंतु त्या मूर्तीपासून केवळ स्मरणच होतें असें नाहीं, त्यापासून मनावर मन खराब करणारे विकारही उत्पन्न होतात. त्या मूर्तीचें अतिशय संघट्टन असल्यामुळें असे विकार झाल्याशिवाय रहात नाहींत.

वर सांगितलेला मूर्तिपूजेपासून उत्पन्न होणारा तोटा सहज लक्षांत येण्यासारखा नाहीं, परंतु तो खरा आहे व त्यापासून मोठे वाईट परिणाम होतात. वाईट समागम केला असतां कसा शेवट होतो याचा विचार केला असतां आमचे लिहिण्याचा खरेपणा लक्षांत येईल. परंतु मूर्तिपूजेपासून दुसरे पुष्कळ अनर्थ होतात आणि ते सहज लक्षांत येण्यासारखे आहेत.

मूर्तीची योजना निघाल्यामुळें देवालयांची आवश्यकता झाली; तसेंच मूर्तीची सर्व प्रकारें काळजी वागविण्याकरितां कोणातरी मनुष्याचें तेथें रहाणें जरूर पडतें. मूर्तीच्या समागमानें या मनुष्याची योग्यता वाजवीपेक्षां फार वाटते. अज्ञान लोकांस तो केवळ प्रतिदेव आहे असें वाटतें, त्यालाही आपला मोठेपणा वाटूं लागतो. परंतु किती जरी झालें तरी तो मनुष्य. दुर्वासना त्यास सोडित नाहीत. नानाप्रकारचे लोक देवालयांत येत गेल्यामुळें त्या लोकांवर हरेक

प्रकारचा अंमल बसविण्याकडेस त्याच्या मनाची प्रवृत्ति होते. या क्रमापासून काय अनर्थ होतात हें मात्र सांगण्याची आवश्यकता नाहीं. मोठमोठालीं देवस्थानें जेथें जेथें आहेत, तेथील स्थिति अभिमान एकीकडे टाकून मनांत आणिली म्हणजे ह्या अनर्थांचा पूर्णपणें बोध झाल्याशिवाय रहाणार नाहीं. बहुतेक लोकांनीं हे परिणाम लक्षांत आणिले आहेत आणि 'दिव्याखालीं अंधेर' ही म्हण अशा प्रकारचा कांहीं अनर्थ दृष्टीस पडला असतां नेहमीं ऐकण्यांत येते. आतां ज्या स्थळीं परमेश्वराची मूर्ति रहावयाची त्या स्थळीं उच्चार करवत नाहीं, अशाप्रकारचे जर अनाचार घडले, तर मूर्ति स्थापन करण्याचा मूळचा हेतु किती सिद्धीस गेला ह्याविषयीं विचार करणें नलगे.

मूर्तिपूजेपासून कोणते परिणाम घडून येतात हें वर सांगितलें, व मूर्तिपूजे-पासून उत्पन्न होणारे थोडथोडे लाभही दर्शविले आहेत. गुणापेक्षां दोष पुष्कळ आहेत, असें सुज्ञ वाचणारांच्या मनांत आल्यावांचून राहणार नाहीं. आणि गुण जे आहेत ते मूर्ति नसल्या म्हणजे असाध्य आहेत असें नाहीं. ह्याकरितां त्याविषयीं लोक चांगला विचार करून त्यापासून जितकें अलिप्त रहावेल तितकें रहाण्याविषयीं प्रयत्न करतील अशी आम्ही आशा करितों.

वर लिहिलेले विचार कित्येकांस अगदीं नवीन वाटतील, तथापि आम्ही त्यांस विनयपूर्वक कळवितों कीं ते कांहीं नवीन नाहींत. आपल्याच देशांतील जुने सर्वमान्य ग्रंथ वाचिले म्हणजे आमच्या लिहिण्याविषयीं त्यांची खात्री होईल.

हा मुख्य लेख व त्या वरील वादविवाद ताजा असतांनाच ह्या मुंबई शहरीं प्रार्थनासमाजाची स्थापना झाली.

## प्रार्थनासमाजाची स्थापना, व स्थापनेनंतरचें वावटळ.

गेल्या भागांतील हकीकतीवरून हें लक्षांत येण्यासारखें आहे कीं, निरनिराळ्या प्रकारच्या उदारविचारप्रवर्तक कार्यकारी संस्था स्थापन होण्यास "वास्तविक कारण म्हटलें असतां ह्या देशांतील इंग्रजी विद्येचा प्रसार हें होय." परमहंस सभा ह्याच विचारजागृतीचें फळ होतें. परंतु ती सभा टिकली नाहीं. ती कां टिकली नाहीं याचेंही कारण गेल्या भागांत आलें आहे. परंतु एकदां जी विचार-जागृति झाली ती नष्ट झाली नाहीं. खरें पहातां परमहंस सभा बंद पडल्यापासून नंतर उदारविचारप्रवर्तकांवर पुष्कळच गंडांतरें आलीं! आद्य प्रवर्तक दादोबा पांडुरंग यांनीं आपलें अंग काढून घेतलें व त्याचा कल स्वीडनबर्गच्या पंथाकडे

वळला; जी ब्राह्मण व शास्त्री मंडळी परमहंस मंडळींत होती ती एकामागून एक जुन्या समाजांत एकजीव झाली; परमहंस सभा व ख्रिस्ती मिशनरींचे बाटविण्याचे प्रयत्न ह्यांचा विनाकारण निकट संबंध दाखविल्यामुळें त्या मंडळींत असलेल्या मंडळीविषयीं लोकांत पसरलेला गैरसमज अद्याप नष्ट झालेला नव्हता. स्टूडंटस् लिटररी ॲन्ड सायंटिफिक सोसायटी, ज्ञानप्रसारक सभा, बांबे ॲसोशिएशन, नेटिव्ह जनरल लायब्ररी, रायल एशियाटिक सोसायटीचें प्रचंड पुस्तकालय, हिंदु रिफारमर, दंभहारक, प्रभाकर, ज्ञानोदय, ज्ञानप्रकाश, शाळा व विद्यालयें ह्यांच्या द्वारें उदार विचारांचा प्रसार प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें होत होताच; गोपाळ हरि देशमुख, माधवराव रानडे, जनार्दन सखाराम गाडगीळ, विष्णुशास्त्री पंडित ह्यांचें लक्ष सामाजिक विषयांकडे होतेंच; परंतु १८६३ सालीं इंदुप्रकाश निघाल्यापासून समाजिक सुधारणेस सर्वथा अनुकूल असे लेख मोठ्या धडाडीनें ह्या वर्तमानपत्रांत येऊं लागले होते. माधवरावांनीं इंग्रजी लेख लिहून लोकजागृतीचें कार्य मोठ्या निष्ठेनें चालविलें होतें. निरनिराळ्या धर्मपीठांच्या आचरणावर जिकडून तिकडून टीका होत होती व महाराजा लायबल केसनें मुंबई शहरांत बरीच धांदल उडून दिलेली होती. असा प्रकार चालू असतां मुंबई शहरांत व सर्व इलाखाभरही संपत्तीचा धूर निघूं लागला! त्यापूर्वीं लोकांना शेअर्सच्या सट्टाबाजीची माहिती नव्हती, पण आतां त्याचें वेड लागलें. मुंबईचा शेअर बाजार ज्याला त्याला श्रीमंत करूं लागला. शेअर्सची देवघेव मोठ्या प्रमाणावर झाली. प्रेमचंद रायचंद हे शेअर बाजाराचे पुढारी अत्यंत श्रीमान म्हणून गणले जाऊं लागले. पुष्कळ व्यापारी, व्यापारी पेढया, इतर लोक धनाच्या विपुलतेमध्यें पोहूं लागले. सर्वांच्या डोळ्यांवर जणूं धनाचा मद चढला होता. १८६४ सालची मुंबईची दिवाळी फारच उत्साहानें पार पडली. त्या वेळच्या रोषनाईची आठवण सर दिनशा ह्यांस अद्याप आहे. तिचें रसभरित वर्णन त्यांनीं आपल्या पुस्तकांत केलेंही आहे. ह्या वेळीं दुसऱ्या कोठल्याही विषयाकडे लक्ष देण्याची लोकांस इच्छा नव्हती व बाहेरून आलेल्या माणसांसही हा अनुभव आल्यावांचून रहात नसे. अशा प्रकारें मुंबई शहर ऐश्वर्याच्या शिखरास पोंचलेलें असतांना प्रसिद्ध ब्राह्मप्रचारक ब्रह्मानंद केशवचंद्र सेन यांची स्वारी मुंबई शहरीं आली. त्यांचीं अनेक व्याख्यानें झालीं. परंतु तीं सर्व फुकट गेलीं. त्यांची इंग्रजी भाषेवरील सत्ता, अमोघ वक्तृत्व, परिणामकारक व्याख्यान देण्याची पद्धत, उदार विचार, अंतःकरणास झोंबणारे उद्गार यांचा लोकांच्या मनांवर कांहीं परिणाम झाला नाहीं, इतके संपत्तीच्या धुरानें लोकांचे

डोळे तारवटलेले होते. * केशव बाबूंचें एक व्याख्यान डा. भाऊ दाजी यांच्या अध्यक्षतेखालीं झालें. त्या वेळीं केशवचंद्रांनीं धर्मसंजीवनाची अवश्यकता प्रतिपादिली. " केशवचंद्रांच्या रक्ताच्या थेंबथेंबांत उत्साह भरला असावा असा त्यांचें प्रवचन ऐकणारास भास होत असे. सेन बाबूंच्या व्याख्यानानें श्रोत्यांच्या अंतरंगांतील बंद असणारे धर्मविषयक भावनांचे दरवाजे खडाखड उघडून त्यांतून उत्साहाच्या लाटांवर लाटा खेळूं लागत. डा. भाऊदाजींनीं त्याचें अध्यक्षस्थान स्वीकारलें. त्या व्याख्यानाच्या शेवटीं श्रोत्यांच्या वृत्ति तल्लीनतेच्या पराकाष्ठेस पोंचल्या होत्या. व्याख्यात्यांच्या विवेचनावर अध्यक्ष आपल्या अनुकूल भाषणानें कळस चढवितील आणि श्रोत्यांच्या मनःस्थितीची पूर्ण सांगता करितील अशी हजर असलेल्या सर्वांची कल्पना होती, पण अध्यक्षांनीं उत्साहाच्या तापावर थंड पाणी ओतण्यास आरंभ करून सर्वांना निराशेच्या दरींत लोटून दिलें. ते म्हणाले कीं, "दीर्घ विचारांतीं धर्मांतील सुधारणा सावकाशीनें व सावधपणें केल्या पाहिजेत" डा. भाऊ दाजी यांनीं इतके सावधगिरीचे उद्गार काढावयास परमहंस सभेचा त्यांस आलेला अनुभव होय. ते परमहंस सभेचे सभासद लवकरच होणार तोंच परमहंस मंडळीच्या कामाचा बोभाटा † झाला, त्यामुळें मागेंच राहिले; आणि तो अनुभव लक्षांत घेऊन त्यांनीं ही सावधगिरी दर्शविली असावी. १८६४ सालीं केशव

* " सेन बाबू जसे आले तसेच परत गेले. परमार्थ आणि सुखस्थिति यांचा उभा दावा आहे. त्रिविध तापांनीं पोळणाऱ्या चित्ताला परमार्थाची कास धरावीशी वाटते; सुखाच्या शीतलतेंत लोळणारांना परमार्थ रुचत नाहीं, किंबहुना तो डोळ्यांसमोर आल्यास सुखस्वास्थ्याचा स्वैर उपभोग घेणाऱ्या लोकांचा अनिवार पित्तप्रकोप होतो असा अनुभव आहे. लक्ष्मीच्या मंजुमधुर नादानें भरून गेलेले तत्कालीन मुंबापुरस्थांचे कान सेन बाबूंची धर्मसंबंधी टकळी ऐकण्यास तयार नव्हते. त्यांची रससंपन्न वक्तृत्वशक्ति मुंबईत इतकी फोल ठरली कीं, सेन बाबू आले होते कीं नाहीं याचीही दाद लोकांत उरली नाहीं. धर्मप्रवण बुद्धीच्या लोकांच्या मनावर त्यांच्या प्रवचनांचा जो कांहीं परिणाम झाला असेल तेवढाच." —फाटककृत न्या. मू. रानडे.

† Just about the time the secret of the society was betrayed, it was rumoured in our meetings that Dr. Bhau Daji and Bhau Russool Dadaji were about to join the sabha, but when the sabha was given up they could not join."

( From Mr. Narayan Raghunath's letter to Rev. Baba Padmanji—written in the year 1887. )

बाबूंची जरी अशी निराशा झाली, तरी परमहंस सभेंतील ज्या मंडळीचा धर्माकडे विशेष कल होता ती मंडळी कांहीं स्वस्थ बसलेली नव्हती. १८६३ सालींही रा.रा. गोविंद नारायण ह्यांनीं ग्वाही दिली होती कीं, "ही सभा निखालस मोडली नाहीं. हिचे कित्येक सभासद अद्याप आहेत व ह्यांचे उद्योग* चालले आहेत." हे उद्योग १८६५ सालच्या अनुभवानें पुढें अधिक बळावले. ज्या ठिकाणीं १८६४ सालीं लक्ष्मीचा धूर निघत होता तेथें एकच वर्षांत विपरीत प्रकार दिसून आला. शेंकडो व्यापाऱ्यांचीं दिवाळीं निघालीं, मोठ्या हावरेपणानें घेतलेले शेअर कवडीमोल होऊन लोक धाय धाय रडूं लागले. कित्येक अब्रूदार लोकांनीं प्राणत्याग केला. कित्येकांनीं देशत्याग केला. १८६५ सालीं एप्रिल महिन्यांत अमेरिकेंतील सिव्हिल वॉर संपली. लढाई चालू असतांना कापसाची किंमत फार वाढली व त्यामुळें भरभराट झाली. परंतु लढाई संपल्यावर सगळा प्रकार उलटला. †"हिंदुस्थानांतल्या व्यापाराला खो मिळाला आणि संपत्तीच्या साहित्यशृंगारानें सजलेली येथील व्यापाराची इमारत एकदम भंगली." हा सर्व अनुभव दृष्टीपुढें ठेवून परमहंस सभेंतील जुनी मंडळी पुन्हा उद्योगास लागली. संपत्तिलाभ व तिचा क्षय ह्यांयोगें लोकांमध्यें पसरलेली अस्वस्थता नाहींशी व्हावयास अर्थात् कांहीं वेळ लागला. त्यानंतर १८६६ सालीं जी मंडळी मागें राहिली होती व नवीन कांहीं

---

* १८६५ सालीं ज्या वेळीं पहिले हिंदी आय. सी. एस. बाबू सत्येंद्रनाथ ठाकूर परत आले त्या वेळीं डा. वुइल्सन ह्यांनीं त्यांच्या व स्मालकाज कोर्टाचे जज्ज माणेकजी कर्सेटजी ह्यांच्या सन्मानार्थ एक सामाजिक मेळा भरविला होता. तेथें निरनिराळ्या धर्मांचे निवडक लोक होते. त्या मेळ्यास उद्देशून ज्ञानोदयानें पुढील उद्गार काढलेः—

"मुंबईतील सुधारणुकीच्या पक्षाचे लोक पुष्कळ दिवस उगाच बसले आहेत. गतवर्षी (१८६४) बाबू केशवचंद्र सेन येथें आले होते, त्यावरून जी आशा उत्पन्न झाली होती तिचा एकाएकीं भंग झाला. ह्यावरून कित्येकांस कदाचित असें वाटलें असेल कीं, आतां सुधारणेचें काम कांहीं चालत नसेल. वरील रात्रीं सदरील मंडळींत कित्येक गोष्टींवरून व भाषणांवरून दिसून आलें कीं, निमूटपणें सुधारणुकीची बरीच वृद्धि झाली आहे. आतांशीं पहिल्याप्रमाणें सुधारणुकेची धामधूम व मंडळ्या यांचा जमाव नाहीं, पण स्वज्ञान व स्वतंत्रता हीं विशेष आहेत."

† फाटककृत न्या. मू. रानडे यांचें चरित्र.

तरुण ह्यांस असें वाटूं लागलें कीं, आपल्या उद्देशाच्या सिद्धीसाठीं प्रसिद्धपणें एक संस्था आपण स्थापिली पाहिजे. त्यावेळीं कोणत्या विशेष कार्यासाठीं संस्था स्थापावयाची त्याचा विचार सर्वानुमतें निश्चित झालेला नव्हता. म्हणून ता. १७ डिसेंबर १८६६ सालीं डा. आत्माराम पांडुरंग यांच्या घरीं ह्या मंडळीची पहिली सभा भरली. राम बाळकृष्ण जर ह्यांत असते तर त्यांनींच ह्या सभेचा पुढाकार घेतला असता. त्यावेळीं डा. आत्माराम पांडुरंग, रा. रा. शांताराम नारायण बोंडसे वकील, रा. रा. महादेव नारायण शिरगांवकर, मोरोबा विनोबा मंजगिरि, बाळ मंगेश वागळे, भास्कर हरि भागवत, नारायण महादेव परमानंद, सर्वोत्तम सखाराम मानकर, तुकाराम तात्या पडवळ, विश्वनाथ गोविंद चोळकर व वासुदेव बाबाजी नवरंगे इतके गृहस्थ हजर होते. ही सर्व मंडळी परमहंस सभेंत होतीच असें म्हणतां येत नाहीं. प्रथमतः ज्यावेळीं सभा झाली त्यावेळीं समाजिक सुधारणेचेच विचार विशेष प्रमाणानें मनांत असावेत. कारण सभेमध्यें देशांतील चालू जातिभेदाची चाल अतिवाईट आहे असें प्रसिद्धपणें प्रतिपादावें, विधवाविवाह सुरू करावे; स्त्रीशिक्षणास उत्तेजन द्यावें, बालविवाहाची चाल बंद करण्याचा यत्न करून लग्नाच्या संबंधानें वयाची इयत्ता ठरवावी असल्याच हेतूची वाटाघाट चालली होती. परंतु ह्यासंबंधानें कित्येक सभा भरून विशेष विचार करितां मंडळीस असें दिसून आलें कीं, ऐहिक कल्याणावर विशेष दृष्टि ठेवून हीं कार्यें हातीं घेण्यापेक्षां मनुष्याचें ह्या जन्मीं मुख्य कर्तव्य जें परमार्थसाधन त्याकडे विशेष दृष्टि ठेविली पाहिजे. हा विचार कायम होऊन प्रार्थना समाजाच्या स्थापनेचा विचार कायम झाला. ह्या नवीन विचारास अनुसरून फाल्गुन वद्य ११ (**पापमोचनी**) शके १७८८ रविवार ता. ३१ माहे मार्च १८६७ रोजीं ईश्वरोपासनेस आरंभ झाला. ज्या वेळीं समाजस्थापनेचा दिवस नक्की झाला त्या वेळीं आनंदाश्रम स्वामी ह्या नांवाचे कोणी बंगाली स्वामी मुंबईत होते. त्यांना ही नवीनच स्थापन होणारी संस्था व तिचे हेतु फार पसंत पडले, म्हणून त्यांनीं आपला मुक्काम कांहीं दिवस वाढविला व समाजाच्या स्थापनेच्या दिवशीं हजर राहून त्यांनीं शेवटली प्रार्थना हिंदींत केली व सर्वांस आशीर्वाद दिला. समाजस्थापनेच्या वेळीं समाजाचा उद्देश व मूलतत्त्वें पुढील प्रमाणें होतीं:—

देव एकच व निराकार आहे. त्याचें मानसिक भजनपूजन करणें योग्य व आपलें कर्तव्य आहे. मूर्तिपूजा हा असन्मार्ग असून देवास अपमानकारक, आणि मनुष्यास नीचत्व आणणारा व दुराचरणाप्रत नेणारा आहे. तेव्हां हा अस-

न्मार्ग सुटून सन्मार्गाची लोकांत प्रवृत्ति व्हावी व सर्व संसारांतील धर्मसंबंधी कृत्यें ह्या मतास अनुसरून व्हावीं हा या समाजाचा उद्देश आहे.

धर्माचीं मूलतत्त्वें खालीं लिहिल्याप्रमाणें होतीं:—

देव एकच आहे, त्याशिवाय दुसरा देव नाहीं असा मी दृढ भाव धरितों.

सर्व उत्पन्न करणारा एकच देव आहे असें मी समजतों आणि मूर्तिपूजेवर माझी श्रद्धा नाहीं.

समाजाचा सभासद होणारास हीं तत्त्वें मान्य असावीं लागत असून शिवाय खालीं लिहिल्याप्रमाणें प्रतिज्ञा करावी लागे:—

मी प्रत्यहीं परमेश्वराचें चिंतन करीत जाईन.

सत्कर्मे आचरावयास व असत्कर्मांपासून दूर रहावयास मी यत्न करीन.

स्वभावदोषानें कांहीं वाईट कर्म मजपासून घडल्यास त्याविषयीं पश्चात्ताप व्हावा एतदर्थ परमेश्वरापाशीं प्रार्थना करीन.

हे परमेश्वर! ह्या प्रतिज्ञा पाळण्याचें सामर्थ्य मला दे.

अशा प्रकारें ता. ३१ मार्च १८६७ रोजीं ज्या वेळीं संस्थेची स्थापना झाली त्यावेळीं **प्रार्थनासमाज** हें नांव प्रसिद्धपणें जाहीर झालेलें नव्हतें, असें म्हणावयास दोन आधार आहेत. स्थापनेची बातमी ज्ञानोदयकर्त्यांस जेव्हां कळली तेव्हां त्यांनीं प्रथम जो एक लहान लेख लिहिला त्यांत म्हटलें "जेव्हां कोणी एतद्देशीय तरुण किंवा त्यांची मंडळी एक जो निराकार ईश्वर त्याची भक्ति आत्मिक रीतीनें करूं लागतात तेव्हां आनंद मानला पाहिजे. ह्याप्रमाणें **ईश्वराची भक्ति करण्याकरतां** म्हणून पूर्वी येथें परमहंसनामें एक मंडळी स्थापिली होती, पण ती गुप्त होती, आणि थोडीं वर्षे चालून मोडून गेली. आतां आम्हीं एका मित्रापासून असें ऐकिलें आहे कीं, मार्च महिन्याच्या शेवटल्या रविवारपासून एथील एका संभावित नेटिव्ह गृहस्थाच्या दिवाणखान्यांत कित्येक एतद्देशीय सुशिक्षित लोकांची मंडळी ईश्वराची भक्ति व प्रार्थना करण्याकरितां जमूं लागली आहे. व तेथें सर्वत्रांस जाण्याची मोकळीक आहे. या गोष्टीची जास्ती माहिती होईपर्यंत आमच्यानें सदरील गृहस्थाचें नांव प्रसिद्ध करवत नाहीं. सध्यां आम्ही इतकेंच म्हणतों कीं, ही बातमी खरी असल्यास ही मंडळी जर धैर्य व विश्वास धरून हा भक्तिक्रम असाच सदोदित उघड रीतीनें चालवील तर ईश्वर त्यांस साहाय्य करून खरा मार्ग दाखवील यांत संशय नाहीं." ह्या लेखांत

नांवाचा उल्लेख नाहीं. याच पत्रानें पुढें जून महिन्यांत संस्थेविषयीं विशेष माहिती देतांना ' मुंबईकर तरुणांची ईश्वरभक्त्यर्थ मंडळी ' असें नांव दिलें आहे, ही माहिती देण्यापूर्वी पत्राचे संपादक उपासनेस स्वतः हजर होते. दुसरें असें कीं, समाजाची स्थापना झाल्यानंतर तिची प्रसिद्धी होतांच संस्थेवर चोहोंकडून टीका होऊं लागली. ती टीका व तीस मिळालेलीं उत्तरें ह्यांचें स्वरूप पुढें दाखविण्यांत येईल. ही टीका पाहून प्रार्थनासमाजाच्या एका सभासदानें उत्तर देतांना आक्टोबर १८६७ मध्यें असें म्हटलें आहे " उपरोक्त मंडळीचें वास्तविक नांव " प्रार्थना समाज " हें एकीकडेस राहून ' एकेश्वर भक्तमंडळी ' या नामाभिधानानें हिची प्रसिद्धी होत आहे. **हें नांव** ( एकेश्वर भक्त मंडळी ) **तीस पडलें त्या वेळेस मंडळीचें ठेवलेलें नांव प्रसिद्ध नव्हतें हें खरें;** परंतु आतां तसें होऊं नये. तर ' प्रार्थना-समाज ' याच नांवानें ती प्रदर्शित व्हावी. दुसरें, ' एकेश्वर ' यांत फारसा अर्थ नाहीं, कारण ईश्वर एकच आहे हें सर्वांस मान्य आहे." यासंबंधानें आणखी एक असा आधार आहे. ता. १ आगष्ट १८६७ च्या हिंदु रिफार्मर पत्रामध्यें प्रार्थनासमाजास कांहींसा अनुकूल प्रतिकूल लेख आलेला आहे. त्यांत कांहीं नियमांवर टीका आली आहे. पहिला नियम " ह्या मंडळीचें नांव प्रार्थनासमाज असावें. " असा आहे. ह्यावरून स्थापनेनंतर नांव व नियम नक्की ठरलें असें होतें. यावरून असें उघड होतें कीं, प्रथम कांहीं दिवस नांव निश्चित झालें नव्हतें व त्याची प्रसिद्धि झालेली नव्हती. नंतर प्रसिद्धी झाल्यावरही प्रार्थनासमाजास एकेश्वरी मंडळी ह्याच नांवानें लोक ओळखीत. प. वा. शामराव विठ्ठल ह्यांनीं प्रथमच नारायणराव चंदावरकरांस जेव्हां उपासनेस नेलें व डा. आत्माराम पांडुरंग, नारायण महादेव परमानंद, प्रो. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, रा. बाळ मंगेश वागळे, रा. महादेव गोविंद रानडे, मोरोबा विनोबा, भास्कर हरी भागवत आणि वासुदेव बाबाजी नवरंगे ह्यांची ओळख करून दिली त्यावेळीं These are Ekeshvaries हे एकेश्वरी आहेत असें त्यांना सांगितलें. असो.

## प्रारंभींच्या उपासना.

अगदीं प्रारंभींच्या उपासनापद्धतीचें वर्णन प्रार्थनासमाजाच्याच कोणी सभासदानें केलेलें आमच्या पहाण्यांत नाहीं. त्यामुळें त्यावेळीं इतरांनीं केलेल्या वर्णनावरून तहान भागविणें अगत्याचें आहे. उपासनेस बाहेरची पुष्कळ मंडळी

येत असे. अर्थात् कित्येक केवळ मौज पहावयास येत असले तर नवल नाही. ता. २ जून १८६७ रोजीं झालेल्या उपासनेस ज्ञानोदयाचे संपादक ( मि. शाहूराव कुकडे ) हे हजर होते. त्यांनीं त्या दिवसाच्या उपासनेचें वर्णन करितांना म्हटलें आहे कीं, " आम्हांस आमचे मित्र डॉ. आत्माराम पांडुरंग यांजकडून आमंत्रण आल्यावरून आम्ही ता. २ मिनहू रोजीं ( जून १८६७ ) कांदेवाडींत त्यांच्या दवाखान्यांत गेलों होतों. त्यांचा माडीवरील दिवाणखाना जरी संकोचित आहे तरी त्यांतच शंभरांहून जास्त मंडळी जमली होती. त्यांत बहुतकरून एथील प्रमुख, विद्वान, सुधारलेले एतद्देशीय तरुण व पोक्त गृहस्थ होते. पूर्वेच्या भिंतीशीं वक्त्यासाठीं उंच सिंहासन केलें होतें. त्याच्या समोर एक कोच मांडला होता आणि कोचाच्या मागें आणि दोहोंबाजूंस खुर्च्या मांडल्या होत्या. आम्ही गेलों तेव्हां रा. भिकाजी लक्ष्मण म्हणून एक **भंडारी मनुष्य** सिंहासनावर उभा राहून ईश्वराची प्रार्थना कशी करावी व प्रार्थना करणाऱ्यांनीं कसें वर्तावें या विषयावर एक निबंध वाचीत होता. तो झाल्यावर तीन चार मुलींनीं सुस्वर गळ्यानें तुकारामाचे कांहीं अभंग गाइले. नंतर पुन्हा **भंडारी** मजकूर यांनीं एक लिहिलेली प्रार्थना वाचली. तिच्या शेवटीं ' तथास्तु ' असें होवो हा शब्द होता......हें काम चालविण्याकरितां ह्या मंडळीसारखा कोणी विद्वान, सुधारलेला, वजनदार मनुष्य नेमावा, अगर अशा प्रकारचे जे गृहस्थ त्यांच्यांत असतील त्यांतून दर वेळेस एकएकानें पाळीपाळीनें हें काम चालवावें. कोणी योग्य मनुष्य मिळेपर्यंत पूर्वोक्त **भंडारी मनुष्य** त्यांनीं उभा केला आहे हें बरें केलें. पण तो असल्या मंडळींत शोभत नाहीं व लायक नाहीं......जो व्याख्यानें देतो तोहि **पोशाक, भाषण** वगैरे गोष्टींनीं संभावित असला पाहिजे. त्याचप्रमाणें ईश्वराची भक्ति करण्यास आपण जमलों तेव्हां कसें वर्तलें पाहिजे व तेथील व्याख्यानें प्रार्थना वगैरे कशा असल्या पाहिजेत याचाही चांगला शोध व विचार करून सुधारणा करावी. ईश्वराची भक्ति चालली असल्यास कोणी आल्यास त्यास ताजीम देऊन जागा देण्यांत कांहीं वेळ घालवून गडबड व श्रोत्यांचीं एकाग्र झालेलीं मनें अस्थिर करून भक्तीस व्यत्यय आणावा हें बरें नाहीं."

भिकोबादादा चव्हाण हे एक शिक्षक होते. यांचा प्रेमळ स्वभाव, ईश्वरावरील निष्ठा, उदार व निश्चित विचार, लोकांमध्यें, कुटुंबांमध्यें शुद्ध धर्माचा प्रसार व्हावा ह्या संबंधाची यांची कळकळ, ह्यांचा साधेपणा, सरल वृत्ति ह्यांची माहिती

नसल्यामुळें व त्यांचें तें भंडारी लोक वापरतात तसें मोठें पागोटें, जुन्या तऱ्हेचा अंगरखा व धोतर असा अगदीं साधा पोषाख पाहून निराश होऊन त्यांच्या संबंधानें कमीपणाचे उद्गार, उपदेशकाचा ठराविक पोषाख पहाण्याची संवय झालेल्या ज्ञानोदयकारांनीं काढले आहेत व खिस्ती झाल्यावरही जातिविषयक पूर्व संस्कार कसे कायम राहतात हें त्यांच्या टीकेवरून लक्षांत येतें. भिकोबादादांविषयीं सर्वांच्या मनांत अत्यंत आदर वसत असे. १८७८ सालीं ज्या वेळीं त्यांचा एकुलता एक मुलगा ऐन तारुण्यांत असतांना परलोकवासी झाला त्या वेळी ती बातमी देतांना "आमच्या येथील समाजाचे एक आद्य पुरस्कर्ते आणि प्रथम आचार्य असें ज्यांस म्हणण्यास चिंता नाहीं असे आमचे बहु सन्मान्य स्नेही रा. भिकोबा लक्ष्मण चव्हाण" असा सुबोधपत्रिकेनें उल्लेख केलेला आढळतो. हा त्यांच्या वृद्धपणांतील अति बिकट प्रसंग पाहून त्यांचे कित्येक स्नेही त्यांस भेटावयास गेले असतां जो प्रकार घडला, व त्यांनीं जें भाषण केलें तें भक्तीचें व परमेश्वरावरील निस्सीम विश्वासाचें निदर्शक आहे. तो प्रसंग असाः—

१९१२ सालीं "अवधाचि संसार सुखाचा करीन" असें एक धर्मपर व्याख्यान प्रसिद्ध झालें. त्यांत दुःखाचा डोंगर कोसळला तरी **कर्तव्यास न विसरणाऱ्या** कांहीं व्यक्तींचीं उदाहरणें दिलीं होतीं त्यांस उद्देशून रा. रा. दोनानाथ वि. माडगांवकर ह्यांनीं लिहिलेल्या पत्रांत पुढील मजकूर आहेः—

ता. २३ जुलै १९१२ च्या अंकांत जीं आधुनिक सद्गृहस्थांचीं दुःखाचा डोंगर कोसळला तरी त्यावेळीं नियमित इतर जनसंबंधाचीं कामें करणारे या दृष्टीनें प्रसंशनीय म्हणून जीं उदाहरणें दिलीं आहेत, तीं वाचून समाधान वाटलें. त्याबरोबर प. वा. भिकोबा लक्ष्मण चव्हाण ह्या तत्कालीन मुंबई प्रार्थना समाजाच्या एकदंर लहान मोठ्या समासदांस वंद्य वाटणाऱ्या सद्गृहस्थांची आठवण झाली. रा. रा. भिकोबादादा मनीस्कुलांत कांहीं वर्षें मराठी शिक्षकाचें काम लहानशा वेतनावर करीत असत, आणि त्यांच्या उतार वयांत तोही उदरनिर्वाहाचा मार्ग बंद पडला. त्यांच्यासारखी शांत, नम्र व आपण जणू कांहींच हिशेबांत नाहीं अशा प्रकारें दडून राहाण्याची वृत्ति फारच विरळा असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. त्यांस इंग्रजी भाषेचा प्रायः गंधही नव्हता, तथापि मराठी वाङ्मयांत ते बरेच निष्णात असत, आणि त्यांचे व्यासपीठावरून देण्यांत येणारे उपदेश प्रौढ विचारांनीं परिपूर्ण पण सुबोध व मनावर ठसण्यासारखे होत असत.

इतकी योग्यता असून साप्ताहिक उपासनांच्या वेळीं त्यांची पाळी नसे तेव्हां कोणाच्याही दृष्टीस पडणें कठिण असे कोनाकोपऱ्यांत ते बसत असत. त्यांचें स्मरण होण्यास कारण जी चिरस्मरणीय गोष्ट ती येणेंप्रमाणें:—

वर लिहिल्याप्रमाणें त्यांच्या वृद्धापकाळीं स्वतंत्र चरितार्थाचा मार्ग बंद झाल्यावर त्यांच्या एकुलत्या एका ६०–७० रुपये कमविणाऱ्या सुमारें ३५–३६ वर्षांच्या मुलग्यास देवाज्ञा झाली. त्या मुलाची पत्नी व पित्याच्या अकालिक मरणानें उघडीं पडलेलीं दोन मुलें होतीं. म्हणजे एवढा मोठा संसार चालविणारा मुलगा निवर्तला इतकेंच नव्हे, तर अशा विपन्नावस्थेंत असणाऱ्या सर्व संसाराचा भार मिकोबा दादांच्या डोईवर आला. हें खेदजनक वर्तमान कानीं पडलें, तेव्हां समाजांतील बरीच प्रमुख मंडळी व कांहीं बारीकसारीक सभासद मिकोबा दादांस भेटून त्यांचें सांत्वन करण्यासाठीं आणि त्यांस धीर देण्यासाठीं त्यांच्या घरीं गेली. त्या प्रसंगीं अत्यंत कोमल अंतःकरणाच्या एक दोन सभासदांस तर मिकोबादादांस पहाण्याबरोबर रडें कोसळलें. ही आपल्या भेटीस आलेल्या मित्रांची स्थिति पाहून मिकोबादादा कांहीं वेळपर्यंत तो दुःखाचा उमाळा शांत होईल म्हणून त्या मित्रांकडे टक लावून पाहात राहिले. शेवटीं म्हणाले " हें तुम्हीं काय आरंभिलें आहे ? हा तुमच्या अश्रूंचा लोट मजवर हा दुर्घट प्रसंग गुदरला याबद्दल आपणांस अतिशय दुःख होत आहे त्याची साक्ष आहे, आणि देवानें ह्या दुःखांत मला घालूं नये होतें असें आपणांस वाटलें, याचें प्रत्यक्ष प्रमाण आहे असा माझा समज झाला आहे. तो चुकीचा नसेल तर आपल्या ह्या मनोवृत्ती-बद्दल मला फार वाईट वाटतें. परमेश्वर मायबाप आहे. तो कृपासागर, करुणानिधान असून न्यायी आहे असें मानणारे व तोंडांतून उद्गार काढणारे तरी आपण सर्व आहों. मग असें परमेश्वराविषयीं मनांत येणें अथवा त्यास मनांत थोडीही जागा देणें किती अनुचित आहे याचा तुम्हीच विचार करा. हा प्रसंग मजवर येणें योग्य नाहीं असें म्हणणें म्हणजे करुणामय देवावर क्रूरतेचें व अन्यायाचें दोषा-रोपण करणें होय; आणि श्रद्धालु मनुष्यास हें बोलणें तर काय, पण असा विचार मनांत येऊं देणेंही शोभत नाहीं. हा प्रसंग दुःसह तर खराच आणि परमेश्वर-कृपेनें तो कोणावरही न येवो. पण तो ओढवल्यापासून, देवानें कृपा करून एकाच, परंतु सुशील, आज्ञाधारक, व माझें कधींच मन न दुखविण्यासाठीं निरंतर झटणाऱ्या अशा मुलग्याची देणगी दिली, आणि माझे अनेक ज्ञाताज्ञात अपराध पोटीं घालून तो मुलगा एवढा मोठा होईपर्यंत माझ्या अंगीं पात्रता येईल म्हणून

वाट पाहिली; अखेरीस मी तिला अपात्रच ठरलों, आणि तो परत घेऊन गेला; अशीच माझी खातरी झाली आहे. आपण मनसोक्त वागावें, आणि देवास दूषण द्यावें यांत काय अर्थ ? तेणेंकरून आपण अधिक दोषी मात्र होतों. माझें वरील तुमच्या शोककारणाचें निदान चुकीचें असेल, आणि आजपर्यंत माझ्या अल्प नजरेपुढें येणाऱ्या वर्तनावरून माझ्या योग्यतेची आपण जी परीक्षा केली होती, ती खोटी ठरली आणि या प्रसंगावरूनच माझ्या अपात्रतेविषयीं आपली खातरी झाली त्यामुळें माझी दया येऊन आपण सद्गदित झालां असलां, तर गोष्ट निराळी."

किती घोर प्रसंग आणि काय ही शांति, देवावरील निःसीम अढळ श्रद्धा !

## त्यांच्या उपदेशांचें स्वरूप.

भिकोबादादांचे उपदेश त्यांच्या कळकळीचे निदर्शक असत. त्यांची निष्ठा व त्यांची भक्ति हीं त्यांत स्पष्ट अनुभवास येत. त्यांचे पहिल्या वर्षांतील उपदेश आतां कोठें उपलब्ध नाहींत. परंतु प्रार्थनासमाजाच्या तिसऱ्या वार्षिकोत्सवसमयीं त्यांनीं जो उपदेश केला तो वाचून हे गृहस्थ प्रार्थनासमाजाचे उपदेशक शोभत नाहींत असे उद्गार किती अज्ञानमूलक होते त्याची साक्ष पटते, एवढेंच केवळ नव्हे तर त्यांची योग्यता किती थोर होती तेंही सहज दिसून येतें. ह्या उपदेशामध्यें त्यांनीं प्रार्थनासमाजाच्या सर्व सभासदांस अत्यंत कळकळीनें जागृत करण्याचा प्रयत्न करितांना प्रार्थनेचें महत्त्व, प्रार्थनेची सफलता व आपला उद्योग, प्रार्थना केव्हां व कां करावी, सभासदांवरील जबाबदारी, सभासदांनीं स्वतः मतांनुसार वागण्याचा धडा घालून देण्याची अवश्यकता इ० मुद्यांसंबंधानें सुंदर विवेचन केलें आहे.

ह्या सुंदर उपदेशांत ते म्हणतातः—

आतां आमच्या प्रार्थनासमाजस्थ बंधूंच्या सेवेंत सादर होतों. सज्जनहो ! आपण सद्विवेकानें आपल्या कर्तव्यांपैकीं हें सत्कार्य निवडिलें हें चांगलें केलें. आपण प्रतिसप्तकास सायंकाळीं नेमलेल्या स्थानीं एकत्र जमून पाळीपाळीनें श्रीपरमेश्वराची प्रार्थना करून गीत गातों व बोधपर विषय वाचितों, हें चांगलें आहे. परंतु इतकेंच करून हें सत्र सांग होतें काय ? आमचे ठायीं जगदीश्वर प्रभूची सेवा करण्याचा अधिकार आला आहे काय ? आपण दुर्गुण टाकून दिले काय ! आपल्या कुटुंबांत एकाच परमेश्वरास भजण्याचा हा सोपा क्रम तरी चालू केला काय ? आपल्या बंधुजनांशीं विश्वास, प्रीति, नम्रता इत्यादि सद्गुण धरून चालतों

काय ? परस्परांचे उपयोगीं पडतों काय ? दुःखितांचा समाचार घेतों काय ? परमार्थाकरितां लोकनिंदा, छळ, अर्थहानि इत्यादि सोसायास सिद्ध झालों काय ? देवांचीं नांवें दिलेल्या मूर्ति पदार्थसंग्रहाच्या देव्हाऱ्यांत ठेवण्याची तयारी करीत आहों काय ? हें जर नाहीं, तर आपण एकाच परमेश्वराची भक्ति करतों ती कशी ? आम्ही प्रार्थना करितों ती कशी ? चांगल्या गोष्टीविषयीं मनांत उत्कंठा नसतां बाह्यात्कारीं मात्र लोकांस दाखविण्याकरितां जर प्रार्थना करीत असलों, तर ती प्रार्थना नव्हे, तें ढोंग समजावें. आपण असमर्थ जाणून नम्रभावानें अंतःकरणापासून श्रीपरमेश्वरापाशीं जें मागणें करावें, तिला प्रार्थना म्हणतात. योग्य अर्थाचे प्राप्तीविषयीं मनांत बळकट इच्छा धरणें आणि त्याविषयीं वर सांगितल्याप्रमाणें प्रार्थना करणें हें एकच आहे. इच्छामात्रें जसें इच्छिलें कार्य होत नाहीं, तसें बहुधा नुसत्या प्रार्थनेपासूनही काम होत नाहीं. एथें मला आपला अभिप्राय स्पष्ट करून दाखवितां आला नाहीं, तो सुज्ञांनीं पुढल्या वाक्यावरून समजून घ्यावा. योग्य अर्थाचे सिद्धीविषयीं जशी मनांत प्रथम इच्छा, आस्था किंवा उत्कंठा उत्पन्न झाली पाहिजे, तशीच धर्मशीलास प्रार्थनेचीही आवश्यकता आहे. आणि जशी प्रार्थनेची तशीच प्रयत्न करण्याचीही आवश्यकता आहे. आपण जें समजतों, तें जरी खरें असलें, तरी त्या ज्ञानाच्या सत्यतेचें प्रमाण आपल्या नुसत्या बोलण्यावर नाहीं, परंतु त्याप्रमाणें करण्यावर आहे. याजकरितां नुसतें बोलणें किंवा प्रार्थना करणें याहून उचित क्रिया आचरणें अथवा प्रयत्न करणें हें उत्तम कर्तव्य होय. यावरून प्रार्थना करूं नये असा माझा आशय नाहीं. विघ्न अथवा अरिष्ट यांच्या निरसनार्थ श्रीपरमेश्वराची प्रार्थना करावी, हा धार्मिक जनांचा शिष्टसंप्रदाय, मंगलाचरण, किंवा सदाचारच आहे. तुकाराम साधूचें वचन आहे कीं, " नाम विठोबाचें घ्यावें, पुढें पाऊल टाकावें." यांतील भावार्थ, परमेश्वराचें नांव घेऊन प्रयत्न करावा. रामदास स्वामींच्या श्लोकांत म्हटलें आहे कीं, " प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ पुढें वैखरी राम आदीं वदावा ॥ सदाचार हा थोर सांडूं नये तो ॥ जगीं तोचि या मानवीं धन्य होतो." याचा भावार्थ, इतर उद्योगास लागण्याच्या पूर्वी सकाळीच उठून श्रीपरमेश्वराचें मनांत चिंतन करावें, नंतर ध्वन्यात्मक वाणीनें त्याचें नांव घ्यावें; हा जो थोर सदाचार तो सोडूं नये. याप्रमाणें जो मनुष्य चालतो तो या जगांत धन्य होतो. याप्रमाणें बहुत ज्ञात्यांचीं अनुमोदनें आहेत. जेथें आपला उपायच नाहीं. तेथें श्रीदयाळू परमेश्वराची मोठ्या आस्थेनें व विनत भावानें नुस्ती प्रार्थना करणें

योग्य आहे. परंतु जेथें आपला उपाय चालण्याजोगा आहे, तेथेंही नुस्ती प्रार्थना करणें ती प्रयत्नसहित केली पाहिजे. कारण कीं, उचित कार्यांविषयीं प्रयत्न करावयास जगद्वंद्य प्रभूनें आम्हांस आपली आज्ञा व स्वातंत्र्य हीं देऊन ठेविलीं आहेत. त्यांस अनुसरून सत्कर्मांची मनापासून इच्छा धरून प्रयत्न मात्र निश्चयानें केला म्हणजे झालें. सत्कर्मांची इच्छा धरणें ही एक मानसिक प्रार्थनाच आहे; ती केल्यावर मग दुसरी तोंडची प्रार्थना न केली तरी चालेल. परंतु त्यांतूनही जे कोणी सदाचार न टाकितां, आपला सद्धर्म बजाविण्याचा प्रयत्न करते वेळेस मानसिक व वाचिक अशा दोन्ही प्रकारच्या प्रार्थना करितात, ते सज्जन पुरुष या लोकीं धन्य होत.

गुणावगुण धरण्या सोडण्याचें स्वातंत्र्य, शक्ति, व उपायांचें ज्ञान इत्यादि साधनें श्रीपरमेश्वरानें आमचे ठायीं ठेविलीं असतां, देवा! आमचे दुर्गुण काढून टाक, आणि चांगले गुण लाव, अशी वर वर प्रार्थना केली, परंतु अंतर्यामापासून आपण ते वाईट गुण सोडावयास व चांगले गुण धरावयास उद्युक्त झालों नाहीं, व दृढ निश्चय केला नाहीं, तर असे ज्याचे त्यानें प्रयत्न केल्यावांचून कोणाचे दुर्गुण देवानें घालविले आहेत? जे गुण आम्हांला धरितां आले ते गुण आपणालाच सोडितांही आले पाहिजेत. देवाचें साहाय्य मागून जें काम आम्हांस केलें पाहिजे, तें जर देवावरच सोंपूं लागलों, तर आम्हांस जीं साधनें दिलीं आहेत, तीं कशाला? त्या साधनांनीं अनुचित कर्में करावयास बरें वाटतें, आणि उचित कार्यांविषयीं प्रयत्न करावयास जिवावर येतें काय? मग सगळींच कार्यें देवावर टाकून स्वस्थ कां बसत नाहीं? पुढील प्रजेकरितां अर्थसंग्रह करून ठेवावयास कशाला कष्ट करावे? ती आपल्या निर्वाहाकरितां अर्थाचा संग्रह करील किंवा नाहीं याचा जर आपणाला भरंवसा नाहीं, तर हें कल्याणदायक कार्य त्या प्रजेच्या हातून सिद्धीस जाईल याचा तरी काय भरंवसा? आपण प्रीतिभावानें मुलांकरितां संपत्ति जोडून ठेवितों. कसें जरी म्हटलें, तरी अर्थाहून परमार्थ श्रेष्ठ आहे, तेव्हां मुलांकरितां वडिलांनीं अक्षय संपत्ति जोडून ठेवावी हें त्यापेक्षांही मोठ्या प्रीतीचें लक्षण प्रदर्शित होईल. सांगा आतां या देशाच्या आर्यपुत्रांनों! तुमच्या देवधर्मांची व्यवस्था कोणीं करावी? सांप्रतच्या परदेशी अधिकाऱ्यांनीं? त्यांची व्यवस्था मान्य असली तर सिद्ध आहे. घ्या ख्रिस्ती धर्म. तो नाहीं तर तुम्ही निवडलेला मार्ग शुद्ध आहे. हा तरी प्रचारांत आणण्यास प्रयत्न करा. हा मार्ग नाशकारक, वाईट, कपटाचा, ठकबाजीचा असा कांहीं तुम्हांस वाटत असल्यास तसें आतांच कळूं

था. यापासून सुज्ञांस कांहीं बरेवाईट परिणाम दिसत असतील ते एव्हांच उघड करा. नाहीं तर आरंभीं अज्ञान लोकांकडून तुमची फजिती होतच आहे, परंतु पुढें ज्ञानी लोकही तुम्हांला हंसूं लागतील असें करूं नका. सध्यां जसे आम्ही वडिलांच्या जुन्या मार्गांत ठेंचा खाऊन दुःख पावत आहों, तशीं आपल्या पुढील प्रजेनें धर्माच्या अयोग्य चालींपासून दुःखें भोगूं नयेत, म्हणून दूरवर दृष्टि पोंहचवून आतांच नीट विचार करा. जर पुष्कळ विचाराअंतीं हाच मार्ग तुम्हांस चोख दिसत असला, तर हा प्रशस्त मार्ग स्वीकारून हळूहळू प्रचारांत आणायाचे प्रयत्न कां करीत नाहीं ? तुम्ही लोकनिंदेस भिऊन हें सत्कृत्य इतक्यावरच ठेवायास पाहाल तर पुढें तरी हें कोण चालवील ? तुमची प्रजा ? जें काम आमच्यानें करवत नाहीं, तें बिचाऱ्या पुढील लेंकरांस तरी कसें झेंपेल ? असें करण्यानें तुमच्या लेंकरांची तुम्हांस दया नाहीं असें कसें दाखवितां ? काय या धर्मकृत्यावर आपली श्रद्धा नाहीं ? जर आहे, तर ज्या गोष्टीवर आपली श्रद्धा आहे ती करायास लाजतों, आणि ज्यावर श्रद्धा नाहीं असें प्रसिद्ध केलेलें अयोग्य कर्म जाणून बुझून अज्ञान लोकांच्या भयामुळें करितों, हा आपला केवढा विपरीताचार आहे बरें ? अज्ञान लोक आम्हांला दोहींकडून हंसायाला तयार आहेत. त्यांच्या हसण्याची आपण कशाला परवा करावी ? आम्ही त्यांच्या हसण्याची परवा बाळगितों म्हणून ते आम्हांला हंसतात. ज्या अज्ञान चालींचा आम्ही तोंडानें अव्हेर करून दाखवितों त्याच चालींचा त्यांच्या निंदेची परवा बाळगून स्वीकार करितों, असें जेव्हां ते पाहतात तेव्हां ते सुज्ञ म्हणविणारांस कसे न हंसतील ? सुज्ञांनीं आपल्या उत्तम आचरणाचा कित्ता अज्ञान्यांस दाखवावा; अज्ञान्यांच्या आचरणाचा कित्ता सुज्ञांनीं घेऊं नये. कित्येक गोष्टींनीं जीं अशुद्ध मतें आहेत, तसल्या मतांच्या श्रद्धावानांनीं तर धर्मासाठीं अज्ञान लोकांकडून निंदा व नानाप्रकारच्या हालअपेष्टा सोसून शेवटीं आपले प्रिय प्राणही वेंचले, तशी आतां या राज्यांत धर्मसंबंधीं उद्योग करणारास प्राणांताची धास्ती नसतां केवळ आप्तांच्या हसण्यास व अज्ञान लोकांच्या निंदेस भिऊन आपल्या सद्धर्माची उपेक्षा करावी ही मोठी अश्लाघ्य गोष्ट आहे."

शेवटीं येथें हेंही सांगणें जरूर आहे कीं, लहानपणापासून मुलांस धर्मशिक्षण मिळालें पाहिजे म्हणून त्यांच्यासाठीं धर्मशिक्षण देण्यासाठीं वर्ग सुरू करण्याची कल्पना भिकोबा दादांचीच व त्यांनींच ती मूर्त स्वरूपांत आणिली. असो.

प्रारंभीं प्रारंभीं उपासनांमध्यें आजची शिस्त नव्हती."त्या वेळच्या उपासनांमध्यें उद्बोधन, स्तवन, प्रार्थना व उपदेश असे जे आज भाग आहेत ते तसे नव्हते, प्रार्थना करावयाची व एक निबंध वाचावयाचा हा प्रघात असे. हे निबंधहि बहुत-करून थिओडर पारकर व दुसऱ्या अशा प्रकारच्या लेखकांच्या लेखांचे तर्जुमे असत. हल्लीं जें प्रार्थनासंगीत आहे तसें त्या वेळीं नव्हतें. त्या वेळीं पाळंदे यांचें रत्नमाला नामक पुस्तक होतें. त्यांतील पद्यें म्हणण्याचा प्रघात असे. पुढें आमच्यापैकीं कित्येकांनीं पद्यें रचण्याचा क्रम सुरू केला आणि एकंदरींत गायनाची सुधारणा व्हावी म्हणून रावजीबोवा बेलबागकर गवई यांची योजना करून त्यांजपाशीं त्यांच्या जुन्या चिजा गावयास शिकण्याचा क्रम सुरू केला. कांहीं नवीन पद्यें जीं केलीं त्यांमध्यें रावजीबोवांकडून शिकलेल्या चिजांचे शब्दांबद्दल आमच्या धर्मसंबंधीं अभिप्रायास जुळणारे असे शब्द घालून तयार केलीं. पूर्वी उपदेशाचा भाग लिहून आणून वाचावा असा प्रकार होता असें म्हटलें आहे; पण, नंतर वाचण्यापेक्षां बोलणें बरें असें वाटून तो क्रम सुरू झाला व आम्ही उत्सवासारख्या प्रसंगांसाठीं नवीन पद्यें रचून तीं लहानशा पत्रकांच्या रूपानें छापूं लागलों. एका वर्षी आम्हीं तुकारामाचे कांहीं अभंग घेतले व ते सर्व मंडळींना फार आवडले. तेव्हां पुढें आमच्या संगीताच्या सर्व आवृत्तींमध्यें तुकाराम नामदेव आदिकरून संतांचें अभंग घालूं लागलों व त्याचप्रमाणें दुसऱ्या अनेक कवींचीं पद्येंही आम्ही त्या संगीतामध्यें समाविष्ट करूं लागलों. प्रथमचा निबंध वाचण्याचा क्रम सुटून स्वतःचे विचार कोणत्या तरी ग्रंथाच्या आधारानें उपदेशरूपानें सांगण्याचा प्रकार आला; पण नंतर तुकारामाचा अगर अशाच कोणत्याही साधूचा अभंग अगर त्याचा कांहीं भाग आधारास घेऊन बहुत उपदेश होऊं लागले व अद्यापही तो क्रम साधारणपणें येथें व पुण्यास चालू आहे." *

## प्रारंभींचे कांहीं आक्षेप व त्यांस उत्तरें.

आज परमहंस सभा ही आम्हांला फार दूर वाटते व तिच्या संबंधाची कमी अधिक माहिती मिळाली म्हणजे ती मनोरंजक व बोधपर वाटते. परंतु ज्या वेळीं प्रार्थनासमाजाची स्थापना झाली, त्यावेळीं लोकांचा कल तसा नव्हता. परमहंस

---

* डा. भांडारकरांनीं मुंबईच्या प्रार्थनासमाजाच्या ५० व्या वार्षिकोत्सव-समयीं दिलेल्या व्याख्यानांत हा भाग आहे.

प्रकरण ताजें होतें. परमहंस मंडळींत प्रथम असलेली व नंतर अगर ती मंडळी जिवंत असतांनाच ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतलेली मंडळी डोळयापुढें होती. नव्या सुशिक्षित मंडळीपैंकीं पुष्कळांस खरें पहातां धर्माची कांहीं अवश्यकता वाटत नव्हती. जुना धर्म व आचार वेडगळ म्हणून ते सोडावयाचे आणि नवा धर्म व नवे आचार घेऊन नव्या वेडगळपणाचा बाजार घालावयाचा यांत काय अर्थ आहे, ही त्यांच्या विचारांची दिशा होती. टीकाकारांचा आणखी एक वर्ग होता. तो ख्रिस्ती लोकांचा. प्रार्थनासमाजासारखी संस्था त्यांना ख्रिस्ती धर्माकडे येण्याचा एक नजीकचा रस्ता असें वाटत होतें. स्थापनेनंतर अभिनंदनपर लेख लिहितांना ज्ञानोदयानें दोन वेळां असें म्हटलें आहे कीं, "जर तुम्ही धैर्य व विश्वास धरून हा भक्तिक्रम असाच उघड रीतीनें चालवाल व ईश्वराचें साह्य मागाल, तर तो तुम्हांस **खरा मार्ग** दाखवील यांत संशय नाहीं.* त्यांच्या दृष्टीनें खरा मार्ग कोणता त्याचा येथें उल्लेख करण्याची अवश्यकता नाहीं. सारांश, समाजस्थापना होतांच त्याच्यावर चोहों बाजूंनीं टीका सुरू झाली. जुन्या लोकांना हें ख्रिस्ती लोकांचें अनुकरण वाटलें, तर त्यांचीच ज्ञानप्रकाशासारख्या आधुनिक शिक्षण-मंडितांनीं री ओढली ! मुलींनीं पदें म्हणणें, उपदेशकानें सर्वांसाठीं प्रार्थना करणें, ह्यावर जुन्यांनीं टीका केली व लांब सूर काढून शब्द उच्चारिले म्हटलें, तर नव्यांनींही "केवळ इंग्रज जसे बोलतात तसे ते बोलतात"† असें म्हटलें. जुन्या लोकांनीं प्रार्थनेवर टीका केली तर ह्यांनींही "ह्या नव्या मंडळीस ही प्रार्थनेची चाल शोभत नाहीं. ईश्वरास जर सर्वच दिसतें तर आपलीं मनेंही त्यास दिसतातच. मग आपण त्याचे उपकार मानतों हें बोलण्यांत काय अर्थ ? केवळ इंग्रज डोळे मिटून प्रार्थना करितात म्हणून आपण करावयाची इतकाच अर्थ दिसतो" असें म्हणावयाचें ठेविलें नाहीं. मुलींनीं सुस्वर गाणीं म्हणणें, प्रार्थना करणें तथास्तु असें म्हणणें इ० सर्व प्रकार "अशा सुधारलेल्या लोकांनीं अशा पोरचेष्टा आपल्या सुधारलेल्या पंथांत आणिल्या" असें वाटून "हें पाहून आम्हांस हंसूं येतें" असेंही त्यावेळच्या ज्ञानप्रकाशकारांनीं म्हटलें. हें झालें सभ्यपणा न सोडतां झालेल्या टीकेसंबंधानें. परंतु मित्रोदयनामक पत्रांत झालेल्या टीकेचें स्वरूप अत्यंत गलिच्छ असें होतें. त्या टीकेविषयीं लिहितांना परस्पर ज्ञानोदयकर्त्यांनीं म्हटलें कीं

---

* ज्ञानोदय १५ एप्रिल १८६७ व १५ जून १८६७. † ज्ञानप्रकाश १९ आगस्ट १८६७.

" मित्रोदयांत एका लिहिणारानें ह्या मंडळीविषयीं जो मजकूर लिहिला तो इतका चेष्टेचा व हलकटपणाचा आहे कीं, त्यास पत्रांत जागा मिळाली याचें नवल वाटतें. त्यावर येथें टीका करण्यांत विशेष अर्थ नाहीं." अशा प्रकारें चोहों बाजूंनीं प्रारंभीं टीका होत असतां कित्येक महिने समाजाच्या वतीनें अगर समाजाच्या सभासदानें स्वतःच्या जबाबदारीवर कांहीं उत्तर देण्याचा प्रयत्न केला नाहीं. परंतु नांव व नियम वगैरे जाहीर झाल्यावरही जेव्हां बाष्कळ टीका थांबली नाहीं त्या वेळीं " प्रार्थनासमाजाचा एक सभासद " अशा सहीचीं दोन पत्रें येथील नेटिव्ह ओपिनिअन पत्रांत प्रसिद्ध झालीं. पहिल्या पत्राच्या अखेरीस लिहिणारानें असें स्पष्ट बजाविलें आहे कीं, " हें पत्र प्रार्थनासमाजाच्या किंवा समाजाच्या कोणाही कामगाराच्या सांगण्यावरून लिहिलें नाहीं, तर ज्ञानप्रकाशाच्या प्रश्नास उत्तरादाखल मला जें सयुक्तिक दिसतें तें लिहिलें आहे. हें पत्र समाजास कितपत मान्य होईल हें सांगवत नाहीं. तेव्हां याची जबाबदारी माझ्यावरच आहे." आम्हांला असें वाटतें कीं एक तर हीं पत्रें स्वतः मामा परमानंद ह्यांनीं लिहिलीं असावीं अगर त्यांच्या साहाय्यानें रा. रा. भास्कर हरि भागवत ह्यांनीं लिहिलीं असावीं. ज्याप्रमाणें टीकेचें स्वरूप येथें नमूद केलें आहे त्याचप्रमाणें ५९ वर्षांपूर्वी ह्या टीकेला पहिल्या पिढीनें तोंड कसें दिलें याची कल्पना होण्यासाठीं त्या दोन्ही पत्रांतील कांहीं निवडक भाग पुढें दिले आहेतः—

"ज्ञानप्रकाशकर्त्यांचा प्रार्थनासमाजावर सामान्य दोष हा आहे कीं, 'त्याचीं मतें व आचरण केवळ युरोपिअन पाद्री लोकांचें अनुकरण आहे.' याचें स्पष्टीकरण ते असें करतात कीं, ' इंग्रजी शिकलेल्या हिंदूंची स्वधर्मावरून श्रद्धा उडते व खिस्ती व मुसलमानीही धर्म ते स्वीकारीत नाहींत, म्हणून त्यांचीं मनें रिकामीं पडतात ' ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तथापि त्याचा कांहीं विचार न करितां, " ह्या मंडळीनें रिकामीं मनें भरून टाकण्याची ही तोड काढली आहे असें म्हणणें आम्हांस भाग आहे......ह्या पंथाचा मूळ जो हा पाया तोच निरर्थक होय." परंतु आपल्या पुणेंकर बंधूस असें विचारणें आहे कीं, प्रार्थनासमाजानें जो क्रम चालविला आहे त्याचा हेतु इतकाच कीं, रिकामीं मनें भरून टाकिल्यासारखें व्हावें हें त्यास कोणीं सांगितलें ? तो अशी पोकळ कल्पना करण्याऐवजीं समाजाचा हेतु जो लिहिला आहे (पृ.३५-३६) तो लक्ष लावून वाचील तर त्याचा चांगला समज होईल. आतां मन रिकामें पडणें म्हणजे काय हें मलाही समजत नाहीं. परंतु कित्येक भाविक खिस्ती पाद्री आमच्या इंग्रजी शिकलेल्या लोकां-

विषयीं धर्मांच्या बाबतींत जें म्हणतात त्याचा अर्थ हा कीं, धर्म व शास्त्रावर कोणत्याही लोकांचा विश्वास असला म्हणजे लोक देवास भिऊन सदाचरणानें वागतात व ज्यांची श्रद्धा कोणत्याही धर्मावर किंवा शास्त्रावर नाहीं त्यांस पाहिजे तशी वर्तणूक करण्यास कोणाचेंच भय उरत नाहीं. हें म्हणणें कितपत खरें आहे याविषयीं या ठिकाणीं विचार करणें जरूर नाहीं. परंतु रिकामीं पडलेलीं मनें कशीं तरी भरून काढायाचीं म्हणून प्रार्थनासमाजानें आपला क्रम चालविला आहे असें म्हणणें अगदीं गैर व निराधार आहे.

तर मग कोणी असें म्हणेल कीं, हा नवीन पंथ काढण्याचें कारण काय ? याचें उत्तर देण्यापूर्वी मला सुचविणें आहे कीं, जो नास्तिक, जो सर्वच गोष्टींचा संशय बाळगणारा, ज्यास दृष्टिगोचर सृष्टीशिवाय दुसरें कांहीं आहे असें वाटत नाहीं व मनुष्यानें जनावराप्रमाणें केवळ शरीरनियमानेंच वागून यथेच्छ इंद्रियसुख भोगावें असा ज्यांचा मनापासून समज आहे, त्यांजबरोबर मला वाद करणें नाहीं. परंतु ज्यांच्या मनास असें वाटत असतें कीं, ह्या इंद्रियगोचर विश्वाचा कर्ता व नियंता कोणी तरी असून तो आपणांपेक्षां सर्व प्रकारें श्रेष्ठ आहे; मनुष्यमात्र व इतर प्राणी यांच्या गुणधर्मांत अंतर आहे; मनुष्यांत स्वभावतः सत्यासत्य, बरें वाईट, नीति अनीति जाणण्याची शक्ति आहे व त्यानें कोणास न कळतांही बरें केलें असतां चित्तास समाधान वाटतें, व वाईट केल्यास खेद होतो, आणि ज्या बऱ्या-वाईट कृत्यापासून होणारे परिणाम केवळ ह्या जगांतच भोगवतील इतकें नाहीं तर मरणानंतरही आपणास भोगावे लागतील असें ज्यांचें मत असेल अशा लोकांशीं मात्र प्रार्थनासमाजाचा संबंध असतो व मी अशांच्याच प्रश्नांस यथामति सुचेल तें उत्तर देईन. तर आतां सांगितलेल्या गोष्टी ज्यांस मान्य त्यांस प्रार्थनासमाजाचें आचरण वेडेपणाचें दिसूं नये. कारण, त्याच्या सभासदांस वाटतें कीं ईश्वरसंबंधीं व नीतिसंबंधीं आपल्या मनांत ज्या उपरोक्त स्वाभाविक प्रेरणा त्यांस केवळ अनुसरणारें जें मत तेंच खरें, इतर खोटीं; म्हणून त्यांस सत्य वाटलेल्या गोष्टीचा त्यांनीं स्वीकार केला आहे व खोटी ती मुळींच वर्ज करावी असा त्यांचा निश्चय आहे, तर यांत अचंबा वाटण्यासारखें काय आहे ? प्रार्थनासमाजाच्या सभासदांसारखेच ज्ञानप्रकाशकर्तेंहि इंग्रजी शिकलेल्या पैकींच तरुण आहेत. कोणी कोणी लोक असेंहि म्हणतात कीं त्यांचीं व त्यांच्या पुण्यांतील अनुयायी लोकांचीं धर्मसंबंधीं व नीतिसंबंधीं मतें विलक्षणच आहेत. परंतु तें कसेंहि असलें व आपल्या वर्गा-

तील लोकांचे विचार जरी भिन्न असले, तरी ते व त्यांचें कारण समजणें इतकें आपल्या पुणेकर बंधूंस बिकट पडूं नये.

**दुसरा दोष**—ज्ञानप्रकाशकर्ते म्हणतात "मूर्तिपूजेचा ही मंडळी ( प्रार्थनासमाज ) अतिशय द्वेष करिते व ती बहुत नीच व ईश्वराचा अपमान करणारी होय असें त्यांचें मत आहे. हें जो मानील त्यासच ही मंडळी आपल्यामध्यें घेते. हा इतका मूर्तिपूजेचा दुष्टावा कां हेंहि आम्हांस समजत नाहीं. केवळ इंग्रज जसे बोलतात तसें ते बोलतात इतकेंच म्हणणें भाग आहे." आतां ही ज्ञानप्रकाशाकडून डोळे झांक कां होते हें मला समजत नाहीं. मूर्तिपूजेस जीं दूषणें लाविलीं आहेत, त्याचें कारण विचारलें असतें तर गोष्ट वेगळी. परंतु कबूल केल्यासारखें करून तिचा दुष्टावा कां करितात हा प्रश्न सयुक्तिक नव्हे. लोक वाईट म्हणतील त्यांस बरें म्हणण्याचें ज्यांचें ब्रीद असेल त्यांनीं हा प्रश्न घेऊन बसावें. इतर लोक तर वाईट व नीच गोष्टींचा दुष्टावाच करितील.

**तिसरा दोष**—ज्ञानप्रकाशकर्ते म्हणतात कीं, "पाषाण पितळेचा गजमुख किंवा वानराकृति ह्या मूर्तीची गंधादिकांनीं पूजा करणें व जगत्कर्ता अदृश जो ईश्वर त्याची शुद्धभावें स्तुति व प्रार्थना करून त्याचे उपकार मानणें हें एकच आहे. तेव्हां प्रार्थनासमाजानें एक वेड सोडून दुसरें उचलणें यांत विशेष पुरुषार्थ नाहीं. ईश्वरास सर्व समजतें, आपलें मनहि दिसतेंच आहे. प्रार्थना करणें हें ख्रिस्ती लोकांचें वेड आहे." आतां ज्या गैर माहित लोकांस ख्रिस्ती धर्माचें मर्म समजत नाहीं, त्यांस हें म्हणणें शोभतें. परंतु ज्ञानप्रकाशकर्त्या सारिख्यांनीं इतका इतिहास वाचलेला व धर्मसंबंधीं शोध केलेला असून त्यांनीं असें लिहूं नये. प्रार्थनासमाजास ख्रिस्ती लोक नास्तिका जवळ जवळ म्हणतील, तर मग त्यांनीं ख्रिस्ती वेड कसें घेतलें ? प्रार्थना करणें हें आपल्या हितासाठीं आहे. आपापल्या एकट्याच्या मनांत पुष्कळ असतें. परंतु आपण एकत्र ठिकाणीं मिळून आपणांपासून घडलेल्या अपराधांची ईश्वराजवळ क्षमा मागणें व कर्तव्याची आठवण वारंवार करून घेणें हें ज्यांस वेड वाटतें त्यांनीं मला वेडा म्हटलें तरी चिंता नाहीं. परंतु ज्ञानप्रकाशकर्ते जेव्हां प्रार्थनारूप भक्तीस इतका दोष देतात तेव्हां त्यांच्या मनांत स्वदेशाची सद्यःस्थिति व नीच व बाह्य स्वरूपी धर्माचरण लोकांत चाललें आहे याचा कांहीं तरी विचार वागत असतो काय ? आपल्या घरांतील सर्व मनुष्यें व देशांतील लोक असा धर्म पाळीत असतां, आपण परमेश्वराची प्रार्थना करणें जर वेडच

आहे, तर ज्ञानप्रकाशकर्त्यांच्या मतें करावें तरी काय ? त्यांस कोणता मार्ग शहाणपणाचा वाटतो हें ते कृपा करून कळवितील काय ?

**चवथा दोष** तर पोरकटच आहे. तो हा: प्रार्थना करते वेळीं 'डोळे मिटणें, मुलींनीं गाणें,* प्रार्थनेच्या शेवटीं इंग्रजी एमेन शब्दाचें भाषांतर करून 'तथास्तु' म्हणणें, अशा कांहीं नकला उडतात. त्या तर केवळ इंग्रजांच्या अनुकरणाकरितां आहेत हें स्पष्ट आहे.' हा स्पष्टपणा मला दिसत नाहीं. निराकाराचें मानसिक भजनपूजन करतांना इकडे तिकडे मौज पहाणें ज्यांना साधत नाहीं त्यांनीं डोळे मिटले, परमेश्वराची स्तुति पद्यांत मुलींजवळून म्हणविली व समाजांत एकटा प्रार्थना म्हणणारा जो त्यानें शेवटीं सांङ्गिक शब्द म्हटला म्हणून काय झालें ? या कारणावरून असें करणारे अति मूर्ख व त्यांचीं मतें शुद्ध वेडेपणा ठरला काय ? आपल्या लोकांत ईश्वराचें ध्यान करणारे डोळे झांकीत नाहींत ? पद्यरूपी स्तुति गात नाहींत ? पत्राच्या शेवटीं 'ही विनंति,' प्रार्थनेच्या शेवटीं 'ही प्रार्थना' व 'तथास्तु' म्हणण्याची चाल नाहीं काय ? मग यांत इंग्रजांचें अनुकरण कसें झालें ? या प्रकारची टीका अज्ञान व जुन्या समजुतीच्या लोकांस शोभते. त्यांनीं कोणास पायमोजे घातलेलें पाहिलें म्हणजे देखील तो ख्रिस्ती झालासें त्यांस वाटतें व त्यास ते बाय्याही म्हणतात. परंतु ज्ञानप्रकाशकर्ते सुशिक्षित व विचारशील आहेत. त्यांनीं इंग्रजांचें अनुकरण करून नवीन ग्रंथही रचले आहेत व हे स्वतः मोठे शिवभक्त किंवा कडक वैष्णव असे नसून विचारहीन लोक यांस काय म्हणतात याची त्यांस पर्वाही नाहीं. मग त्यांनीं वेड घेऊन उगाच कल्पना काढीत कां बसावें ? खरोखरच तर मनुष्यस्वभाव मोठा चमत्कारिक आहे."

अशा प्रकारें टीका व क्वचित तीस उत्तर देणें असा प्रकार होत असतां प्रार्थनासमाजाचें काम कोणाच्याही टीकेकडे लक्ष्य न देतां संथपणें चाललें होतें. हा नुस्ता प्रारंभ होता, तरी स्थापकांच्या पुढें ध्येय फार मोठें होतें. समाजाचे पहिले सेक्रेटरी रा. रा. बाळ मंगेश वागळे हे होते व पहिले अध्यक्ष डा. आत्माराम पांडुरंग होते. डा. आत्माराम पांडुरंग १८९८ सालीं त्यांच्या मृत्यूपर्यंत समाजाचे

*आज अगदीं जुन्या विचारांच्या कुटुंबांतील मुली गांवोगांव मेळ्यांचीं पदें सार्वजनिक स्थळीं व नाटकगृहांतही म्हणत फिरत असतात. आणि त्यांत जुन्या समजुतीच्या लोकांनाही कांहीं वैर वाटत नाहीं.

अध्यक्ष होते. नियम वगैरे ज्या दिवशीं कायम झाले त्या दिवशीं सेक्रेटरींनीं सांगितलें कीं, "ही संस्था जी निघाली आहे तिचें मुख्य कारण असें कीं, नवशिक्षित मंडळीचा प्रचलित हिंदुधर्मावर व त्यांतील सर्व चालीरीतींवर विश्वास नाहीं. महमदी अगर ख्रिस्ती धर्म विचारास पटत नाहीं, म्हणून त्याचा स्वीकार करतां येत नाहीं. त्यामुळें देवधर्म सुटला असें होतें. हें असें होणें इष्ट नाहीं. म्हणून पूर्ण विचार करून कांहीं मंडळीच्या अनेक सभा भरून व त्यांत चर्चा होऊन ही संस्था स्थापन झाली आहे. ही संस्था आज केवळ बीजरूपानें आहे. ह्या लहानशा बीजाचा मोठा वृक्ष व्हावा अशी आमची इच्छा आहे; व त्या हेतूनेंच आमचे प्रयत्न चालू आहेत." याच सभेमध्यें रा. रा. मोरोबा विनोबा संजगिरी यांनीं एक सावधगिरीची सूचना केली होती. संस्थापकांचा प्रतिमापूजनावर फार मोठा कटाक्ष होता व "संसारांतील सर्व कृत्यें ह्या मतास अनुसरून व्हावीं" अशा उद्देशानें प्रार्थनासमाज स्थापिलेला म्हणून रा. रा. मोरोबा विनोबा म्हणाले "मला लहानपणापासून मूर्तिपूजेचा कंटाळा आहे. मजवर तो गजप (गहजब) आप्त मंडळीच्या योगें कधीं कधीं येतो तो मोठ्या दुःखानें मी सहन करतों ( म्हणजे माझ्या इच्छेविरुद्ध मूर्तिपूजा कधीं कधीं मला करावी लागते ) परंतु जेव्हां ह्या सभेचा सभासद झालों तेव्हांपासून मूर्तिपूजा निश्चयानें सोडिली आणि **आतां जेव्हां प्रतिज्ञेवर सही करीन** तेव्हां ती गोष्ट मनांतच आणणार नाहीं * असें जरी आहे तरी मूर्तिपूजा न केल्यानें ज्या अडचणी येणार आहेत त्यांविषयीं कसें व्हावें?" परंतु त्या वेळीं ह्या अडचणींचा आगाऊ विचार करावयास मंडळी तयार नव्हती. उलट पक्षीं समाजाच्या स्थापनेपासून दर आठवड्यास उपासनांस हजर राहणाऱ्या हिंदु रिफारमर पत्राच्या संपादकांनीं असा सावधगिरीचा उपाय सुचविला कीं, "आपण इतके सुशिक्षित असून यत्किंचित एकादा सांप्रदाय प्रचारांत आणावयास किंवा त्याप्रमाणें चालावयास, असंख्य अडचणी येतात.

---

* प्रतिज्ञा ही अशी होतीः—

मी प्रत्यहीं परमेश्वराचें चिंतन करीत जाईन.

सत्कर्म आचरावयास व असत्कर्मापासून दूर रहाण्यास मी यत्न करीन.

स्वभावदोषानें कांहीं वाईट कर्म मजपासून घडल्यास त्याविषयीं पश्चात्ताप व्हावा एतदर्थ परमेश्वरापाशीं प्रार्थना करीन.

हे परमेश्वरा! ह्या प्रतिज्ञा पाळण्याचें सामर्थ्य मला दे.

ह्यावरून असें होतें कीं, सभासदांनीं प्रतिज्ञापत्रावर सह्या मागाहून केल्या.

पदोपदीं आपली गुंतागुंत इतकी होऊन राहिली आहे कीं, समयविशेषीं आपलीं सर्व मतें एकीकडे ठेवून कुटुंबाच्या किंवा आपल्या सुखास्तव एकाद्या वेडगळ मसलतीसही अनुसरावें लागतें. असें असतां प्रतिज्ञा करून सदरहुप्रमाणेंच तिच्या विरुद्ध आचरण करण्यास प्रवृत्त होणें हें किती दोषार्ह आहे ? म्हणून असा अप्रसिद्ध ( ? ) नियम करून सर्वत्रांस अडचणींत टाकून आपल्या सत्कृत्यास धोका आणण्यापेक्षां सांप्रत तो किंचित सौम्य ठेवणें आम्हांस बरें वाटतें " ह्या सावधगिरीच्या सूचनेचा समाजानें विचार करणें शक्यच नव्हतें. परंतु पुढें प्रो. भांडारकर मुंबईंत येऊन ते सभासद झाल्यानंतर उद्देश, धर्मतत्त्वें ह्यांना निश्चित स्वरूप देण्यांत आलें. त्याचा विचार करण्यापूर्वी समाजाजी स्थापना करितांना ब्राह्मसमाजाचे सिद्धान्तच येथें उचलून घेतले कीं, त्यांत कांहीं फेरफार केला व केला असल्यास तो कोठें हें पहाणें बोधपर होईल.

### आदि ब्राह्मसमाजाचीं तत्त्वें.

१ प्रथम फक्त एक परब्रह्म परमेश्वर होता, दुसरें कांहीं नव्हतें. त्यानेंच सर्व सृष्टि उत्पन्न केली आहे.

२ तो ज्ञानस्वरूप, अनंतस्वरूप, मंगलस्वरूप, नित्य, नियंता, सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वाश्रय, निरवयव, निर्विकार, एकमेवाद्वितीय, सर्वशक्तिमान, स्वतंत्र आणि परिपूर्ण आहे. त्याच्याशीं कोणाचीही तुलना करतां येत नाहीं.

३ फक्त त्याचीच उपासना केल्याच्यायोगें इहपरलोकीं सुख प्राप्त होतें.

४ त्याच्यावर प्रीति करणें व त्याला प्रिय अशीं कार्यें करणें, हीच त्याची खरी उपासना.

### प्रार्थनासमाजाचा स्थापनाकालचा उद्देश व तत्त्वें.

१ देव एकच व निराकार आहे. त्याचें मानसिक भजनपूजन करणें योग्य व आपलें कर्तव्य आहे. मूर्तिपूजा हा असन्मार्ग असून देवास अपमानकारक आणि मनुष्यास नीचत्व आणणारा व दुराचरणाप्रत नेणारा आहे. तेव्हां हा असन्मार्ग सुटून सन्मार्गांत लोकांची प्रवृत्ति व्हावी व सर्व संसारांतील धर्मसंबंधीं कृत्यें या मतास अनुसरून व्हावीं हा या समाजाचा उद्देश आहे.

### मूलतत्त्वें.

देव एकच आहे. त्याशिवाय दुसरा देव नाहीं, असा मी दृढ भाव धरितों. सर्व उत्पन्न करणारा एकच देव आहे असें मी समजतों, आणि मूर्तिपूजेवर माझी श्रद्धा नाहीं.

## आदिब्राह्मसमाजानुसार ब्राह्म-धर्मग्रहण.

१ ब्राह्मधर्माच्या तत्त्वांवर विश्वास ठेवून मी ब्राम्हधर्माचा स्वीकार करितों.

२ सृष्टी-स्थिति-लयकर्ता, ऐहिक, पारमार्थिक, मंगलदाता, सर्वज्ञ, सर्व-व्यापी, मंगलस्वरूप, निरवयव, एकमात्र अद्वितीय, परब्रह्म जो परमेश्वर त्याच्या वर प्रीति ठेवून त्याला प्रिय कार्यें करून मी त्याची उपासना करीन.

३ कोणत्याही सृष्ट पदार्थाला पर-मेश्वर समजून मी त्याची उपासना कर-णार नाहीं.

४ आजारी नसतांना अगर दुसऱ्या कांहीं संकटांत पडलेला नसलों तर दररोज चित्त एकाग्र करून मी प्रीतिपूर्वक परमेश्वराचें चिंतन करीन.

५ सत्कर्में आचरावयास मी यत्न करीन.

६ दुष्कृतीपासून दूर राहण्याचा मी यत्न करीन.

७ मोहवश होऊन जर कधीं मज-कडून कांहीं वाईट कर्म घडल्यास त्या-साठीं मनापासून पश्चात्ताप पावून अशा कर्मांपासून दूर रहाण्याचा मी यत्न करीन.

८ ब्राह्मधर्माच्या उन्नतीसाठीं दर वर्षी ब्राह्मसमाजास देणगी देईन.

९ हे परमेश्वर, हा परमधर्म उत्तम रीतीनें पाळण्यास मला सामर्थ्य दे.

---

## सभासद ह्या नात्यानें प्रार्थनासा-जांत दाखल होतांना करावी लागणारी प्रतिज्ञा.

१ मी प्रत्यहीं परमेश्वराचें चिंतन करीत जाईन.

२ सत्कर्में आचरावयास व अस-त्कर्मांपासून दूर रहावयास मी यत्न करीन.

३ स्वभावदोषानें कांहीं वाईट कर्मे मजपासून घडल्यास त्याविषयीं पश्चा-त्ताप व्हावा, एतदर्थ मी परमेश्वरापाशीं प्रार्थना करीन.

४ हे परमेश्वर ! ह्या प्रतिज्ञा पाळ-ण्याचें सामर्थ्य मला दे.

---

आतां, ब्राह्मसमाजानें अंगिकारिलेलीं तत्त्वें व प्रतिज्ञा आणि प्रार्थना समाजाचा उद्देश, तत्त्वें, व प्रतिज्ञा हीं जे कोणी लक्ष्य लावून पहातील त्यांच्या असें लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं कीं, जरी ब्राह्मसमाजाचा नमुना प्रार्थनासमाजाच्या संस्थापकांनीं आपल्यापुढें ठेविला होता, ब्राह्मसमाजाच्या अनुभवाचा फायदा घेण्याची त्यांची तयारी होती, तरी मुंबईच्या मंडळींनीं आपलें स्वतःचें स्वत्व कायम ठेवून तत्त्वांची रचना केली. ब्राह्मसमाजाच्या तत्त्वांमध्यें प्रतिमापूजनासंबंधानें इतका आवेश दिसत नाहीं. खरें पहातां, बंगाल्यामध्यें प्रतिमापूजनाचें भीषण स्वरूप जितकें पहावयास सांपडे तितकें मुंबईंत नसावें. तथापि बंगालचा अनुभव लक्ष्यांत ठेवून पूर्वीपासूनच योग्य खबरदारी घेण्याच्या हेतूनें प्रतिमापूजनाविषयीं इतका कठोर भाव समाजानें स्वीकारला असावा. त्याचप्रमाणें नेटिव्ह ओपिनिअन पत्रांतील मूर्तिपूजेवरील लेख लोकांच्या मनाची काय स्थिति होते, किंवा लोकांत किती खळबळ होते हें पहाण्यासाठींच प्रसिद्ध करण्यांत आला असावा अशी आमची अटकळ आहे. दुसरें असें कीं, मुंबईच्या मंडळींनीं ब्राह्मसमाजाचें सर्वप्रकारें अनुकरण करण्याचें जरी योजिलें नव्हतें तरी ब्राह्मसमाजांतील घडामोडींकडे त्यांचें लक्ष्य असावें. त्या वेळीं महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर हे ब्राह्मसमाजाचे प्रधान आचार्य होते. ब्राह्मसमाजांत येऊं लागल्यानंतर त्यांना अनेक प्रकारचे अनुभव येत होते. पहिला अनुभव वेदीच्या मागें जाऊन वेदमंत्राचा होणारा घोष, दुसरा अनुभव राजा राममोहनरायांनीं आपल्या ट्रस्टडीडमध्यें अवताराच्या कल्पनेविरुद्ध जरी स्पष्ट विचार प्रदर्शित केले होते तरी त्यास अनुकूल विचार उपदेशकानें प्रकट करणें; हा असला विपरीत प्रकार योग्य नव्हे असें मनांत आल्यानंतर जे कोणी प्रतिमापूजनाचा त्याग करितील व तसा त्याग केल्याचें जाहीर करितील त्यांसच ब्राह्म समजलें पाहिजे असें त्यांनीं राममोहनांच्या ध्येयानुसार ठरविलें * व त्याप्रमाणें एके दिवशीं महर्षींसह एकवीस

---

* One day I was sitting in the printing office, thinking that there was no religious unity among the members of the Brahma Samaj. Some came really to worship, others came without any definite aim—whom should we regard as the true worshipper of Brahma? Upon these considerations, I decided that those *who would take a vow to renounce idolatry* and resolve to worship one true God, these alone would be regarded as Brahmas... on hearing this exhortation of mine and seeing my singleness of

जणांनीं प्रतिज्ञा घेतली व हें पाहून एका महिन्याच्या अवधींत आणखी पांचशें लोकांनीं तशाच प्रतिज्ञा घेतल्या. ही गोष्ट लक्ष्यांत घेऊन प्रतिमापूजनासंबंधानें कठोरपणा प्रथमपासूनच अंगिकारिला असला पाहिजे.

## धर्मतत्त्वांची पुनर्घटना.

पुढें अर्धशतकाहून अधिक काळ ज्यांनीं प्रार्थनासमाजाची एकनिष्ठेनें सेवा केली; आपले गंभीर उपदेश, विद्वत्ताप्रचुर कीर्तनें, आपलें आदर्शयुक्त आचरण, आपला भक्तिभाव व परमेश्वरावरील निष्ठा ह्यांच्या योगें ज्यांनीं प्रार्थनासमाजाच्या कीर्तींत भर घातली, ते गुरुवर्य डा. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, अगर आपल्या प्रेमळ प्रार्थना, नित्य नवीन विचारांची जागृति करून देणारे उपदेश, आपलें दूरदर्शित्व, थोर विद्वत्ता, विहगदृष्टि, मनाचा उदारपणा व धर्मतेज ह्यांच्या योगें जे अखिल भरतखंडास वंद्य झाले ते न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे प्रार्थनासमाजाच्या स्थापनेच्या वेळीं मुंबई शहरांत नव्हते. म्हणून स्थापनेच्या वेळच्या सभासदांत यांचीं नांवें नाहींत. डा. भांडारकरांनीं स्वतःच सांगितलें आहे कीं, " प्रार्थनासमाजाची स्थापना झाली, त्यावेळीं मी येथें नव्हतों. मी पुढें दीडवर्षानें येथें आलों. मी येथें नव्हतों म्हणजे केवळ शरीरानें नव्हतों. मी कामानिमित्त परगांवीं होतों. पण संस्था स्थापन झाली तिचे उद्देश मला मान्य होते व म्हणूनच पुढें दीड वर्षांनें येथें आल्याबरोबर मी समाजांत प्रविष्ट झालों, आणि समाजाशीं निकट संबंध जोडला " आणि हा निकट संबंध अखेरपर्यंत कायम राहिला हें सर्वांस विदित आहेच. भांडारकर व रानडे ह्या दोघांचीं मनें धर्मोन्मुख होतीं. त्यामुळें इतरांची धर्मभावना पाहून आपली व आपल्यासारख्या नवशिक्षित लोकांची धर्मभावना कशी आहे ह्याविषयीं त्यांच्या मनांत विचार नित्य घोळत असत. यांतच वामन आबाजी मोडक यांची गणना केली पाहिजे. *"मनुष्यास जागृत करून परमेश्वराप्रत न्यावें, आणि त्याच्या मनावर उत्तम धर्म-

---

purpose, Vidyavagish shed tears and said "such was the aim of Rammohan Rai, but he was not able to realize it. After all this time, now his desire has been realised."

*Maharshi Devendra Nath.*

* वामनराव मोडकांच्या धर्मपर आणि नीतिपर व्याख्यानास डॉ. भांडारकरांनीं प्रस्तावना लिहिली आहे. तींत ते म्हणतातः—

संस्कार करावे एतदर्थ वामनराव निरंतर ह्मटत असत " ( डा. भां. ) अशा विचारांचे हे तीन गृहस्थ ज्यावेळीं मुंबईत एकत्र झाले त्यावेळीं ते प्रार्थनासमाजांत दाखल झाले; प्रार्थना समाज त्यावेळीं अगदींच बाल्यावस्थेंत होता. " परमेश्वराच्या ठायीं अनन्य भाव आणि परमभक्ति, अंतःकरणाची शुद्धि व उदारता, प्राणिमात्राविषयीं प्रेम आणि दया, निरभिमान वृत्ति, सत्यनिष्ठा इ० गुणांच्या ठायीं जी गोडी आहे, जें समाधान आहे, जी अंतःकरण समुन्नति आहे तिचा अनुभव होऊन या दैवी संपत्तीपुढें प्रापंचिक संपत्ति अत्यंत तुच्छ आहे या गोष्टीचा प्रत्यय येऊन, या संपत्तीविषयीं आपलें अंतःकरण अत्यंत लुब्ध होईल, अशाविषयीं सतत यत्न चालविला पाहिजे. तदर्थ ध्यान, उपासना, भजन, आत्मपरीक्षण आत्मसंयमन इत्यादिकांचा नेहमीं अभ्यास केला पाहिजे" असें डा. भांडारकरांचें ध्येय होतें. परंतु मुंबईस आल्यावर सर्व मंडळीशीं निकट संबंध येतांच त्यांच्या जी गोष्ट लक्ष्यांत आली ती ही कीं, प्रार्थनासमाजाचीं तत्त्वें असावींत तितकीं उदार, स्पष्ट व व्यापक (comprehensive) नाहींत, व त्यांसंबंधानें अधिक खुलासा होण्याची जरूर आहे. धर्माच्या अनेक बाबींविषयीं पुष्कळ गोष्टी तत्त्वांत न घालतां भाषणांत व आचरणांत त्या आहेत असें धोरण असे. उदाहरणार्थ, धर्मग्रंथांचें अभ्रांतत्व किंवा ईश्वरप्रणीतत्व व अवतारवाद ह्यांविषयीं स्पष्ट खुलासा तत्त्वांत कोठेंच नाहीं. नाहीं म्हणावयास राजा राममोहन यांनीं तयार केलेल्या Trust Deed मध्यें ह्या दोन्ही गोष्टींचा स्पष्ट उल्लेख आहे. तथापि तेथें तो स्पष्ट उल्लेख असूनही वेदमंत्र बाजूस जाऊन म्हणणें व श्रीरामचंद्रास प्रत्यक्ष देवाचा अवतार बनविण्याचा प्रयत्न करणें ह्या गोष्टी ज्याप्रमाणें ब्राह्म समाजांत एके काळीं झाल्या, कांहींसा तसाच अनुभव आमच्या येथें येत होता. आमच्या समाजांतील प्रथम प्रथमचे उपदेश बंधन विरहित होत. जुलै १८६७ मध्यें समाजाच्या तत्त्वांचा अखेरचा खरडा, नांव, नियम, मुकरर झाले. त्या दिवशीं हिंदु रिफारमर

---

" सुमारें १८६३–६४ मध्यें एक दिवस प्रातःसमयीं मित्र रा. रा. वामनराव मोडक व मी फिरावयास गेलों होतों. येतांना तुळशी बागेंतून परत आलों. त्या ठिकाणीं स्नान करून सोंवळें नेसून कित्येक ब्राह्मण संध्या करीत आहेत; आमचाही भाव एकदां ह्या संध्येवर असाच होता तो आतां नष्ट झाला आणि धर्मसंबंधीं अन्यच कांहीं मतें आमचीं झालीं आहेत. त्या मतांवर ह्या प्रकारचा भाव व विश्वास असला पाहिजे असे विचार आमच्या मनांत आले. "

पत्राचे संपादक सभासद ह्या नात्यानें जरी नव्हे तरी सभास्थलीं हजर होते. नंतर समाजाचे हेतु, कार्य, उपाययोजना ह्याविषयीं लिहिलेल्या ता. १ आगस्ट १८६७ च्या अंकांतील लेखांत उपदेशांसंबंधानें त्यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, " ही मंडळी कोणत्या हेतूनें उपस्थित झाली, कोणता धर्म प्रतिपादन करणार, त्याचीं मूलतत्त्वें काय हें सर्व सभा स्थापन होण्यापूर्वीच समजलें पाहिजे होतें. आपल्या मनांत सहस्रावधि कल्पनांचे तरंग आले म्हणून तीं आपलीं मतें समजून जगप्रसिद्ध करणें किती अनुचित आहे! सांप्रत प्रति रविवारीं जे धर्मोपदेशक धर्मबोध करितात त्यांपैकीं कोणी श्रावणी करणें चांगलें म्हणतात, कोणी ख्रिस्ती धर्मानेंही पापमोचन होतें म्हणून त्याचीच प्रसंशा करितात, कोणी ब्राह्मधर्म उत्तम असें प्रतिपादितात. कोणी ज्ञानोबा, तुकाराम, रामदास हे केवळ मूर्तिपूजक असतांही त्यांचा धर्म सांगतात. इत्याद्यनेक मतांचा संग्रह होतो, येणेंकरून जे जे लोक सभेस येतात त्यांच्या विचारांचा मात्र घोटाळा होऊन जातो. " कांहीं अंशीं हा प्रकार अपरिहार्य होता. मतांस, विचारांस, ध्येयांस निश्चितावस्था प्राप्त होण्यापूर्वी व कार्यांची रूपरेषा ठरण्यापूर्वी होणारे उपदेश विसंगत असावयाचेच; पण ह्याला बंधन घालावयास हिंदु रिफारमर पत्रानें सुचविलेला उपाय कीं " निदान इतकें तरी केलें पाहिजे कीं, जें व्याख्यान द्यावयाचें तें पूर्व दिवशीं एका निवडक मंडळीनें वाचून पाहून तें आपल्या मतांनुसार आहे असें वाटलें म्हणजे तें सभेंत वाचण्याची मोकळीक द्यावी " हा कांहीं योग्य नव्हता व तो मंडळीनें अमलांत आणिला नाहींच. परंतु १८६८ मध्यें मुंबईत आल्यानंतर निरनिराळ्या उपदेशांचा माधवराव रानडे अनुभव घेत असतां, भांडारकर मुंबईत आल्यावर त्यांसही तो अनुभव येत असतां, आपल्या ध्येयाची विचिकित्सा ज्यांत केली आहे असा कांहीं तरी लेख असावा असें ह्यांस वाटूं लागलें व तें काम माधवरावांनीं आपल्या अंगावर घेऊन A Thiest's Confession of Faith हा विस्तृत लेख लिहिला व तो हिंदु रिफारमर व दुसऱ्या एका पत्रांत प्रथम प्रसिद्ध झाला. प्रो. रामकृष्णपंत भांडारकरांनीं ईश्वरविषयक ज्ञान ह्या विषयावर विस्तृत निबंध पुढें लिहिला. हा सर्व निबंध उपनिषदांतील व गीतेंतील वचनें ह्यांच्या आधारेंच लिहिलेला आहे, हें आतां सर्वांस माहित झालेंच आहे. माधवराव रानड्यांच्या लेखांत प्रार्थनासमाजाचीं तत्त्वें ज्यास मान्य आहेत त्याचे धर्म व तत्त्वज्ञान ह्यांत मोडणाऱ्या अनेक गोष्टींविषयीं कोणते विचार असावयास पाहिजेत त्यांचें ३९ कलमांत विवेचन

केलें आहे. प्रार्थनासमाजाच्या इतिहासांतील हा एक महत्त्वाचा भाग असल्यामुळें त्याचा सारांश येथें देणें अगत्याचें आहे.

---

## साधकाचा विश्वास.

### A Theist's Confession of Faith.

जगाच्या सर्व भागांत व विशेषतः आपल्या देशांत एकेश्वरी मताच्या अनेक धर्मसंस्था ज्या उत्पन्न होत आहेत त्यां सर्वांविरुद्ध वारंवार एक असा आक्षेप घेण्यांत येत असतो कीं, ज्याच्या योगानें मनुष्यमात्राच्या धर्मसंबंधीं गाढ आकांक्षांचें समाधान होईल व प्रचलित धर्माशीं विरोधात्मक भाव दर्शविल्यानें या संस्थांना शाश्वत यश मिळेल असा कांहीं भाग त्यांच्यांत नाहीं. त्यांचीं मूलभूत धर्मतत्त्वें अगदींच आटपसर व अनिश्चित असून, त्यांनीं केलेले ऐहिक व पारमार्थिक प्रश्नांचे निर्णय अनिश्चित आहेत. त्यांच्या उदयाचा व प्रगतीचा इतिहास पहातां कोणी विशेष स्वार्थत्याग केलेला, अगर कडक एकनिष्ठा दाखविलेली दिसत नाहीं, व जें पाहून जनसमूहाच्या धर्मबुद्धीचें समाधान व्हावें असें अधिकाराचें तेज त्यांच्या उपदेशांत, आश्वासनांत व प्रतिज्ञेंत दिसून येत नाहीं; अशा प्रकारें या साऱ्या संस्थांना दूषण देण्यांत येत असतें. प्रचलित पुरातन धर्मांचे अनुयायी मोठ्या आढयतेनें सांगत असतात कीं, एखाद्या प्रचंड जनसमुहानें शुद्ध एकेश्वरी धर्माचा स्वीकार केला आहे असें कांहीं सहसा होत नाहीं, व पुढेंही असें होण्याची आशा नाहीं. आतां, जर आपण अंतस्थ स्थिति काय आहे ती पाहिली नाहीं आणि केवळ वरवर पाहिलें, तसेंच ह्या नव्या निघालेल्या संस्थांचे जे कोणी अग्रणी म्हणून नांवाजलेले आहेत, त्यांचींच वचनें प्रमाण मानिलीं, तर प्रचलित धर्मांच्या छत्राखालीं ज्यांना सुरक्षितपणा वाटतो व जे स्वतः विचारही करावयास तयार नाहींत, त्यांच्या शंका व आक्षेप यांस जागा आहे असें आपल्याला दिसून येईल. कारण, ब्राह्मसमाजाचे कांहीं उत्साहपूर्ण अग्रणी जाणूनबजून अशीं विधानें करीत असतात कीं, एकेश्वरी धर्म सर्व मनुष्यजातीस संमत होण्याला ईश्वराचें पितृत्व व मनुष्याचें भ्रातृत्व हीं दोनच धर्मतत्त्वें आवश्यक आहेत. आपला उद्धार व्हावा व आपणांस मोक्ष मिळावा यासाठीं जीं तत्त्वें हृदयांत दृढपणें वागविणें अत्यावश्यक आहे तीं हींच दोन तत्त्वें होत! समाजाची पन्नास वर्षांची चालू हकीकत ठाऊक असूनही आमच्या अग्रणींचें समाधान बालवयाच्या गोष्टी बोलण्यांत होत आहे असें दिसतें. ज्या

धार्मिक शंकांमुळें लोकांची श्रद्धा नेहमीं डळमळूं लागते व अंतीं ईश्वरप्रणित मानलेल्या धर्मापुढें मान वांकवावी लागते. अशा शंकांचें पूर्ण आस्थेनें आकलन करण्याविषयीं व त्यांविषयीं जनतेची कांहीं समजूत घालण्यासंबंधानें ते कांहींच प्रयत्न करीत नाहींत. त्यांच्या दृष्टीनें धर्माचा संबंध केवळ मनोवृत्तीशींच आहे; अडचण जी काय असते ती बुद्धिविषयक नसून श्रद्धा चिरस्थायी होत नाहीं येवढीच आहे. वर जें कांहीं आम्हीं लिहिलें आहे त्याचा उद्देश आपल्या देशांत जें धर्मसंस्थापनेचें काम चाललें आहे त्याचें महत्व कमी लेखावें हा नाहीं; परंतु सर्व काळांतील श्रेष्ठ पुरुषांनीं अगणित शतकें आस्थेनें मनन करून ज्या अनेक धर्मतत्त्वांचा विकास केला त्या तत्त्वसमूहाविषयींचें आमच्या ब्राम्हसमाजाच्या कांहीं पुरस्कर्त्यांचें ज्ञान किती कोतें व अनिश्चित आहे ही गोष्ट ध्यानांत घेतली म्हणजे प्रचलित धर्माच्या अनुयायांनीं येथें किंवा अन्यत्र निघालेल्या एकेश्वरी धर्मसंस्थांचे जे दोष दाखविले आहेत ते अगदींच अन्यथा नाहींत असेंच आपणांस वाटणार आहे. आपल्या स्वतःच्या स्थितीसंबंधानें जरी पाहिलें तरी प्रार्थनासमाजाचेंही पूर्ण समाधान दोन धर्ममतांच्याच संग्रहानें होत आहे. त्यांपैकीं एका मतांत ईश्वर एकच आहे अशी श्रद्धा प्रगट केली आहे व दुसऱ्यांत चालू हिंदु धर्माच्या दोषांचा निषेध केला आहे, म्हणजे मूर्तिपूजा करणें अशुद्ध आहे, तें पाप आहे अशा शब्दांनीं मूर्तिपूजेचा अधिक्षेप केला आहे; व येवढयाशा आकुंचित धर्ममतांच्या पायावर कालेंकरून नवी धर्मसंस्थापना करितां येईल अशी मोठी उमेद बाळगण्यांत येत आहे. युरोप व अमेरिका या देशांतील संस्थांकडे जरी लक्ष दिलें तरी धर्मविचाराच्या प्रांताचें निरीक्षण करण्याकरितां जेव्हां एखादा आस्थेवाईक शोधक निघतो तेव्हां त्याच्या मार्गांत काय काय अडचणी दत्त म्हणून उभ्या असतात त्याविषयींची उदासीनता तिकडेही कमीअधिक प्रमाणानें आढळून येते. युनिटेरियन पंथ मात्र कांहीं अंशानें ह्या सिद्धान्ताला अपवाद आहे. या उदासीनतेचें कारण एवढेंच कीं, प्रचलित धर्मांत जो कांहीं दुराग्रहाचा भाग असतो व विधिनिषेधाचीं जी वितानें माजलेलीं असतात त्यांची चीड येऊन, त्यांचा विध्वंस करावा ही जी बुद्धि उत्पन्न होते ती बुद्धि या साऱ्या संस्थांच्या मुळाशीं आहे; या संस्था अजून प्रतिक्रियेच्या अवस्थेंतून बाहेर पडलेल्या नाहींत व त्यामुळें प्रचलित धर्मापासून भिन्न होत असतां जें एकदेशीय स्वरूप त्यांना अनिवार्यपणें प्राप्त झालें तें अजून तसेंच राहिलेलें आहे. बुद्धिव्यतिरिक्त हृदयाचें किंवा आपल्या

मनोवृत्तीचें समाधान होत असलें, म्हणजे धर्मांच्या बाबतींत आपली इतिकर्तव्यता झाली असें जें ह्या साऱ्या चांगल्या भाविक मंडळींना वाटत आहे त्याचें स्पष्टीकरण आम्हीं जें आतां वर प्रतिपादन केलें त्यानेंच होऊ शकतें. तरी ज्या धर्मांना ही मंडळी दोषरूप मानतात त्यांमधूनच ते आपल्या बुद्धीच्या समाधानासाठीं अजाणतां कांहीं धर्ममतें उसनीं घेत असतात; परंतु हें मतग्रहण विचारपूर्वक होत नसतें.

म्हणून नवीन धर्मसंस्थांत जे दोष दाखविले जात असतात त्यांचें निराकरण करण्याविषयीं आस्थेनें प्रयत्न करण्याचा काळ आतां आला आहे असें आम्हांस वाटतें. शुद्ध एकेश्वरी धर्माचा मोठ्या जनसमुहानें अद्याप स्वीकार केला नाहीं, हें जरी खरें असलें, तरी पुढें तशी गोष्ट होणेंच नाहीं असें कांहीं तेवढयावरून सिद्ध होत नाहीं. मूर्तिपूजेचीं तंत्रें, दृश्य वस्तूंच्या द्वारें आराधना, धर्मच्छलाची कर्तव्यता, इत्यादि अनेक ग्रह साऱ्या प्राचीन धर्मांचीं प्रमुख अंगें होतीं; परंतु अर्वाचीन काळांतील उन्नत धर्मांतून त्या ग्रहांना काढून टाकितांना बहुकाल परंपरा आड आलेली नाहीं व म्हणून धर्मवृत्तींत व विचारांत कांहींच प्रगति नाहीं असें सार्वत्रिक रीतीनें म्हणणें यथार्थ नव्हे; व हाच प्रगतीचा क्रम पुढेंही अबाधित चालेल असें मानण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं, इतकेंच नव्हे तर देवाच्या राज्याचे दिवस समीप आले आहेत, असें दर्शविणारीं चिन्हें आतां स्पष्ट दिसूं लागलीं आहेत.

सध्यां जे भिन्न भिन्न धर्मपंथ आहेत ते मोडून, त्यांच्या जागीं एका सार्वत्रिक धर्माची स्थापना होईल असा विश्वास आमच्या हृदयांत वागत आहे. विश्वास ज्यायोगें डळमळेल असें निश्चयात्मक प्रमाण इतिहासांत नाहीं असें आम्हीं वर दर्शविलेंच आहे. वास्तविक पहातां जगाच्या सर्व भागांत आज ज्या एकेश्वर मताच्या धर्मसंस्था उदय पावत आहेत त्या भविष्य काळीं प्रचलित होणाऱ्या सार्वत्रिक धर्माचीं पूर्व चिन्हेंच होत. शिवाय जरी आपण जगाच्या इतिहासाकडे पाहिलें तरी प्रचारांत असलेल्या धर्मव्यवस्थेनें विशेष विवेकसंपन्न लोकांच्या चित्ताचें समाधान होत होतें असा काळ कधींच आढळत नाहीं. प्रचलित धर्मानें जें साध्य आहे त्याहून शुद्धतर प्रेरणा आपणांस व्हावी व अधिक पवित्र ज्ञान मिळावें ह्याविषयींचा हव्यास अनेकांचे ठायीं असेच. ह्या गोष्टीकडे आपण काय म्हणून दुर्लक्ष करावें? व ह्या गोष्टीचें स्वरूप आपण जर नीट ध्यानांत घेतलें तर

प्रचलित धर्मांच्या पुरस्कर्त्यांचा अभिमान यथार्थ नाहीं अशी आपली तेव्हांच खात्री होणार आहे. रूढ धर्मांनींच मनुष्यांच्या धार्मिक आकांक्षांचें समाधान होतें व आत्म्याची जिज्ञासा तृप्त होण्याजोगीं उत्तरें त्या धर्मांतच मिळतात–असें म्हणण्यास वस्तुस्थितींत कांहीं एक आधार नाहीं. बाहेरून पहाणाऱ्यांना प्रचलित धर्म जरी खंबीर दिसले, तरी आंतून ते तसे नसतात व ह्या नवीन निघालेल्या धर्मसंस्था त्यांपुढें फिक्या दिसतात असें जरी प्रथमदर्शनीं वाटलें तरी जर आपण तुलना करून पाहिली, तर नवीन संस्थांकडेच श्रेष्ठत्व येतें.

शिवाय सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण केलें तर आपणास असेंही आढळेल कीं, धर्मग्रंथांत प्रमाणभूत होऊन राहिलेल्या कांहीं सिद्धांतांनीं वास्तविक शंकानिवृत्ति होते असें कांहीं नाहीं. कारण, कांहीं गोष्टी आपल्या मर्यादित मानसिक सामर्थ्यास आकलनीयच नाहींत; व जेथें बुद्धीची गति कुंठित होते तेथें ती दरी केवळ श्रद्धेच्या पंखांचा आश्रय धरून उडून जातां येईल असें होणें नाहीं. तसें समजणें म्हणजे श्रद्धेची विटंबना करणें होय. कारण, श्रद्धा म्हणजे अज्ञ भोळेपणा नव्हे. श्रद्धेला कांहीं विशिष्ट अधिकार आहे हें खरें, व त्या अधिकाराचें श्रेष्ठत्व कमी मानण्याची आमची इच्छाही नाहीं. परंतु जें मुळींच अज्ञेय आहे, तें समजण्यास सोपें व्हावें, याविषयींच्या निरर्थक प्रयत्नांत श्रद्धेचा धांवा करणें अन्यथा आहे.

या निबंधांत धर्मविषयक सिद्धांतांचें स्वतंत्र रीतीनें पर्यालोचन करण्याचें आम्हीं योजिलें आहे. ह्यायोगें धर्ममीमांसेंत कांहीं अपूर्व भर घालतां येईल असें कांहीं म्हणतां येत नाहीं; तथापि आपणांपैकीं पुष्कळांच्या ज्ञानदृष्टीपुढें जे विचार अस्पष्ट रूपानें येत जात असतात त्यांस निश्चित भावनांचें स्वरूप देऊन त्यांचा संग्रह करावा; धर्मतत्त्वांच्या संशोधनाचे कामीं जें सत्याचें प्रमाण आवश्यक मानतात किंवा जें साध्य आहे तें प्रमाण कोणतें याविषयीं निश्चय करावा; एका नाहीं तर दुसऱ्या प्रचलित धर्मानें ज्या तत्त्वांचा ऊहापोह केला आहे व दिसण्यांत तरी शेवटचे असे निर्णय देऊन टाकिले आहेत त्या साऱ्या प्रश्नांचें परीक्षण करावें; ज्या तत्त्वांविषयीं निश्चित ज्ञान मिळविणें शक्य आहे व म्हणून ज्यांविषयीं सर्वांचें मतैक्य होण्याचा संभव आहे तीं तत्त्वें वेगळीं काढावीं; व ज्या बाकी राहिलेल्या तत्त्वांचें ज्ञान करून घेण्याचे प्रयत्नांत मन गोंधळून जातें व परस्पर विरुद्ध कल्पना प्राप्त होऊन मन हताश होतें तीं तत्त्वें पृथक् करावीं; व त्या तत्त्वांच्या ज्ञानांत प्रगति होणें मनुष्याच्या आटोक्याच्या बाहेर आहे व श्रद्धेच्या जोरावर किंवा ईश्वरप्रणीत समजलेल्या धर्मांच्या आधारानें त्या गूढांचा उलगडा होईल-

असें मानणें म्हणजे निवळ स्वतःला फसवून घेणें आहे असें सिद्ध करावें—हा आमचा उद्देश आहे.

हें विवेचन आम्ही ऐतिहासिक पद्धतीनें करणार आहों. कारण, म्हणण्यासारखी कांहीं फलसिद्धि होणें असेल तर ती केवळ याच पद्धतीनें. आपल्या विचाराच्या कलाप्रमाणें बनलेलीं कांहीं मूलतत्त्वें गृहीत धरून जर आपण निघालों तर अर्थनिष्पत्ति न होतां व्यर्थ आपण घोटाळ्यांत मात्र पडूं. विवेचनास आरंभ झाला म्हणजे आमच्या या वचनाचा प्रत्यय वाचकांस येईल.

बुद्धीचें व हृदयाचें समाधान करून मनुष्यमात्राची निष्ठा संपादन करावी असें जर धर्ममीमांसेचें उद्दिष्ट ध्येय असेल, तर त्या धर्ममीमांसेंत ज्या विषयांचें निरीक्षण व यथार्थ स्वरूपकथन आवश्यक आहे त्या साऱ्या विषयांचा विस्तृतपणें उल्लेख करून या विवेचनास आम्ही सुरुवात करणार आहों. धर्ममीमांसेचा तज्जातीय सृष्टिशास्त्राशीं व मानसशास्त्राशीं सर्व बाजूंनीं संबंध येतो. त्या शास्त्रांच्या मर्यादा निर्विवाद रीतीनें ठरलेल्या नाहींत. तरी प्रत्येक शास्त्राचे जे सिद्धांत म्हणून ठरविण्यांत आले आहेत ते आपण खरे मानून चालूं व त्यांचा आपल्या धर्ममीमांसेच्या निर्णयांशीं जितका मेळ घालणें शक्य असेल तितका घालण्याचा प्रयत्न करूं.

एकंदर विषय मनांत आणितां, धर्ममीमांसेचा प्रान्त तरी काय आहे, जगांतील एका नाहीं तर दुसऱ्या रूढ धर्मपंथांत अध्यात्म विद्येंत जे प्रश्न उपस्थित झालेले असतात, ज्यांचें कसें तरी विवेचन केलेलें असतें, व ज्यांविषयीं कधीं बुद्धिवादानें, तर कधीं अधिकारबलानें, निकाल लाविलेला असतो त्या प्रश्नांचें स्वरूप व लक्षण काय आहे, ह्याविषयीं निरूपण करण्याचे पूर्वी दोन प्राथमिक गोष्टी ठरविल्या तर बरें होणार आहे. पहिली गोष्ट ही कीं, धर्मविषयक शंकांचें निरसन होऊन आपल्या हृदयांत जो प्रत्यय किंवा विश्वास उत्पन्न व्हावयाचा त्याचें प्रमाण व स्वरूप काय आहे; व दुसरी गोष्ट ही कीं, विचार व आचार हीं जीं आपल्या स्वभावाचीं दोन अंगें त्या दोहोंशीं धर्माचा सारखाच संबंध आहे व धर्ममीमांसेचें स्थान तत्त्वज्ञान व नीतिशास्त्र यांच्या मधोमध आहे, हें आपण ध्यानांत धरिलें पाहिजे.

गणित शास्त्रांत कांहीं मूलतत्त्वें प्रमाण मानून त्यांवरून सिद्धांत काढलेले असतात; व त्या सिद्धान्तांच्या सत्यतेविषयीं आपली पूर्ण खात्री असते. तसलें

'एकान्तिक सत्यत्व धर्मविषयांत साध्य नाहीं' अशी सर्व ईश्वरप्रणीत धर्मांची साक्ष आहे. धर्मतत्त्वें जेव्हां आपण मान्य करितों, तेव्हां आपले चित्तांत संशयाला स्थान नसतें व आपण जी संमति देतों तिला दृढ प्रत्ययाचा आधार असतो हें खरें. तरी तो प्रत्यय असेल किंवा त्यांत असद् ग्रह होण्याचा संभव नसेल, असें सांगतां येत नाहीं. ही अडचण दूर करावी, व आपल्या विश्वासाला अधिकाराचें किंवा शाब्दप्रमाणाचें पाठबळ असावें म्हणूनच ईश्वरप्रणीतत्त्वाची आवश्यकता मानण्यांत येत असते. एवंच, धर्मविषयांत सत्य साध्य आहे, परंतु तें उपाधियुक्त आहे या मताविषयीं सर्व रूढ धर्मांची एकवाक्यता आहे. ही वस्तुस्थिति आपण आपल्यापासून लपवून ठेविण्याचा प्रयत्न करण्यांत अर्थ नाहीं. असो. सर्व धर्मांची साक्ष जी एक पडते, तें एक अप्रत्यक्ष प्रमाण झालें. तें जरी सोडून दिलें तरी दुसरींही कांहीं सबळ कारणें आहेतच कीं ज्यांवरून वर सांगितलेले सिद्धान्त काढणें अनिवार्य होतें. कारण, दिशांनीं व कालांनीं अनवच्छिन्न व अतींद्रिय अशा ज्या वस्तु त्याच मुळीं धर्मांचे विषय असतात; धर्ममीमांसेंत कालाचें अनन्तत्व, सृष्टीचा उद्भव, आत्मा व परमात्मा यांचे गुण व स्वरूप, ईश्वरी तंत्राचे नियम इत्यादि गोष्टींविषयीं विवेचन असावयाचें; व म्हणून धर्मतत्त्वांसंबंधानें एकान्तिक ज्ञान दुर्लभ होय. सामाजिक शास्त्रांत व मानस शास्त्रांत तीच अडचण अनुभवास येते. त्या शास्त्रांत ज्या वस्तूंच्या व स्थितींच्या अवलोकनावर सिद्धांत रचिलेले असतात, त्या आधारभूत गोष्टींचें स्वरूप बहुविध व संकीर्ण असतें; व म्हणून त्या सिद्धान्तांनांही पूर्ण सत्यत्व प्राप्त होत नाहीं. व शिवाय धर्माचा विषय अतींद्रिय असल्यामुळें धर्मतत्त्वांचें यथार्थ आकलन अधिकच कठीण झालें आहे. म्हणजे एका दृष्टीनें जरी, धर्मतत्त्वांच्या ज्ञानाचें स्वरूप इतर अनुभवसिद्ध गोष्टींप्रमाणें साधें व सरळ आहे तरी त्या ज्ञानाविषयीं आपणास निःसंदेह व निशंक खात्री बाळगतां येत नाहीं; असें आम्ही जरी प्रांजलपणें कबूल करितों तरी त्याच वेळीं आम्हांस असें निक्षून सांगितलें पाहिजे कीं, जीं कांहीं धर्मतत्त्वें **शुद्धधर्माचें** जीवितसर्वस्व आहेत, त्यांचे ठायीं फार श्रेष्ठ प्रमाणानें सत्य वसत आहे. समाजशास्त्र, राज्यतंत्रशास्त्र, किंवा नीति, या सर्वांत सत्याचें तितकें प्रमाण लाभत नाहीं, व आपणास व्यवहारांत बहुतेक प्रसंगीं ज्या ज्ञानावर एखादी गोष्ट खरी असें मानून वागावें लागतें व वागणें रास्तही असतें, त्याहून धर्मतत्त्वांच्या सत्यतेविषयीं आपला विश्वास फारच श्रेष्ठ प्रकारचा आहे. ह्या आमच्या मताच्या

समर्थनार्थ प्रचलित धर्मपंथांचाही आधार देतां येतो. कारण, जीं थोर व सार्वत्रिक धर्मविषयक सत्यें आहेत त्यांच्या बाजूला, ईश्वरप्रणीतत्वाव्यतिरिक्त अन्य भला भक्कम पुरावा आहे असें सर्व धर्मांना मान्य आहे. त्या सर्वांचें जें म्हणणें असतें तें हेंच कीं ईश्वरानें प्रणीत केलेलीं तीं सत्यें आहेत ह्या समजुतीनें त्यांस अधिक बळकटी येते येवढेंच. म्हणजे जीं सत्यें आपण आधींच जाणलेलीं असतात व आपल्या बुद्धीस संमत झालेलीं असतात, तीं सत्यें अधिक दृढपणें व स्थिरपणें हृदयांत वागूं लागतात, हाच ईश्वरप्रणीतत्वाचा गुण असें म्हणणें असतें. परंतु कोणताच ईश्वरप्रणीत धर्म अनादिसिद्ध आहे असें नाहीं. प्रत्येकाची वाढ व विकास इतिहासांत प्रसिद्ध आहे, व अमक्या काळीं व स्थळीं, अमक्या लोकांत किंवा जातींत ईश्वरानें तो धर्म प्रगट केला अशी त्या त्या धर्मांच्या अभिमान्यांची समजूत असते; व दुसऱ्या धर्मपंथांच्या लोकांशीं वादविवादांत आपला आग्रह सोडून इतर धर्मांचेंही ईश्वरप्रणीतत्व त्यांस मान्य करावें लागतें; म्हणजे धर्माचें श्रेष्ठत्व ईश्वरप्रणीतत्व या गुणांत नाहीं, तर तें आंतील स्वारस्यांत आहे असेंच पर्यायानें कबूल करणें प्रत्येक धर्माभिमान्यास भाग पडतें.

धर्मविषयांत जें सत्य साध्य आहे तें कोणत्या प्रकारचें आहे ह्या मुद्यावर पुढील विवेचनांत अधिक प्रकाश पडणार आहे. तरी आतांपर्यंत जें सांगण्यांत आलें आहे त्यावरून आमची विचाराची दिशा काय आहे व आमच्या विवेचनाचें आधारभूत तत्त्व कोणतें आहे हें वाचकांस कळून चुकणार आहे; व शिवाय उपहासशील नास्तिकाचें जें म्हणणें असतें कीं माझ्या मार्गांतील यच्चावत शंकांचें जर निराकरण होईल तरच मी ईश्वरावर श्रद्धा ठेवीन हें म्हणणें किती असंमजस आहे ह्याचीही सर्वांस कल्पना होणार आहे.

आतां राहिलेला जो दुसरा मुद्दा त्यासंबंधानें आम्हास फारसें सांगावयाचें नाहीं. धर्ममीमांसेचें स्वरूप द्विविध आहे. तत्त्वज्ञान व नीति हीं तिचीं अंगें आहेत. तींत धर्मतत्त्वांचा व तसाच सदाचारनियमांचा संग्रह होतो. ह्याविषयीं उल्लेख करण्याचें कारण हेंच कीं, एक जो नेहमीं घोंटाळा होतो तो टाळावा हें होय. कारण कोणी निवळ तत्त्वें शोधण्याच्या इच्छेनें निघतात, व असा भ्रम करून घेतात कीं, धर्माचें मुख्य अंग, नीट विचार करण्याजोगा भाग, म्हणजे आत्म-अनात्म चर्चा हाच होय. कोणी अगदींच उलट दिशेला जातात, व हरघटकेला आपल्या कर्तव्यासंबंधानें धर्मांत नियम सांपडतील असा उद्देश धरितात, धर्म व नीति ह्यांतील भेद नाकबूल करूं लागतात किंवा विधिनिषेधाचीं वचनें

हेंच धर्मांचें मुख्य सार असें मानूं लागतात. परंतु सर्व प्रचलित धर्मांचे ठायीं जीं धर्मतत्त्वें अन्तर्लीन असतात त्या मतांची जी यादी आम्हीं आतां देणार आहोंत तिचें जो विमल मनानें अवलोकन करील त्याची खात्री होईल कीं, सर्व प्रचलित धर्मांनीं आम्हीं वर सांगितलेलें धर्मांचें द्विविध स्वरूप ओळखिलें आहे, व त्यावरून असें उघड दिसतें कीं, सर्व मनुष्यमात्राच्या स्वभावाची रचनाच अशी आहे कीं ज्ञान मिळवावें व कर्मेंही आचरावीं ह्याविषयीं साहजिक स्फूर्ति होत असावी.

प्रस्तावनेदाखल हे चार शब्द झाले. आतां आपल्या विषयास आरंभ करूं.

( १ ) आपल्या मानवी स्वभावांत धार्मिक किंवा आध्यात्मिक अंश आहे; जीवात्म्याला धर्मवासना व धर्मइंद्रियें आहेत, त्यामुळें मुक्त आत्म्यांच्या लोकांशीं (world of spirits) त्याचा संबंध आहे व ईश्वराच्या मार्गाकडे त्याची प्रवृत्ति होते, अशी साधकाची श्रद्धा असते. ह्या धर्मवृत्तीचें अस्तित्व कसें सिद्ध होतें ? तर सर्व देशांत व काळांत व मनुष्यांच्या सर्व जातींत ईश्वराच्या आराधनेचा प्रघात चालू आहे, त्यावरून; मनुष्य दीन, पराधीन प्राणी आहे, त्याच्याहून अन्य व त्याचें नियमन करणाऱ्या अशा गूढ व पूज्य सामर्थ्यावर तो अवलंबून आहे अशी स्वाभाविक जाणीव आपल्या हृदयांत असते, तीवरून धर्मवृत्तींच्या अस्तित्वाची साक्ष आपणांस पटते.

( २ ) गृहीत गोष्टीवरून काढलेले गणितशास्त्राचे सिद्धांत सर्वथैव खरे आहेत असा प्रत्यय आपणांस असतो. परंतु आपण निश्चित केलेलीं धर्मतत्त्वें त्याच प्रमाणानें खरीं आहेत असा प्रत्यय आपणांस साध्य नाहीं. तरी आपल्या विज्ञानाच्या अन्तर्गत ज्या गोष्टी असतात, म्हणजे आपलें मन ज्ञानाचा विषय करून ज्या गोष्टी आपल्या अनुभवास येतात, त्यांच्या सत्यत्वाविषयीं जी खात्री आपणांस वाटते तितकी खात्री धर्मतत्त्वांसंबंधानें करून घेणें शक्य आहे, म्हणजे एकंदरीनें धर्मांतलीं जीं थोर व प्रमुख सत्यें त्यांचें प्रामाण्य फारच श्रेष्ठ प्रतीचें आहे. अर्थात् समाजशास्त्राचे सिद्धान्तांविषयीं जी खात्री आपणास साध्य आहे, किंवा व्यवहारांत अत्यंत महत्त्वाचे प्रसंगीं मनुष्यास वागण्याला वस्तुस्थितीसंबंधानें जी खात्री पुरेशी वाटते त्याहून धर्मतत्त्वांच्या सत्यतेविषयीं आपली खात्री अधिक श्रेष्ठ प्रतीची आहे. परंतु समाजशास्त्रास किंवा राज्यतंत्रशास्त्रास ज्या गोष्टी आधारभूत असतात त्यांच्यासारखेंच धर्मप्रश्नांचेंही स्वरूप संमिश्र व बहुविध आहे व शिवाय अतींद्रिय किंवा अदृश्य ज्या वस्तु त्या धर्म-

प्रश्नांचे विषय आहेत म्हणून धर्मतत्त्वांसंबंधानें आपल्याला व्यवहाराला पुरेशी मनाची खात्री असली म्हणजे झालें. आपल्या मर्यादित मानसिक सामर्थ्यास त्याहून जास्ती कळणें शक्य नाहीं.

( ३ ) शिवाय धर्माचे कांहीं प्रश्न जे आहेत ते दिशा व काल इत्यादि संबंध-विहीन वस्तूंविषयीं आहेत व म्हणून त्यांचा निर्णय होणें शक्य नाहीं. ह्या प्रश्नांचें विशेष लक्षण असें आहे कीं त्या संबंधानें विधिवाचक किंवा निषेधवाचक कोणतें मत सर्वथैव खरें असेल अशी आपल्या मर्यादित मनास तर्कशास्त्रदृष्टया कल्पनाच करितां येत नाहीं; तरी या दोन परस्परांशीं अत्यंत विरुद्ध मतांपैकीं एकाचें ग्रहण केल्याविना आपल्या मनास राहवत नाहीं. सृष्टीची उत्पत्ति, मनुष्याचा संभव, ईश्वर व सृष्टि यांचा संबंध, चैतन्य अथवा मन आणि जडद्रव्यसमुच्चय यांचें नातें इत्यादि जे प्रश्न ते या प्रकारचे होत.

हे प्रश्न निश्चयत्वानें सोडविण्यास आपण असमर्थ आहोंत असें साधक सरळपणें कबूल करितो. कारण, ते आपल्या मर्यादित बुद्धीच्या आटोक्याच्या बाहेरचे आहेत. परंतु ह्यांपैकीं कांहीं प्रश्नांसंबंधानें त्यांच्या मनांत दृढ विश्वास असतो व तेवढाच संसाराला व परमार्थाला पुरेसा आहे.

( ४ ) आतां, आणखी कांहीं असे प्रश्न आहेत कीं त्यांचा एकंदर व्याप व परिस्थिति आपल्या सध्याच्या मर्यादित ज्ञानदृष्टीस दिसत नाहीं हें खरें. तरी त्याविषयीं कांहींच समाधानकारक निर्णय करितां येऊं नये अशी दीन अवस्था मनास नसते; सहजज्ञानानें किंवा कमजास्त पुरावा पाहून विवेकानें, आपलें मन दोहोंपैकीं एक निर्णय करीत असतें; परंतु त्या मतासंबंधानें आपली खात्री निःशंक नसते. शंका आपणास व्याकुळ करीत असतातच व त्यांचें पूर्ण निवारण करितां येत नाहीं. शंकेनें पर्याकुळ असणें ही स्थिति ज्ञान व श्रद्धा ह्याबरोबर नियमानें असावयाचीच असें साधक मानतो व आपलें समाधान करून घेतो. आधिभौतिक व आध्यात्मिक जें अनिष्ट व पाप आहे त्याचें मूळ, मनुष्याचें अपूर्ण इच्छास्वातंत्र्य, शरीर सोडल्यावर आत्म्याची निश्चित अवस्था काय होत असावी, देहाशीं संयोग होण्याचे आधीं आत्म्यास अस्तित्व कसें होतें इत्यादि जे प्रश्न ते ज्यांचे निकाल संशयग्रस्त आहेत अशा प्रश्नांपैकींच आहेत.

( ५ ) मनुष्यजातीच्या धार्मिक अनुभवाचीं दोन अंगें आहेत. बुद्धि किंवा विचार हें एक अंग व त्याची तत्त्वज्ञानाशीं सांगड आहे. तत्त्वज्ञानाबरोबरच

धार्मिक विचारांची वाढ होत असते. विनय किंवा सदाचार हें दुसरें अंग असून त्याचा आपल्या मनोवृत्तीशीं संबंध असतो. आतां, जरी आत्मज्ञानाचे व नीतिशास्त्राचे नाना पंथ असले तरी धर्म व नीति हीं तत्त्वतः एकेकच आहेत. ईश्वराचे ठायीं भक्ति व मनुष्यमात्रावर प्रेम हीं जरी व्यवहारदृष्ट्या अभिन्न वाटतात तरी त्यांचा उगम आपल्या स्वभावांतील, संलग्न असून पृथक् असणाऱ्या अशा, दोन निराळ्या वृत्तींपासून आहे. परंतु धार्मिक वृत्ति ही आपल्या अंतःकरणांत अधिक दृढ व खोल रुजलेली असल्यामुळें, नीतीची किंवा सदाचाराची श्रेष्ठ व उदात्त कल्पना बनविण्यांत तिचेंच प्राधान्य असतें व त्याच धर्मवृत्तीपासून सदाचाराचे नियम पाळण्याचें सामर्थ्य मिळत असतें.

( ६ ) मनुष्याचें व सृष्टीचें नियमन करणारी अशी आपल्या बाहेर विश्वांत जी शक्ति आहे तिजविषयीं मनुष्याच्या धार्मिक ज्ञानशक्तीनें जी कल्पना बनविली आहे ती कल्पना हळुहळु विकास पावून झालेली आहे, असें साधकास वाटतें. ईश्वर एक आहे ही शुद्ध धर्माची अंतस्थ व प्रमुख कल्पना आहे. पण तिचें आकलन एकदम झालेलें नाहीं. मनाचा विचाररूपी व्यापार श्रेष्ठ प्रकारानें होण्यास जीं साधनें अनुकूल व आवश्यक आहेत तीं जशीं जशीं पूर्णावस्थेप्रत पावलीं तसें तसें त्या कल्पनेचें आकलन होत गेलें आहे.

( ७ ) पूज्यबुद्धि, भाव, व भक्ति यांचा एकमेव अद्वितीय विषय ईश्वर हाच आहे अशी मनुष्याचे ठायीं बुद्धि उत्पन्न करावी, आपलें सहजज्ञान, बुद्धि, सदसद्विवेक, व धार्मिक मनोवृत्ति ह्यांनीं ईश्वराच्या ज्या आज्ञा आपणांस प्रगट केल्या आहेत त्या इच्छापुरस्सर व मनोभावानें पाळण्याविषयीं प्रेरणा करून द्यावी, इहलोकींच आपल्या स्वभावांत ईश्वराचा चांगुलपणा कांहीं अंशानें तरी आणावा, ईश्वराशीं आपलें नातें काय आहे तें ओळखावें व परलोकाकरितां आपल्या आत्म्याची योग्य तयारी करावी, ह्याविषयींचा बोध करणें हा धर्माचा उद्देश व हेंच धर्माचें काम आहे असें साधकास वाटतें.

( ८ ) आपण दीन, पराधीन आहोंत असें आपणांस वाटत असतें. त्यांतला गूढ अर्थच हा कीं एक सर्वशक्तिमान ईश्वर आहे व त्यास अनुलक्षूनच आपण आपणांस दीन व पराधीन आहों असें वाटत असतें. म्हणजे ईश्वराविषयींची कल्पना आपणांस बुद्धीच्या व सहजज्ञानाच्या द्वारें झालेली असते व म्हणून ती स्वाभाविकच आहे. हा आपला स्वाभाविक प्रत्यय अनेक कारणांनीं म्हणजे

आपण कारणपद्धतीनें किंवा कार्यपद्धतीनें विचार केला, इतिहासाची काय साक्ष आहे ती पाहिली, सृष्टीचें अवलोकन केलें, प्रबुद्ध किंवा प्रकाशित झालेल्या विज्ञानाचे जे अनुभव असतात ते ध्यानांत आणिले म्हणजे आपला ईश्वरविषयक प्रत्यय दृढ होतो.

आपल्या विज्ञानवत्तेबरोबर अवश्यमेव असणारी अशीच ही ईश्वरविषयक कल्पना आहे व तींत कांहींएक आत्मविशेष नाहीं. ह्या रीतीनें कळून आलेली ईश्वराची कल्पना अशी आहे कीं ईश्वर आहे, तो चैतन्यरूप किंवा आत्मरूप आहे. तोच परमेश्वर कारणाचें आदिकारण, दिशा काल इत्यादि संबंधविहीन विश्वाचा नियंता, त्याच्याच योजनेनें हें सर्व विश्व चाललें आहे, चांगुलपणा, प्रेम, न्याय, पवित्रता, सामर्थ्य इत्यादि गुण त्याचे ठायीं परमावधीनें आहेत. तोच प्रभु पिता, न्यायदाता व सर्व आत्म्यांचा शास्ता आहे, अशी ही ईश्वराची कल्पना आहे.

( ९ ) ईश्वर म्हणजे नुसतें एक सामर्थ्य आहे, किंवा केवळ एक शक्ति आहे असें नव्हे; किंवा उत्पन्न केलेलें अथवा आपोआप उत्क्रान्त झालेलें जें हें सर्व जगत् तेंच ईश्वर असें नाहीं, म्हणजे जडसृष्टि हीच ईश्वर असें नाहीं. किंवा ईश्वर ही या सृष्टीची अव्यक्त अथवा बीजरूप अवस्था असेंही नव्हे. पृथ्वी, आप, तेज, वायु हीं महाभूतें हीं ईश्वर नाहींत. सूर्य, चंद्र, तारे किंवा सृष्टीच्या अन्तर्गत असणारें जड जें तत्त्व तेंही ईश्वर नव्हे. देव अनेक नाहींत व देवांचें साम्राज्यही नाहीं. चांगल्या आणि वाईट देवता, प्रकाशाचें एक तत्त्व व ( सेटन या रूपानें अन्धकाराचें दुसरें तत्त्व, ) द्रव्यरूप एक तत्त्व व चैतन्यरूप दुसरें तत्त्व, प्रकृति अथवा माया आणि पुरुष इत्यादि प्रकारही नाहींत. ईश्वर एक व अद्वितीय आहे. ईश्वरांत ( पिता, पुत्र आणि पवित्र आत्मा असे ) अनेक पुरुष नाहींत—त्रिमूर्ति नाहींत किंवा द्विमूर्तीही नाहींत. आत्मविचारांत मग्न व या जगांत व मनुष्यलोकांत काय चाललें आहे याविषयीं उदासीन असा ध्यानस्थ ब्रम्ह हाच ईश्वर असेंही नाहीं.

( १० ) ईश्वर व जड जगत् यांच्या परस्पर संबंधांचें यथावत् स्वरूप काय आहे हें एक गूढ आहे; तें आपल्या बुद्धीस गम्य नाहीं, असें साधकास वाटतें. ‘ कांहीं नाहीं ’ मधून या जड जगताची उत्पत्ति झाली ही कल्पना संभवनीय नाहीं. हें विश्व नव्हतें व त्याचें अस्तित्व सुरू झालें अशा काळाची आपल्या मर्यादित

अन्तश्चक्षूस कल्पना करितां येत नाहीं; किंवा विश्व ईश्वराप्रमाणें अनादि आहे अशीही कल्पना होत नाहीं. हें विश्व म्हणजे ईश्वराच्या सत्वाचा विस्तार, आविर्भाव किंवा व्यक्तस्वरूप आहे असें मानतां येत नाहीं; किंवा जगतास वास्तविक अस्तित्व नाहीं, तें केवळ एक आभास किंवा दृष्टिभ्रम आहे, मायेमुळें किंवा अज्ञानामुळेंच तें विषय अथवा पदार्थ, या रूपानें पृथक भासतें असेंही मानतां येत नाहीं. हें गूढ उकलण्यास आपण असमर्थ आहों असें जरी साधक कबूल करितो, तरी त्याचा *असा विश्वास आहे कीं ईश्वरच आपल्या योजनेनें या सृष्टीस रंगरूपास आणितो* व तिची व्यवस्था लावितो; याविषयीं त्यास कांहीं एक शंका वाटत नाहीं. त्याच्या विश्वासास प्रमाण हें कीं सृष्टींत सर्वत्र चातुर्याच्या, योजनेच्या किंवा संकेताच्या व दयाळु स्वभावाच्या खुणा दिसत असतात; व त्या खुणांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, कोणी तरी ज्ञानवान् तत्त्व या सजीव निर्जीव सृष्टीच्या व्यापारांवर व घडामोडींवर इच्छापूर्वक देखरेख ठेवीत आहे, त्यांना अस्तित्व आहे, गति व चैतन्य देत आहे, व आपल्या उद्देशानुरूप त्यांचें नियमन करीत आहे. म्हणजे आकाशांत व काळांत, सर्वत्र ईश्वराचें तेज व्यापून राहिलें आहे; क्रियारूपानें, जीवनरूपानें किंवा आधार या रूपानें प्रत्येक वस्तूंत ईश्वराचें तेज वसत आहे. वृद्धि पावणें, क्षय होणें, किंवा नवीन रूपान्तरें प्राप्त होणें, हे जे व्यापार जड जगतांत नेहमीं चाललेले असतात ते आपल्या इंद्रियांत ईश्वराचें सामर्थ्य प्रगट करितात. या जगताचें अस्तित्व, त्यांतील गति व त्याचें जीवन, हें सर्व ईश्वरापासून आहे. जडकोटि, उद्भिज्जकोटि, व प्राणिकोटि यांमधील जे नानाविध पदार्थ व त्यांच्यामधील गुरुत्वाकर्षण, उष्णता, विद्युत इत्यादि व्यापार, रासायनिक व्यापार, वनस्पतींच्या व प्राण्यांच्या जीवनक्रिया अथवा शरीराचे व्यापार, हृदयांत सहजज्ञान जागृत होणें, किंवा विचारानें तें प्राप्त होणें या साऱ्या गोष्टींत ईश्वराचें सामर्थ्य किंवा तेज कमी अधिक मानानें—म्हणजे वस्तूंचे ठायीं मूळारंभीं ज्या प्रमाणानें क्षमता ठेवण्यांत आली आहे त्या प्रमाणानें—व्यक्त होत आहे.

( ११ ) साधकाचा असा विश्वास आहे कीं जीवात्मा हा चैतन्यरूप आहे, व त्याला पृथक् अस्तित्व आहे. तो द्रव्याचाच प्रकार, किंवा क्रिया, किंवा गुणधर्म नाहीं. विषयांचें, पदार्थांचें ग्रहण करणें, विचार, इच्छा, सुखदुःखांचा अनुभव, सदसद्विवेक इत्यादि नानाविध शक्ति त्याचे ठायीं आहेत. आणखी, आत्मा हा अमर आहे, मृत्यूनें त्यास देहापासून सोडविल्यानंतरही तो असतो; अशी साधकाची श्रद्धा

आहे. जीवात्मा हा एकच असून त्याचें ईश्वराशीं ऐक्य किंवा तादात्म्य आहे, मायेमुळें किंवा मानवी अज्ञानामुळें तो पृथक्त्वानें भासतो असें साधकांस वाटत नाहीं. जीवात्म्याला पृथक् अथवा स्वतंत्र अस्तित्व आहे तरी तें ईश्वराच्या आधीन असें आहे; आत्मा हा ईश्वररूप तेजाचा एक किरण आहे किंवा त्याचेंच प्रतिबिंब आहे असें नाहीं. साधकास आणखी असें वाटतें कीं जितके म्हणून मनुष्यप्राणी आहेत तितकेच आत्मेही आहेत. आत्म्याच्या संबंधानें जीं हीं एकंदर मतें सांगितलीं तीं सत्य आहेत अशी खातरी बाळगण्यास जरी पुरेसा पुरावा आहे तरी या एकंदर मतांत जो कांहीं संदेहाचा किंवा शंकेचा भाग आहे त्या सर्वांचें निवारण करण्यास आपण असमर्थ आहों असें साधक कबूल करितो. आत्म्याचें स्वरूप काय आहे, त्याचा उद्भव कोठून आहे, त्याचें अस्तित्व कशा प्रकारचें आहे व त्याची पुढें गति काय आहे, परमात्म्याशीं त्याचा संबंध काय आहे, ईश्वरानेंच त्याला उत्पन्न केला आहे किंवा तो ईश्वराबरोबरच अनादि आहे ह्याविषयीं आपणांस पूर्ण व यथावत ज्ञान आहे असें म्हणण्याचें धाडस साधक करीत नाहीं. तरी साधकाचा एवढा विश्वास आहे कीं ज्याप्रमाणें जड विश्वांत परमेश्वराचें सामर्थ्य दिसून येतें, त्याचप्रमाणें आत्म्याच्या प्रांतांत त्याचेंच सामर्थ्य आत्म्याच्या उन्नत आकांक्षा व कार्य ह्यांच्याद्वारें दृग्गोचर होत असतें.

( १२ ) सर्व सजीव व निर्जीव सृष्टीचें पालन व नियमन ईश्वराची इच्छा एका सर्वसाधारण व सर्वदा सारख्या अशा योजनेच्या द्वारें करिते, व ज्यांचे ठायीं विज्ञान व स्वतंत्र इच्छा आहे अशा जीवांचें पालन व नियमन तीच ईश्वरी इच्छा सर्वसाधारण व विशेष अशा योजनेच्या दोन प्रकारांनीं करिते, असा साधकाचा भरंवसा आहे. हे जे योजनेचे दोन प्रकार आहेत त्यांची प्रवृत्ति ईश्वराच्या यशाची अभिवृद्धि व्हावी व सर्व जीवांचें कल्याण व्हावें याकडे आहे. शिवाय हा जो विशिष्ट योजनेचा प्रकार आहे त्यायोगें ईश्वर जीवांस सदाचाराचें शिक्षण देत असतो. सदाचरणाच्या किंवा दुराचरणाच्या मागोमाग कांहीं आल्हाद व क्लेश या रूपानें शारीरिक परिणाम घडतात ते, किंवा अन्तर्यामीं जें कांहीं समाधान किंवा उद्वेग, उन्नति किंवा अवनति वाटते तीं सारीं ईश्वरानें आपल्या नियमांची अमलबजावणी करण्याकरितां ठरविलेलीं फळें आहेत. अशा तऱ्हेनें ईश्वर आपणा मनुष्यांच्या आचरणाचें नियमन करीत असतो. परंतु आपल्या ठिकाणीं आचरणासंबंधानें जी स्वेच्छा व मर्यादित असें स्वातंत्र्य ठेविलेलें आहे त्याच्याशीं या ईश्वरी नियंतृत्वाचा विरोध येतो असें वाटण्याचें कारण नाहीं.

निदान ज्या आचरणाचे बरे वाईट परिणाम आपल्या ध्यानांत आधींच येतात, व प्रयत्न करून वर्तनाचा एक मार्ग टाळावा व दुसरा अंगिकारावा असें सामर्थ्य ज्या गोष्टीसंबंधानें आपल्यांत आहे त्या गोष्टींत तरी ईश्वरी इच्छेचा आपल्या मर्यादित स्वतंत्र इच्छेशीं विरोध नाहीं. असो. या जगतांत, ईश्वरानें ठरविलेलीं आचरणाचीं फळें नियमानें व पूर्णपणें आपला परिणाम करितातच असें नाहीं. पुष्कळ वेळा विलंब होतो; कधीं कधीं दुराचारासच उत्तेजन मिळत आहे असें वाटतें आणि पुष्कळ वेळा सदाचाराचा दुष्परिणामच झाल्यासारखें वाटतें. ह्या-योगें आपलें मन क्षणमात्र शंकित होतें, तथापि ईश्वराची एकंदर योजना व व्यवस्था सदाचारास उत्तेजक आहे याविषयीं शंका कायम रहात नाहीं.

( १३ ) साधकाचा असा विश्वास आहे कीं, आपला सध्याचा जन्म आपल्या परीक्षेकरितां व पुढच्या तयारीकरितां आहे. सद्गुण व धर्मशीलता ह्या बाबतींत आपणास कसास लावून पहावें व शिक्षण द्यावें व पुढच्या जीवनक्रमाविषयीं योग्य पात्रता आपल्या ठायीं यावी यासाठीं आपलें सध्याचें आयुष्य आहे. आपण आड वाटेला जाण्याचा संभव असतो, आपल्या मार्गांत मोहाचे प्रसंग येतात; चित्तांत दुर्विकार उत्पन्न होतात व न्याय्य व योग्य कोणतें तें बहुधा आपणांस ठाऊक असून त्यापासून मोहामुळें किंवा दुर्विकारामुळें आपण परावृत्त होत असतों; ह्या गोष्टीवरून असें दिसतें कीं आपली परीक्षा होत आहे व आपण कसास लाविले जात आहोंत. अशा ह्या अडचणी, मोह आणि धोके संसारांत आहेत व आत्मसंयमन करावें व स्वतःला योग्य वळण लावावें व पुढच्या सुखाकरितां सध्याचें दुःख सोसावें अशी वृत्ति बनविणें आवश्यक होतें. म्हणजे आपली सध्यांची स्थिति केवळ परीक्षेची नव्हे, तर शिक्षणाचीही आहे. शिवाय आपली उन्नति करून घेण्याची जी पात्रता आपल्या ठायीं ठेविली आहे त्यावरून वर सांगितलेल्या सिद्धान्तांचें आणखी समर्थन होतें. अनुभव येऊन आणि आपलें सामर्थ्य व क्षमता यांचा विकास करून आपली उन्नति करून घेण्याची पात्रता आपल्यांत आहे हें खचित आहे. म्हणजे एकंदरीनें इंद्रियांवर जय मिळवावा, त्यांवर पगडा बसवावा हेंच सदाचरणाचें मूलतत्त्व आहे आणि ईश्वराची इच्छा समाधानवृत्तीनें मान्य करावी असेंच आपणांस संसारांत शिक्षण मिळत असतें. आपलें सध्याचें आयुष्य परीक्षेची स्थिति आणि सदाचरणाची किंवा सुविनयाची शाळा होण्यास विशेष प्रकारानें योग्य आहे. याचें कारण असें कीं, आपल्या मार्गांत मोह असतात व त्यामुळें आत्मसंयमनाचें शिक्षण आपणांस मिळतें, जगा-

कडे व त्यांतील दोषांकडे किंवा उणीवांकडे पाहून आपण ईश्वराच्या आधीन आहोंत अशी मनोवृत्ति वृद्धिंगत होते आणि मोहाचे प्रसंग पुष्कळ काळपर्यंत सतत आल्यामुळें आपल्या सदाचारवृत्तींचा विकास होण्यास साधन मिळतें.

( १४ ) आत्मा अमर आहे व त्यानें ह्या जन्मांत जें पापपुण्य केलें असेल तदनुरूप परलोकीं त्याच्या वांट्यास सुख व दुःख येईल असा साधकाचा विश्वास आहे. हें सुखदुःख कोणत्या विशेष प्रकारानें दिलें जातें, हें गूढ काय आहे त्याचा उमज आपल्याला पडावयाचा नाहीं. ह्या शरिरांत वसति करण्यापूर्वी आत्म्याचे अनेक जन्म झाले आहेत कीं काय व पुढेंही त्यास एका पाठीमागून एक अनेक जन्म कीं ज्यांची उच्चनीचता ह्या जन्मींच्या त्याच्या वर्तनावरून ठरणार आहे, असे त्यास घ्यावयाचे आहेत कीं काय, किंवा पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत आत्मा निद्रावस्थेंत राहतो व त्या दिवशीं न्याय घेण्याकरितां मनुष्यदेह धारण करून उठतो, किंवा तो पावन करणाऱ्या लोकांत शुद्धिव्यापार करीत राहतो असें आहे कीं काय, त्याचप्रमाणें आपल्या आत्म्यास कोणत्या प्रकारच्या सूक्ष्म देहाचें आवरण आहे, मृत्यूनंतरच्या अवस्थेंत कोणत्या प्रकारच्या सुखदुःखांनीं तो परिवृत असतो, हे जे सारे प्रश्न आहेत ते कळण्याजोगे नाहींत, त्यांवर अंधकाराचें आवरण आहे व तें काढणें आपणास प्रतिसिद्ध आहे. स्वर्ग व नरक ह्यांविषयीं आपणांस वास्तविक कल्पना करतां येत नाहींत हें साधक कबूल करितो, तरी तेथें जीं सुखदुःखें अनुभवावयाचीं असतील तीं ज्या सुखदुःखांचा आपणास इंद्रियमय शरीराच्या द्वारें प्रत्यय होतो तशा प्रकारचीं नसतील अशी त्याची पूर्ण खात्री असते. आणखी ईश्वराचा न्यायीपणा आणि दयाळुत्व ह्यांवर त्याचा भरंवसा असल्याकारणानें साधकास असें वाटतें कीं, ह्या सृष्टींतील कोणत्याही आत्म्यास शाश्वत अधोगति व दुःख प्राप्त होणार नाहींत. कारण, ईश्वराच्या राज्याची रचना किंवा व्यवस्था तशा प्रकारची नाहीं. आत्म्याच्या क्षमतेची वृद्धि व्हावी, सर्व सामर्थ्यांचा विकास व्हावा असाच त्या योजनेचा उद्देश दिसतो, व म्हणून कोणताही आत्मा नष्टप्राय व्हावा अशा रूपानें ईश्वराच्या दयाशील योजनेचा शेवटचा परिणाम कधींही होणार नाहीं. ईश्वराचें शासन किंवा दंड शाश्वत आहे असें मत साधकास मान्य नाहीं. कारण मर्यादित आयुष्यांत केलेल्या पापाबद्दल अनंत काळपर्यंत शासन भोगावें लागेल हें मत ईश्वराच्या स्वभावाविरुद्ध आहे. कारण, ईश्वर दयेचा सागर, पूर्णपणें न्यायी व सर्वज्ञ असा आहे.

(१५) साधकाचा असा विश्वास आहे कीं, मनुष्यावर आपल्या सर्व कर्मांची जबाबदारी असून, आत्मविजयाचें सामर्थ्य त्याच्यामध्यें ठेविलेलें आहे. तथापि, विशिष्ट काळ, आजूबाजूची परिस्थिति, त्याचें शिक्षण, त्याच्या एकंदर स्वभावाची घडण, समाजस्थिति ह्यांचा त्याच्या स्वातंत्र्यावर कमी अधिक परिणाम होत असतो. पूर्वजन्मींच्या सत्कृत्यांचें अगर दुष्कृत्यांचें फळ, प्रारब्ध, सत्त्व, रज, व तम ह्यांचा झगडा, देवांचा व भुतांखेतांचा जुलूम त्याला वाटेल तसें वागावयास स्वातंत्र्य आहे व दैवाच्या सर्वस्वी आधीन आहे. अशा ह्यासंबंधानें निरनिराळ्या कल्पना प्रचलित आहेत. ह्यांतील मध्यममार्ग साधकास पसंत आहे.

(१६) शरीरविषयक सुखदुःख हा केवळ आपल्या अज्ञानाचा परिणाम होय. परंतु नैतिक दुःख, पाप यांच्या अस्तित्वाचें गूढ उकलण्याचें सामर्थ्य आपल्यांत नाहीं हें साधक प्रांजळपणें कबूल करितो. तथापि आपलें येथील जीवन हें आपल्या भावी उन्नतीची तयारी करण्यासाठीं असावें. आणि हें जर खरें तर दुःख, प्रसंग हीं मार्गांत असल्यावांचून आपलें सामर्थ्याची वाढ होणें नाहीं. आचारस्वातंत्र्य म्हणजे पापाचरणाची शक्यता असें जरी साधकास वाटत नाहीं, तरी पापाचें अस्तित्व त्यास मान्य असून, असत्य, भ्रम, चूक, सत्याचा व सद्गुणाचा अभाव, अशा प्रकारें पापासंबंधानें स्पष्टीकरण देण्याच्या भानगडींत साधक पडत नाहीं. पापाचें मूळ कारण त्यास ज्ञानातीत आहे व देवाची योजना, देवाची व्यवस्था ह्यांविषयीं आज जें आपणास ज्ञान आहे त्याच्या साहाय्यानें आज आपल्याला ह्याचा उमज पडत नाहीं असा साधकाचा विश्वास आहे.

(१७) मनुष्यप्राणी जन्मतःच पापी जन्मतो, व अगदीं पहिल्या जोडप्याच्या पापाचें हें फळ आहे हें मत खरें नाहीं व परिपूर्ण व पूर्णव्यापी जो परमेश्वर त्याच्या न्यायीपणास शोभणारें नाहीं.

(१८) कांहीं माणसांनीं अनंतकालपर्यंत नरकवासांत रहावें, व कांहींनीं अनंतकालच्या सुखाचा आस्वाद घ्यावा अशी देवाची योजना आहे असें मानणें हें देवाच्या स्वरूपाशीं विसंगत आहे.

(१९) दररोज परमेश्वराची प्रार्थना करण्याची आवश्यकता साधकास मान्य आहे. आपल्या अंतःकरणाच्या उन्नतीसाठीं परमेश्वराला शरण जाणें, आपलें अंतःकरण त्यास अर्पण करणें व आपल्या अडचणी त्यास निवेदन करणें हें आपल्या उन्नतीच्या दृष्टीनें अत्यंत अगत्याचें आहे. संसारांत आपल्याला अडचणी येतात

त्या वेळीं आपण परमेश्वराचें साहाय्य अवश्य मागावें, त्याची करुणा भाकावी व त्यानें आपला मार्गदर्शक व्हावें अशी आपण अवश्य याचना करावी. परंतु प्रार्थना मान्य करणें अगर न करणें हें परमेश्वराच्या इच्छेवर ठेवावें.

(२०) अंतःकरणपूर्वक झालेल्या पश्चात्तापाच्या द्वारें आत्म्याची उन्नति होते हें मत पूर्णपणें विश्वसनीय आहे. तात्कालिक अगर मृत्युशय्येवरील पश्चात्ताप अशा प्रकारें परिणामकारक होत नाहीं. पश्चात्ताप जर खरोखर परिणामकारक व्हावयास पाहिजे, तर त्याच्यानंतर ज्याबद्दल पश्चात्ताप व दुःख झालें तें आचरण अगर ती चूक पुन्हा न करण्याचा दृढ निश्चय पाहिजे. अशा प्रकारें दृढ निश्चय करणें, व मोहास वश न होतां, निश्चयानुसार वर्तणें ह्यांच्या योगें पूर्वीचें दुःख, यातना व पश्चात्ताप ह्यांच्या द्वारें आपल्या आत्म्याची उन्नति होत आहे असा अनुभव येत जातो. पश्चात्ताप केव्हांही उशीरा झाला असें म्हणतां येत नाहीं. पश्चात्तप्त अंतःकरणाच्या मनुष्यावर परमेश्वराची कृपा केव्हांही होते, म्हणून आपल्या नित्याच्या प्रार्थनेमध्यें, ज्या ज्या वेळीं आपलें पतन होतें त्या त्या वेळीं, देवाच्या कृपेचा आपल्यावर वर्षाव व्हावा व आपल्यास पश्चात्ताप व्हावा अशी आपण याचना करावी.

(२१) साधकाचा असा विश्वास आहे कीं, भक्ति, प्रार्थना, परमेश्वराच्या इच्छेनुसार वर्तन, मनुष्य व परमेश्वर ह्यांजवरील प्रेम व सदाचरण ह्यांच्याद्वारें त्याचा तरणोपाय होतो. प्रेम व भक्ति ह्यांच्या अभावीं होणारा पश्चात्ताप, किंवा केवळ परोपकाराचीं कार्यें अगर कष्टमय व्रतें वैकल्यांचा पसारा, संपूर्ण आत्मज्ञान, अगर परमेश्वराशीं एकरूप होणें, अगर यज्ञयागादि कृत्यें करणें यांवर, जरी हे व असे उपाय पुष्कळ धर्मपंथांस मान्य आहेत तरी, साधकाचा विश्वास बसणार नाहीं.

(२२) साधकाचा असा पूर्ण विश्वास आहे कीं, सर्व पुरुष व सर्व स्त्रिया हीं परमेश्वराचीं लेंकरें आहेत. त्याच्या दृष्टीनें मनुष्या मनुष्यांत मुळींच भेदभाव नाहीं. अशा प्रकारें भेदभावाचा त्याच्यावर आरोप करणें हेंही मनुष्यास उचित नाहीं. जो कोणी त्याचेवर प्रेम करितो व त्यास भ्यावयाचें तेथें भिऊन वागतो त्याचा परमेश्वर स्वीकार करितो.

(२३) आत्मसंमयन, परमेश्वरावरील पूर्ण निष्ठा ह्यांच्याद्वारें मनुष्य मोहवश न होतां वागतो त्या वेळीं त्यास परमेश्वराच्या सांनिध्याचा लाभ होतो व परमेश्वराचें प्रेम, पावित्र्य, न्यायीपणा ह्यांचा त्यास प्रत्यक्ष अनुभवानंद प्राप्त होतो, व त्याच्या सेवेंत, त्याच्या सहवासाच्या आनंदामध्यें तो निमग्न होतो. हेंच भक्ताचें तारण

होय. ह्या देहाचा त्याग करून अन्यत्र पुनश्च चैन भोगण्यासाठीं जाणें, किंवा आपणच ब्रह्म आहोंत अशी लटकी कल्पना करून घेऊन त्यांतच निमग्न असणें, किंवा आत्मा व परमात्मा एकच होत असें मानणें, अगर वासनाविरहित होऊन निर्वाणाप्रत जाणें इत्यादि मतें निरनिराळ्या धर्मांच्या अगर पंथांच्या अभिमानी जनांस कितीही प्रिय असलीं तरी हीं मतें वैषयिक अगर काल्पनिक होत असें साधकास वाटतें.

(२४) परमेश्वर सावयवरूपानें इहलोकीं अवतरतो, म्हणजे मनुष्यरूपानें आपल्यामध्यें वावरतो अशा विश्वासाची कांहीं जरूरीही नाहीं व तो विवेकाच्या कसास उतरतही नाहीं. परमेश्वर आपल्या कृपेचा वर्षाव कित्येक व्यक्तींवर * करतो व ह्या व्यक्ती परमेश्वराच्या सामर्थ्याचें, प्रेमाचें ज्ञान इतर जनांस करून देतात. ज्याप्रमाणें कुंभार निरनिराळीं, निरनिराळ्या आकाराचीं व निरनिराळ्या कार्यांसाठीं पात्रें तयार करितो, त्याचप्रमाणें जगांतील सर्व योद्धे, सर्व साधुसंतादि पवित्र माणसें,

---

* (1) God sends special agents when circumstances are ripe for their advent.—*Cousin.*

(2) At certain times in national or world History when He sees that evolution has reached a certain point, He sends–and it has so frequently occurred that it may be called a law–a new soul into the world charged with power, not with superhuman power, but with human power raised to the utmost point it can reach at that period of human development. A genius, as we call it, is born. A new start is given to the world, an elect soul is sent forth to do a vast work.

*Stopford A. Brooke.*

( ३ ) जेथ जेथ ज्या ज्या काळीं उग्र होय धर्मग्लानि ।
सत्य ज्ञान लोपुनि अवघे जन होती बहु अज्ञानी ॥
नयनीति टाकुनि सकळ रत होती असदाचरणी ।
तेथ तेथ प्रभु जगशास्ता । निर्मितो धर्मनयत्राता ॥
भक्तराज वंद्य समस्तां । परि त्यातें प्रभु न गणावें ॥

—वामनराव मोडक.

इष्ट कार्यासाठीं प्राणाची आहुति देणारे जन ह्या सर्वांचा जनक तो परमेश्वरच होय आणि हे सर्व परमेश्वराचें सामर्थ्य व कृपा यांची साक्ष पटवितात. निरनिराळ्या अवतारांची अशी व्यवस्था लावल्यावर कोणीही अवतार कुमारीच्या पोटीं जन्मला असल्या खुळसट गोष्टीवर विश्वास ठेवण्याची आवश्यकता रहात नाहीं.

(२५) भक्ताचा असा विश्वास आहे कीं, परमेश्वर ह्या बाह्य विश्वांत त्याचप्रमाणें आपापल्या अंतःकरणांत आणि सर्व इतिहासांत आपलें स्वरूप प्रकट करीत आहे. त्याचें प्रकटीकरण ह्या ठिकाणीं नेहमींच अनुभवास येतें. ज्या ज्या वेळीं विशेष सामर्थ्याचीं माणसें तो पाठवितो, त्या त्या वेळीं कोणी धर्मतत्त्ववेत्ता, व भविष्यवादी म्हणून जगावर छाप बसवितो; कोण जगविख्यात कवि होऊन आपल्या मधुरकाव्यानें सर्वांस वेड लावितो; कोणी आपल्या अलौकिक वक्तृत्वानें सर्वांस वश करितो व कोणी सत्कार्यासाठीं आपला प्राण खर्ची घालतो. हीं सर्व माणसें परमेश्वराचें विशेष सामर्थ्य दाखवितात, परमेश्वराच्या विशेष गुणांचा लाभ जनांस करून देतात. हींच माणसें प्रमाणतः देवाची इच्छा प्रकट करीत असतात. ह्यावरून सर्व धर्मग्रंथांचें अभ्रांतत्व सापेक्ष आहे असें दिसून येईल.

(२६) जगाचा इतिहास असें दाखवितो कीं, सर्व ठिकाणच्या लोकांस निरनिराळ्या प्रकारच्या अज्ञानमूलक धर्मविचारांच्या स्थितींतून निघून जावें लागलें. परंतु ह्या स्थितींतून निघून ज्या वेळीं त्यांस विश्वाचा कर्ता एक परमात्मा परमेश्वर आहे हें ज्ञान होतें त्यानंतरही काष्ठपाषाणांच्या मूर्तींची पूजाअर्चा करणें हा निवळ वेडेपणा आहे. आणि ह्या स्थितीचा अनुभव आल्यानंतर जेव्हां मन स्थिर करण्याकरतां मूर्ति लागते असा नेहमींचा जो युक्तिवाद लढविण्यांत येतो तो खरें पहातां अनुभवाच्या दृष्टीला पटत नाहीं. तथापि धर्माची उन्नत स्थिति गांठेपर्यंत, म्हणजे उन्नत धर्माची कल्पना होईतों प्रतिमापूजनाचें स्थान धर्ममार्गांत आहे. नाहींतर मनुष्य पुढें जावयाच्या ऐवजीं मागें जाईल. परंतु देशांतील विचाराची ही अवनत स्थिति एकदां निघून गेल्यानंतर, व जनांना परमेश्वराच्या शुद्ध स्वरूपाचें ज्ञान झाल्यानंतरही पुन्हा मूर्तिपूजेचा आश्रय करणें हें मनुष्यास नीचत्व प्राप्त करून देणारें आहे. आम्ही देव मानलेल्या मूर्तींना माणसांहून दुबळ्या बनवितों, व आमची देवाची कल्पना अत्यंत नीच कोटीप्रत आम्ही नेतों. ह्या देवाच्या मागें कामाचे व मोहाचे प्रसंग आम्ही लावतों, त्यांना अत्यंत कामी करून

देवाच्या उच्च स्वरूपाचा आम्ही पूर्ण नाश करितों. अशा स्थितींत आमचा सर्व सारासार विचार नष्ट होतो व आमची बुद्धि व अक्कल लंगडी पडते.

( २७ ) सृष्टिनियमांविरुद्ध घडून येणारे प्रकारांची म्हणजे चमत्कारांची खरें पहातां कांहीं जरूरी नाहीं व ते विश्वासपात्रही नाहींत. जेव्हां कोणी अमुक अमुक चमत्कार पाहिल्याचें, अगर केल्याचें किंवा ऐकिल्याचें सांगतो त्या वेळीं सृष्टि-नियमांचा संकोच झाला, सृष्टिनियमांविरुद्ध कांहीं प्रकार घडले असें मानण्यापेक्षां त्यांचाच कांहीं गैरसमज झाला, असेंच मानणें बरें. धर्मजीवनाच्या बाबतींत ह्या चमत्कारांचें कांहींही कार्य नाहीं. व्यक्तिमात्राची उन्नति अगर अवनति ह्या चम-त्कारांवर मुळींच अवलंबून नाहीं. जो मनुष्य चमत्कार करतो म्हणतो तो नेहमीं सत्य उपदेशितो असें कांहीं नाहीं. उलटपक्षीं ह्या सर्व विश्वाचा सुयंत्रित चाल-लेला व्यापार, परस्परविरोधी प्रकार असूनही नियमबद्ध रीतीनें चाललेले सर्व व्यवहार हाच धर्मनिष्ठाच्या दृष्टीनें मोठाच चमत्कार व ह्याच्याच योगें त्याचा विश्वास दृढ होतो. तो दृढ व्हावयास नियमांचें उल्लंघन झालेलें पहावयाची कांहीं जरूरी नाहीं.

( २८ ) वैराग्य व आपल्या शरीराला यातना देऊन निरनिराळे प्रकार करणें, रानावनांत जाऊन शरीरास कष्ट देऊन साधन करणें ह्यांची कांहींच आवश्यकता नाहीं. ह्याच्या योगें आम्ही आमच्या जीवनाचें जें साध्य त्यासच मुळी मुकतों. संसारांत राहून आत्मसंयमनाच्या द्वारें, त्याचप्रमाणें स्वतःच्या व इतरांच्या अनु-भवांच्या द्वारें मिळणाऱ्या शिक्षणास संसारत्याग केल्यानें मनुष्य मुकतो. संसार-त्याग सृष्टिनियमाच्या विरुद्ध* आहे. बहुत लोकांनीं अगर सर्वांनीं संसारत्याग करणें ही मोठी भूल आहे. एखाद दुसऱ्या व्यक्तीनें संसारांतील विरोधास तोंड देतां येत नाहीं म्हणून संसारत्याग करून जर एकांत पत्करिला व पवित्र शील राखून त्यानें आपला क्रम आक्रमिला तर त्याला कोणी दोष देणार नाहीं. पण हें कांहीं सार्वत्रिक ध्येय नव्हे. तथापि योग्य वेळीं आपलीं सर्व कर्तव्यें यथासांग केल्यानंतर संसारांतून अंग काढून घेऊन एकांतवास पत्करणें हें प्रत्येक मनुष्यास लागू आहे असेंही मानावयास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें ज्या समाजांत

---

*गिरह तजे तो मठही बनावे उदम तजे तो फेरी
कुटुम तजे सिख शाखा धुंडे मति मायानें घेरी—कबीर.

अगर देशांत ऐषआराम फार वाढला आहे, अवास्तव कार्यासाठीं धनाचा अपव्यय होत आहे, नीतिअनीतीचा धरबंद राहिलेला नाहीं, तेथें आपल्या सांसारिक सर्व सुखावर लाथ मारून लोकांस जागृत करण्यासाठीं, खरा मार्ग दाखविण्याच्या हेतूनें एक अगर कांहीं निवडक व्यक्तींनीं संसारत्याग केला तर अशा त्यागाचा इष्टच परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं.

(२९) सार्वजनिक प्रार्थना, उपासना अत्यंत लाभदायक होत. मात्र व्यक्तिगत प्रार्थना व उपासना यांची त्यांत भर पडली पाहिजे. सार्वजनिक प्रार्थनेच्या वेळीं सर्व दर्जाचीं माणसें, लहान थोर, गरीब श्रीमंत, विद्वान अविद्वान, सर्व एकत्र येतात, देवापुढें सर्वांची योग्यता सारखी आहे, हें लक्षांत येऊन कोणास गर्व असल्यास त्याचा ऱ्हास होतो व आपण सर्व एका परमेश्वराचीं लेंकरें आहोंत व परमेश्वर परमात्मा आपला पिता आहे हें प्रत्यक्ष अनुभवास येतें.

(३०) धर्मोपदेशकांची नियमबद्ध संस्था असणें जरूर आहे. परंतु हा पिढिजाद धंदा झाल्यास व अखिल जनतेपेक्षां आपले हितसंबंध निराळे आहेत असा भाव उत्पन्न होऊन आपल्याकडे हे लोक श्रेष्ठपणा घेऊं लागल्यास हा क्रम हानिकारक आहे. म्हणून ह्यास केव्हांही उत्तेजन देणें योग्य नाहीं. त्याचप्रमाणें आपण हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, अशा प्रकारच्या संस्थेचा घटक असणें ही कांहीं जन्मसिद्ध हक्काची बाब नव्हे, किंवा त्या त्या कुटुंबांत जन्म पावले म्हणून त्या कार्यासाठीं देवानें योजलेलीं हीं माणसें असेंही केव्हां म्हणतां यावयाचें नाहीं. धर्मसंस्थेच्या सुव्यवस्थेसाठीं अशा संस्थांची आवश्यकता असते. आणि केवळ धर्मकार्य करण्याकरितां आपलें आयुष्य वेंचण्यास सिद्ध असणारीं आत्मत्यागी माणसें धर्मकार्याच्या उन्नतीसाठीं व प्रसारासाठीं अत्यंत आवश्यक आहेत यांत कांहीं संशय नाहीं.

(३१) सार्वजनिक उपासना व प्रार्थना करण्यासाठीं सुंदर व मोठीं मंदिरें व भजनालयें ठिकठिकाणीं असलीं पाहिजेत. अशीं मंदिरें उत्तम रीतीनें शृंगारणें, सुमधुर वाद्यें लाविणें, इ० साधनांचा फायदा घेणें हें विशेष प्रसंगीं उपासना व प्रार्थनेच्या वेळीं उत्तेजक होतें. मात्र ह्या बाह्य उपकरणांसच सर्व महत्त्व मिळून मुख्य कार्य मागें पडतां नये.

(३२) धर्मसंस्थांनीं वार्षिकोत्सव व दुसऱ्या विशेष प्रसंगानिमित्त उत्सव करणें जरूर आहे. कारण, आपली एकंदर समाजरचनाच अशी आहे कीं, अशा

प्रकारचे विशेष प्रसंग घडवून आणिल्यानें नित्य व्यवसायामध्यें रंगलेल्या जीवास थोडा विसावा मिळतो; व देवाकडे व धर्मकार्याकडे आपलें लक्ष असणें अगत्याचें आहे अशी जागृतिही हे उत्सव करून देतात. संसारांतील चिंता, प्रसंग व सुखदुःखें ह्यांनीं मनुष्य कधीं कधीं इतका व्यथित होऊन जातो कीं अशा उत्सवांच्या योगें त्यास मिळणारी शांति व धर्माचा उत्साह त्यास अत्यंत लाभदायक वाटतो.

( ३३ ) संसारांतील कित्येक प्रसंग योग्य प्रकारच्या धर्मसंस्कारांसहितच पार पाडले पाहिजेत. उदाहरणार्थ, जन्म, धर्मप्रवेश, विवाह, मृत्यु इ० जे प्रसंग येतात त्या वेळीं परमेश्वराची उपासना अवश्य व्हावी. अशा कार्याशीं ज्यांचा ज्यांचा निकट संबंध येतो त्यांस त्या त्या कार्याचें व प्रसंगांचें महत्त्व कळावें, त्यांची जबाबदारी त्यांस कळावी म्हणून परमेश्वरापाशीं प्रार्थना व्हावी. धर्मानेंच हीं कार्यें विहित व अवश्य होत असें ठरवावें. व अशा सर्व प्रसंगीं योग्य प्रमाणावर गोरगरिबांस दानधर्म करून प्रसंगांचा गंभीरपणा कायम राखावा. ह्याचदृष्टीनें श्राद्धासारखे प्रसंग कुटुंबांत घडवून आणावे.

( ३४ ) धर्मशिक्षण द्यावयाचें तें असें असावें कीं त्याच्या योगें निःस्वार्थबुद्धि, स्वार्थत्याग, ह्यांकडे वृत्ति अधिक वळावी. दया, क्षमा, परोपकार, आत्मसंयमन, ह्यांकडे जितका अधिक कल होईल तितका इष्टच समजावा. मनुष्याची वृत्ति साधारणतः स्वार्थपर आहे म्हणून वरील प्रकारचे कल ह्या वृत्तीस आळा घालतील. धर्मकार्याविषयीं जीवंत जागृत आस्था ही एक अमोलिक व अल्प प्रमाणावर अनुभवास येणारी देणगी आहे. हिच्या वाढीस प्रत्यवाय करूं नये. मात्र ह्या आस्थेचें रूपांतर धर्मवेडांत कधीं कधीं होण्याचा संभव असतो एवढें लक्षांत ठेवावें.

(३५) स्थलमाहात्म्य किंवा तीर्थस्थलमाहात्म्य यांत कांहींच अर्थ नाहीं असें नाहीं. लोक मुद्दाम तीर्थयात्रेच्या निमित्तानें दूरदूरच्या देशीं जातात, तेव्हां तेथील मनोहर देखावे, सृष्टीचें सौंदर्य, ऐतिहासिक महत्त्व ह्यांचा मनावर परिणाम होऊन स्थलमाहात्म्यानुसार धर्मबुद्धि जागृत होते. धर्मजीवनाच्या वाढीला अशा बुद्धीनें होणाऱ्या यात्रांची मदत होते. परंतु अमुकच स्थल मात्र पवित्र अशी भावना झाल्यास तें एक प्रकारचें धर्मवेड अहंतामूलक आहे हें लक्षांत ठेवून वागलें पाहिजे.

( ३६ ) साधुसंत, इतर थोर व पवित्र पुरुष ह्यांच्या सहवासाचा व्यक्तीच्या चारित्र्यावर अत्यंत इष्ट असा परिणाम होतो व त्यायोगें आपली धर्मबुद्धि जागृत

होते यांत कांहीं संशय नाहीं; तथापि कित्येक धर्मपंथांमध्यें, गुरु, मध्यस्थ, अगर उपदेशक यांचें इतकें महत्त्व वर्णिलें आहे कीं, आत्मप्रयत्नानें मनुष्याला आपली उन्नति साधणें जणूं काय अशक्य आहे असें लोकांस वाटूं लागतें. अशा प्रकारच्या विचारास जितका विरोध होईल तितका थोडाच आहे.

(३७) देव व मनुष्य यांच्यांत मध्यस्थी करणाराची अगर पापापासून सोडवणूक करणाराची आवश्यकता कित्येक धर्मांत अगर पंथांत अतिशय प्रतिपादिली आहे. त्यामुळें आपली उन्नति आपल्या स्वतःच्याच प्रयत्नांवर सर्वस्वी अवलंबून आहे या तत्त्वाच्या लोकांना विसर पडण्याचा संभव असतो. आपल्या आध्यात्मिक उन्नतीसाठीं दुसऱ्याचें सदाचरण, दुसऱ्याची सत्यनिष्ठा कांहीं उपयोगाची नाहीं. साधुसंत अगर धर्मबाबतींतील इतर थोर अधिकारी पुरुष यांच्याशीं सहवास केल्यानें लाभ होतो. त्याचें महत्त्व कमी करणें नाहीं. परंतु त्यांच्या साहाय्यालाही सीमा आहे. कितीही थोर पुरुष असला तरी तो आपलें स्वतःचें कल्याण करून केवळ त्याच्या प्रयत्नानें दुसऱ्याचें आध्यात्मिक कल्याण होणें शक्य नाहीं. ज्यानें त्यानें आपल्या स्वतःच्या प्रयत्नानें आपली स्वतःची उन्नति साधिली पाहिजे. एका व्यक्तीनें सर्वांच्या तारणाची हमी घेणें हा विचार आपल्याला देवाच्या एकंदर व्यवस्थेचा जो अनुभव आहे त्याचे विरुद्ध आहे.

(३८) प्रत्येक व्यक्तिमात्राच्या विवेकाच्या सांगीचें त्यास अत्यंत महत्त्व आहे. विवेकाच्या सांगीपुढें राजकारण, पक्षभेद अगर सामाजिक अडचण वगैरे यांचा कांहीं उपयोग नाहीं. मात्र विवेकाची सांगी नीतिबाह्य व त्याचप्रमाणें दुसऱ्यांच्या रास्त अधिकाराचा प्रतिकार करणारी नसावी. कोणीही एक मनुष्य अगर जनसमूह आपण म्हणतों तेंच ईश्वरप्रणीत व अभ्रांत सत्य असें म्हणूं लागला, तर हें मत असत्य असल्यामुळें त्यास कसून विरोध केला पाहिजे. कारण एकदा ही विचाराची दिशा मान्य केली कीं मनुष्यांच्या स्वतंत्रतेवर घाला पडून मनुष्यें धार्मिक गुलामगिरींत अडकावयास वेळ लागत नाहीं.

(३९) धर्माच्या बाबतींत साधक विश्वास व विवेक यांच्यांत भेद मानीत नाहीं. त्याचा विश्वास विवेकग्राह्य असतो. त्याचा विवेक विश्वासास जवळ करतो. धर्माच्या इलाख्यांत बाह्य अधिकाराचें महत्त्व नाहीं. अधिकार व विश्वास आणि विवेक यांच्यांत जेव्हां लढा उत्पन्न होतो त्या वेळीं आधुनिक साधकास विवेक व विश्वास ह्यांचेंच साहाय्य अधिक होतें.

अशा प्रकारें कामगिरि बजावून माधवराव पुण्यास गेले. त्यानंतर समाजाच्या तत्त्वांची पुनर्घटना करण्याचें काम प्रो. भांडारकर समाजांतील मुख्य साहासात मंडळीच्या साहाय्यानें करूं लागले. जुन्या तत्त्वांचा पुष्कळ खल झाला व अखेरीस पुढील साहा तत्त्वें, उद्देश व प्रतिज्ञा हीं सर्व तयार झालीं. तीं तयार करितांना योग्य तो शब्दरचना करणें; सर्व ध्येयाचें सार तत्त्वांत येईल अशी त्यांची जुळवाजुळव करणें व आपल्या ध्येयाची ह्या तत्त्वांच्या द्वारें स्पष्ट कल्पना करून देणें हें सर्व काम विशेषतः प्रो. रामकृष्णपंतांनींच केलें. पुढें दिलेलीं साहा तत्त्वें व माधवरावांचे वरील ३९ कलमांतर्गत सिद्धांत हीं जवळ ठेवून जे कोणी विचार करितील त्यांस प्रार्थनासमाजाच्या साहा तत्त्वांचें स्पष्टीकरण वरील ३९ कलमांत व त्याचप्रमाणें डा. भांडारकरांच्या ईश्वरविषयक ज्ञान ह्या लेखांत सांपडल्यावांचून राहणार नाहीं. ह्यावरून असें दिसून येईल कीं धर्मतत्त्वांची पुनर्घटना करितांना माधवरावांच्या सिद्धांतांचा व डा. भांडारकरांच्या विचारांचा मंडळीस पुष्कळ उपयोग झाला असावा. माधवरावांच्या ३९ कलमांतर्गत लेखाचें महत्त्व सर्व पुढाऱ्यांस मान्य होतें व म्हणूनच जेव्हां प्रार्थनामंदिराचा पाया ता. २९ दिसेंबर सन १८७२ रोजीं घातला त्या वेळीं तो कालसूचक कांहीं वर्तमानपत्रें एका कुंभामध्यें ज्याप्रमाणें घातलीं त्याचप्रमाणें माधवराव रानड्यांच्या ह्या लेखाची एक प्रत त्या कुंभामध्यें मुद्दाम घातली. अखेरीस प्रार्थनामंदिराचें काम चालू असतांना १८७३ सालीं प्रार्थनासमाजास मान्य असलेल्या धर्मतत्त्वांची पुनर्घटना पूर्ण झाली. त्या वेळीं मुकरर झालेलीं तत्त्वें, व उद्देश अद्याप कायम आहेत. नाहीं म्हणावयास कांहीं वर्षांपूर्वी रा. रा. द्वारकानाथ गोविंद वैद्य यांच्या सूचनेवरून '**प्रेमस्वरूप**' हा शब्द पहिल्या मूलतत्त्वामध्यें साधारण सभा भरून घालण्याचें एकमतानें ठरलें.

## धर्माचीं पुनर्घटित मूलतत्त्वें.

१ परमेश्वरानें हें सर्व ब्रह्मांड निर्माण केलें. तोच एक खरा देव. तो नित्य, ज्ञानस्वरूप, अनंत, कल्याणनिधान, आनंदमय, निरवयव, निराकार, एकच, अद्वितीय, सर्वांचा नियंता, सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वशक्ति, कृपानिधि, परमपवित्र, व पतितपावन असा आहे.

२ केवळ त्याच्याच उपासनेच्यायोगें इहलोकीं व परलोकीं शुभ प्राप्त होतें.

३ त्याच्या ठायीं पूज्यत्वबुद्धि व अनन्यभाव हीं ठेवून तत्पूर्वक त्याचें मानसिक भजनपूजन करणें व त्यास प्रिय अशीं कृत्यें करणें हीच त्याची खरी उपासना.

४ प्रतिमा व इतर सृष्ट पदार्थ यांची पूजाअर्चा किंवा आराधना करणें हा ईश्वरोपासनेचा खरा प्रकार नव्हे.

५ परमेश्वर सावयवरूपानें अवतार घेत नाहीं आणि कोणताही एक ग्रंथ साक्षात् ईश्वरप्रणीत नाहीं.

६ सर्व मनुष्यें एका परमेश्वराचीं लेकरें आहेत, म्हणून भेद न राखितां परस्परांशीं बंधुभावानें वागावें हें ईश्वरास प्रिय आहे आणि हें मनुष्याचें कर्तव्य आहे.

## उद्देश.

१ ज्या धर्माचीं मूलतत्त्वें वर लिहिलीं आहेत त्या धर्माची प्रवृत्ति होऊन प्रपंचांतील सर्व कृत्यें त्यास अनुसरून घडावीं हा ह्या समाजाचा उद्देश आहे.

## प्रतिज्ञा.

वर लिहिलेल्या धर्माच्या मूलतत्त्वांवर माझी पूर्ण श्रद्धा आहे, आणि त्यांस अनुसरून आचरण करणें हें माझें कर्तव्य आहे, असें मी समजतों, अशी परमेश्वराला स्मरून मी प्रतिज्ञा करितों.

ह्या प्रतिज्ञेमध्यें १९२० सालीं “मी एकेश्वरी विधीनुसार सर्व गृह्य व इतर संस्कार करण्यास तयार आहें व त्या वेळीं कोणत्याही प्रकारें प्रतिमापूजन करणार नाहीं” असें एक वाक्य घालण्याचें ठरल्यामुळें त्यानंतरच्या सर्व सभासदांस जी प्रतिज्ञा करावी लागते ती पुढें दिली आहे:—

## हल्लींची प्रतिज्ञा.

“वरील धर्मतत्त्वांवर माझी पूर्ण श्रद्धा आहे, आणि त्यांस अनुसरून आचरण करणें हें माझें कर्तव्य आहे असें मी समजतों. तसेंच मी एकेश्वरी विधीनुसार सर्व गृह्य व इतर संस्कार करण्यास तयार आहें व त्या वेळीं कोणत्याही प्रकारें प्रतिमापूजन करणार नाहीं अशी मी परमेश्वरास स्मरून प्रतिज्ञा करितों.”

पूर्वीचीं तत्त्वें व हीं तत्त्वें दृष्टीसमोर ठेविलीं तर त्यांत अनेक बाबतींत फेरफार केल्याचें दृष्टोत्पत्तीस येईल. “पूर्वीच्या तत्त्वांत परमेश्वरविषयक सिद्धांत

विशेष सविस्तर रीतीनें मांडलेला नव्हता; परंतु समाज स्थापन करणारांची जरी समजूत झालेली असली, व त्यांचे विचार जरी ठरलेले असले तरी भावी प्रजेच्या हितासाठीं समाजाची परमेश्वरसंबंधाची समजूत सूत्ररूपानें ठरलेलीच असणें जरूर होतें. म्हणून सर्व देशींच्या उदार धर्मास शोभण्यासारखाच*" प्रथम सिद्धांत सूत्ररूपानें मांडला आहे. दुसरें असें कीं, आदि ब्राह्मसमाजाचीं मूलतत्त्वें † व माधवराव रानडे ह्यांचा ३९ कलमात्मक निबंध हीं पुढें ठेविलीं तर वरील साहा तत्त्वांची मांडणी करितांना ह्या दोहोंचा पुष्कळ उपयोग झाल्याचें दिसून येतें. आदिसमाजाच्या तत्त्वांतून कांहीं शब्द व शब्दसमुच्चय जसेच्या तसेच येथें उचलून घेतले आहेत. त्याचप्रमाणें ३९ कलमांतील स्पष्टीकरण व पुढें प्रसिद्ध झालेले भांडारकरांचे विचार हीं सूत्ररूपानें अत्युत्तम रीतीनें तत्त्वांमध्यें ग्रथित करण्यांत आलीं आहेत. हें कार्य डा. भांडारकरांनीं किती कुशलतेनें केलें आहे हें ह्या धर्मतत्त्वांच्या द्वारें अनेक वादग्रस्त विषयांचा निश्चयात्मक रीतीनें ह्या सूत्रांत जो निकाल लावलेला आहे त्यावरून लक्ष्यांत येतें. वर म्हटलेंच आहे कीं पूर्वीच्या तत्त्वांत बराच फेरफार केलेला आहे; आणि हा फेरफार विशेषतः प्रतिमापूजनासंबंधाच्या दृष्टींत असल्याचें एकदम लक्ष्यांत येतें. पूर्वी, "मूर्तिपूजा हा असन्मार्ग असून देवास अपमानकारक आणि मनुष्यास नीचत्वास आणणारा व दुराचरणाप्रत नेणारा आहे" असें होतें. त्याच्या ऐवजीं आतां " प्रतिमा व इतर सृष्ट पदार्थ यांची पूजा अर्चा किंवा आराधना करणें हा ईश्वरोपासनेचा खरा प्रकार नव्हे " असें आहे. पूर्वींचे तत्त्वांची मांडणी करितांना ख्रिस्ती व महमदी धर्मांतील विचारांचा मनावरील पगडा ह्या एका बाबतींत सुव्यक्त होतो व नंतरच्या तत्त्वांत उपनिषदांतर्गत व भगवद्गीता व संतांचा अनुभव यांच्या विचारांचें वर्चस्व दिसून येतें. माधवराव रानडे काय किंवा प्रो. भांडारकर काय ह्यांच्या विचारांतील प्रतिमापूजनाच्या योगें होणाऱ्या हानीविषयींच्या उद्गारांतील तिखटपणा केव्हांही कमी झाला नाहीं, हें माधवरावांच्या ३९ सिद्धा-

---

* डा. भांडारकरांच्या धर्मपरलेख व व्याख्यानांस जोडलेला चरित्रात्मक लेख.

† The root principles were taken from the Brahma Samaj of Bengal with some modifications.

*Dr. R. G. Bhandarkar, in* शाश्वत धर्म *(1916).*

न्तांतील २६ वा सिद्धान्त व डा. भांडारकरांच्या धर्मपर व्याख्यानांतील अनेक प्रसंगींचे उद्गार पहातां दिसून येतें. * असें असतां हा सौम्यपणा येथें कां आला याचें थोडेसें स्पष्टीकरण येथें नमूद करणें जरूर आहे. पण, तें आम्ही आमच्या शब्दांत न देतां तत्त्वांचें पुनर्घटन ज्यांच्या विशेष श्रमांचें व आस्थेचें फळ आहे त्या गुरुवर्य डा. भांडारकरांच्याच शब्दांत देतों:—

" प्रतिमापूजन हें पाप आहे असें नाहीं. तो ईश्वरोपासनेचा खरा मार्ग नव्हे. म्हणून खरा जो मार्ग नव्हे त्याचें अवलंबन लौकिकासाठीं करणें हा प्रकार अत्यंत लघुता आणणारा आहे. पाप आहे असें मला वाटत नाहीं. मात्र, **मूर्तिपूजेवर श्रद्धा नसून श्रद्धा आहे असें भासविलें तर तें पाप होईल.**" "ईश्वर आम्हांस पूज्य असें मत असतांही मारुती, गणपति, वेताळ, जोखाई जाखाई इत्यादिकांस जो भजतो आणि त्यांस बळी देतो आणि प्रतिमापूजन हा ईश्वरोपासनेचा खरा मार्ग नव्हे असें मत असून वर निर्दिष्ट केलेल्या देवतांच्या देवळांत जाऊन त्यांना नमस्कार करून त्यांची पूजाअर्चा करितो तो मनुष्य समाजाचा सभासद नव्हे."

## निर्गुणोपासना व सगुणोपासना.

अशा प्रकारचीं हीं जीं पुनर्घटित धर्मतत्त्वें त्यांच्या संबंधानेंही लोकांचे नाना-प्रकारचे आक्षेप येत असतात. त्यांस उत्तर देण्याचें हें स्थल नव्हे. परंतु ह्या

* येथें एकच उतारा दिला आहे:—

" ज्या एकदेशीय दृष्टीचा अतिशय होऊन....बिघड झाला तिचा प्रतिकार नानक, चैतन्य, तुकाराम बोवा इत्यादि भक्तिमार्गांतील साधुसंतांनीं केला. परंतु त्यांतही हळु हळु खराबी होत गेली व आपणाप्रमाणें देवास शय्या, खाणें पिणें, पानसुपारी वगैरे पाहिजेत अशा त्याला साधारण मनुष्यांची बरोबरी म्हणजे नीचत्व आणणाऱ्या कल्पनांचा लोकांत प्रवेश होऊन त्यांच्या पाठीमागून त्याला पिकदाणी हवी, व त्याच्या मूर्तीला कोणी पाखंड्यानें भग्न केली, तर त्याला बरा करण्याकरितां काढे दिले पाहिजेत व औषधोपचार करणें आवश्यक आहे एथवर घाण झाली." पृ. २६३.

या विषयासंबंधानें 'देवांची व प्रतिमांची पूजाअर्चा,' 'प्रार्थनासमाज व ब्राह्मधर्म,' 'भावाचा दुर्विकास' वगैरे डा. भांडारकरांच्या व्याख्यानांतील प्रकरणें वाचण्याची शिफारस आहे.

पुनर्घटित तत्त्वांचें जें एक मुख्य ध्येय आहे तें हें कीं, शोधित भक्तिमार्गाची गोडी जनांस लावून त्याचा प्रसार करावयाचा. असें असतां, व परमेश्वराच्या वर्णनात्मक पहिला सिद्धान्त दृष्टीपुढें असतांना ज्या नेटिव्ह ओपिनीअन पत्रामध्यें १८६७ सालीं प्रतिमापूजनाविरुद्ध सुंदर संपादकीय लेख आला होता त्याच पत्रानें ३३ वर्षांनंतर प्रार्थनासमाजाला निर्गुणोपासक ठरविलें! खरें पहातां जो कोणी प्रार्थनासमाजाचा पहिला धर्मसिद्धान्त पाहील त्यास प्रार्थनासमाज निर्गुणोपासक असणें शक्य नाहीं हें निराळें सांगावयास नको. परंतु तो जर निर्गुणोपासक नाहीं तर अर्थात सगुणोपासक आहे हें उघड आहे, आणि सगुणोपासनेंत प्रतिमापूजनाचाही अन्तर्भाव होतो. म्हणून ज्यांच्या श्रमानें पहिलें सूत्र सिद्ध झालें त्यांसच नव्यानें वरील आक्षेप येतांच प्रार्थनासमाजास मान्य असणारी जो सगुणोपासना तिच्या संबंधानें खुलासा करण्याची विनंति आम्हीं केली. तेव्हां २५ वर्षांपूर्वी डा. भांडारकरांनीं पुढीलप्रमाणें खुलासा केलाः—

"प्रार्थनासमाज निर्गुणाची म्हणजे भगवद्गीतेंत १२ व्या अध्यायाचे आरंभीं सांगितलेल्या अक्षर, अनिर्देश्य, अव्यक्त, अचिंत्य, कूटस्थ, अचल, ध्रुव अशा तत्त्वाची उपासना करीत नाहीं; सगुणाची म्हणजे विश्वकर्ता, विश्वव्यापक, सर्वांतर्यामी, हृदयनिवासी, विश्वयोजक, आनन्दस्वरूप, सत्यसंकल्प, प्रेमस्वरूप व शाश्वतधर्मप्रतिष्ठा, अशा परमात्म्याची उपासना समाज करितो; परंतु ह्या प्रकारच्या गुणांनीं विशिष्ट जरी परमेश्वर आहे, तथापि मनुष्यासारखा देह धारण करून, स्त्रीशीं विवाह करून, आम्हां मनुष्यांप्रमाणें तो प्रपंच करीत नाहीं, किंवा पशुपाषाणाचें स्वरूप धारण करीत नाहीं. येथपर्यंत परमेश्वराची सगुणता प्रार्थनासमाज नेत नाहीं. उपनिषदांत सांगितल्याप्रमाणें तो आदिपुरुष हातापायांशिवाय हातापायांची ग्रहणरूप क्रिया करितो. डोळे नसून तो पहातो, कान नसून तो ऐकतो असें समाज मानितो. समाज प्रतिमांचें पूजन करीत नाहीं. कारण, तेणेंकरून परमात्म्याच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान होत नाहीं, तें स्वरूप अंतःकरणापुढें रहात नाहीं. ह्यास्तव, किंवा मनुष्य आणि इतर प्राण्यांचें रूप धरून देव प्रपंच करीत नाहीं असें मानिल्यामुळें समाज निर्गुणाची उपासना करितो असें म्हणणें सर्वथा अयथार्थ आहे. **सगुणाचीच उपासना समाज करितो.** परंतु भौतिकरूप हा देवाचा गुण नाहीं. देव केवळ चैतन्यरूप आहे असें समाज मानितो. आतां देवाची उपासना म्हणजे मंत्रतंत्राचा प्रयोग करणें, किंवा नुसतें देवाच्वें हठयोग्यासारखें ध्यान करीत बसणेंही नव्हे. देवाच्या

ठायीं पूज्यबुद्धि व परमप्रेम ठेवणें म्हणजे त्याची भक्ति करणें, भक्तीनें त्याचें भजन पूजन करणें, सत्यास व धर्मासच अनुसरून आपली वृत्ति आणि आचरण ठेवून त्याचें सत्यस्वरूप व धर्मस्वरूप आपल्या अंतःकरणांत विकसित करणें; यावत् मनुष्य आणि इतर प्राणी यांजविषयीं प्रेम आपल्या हृदयांत स्थिर करून आणि त्यास अनुसरून त्यांचें कल्याण करण्याविषयीं झटून देवाचें प्रेमस्वरूप आपल्या अंतःकरणांत विकसित करणें, त्याची इच्छा सर्व गोष्टींमध्यें प्रमाण धरून, आपली एकीकडे सोडून देऊन, स्वात्मा त्याजला अर्पण करणें, ही त्याची उपासना. ह्यावरून पाहिलें असतां उपनिषद भगवद्गीतेमध्यें उपदिष्ट आणि तुकारामबुवासारख्या साधूंनीं अवलंबित जो भक्तिमार्ग त्याचाच स्वीकार प्रार्थनासमाजानें केला आहे असें आढळून येईल. मात्र कांहीं अंशीं तो शोधित भक्तिमार्ग आहे.'"

## पुढील कार्य.

समाजाच्या मूलतत्त्वांच्या पुनर्घटनेचें कार्य चालू असतांना व्यवस्थापक मंडळीनें असें ठरविलें कीं, समाजधर्माचें वळण लागावें, धर्माचा प्रवेश कुटुंबांमध्यें व्हावा व बंगाल्यांत ह्या बाबतींत कसे प्रयत्न होत आहेत ते आपल्यायेथील मंडळीस कळावे म्हणून केशवचंद्र सेन किंवा त्यांना येणें शक्य नसल्यास बाबू प्रतापचंद्र मुझुमदार ह्यांस येथें बोलवावें. ब्रम्हानंद केशवचंद्र सेन पूर्वीं दोन वेळां मुंबईस येऊन गेले होते. त्यांची कीर्ति सर्व हिंदुस्थानभर पसरली होती. केशवचंद्र सेन हे प्रथम जेव्हां मुंबईस आले त्या वेळीं त्यांस मुंबईसंबंधानें आलेल्या अनुभवाचें वर्णन पृ. ३२-३३ मध्यें आलें आहेच. त्यानंतर १८६८ मध्यें ते जेव्हां आले तेव्हां त्यांस निराळा अनुभव आला. त्या वेळीं लोक थोडे शहाणे झाले होते. पैशाचा धूर नाहींसा झाल्यामुळें लोकांची दृष्टि निवळली होती. केशवचंद्रांचा ह्या वेळचा अनुभव संतोषकारक असल्याचें त्यांनींच जाहीर केलें. Faith, Prayer व Religious Reformation ह्या विषयांवरील त्यांचीं धर्मपर व्याख्यानें त्याच वेळीं झालीं व त्यांचा लोकांच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला. हीं व्याख्यानें रा. रा. वासुदेवराव नवरंगे ह्यांनीं स्वतंत्र रीतीनें छापविलीं होतीं. त्यांच्या भेटीचा असा इष्ट परिणाम झालेला अनुभविल्यामुळें ते येथें येऊन कांहीं काळ आपल्या मंडळींत राहिल्यास पुष्कळ फायदा होईल असें वाटून केशवचंद्रांनींच होतां होईल तों यावें अशी मंडळींची इच्छा होती. परंतु सर्व बंगाल्यांतील समाजांचें कार्य त्यावेळीं त्यांच्या शिरावर असल्यामुळें केशवचंद्रांनीं बाबू प्रतापचंद्र मुझुमदार ह्यांस येथें पाठविलें. १९१२ सालीं

रा. रा. विठ्ठल रामजी शिंदे ह्यांनीं प्रसिद्ध केलेल्या थिईस्टिक डायरेक्टरी नामक पुस्तकांत प्रतापचंद्राच्या कार्याविषयीं म्हटलें आहे:—

"...It must be distinctly and thankfully acknowledged.......that no Bengali gentleman either lay or a missionary has shed as much direct and personal influence over this Samaj in the most formative period of its life and as effectively conveyed the message of Brahmoism, both in its practical and devotional aspects to this Western Presidency, as the late revered Babu Pratap Chandra Muzumdar. ( p. 135 )

बाबू मजकूर येथें आले तेव्हां सहामहिने त्यांचा येथें मुक्काम होता. त्या वेळीं त्यांनीं मुंबईत पुष्कळच काम केल्याचा उल्लेख सांपडतो. दर शनिवारीं त्यांचें इंग्रजींत व्याख्यान होत असे. दर रविवारीं ते हिंदीमध्यें उपासना चालवीत. त्याचप्रमाणें ह्या साहा महिन्यांत त्यांनीं फ्रामजी कावजी इन्स्टिट्यूटमध्यें दोन व टाऊन हालमध्यें एक अशीं तीन व्याख्यानें दिलीं. तरुणांच्या लाभासाठीं ते धर्मशिक्षणाचा एक वर्ग आपल्या रहात्या घरीं ( खेतवाडी काळा बंगला ) चालवीत असत. त्याचप्रमाणें आठवड्यांतून एकदां समाजांतील व इतर स्त्रियांस एकत्र करून त्यांस शास्त्रीय व इतर विषयांवर हिंदींत व्याख्यानें देत असत. ह्या अवधींत ते दोन वेळां पुण्यास गेले व तेथें त्यांनीं उपासना चालवून व्याख्यानें वगैरे दिलीं, त्याचप्रमाणें बडोदें व अहमदाबाद येथेंही ते गेले होते व तेथें त्यांचीं व्याख्यानें वगैरे झालीं. त्यांनीं ह्या साहा महिन्यांत जें काम केलें त्याचा उल्लेख करितांना १८७२ सालच्या रिपोर्टांत म्हटलें आहे:—

"येथें आल्यानंतर बाबू प्रतापचंद्र येथें ६ महिने राहिले. तेवढया अवधींत त्यांनीं जाहीर व्याख्यानें दिलीं व पुष्कळ धर्मपर व्याख्यानेंही दिलीं. शिवाय निरनिराळ्या सभासदांस भेटून त्यांस सल्ला मसलत देणें, त्यांच्या अडचणी समजून घेऊन त्यांस उत्तेजन देणें हा क्रम चालूच होता. ते आल्यापासून आमच्या सार्वजनिक उपासना चालविण्याच्या पद्धतींत पुष्कळ सुधारणा झाली आहे. आमच्या मध्यें धर्म व धर्मकार्य ह्यांविषयीं जी अनास्था आहे ती दूर होऊन, देवाच्या सान्निध्या संबंधानें प्रार्थना व उपासना ह्यांविषयीं सभासद व कुटुंबें ह्यांत

अधिक आस्था उत्पन्न व्हावी ह्याच हेतूनें ते कार्य करीत होते. त्यांच्या साहा महिन्यांच्या वास्तव्यानें किती फायदा झाला आहे हें आज एकदम सांगतां जरी आलें नाहीं तरी त्यांच्या सहवासानें बहुत लाभ झाला आहे यांत कांहीं संशय नाहीं." प्रतापबाबूंना येथें मुद्दाम बोलावून आणून त्यांस समाजानें साहा महिने ठेवून घेतलें यावरून धार्मिक जीवनाची वाढ व्हावी ह्या संबंधानें मंडळींत तळमळ उत्पन्न झाली होती हें उघड होतें. त्यांच्या दृष्टीनें मुंबईची मंडळी बरीच मागें होती आणि कित्येक बाबतींत ती मागें होती यांत कांहीं संशय नाहीं. प्रतापचंद्रांच्या व्याख्यानांत ख्रिस्ती धर्म व ख्रिस्त ह्यांचा वारंवार उल्लेख होत असे. त्यामुळें त्यांच्या व्याख्यानांकडे ख्रिस्ती लोकांचेंही लक्ष्य लागलें. परंतु ते ख्रिस्त व ख्रिस्ती धर्म ह्यांचे संबंधानें अपुरा उपदेश करितात असें त्यांस वाटत असे. आणि कोणाही प्रसिद्ध उपदेशकानें केवळ वेद, उपनिषदें, गीता, संतांचे उद्गार ह्यांच्या आधारें आपल्या उपदेशाचें काम केलें कीं, ह्यांचे उपदेश एकतर्फी असतात असें तुणतुणें ख्रिस्ती लोकांचें * सुरू होई. ख्रिस्ती लोकांचें त्यांच्याकडे विशेष लक्ष असल्यामुळें एका ख्रिस्ती गृहस्थांनीं बाबू प्रतापचंद्र यांची मुलाखत घेतली. ह्या मुलाखतींत त्यांचीं कांहीं प्रश्नोत्तरें झालीं तीं त्या वेळीं प्रसिद्ध झालीं होतीं. त्यांवरून बाबू मजकुरांच्या दृष्टीनें आमच्या येथें त्या वेळीं खरा प्रकार काय असावा त्याची कल्पना होते. 'तुम्ही येथें साहा महिने येऊन राहिलांत, प्रार्थनासमाजाच्या मंडळींत काम केलेंत, तेव्हां त्या मानानें तुम्हाला कितपत यशप्राप्ति झाली' अशा अर्थाचा ख्रिस्ती गृहस्थाचा पहिला प्रश्न होता. त्यास उत्तर देतांना बाबू मजकूर म्हणाले, "यश म्हटलें तर खरोखर फार थोडें प्राप्त झालें असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. माझ्या कामाला ताबडतोब यश येईल अशी मीं अपेक्षाच केली नव्हती. येथें येण्याचा माझा मुख्य उद्देश असा होता कीं,

---

* न्या. मू. रानडे बायबलाच्या आधारें आपले धर्मोपदेश करीत नाहींत म्हणून त्यांच्यावर ज्ञानोदय रागावतो! उलटपक्षीं, कांहीं वर्षांपूर्वी, त्यांनीं बायबलांतील वचनांच्या आधारें उपदेश केले म्हणून जणू काय आपल्या धर्मग्रंथांत यांना आधार घ्यावयास कांहीं सांपडतच नाहीं, असें म्हणून पुण्याच्या मराठा पत्रानें त्यांची खूप निंदा केली! म्हणजे ज्ञानोदय काय किंवा मराठा काय ह्या दोघांच्याही ह्या नव्या भागवतधर्माचें मुख्य धोरण लक्षांत आलेलें नाहीं!

—सर नारायण चंदावरकर.

येथील मंडळीमध्यें ब्राह्मधर्मासंबंधानें उत्साह उत्पन्न करावा. तुमच्या महाराष्ट्रांतील लोक आम्हा बंगाली लोकांसारखे नाहींत. मराठे सहसा जागेवरून हलावयाचे नाहींत, ( म्हणजे त्यांचेवर तात्काळ एखाद्या गोष्टीचा परिणाम होत नाहीं ) परंतु एकदां त्यांनीं कोणतीही गोष्ट मनावर घेतली कीं मग त्यांचा उत्साह दांडगा असतो." महाराष्ट्रीय मंडळीला व त्यांतून प्रार्थनासमाजांतल्या लोकांना हें असें सर्टिफिकेट मिळाल्यावर ख्रिस्ती गृहस्थाचा दुसरा प्रश्न पुढें आलाच! "कोणकोणत्या गोष्टींबद्दल त्यांनीं विशेष आस्था दाखवावी असें तुम्हांला वाटतें?" हा प्रश्न ऐकतांच बाबूंनीं त्यांना एका वाक्यांत उत्तर दिलें कीं, "त्यांनीं प्रतिमापूजनाचा अजीबात त्याग करावा व जातिबंधनें मानूं नयेत अशी माझी इच्छा आहे व त्याच दिशेनें माझा प्रयत्न आहे." पण एवढयानें ह्या ख्रिस्ती मित्राची तृप्ति कोठली व्हायला? त्यानें लागलेच तीनचार अगदीं महत्त्वाचे प्रश्न प्रतापचंद्रांपुढें ठेविले. त्यांचा मुख्य हेतु हा होता कीं, ही संस्था निघाली आहे, पण, तिला यश खरोखर कितपत येत आहे, अगर पुढें मागें येण्याचा संभव आहे, हें दोन्ही प्रांतांची माहिती असणाऱ्या ख्रिस्तोन्मुख गृहस्थाच्या तोंडूनच वदवावें. कारण 'खऱ्या मार्गा' पासून ही मंडळी किती लांब आहेत, अगर 'खऱ्या मार्गा'च्या किती जवळ येत आहेत हें त्यांस पहावयाचें होतें. ह्या दृष्टीनेंच त्यांचे पुढील प्रश्न असावेतः—

( १ ) तुम्ही म्हणतां ह्या मुंबईच्या मंडळींनीं प्रतिमापूजन व जातिभेद यांचा त्याग करावा अशी तुमची मोठी इच्छा आहे, पण तुमच्या अनुयायांपैकीं कोणीं तसें केलें आहे काय?

( २ ) ते यज्ञोपवीत धारण करितात कीं नाहीं?

( ३ ) गेल्या आठवड्यांतच गणपति येऊन गेले, त्यांनीं गणपतीची पूजा केली कीं नाहीं?

( ४ ) ते उघडपणें तुमच्याशीं अन्नव्यवहार ठेवितील काय?

प्रतापचंद्र मुझुमदार हे देखील धर्मप्रचारकच होते, त्यांना अशा प्रकारचे प्रश्न ऐकण्याची संवयच असावी. प्रत्येक प्रश्नाला लांबलचक उत्तर देण्याच्या भरीस न पडतां सर्व प्रश्नांस त्यांनीं पुढीलप्रमाणें उत्तर दिलें:—

"मुंबईच्या सभासदांपैकीं एका* ही सभासदानें यज्ञोपविताचा त्याग केला आहे, किंवा जात सोडिली आहे असें मला वाटत नाहीं. येथील कांहीं

* हें प्रतापचंद्रांचें उत्तर त्या वेळच्या वस्तुस्थितीस धरून नाहीं. रा. रा. वासुदेव बाबाजी नवरंगे ह्यांचा विवाहही ब्राह्मधर्मानुसारें १८७० सालीं झाला.

सभासदांच्या घरीं नुकतेच गणपतिही आले व त्यांच्या यथासांग पूजा झाल्या. त्या वेळीं त्यांनीं असें सांगितलें कीं घरांतल्या म्हाताऱ्या माणसांचीं मनें दुखविलीं जाऊं नयेत म्हणून आम्हांस तसें करावें लागलें. कांहीं जणांनीं वृद्ध माणसांनींच गणपति आणावेत व त्यांनींच त्यांची पूजा अर्चा करावी, अशी व्यवस्था केली होती. त्यांनीं स्वतः कोणत्याही विधींत कांहींही भाग घेतला नाहीं. सर्वांनीं एकदम हे जुने प्रचार सोडून द्यावेत असें कांहीं मी म्हणत नाहीं. त्यांच्यांत एकदम क्रांति घडवून आणण्यासाठीं कांहीं मी येथें आलेलों नाहीं. मी त्यांस माहिती देण्यासाठीं, मार्ग दाखविण्यासाठीं, ब्राह्मसमाजाच्या ध्येयाची योग्य कल्पना करून देण्यासाठीं येथें आलेलों आहें. आतां जातीसंबंधानें म्हणाल तर सभासदांपैकीं उघडपणें माझ्याशीं व्यवहार करणारे मला वाटतें एकच * गृहस्थ आहेत." प्रतापबाबूंचें हें उत्तर ऐकून त्यांच्या पृच्छकांनीं आपला मोर्चा बंगालकडे फिरविला. "इकडची ही अशी स्थिति तर तुमच्या बंगाल्यांत सुशिक्षित लोक विचारांप्रमाणें आचार करण्याच्या बाबतींत कांहीं पुढें गेले आहेत काय ?" असा प्रश्न त्यांनीं त्यांचेवर सोडला! "प्रत्येकाकडून बोलल्याप्रमाणें आचार झालाच पाहिजे अशी अपेक्षा आम्ही बंगाल्यांतही † करीत नाहीं." असें त्यांस उत्तर प्रताप बाबूंनीं देऊन टाकलें. पुरवणीदाखल त्यांनीं आणखी असेंही सांगितलें कीं, "आमच्या प्रांतांत विधवाविवाहाची चळवळ बहुतेक बंदच पडली आहे. त्याचें कारण असें आहे कीं, विधवाविवाह झाला कीं, उभयपक्षांच्या मंडळीचा जुन्या

---

त्या वेळीं ज्या पद्धतीनुसार विवाह झाला ती पद्धति कलकत्त्याहूनच आणविली होती. हा विधि आद्य आचार्य भिकोबादादा यांनीं चालविला. त्याची हकीकत योग्य ठिकाणीं पुढें येईलच. ह्या विवाहाची हकीकत बंगालच्या पत्रांत प्रसिद्ध झाली होती. रा. रा. वासुदेवरावांनीं यज्ञोपविताचा त्याग केलेला होता व ते जातिभेद मुळींच मानीत नव्हते. कदाचित ते ब्राह्मसमाजाचे सभासद होते व म्हणूनच त्यांनीं ह्या गोष्टी केल्या अशी कल्पना रचून येथील एकाही सभासदानें यज्ञोपविताचा त्याग केला नाहीं, किंवा प्रतिमापूजन असणारे विधि सोडले नाहींत अगर जातिभेद मोडला नाहीं, असे उद्गार प्रतापचंद्रांनीं काढले असल्यास नकळे

* हे बहुतकरून डा. आत्माराम पांडुरंग अगर रा. वासुदेवराव नवरंगे असावेत.

† We do not much insist on practise even in Bengal.

समाजाशीं असलेला सर्व संबंध अगदीं तुटतो व त्यांना अगदीं एकएकटें रहावें लागतें. * मात्र ब्राह्मसमाजांतील लोक शक्य तितक्या रीतीनें प्रतिमापूजन टाळ-ण्याचा प्रयत्न करितात. † ”

## जागृति.

अशा प्रकारें बाबू प्रतापचंद्र कार्य करून स्वदेशीं परत गेल्यावर समाजाचे सभासद थोडी अधिक जागृति दाखवूं लागले. आपल्यामध्यें वैगुण्यें आहेत तीं दूर करण्यास आपल्यास साहाय्य व्हावें ह्या दृष्टीनें बाबू मजकुरांस बोलाविलें. त्यांनीं मंडळींतील कोणकोणतीं वैगुण्यें दाखविलीं हें त्यांनीं अखेरीस दिलेल्या दाखल्यावरून दिसून येतच आहे. ह्यापेक्षां अधिक महत्त्वाच्या बाबींकडे त्यांनीं लक्ष्य दिलें होतें. जात सोडणें, यज्ञोपवीताचा त्याग करणें, अगर उघडपणें सर्वांशीं अन्नव्यवहार करणें ह्या हेतूनें कांहीं प्रार्थनासमाज स्थापन झाला नाहीं. प्रतिमापूजनाचा त्याग करून एका अद्वितीय, अपाणि, अपाद, अचक्षु परमेश्वराची उपासना करणें व संसारांतील सर्व कार्यें समाजानें जीं धर्मतत्त्वें मान्य केलीं त्या तत्त्वांनुसारें करणें हें प्रत्येक सभासदाचें कर्तव्य होय. परंतु हीं संसारांतील कर्तव्यें कुटुंबाकुटुंबांतील एकएकटा पुरुष प्रार्थनासमाजाचा सभासद झाल्यानें समाजाच्या ध्येयानुसार कशीं होणार ? अर्थात कुटुंबांतील एकेक पुरुषच समाजाचा सभासद झाल्यामुळें प्रत्येक गृहकार्याच्या वेळीं जुनें व नवें ह्यांतील लढा उत्पन्न झाल्यावर ह्या एकट्या मनुष्यास सर्वांच्या मतानुसार वागावें लागत असे. हा विपरीतपणा जर घालवावयाचा तर कुटुंबांतील एका पुरुषाचें जें ध्येय तें त्या कुटुंबांतील सर्व व्यक्तींचें झालें पाहिजे, हें उघड आहे. रविवारच्या साप्ताहिक उपासनेच्या वेळीं पूर्वीं स्त्रिया येत नसत. एवढेंच नव्हे, तर प्रथम मुलींनीं गाणीं म्हटलीं म्हणून समाजावर पुष्कळशी विरुद्ध टीका झाली म्हणून म्हणा, त्या वेळींही कोणी स्त्रियांस उपासनेस आणण्याची सुरवात केली नाहीं म्हणून म्हणा, रविवारचा समाज हा पुरुषांचा व फारतर पुढें शनिवारीं भरू-

---

* Remarriages of widows have virtually ceased, for a re-marriage brings about the entire isolation of parties concerned from the orthrodox society.

† Our people try as much as lies in their power to abstain from idolatrous practices.

लागलेला आर्यमहिला समाज स्त्रियांसाठीं असा समज पुष्कळ वर्षें होता. ही अडचण कशी दूर व्हावी ह्याविषयींची चर्चा मंडळीमध्यें सुरू झाली. प्रत्येक वेळीं आपल्या पुढें असलेल्या अडचणींचें भेसूर चित्र उभें राहीच. येथें, बंगालच्या स्थितींत व महाराष्ट्रातल्या स्थितींत जो मूलतः एक मोठा भेद होता त्याकडे लक्ष्य दिलें पाहिजे. प्रतापचद्रांनीं त्या ख्रिस्ती गृहस्थाला असें सांगितलें कीं, ब्राह्म समाजांतील लोक शक्य तितक्या रीतीनें प्रतिमापूजनाचा त्याग करण्याचा प्रयत्न करितात. हें त्यांच्या हातून व्हावें व आमच्या हातून न व्हावें याचें कारण काय ? तेथें ब्राह्मधर्माचा स्वीकार करणाऱ्या मनुष्यास आपल्या जुन्या समाईक कुटुंबांत थारा मिळत नसे. बाप जुन्या मतांचा असून मुलानें ब्राह्म धर्माचा स्वीकार केला तर त्यास आपल्या जुन्या विचारांच्या कुटुंबांत रहातांच येत नसे. त्यास निराळा संसार करणें अगर एकटा असल्यास निराळें राहाणें भाग पडे. अर्थात त्यामुळें सर्व विधि ब्राह्म धर्मानुसार व्हावयास फारसा त्रास होत नसे. वरील परिस्थितींत नित्य सहवासानें पतीच्या विचारानुसार पत्नीचे विचार होणें हें कांहीं बिकट कार्य नसतें. सर्व आप्त स्वकीयांनीं सोडून दिलेलें असतांना, पतीचे जे विचार व जीं ध्येयें त्यांकडे पत्नीचें लक्ष जाणें हें साहजिक होतें. पण, आदि ब्राह्मसमाजांत तशी स्थिति नव्हती. त्यामुळें त्या समाजांत इकडल्या प्रमाणेंच अनुभव येत होता. असो. ह्या सर्व अडचणी आमच्या पुढाऱ्यांच्या पुढें होत्या. म्हणून प्रथम कुटुंबांमध्यें प्रार्थनासमाजांतील उपसनांप्रमाणें उपासना सुरू करण्यासंबंधानें चर्चा सुरू झाली, व ह्यासाठीं ता. २० जुलै १८७३ रोजीं डा. माणकजीच्या वाडींत समाजाच्या सभासदांची साधारण सभा भरली होती. त्या वेळीं डा. आत्माराम पांडुरंग, मामा परमानंद, प्रो. रामकृष्णपंत भांडारकर, रा. रा. वासुदेवराव नवरंगे; बाळकृष्ण मोरोबा; रामभाऊ माडगांवकर; दीनानाथ माडगांवकर; मुरलीधर घोडी; खेडकर, पंगे; चिंतामणराव भट; बाळकृष्णपंत भाटोडीकर; गणपतराव तिवरेकर, भास्कर हरि भागवत इ० मंडळी हजर होती. त्या वेळीं "सर्व सभासदांनीं घरांतील मनुष्यें येतील तर त्यांस बरोबर घेऊन ईश्वरोपासना करण्याचा प्रघात घालावा हें आवश्यक आहे" या विषयावर प्रो. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांचें भाषण झालें. हें भाषण झाल्यानंतर अशा उपासनांची आवश्यकता सर्वांस पटली व "ह्याप्रमाणें आजपासून आपण करीत जाऊं" असें सभेस आलेल्या सर्व सभासदांनीं कबूल केलें आणि सर्वांच्या विचारानें असें ठरलें कीं, "दर महिन्याच्या शेवटच्या रविवारीं ह्या गोष्टीचें अगत्य सर्वांच्या मनांत जागृत

राहण्यासाठीं समाजाची सभा भरवावी व सभेस न आलेल्यांस सभेंतील हकीकत लिहून कळवावी. " हा क्रम पुढें नियमानें चालला होता किंवा कसें तें कळण्यास आज चांगलेंसें साधन नाहीं. तथापि पुढें सव्वा वर्षानें अशीच एक सभा भरली असतां घरगुती उपासनांचा क्रम कसा चालविला आहे हें सभेंत हजर असलेल्या प्रत्येक सभासदानें सांगितलें. वरील सर्व मंडळी ह्याही सभेस हजर होती. त्यांनीं त्या वेळीं जें कांहीं सांगितलें, कौटुंबिक उपासनांसंबंधानें निरनिराळ्या सभासदांस जे अनुभव आले त्यांचें टांचण ठेवलेलें नसल्यामुळें आपलें पुष्कळ नुकसान झालें आहे. साप्ताहिक उपासना, रोजच्या कौटुंबिक उपासना त्यावेळीं सुरू होत्या. तरी त्या वेळच्या सभासदांची तेवढ्यानें तृप्ति झाली नाहीं, म्हणून रा. रा. करमरकर ह्यांनीं ता. २७ माहे जून १८७४ रोजीं झालेल्या सभेंत घरीं भजन व उपासना ह्या संबंधानें भाषण करून सर्वांनुमतें असा ठराव करून घेतला की, "ह्यापुढें रविवारच्या उपासनेखेरीज दर मंगळवारीं व गुरुवारीं सकाळीं * मंदिरामध्यें प्रार्थना † व्हावी व ज्यांस सोईचें असेल त्यांनीं त्या वेळीं यावें." हा क्रम पुढें किती वर्षें चालू राहिला तें सांगतां येत नाहीं. तथापि १८७५ च्या ज्यान्युआरी महिन्यांत प्रो. रामकृष्णपंत भांडारकरांच्या अध्यक्षतेखालीं एक सभा झाली. त्या वेळीं आपणामध्यें भक्तिभाव वाढविण्याच्या आवश्यकतेवर अध्यक्षांनीं भाषण केलें. व एतद्विषयीं प्रत्येक सभासदानें आपापला क्रम कसा चालला आहे याविषयीं हकीकत कळविली. ह्या सभेमध्यें एक नवीनच प्रश्न उपस्थित झाला. तो प्रश्न असा—

प्रार्थनासमाजाचीं तत्त्वें केवळ पुरुषांनीं स्वीकारिलीं तर तें पुरेसें नाहीं हें अनुभवसिद्ध आहे. प्रार्थनासमाजास मान्य जीं धर्मतत्त्वें तीं कुटुंबांतील पुरुषांप्रमाणें स्त्रियांसही मान्य व्हावयास पाहिजेत, तरच ह्या तत्त्वांनुसार आचरण होण्याची आशा. ह्यासाठीं कौटुंबिक उपासनांच्या द्वारें स्त्रियांचें शिक्षण जरी चालू ठेविलें तरी दुसरी अडचण पुढें येतेच. त्या अडचणीचा उल्लेख प्रतापचंद्र मुझुमदारांनीं

---

* प्रार्थनामंदिर ह्या वेळीं तयार झालें होतें. त्या संबंधाची सविस्तर हकीकत पुढें दिली आहे.

† "सुमारें १५ वर्षांमागें प्रतिसप्ताहीं एकदा, कधीं दोन तीनदां या मंदिरांत प्रार्थना व उपासना करण्याचा ज्याचा प्रघात होता" हे 'तरुण मंडळीचें धर्मसंबंधानें कर्तव्य' ह्या व्याख्यानांत डा. भांडारकरांनीं काढलेले उद्गार ह्याच काळास अनुसरून असावे.

ख्रिस्ती मनुष्यास दिलेल्या उत्तरांत* झालेला आहे. स्वमतानुसार वर्तन करावयाच्या ऐनवेळीं जवळच्या अगर दूरच्या स्त्री अगर पुरुष नातेवाइकाची भीड आड येते व त्यायोगें धर्मानुष्ठानांत बिघाड होतो, म्हणून,"उपासनेचा क्रम सतत चालू रहावा व तदनुसार वर्तन व्हावें एतदर्थ सभासदांनीं एकत्र किंवा जवळ जवळ रहावें हें फार अगत्याचें आहे. असें होईल तर हल्लीं नडतात त्या पुष्कळ अडचणी दूर होऊन आपला हेतु परस्परांकडून बहुत प्रकारें † साहाय्य होणार आहे." ही सूचना केव्हांच अंमलांत आली नाहीं असें दिसतें. नाहीं म्हणावयास सुमारें पंधरा वीस वर्षांपूर्वी ही कल्पना प. वा. शेट दामोदर गोवरधनदास सुखडवाला यांनीं उचलली होती व ते समाजांतील अनेक कुटुंबें एकत्र रहाण्यासाठीं एक सोईस्कर घर विकत घ्यावयाचा विचार करीत होते. परंतु किंमत न पटल्यामुळें तो विचार रद्द झाला तो झालाच. मध्यंतरीं परस्पर साहाय्यकारी तत्त्वावर कांहीं होणें शक्य आहे किंवा कसें याचाही थोडाबहुत विचार झाला, पण तो विचार फलद्रूप होण्याची आशा प्रथमपासूनच फार थोडी होती.

अशा प्रकारें प्रार्थनासमाजाच्या तत्त्वांचें पुनर्घटन, पुनर्घटित तत्त्वें आचरणांत आणण्याविषयींचे प्रयत्न, कौटुंबिक व व्यक्तिगत आध्यात्मिक जीवनाच्या वाढीविषयीं झालेला विचारविनिमय इ० चा इतिहास आहे. ह्याविषयीं येथें अधिक चर्चा करण्याची आमची इच्छा नाहीं. तथापि एक गोष्ट येथें नमूद केली पाहिजे. १९१५ सालीं ह्या लेखकानें यंग थीईस्टस् यूनिअन संस्थेपुढें " प्रार्थनासमाजाच्या पहिल्या पिढीची तळमळ " हा विषय विचारासाठीं ठेविला होता. त्या वेळीं " सर्व सभासदांनीं घरांतील मनुष्यें येतील तर त्यांस बरोबर घेऊन ईश्वरोपासना करण्याचा प्रघात घालावा" अशा व "आजपासून आपल्या कुटुंबांतील माणसें आलीं तर त्यांस बरोबर घेऊन ईश्वरोपासना करीत जाऊं" यांतील " येतील तर " व " आलीं तर " ह्या शब्दांनीं सूचित जी परिस्थिति तिचेवर टीका झाली होती. त्यावेळीं मुख्य मुद्दा असा होता व तो आजही कमीअधिक

---

* पृष्ठें ८९–९०.

† ह्याच्या पूर्वी ६ कुटुंबें आपल्या विचारांप्रमाणें चालणारी एकत्र झालीं, तर जातिबंधन तोडावयास हरकत नाहीं व त्या सहांत आपण आहों असें दोघां सभासदांनीं जाहीर केलें. मूळ पत्र लिहिणारे मामा परमानंद होत. त्यांच्या पत्रांतील कांहीं भाग त्यांच्या चरित्रांत दिला आहे.

प्रमाणानें आहेच, कीं, पुरुष व स्त्रिया सर्व बाबतींत समान विचाराच्या आढळणें त्या वेळीं दुर्घट असे. तशांतून पुरुषाचें शिक्षण पुष्कळ झालेलें असलें व त्याचे विचारही उदार झालेले असले तरी त्याच्या पत्नीचें जर कांहीं शिक्षण झालेलें नसलें व उदारविचारांची योग्यता कळण्याची पात्रता तिच्यांत जर आलेली नसली, तर ती पात्रता आणण्याची जबाबदारी त्या पुरुषावर येते. तथापि, कार्यबाहुल्यामुळें म्हणा, काय त्या अज्ञान स्त्रीशीं डोईफोड करून कालव्यय करावयाचा अशा अहंतेमुळें म्हणा, किंवा पतीच्या विचारांचें व आचारांचें वजन सभोवतालच्या माणसांच्या विचारआचारापेक्षां कमी ठरल्यामुळें ह्मणा, स्त्रियांच्या मनोभूमीची मशागत पहिल्या पिढीकडून ज्याप्रमाणें व्हावयास पाहिजे त्याप्रमाणें झाली नाहीं. आजही कमीअधिक प्रमाणानें तोच प्रकार आहे. म्हणूनच १८७३ सालच्या सभेसंबंधानें बोलतांना असें दाखवून देण्यांत आलें होतें कीं, वरील सभेंत जे सभासद हजर होते त्यांपैकीं ९ सभासदांचा व प्रार्थनासमाजाचा संबंध त्यांच्या मृत्यूपर्यंतच होता. त्यांच्या पश्चात् त्यांच्या मुलांबाळांपैकीं कोणाचा समाजाशीं सभासद ह्या नात्यानें संबंध राहिला नाहीं. नाहीं म्हणावयास माधवराव रानड्यांनीं इतके सर्व व्यवसाय संभाळून आपल्या पत्नीचें शिक्षण व्यवस्थित रीतीनें आपल्या स्वतःच्या देखरेखीखालीं चालविल्याचें एक उदाहरण दृष्टीपुढें आहे. माधवरावांच्या पत्नीनें त्यांच्या मागें किती थोर कार्य केलें त्याची माहिती आजच्या पिढीला आहेच. पण, त्यांनींही ब्राह्मधर्माच्या अनुष्ठाना संबंधानें करारीपणा दाखविला नाहीं हें येथें नमूद करणें आमचें कर्तव्य आहे. सारांश, ह्या सर्व माहितीपासून आतांही समाजांतील तरुणांनीं बोध घेतला नाहीं, तर ब्राह्मधर्मानुष्ठानाच्या बाबतींत तेही मागेंच राहतील असा मागचा अनुभव सांगत आहे. म्हणून मागच्यांस ठेंचा लागल्यामुळें पुढिलांनीं तरी आतां सावध व्हावें.

---

## Bombay Theistic Association.
## मुंबई येथील एकेश्वर उपासक मंडळी.

मुंबईचा प्रार्थनासमाज स्थापन झाला तेव्हां पासून अगदीं स्वतंत्र आहे. बंगालमध्यें एकाचे तीन समाज झाले, खुद्द मुंबई शहरांत कांहीं वर्षें एक ब्राह्म-समाज अस्तित्वांत होता; परंतु मुंबईच्या समाजाचें सर्वांशीं प्रेमाचें नातें आहे. राममोहन राय, महर्षि देवेंद्रनाथ, ब्रह्मानंद केशव चंद्र सेन यांच्या संबंधानें समाजानें नित्य पूज्यभाव व्यक्त केला आहे. तथापि एक गोष्ट येथें नमूद करण्यासारखी आहे. १८७७–७८ सालीं महर्षि देवेंद्रनाथ वांद्रें येथें आपली प्रकृति सुधारण्यासाठीं येऊन राहिले होते त्या वेळीं समाजांतील कित्येक मंडळी त्यांस भेटावयास गेली होती व सर्वांना त्यावेळीं महर्षींच्या पंक्तीचा लाभ झाला होता. प्रो. भांडारकर ज्या बंगल्यांत वांद्रें येथें असतांना रहात होते त्या बंगल्यांत महर्षि रहात होते. मात्र मुंबईंत येऊन त्यांनीं आपल्या सहवासाचा लाभ दिल्याचें ऐकिवांत नाहीं. परंतु ब्रह्मानंद केशवचंद्र समाजाची स्थापना होण्यापूर्वी व स्थापना झाल्यानंतर असे दोन वेळ येथें येऊन गेले. पंडित शिवनाथ शास्त्री दोन वेळां मुंबईंत आले. दुसरेही कित्येक मिशनरी येऊन गेले. तथापि बाबू प्रतापचंद्र मुझुमदार यांनीं मुंबईंत राहून जितकें काम केलें तितकें दुसऱ्या कोणत्याही मिशनरीनें केलें नाहीं, हें येथें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. १८७२ सालीं येथें येऊन त्यांनीं साहा महिने मुक्काम केला. तेवढया अवधींत त्यांनीं उपासना चालविल्या; सर्व कुटुंबांच्या भेटी घेतल्या; स्त्रियांसाठीं सभा भरविल्या; त्यांच्या शिक्षणाचे वर्ग सुरू केले धर्म विषयक शिक्षणाचे वर्ग काढले; त्यांत व्याख्यानें दिलीं; टाऊन हाल, फ्रामजी कावसजी इन्स्टिटयूट, प्रार्थनामंदिरामध्यें व्याख्यानें दिलीं; पुणें, अहमदाबाद, बडोदें येथें व्याख्यानें देऊन व उपासना चालवून धर्मकार्य केलें व एकंदरींत ब्राह्मधर्माविषयीं जागृति उत्पन्न केली यांत कांहीं संशय नाहीं. व हें त्यांच्या कामासंबंधानें १८७२ सालच्या समाजाच्या रिपोर्टांत जो उल्लेख * आहे त्यावरून स्पष्ट होत आहे पण ह्याहीपेक्षां त्यांनीं दुसरें एक फार महत्त्वाचें काम केलें. त्या वेळपर्यंत प्रार्थनासमाजाकडून साप्ताहिक उपासनांपलीकडे दुसरें कांहींही काम होत नव्हतें. साप्ताहिक उपासनांस बाहेरची मंडळी येतील त्या पलीकडे बाहेरच्या लोकांशीं कांहीं संबंध येत नव्हता. तीच तीच बाहेरची मंडळी त्यावेळीं

* हा उतारा पृष्ठ ८७ वर घेतलेला आहे. तेथें पहावा.

उपासनेस नियमानें येतच असे असें कांहीं म्हणतां येत नाहीं. उलट पक्षीं समाज स्थापन झाला त्यावेळीं, म्हणजे १८६७ सालीं, हिंदु रिफारमर पत्राच्या कर्त्यानें असें स्पष्ट म्हटलें होतें कीं, "आम्ही त्या सभेस जाऊं लागल्या दिवसापासून असें पाहातों कीं, जे लोक मागील रविवारीं आले, ते पुढील रविवारीं दिसत नाहींत, नेहमीं नवेच लोक असतात." हा अनुभव पुढें कमी होत जाऊन तीच तीच मंडळी जरी येत असली, तरी अधिक लोकांची सहानुभूति मिळविण्यास साधन नव्हतें. शिवाय, अनुष्ठानासंबंधानें मुंबईच्या समाजाच्या सभासदांचें पाऊल अगदींच मागें आहे हें त्यांनीं अनुभविलेंच होतें व तसें आपलें मत जाहीरही केलें होतें. * म्हणून समाजाची मंडळी व बाहेरची मंडळी वारंवार एकत्र होऊन त्यांचा विचार-विनिमय व्हावा व दोघांनीं मिळून कांहीं कार्यें करावयाचें हातीं घ्यावें ह्या उद्देशानें बाबू प्रतापचंद्र यांच्या खटपटीनें १८७२ सालीं Bombay Theistic Association किंवा मुंबईची एकेश्वर उपासक मंडळीची स्थापना झाली. प्रताप बाबूंच्या खटपटीनें त्या वेळीं सर्वांत मोठी कामगिरी झाली ती ही होय व हिच्या द्वारेंच कित्येक वर्षें कित्येक लोकोपयोगी कार्यें पार पडलीं. म्हणून प्रथम ह्या मंडळीचे उद्देश व नियम येथें नमूद करितोः—

## मुंबई येथील एकेश्वर उपासक मंडळी.

१ ह्या मंडळीचें नांव मुंबई येथील एकेश्वर उपासक मंडळी असें असावें.

२ ह्या मंडळीचे दोन प्रकारचे उद्देश आहेतः-

(१) परस्परांच्या साहाय्यानें शुद्ध भाविक आचरण आणि धर्मसंबंधीं सत्य हीं आपण स्वतः साध्य करून अन्यत्र प्रसृत करावीं आणि सदाचार व व्यावहारिक सुधारणा ह्यांची वृद्धि करावी ह्यासाठीं मुंबईतील सर्व एकेश्वर उपासक ह्यांचें ऐक्य व्हावें.

(२) ह्या मंडळीच्या सभासदांच्या कुटुंबांतील स्त्रियांच्या स्थितीची ज्ञान व्यवहार आणि धर्म ह्यांच्या संबंधानें सुधारणा करणें.

३ वरील उद्देशांपैकीं पहिला उद्देश सिद्धीस नेण्यासाठीं पुढील उपाय योजिले आहेत.

---

* पृ. ८९–९० पहा.

( १ ) प्रत्येक बोलणाराच्या अथवा लिहिणाऱ्याच्या मर्जीप्रमाणें इंग्रजींत अथवा एतद्देशीय भाषेंत निबंध वाचण्यासाठीं आणि वादविवाद करण्यासाठीं सभा भरणें.

( २ ) स्वतःच्या व जनसमाजाच्या संबंधानें आपलीं कर्तव्यें काय आहेत तीं समजून घेणें आणि तीं करणें ह्याविषयीं मंडळीच्या सभासदांस साहाय्य करणें.

३ ह्याच उद्देशानें ह्या इलाख्यांत निरनिराळ्या ठिकाणीं ह्यासारख्या सभा स्थापित करणें.

दुसरा उद्देश सिद्धीस नेण्यासाठीं पुढील उपाय योजिले आहेतः—

( १ ) प्रत्येक आठवड्यांत एक वेळ स्त्रियांस एके ठिकाणीं जमवून त्यांस धर्म, सदाचार, शास्त्रीय व इतर साधारण विषयांवर शिक्षण देणें. ह्यासंबंधीं देखरेख करण्यासाठीं एक कमीटीची योजना करावी.

( २ ) धर्म, सदाचार व व्यवहार ह्या विषयांवर लहान, अल्प किंमतीचीं पुस्तकें प्रसिद्ध करण्याचा उद्योग करण्यास्तव आणि गरीब कामकरी लोकांस रात्रीं शिक्षण देण्यास्तव एक कमीटी असावी.

४ खालीं लिहिलेल्या मूलतत्त्वांवर ज्या मनुष्याची श्रद्धा आहे तो ह्या मंडळीचा सभासद होण्यास लायक आहेः—

( १ ) ईश्वराचें अस्तित्व.

( २ ) मानव आत्म्याचें अस्तित्व.

( ३ ) परलोकाचें अस्तित्व.

( ४ ) सदाचार दुराचार हीं परस्पर भिन्न आहेत.

( ५ ) प्रार्थनेची आवश्यकता.

५ ह्या मंडळीची मासिक सभा प्रत्येक इंग्रजी महिन्याच्या पहिल्या शनिवारीं भरेल, त्यावेळीं धर्म व व्यवहार ह्या विषयांवर निबंध वाचले जाऊन वादविवाद केला जाईल. या सभेस सर्वांस यावयास मोकळीक आहे.

६ गरज असेल त्यावेळीं कामाकरितां फक्त सभासदांची सभा भरेल. अशा सभेचें काम चालविण्यास निदान ८ सभासद हजर असले पाहिजेत.

७ ह्या सभेचें काम अध्यक्ष, उपाध्यक्ष व चिटणीस, तेच खजीनदार, हे चालवितील व त्यांची योजना प्रतिवर्षी केली जाईल.

८ ज्या गृहस्थांस ह्या मंडळीचे सभासद होण्याची इच्छा असेल त्यांनीं आपलीं नांवें चिटणिसांकडे पाठवावीं व ते त्यांचीं नांवें मंडळीच्या पटांत दाखल करितील.

९ प्रार्थनासमाजाचे सर्व सभासद ह्या मंडळीचे सभासद समजावे.

१० प्रत्येक सभासदानें वर्षास एक रुपया वर्गणी दिली पाहिजे.

११ सर्व सभांच्या आरंभीं व अंतीं प्रार्थना व्हावी.

अशा प्रकारें ही सभा स्थापन करितांना सर्व धर्मांच्या लोकांना एकत्र करण्याचा जो मूळ हेतु होता तो जरी पूर्ण झाला नाहीं, तरी प्रथम प्रथम पुष्कळ कामें झालीं. स्त्रियांच्या ज्ञानामध्यें भर घालण्यासाठीं पुष्कळ वर्षें नियमानें सभा भरत असत व त्यांत कित्येक सद्गृहस्थ व्याख्यानें देत. उत्सवाच्या वेळीं स्त्रियांस मुद्दाम बोलावून त्यांच्यासाठीं प्रतापचंद्र मुझुमदार, डा. भांडारकर, वामनराव मोडक, सदाशिवराव केळकर वगैरे मंडळी व्याख्यानें देत. एरव्हींही समाजाबाहेरील डा. सखाराम अर्जुन, डा. काणे, मिसेस रेबेका इ० पुरुष व स्त्रिया निरनिराळ्या विषयांवर व्याख्यानें स्त्रियांसाठीं देत असत. सार्वजनिक व्याख्यानेंही वारंवार होत असत. रा. ब. रानडे, रा. ब. कुंटे, पंडित, इ० गृहस्थांचीं व्याख्यानें होत असत. सुबोधपत्रिका, रात्रीच्या शाळा, चीप लिटरेचर सोसायटी वगैरे कामें ह्याच संस्थेच्या विद्यमानें झालीं. १८७७ सालच्या दुष्काळाच्या वेळीं समाजाचे सभासद व ह्या संस्थेचे सभासद ह्यांनीं मिळून सात आठ हजार रुपयांचा फंड जमविला. अशा प्रकारें पहिलीं सहा सात वर्षें उत्साहानें काम चालल्यावर थोडी शिथिलता येऊं लागल्याचें दिसून आलें. म्हणून लोकांना जागें करण्यासाठीं ता. १५ जून १८७९ च्या सुबोधपत्रिकेच्या अंकांत पुढील स्फुट लेख प्रसिद्ध झालाः—

"ह्या मंडळीची स्थापना होऊन सुमारें सात वर्षें झालीं. ह्या काळांत मंडळीची जितकी बढती व्हावी तितकी झाली नाहीं, तथापि ह्या मंडळीच्या हातून बरींच लोककल्याणाचीं कामें झालीं आहेत. गेल्या दुष्काळांत मंडळीनें आपल्या सामर्थ्यानुरूप दुष्काळनिवारणार्थ बरीच मदत केली. सुमारें आठ हजार रुपये मंडळीनें लोकांपासून व सभासदांपासून जमवून दुष्काळपीडित लोकांस पाठविले. तसेंच मुंबईत गरीब लोकांकरितां रात्रीच्या दोनतीन शाळा आहेत, त्याही ह्या मंडळीच्या मदतीनें चालल्या आहेत. परंतु अलीकडे मंडळीची मोठी वाईट

स्थिति होऊन लोकोपयोगी कामाची वृद्धि व्हावी तशी होत नसतां उलटीं जीं कामें चाललीं आहेत तीं कदाचित बंद पडतील; अशी स्थिति होण्याचें कारण हें कीं, जितके लोक मंडळींत असावे तितके नाहींत. ह्या सभेचे नियम व व्यवस्था बहुतेकांस सर्वमान्य होण्याजोगीं केली आहे... खिस्ती लोकांत यंग मेन्स खिश्चियन अॅसोशिएशन आहे. त्यांत जसे बहुतेक सर्व खिस्ती लोक आहेत तसेच ह्यांत सर्व धर्मांचे लोक कां नसावेत ? एकी मोठ्या उपयोगाची असते हें सर्वांस ठाऊकच आहे, म्हणून धर्म मानणाऱ्या लोकांनीं म्हणजे हिंदु, खिस्ती, मुसलमान, पार्शी व आर्यसमाजाचे लोक ह्या सर्वांनीं आपल्या भिन्न भिन्न मतांचे भेद मनांत न आणितां ऐक्यच ज्या ठिकाणीं होत असेल त्या ठिकाणीं सर्वांनीं जमण्याचा विचार करावा आणि ही ऐक्यता आमच्या समजुतीनें एकेश्वर उपासक मंडळींत होण्यासारखी आहे."

सर्व धर्मांच्या लोकांस एकत्र होतां यावें म्हणून ह्या संस्थेचीं तत्त्वें सर्वांस मान्य होण्यासारखीं ठेविलीं होतीं. जुन्या लोकांच्या आड मूर्तिपूजेचा प्रश्न येतो म्हणून तोही बाजूस सारला होता, तथापि ह्या संस्थेची विशेष भरभराट न होतां पुष्कळ वर्षें ती मृतप्राय स्थितींत राहिली. तिच्या आश्रयानें निघालेलीं कामें हळु हळु समाजाकडे आलीं. रात्रीच्या शाळांची व्यवस्था समाजाचे सभासद पाहूं लागले. बाहेरचे सभासद हळुहळु गळूं लागले; अखेरीस कांहीं वर्षें संस्थेचें नांव मात्र राहिलें. शेवटीं सन १८९९ सालीं ही संस्था एक ठराव करून बंद करण्यांत आली व रात्रींच्या शाळा व सुबोधपत्रिका ह्या दोन संस्थांची जबाबदारी समाजाकडे सर्व प्रकारें आली.

ह्याच संस्थेची Cheap Literature Society म्हणून एक कमिटी होती. हिनें मुलांस उत्तम देणगी, भाग तीन, परमेश्वराच्या आराधनेचे प्रकार, जगदीशस्तोत्र, ब्रह्मोपासना, धर्मवासना, आदिशास्त्र, एकनाथी भागवतांतील वेंचे, भागवतधर्मावरील उपदेश, Parental Advice, Ends and Aims of College Education, प्रार्थनासमाज हें काय प्रकरण आहे, वगैरे लहान लहान पुस्तकें छापून काढिलीं होतीं. १८९४ मध्यें एकनाथी भागवतांतील वेंचे व भागवतधर्मावरील उपदेश प्रसिद्ध केल्यानंतर कांहीं लहान मोठें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें दिसत नाहीं. प्रार्थनासमाजासंबंधानें प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचा उल्लेख 'ग्रंथ परिचय' ह्या सदराखालीं केला आहे.

# प्रार्थनामंदिर.*

प्रार्थनासमाजाची स्थापना शके १७८८ फाल्गुन वद्य एकादशी सन १८६७ मार्च ता. ३१ ह्या दिवशीं होऊन सामाजिक ईश्वरोपासना करण्याचा क्रम सुरू झाला, हें येथपर्यंतची हकीकत वाचणारास नव्यानें सांगावयास नको. सामाजिक उपासना प्रथम समाजाचे अध्यक्ष डा. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या येथें भरूं लागल्या. १८७० पर्यंत उपासना त्याचप्रमाणें सभा वगैरे सर्व कार्यें याच दिवाणखान्यांत होत असत. सामाजिक उपासना खाजगी गृहामध्यें भरविणें इष्ट नाहीं. पण प्रथमच स्वतंत्र जागा मिळणें शक्य नव्हतें. ही जागेची अडचण लक्षांत येऊन सन १८६८ मध्येंच एक स्वतंत्र मंदिर बांधण्यासाठीं वर्गणीनें पैसा जमविण्याचा ठराव रा.रा. माधव नारायण शिरगांवकर यांच्या सूचनेवरून सभासदांनीं केला होता व त्याच वेळीं बहुतेकांनीं आपापली एकेक महिन्याची प्राप्ति वर्गणीच्या रूपानें ह्या कार्याप्रत देण्याचें कबूल केलें होतें. १८७० पासून पुढें कांहीं काळ समाजाच्या उपासना रा. ब. रामचंद्र बाळकृष्ण यांच्या घरीं गिरगांव बॅक रोडवर होत असत. नंतर लवकरच ज्या ठिकाणीं हल्लींचें प्रार्थना मंदिर आहे त्याच ठिकाणीं बर्फाच्या गिरणीचें एक लोखंडी पत्र्याचें घर होतें तेथें समाजाच्या उपासना वगैरे होऊं लागल्या. ही जागा ब्यांक आफ वेस्टर्न इंडियाच्या ताब्यांत होती. परंतु जेव्हां बँकेचा कारभार आटोपला तेव्हां ती बँकेचे लिक्विडेटर्स प. वा. विनायकराव जगन्नाथजी शंकरशेट, शेट लिमजीभाई जमशेटजी बाटलीभाई व मि. जॉन रॉबिन्सन ह्यांच्या ताब्यांत गेली. त्यांनीं मेहरबानी करून ही जागा समाजास फुकट वापरण्यास दिली. हे ह्या गृहस्थांनीं समाजावर मोठे उपकार केले. १८७२ पर्यंत समाजाच्या उपासना ह्याच ठिकाणीं होत असत, परंतु नंतर ही जागाच विकावयास काढल्यामुळें समोरच्या डॉ. माणकजी आदरजी ह्यांच्या

---

* प्रार्थनामंदिराचा संक्षिप्त वृत्तान्त १८७७ सालीं रा. रा. भास्कर हरि भागवत समाजाचे सेक्रेटरी असतांना प्रसिद्ध झालेला आहे. त्याचेच आधारानें हा भाग लिहिला आहे. मात्र मंदिराच्या प्रवेशसमारंभाची हकीकत त्या वर्षाची सुबोधपत्रिकेची फाईल उपलब्ध नसल्यामुळें ज्ञानोदय व इतर पत्रांतून घेतली आहे.

वाडींत* जागा भाड्यानें घेण्यांत आली व नंतर समाजाचें स्वतःचें मंदिर तयार होईतों उपासना वगैरे त्याच ठिकाणीं भरत असत. शेवटच्या वर्षाचें भाडें डा. माणकजी ह्यांनीं समाजापासून घेतलें नाहीं. अशा प्रकारें त्यांनीं समाजकार्या-संबंधानें आपली सहानुभूति दाखविली.

ज्या वेळीं समाजाचें स्वतंत्र मंदिर असावें असें ठरलें त्या वेळापासून समाजासाठीं सोईची व स्वतंत्र जागा आढळली तर ती घ्यावयाची असें मंडळीनें योजिलें होतें. पुढें १८७२ सालीं ज्या ठिकाणीं उपासना होत असत तीच जागा विकावयास काढल्यावर ती जुनी बर्फाच्या गिरणीची जागा समाजानें मंदिर उभारण्यासाठीं विकत घेतली. ही जमीन मिळण्याच्या आधींपासूनही बाहेरच्या लोकांकडून देणग्या मिळविण्याचा प्रयत्न सुरू झाला होता. आणि ह्या प्रयत्नाचें दृश्य फळ म्हणजे जमीन घेण्यापूर्वीच कच्छचे राव यांजकडून आलेली एक हजार रुपयांची देणगी हें होय. त्यांनीं पुढें ह्या देणगींत आणखी ७५० रुपयांची भर घातली.

सन १८७२ सालीं सहा महिने बाबू प्रतापचंद्र यांचा मुक्काम मुंबई शहरीं समाजकार्यासाठीं होता हें मागील भागांत आलेंच आहे. ते येथें असतांना मंदिराच्या पायाचा दगड बसविण्याचा समारंभ शके १७९४ मार्गशीर्ष वद्य १४ ता. २९ डिसेंबर १८७२ रोजीं झाला. पायामध्यें एक कुंभ ठेविला आहे. त्यांत इंदुप्रकाश, नेटिव्ह ओपिनिअन, इ० वृत्तपत्रें व रा. ब. महादेव गोविंद रानडे ह्यांनीं लिहिलेल्या A Theist's Confession of Faith ह्या लेखाची एक प्रत ठेवण्यांत आली होती अशी माहिती ह्या लेखकास डा. भांडारकर ह्यांनीं कांहीं वर्षांपूर्वीं दिली होती. पायाच्या दगडावर पुढीलप्रमाणें लेख कोरला आहे:—

* मुंबईच्या आर्यसमाजाची स्थापना ह्याच वाडींत १८७५ सालीं एप्रिल महिन्यांत झाली. त्या संबंधानें इंदुप्रकाशानें असें म्हटलें आहे:—आर्यसमाजाच्या स्थापनेचा समारंभ गिरगांवांत डा. माणकजी आदरजी ह्यांच्या वाडींतील सोप्यांत, म्हणजे ज्या ठिकाणीं पूर्वीं प्रार्थनासमाजाचे लोक उपासना वगैरे करण्याकरतां जमत असत त्या ठिकाणीं, झाला. आतां ह्या समाज व प्रार्थनासमाज समोरासमोर आहेत, म्हणून दोन्ही पाहाण्याची लोकांस चांगली सोय आहे.

प्रार्थनासमाजमन्दिरम् ।
प्रतिष्ठाशिला मार्गशीर्ष कृष्णचतुर्दश्यां न्यवेशि ।
शकाब्दाः १७९४ । विक्रमार्कसमाः १९२९ ।
सत्यमेव जयते । एकमेवाद्वितीयम् ।
ॐ तत्सत्.

PRARTHANA SAMAJA MANDIRA.
FOUNDATION STONE LAID
*December 29th 1872 A. D.*

वरील तारखेस जरी मंदिराच्या पायाचा दगड बसविण्यांत आला तरी त्याचवेळीं मंदिराच्या कामास सुरुवात झाली नाहीं. एकंदर सर्व जमवाजमव करावयास नऊ महिन्यांचा अवधि लागला. १८७३ सालीं आक्टोबर महिन्यांत कामास प्रारंभ झाला व तें काम एप्रिल १८७४ मध्यें पूर्ण झालें. मंदिराचे एन्जीनिअर रा. रा. हरिश्चंद्र सदाशिवजी हे होते. ह्यांनीं केवळ धर्मबुद्धीनें मंदिरासंबंधाचें सर्व काम म्हणजे प्लान तयार करणें व त्याप्रमाणें सर्व कामें करून घेणें इ० आपला अमोलिक वेळ खर्च करून केलें व वर मंदिर बांधण्यासाठीं पन्नास रुपयांची देणगीही दिली. अशा प्रकारें त्यांनीं समाजास ऋणी करून ठेविलें आहे. त्याचप्रमाणें हायकोर्टाचे सालिसिटर शेट कमरुद्दीन तय्यबजी यांनीं समाजाची जमीन विकत घेतल्यापासून निरपेक्षबुद्धीनें वकिलाचें सर्व काम केलें त्याबद्दलही समाज त्यांचा अत्यंत ऋणी आहे. प्रार्थनासमाजाच्या सभासदांमध्येंच वर्गणी जमा करून मंदिर उभारावयाचें असें जर ठरविलें असतें तर त्या वेळची इमारत उभारली गेली नसती. ही इमारत ६३ फूट लांब व ३५ फूट रुंद असून वरील ग्यालरीसुद्धां आंत सातशें मंडळीचा समावेश होईल अशी मंदिर पूर्ण झालें त्यावेळीं अटकळ केलेली होती. परंतु अनेक प्रसंगीं ह्याहीपेक्षां अधिक मंडळीची बसण्याची सोय व्यवस्थित रीतीनें करण्यांत आलेली आहे. मंदिराच्या मोठ्या कामास कित्येक राजेरजवाडे, शेटसावकार, मित्र व इतर गृहस्थ व भगिनी ह्यांनीं जें साहाय्य केलें त्यामुळेंच मंदिर बांधलें गेलें हें येथें नमूद करणें अवश्य आहे. मंदिरास एकंदर २६००० रुपये खर्च आला. बर्फाच्या गिरणीची जागा व सर दिनशा माणिकजी पेटिट यांजकडून घेतलेला तुकडा मिळून जमिनीसाठींच

७३२० रुपये खर्ची पडले, तेही ह्या सव्वीस हजारांतच असल्यामुळें इमारतीचें काम किती कसोशीनें झालें असलें पाहिजे त्याची कल्पना होते. मंदिर तयार झालें, त्यावेळीं ३,३९० रुपयांचें कर्ज होतें तें समाजाच्या सभासदांनींच फेडलें असें धरून चालल्यास सभासदांमध्यें जमलेली वर्गणी ( ७,७१४ ) मंदिराची जमीन विकत घेण्यापुरतीच होती व वरील इमारतीचा बहुतेक सर्व खर्च बाहेरील वर्गणीवरच भागविला गेला असें वाचकांस दिसून येईल. ह्यावरून सभासद नसणारांनीं पुष्कळ उदार बुद्धीनें मदत केली असें उघड होतें. हें लक्षांत घेऊनच मंदिराच्या संक्षिप्त वृत्तांतामध्यें " ज्या परमवत्सल प्रभूनें इतक्या देशबांधवांस मदत करण्याची बुद्धि दिली आणि आपल्या दुर्बल बालकांचा अल्पस्वल्प श्रम सफल करून मंदिराचें मोठें कार्य सिद्धीप्रत नेलें त्यानें तें आम्हा सर्वांच्या पारमार्थिक कल्याणासाठीं कारणीभूत करावें " अशी प्रार्थना केली आहे.

## प्रवेशसमारंभ.

मंदिराचा प्रवेशसमारंभ वैशाख शुद्ध १० शके १७९६ ता. २६ एप्रिल १८७४ रोजीं सकाळीं झाला. ह्या संभारंभासाठीं समाजाच्या वतीनें शहरांतील व परगांवच्याही पुष्कळ लोकांस आमंत्रणें गेलीं होतीं. त्याप्रमाणें ह्या प्रसंगीं स्त्रीपुरुषांची गर्दी होऊन मंदिर अगदीं भरून गेलें होतें. प्रथम सकाळीं ७॥ वाजतां समाजाच्या सभासदांनीं जुन्या समाजगृहांतून निघून नवीन मंदिरांत प्रवेश केला. यावेळीं रा. रा. रामचंद्र विष्णु माडगांवकर ह्यांनीं त्या प्रसंगासाठीं मुद्दाम रचिलेलें पद म्हणण्यांत आलें. तें पद पुढें दिलें आहे:—

**प्रभु तेजोमया । पुण्यरूपा दया । शांतिसौख्यालया । दास बाहूं ॥ ध्रु० ॥ त्वत्कृपें पावल्या । पूर्णते आलया । अर्पितों तूज या । रक्षि नाथा ॥ प्रभु ॥ १ ॥ पुण्यशीला तरी । शुद्ध यातें करीं ॥ राहिं चिर अंतरीं । चिद्धना गा ॥ प्रभु० ॥ २ ॥ तेविं हृन्मंदिरीं । वास देवा करीं । पुण्यमार्गावरी । लावीं दासा ॥ प्रभु० ॥ ३ ॥ भक्तिच्या साधना । येथ लावूं मना । आवरूं वासना । इंद्रियांच्या ॥ ४ ॥ प्रभु० ॥ त्यागुनी दुर्मदा । कामना त्वत्पदा । पाववूं सर्वदा । होउ ऐसें ॥ प्रभु० ॥ ५ ॥ बंधुभगिनी तुला । आळवूं मंगला । सुखनिधे वत्सला । मायबापा ॥ प्रभु० ॥ ६ ॥**

मंदिरांत प्रवेश करितांच काय वाटलें असावें त्याची कल्पना ज्ञानोदयाच्या कर्त्यांनीं केलेल्या पुढील वर्णनावरून चांगली होतेः—

"मंदिर सुंदर रीतीनें बांधलें आहे, आंत मंडळीस बसण्यासाठीं बांकें व खुरच्या मांडल्या असून वर पूर्व, पश्चिम व दक्षिण ह्या तीन बाजूंस ग्यालरी केली आहे. मंदिराच्या उत्तरेच्या शेवटावर सिंहासन किंवा उपदेशस्थान केलें आहे. त्याच्या सभोंवतीं पांढऱ्या धोंड्यांची वरंडी असून तिजवर सुंदर नक्षी व जाळी केली आहे; आणि तिच्या भोंवतीं उपदेशकास बसण्यासाठीं शिसवी लांकडाचें व्यास-पीठ किंवा खुरची आहे व पुढें पुस्तक वगैरे ठेवण्यासाठीं शुभ्र संगमरवराचा सुरेख चौरंग आहे. कलकत्त्यास ब्राह्मसमाजमंदिरांत कांहींशी अशीच व्यवस्था केली आहे. पण त्यापेक्षां हें मंदिर प्रशस्त, देखणें, व विशेष व्यवस्थित आहे." *

मंदिराच्या उपयोगाविषयीं नियम सदरहू समारंभाच्या दिवशीं वाचून दाख-विण्यांत आले ते पुढें दिले आहेतः—

" सर्वव्यापक, सर्वशक्ति, सर्वज्ञ, परमपवित्र, दयानिधि, विश्वस्रष्टा, अव्यंग, अनादि, अनंत, असा जो एकच, अद्वितीय परमेश्वर त्याची उपासना या स्थळीं प्रतिदिवशीं, निदान प्रति आठवड्यास, करण्यांत आली पाहिजे. कोणत्याही सृष्ट पदार्थाची उपासना येथें करितां नये, कोणी मनुष्य अथवा इतर प्राणी किंवा बहि-रिंद्रियगोचर पदार्थ हा ईश्वरच, किंवा ईश्वरासारखा, किंवा ईश्वराचा अवतार असें समजून येथें त्याची आराधना करितां नये; आणि परमेश्वराशिवाय दुसऱ्या कोणा-चीही अथवा कोणाच्याही नांवें एथें प्रार्थना करण्यांत, अथवा गीत गाण्यांत येऊं नये; कोणत्याही पंथाच्या लोकांनीं आजपर्यंत कधीं पूजेसाठीं अथवा कोणत्या एका गोष्टी (वृत्ता) च्या स्मरणार्थ जिचा उपयोग केलेला असेल, किंवा यापुढें कर-ण्यांत येईल अशी कोणतीही कोरींव किंवा रंगीत प्रतिमा अथवा बाह्य चिन्ह येथें बाळगूं नये. कोणताही प्राणी येथें बळी देतां नये. जेवणखाण, मद्यप्राशन अथवा कोणत्याहि प्रकारची मौज किंवा करमणूक एथें करूं देतां नये. जी कोणतीही सृष्ट वस्तु अथवा पदार्थ आजपर्यंत कधीं कोणत्याहि पंथाच्या लोकांनीं पूजिला असेल, अथवा ह्यापुढें पूजिला जाईल त्याचा येथें होणाऱ्या उपासनेंत उपहास किंवा निंदा करितां नये. कोणताही ग्रंथ साक्षात् ईश्वरप्रणीत, सर्वांशीं प्रमाण (निर्बाध) असें

* ज्ञानोदय २० एप्रिल १८७४.

मानितां नये; किंवा तसें मानून त्याविषयीं पूज्यभाव धरितां नये. तथापि कोणताहि ग्रंथ आजपर्यंत कधीं कोणत्याही पंथाच्या लोकांनीं सर्वांशीं प्रमाण ( निर्बाध ) मानलेला असेल किंवा पुढें मानण्यांत येईल त्याचा उपहास किंवा निंदा करितां नये. या स्थळीं प्रार्थना, उपदेश किंवा भाषण करावयाचें अथवा गीत गावयाचें तें कोणत्याहि प्रकारचे सृष्ट पदार्थ ( मूर्ति ) पूजन, मत विशेषाभिमान किंवा पाप ह्यास उत्तेजन किंवा आश्रय मिळेल अशा प्रकारचें असूं नये. परमेश्वराची उपासना ह्या ठिकाणीं अशा वृत्तीनें व अशा प्रकारें करण्यांत आली पाहिजे कीं, जेणें करून आपण सर्व एका कुटुंबांतलीं माणसें आहों असा परस्पर भाव वागविणें, सर्व प्रकारची भ्रांति व पातक ह्यांपासून दूर राहणें आणि ज्ञान, भाव व पुण्यशीलता उत्तरोत्तर वृद्धीप्रत नेणें ह्याविषयीं सर्व पुरुष व स्त्रिया, त्यांची जात, वर्ण व प्रापंचिक स्थिति कोणतीही असली तरी समर्थ होतील."

"Every day, at least every week, the One only God, without a Second, the Perfect and Infinite, the Creator of all, Omnipresent, Almighty, All-knowing, All-merciful, and All-holy, shall be worshipped in these premises. No created object shall be worshipped here. No man or inferior being or material object shall be worshipped here as identical with God or like unto God or as an incarnation of God; and no prayer or hymn shall be offered or chanted unto or in the name of any one except God. No carved or painted image, no external symbol which has been or may hereafter be used by any sect for the purpose of worship or the remembrance of a particular event, shall be preserved here. No creature shall be sacrificed here. Neither eating nor drinking nor any manner of mirth or amusement shall be allowed here. No created being or object that has been or may hereafter be worshipped by any sect shall be ridiculed or condemn-

ed in the course of Divine service to be conducted here. No book shall be acknowledged or revered as the infallible word of God; yet no book which has been or may hereafter be acknowledged by any sect to be infallible shall be ridiculed or condemned. No sect shall be vilified, ridiculed or hated. No prayer, hymn, sermon, or discourse to be delivered or used here shall countenance or encourage any manner of idolatry, sectarianism or sin. Divine service shall be conducted here in such spirit and manner as may enable all men and women irrespective of distinctions of caste, colour and condition, to unite in one family, eschew all manner of error and sin, and advance in wisdom, faith and righteousness."

मंदिरप्रवेश, मंदिराच्या उपयोगांविषयीं नियमांचें वाचन हीं कार्यें झाल्यानंतर (१) रामचंद्र विनायक रणजीत; (२) बाळाजी दत्तोबा परुळेकर; (३) दाजी रामजी चव्हाण; (४) बाळकृष्ण राघोजी पाटकर; (५) विठ्ठल कृष्णाजी खेडकर हे पांच गृहस्थ प्रतिज्ञापूर्वक करार करून समाजांत दाखल झाले. त्यानंतर प्रो. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांनीं ईश्वरोपासना चालविली. उपदेशाच्या वेळीं त्यांनीं असें सांगितलें कीं, "आम्हांस ईश्वरदत्त धर्म नाहीं असें कोणी म्हणतात. प्रत्येक धर्माचे लोक म्हणतात कीं, ईश्वरदत्त धर्म काय तो आम्हांपाशींच आहे; दुसऱ्यांपाशीं नाहीं, म्हणून त्यांचा नाश होईल. हा धर्म ईश्वरानें १८०० किंवा १३०० वर्षांमागें किंवा अमुक वेळेस दिला असेंही ते म्हणतात. म्हणजे त्याच्या अगोदर मनुष्यांमध्यें सत्य किंवा धर्म म्हणून अगदीं नव्हता. यावरून ईश्वरास फक्त ह्या लोकांची काळजी आहे व इतर लोकांची कांहीं दया नाहीं असें ठरतें. पण ईश्वरास सर्वांची दया आहे, म्हणून सत्य सर्वांसाठीं आहे व तें तो अमुक एका ठिकाणच्या लोकांस देईल असें नाहीं; त्यानें तें सृष्टीच्या आरंभापासून सर्व लोकांस प्रगट केलें आहे. पण मनुष्यांनीं त्यांत पुष्कळ असत्य गोष्टी मिसळल्या आहेत. म्हणून सर्व धर्मांत सत्य व असत्य आहे. प्रत्येक धर्मांत जो सत्यांश

आहे, म्हणजे ज्या गोष्टी सर्व धर्मांस समाईक आहेत, त्या आम्ही घेतों. यास्तव आम्ही ईश्वरदत्त धर्माचे अनुयायी आहों."

उपासनेनंतर दोन प्रहरीं धर्मचर्चा झाली. तींत प्रार्थनासमाज हें नांव बदलून ब्राह्मसमाज हें नांव द्यावें किंवा कसें, प्रवृत्तिमार्ग, निवृत्तिमार्ग वगैरे अनेक विषयांवर वादविवाद झाल्यावर रा. ब. माधवराव रानडे ह्यांचें मंडळीस जागृत करण्यासारखें भाषण झालें. त्याचें साधारण स्वरूप असें होतें:—"आपण आज ह्या सुंदर मंदिरामध्यें प्रवेश केला आहे. पण एवढयानें आपली इतिकर्तव्यता झाली असें म्हणतां येईल काय? किंवा हें मंदिर तयार झालें ह्यांत खरोखर आम्हां सभासदांस मोठी धन्यता वाटण्यासारखी कांहीं गोष्ट आहे काय? मंदिराच्या उभारणीला जो खर्च लागला त्यांतील दोनतृतीयांश प्रार्थनासमाजाचे जे सभासद नाहींत व ज्यांपैकीं बहुतेक सभासद होण्याची आशाही नाहीं, अशांच्या वर्गणीनें भागविला आहे. आपल्या समाजांतील मंडळींत फार तर एकतृतीयांश फंड असावा. मला तर असें वाटतें कीं, जे आमच्याबरोबर यावयास सिद्ध नाहींत, जे आमच्या मताचे आहेत असें जाहीर करावयास तयार नाहींत, त्यांच्या पैशानें बांधलेल्या मंदिरापेक्षां आपल्या मंडळीच्या पैशानें बांधलेल्या गवताच्या लहानशा झोंपडींतही उपासना करणें अधिक चांगलें!" ह्याच दिवशीं सायंकाळीं रा. रा. वामनराव मोडक ह्यांनीं ईश्वरोपासना चालविली. त्यांनीं तुकोबाच्या भक्तिमार्गानुसारें चित्तशुद्धीच्या अवश्यकतेवर प्रवचन केलें.

### प्रार्थनामंदिरासाठीं १८७३-७४ सालीं सभासदांनीं पुढीलप्रमाणें वर्गणी दिली:—

| | | | |
|---|---|---|---|
| डा. आत्माराम पांडुरंग | ५०० | सदानंद बाळकृष्ण पालेकर | ३०० |
| जगन्नाथ सदाशिवजी हाटे | ५०० | रघुनाथ जनार्दन | ३०० |
| बाळ मंगेश वागळे | ४०० | नारायण महादेव परमानंद | २५० |
| रामचंद्र व दीनानाथ विष्णु | | वामन आबाजी मोडक | २०० |
| माडगांवकर | ४०६-१२ | भास्कर हरि भागवत | १५० |
| रामकृष्ण गोपाळ भांडारकर | ३५० | गोपिनाथ सदाशिवजी हाटे | १५० |
| महादेव गोविंद रानडे | ३५० | अनंत नारायण आदरकर | १५० |
| माधव नारायण शिरगांवकर | ३०० | रा. सा. मुकुंद रामचंद्र | १४२ |

| | | | |
|---|---|---|---|
| दिनकर बल्लाळ वैद्य | ११० | डा. बळवंत गोपाळ भाटे | ५० |
| कल्याण सिताराम चित्रे | ११० | गणपत कृष्णाजी तिव्रेकर | ५० |
| भास्कर बापू जोशी | १०० | दामोदरदास गोवरधनदास | ४० |
| रा. सा. चिंतामण नारायण भट | १०० | बाळकृष्ण निळाजी पितळे | ३० |
| जनार्दन सखाराम गाडगीळ | १०० | बाळकृष्ण मोरोबा | ३० |
| डा. शांताराम विठ्ठल | १०० | जयशंकर सर्वशंकर | २५ |
| मुरलीधर गिरिधर | १०० | कृष्णाजी धोंडो पंगे | २५ |
| रा. ब. शंकर पांडुरंग पंडित | १०० | बाळकृष्ण गोविंद भाटोडीकर | २५ |
| महादेव मोरेश्वर कुंटे | १०० | लक्ष्मण सीताराम कारखानीस | २५ |
| रामचंद्र त्रिंबक राजे | ८० | सखाराम यशवंत परांजपे | २५ |
| मोरो विठ्ठल वाळवेकर | ७० | साजो कृष्ण धोंड | २० |
| नारायण विठ्ठल तेंडोलकर | ६० | दिनानाथ पांडुरंग मिटकर | २० |
| पांडुरंग भीमराव | ५५ | कान्होबा रणछोडदास कीर्तिकर | १० |
| वासुदेव बाबाजी नवरंगे | ५० | भिकोबा लक्ष्मण चव्हाण | ६ |
| मोरोबा विनोबा संजगिरि | ५० | पांडुरंग रामचंद्र | ५ |
| | | बळवंत गोविंद गोडबोले | ५ |

## सभासद नसणारांकडून आलेल्या देणग्या.

| | | | |
|---|---|---|---|
| कच्छचे राव साहेब | १७५० | शेट लखमीदास खिमजी | २०० |
| इंदुरचे होळकर सरकार | ५०० | एक मित्र | २०० |
| नवानगरचे जामसाहेब | ५०० | शेट वन्द्रावनदास पुरुषोत्तमदास | २०० |
| एक पारसी मित्र | ५०० | ,, धीरजलाल मथुरादास | १५० |
| जमखिंडीचे चीफ साहेब | ३०० | एक हिंदु मित्र व बंधु | १५० |
| एक मित्र व त्याचा भाऊ | २५० | शेट धरमसी पुंजाभाई | १५० |
| एक हिंदु मित्र | २५० | एक मित्र | १४० |
| ना. नानाभाई हरिदास | २५० | शेट मोरारजी गोकुळदास | १२० |
| शेट द्वारकादास वसनजी | २५० | देवासचे महाराज | १०० |
| श्रीमंत विनायक गणेश किबे | २५० | राजकोटचे ठाकुरसाहेब | १०० |
| जुनागडचे नबाबसाहेब | २०० | डा. सखाराम अर्जुन | १०० |
| नवानगरचे कुमार भोगसिंगजी | २०० | विष्णु घनश्याम | १०० |
| एक हिंदु मित्र | २०० | खंडेराव चिमणराव बेदरकर | १०० |

| | | | |
|---|---|---|---|
| पी. वेंकटचेली चिट्टी | १०० | रा. सा. नारायण अनंत मुतालिक | ५० |
| विनायक वासुदेव | १०० | गंगाराम भाऊ | ५० |
| रा. सा. गणपतराव मोरोबा पितळे | १०० | विनायक नारायण भागवत | ५० |
| भैरवनाथ मंगेश | १०० | त्रिंबकराव बापूजी मायदेव | ५० |
| काशिनाथ विठोबा | १०० | बाबाजी गोपाळ | ५० |
| ए. बी. | १०० | शामराव विठ्ठल | ५० |
| रा. ब. भास्कर दामोदर पाळंदे | १०० | हरिश्चंद्र सदाशिवजी | ५० |
| शेट लल्लूभाई केशवलाल | १०० | शामराव भास्कर | ५० |
| रा. ब. नाना मोरोजी | १०० | घनश्याम निलकंठ नाडकर्णी | ५० |
| भाई जिवनजी | १०० | सोराबजी बेझनजी वकील | ५० |
| शेट मथुरादास लवजी | १०० | हरि गणेश पटवर्धन | ५० |
| रघुनाथ नारायण खोटे | १०० | पांडुरंग राघोबा | ५० |
| कासमभाई धरमसी | १०० | एक पारशी मित्र | ५० |
| नारो बाळकृष्ण पटवर्धन | १०० | रा. ब. गणपतराव भास्कर | ५० |
| बाळाजी पांडुरंग | १०० | रामचंद्र हेमराज | ५० |
| नागू सयाजी | १०० | एक तेलगू मित्र | ५० |
| गोविंद विठ्ठल करकरे | १०० | रा. ब. विष्णु मोरेश्वर भिडे | ५० |
| शेट कहानदास मंच्छाराम | १०० | शेट माधवदास रघुनाथदास | ५० |
| शेट छबिलदास लल्लूभाई | १०० | रा. सा. विश्वनाथ गोविंद चोळकर | ५० |
| एक हिंदु मित्र | १०० | विश्वनाथ धोंडबा | ५० |
| बळवंतराव सी. जावळे | १०० | रा. सा. भिकाजी आरमांडे | ५० |
| जेराजभाय पीरभाय | १०० | गणपतराव श्रीकृष्ण | ४५ |
| करीमभाय इब्राहीम | १०० | जयसत्ताबोधराव तिरमळराव | ४० |
| थारिया टोपण | १०० | जनार्दन गोपाळ | ४० |
| दयाळ रतनसी | १०० | एक आर्य | ४० |
| शेट करसनदास नेन्सी | ७५ | नारायण विठ्ठल तेंडोलकरांच्या तर्फे | ३३॥ |
| ना. रा. ब. बेचरदास अंबादास | ७० | रा. ब. भोलानाथ साराभाई | ३२ |
| कृष्णाजी लक्ष्मण नूलकर | ६० | डोसाभाई फ्रामजी कराका | ३० |
| का. त्रिं. तेलंग | ५८ | केशव बापूजी बाळ | ३० |
| गणेश शास्त्री इंदूरकर | ५० | दयाराम खेमचंद | ३० |

| | | | |
|---|---|---|---|
| आबाजी विष्णू काथवटे | ३० | लक्ष्मण दाजी बिवलकर | २० |
| महादेव नारायण जोगळेकर | ३० | रा. सा. गणपत अमृत मानकर | २० |
| सत्येंद्रनाथ टागोर | ३० | धिरजराम दलपतराम | २० |
| वकील इंदुरकर | २५ | एक कच्छी वैष्णव | २० |
| रा. सा. नारायण गोविंद आपटे | २५ | लक्ष्मण नरसिंग जोशी | २० |
| पांडुरंग बळिभद्र | २५ | दिनानाथ आत्माराम दळवी | २० |
| रा. सा. वासुदेव बापूजी कानिटकर | २५ | रामचंद्र आनंदराव उदास | २० |
| मनसुखलाल मुगुटलाल मुन्शी | २५ | द्वारकानाथ नारायण रणदिवे | १५ |
| मोरोजी काशीनाथ | २५ | गोविंद बाळकृष्ण | १५ |
| आत्मरामपंत कायगांवकर | २५ | नरहर गणपत | १० |
| गोविंद गंगाधर | २५ | एक मित्र | १० |
| रूपसिंग मथुरादास | २५ | त्रिंबक वामनराव रसाळ | १० |
| वासुदेव पांडुरंग | २५ | रनछोडलाल छोटालाल | १० |
| कृष्णशास्त्री चिपळूणकर | २५ | एक मित्र | १० |
| राघोबा पांडुरंग | २५ | एम. जे. पोवार | १० |
| मिसेस सुंद्राबाई दामोदर कृष्णाजी | २५ | माधवराव पांडुरंग बरवे | १० |
| काशिनाथ बाळकृष्ण मराठे | २५ | गंगादास किशोरदास | १० |
| जनार्दन रामचंद्र | २५ | रमाकांत कृष्ण भेंडे | १० |
| नीळकंठ महादेव | २५ | लक्ष्मण विष्णु | १० |
| खंडेराव जनार्दन | २५ | दिवाण कौरामल | १० |
| बाबा गोखले | २५ | दयाराम व उदाराम | १० |
| विनायक जे कीर्तने | २५ | वसंतराव आत्माराम | १० |
| राजन्ना लिंगू | २० | सातारा प्रार्थनासमाजाचा एक सभासद | १० |
| सदाशिव बल्लाळ | २० | विनायक बळवंत | १० |
| रा. ब. गोपाळ हरि देशमुख | २० | हरिश्चंद्र अंतोबा | १० |
| एक हिंदु मित्र | २० | विष्णुशास्त्री पंडित | १० |
| कृष्णाजी बापूजी बाळ | २० | श्रीकृष्णशास्त्री तळेकर | १० |
| आबा विष्णु पुराणिक | २० | एक मुसलमान मित्र | १० |
| जी. जी. घाटे | २० | लक्ष्मण यशवंत शिरगांवकर | १० |
| तुळशीदास देविदास | २० | | |

| | | | |
|---|---|---|---|
| नगिनदास तुळसीदास मारफतिया | ७ | जव्हेरिलाल उमियाशंकर याज्ञिक | ५ |
| नागरदास नरोत्तमदास | ५ | रामा मानाजी | ५ |
| समाजाचा एक जुना मित्र | ५ | गणेशशास्त्री बोडस | ५ |
| रा. सा. महिपतराम रूपराम | ५ | एक निनांवी मित्र | ५ |
| रामचंद्र शामराव | ५ | एक मित्र | ५ |
| मेरवानजी एदलजी | ५ | पांच रुपयांपेक्षां कमी मिळून | २३ |

यानंतर १९२३ सालीं राममोहन इंग्लिश स्कूलसाठीं ह्या मंदिरावर एक मजला उठविण्यांत आला. त्याची हकीकत राममोहन स्कूलच्या सदराखालीं दिली आहे.

# रात्रींच्या शाळा.

थिईस्टिक ॲसोशिएशनच्या विद्यमानें रात्रींच्या शाळा काढावयाचें जेव्हां ठरलें त्या वेळीं पहिल्या शाळेसंबंधाचा पुढाकार "प्रार्थनासमाजाचे आद्य पुरस्कर्ते व प्रथम आचार्य" असें ज्यांस १८७७ सालीं सुबोधपत्रिकेनें म्हटलें आहे त्या रा. रा. भिकोबा लक्ष्मण चव्हाण ह्या वयोवृद्ध गृहस्थांनीं रा. रा. भानु केशव गांगनाईक यांस मदतीस घेऊन घेतला. १८७६ सालीं पहिली रात्रींची शाळा चेऊलवाडी येथें उघडली. भिकोबादादा हयात असतांनाच त्यांस लक्ष्मणराव मुंज हे मदतीस मिळाले व पुढें तेच सेक्रेटरीचें काम मोठ्या आस्थेनें करूं लागले. रा. मुंज ह्यांचा अंत १८८७ मध्यें होईपर्यंत ते सेक्रेटरीचें काम करीत होते. मुंबईसारख्या बकाली वस्तीच्या शहरीं शिक्षणाचीं साधनें जरी मुबलक आहेत तरी अज्ञान त्याहीपेक्षां अधिक आहे. तसेंच, गिरण्यांत, अनेक कारखान्यांत, अफिसांत वगैरे काम करणाऱ्या लोकांपैकीं ज्यांची आपल्या ज्ञानांत भर पडावी अशी इच्छा असते त्यांच्या शिक्षणाची कांहीं सोय नसल्यामुळें ॲसोशिएशननें हें काम हातीं घेतलें व वर म्हटल्याप्रमाणें १८७६ सालीं पहिली शाळा सुरू केली. दुसरी शाळा १८७९ मध्यें गिरगांवांत, तिसरी १८८१ त गांवदेवी येथें, १८८४ त खेतवाडी येथें चौथी व १८८६ मध्यें भायखळा येथें पांचवी शाळा स्थापण्यांत आली. ह्या व नंतर निघालेल्या सर्व शाळा म्युनिसिपल शाळांच्या इमारतींत भरतात व त्याबद्दल म्युनिसिपालिटी कांहीं भाडें वगैरे घेत नाहीं. १८९० सालीं महार चांभार वगैरे जातींच्या लोकांकरितां मदनपुऱ्यांत एक स्वतंत्र शाळा स्थापण्यांत आली. अस्पृश्य वर्गांतील लोकांसाठीं ही जी पहिली शाळा उघडली गेली तिचा इतिहास बोधप्रद आहे. एका शाळेंत एक गृहस्थ शिक्षक होते. रा. मुंज हे परलोकवासी झाल्यानंतर रा. के. आनंदराव हे सेक्रेटरी व रा. रा. बाबण बापू कोरगांवकर मदतनीस सेक्रेटरी होते. वरील शिक्षक रा. कोरगांवकरांपाशीं बढती संबंधानें विनंति करूं लागले. त्या पूर्वी पुष्कळ दिवस अस्पृश्य वर्गांतील मजुरांसाठीं निदान एक स्वतंत्र शाळा तरी स्थापण्यांत आली पाहिजे असा विचार रा. कोरगांवकर ह्यांच्या डोक्यांत घोळत होता. हे शिक्षक म्युनिसिपालिटींत ड्रेनेज खात्यांतच नोकरीला आहेत हें पाहून त्यांस असें सुचविण्यांत आलें कीं, तुम्ही अस्पृश्य वर्गांतील विद्यार्थि जमवून एक स्वतंत्र शाळा चालवून दाखवा, म्हणजे मग तुम्हाला पगार अधिक मिळूं लागेल. ह्या गृहस्थांनीं मुलें जमविलीं व शाळाही चालविण्याचें कबूल केलें, मात्र आपल्या नांवाचा बोभाटा करूं नये अशी अट घातली. आतां

फक्त पैशाची व्यवस्था करण्याचा प्रश्न राहिला! तोही कसा सोडवावयाचा तें रा. कोरगांवकरांनीं योजून ठेविलें होतें. वरीलप्रमाणें पूर्व तयारी झाल्यानंतर त्यांनीं शेट दामोदरदास ह्यांना ह्या शाळेचा एक वर्षाचा खर्च देण्याची विनंति केली व ती त्यांनीं मान्य केल्यानंतर अस्पृश्य वर्गांतील लोकांसाठीं पहिली शाळा वर म्हटल्याप्रमाणें सुरू झाली. परंतु समाजाच्या उत्सवाच्या वेळीं एक नवीनच अडचण उपस्थित झाली. उत्सवामध्यें रात्रींच्या शाळांतील मुलांस एकत्र करून त्यांस थोडा उपदेश करून मिठाई वांटण्याची पद्धत पुष्कळ वर्षांपासून चालू होती. परंतु उत्सवांत ह्या अस्पृश्य विद्यार्थ्यांना बोलवावयाचें कीं नाहीं? जर त्यांस आणिलें तर त्यांची बसावयाची व्यवस्था कशी करावयाची? हे प्रश्न पुढें आले. समाजाची मंडळी कोणास अस्पृश्य लेखीत नव्हती, पण जमलेल्या विद्यार्थ्यांस हा विचार पसंत पडेल किंवा नाहीं ह्याविषयीं शंका होती. शेट दामोदरदास यांनीं तर स्पष्ट सांगितलें कीं, आपल्या समाजाच्या उत्सवांत रात्रींच्या शाळांतील सर्व विद्यार्थ्यांस एकत्र करण्याची आपली, वहिवाट आहे तीस अनुसरून आपण सर्व विद्यार्थ्यांस एकत्र आणावें. कोण स्पृश्य व कोण अस्पृश्य हें पहाण्याची आपल्याला आवश्यकता नाहीं. त्याप्रमाणें सर्व शाळांतील विद्यार्थ्यांस एकत्र करण्यांत आलें. अस्पृश्य शाळेंतील विद्यार्थ्यांस वेदीच्या उजव्या बाजूस बसविलें. त्या वेळीं विद्यार्थ्यांत थोडी कुजबुज सुरू झाली, व शेवटीं इतर विद्यार्थ्यांबरोबरच त्यांस जेव्हां मिठाई वांटण्यांत आली तेव्हां कांहीं विद्यार्थ्यांनीं आपली मिठाई घेतली नाहीं, व कांहींनीं घेतलेली फेकून दिली! तिकडे समाजाच्या मंडळीनें लक्ष्य दिलें नाहीं. शाळा नित्याप्रमाणें चालू होत्याच. इतकें झाल्यानंतर आणखी पुढें पाऊल टाकण्यांत आलें. ही शाळा चालविणारे गृहस्थ दुर्दैवानें अकालीं कालवश झाले, व पुढें ही शाळा कशी चालवावयाची हा प्रश्न मंडळीपुढें येऊन पडला. त्यावेळीं रा. जोशी ह्या नांवाचे एक म्युनिसिपल शाळेचे हेडमास्तर होते, ते खेतवाडींतील रात्रीची शाळा चालवीतच होते. त्यांनीं ही शाळाही चालविण्याचें मनावर घेतलें. हे गृहस्थ मोठे धोरणी व दूरदर्शी होते. त्यांनीं आपल्याच शाळेंत ह्या अस्पृश्य मुलांना घेतलें व सर्व मुलें एकत्र बसूं लागलीं, व शाळेंत असत तोंपर्यंत विद्यार्थ्यांतील स्पृश्य अस्पृश्य हा भेद सहज नष्ट झाला!

ह्यानंतर कित्येक वर्षें रा. रा. बाळकृष्ण गोविंद भाटोडीकर व डा. परमानंद हे रात्रींच्या शाळांची व्यवस्था पहात होते. १८९९ सालीं आक्टोबर महिन्यांत

थिइस्टिक ॲसोशिएशन बंद झाल्यामुळें ह्या शाळांची सर्व व्यवस्था समाजाकडे आली व समाजानें १९०० सालापासून रा. रा. वामन सदाशिव सोहोनी ह्यांस सन्मान्य सुपरिंटेंडेंट नेमून त्यांस सर्व शाळांची व्यवस्था पहावयाची विनंति केली. त्यांनीं कांहीं दिवस अल्प वेतनावर एक इन्स्पेक्टर नेमून त्यांस शाळांची दर आठवड्यास तपासणी करावयास सांगितलें. शाळांतील विद्यार्थी व शिक्षक वेळेवर येतात किंवा नाहीं, शाळेचा वेळ शिक्षणांतच जातो किंवा कसें, त्याचप्रमाणें दिवाबत्तीसंबंधानें व्यवस्था कशी आहे वगैरे कामें हे इन्स्पेक्टर करीत असत, व मधून मधून सेक्रेटरी रा. सोहोनी हेही निरनिराळया शाळा जाऊन पहात असत. शिवाय सर्व शाळांमध्यें सुलभ संगीतांतील कित्येक पद्यें शिकविण्याची व्यवस्था केली. हें काम इन्स्पेक्टरच करीत असत. वारंवार सर्व शाळांचे बक्षिस समारंभ करवून शाळांतील मुलें, शिक्षक व प्रार्थनासमाज यांचा काय संबंध आहे तें लक्षांत आणून दिलें व अशा रीतीनें शाळांस व्यवस्थित स्वरूप दिलें. येथें हें सांगितलें पाहिजे कीं, पूर्वीही शाळांतील मुलांचे बक्षिससमारंभ मधून मधून होत असत, व त्यावेळीं सर डब्ल्यु वेडरबर्न, बद्रुद्दिन तय्यबजी ह्यांच्यासारखी मंडळी अध्यक्ष असत. सर वेडरबर्न ह्यांनीं सर्व शाळांतील मुलें एकत्र झालेलीं पाहून एके वर्षी फार समाधान व्यक्त केलें व समाज इतकें महत्त्वाचें व चांगलें काम करीत असतां त्याची माहिती लोकांस करून देत नाहीं याबद्दल समाजास त्यांनीं दोष दिला! असो. पूर्वींपेक्षां आतां शाळांचा खर्च वाढला आहे. हल्लीं मुलां जवळून थोडी फीही घेण्यांत येते. म्युनिसिपालिटी व सरकार यांच्याकडून ग्रँटही मिळतात, तथापि खर्च भागत नाहीं. रा. रा. सोहोनी ह्यांचीं दुसरीं कामें वाढल्यामुळें व ते प्रथम परळ येथें रहावयास गेल्यामुळें त्यांस हें काम सोडावें लागलें. आतां कित्येक वर्षे रा. रा. विष्णु बल्लाळ वेलणकर ह्या सर्व शाळांचे सुपरिंटेंडंड असून ते सर्व शाळांच्या देखरेखीचें काम स्वतः पहात असतात. खर्चाचें वाढतें प्रमाण अनुभवून देणग्या मिळविणें, एकादा नाटकाचा, सिनेमाचा प्रयोग मिळविणें वगैरे सर्व कामें ते एकटे जातिनिशीं करीत असतात, म्हणून रात्रींच्या शाळा हल्लींच्या व्यवस्थित स्वरूपांत आहेत, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. असो.

सन १८९९ सालीं ज्या वेळीं रात्रींच्या शाळा समाजाकडे आल्या त्या वेळीं त्यांची संख्या ६ होती असें वर आलें आहेच. पुढें १९१२ पर्यंत ही संख्या दाहांपर्यंत वाढत गेली. तथापि नंतर खर्चाचें मान फार वाढलें; मासिक वर्गणी व देणग्या कमी झाल्या; स्वतः म्युनिसिपालिटी व दुसऱ्या कित्येक

लोकोपकारी संस्था यांनीं प्रार्थनासमाजाच्या शाळांच्या धर्तीवर रात्रीच्या शाळा स्थापिल्यामुळें तीन शाळा कमी कराव्या लागल्या व त्यामुळें हल्लीं सात शाळा समाज चालवीत असून त्यांपैकी दोन वांद्रें येथें असून त्याला तेथील स्कूल्स कमीटीची थोडी ग्रँटही आहे. वांद्र्याच्या शाळेंतील विद्यार्थ्यांपासून फी घेण्यांत येत नाहीं. ह्या शाळांतून ब्राम्हण, मराठे, भंडारी, वाणी, लोहार, ख्रिस्ती, कोळी, अस्पृश्य मानलेले, मुसलमान असे अनेक जातींचे व धर्मांचे विद्यार्थि शिकत आहेत. यावरून सर्व जातींच्या व धर्मांच्या लोकांस ह्या शाळांपासून फायदा होत असल्याचें दिसून येईल. तसेंच धंदेवारी जरी पाहिली तरी तीही बोधपरच आहे. शिकणाऱ्या विद्यार्थ्यांत कारकुनी करणारे, ऑफिसांतील शिपाई, पोस्टमेन, मोटार हाकणारे, गिरण्यांत काम करणारे मजूर, कारखान्यांत काम करणारे, हमाली करणारे, शिंपी, पोर्टर, दुकानदार, टाईप जुळविणारे, फेरीवाले, बुकबाइंडर असे निरनिराळे धंदे करणारे असतात. अशा प्रकारें परमेश्वराच्या कृपेनें सतत अर्ध शतक ह्या शाळा लोकशिक्षणाचें काम कोणत्याही प्रकारें विशेष गाजावाजा न करितां करीत आहेत. इतकीं वर्षे अल्पस्वल्प काम झालें तें परमेश्वरानेंच करवून घेतलें व त्याचें श्रेय त्यासच आहे. आजपर्यंत हजारों विद्यार्थ्यांना ह्या शाळांनीं ज्ञानाचे दरवाजे खुले ठेविले, हजारो विद्यार्थ्यांच्या ज्ञानांत भर पडल्यामुळें त्यांस सुस्थिति प्राप्त झाली आहे. तथापि शाळांमध्यें पुष्कळ सुधारणा करण्यास अवकाश आहे हें समाज जाणून आहे. शिक्षकांची संख्या वाढविणें, अधिक लायक शिक्षक नेमणें, त्यांस अधिक वेतन देणें, दिवेबत्ती विषयींचा खर्च वाढविणें, नवीन नवीन पण गरीब वस्तीच्या ठिकाणीं नवीन शाळा स्थापणें इ० सुधारणा करणें आहेत. परंतु ह्या सर्व गोष्टी लोकाश्रयावर अवलंबून आहेत. म्युनिसिपालिटी व सरकार यांच्या सांवत्सरिक ग्रँटस् ह्या संस्थांना आहेत, त्या पुरेशा नाहींत. म्युनिसिपालिटी व सरकार ह्यांच्या अधिकाऱ्यांनीं शाळांविषयीं अधिक सहानुभूति दाखवावयास पाहिजे. सरकारी नियमांप्रमाणें येथलें शिक्षण सांपडणें शक्य तरी कसें आहे ही साधी गोष्टी कित्येक अधिकारी लक्षांत ठेवीत नाहींत. व सरकारी नियमाप्रमाणें कांटेतोलपणानें परीक्षा घेऊं पहातात. ह्याला रा. सा. टाकी व रा. सा. पाणंदीकर यांच्या सारखे कांहीं इन्स्पेक्टर्स अपवाद आहेत. रा. सा. टाकी हे विद्यार्थ्यांचा मगदूर, चालकांच्या अडचणी व जें शिकविणें शक्य झालें असेल त्या मानानें पूर्ण सहानुभूतिपूर्वक परीक्षा घेत असत, व विद्यार्थ्यांस शाळांपासून कांहीं लाभ होत आहे किंवा नाहीं हें पहाण्याकडे त्यांचा

सर्व कल असे. शाळांच्या चालकांस मुख्य अडचण अशी भासते कीं, ह्या शाळांतून शिकणारे विद्यार्थि सारखे टिकून राहात नाहींत; कांहीं सणवार ( शिमगा, दिवाळी, गौरी, ) आले कीं शाळा ओस पडण्याची पाळी येते ! निरनिराळ्या धंद्यांच्या तेजीमंदीचाही विद्यार्थ्यांच्या हजेरीवर तत्काळ परिणाम होतो. अशी स्थिति असल्यामुळें शिक्षकांना आपल्या श्रमाचें फळ दाखविणें जड जातें. आणि कित्येक अधिकारी सरकारी नियमांप्रमाणें ह्या विद्यार्थ्यांची परीक्षा घेऊन त्यावरून ग्रँट किती द्यावयाची तें ठरवूं पहातात ! अशा अधिकाऱ्यांशीं चालकांना वाद घालतां येत नाहीं व जी कांहीं ग्रँट मिळेल ती निमूटपणें घ्यावी लागते. यासाठीं ह्या शाळांतील ज्या विद्यार्थ्यांची परीक्षा घ्यावयाची ते किती दिवस टिकून आहेत; ते कोणकोणत्या समाजांतून आले आहेत, त्यांची धांव कोठवर आहे, ह्या सर्व गोष्टींचा विचार करून, सहानुभूति दाखवून, ते जर आपलें परीक्षेचें अस्त्र रा. सा. टाकी यांचें अनुकरण करून सोडतील तर त्या योगें मुलांस व शिक्षकांस उत्तेजन मिळणार आहे. सर्व प्रकारची अनुकूल स्थिति जेथें आहे तेथें परीक्षा घेतांना कांटेतोलपणा असला तर कांहीं हरकत नाहीं.

---

# धर्मप्रचार व्यवस्था.

The Theist believes that the institution of an organized body of priests is of great use in conserving the interests of religion........An order of men selected for the priestly office, and devoting their life's best energies to its discharge, is absolutely necessary in the best interests of religion.

*—M. G. Ranade (1870).*

प्रार्थनासमाजाचीं अगर ब्राह्मसमाजाचीं धर्मतत्त्वें अशीं आहेत कीं, त्यांचा अनेक मार्गांनीं प्रचार व प्रसार व्हावयास हवा. मंदिरांतील उपासना हें एक साधन आहे; परंतु एक तर समाज स्थापन झाल्यापासून पुढें सुमारें दहा वर्षेपर्यंत मंदिरांत होणाऱ्या उपासना कांहींशा बंधनविरहित होत्या. अनेक सभासद उपासना चालविणारे अवश्य असावेत. परंतु मुख्य गोष्टींसंबंधानें समविचारांचीं माणसें नेहमींच लाभणें शक्य नसतें. त्यामुळें ध्येयभिन्नत्वही कधीं कधीं उपासकांच्या उपदेशांत येण्याचा संभव असतो. त्याचप्रमाणें एकाच उपासकास विशेष प्राधान्य मिळालें म्हणजे मूळ ध्येय मागें पडून त्याच्या विचारांच्या प्रवृत्तीप्रमाणें ध्येयाचे रंग पालटूं लागतात. उदाहरणार्थ, ब्रह्मानंद केशवचंद्र सेन ह्यांचेंच आपण उदाहरण घेऊं. त्यांनीं ब्राह्मसमाजाचें नांव सर्वतोमुखीं केलें याविषयीं संशय नाहीं. पण, त्यांच्या अनेक व्याख्यानांत व उपदेशांत ख्रिस्ताकडे विशेष कल दिसत असे व ब्राह्मसमाजाचा ज्या एका गोष्टीवर विशेष कटाक्ष कीं देव व त्याचा भक्त ह्यांमध्यें कोणाही मध्यस्थाची जरूरी नाहीं, तो बाजूस राहून प्रत्यक्ष केशवचंद्र सेन तसे मध्यस्थ होण्याची भीति वाटूं लागली !* ही भीति इतक्या

---

* केशवचंद्र सेन ह्यांस त्यांच्या एका शिष्यानें लिहिलेल्या एका पत्रांत त्यांस उद्देशून केलेल्या प्रार्थनेंत पुढील मजकूर आहेः—

"Pradhan, Lord, I am a great sinner; how shall I approach the throne of great holiness ? I feel myself incapable to pray to the Most High. Do I beseach you, pray to your Father for me."

*Leonard's History of Bramha Samaj.*

थरास गेली कीं, ज्या वेळीं ब्राह्मसमाजांतील दोन पक्ष एक व्हावेत, निदान त्यांच्यामध्यें अधिक दळणवळण व्हावें, अधिक सलोखा व्हावा, अशी प्रबळ इच्छा उत्पन्न झाली होती, व महर्षि व ब्रह्मानंद यांच्यांतील करारनाम्याचा खरडाही तयार झाला होता त्या वेळीं केशवचंद्र सेन' पक्षाच्या मंदिरांत उपासना चालविण्यासाठीं महर्षि देवेंद्रनाथ आग्रहाचें आमंत्रण आल्यावरून गेले असतां उपदेशाच्या वेळीं, सर्व ब्राह्मांना अशी धोक्याची सूचना देणें त्यांना जरूर वाटलें कीं, इष्ट वाटत असेल तर तुम्ही बेलाशक खिस्ती धर्माचा स्वीकार करा; परंतु ब्राह्मसमाजांत राहून सर्व काळ खिस्तीधर्म व खिस्त ह्यांविषयीं उपदेश किंवा खिस्त हा मध्यस्थ मानून ब्राह्मसमाजांत राहाणें असला प्रकार करूं नका. * आणि आपल्या प्रांतीं प्रार्थनासमाजानें ब्राम्हसमाज हें नांव घ्यावें अशी चळवळ ज्या वेळीं सुरू झाली, त्या वेळीं डा. भांडारकरांनीं रा. ब. माधवराव रानडे ह्यांना लिहिलेल्या एका खाजगी पत्रांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं—

"There is much in the feelings and doings of Babu Keshab's section that I consider very objectionable, while Devendra's section consider it no business of theirs to encourage such reforms as intermarriage and giving up caste...Keshab's religion clearly took its rise from Christianity. For years all his thoughts were cast in a Christian mould; and the party courts and values the sympathy of Christians, I may say exclusively...The religious and philosophic ideas of

---

* In the sermon which Devendranath delivered, he brooched the subjects of Keshab's leaning to Christianity and belief in the divine mission of Jesus Christ, and pointed out how incompatible this was with the dictates of Brahmoism which recognised but one supreme God. He exhorted his hearers to be either Christians or Brahmas, but not attempt to reconcile the two systems of religion.

—*Leonard.*

Hindus have been influencing Europe and a neglect of them on our part is sure to be attended with melancholy results."*

सारांश, एकीकडे कोणाही एका व्यक्तीचें प्राबल्य वाढूं न देतां अशा प्रकारचे अनिष्ट परिणाम आमच्या मंडळीला टाळावयाचे होते; दुसरीकडे केवळ साप्ताहिक उपासनांच्या वेळीं होणाऱ्या उपदेशांच्या द्वारें आध्यात्मिक जीवनाची वाढ होणें शक्य नसल्यामुळें, आपलीं ध्येयें, आपली जबाबदारी ह्यांविषयीं जागृति उत्पन्न व्हावयास पाहिजे होती. प्रत्येक सभासद हा एकार्थी समाजाचा प्रचारक नेहमीं असतो. त्याचें वर्तन, त्याची रहाणी, त्याचें कौटुंबिक जीवन, त्याचें सार्वजनिक चारित्र्य, त्याचे विचार, त्याची भाषा ह्या सर्वांच्या द्वारें त्याच्या उच्च ध्येयाचा त्याच्या शीलावर किती परिणाम झाला आहे हें व्यक्त होत असतें. परंतु जेथें ब्राह्मसमाजांतील प्रथम काळांतील अनुभवाची† येथें पुनरावृत्ति होत होती, तेथें एव्हांच सर्व सभासद चालते बोलते प्रचारकच आहेत असा अनुभव येण्याची फारशी आशा नव्हती. म्हणून योग्य प्रकारची जागृति करण्यासाठीं धर्मप्रचारकांची जरूर आहे असें १८७० सालींच रा. ब. रानडे ह्यांना वाटत असल्यामुळें, १८८१ सालीं येथें ते प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट असतांना 'आपल्या समाजास मान्य जो धर्म त्याच्या वृद्ध्यर्थ एकादा धर्मप्रचारक असावा व त्याचा व समाजसंबंधीं इतर खर्च भागविण्यासाठीं प्रार्थनासमाजाच्या सभासदांनीं आपल्या प्राप्तीच्या मानानें दरमहा द्रव्य द्यावें' असें त्यांच्या मनांत आलें व त्यांनीं ती गोष्ट प्रो. रामकृष्णपंत भांडारकर व

---

* हें महत्त्वाचें पत्र रा. नरहर रघुनाथ फाटक ह्यांना माधवरावांच्या कागद पत्रांच्या ढिगाऱ्यांत सांपडलें. त्याचा त्यांनीं रानडे चरित्रांत उपयोग केला आहे.

† The external social life of Brahmas, says Miss Collett, differed but little from that of their polytheistic countryman, many of them conforming to all those degrading sacraments of idolatry which are interwoven with ordinary Hindu life. Meetings had occasionally been held at the desire of zealous Brahmas for the purpose of adopting the best means of terminating this unworthy conformity; but the result of such meetings had always been in favour of the conservatives.

दुसरे कांहीं मित्र ह्यांच्याजवळ काढली. त्यांस ती मान्य झाली. इतक्यांत राव-बहादुर माधवराव रानड्यांची बदली झाली. तथापि त्यांच्या जाण्यानें हा विषय मागें पडला नाहीं. समाजाच्या सभासदांमध्यें आपापसांत ह्या गोष्टीचा विचार चालू असे. अखेरीस ता. ३१ जुलै १८८१ रोजीं समाजाच्या सभासदांची सभा भरली होती, त्या वेळीं ह्या विषयाचा विचार झाला. ह्या सभेच्या अध्यक्षस्थानीं प्रो. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांची योजना झाली होती. ह्या कार्यास सभासदांनीं कोणत्या प्रकारें साहाय्य करावयाचें ह्याचा बराच खल झाल्यावर "जमलेल्या सभासदांनीं प्रार्थनासमाजाचीं धर्मप्रचार व इतर गोष्टींसंबंधानें कर्तव्यें ह्यांबद्दलच्या खर्चाकरितां आपल्या मिळकतींतून शेंकडा दोन टक्केप्रमाणें पैसा देण्याचें कबूल केलें." नंतर आणखी कांहीं सभासदांनीं ह्या कार्यास आपली मान्यता दर्शविल्या-वर सर्व सभासदांस पुढीलप्रमाणें पत्र लिहिण्याचा ठराव सर्वांनुमतें झालाः—

वि. वि. पुढें लिहिलेल्या विषयाचा विचार होऊन त्याबद्दलचा आपला मनो-दय कृपा करून सत्वर कळविण्यांत यावा.

२. आपण सत्य मानिलेल्या धर्मास आपल्या अंतःकरणांत दृढता यावी व त्याचें संरक्षण होऊन तो प्रसृत व्हावा ह्या गोष्टीची अपेक्षा फार आहे असें आपण कबूल कराल. तर ह्या गोष्टी श्रमावांचून साध्य होत नाहींत. तो श्रम प्रत्येकानें केला पाहिजे. परंतु इतर कर्तव्यें असल्यामुळें व्हावा तितका श्रम प्रत्येकाकडून होत नसल्यास कोणी करावयास सिद्ध आहेत त्यांस साहाय्य करणें हें आपलें कर्तव्य आहे व तें साहाय्य करण्याचें मुख्य साधन द्रव्य आणि धर्माच्या संबंधानें द्रव्याचा व्यय सर्व पृथ्वीवर लोक करीत असतात. कारण, धर्मापेक्षां दुसरी मोठी गोष्ट नाहीं. तिजकरितां द्रव्य खर्च करणें हें आपल्या कर्तव्यांपैकीं अत्यंत सुलभ आणि सहज होण्यासारखें कर्तव्य आहे. परंतु एकेश्वरपंथाचे जे आम्ही प्रार्थना-समाजाचे सभासद त्यांकडून असल्या प्रकारचा व्यय फार थोडा होतो, किंवा पुष्कळांकडून कांहींच होत नाहीं असें म्हटलें तरी चालेल. आणि पाहूं गेलें तर आपल्या धर्माच्या संबंधानें आपलीं कर्तव्यें तर फार मोठीं * पडलीं आहेत त्यांस

---

* प्रार्थनासमाजाशीं सहानुभूति असणारांची आमच्यासंबंधानें प्रथम जेव्हां फक्त ४ आणे वर्गणी ठेविली तेव्हांपासून काय अपेक्षा होती तें हिंदु रिफॉरमर पत्राच्या ता. १ आगस्ट १८६७ मधील अंकावरून सुव्यक्त होत आहेः—

"ह्या मंडळीपासून असंख्यात मोठमोठालीं कामें व्हावयाचीं आहेत. भजना-साठीं स्वतंत्र गृह बांधावयाचें आहे. पुस्तकें छापावयाचीं आहेत. देशोदेशीं धर्मो-

ाप्याप हात लागलाच नाहीं. समाज स्थापून आज इतकीं वर्षें झालीं, तथापि ार्वांचें काम तें कोणाचेंच नाहीं अशा न्यायानें हा काळपर्यंत तें राहून गेलें तें ालें; परंतु आतां तरी होईल तितकी त्वरा करणें अवश्य आहे.

३. सध्या खर्चाचें मुख्य काम म्हटलें म्हणजे जर कोणी एखादा योग्य ुरुष आपला इतर धंदा सोडून धर्मप्रचारकाचें काम पत्करील तर त्याचा व याच्या कुटुंबाचा चरितार्थ चालविणें. दुसरें परोपकाराचें काम म्हणजे पंढरपूर ेथील आर्फनेज म्हणजे अनाथ बालकाश्रम याची व्यवस्था समाजानें आपणा- ाडेस घेतली आहे, त्याजवरील शिक्षकाच्या चरितार्थाची तजवीज चालविणें ाहे व आश्रमाच्या संबंधानें जरूर पडल्यास थोडाबहुत खर्च करावा लागेल. शेवाय मनुष्यांची व द्रव्याची मदत मिळाल्यास ग्रंथ काढणें, सभा करणें, स्त्रियांच्या व मुलांच्या शिक्षणाकडेस विशेष लक्ष देणें इत्यादि अज्ञान व अधर्म ूर करण्याचे प्रकार निघतील त्यांचा विचार होईल.

४. आतां सदरील कामें बजाविण्यास द्रव्याची जी मदत पाहिजे ती प्राप्त करून घेण्याचा एकच मार्ग आहे, तो हा कीं प्रत्येक सभासदानें आपल्या मिळक- तीचा अमुक कांहीं तरी अंश द्यावा. म्हणून आपापल्या मिळकतींतून शेंकडा दोन रुपये या कामाकडेस द्यावे, असा विचार होऊन त्याप्रमाणें मदत करण्यास समाजांतील कांहीं गृहस्थांनीं कबूल केलें आहे. त्यांचीं नांवें समाजांत लिहिलीं आहेत, त्याप्रमाणें देण्याचें आपण मान्य कराल अशा भरंवशानें हें पत्र पाठविलें आहे. तरी आपण सदरहूप्रमाणें दरमहा काय रक्कम देणार तिचा आंकडा लिहून

डॉ. आत्माराम पांडुरंग.
प्रो. रामकृष्ण गोपाळ भांडारकर.
ा.ब. महादेव गोविंद रानडे.
,, शंकर पांडुरंग पंडित.
रा. वामन आबाजी मोडक.
,, बाळ मंगेश वागळे
ा.सा. चिंतामण नारायण भट.
रा. मुकुंद बाळकृष्ण गांगनाईक
,, नरसिंगराव भोलानाथ.
,, यशवंत पुरुषोत्तम मणेरीकर.
,, गंगाधर बाळकृष्ण गद्रे.
,, काशीनाथ पांडुरंग परब.
,, पांडुरंग विनायक करमरकर.

---

ादेशक पाठवावयाचे आहेत व दुसरीं अनेक कृत्यें करावयाचीं आहेत. तर म्शांकरतां द्रव्याची अवश्यकता फार. म्हणून वर्गणीदारांचे दोन वर्ग करून ाहिल्या वर्गास निदान दरमहा दोन रुपये ठेवावे व त्यापासून आरंभीं देणगी- ाखल कांहीं घ्यावें. दुसऱ्या वर्गास सरसकट निदान आठ आणे तरी असावे व त्यावर देणगीचा वगैरे बोजा ठेवूं नये."

,, लक्ष्मण गणेश मुंज.
,, मोरो विठ्ठल वाळवेकर.
,, नारायण महादेव परमानंद.
,, भास्कर हरि भागवत.
,, रामजी संतूजी आवटे.
,, जगन्नाथ हरिश्चंद्र

पंधरा दिवसांचे आंत कृपा करून कळवावें.

५. या गोष्टीचा विचार करितांना इतकें लक्षांत आणिलें पाहिजे कीं, धर्मसंबंधीं कामासारिखें श्रेयस्कर व अवश्य कर्तव्य दुसरें कांहीं नाहीं, आणि जर त्यांतून कांहीं अंश द्रव्यद्वारा सिद्धीस जात आहे तर ह्यासारखा दुसरा सुलभ उपाय नाहीं. ह्याप्रमाणें द्रव्याचें साहाय्य करण्यास जर आम्ही नाकबूल झालों, तर एवढेंच सिद्ध होईल कीं, आपल्या धर्मावर आपली केवळ शाब्दिक श्रद्धा आहे. त्याकरितां थोडें दानसुद्धां खरचण्याविषयीं आमची प्रवृत्ति होत नाहीं. एकेश्वर मतानुयायी आम्ही फार थोडे लोक आहों, तेव्हां ह्या धर्मासंबंधानें अवश्य जीं कामें त्यांस सर्वांनीं हात लाविल्याशिवाय ह्या कामाची व्हावी तशी सिद्धि होणार नाहीं इतकेंच नाहीं; तर आपण आपल्या पहिल्या कर्तव्यास जागलों नाहीं असें होईल. ह्या सर्व गोष्टींचा गंभीर व शांत अशा रीतीनें विचार करून मग काय तो निर्णय करावा.

सदरहूप्रमाणें जें द्रव्य जमेल त्याच्या व्यवस्थेविषयीं द्रव्य देणारांच्या विचारानें मागाहून नियम करण्यांत येतील. तूर्त इतकेंच सुचविलें आहे कीं पैसा देणारे ज्या गांवीं रहात असतील त्या ठिकाणीं समाज असल्यास त्या समाजाच्या चालू खर्चासाठीं ते जितकी वर्गणी देत असतील तितकी शेंकडा दोन टक्क्यांच्या रकमेंतून वजा करण्यास हरकत नाहीं.

वर लिहिल्याप्रमाणें या पत्राचें उत्तर पंधरा दिवसांचे आंत पाठविण्याची कृपा करावी, हे विनंति."

समाजाचे त्या वेळचे चिटणीस रा. रा. भास्कर हरि भागवत ह्यांच्या सहीनें ता. १४ सप्टेंबर १८८१ रोजीं वरील पत्र सर्व सभासदांकडे रवाना झालें. ह्या पत्रास सत्तावीस सभासदांकडून उत्तरें आलीं. त्यांत १९ सभासदांनीं आपल्या प्राप्तींतून शेंकडा दोन टक्के देण्याचें कबूल केलें; ६ जणांनीं ह्यापेक्षां कमी देण्याचें कबूल केलें आणि एका सभासदानें उद्देशाविषयीं आपली मान्यता दर्शविली; परंतु नियमित मदत देण्याचें कबूल न करितां कधीं काळीं मदत देण्याचें दर्शविलें. रा. रा. बाळ मंगेश वागळे व रा. काशीनाथ पांडुरंग परब ह्यांनीं वर्गणीदारांच्या यादींतून आपलीं नांवें कमी करून घेतलीं.

यानंतर जे वर्गणीदार कायम ठरले त्यांजकडे खालीं लिहिल्याप्रमाणें चार गृहस्थांनीं आपल्या सह्यांचें पत्र ता. २१ डिसेंबर १८८१ रोजीं पाठविलें:—

वि. वि. आपणास ता. १४ सप्टेंबर १८८१ रोजचें पत्र समाजाच्या चिटणिसांकडून गेलें होतें त्याचें उत्तर आपणांकडून आलें. त्यांत आपण आपल्या प्राप्तीचा अंश शेंकडा दोन टक्क्यांप्रमाणें देण्याचें कबूल केलें आहे. त्या प्रमाणानें पहिल्यानें ता. १ जानेवारी १८८२ पासून तीन महिन्यांची म्हणजे जान्युआरी, फेब्रुआरी व मार्च १८८२ या तीन महिन्यांची वर्गणी सदरहू दराप्रमाणें तूर्त आम्हांतून कोणा तरी एकाकडेस ता. १५ जानेवारीच्या आंत पाठविण्याची मेहेरबानी करावी. या वर्गणींतून आपण स्थानिक कोणत्याही प्रार्थनासमाजानिमित्त वर्गणी देत असाल तिचा तीन महिन्यांचा ऐवज वजा करावा.

आपणास पूर्वीं लिहिलेंच आहे कीं, हा दोन टक्यांप्रमाणें वसूल केलेला पैसा मुख्यत्वेंकरून एकेश्वर मताचा प्रसार करण्याच्या कामीं खर्च करावयाचा आहे. तो अशा रूपानें कीं, प्रार्थनासमाजानें गृहीत जो एकेश्वर धर्म त्याचा प्रसार, शिक्षण, व्याख्यानें, कीर्तनें, वर्तमानपत्रें, ग्रंथ इत्यादिकांच्या योगें करावा.

तूर्त रा. रा. सदाशिव पांडुरंग केळकर यांची योजना मुंबई येथें करावयाची आहे. ते समाजसंबंधीं कामें मुंबईंत करून बाहेरगांवींसुद्धां सदरहू कामाकरितां जात राहतील. तूर्त त्यांच्या निर्वाहासाठीं दरमहा ४० रुपये पोहोंचते करावयाचें योजिलें आहे. मशारनिल्हे सदाशिवराव हे सदरहू कामास फार लायक आहेत आणि त्यांची योग्यता हीच तर काय, परंतु हीहूनही मोठ्या रकमेपेक्षां अधिक आहे हें सांगणें जरूर नाहीं. परंतु ते इतर धंदा सोडून हें काम हातीं घेणार, तेव्हां त्यांच्या चरितार्थाची तजवीज झाली पाहिजे म्हणून ही व्यवस्था करणें आहे.

ही रकम त्यांस वेळचेवेळीं पोंचती व्हावी आणि ता. १ जानेवारी १८८२ या दिवशीं काम सुरू करितां यावें म्हणून ही तीन महिन्यांची वर्गणी या प्रथम खेपेस एकदम मागण्यांत आली आहे. पुढें दरमहाचे दरमहा वर्गणी वसूल करण्याचा बेत आहे.

या फंडाच्या मुंबईतील वर्गणीदारांची सभा ता. २८ नोव्हेंबर १८८१ रोजीं भरली होती. तींत दहा वर्गणीदार हजर असून, त्यांतून पांचांचें मत ह्या पैशाची व्यवस्था समाजाकडे द्यावी असें पडलें, आणि पांचांचें वर्गणीदारांनीं आपणांतून निराळी कमीटी नेमून तिनें व्यवस्था करावी असें पडलें. तर आपलें मत ह्या

दोहोंतून कोणत्या पक्षाकडे आहे तें कृपा करून ता. ३१ डिसेंबरच्या आंत लिहून पाठवावें. हीं मतें येतील त्याप्रमाणें नियमांची वगैरे पुढील योजना करण्यांत येईल. कळावें, हे विनंति.

रामकृष्ण गोपाळ भांडारकर,
शंकर पांडुरंग पंडित,
ता. २१ डिसेंबर १८८१. नारायण महादेव परमानंद,
भास्कर हरि भागवत.

ह्या चारच सभासदांच्या सह्यांचें पत्र पाठविण्याचें कारण असें झालें कीं, समाजाचे सर्व सभासद ह्या कार्यास मदत करितील असें प्रथम वाटलें होतें. परंतु तसा अनुभव न आल्यामुळें, समाजाच्या चिटणीसांच्या सहीनें पत्रें पाठविणें सोईचें वाटलें नाहीं. म्हणून रा. ब. माधवराव रानडे पुण्यास गेल्यापासून ज्या चार गृहस्थांनीं ह्या कार्यासंबंधानें सर्व खटपट चालविली होती त्यांच्याच नांवें हें पत्र पाठविलें.

ह्या पत्रांत म्हटल्याप्रमाणें रा. रा. सदशिव पांडुरंग केळकर हे प्रार्थनासमाजाचे प्रचारक ह्या नात्यानें ता. १ जानुआरी १८८२ पासून काम पाहूं लागले. ते काय काय कामें करीत होते व ह्या कार्यासंबंधानें त्यांची स्वतःची भावना काय होती हें त्यांच्याच पुढें दिलेल्या पहिल्या रिपोर्टावरून दिसून येईल. परंतु ह्या फंडाच्या व्यवस्थेसंबंधानें विचार मुकरर होईना. बहुमत समाजाकडे व्यवस्था द्यावी असें होतें व त्याप्रमाणें ठरावही झाला. तथापि वर्गणीदारांचीच एक कमिटी नेमून त्या कमीटीकडे सर्व व्यवस्था असावी असा अभिप्राय कित्येकांचा पडल्यामुळें प्रो. रामकृष्णपंत भांडारकर व रा. रा. वामनराव मोडक ह्यांनीं मिशन फंडाच्या सेक्रेटरीस पुढील पत्र लिहिलें:—

Sir,

We have heard that at a meeting of the Subscribers to this Fund held on 5th February last, it was resolved that the management of this fund should be handed over to the Prarthana Samaj General Committee. As we understand that only small minority of those who are members of the Samaj have sub-

scribed to the Fund we think that the arrangement proposed would be attended with great difficulty in actual practice, and will fail to secure that general sympathy from the outside Samajes and also other sympathisers, which it is desirable to secure. We, therefore, request that you will bring this matter before the subscribers to the fund for further consideration. Our own view is that the management of the fund should be entrusted to a committee appointed by the subscribers to the fund. The practical details of the scheme of management, which we propose you should submit for the consideration of the Committee, will be gathered from the following:—

1 The committee should be elected ever year during the anniversary of the Bombay Samaj.

2 The subscribers who are not present should be allowed to vote by proxy.

3 Every year an annual budget of the fund showing its actual receipts and expenditure for the past year, and the estimate of the next year should be prepared by the committee, and submitted to the subscribers' meeting and should be adopted with such modifications as may be approved by the majority of subscribers.

4. The budget should set apart a portion of the amount available for expenditure under four heads, viz. 1 Mission Fund, 2 Orphanage Fund, 3 Newspaper (cheap literature) Fund, 4 School Fund, and 5 Miscellaneous.

5 The committee should have the power of disbursing the money allotted to each head without reference to the subscribers.

6 No extraordinary charges should be incurred without the consent of the subscribers, unless the amount is less than Rs. 50/- and the occasion is so urgent as to make it impossible to obtain previous sanction.

7 The Pandharpur Orphanage should be regarded in so for as the allowance paid to the missionary in charge of it is concerned to be a part of the Mission Fund.

8 Rules of conduct of for the missionaries as set forth in the sketch prepared at the time of the last anniversary should be communicated to the missionary or missionaries for their guidance.

9 The present arrangement should continue on trial till the next anniversay of the Prarthana Samaj, after which period it may be revised by the aid of additional experience.

*V. A. Modak.*

Poona, 22nd March (1882). *R. G. Bhandarkar.*

अखेरीस धर्मप्रचार फंडाचें व व्यवस्थेचें काम वरील नियमानुसारें सभासदांच्या कमीटीकडे देण्याचें ठरलें व त्याप्रमाणें व्यवस्था करण्यासाठीं जी पहिली कमिटी नेमिली गेली तींतील सभासदांचीं नांवें पुढें दिलीं आहेतः—

डा. आत्माराम पांडुरंग

रा. वामन आबाजी मोडक

,, नारायण महादेव परमानंद

,, घनश्याम नारायण पंडित

,, भास्कर हरि भागवत–फंडाचे चिटणीस व खजिनदार.

## धर्मप्रचारकांचा आपल्या कामासंबंधाचा अगदीं पहिला रिपोर्ट.

कृ. सा. न. वि. वि. मी हल्लीं प्रार्थनासमाजाच्या संबंधानें जें कांहीं काम करितों त्याजबद्दल हकीकत कळविण्याविषयीं आपण मला सूचना केली, तिजप्रमाणें पुढील चार ओळी आपणास कळवीत आहें.

१ कामाविषयीं हकीकत कळविण्यापूर्वीं एक गोष्ट कळविणें मला अवश्य वाटतें ती ही कीं, मीं जें हें काम पत्करिलें आहे, तें करण्यास मी योग्य आहें अशा समजुतीनें पत्करिलें आहे असें नाहीं. अशा कामास मजपेक्षां फारच अधिक योग्यतेचा मनुष्य पाहिजे होता, व अशा मनुष्याची योजना झाली असती तरच ह्या कामाकरितां आपल्या फंडाचे वर्गणीदार मोठ्या उदार बुद्धीनें जें द्रव्यसाहाय्य करीत आहेत त्याचा यथायोग्य उपयोग झाला असता. परंतु असा मनुष्य त्या वेळेस कोणी मिळण्यासारखा दिसेना व कोणा तरी मनुष्याची योजना करून मला हें काम पत्करण्याविषयीं विचारलें, तेव्हां आपल्या हातून काय होईल तेवढें करून पहावें अशा विचारानें मीं हें काम पत्करिलें आहे. अजूनही कोणी योग्य मनुष्य मिळेल तर उत्तमच होईल.

२ सध्यां मी जो उद्योग करीत आहें त्याचे दोन प्रकार आहेत. एक माझी स्वतःची शक्ति वाढविण्यासंबंधाचा व दुसरा प्रत्यक्ष उपयुक्त कामाच्या संबंधाचा.

३ स्वतःची माहिती वाढविण्यासाठीं मी इंग्रेजी पुस्तकें व वर्तमानपत्रें ( बहुतेक अंशीं धर्मसंबंधीं ) वाचीत असतों; गुजराथी व बंगाली वाचनाचा साधारण अभ्यास केला आहे व तो वाढवीत आहें. संस्कृत शिकण्यासही प्रारंभ केला आहे. पण त्याचा व्यवहारांत उपयोग होण्यासारखा अभ्यास व्हावयास बरेच दिवस लागतील असें वाटतें. गेल्या वर्षी मी सहासात महिने पुण्यास राहिलों होतों, त्याचा मुख्य उद्देश स्वतःची माहिती वाढविण्याकरितां प्रो. रामकृष्णपंत भांडारकर व रा. रा. वामनरावजी मोडक ह्यांचा सहवास करावा हा होता. ह्या दोघांही गृहस्थांस त्यांच्या दुसऱ्या कामांमुळें सांपडावी तितकी फुरसत सांपडत नसे. तरी त्यांतल्यात्यांत त्यांनीं वेळ काढून तो मजकडे लाविला. ह्यांजपाशीं मीं कांहीं ग्रंथांचा भाग वाचिला व धर्मसंबंधीं विषयांवर संभाषण केलें. ह्यापासून मला फार लाभ झाला. ह्यांसारख्या गृहस्थांचा सहवास होईल तितका चांगलाच. हल्लीं वामनरावजींचें राहणें मुंबईस झालें आहे ही एक आनंदाची गोष्ट आहे. परंतु त्यांचें येणें झाल्यापासून व्हावा तितका लाभ होण्यास संधी सांपडली नाहीं. पण ह्यापुढें ती सांपडेल अशी आशा आहे. ही स्वतःच्या संबंधानें हकीकत आहे.

४ कामापैकीं कळविण्यासारखा भागही फार थोडा आहे. पुण्यास असतांना वर सांगितलेल्या दोघां विद्वान गृहस्थांच्या साहाय्यानें "प्रार्थनासंग्रह व सामाजिक उपासना" ह्या नांवाचें पुस्तक तयार करून तें छापिलें. तसेंच प्रोफेसर भांडारकर यांनीं पुण्यास दिलेल्या एका इंग्रजी व्याख्यानाचेंही पुस्तक छापून काढलें आहे. ह्याशिवाय समाजासंबंधानें चालू असलेलीं संगतसभा, भजन, ग्रंथवाचन, स्त्रियांची सभा इत्यादि व दुसरीं किरकोळ कामें मी पहात होतों. अलीकडे संगतसभा, भजन व ग्रंथवाचन हीं तहकूब आहेत. स्त्रियांच्या नेहमींच्या आठवड्याच्या सभेखेरीज त्यांस इंग्रेजी शिकविण्याचे तीन वर्ग काढिले आहेत. ते आठवड्यांतून दोन वेळ भरत असतात. ह्या वर्गांस शिकविण्याकरितां मिसेस स्लाईट ह्या एक युरोपिअन बाई केवळ परोपकारबुद्धीनें थोडे दिवस येत असत. त्या वेळेस मी त्यांस साहाय्य करीत असें. पण अलीकडे त्या आजारीपणामुळें येईनाशा झाल्यापासून सर्व वर्ग मलाच शिकवावे लागत आहेत. हे वर्ग टिकलेसे झाले म्हणजे त्यांच्या शिक्षणाची दुसरी चांगली तजवीज करावयाची आहे. सुबोधपत्रिकेंत जीं मराठी आर्टिकलें असतात त्यांतील बरींच माझीं असतात. मुलांस धर्म व नीति ह्यांचें शिक्षण देण्याकरितां अलीकडे आठवड्यांतून दोन वेळां वर्ग काढिले आहेत. अद्यापि यावीं तितकीं मुलें येत नाहींत. पण तीं येतील अशी तजवीज करावयाची आहे.

बाहेरगांवीं जे प्रार्थनासमाज आहेत ते जाऊन पहाणें हें एक कर्तव्य कामांपैकीं महत्वाचें काम आहे. परंतु आपल्या फंडाच्या व्यवस्थेकरितां कमिटीची नेमणूक गेल्या एप्रिल महिन्यापर्यंत झाली नव्हती, त्यामुळें वरील कामास लागणारा भाडें खर्च वगैरे मिळण्यास अडचण होतो. यामुळें फारसें कोठें जातां आलें नाहीं. टाणें, पुणें, नगर व पंढरपूर ह्या ठिकाणीं मात्र एकेक दोन दोन वेळां गेलों होतों. ज्या ठिकाणीं समाज नाहींत अशा ठिकाणीं जाऊन समाजाच्या मतांविषयीं लोकांस माहिती देणें ह्यासंबंधानें फक्त सोलापूर व बार्शी ह्या दोन ठिकाणीं मात्र जाणें झालें होतें. ही आजपर्यंत झालेल्या व हल्लीं चालू असून पुढें चालू राहणाऱ्या कामाची हकीकत आहे.

आतां पुढील कर्तव्याविषयीं माझे विचार काय आहेत, याविषयीं आपण विचारिलें आहे, त्यास पुढें कर्तव्य तें फारच आहे, परंतु त्या मानानें माझें सामर्थ्य अति अल्प असल्यामुळें मनोदयाप्रमाणें किती गोष्टी घडून येतील व किती मनांतल्या मनांतच रहातील, याविषयीं कांहींच सांगतां येत नाहीं, याकरितां त्यांचा पूर्वी उच्चारच करूं नये असें मला वाटतें. ह्मणून त्याजबद्दल येथें

कांहीं लिहिलें नाहीं याजबद्दल क्षमा असावी. मनांतील गोष्टींपैकीं कांहीं मित्र-मंडळींच्या व विशेषेंकरून सृष्टिचालक जो सर्वशक्तिमान परमेश्वर, त्याच्या साहाय्यानें घडून येऊन त्या कळविण्याचा सुदिन आल्यास त्या वेळीं त्या कळविणें योग्य होईल. कळावें, बहुत काय लिहिणें, लोभाची वृद्धि असावी, ही विनंति.

आपला परम नम्र सेवक,

ता. ६ जून १८८३. **सदाशिव पांडुरंग केळकर.**

अशा प्रकारें १८८२ पासून १८९४ पर्यंत बारा वर्षेपर्यंत सदाशिवरावांनीं धर्मप्रचारकाचें कार्य केलें. मध्यंतरीं त्यांस पन्नास रुपये दरमहा पोंचविण्याची व्यवस्था झाली होती. एका रिपोर्टांत " त्यांच्या हातून व्हावें तितकें काम झालें नाहीं व जें झालें तें मंडळीनें केलेल्या नियमास अनुसरून झालें नाहीं" असा उल्लेख आहे. पुढें १८९२ च्या जानेवारीपासून त्यांनीं "प्रार्थनासमाजाच्या धर्मप्रचारकाचें काम सोडलें व ब्राह्मधर्मप्रचारक म्हणून स्वतंत्रपणें काम करण्याचा निश्चय विदित केला." सदाशिवरावांनीं आपल्याला ब्राह्मधर्मप्रचारक म्हणवून घेतलें तरी त्या-योगें प्रार्थनासमाजाच्या कार्यास उत्तेजनच मिळणार हें जाणून त्यांस दरमहा वीस रुपये प्रमाणें मदत देण्याचें ठरलें व त्याप्रमाणें कांहीं काळ काम केल्यावर त्यांनीं हें काम सोडलें. भास्करराव भागवत वारल्यानंतर कांहीं वर्षे मिशनफंड कमिटी नांवाला अस्तित्वांत होती. पुढें या कार्यासाठीं वर्गणी जमा करण्याचेंही काम बंद पडलें व फंडाची व्यवस्था समाज पाहूं लागला.

सदाशिवराव केळकर धर्मप्रचारकाचें काम करीत असतां तिकडे पुण्यास रा. रा. शिवराम नारायण गोखले हेही आपल्या सामर्थ्यानुसार समाजाचें काम करूं लागले. त्यांस १८८९पासून पुढें कांहीं काळ दरमहा रु. १०ची मदत हा फंड करूं लागला. शिवरामपंतांच्या कामासंबंधानें १८८९–९० च्या रिपोर्टांत उल्लेख आहे कीं,"ते येथें आले म्हणजे समाजांतील सभासदांच्या घरीं जाऊन त्यांच्या कुटुंबां-मध्यें लहानलहानशा उपासना तसेंच मंदिरांत भजन, कीर्तन वगैरे करितात. अशा अनेक रीतींनीं मंडळीस त्यांजपासून लाभ होतो. यांचा स्वभाव मोठा सात्विक, सरळ, लीन व प्रेमळ असल्यामुळें असें काम त्यांच्या हातून केवळ बाळबोध रीतीनें होतें." १८९८ सालीं शिवरामपंतांनीं आपला अन्य व्यवसाय सोडून समाज-कार्याकडेच आपणास वाहून घेतलें व त्यांस पुण्याच्या समाजानें धर्मप्रचारक नेमिलें

व मुंबईहूनही त्यांस दरमहा १५ रुपयांची मदत होऊं लागली. रा. शिवरामपंत अद्याप धर्मप्रचारक असून पुण्याच्या समाजाकडे त्यांच्या मदतीची रक्कम रवाना होत असते. १८९२–९३ सालीं रा. ब. माधवराव रानडे, डा. भांडारकर, रा. ब. भट व रा. गंगाधरपंत गद्रे इ० ह्यांनीं बाबू कन्हय्यालाल ह्यांस धर्मप्रचारक नेमावें अशी सूचना केली होती. बाबू कन्हय्यालाल हे पोस्ट खात्यांत प्रथम नोकर होते; परंतु त्यांनीं नोकरी सोडून धर्मप्रचाराचें कार्य करावें असें योजिलें. फंडाच्या कमिटीनें वार्षिक सभेमध्यें ही सूचना मान्य करितां येत नाहीं, याबद्दल दिलगिरी वाटते असा ठराव केला. अशा प्रकारें मिशन फंडाच्या स्थापनेचा, व्यवस्थेचा, व प्रचारकार्याचा इतिहास आहे.

## नवें वळण.

सन १८९५ सालीं ब्रिटिश व अमेरिकन युनिटेरिअन ॲसोशिएशनच्या तर्फे रेव्ह. जे. टी. संडरलंड हे ब्राह्म व प्रार्थनासमाजांच्या कामाची प्रत्यक्ष माहिती करून घेण्यासाठीं हिंदुस्थानांत आले होते. त्या वेळीं ते मुंबई शहरींही आले होते. हिंदुस्थानांतील सर्व उदार धर्मविषयक चळवळी पाहून त्यांनीं दोन्ही ब्रिटिश व अमेरिकन युनिटेरिअन ॲसोशिएशननां अशी सूचना केली कीं, ह्या दोन्ही संस्थांनीं एकेक स्कालरशिप ठेवून हिंदुस्थानासाठीं लायक हिंदी तरुणाचें दोन वर्षे शिक्षण मँचेस्टर कॉलेज आक्सफर्ड, व मेडव्हील थिऑलाजिकल कॉलेजमध्यें चालवावें. तेणेंकरून हिंदी तरुणांना इकडे उदार चळवळ कोणत्या पद्धतीवर चालली आहे, त्याचें प्रत्यक्ष ज्ञान होईल व तत्त्वज्ञान व इतर विषय ह्यांचें शिक्षण होऊन त्या त्या विषयास वाहिलेल्या अध्यापकांच्या देखरेखीखालीं धर्मग्रंथाचें तुलनात्मक* परिशीलन होईल. ही सूचना दोन्ही संस्थांनीं मान्य केली व त्याप्रमाणें हिंदी विद्यार्थ्यांचें शिक्षण इंग्लंड व अमेरिका येथें होत असून त्याचा लाभ ब्राह्म व प्रार्थनासमाजांस मिळाला आहे व मिळत आहे. प्रथम ह्या शिष्यवृत्तींचा फायदा अर्थातच बंगालला मिळाला. शिष्यवृत्ति देण्यास लायक तरुण निवडण्याचें काम बंगाल्यांतील तिन्ही समाजांचे सभासद जींत आहेत अशा कमिटीवर सोंपविलें होतें. आमच्या प्रांतांतून योग्य तरुणांची निवडणूक होण्याची संधि १९०० सालीं आली. त्यापूर्वी

* प्रो. मोती बुलासा विलायतेस जावयास निघावयाच्या पूर्वी डा. भांडारकरांनीं 'आम्हीं परदेशीं धर्मज्ञानासाठीं कशाला जावयास पाहिजे' ह्या विषयावर दिलेलें धर्मपर व्याख्यान पहा.

केकावलीच्या टीकेमुळें विशेष प्रसिद्धीस आलेले रा. रा. श्रीधरपंत परांजपे ह्यांची शिफारस ह्या शिष्यवृत्तीसाठीं न्यायमूर्ति रानडे ह्यांनीं केली होती. परंतु रा. परांजपे कोणत्याही समाजाचे सभासद नसल्यामुळें मुंबईच्या समाजानें त्यांची शिफारस केली नाहीं. अखेरीस डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे तहाहयात सभासद व फर्ग्युसन कॉलेजचे अध्यापक रा. रा. मोती बुलासा, बी. ए. ह्यांची निवडणूक १९०० सालीं होऊन ता. १६ सप्टेंबर १९०० रोजीं एका इटलियन बोटींतून ऑक्सफर्ड येथें जाण्यासाठीं ते रवाना झाले. प्रो. मोती बुलासा हे मोठे धडाडीचे गृहस्थ होते. हे जातीनें जरी मारवाडी ब्राह्मण होते, तरी त्यांचा महाराष्ट्राशीं बाळपणापासून संबंध जडल्यामुळें मराठी ही त्यांची दुसरी मातृभाषा झाली होती. त्यांनीं विलायतेस जाण्यापूर्वी "सुविचारसमागम" ह्या नांवाचें एक सुंदर मासिक ज्ञानचक्षु छापखान्याच्या मालकांच्या वतीनें चालविलें होतें. त्यांचें सरळ वर्तन, गोड स्वभाव, धर्माविषयीं आस्था ह्यांचा अत्यंत इष्ट असा परिणाम पुण्याच्या व मुंबईच्या समाजांच्या मंडळीवर झाला होता व ते परत आले म्हणजे त्यांच्या हातून समाजाची सेवा उत्तम प्रकारें होईल अशी मोठी आशा वाटत होती; परंतु योगायोग कांहीं निराळाच होता. बिचाऱ्या मोती बुलासांचा बोटींत जो पाय पडला तो धडपणीं बाहेर निघालाच नाहीं! त्यांना बोटींत संधिवात झाला म्हणून आजारी स्थितींतच पोर्टसेड येथें उतरून घेतलें व तेथील हॉस्पिटलमध्यें त्यांचा अंत झाला! त्यामुळें त्यांच्यासंबंधाच्या सर्व आशा जागच्या जागींच निवाल्या. तथापि त्यांच्यासंबंधानें असा कष्टमय अनुभव आला तरी आमच्याइकडील तरुण सभासद रा. रा. विठ्ठल रामजी शिंदे* बी. ए. न डगमगतां पुढें आले व पुढल्या वर्षी

* रा. शिंदे विलायतेस जाण्यापूर्वी पुण्यास जी ईश्वरोपासना झाली तींत डा. भांडारकरांनीं पुढील उद्गार काढले:—

समाजाचें काम जोरानें सुरू करण्याच्या उमेदीनें गेल्या वर्षी एक तरुण विद्वान् व होतकरू गृहस्थ विलायतेंत जाऊन धर्मज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां निघाले होते ते परत आल्यावर समाजास पुष्कळ चांगले दिवस येतील, अशी फार आशा होती. पण आमच्या दुर्दैवानें त्यांचा वाटेंतच अंत झाला. ह्यायोगें धैर्य खचून जाऊन निराशाच व्हावयाची, पण ती अत्यंत खेदजनक वार्ता आमच्या कानीं पडली नाहीं, तोंच दुसरे एक आस्थेवाईक तरुण गृहस्थ तें काम हातीं घेण्यास पुढें आले व ते आतां विलायतेस लवकरच जाणार. ह्याकरितां त्यांच्या अभीष्टचिंतनार्थ आम्ही सर्वजण त्या परमेशाची मनोभावें प्रार्थना करण्याकरितां आज येथें जमलों आहों.

त्यांस ही स्कालरशिप मिळून त्यांची रवानगी झाली. रा. रा. वि. रा. शिंदे दोन वर्षे ऑक्सफर्ड येथें राहिले. तेथें असतांना त्यांनीं सुबोधपत्रिकेसाठीं मोठे बोधपर, मनोरंजक व अनेक प्रकारच्या माहितीनें भरलेले अनेक लेख लिहिले. युनिटेरिअन ॲसोशिएशनची शिष्यवृत्ति सालिना फक्त १०० पौंडांची असते. कॉलेजची फी वगैरे कांहीं पडत जरी नाहीं तरी विद्यार्थ्यांच्या भोजन वगैरे खर्चासाठीं ८ पौंड तेथें पुरत नाहींत. म्हणून एक तर पदरचे पैसे भरीस घालावे लागतात, किंवा तेथें उपदेश वगैरे करून पैसे मिळवून गुजारा करावा लागतो. तसें विठ्ठलरावांनीं केलें. त्यामुळें त्यांच्यासंबंधानें येथील मंडळींत मोठीच आशा उत्पन्न झाली होती. अशा प्रकारें तेथें राहून दोन वर्षांचा अभ्यासक्रम संपवून रा. शिंदे आक्टोबर १९०३ मध्यें विलायतेहून परत आले व तेव्हांपासून १९१० च्या नोव्हेंबरपर्यंत ते प्रार्थना-समाजाचे मिशनरी होते. मिशनरी असतांनाच अस्पृश्य लोकांच्या शिक्षणाच्या व उन्नतीच्या प्रश्नाकडे त्यांचें लक्ष वेधलें व १९०५ सालीं अस्पृश्यांच्या उन्नती-साठीं निरनिराळ्या ठिकाणीं जे प्रयत्न चालले आहेत त्यांचें एकीकरण कसें करितां येईल व प्रार्थनासमाज व सोशल रिफार्म ॲसोशिएशन यांना हें काम कसें करितां येण्यासारखें आहे ह्याविषयीं एक विस्तृत लेख सर नारायण चंदावरकर यांच्या सुचनेवरून त्यांनीं लिहिला. पुढें १९०६ सालीं शेट दामोदरदास गोवर-धनदास ह्यांच्या औदार्यामुळें The Depressed Classes Mission Society of India स्थापन झाली व तेव्हांपासून त्या कामाकडे त्यांचें विशेष लक्ष वेधूं लागलें. अखेरीस १९१० सालीं त्यांनीं हें काम सोडिलें व वरील सोसायटीचे मिशनरी ह्या नात्यानें ते काम करूं लागले.

रा. शिंदे यांच्या उदाहरणानें उत्तेजित होऊन रा. रा. वासुदेव अनंत सुखट-णकर ह्यांनींही युनिटेरिअन स्कालरशिप घेऊन जाण्याचा निश्चय केला व त्यांची निवडणूक झाल्यावर ज्या आठवड्यांत शिंदे परत आले त्याच आठवड्यांत प्रकृति बिघडलेली असतां व नुकतीच त्यांची प्रिय भगिनी गत झाली होती अशा स्थितींत त्यांचीही रवानगी झाली. रा. रा. वासुदेवराव परदेशीं एकंदर ३ वर्षें राहिले. ऑक्सफर्ड येथील दोन वर्षांचा अभ्यास पुरा झाल्यावर त्यांस तत्त्वज्ञानाचाच अभ्यास पुढें चालविण्यासाठीं जर्मनींतील एक स्कालरशिप मिळाली. तेथें एक वर्ष राहून त्यांनीं विशिष्टाद्वैत वेदान्तावर, (रामानुजाच्या तत्त्वज्ञानावर) एक लेख लिहिला तो summum bonum अत्युत्तम असल्याचें ठरून त्यांस Ph. D. ही पदवी मिळाली. परदेशीं असतांना त्यांनींही वारंवार लेख लिहून परदेशांतील

विचारजागृतीची येथील मंडळींना कल्पना करून दिली होती. १९०८ सालीं परत आल्यावर तेही मुंबई समाजाचे धर्मप्रचारक म्हणून काम करूं लागले. कांहीं महिने सुबोधपत्रिकेच्या संपादकाचें कामही त्यांनीं केलें. परंतु जवळ जवळ दोन वर्षें धर्मप्रचारकाचें काम करून त्यांनीं तें सोडलें. हें काम सोडल्यानंतर प्रथम त्यांनीं लाहोर येथें दयाळसिंग कॉलेजांत अध्यापकाचें काम केलें. नंतर इंदुरास अहल्याश्रम स्थापण्याची कल्पना निघाल्यावर त्यांस तेथें नेमण्यांत येऊन त्यांनीं आश्रमास मूर्तस्वरूप दिलें व भरभराटीस आणिलें.

अखेरीस ज्या मुंबई समाजाच्या विद्यमानें दोन धर्मप्रचारक काम करीत होते तेथें पुन्हा एकही प्रचारक नाहीं अशी स्थिति होऊन पुन्हा पूर्ववत् स्थिति झाली. मध्यंतरीं उत्सवाच्या वेळीं बाबू अविनाशचंद्र मुजुमदार हे येथें येऊन प्रत्येक खेपेस कांहीं महिने रहात असत. बाबू अविनाश यांचा प्रेमळ स्वभाव, मधुर भाषण, लीन वृत्ति, परमेश्वरावरील अचल निष्ठा, त्यांचें लहानथोरांत मिसळणें, अनुभवाच्या जोरावर होणारीं प्रवचनें, त्यांचें पवित्र आचरण व त्यांनीं बजावलेली समाजसेवा ह्यांयोगें ते मुंबईंत फार लोकप्रिय झाले होते व सर्वांच्या ठिकाणीं त्यांच्याविषयीं उत्कट आदरभाव वसत असे. येथें आले म्हणजे ते सर्व सभासदांच्या भेटी घेऊन सर्वांच्या ओळखी करून घेत असत. बाबू सुधीरचंद्र बानरजी हेही येथें कांहीं काळ धर्मप्रचारक ह्या नात्यानें येऊन राहिले होते. अखेरीस सुधीरबाबू येथें असतांना सेंट झेविअर कॉलेजांतील एक विद्यार्थि रा. गजानन यशवंत चिटणीस यांची व सुधीरबाबूंची ओळख झाली व रा. रा. गिरिजाशंकर त्रिवेदी ह्यांच्या सल्ल्यानें व खटपटीनें रा. चिटणीस १९१९ मध्यें कलकत्त्यास साधनाश्रमामध्यें राहण्यासाठीं गेले. तेथें दोन वर्षें राहून त्यांनीं आपल्या ज्ञानांत पुष्कळ भर घातली. कांहीं पुढाऱ्यांच्या देखरेखीखालीं थोडेंसें अध्ययन त्यांनीं केलें. परंतु तत्त्वज्ञानविषयक निरनिराळ्या ग्रंथांचा त्यांनीं स्वतंत्र रीतीनें अभ्यास केला. येथें आल्यावर त्यांनीं ब्राह्मधर्म प्रचारकाचेंच काम करण्याचें ठरविलें. कांहीं महिने राममोहन स्कूलमध्यें त्यांनीं शिक्षकाचें काम केलें व नंतर त्यांस साधारण ब्राह्म समाजानें मिशन वर्कर नेमिलें व ते येथें काम करूं लागले. येथें मधून मधून मंदिरांतील उपासना चालविणें, सुबोधपत्रिकेच्या इंग्रजी बाजूचें संपादन करणें, यंग थीईस्ट्स यूनिअनचें काम पहाणें, लिबरल स्कूल आफ रिलिजन नामक संस्था जी त्यांनींच स्थापन केली होती तिच्यासाठीं व्याख्यानांची जुळवाजुळव करणें, वगैरे कामें करीत असतां, युनिटेरिअन स्कालरशिप घेऊन ऑक्सफर्ड येथें जाण्याचा

विचार त्यांस सुचला व कांहीं मित्रांनीं प्रोत्साहन दिल्यामुळें त्यांनीं अर्ज केला व त्यांस स्कालरशिप मिळाली. त्यांच्या वाटखर्चासाठीं मुंबईचा समाज व त्यांचे कांहीं मित्र ह्यांनीं त्यांना साहाय्य केलें व दोन वर्षें ऑक्सफर्ड येथें राहून, चरितार्थासाठीं स्वतः तेथें उद्योग करून, एका मोठ्या लेखाबद्दल एका जर्मन युनिव्हर्सिटीकडून Doctor of Philosophy ही पदवी मिळवून स्वतःच्या खर्चानें ते स्वदेशीं जुलै १९२६ मध्यें परत येऊन लागलीच कामास लागले आहेत. सध्या कलकत्त्याचा साधारण ब्राह्मसमाज त्यांस पूर्वीप्रमाणें द्रव्यसाहाय्य करीत असून मुंबईच्या समाजाकडूनही त्यांस मदत मिळत आहे. हल्लीं ते सुबोधपत्रिकेच्या इंग्रजी बाजूचे संपादक असून दुसरीं पुष्कळ कामें करीत आहेत. डा. चिटणीस ह्यांचें इंग्रजी व मराठी ह्या दोन्ही भाषांवर चांगलें प्रभुत्व असल्यामुळें दोन्ही भाषांतून धर्मप्रचाराचें कार्य त्यांनीं चालविलें आहे.

---

# संगतसभा
## व
## तींत झालेलें धर्मसिद्धान्तांचें विवरण.

एकदां ह्या लेखकानें असें म्हटलेलें ऐकिलें कीं, आपल्या येथें संगतसभेची स्थापना १८७२ सालीं झाली असावी. इतक्या जुन्या संस्थेसंबंधानें अधिक माहिती मिळविण्याचा त्या वेळीं प्रयत्न केला. तो प्रयत्न तेव्हां सफळ झाला नाहीं. मध्यंतरीं कलकत्त्याच्या संगतसभेनें केलेल्या कार्याची हकीगत पुन्हां एकदां वाचण्यांत आली. १८६० सालीं ब्रम्हानंद केशवचंद्र सेन ह्यांनीं आपल्या स्वतःच्या घरांत एका लहानशा खोलींत एका संभाषणात्मक सभेची स्थापना केली. त्या सभेंत कॉलेजांत अभ्यास करणारे, किंवा ज्यांचा तेथील अभ्यासक्रम नुकताच संपला आहे असे तरुण एकत्र जमून धर्म, व्यवहार, नीति, सामाजिक सुधारणा, धर्मकार्य वगैरे विषयांवर अत्यंत आस्थापूर्वक विचारविनिमय चालवीत असत. ह्याच संस्थेला पुढें संगतसभा हें नांव प्राप्त झालें. येथें ही तरुण मंडळी केशवचंद्र सेन ह्यांच्या देखरेखीखालीं प्रार्थना करीत, वादविवाद करीत; आपापल्या जीवनक्रमाची छाननी करीत; आणि ह्या कार्यामध्यें एकदां ते दंग झाले म्हणजे तहान, भूक, झोंप यांची त्यांना शुद्धि नसे; रात्रभर ह्याच कार्यांत ते गढून जात व त्यामुळें तरुणांचे मित्र व आप्त ह्यांस त्यांचेसंबंधानें मोठी काळजी उत्पन्न झाली. परंतु ह्या संगतसभेंत ह्या तरुणांच्या आयुष्याचें परिवर्तन झालें; भावी आयुष्यक्रमाचे विचार येथें मुकरर झाले; जीवनाचा हेतु येथें ठरला गेला. त्याचा परिणाम एकंदर ब्राह्मसमाज व ब्राह्मजनता ह्यांजवर झाल्यावांचून राहिला नाहीं. कित्येक तरुणांनीं आपलें अखिल जीवित ब्राह्मधर्माच्या सेवेंत घालविण्याचा ह्या सभेंत निश्चय केला; व अशा निश्चयास प्रथम कृतीचें स्वरूप पंडित विजयकृष्ण गोस्वामी ह्या मेडिकल कॉलेजांत अभ्यास करणाऱ्या तरुणानें १८६३ सालीं दिलें. त्यांच्या उदाहरणाचा दुसऱ्या तरुणांवर अत्यंत इष्ट असा परिणाम होऊन त्यांनींही त्यांचें अनुकरण केलें व अशा रीतीनें सर्व ऐहिक स्वार्थावर लाथ मारून केवळ धर्मकार्यासाठीं आपणास वहावून घेतलेली तरुण मंडळी पुढें आली. ही सर्व मंडळी संगतसभेमुळें आपल्या जीवनक्रमामध्यें हा क्रांतिकारक फरक घडून आला असें नेहमीं म्हणत असत. ही किंवा अशा प्रकारची संगतसभेची हकीकत वाचून प्रथम **पुण्याच्या** प्रार्थनासमाजाच्या सभासदांनीं **संगतसभा** स्थापन

केली. प्रर्थनासमाजाची स्थापना प्रथम मुंबईस जरी झाली, तरी समाजाच्या इतिहासांत असा एक काळ होता कीं ज्या वेळीं समाजांतील बहुतेक विद्वान व कर्ते माणसें पुण्यास एकत्र झालीं होतीं, ही केवळ ह्या लेखकाची कल्पना नव्हे. प्रो. भांडारकर ज्या वेळीं दक्षिण विद्यालयांत संस्कृत भाषेचे अध्यापक म्हणून बदलून गेले त्या वेळीं, **सुबोधपत्रिकेनें** पुढील उद्गार काढले:—

" समाजाचे उत्तम उत्तम सभासद हे बहुतेक येथून जाऊन पुण्यास जमत आहेत, तेणेंकरून तेथील समाजाचें काम फार चांगल्या रीतीनें चालेल ही आनंदाची गोष्ट आहे. तथापि येथील सभासदांस आपल्या समाजाविषयीं काळजी उत्पन्न होणें हें साहजिक आहे." असो. १८८० सालीं ता. ५ एप्रिल रोजीं समाजाचा रिपोर्ट वगैरे वाचल्यानंतर प्रो. रामकृष्णपंत भांडारकर ह्यांनीं अशी सूचना केली कीं, " **संगतसभा पुणें येथें स्थापन झाल्यापासून तिचा चांगला उपयोग होत आहे, तरी तशी सभा येथेंही स्थापावी.** परंतु अशी सभा चांगल्या रीतीनें चालण्यास एथील सभासदांनीं कळकळ बाळगून तीस आलें पाहिजे आणि तिच्यासाठीं श्रम घेतले पाहिजेत " हें जेव्हां वाचण्यांत आलें, त्या वेळीं १८८० एप्रिल पांच तारखेनंतर केव्हां तरी संगतसभेची स्थापना झाली असावी अशी खात्री झाल्यामुळें पुढें पाहूं लागलों. तों संगतसभा अमुक तारखेस भरून त्या वेळीं अमुक विषयांची चर्चा होईल असा मजकूर सुबोध-पत्रिकेंत आढळला. खरा प्रकार असा होता कीं, ज्या अंकांत संगतसभा स्थापावी अशी वरील सूचना प्रसिद्ध झाली, त्याच अंकांत मुंबई सदराखालीं पुढील दोन ओळी प्रसिद्ध झाल्या होत्या:—

" येत्या बुधवारीं ( ता. १४ एप्रिल १८८० ) सायंकाळीं बरोबर ६ वाजतां समाजांत येण्याची मेहरबानी मित्रमंडळीनें करावी. त्यासमयीं संगतसभेची स्थापना होणार आहे." आणि त्या दिवशीं संगतसभेची प्राणप्रतिष्ठा झाली. कारण, ता. १८ एप्रिलच्या अंकांत पुढील मजकूर आढळतो:—

" मागील बुधवारीं सायंकाळीं संगतसभा प्रार्थनामंदिराच्या मुखशाळेंत भरली होती. रा. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, मोरोबा विनोबा, व दुसरे दहा बारा गृहस्थ आले होते. प्रथम प्रार्थना करून नंतर कित्येकांनीं कांहीं धर्मसंबंधानें शंका काढल्या त्यांजवर भाषण झालें. पुढील बुधवारींही सायंकाळीं ६ वाजता पुनः सभा भरणार आहे तीस सभासदांनीं व इतर मित्रांनीं येण्याची मेहेरबानी

करावी. ” पुढें “ धर्मबीजें ” ह्या विषयावर व्याख्यान व्हावयाचें ठरल्यावेळीं सुमारें सोळा सतरा गृहस्थ हजर होते. त्यांत सारे चारपांच जण समाजाचे सभासद होते. इतर गृहस्थ बाहेरचे होते. त्यांत रा. ब. गोपाळराव देशमूख होते. धर्मबीजें ह्या विषयावर गोविंदराव काणे यांनीं संभाषण सुरू केलें, परंतु रामकृष्णपंत भांडारकर किंवा दुसरें कोणी समाधानकारक रीतीनें विषयाचें प्रतिपादन करण्यास नसल्यामुळें अघळपघळ बोलणें होऊन सुमारें साडेसात वाजतां मंडळी निघून गेली. पुढील बुधवारीं सभेस समाजांतील पुढारी मंडळी अगत्यपूर्वक येऊन व्यवस्था चांगली ठेवितील अशी आशा आहे ” अशा प्रकारें संगतसभेच्या कामास मुंबईस सुरुवात झाल्यावर एका “ सत्यशोधका”नें पुढीलप्रमाणें सूचना केलीः—

“प्रार्थनासमाज मंदिरांत दर बुधवारीं सायंकाळीं सहा वाजतां सभा भरते ती रात्रीं आठ वाजतां भरत जाईल, व रा. रा. भांडारकर, पंडित, तेलंग वगैरे विद्वान गृहस्थ नेहमीं येण्याचा परिपाठ ठेवितील तर अज्ञान धर्मेच्छु जनांस धर्मसंबंधीं ग्रंथांतरीं असलेली माहिती व तिजवर अशा विद्वान, विचारी व तार्किक (?) मंडळीचीं मतें, भाषण व वादविवाद या रूपानें समजून घेण्यास संधी मिळेल, व तिचा लाभ पुष्कळ लोक प्रार्थनासमाजाचे सभासद नसतांही सदरहू बुधवारच्या सभेस येऊन घेतील असें वाटतें.” त्यावर “ही सूचना फार चांगली आहे आणि परमार्थजिज्ञासु लोक सभेस नेहमीं येऊं लागले म्हणजे वर लिहिलेले व दुसरे गृहस्थ ह्यांपैकीं मुंबईस जे असतील ते अवश्य हजर रहातील. धर्मसंबंधीं गोष्टींविषयीं हल्लीं सर्वत्र जी उपेक्षा दिसून येते ती नाहींशी होऊन तत्संबंधीं आस्था आणि उत्सुकता ह्या सभांच्या योगें उत्पन्न होईल तर महत्कार्य होईल. आणि तें कार्य सिद्धीस जावें यासाठीं आपणाकडून होईल तेवढें साहाय्य कोण मनुष्य करणार नाहीं?” असे उद्गार सुबोधपत्रिकेनें काढले. यानंतर रा. ब. पंडित, प्रो. भांडारकर, रा. रा. काशिनाथपंत तेलंग, मुंबईत होते तेव्हां रा. ब. माधवराव रानडे, रा. स. पां. केळकर, गोविंदराव काणे वगैरे मंडळी सभेस येत व सभेमध्यें फार महत्त्वाच्या विषयांवर वादविवाद व विचारविनिमय होत असे. ह्या वादाचें स्वरूप कसें असे व येथें जे विचार अंतीं सिद्धांत रूपानें ग्रथित होत असत त्यांचेंही स्वरूप ह्याच लेखांत पुढें जे उतारे दिले आहेत त्यांवरून वाचकांस कल्पना होईल. तूर्त संगतसभेची पुढली हकीकत येथें नमूद करितों. अशा प्रकारें सुमारें दीड वर्षभर संगतसभा चांगल्या रीतीनें चालल्यावर ती दृष्टाळली !

आणि सुबोधपत्रिकेला पुन्हा लोकांना जागें करण्याचा प्रसंग येऊन ठेपला! ता. ३१ आक्टोबर १८८१ च्या अंकांत म्हटलें आहेः—

"एथील प्रार्थनासमाजाच्या संबंधानें गतवर्षापासून दोन सभा चालू झाल्या आहेत. एक संगतसभा व दुसरी स्त्रियांची सभा. दोन्ही सभा आठवड्यांतून एकदां भरतात. संगतसभेचा उद्देश धर्मसंबंधीं विषयांचा विचार व वादविवाद व्हावा हा आहे. असा वादविवाद करण्यास समाजाच्या संबंधानें तर दुसरा प्रसंग किंवा स्थळ नाहीं. प्रति रविवारीं सामाजिक उपासना मंदिरांत होते तींत केवळ परमेश्वराची स्तुति, प्रार्थना व धर्मसंबंधीं एखाद्या विषयावर व्याख्यान इतकें मात्र होतें, परंतु त्या समयीं कोणास कांहीं शंका आली असतां ती काढण्यास किंवा तिचें समाधान करून घेण्यास सवड मुळींच नसते. धर्मसंबंधीं विषयांचा विचार व चर्चा होण्यास समाजाच्या संबंधानें कांहीं तरी साधन असणें फार इष्ट व आवश्यक आहे हें उघड आहे. आणि सुमारें एक वर्षामागें अशा सभेची गरज बहुत सभासदांस वाटल्यावरून **प्रोफेसर रामकृष्ण गोपाळ भांडारकर** आदिकरून गृहस्थांनीं संगतसभा उपस्थित केली. ह्या सभेंत कोणासही येऊन भाषण करण्याची मोकळीक आहे. स्थापन झाल्यावर कांहीं काळपर्यंत ही सभा फार चांगल्या रीतीनें चालली. समाजाचे सभासद व बाहेरचे गृहस्थ मिळून वीसपंचवीस मंडळी सभेस येऊन विषयांची चर्चा समाधानकारक होत असे. तिचा सारांश पत्रिकेच्या द्वारें वेळोवेळीं प्रसिद्ध होत आलाच आहे. परंतु अलीकडे ह्या सभेस क्षीणत्व लागतां लागतां हल्लीं अशी स्थिति झाली आहे कीं, सभेस सगळे आठदहाजणच बहुतेक येतात, त्यांत फार फार तर तीन चारच समाजाचे सभासद असतात. नेमानें येणारे असे दोनच सभासद. प्रोफेसर भांडारकर व रा. यशवंतराव मणेरीकर...यांत विशेष शोचनीय गोष्ट ती ही कीं, प्रार्थनामंदिराच्या अगदीं जवळ जवळ राहणारे इतके सभासद असून त्यांपैकीं बहुधा कोणींच ह्या सभांस येऊं नये! हमेश येण्यास कोणास न बनो, परंतु महिन्यांतून एकदोनदां कधींच येण्यास बनत नाहीं ही सबब पोकळ भासते. सभेच्या कामासंबंधानें फेरफार करण्याविषयीं कोणास कांहीं सूचना करणें असल्यास ती सभा चालविणारे आदरपूर्वक ऐकून घेतील आणि तिचा विचार करितील. पण तसलें कांहीं कारण नसतां कधींच सभेस न येणें ही शुद्ध अनास्था दिसते; आणि ह्या अनास्थेमुळेंच अत्यंत दुःख होतें. असल्या सभांस साहाय्य करण्यास म्हणजे त्यांस नुसतें जाण्यास समर्थ असे समाजाच्या मुंबईतील सुमारें

साठ सभासदांमध्यें दहा, निदान पांच सुद्धां नसावे हें मोठें लांछन नव्हे काय? आमच्या मित्रांनीं याचा चांगला विचार करावा; कारण, अशा अनास्थेचा परिणाम चांगला दिसत नाहीं. कोणतेंही काम आरंभिलें तरी त्यांत हीच रड हें बरें नाहीं, यामुळें कोणास कांहीं करण्यास हिंमत येत नाहीं, आणि सर्वांनीं हातपाय आटोपून केवळ पोटाचें चिंतन करीत घरीं बसावें असें होणार आहे. तर आम्ही आमच्या समाजीय व इतर बंधूंस अशी प्रार्थना करितों कीं, त्यांनीं ही दुष्ट अनास्था टाकून ह्या सभांस त्यांजकडून जो थोडासा आश्रय पाहिजे आहे तो देण्याचें सत्वर मनावर घ्यावें." ह्या सूचनेचा इष्ट असा परिणाम होऊन संगतसभा पुढें पुष्कळ वर्षें चालली. परंतु नंतर कित्येक अज्ञेयवादी, वितंडवादी मंडळी आंत येऊं लागल्यामुळें सभेसंबंधानें कांहीं नियम केले. पुढें कांहीं वर्षांनीं तिचें महत्व कमी होऊं लागलें. मध्यंतरीं कांहीं दिवस रा. रा. वासुदेवराव भांडारकर 'अवर्स ऑफ थॉट' मधील कांहीं धर्मपर व्याख्यानें वाचून त्यांवर अवश्य तेथें स्पष्टीकरण व चर्चा होत असे. नंतर १९०५ सालीं ह्या सभेचें रूपांतर यंग थीईस्ट्स् यूनिअन ह्या संस्थेंत झालें. यंग थीईस्ट्स् यूनिअन संबंधाची माहिती स्वतंत्रपणें दुसरीकडे दिली आहे.

## संगतसभेंतील धर्मसिद्धान्तविवरण.

संगतसभेमध्यें अनेक विषयांची चर्चा होत असे व तींत डा. भांडारकर, रा. रा. काशिनाथपंत तेलंग, रा. ब. रानडे व पंडित इ० मंडळी भाग घेत असे हें आपण आतां जाणत आहोंच. त्या वेळीं होणाऱ्या चर्चेंत प्रदर्शित झालेले विचार पुष्कळ वेळां अर्थात फार महत्त्वाचे असत. असले महत्त्वाचे विचार या ठिकाणीं एकत्रित करण्याची आलेली संधि आज जर व्यर्थ दवडली, तर हे विचार एकत्र करण्यास पुढें कांहीं मार्ग राहाणार नाहीं, म्हणून त्यांतील कांहीं निवडक वेंचे पुढें दिले आहेत.

### स्त्री व पुरुष.

स्त्री व पुरुष ह्या दोहोंला उपनिषत्कारांनीं हरभऱ्याची उपमा दिली आहे, हरभऱ्यावरचें साल काढलें असतां असें दिसून येईल कीं, भिन्न भिन्न दोन अंश मिळून एक हरभरा झाला आहे. हरभऱ्याला हरभरेपणा हे अंश एकत्र झाल्याच्या योगें करून येतो. दोहोंलाही स्वतंत्रता असून ते दोन्ही मिळून एक.

त्यांपैकीं एकालाही दुसऱ्यास सोडिलें असतां पूर्णता येत नाहीं, ही उपमा मनांत राखिली असतां पुरुष स्त्रीला किंवा स्त्री पुरुषाला कधींही नीच समजणार नाहींत. संसारामध्यें माता व पिता ह्या दोघांचेंही सारखेंच प्रयोजन आहे. स्त्रीच्या अंगीं मातृत्व व पुरुषाच्या अंगीं पितृत्व येतें. असें कोण म्हणेल कीं माता नसली तर चालेल किंवा पिता नसला तर चालेल ? एक गोष्ट पाहून आम्हांस थोडा खेद वाटतो. पुरुष स्त्रियांकडेस नीच दृष्टीनें अवलोकन करितात आणि स्त्रियाही संसारांतील आपलें काम नीच समजतात. ही भयंकर व अकल्याणकारक समजूत भ्रांतीच्या योगेंकरून मनुष्यांमध्यें प्रविष्ट होऊन हिनें किती बरें अनिष्ट परिणाम घडवून आणिले आहेत ? आई व आईचें काम हें नीच, आणि द्रव्य संपादन करणें इत्यादि कामें श्रेष्ठ. हा क्रम मनुष्यसमाजामध्यें आणिला तरी कोणीं ? प्रत्यहीं आमचें जीवन चाललें आहे तें कोणाच्या स्नेहानें, कोणाच्या ममतेनें ? मातेच्या ममतेनें ! स्त्रियांपासून घरांमध्यें कज्जा, कलह, अशांति, वेगळेपणा इत्यादि उत्पन्न होतात तीं कां ? याचसाठीं कीं त्या आपलें काम करून त्याचें महत्त्व जाणत नाहींत. आपणांला त्याच अत्यंत नीच व तुच्छ असें समजतात. या प्रकारचा भाव त्यांच्या हृदयामध्यें दृढ होतां होतां शेवटीं तें हृदय खरोखरीच नीच होऊन जातें. कोणत्याही उत्तम वस्तूचें स्वरूप वाईट व्हावयास लागलें म्हणजे जितकी उत्तम ती वस्तु असेल तितकें वाईट होतें. यामुळें अंतीं त्या कर्कश व विक्राळ होऊन जातात. याचा दोष कोणाकडेस ? मनुष्यसमाजाकडेस. म्हणून हा दोषनिरस्त होऊन शांति आणि कुशल पुनरपि प्राप्त व्हावें म्हणून निश्चयेंकरून जनसमाजानें यत्न केला पाहिजे.

**डॉ. भांडारकर.**

## खरी प्रार्थना.

प्रार्थना हें परमेश्वरप्रीतिपुरःसर कृत्य आहे. ती जर आपल्यामध्यें भाव उत्पन्न होऊन झाली नाहीं तर ती केल्याचें कांहीं श्रेय नाहीं. खरी प्रार्थना म्हटली म्हणजे चैतन्य परमात्मा जो त्याचा जीवात्म्यास साक्षात्कार होणें व तो साक्षात्कार होऊन जीवात्म्यानें परमात्म्यास प्रेमफळें अर्पावीं व परमात्म्यानें जीवात्म्यास उन्नतिरूप रोजमुरा द्यावा ही होय. अशी प्रार्थना घडणें ही कांहीं असाध्य किंवा अशक्य गोष्ट नव्हे, व हा साक्षात्कार केवळ काल्पनिक नव्हे. तो खरोखर मनुष्यात्म्यास होतो असें म्हणण्यास महान् महान् साधूंच्या उक्तींवरून व आम्ही जे प्रपंचाचे पाशांनीं बद्ध त्यांसही या गोष्टीचा थोडाबहुत जो कांहीं

अनुभव होतो त्यावरून सबळ प्रमाण मिळतें. वास्तविक पाहिलें तर परमात्म्याचा आम्हांस साक्षात्कार व्हावा व त्यानें आमची प्रार्थना मान्य करावी व ती मान्य झाली किंवा नाहीं हें आम्हांस कळावें ह्या गोष्टीस सृष्टीच्या अचल नियमांचा कोणत्याच प्रकारें बाध नाहीं असें आढळेल. तर अशा तऱ्हेची भावपूर्वक प्रार्थना जर आमच्याकडून वारंवार घडेल, तरच आमच्यामध्यें परमेश्वराविषयीं भाव ठरला असें होईल, व तो तसा ठरला तरच खरी प्रार्थना केल्याचें श्रेय व फळ आम्हांस प्राप्त होईल. **डॉ. भांडारकर.**

## आत्मा व परमात्मा–ज्ञानाचीं साधनें.

**पूर्वपक्ष.** ( लेखक–कोणी एक अल्पज्ञ मित्र. )

कोणत्याही विषयावर वाद करणें तर वादी प्रतिवादी अशा उभयतांसही कांहीं तरी सिद्धान्त मान्य असले पाहिजेत. निदान कोणत्याही पक्षाबद्दल तथ्यातथ्याविषयीं समर्पक प्रमाण कोणतें याबद्दल तरी एकमत असलें पाहिजे. उदाहरणार्थ, कोणी एखादा वादी जर वेदच प्रमाण मानणारा असला, तर त्याच्याशीं वेदप्रामाण्य वादापुरतें तरी निदान स्वीकारल्यावांचून केवळ प्रत्यक्ष अथवा अनुमानमूलक युक्तींनीं वाद करण्यास प्रवृत्त होणें यांत " वादे वादे जायते कंठशोषः" या वाक्याचेंच एक निदर्शन देणें होय. हें बहुतकरून सर्वांस ग्राह्य होईल असें वाटतें. आतां हाच न्याय दुसरीकडे लावून पाहूं या. कोणी असें प्रतिपादन करीत असला कीं, स्वबुद्धीखेरीज कोणत्याही मनुष्याकडे सत्य शोधण्याचें अथवा सत्यासत्याचा निर्णय करण्याचें दुसरें साधन नाहीं; आणि दुसऱ्या एखाद्या गृहस्थाचा पक्ष असा असला कीं हृदयवृत्तींवरूनही कांहीं गोष्टींत सत्यनिर्णय करितां येतो, तर अशा दोघांमध्यें तरी वाद झाल्यापासून काय निष्पन्न होणार? ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं वाद आहे असें समजा, आणि एका पक्षास बाबू प्रतापचंद्र मुजुमदार आहेत असें समजा. तर अस्तित्वपक्षाकडील सबळ प्रमाणांमध्यें एक प्रमाण ते हें देतील कीं, आमच्या हृदयवृत्तींला जी ईश्वरसंबंधीं तृष्णा लागली आहे ती इतर कोणत्याही रीतीनें समाधान पावत नाहीं तर ह्या गोष्टींवरून त्या तृष्णेचें सांत्वन करणारा ईश्वर सिद्ध होतो. बाबू प्रतापचंद्र यांचें मत मीं आपल्या समजुतीप्रमाणें दिलें आहे. परंतु तें माझ्या बुद्धीस अत्यंत असमर्पक आणि अन्योन्याश्रयदोषदूषित असें वाटतें. तर ह्या विषयाबद्दल बाबूंच्या व माझ्यामध्यें उक्तिप्रत्युक्ति झाल्यानें कोणास व कोणत्या प्रकारचा फायदा होईल बरें? तिसरें उदाहरण

घ्या. कांहीं विचारी गृहस्थांस मानसप्रत्यक्ष हें अतींद्रिय विषयांमध्यें फार बलवत्तर प्रमाण म्हणून अभिमत आहे. माझ्या अल्पमतीला हें ग्राह्य दिसत नाहीं. तर अशा प्रकारचा जेथें मतभेद आहे तेथें वाद करणें वृथा श्रम करण्यासारखें दिसतें. आतां कोणी असें म्हणेल कीं, हा मतभेद मोडून टाकण्यासाठीं वादविवाद कां होऊं नये ? तर त्याला माझें उत्तर इतकेंच आहे कीं, अशा प्रकारच्या मतभेदाचें निरसन वादानें होत नसतें. दरएकानें यथामति, यथावकाश, निरनिराळ्या पक्षांचा विचार करून आपल्या मनाची खात्री करून घेतली पाहिजे. एतदर्थ निरनिराळ्या पक्षांचें उत्तम प्रतिपादन जेथें जेथें होत असेल तेथें जाऊन जी माहिती मिळेल तिचा प्रांजल बुद्धीनें विचार करावा व कुडीमध्यें जीव आहे तोंपर्यंत आपल्या मनांत जे भ्रम असतील त्यांचें दूरीकरण करण्याचीं साधनें नेहमीं शोधीत असावें याखेरीज दुसरा मार्ग मला दिसत नाहीं. आतां अशा प्रकारचा विचार व शोध मानसप्रत्यक्ष प्रामाण्याविषयीं मीं आपल्या अल्पमतीप्रमाणें व फुरसतीप्रमाणें केला आहे. आणि त्या विचाराअंतीं मला असें दिसतें कीं, सर्वांस ह्या साधनानें एकरूप ज्ञान नेहमीं होत नाहीं, आणि सत्य जर एकच आहे, तर सर्व मानवांनीं मान्य केलें पाहिजे असें सत्य दुर्मिळ होतें. दुसरें मला असें वाटतें कीं, मानसप्रत्यक्ष जें आहे त्यापासून आमच्या आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल वगैरे विश्वसनीय ज्ञान प्राप्त होत नाहीं. मानसप्रत्यक्षावरून तद्रूपी भास आपल्याला होतो इतकीच खरी गोष्ट घेतां येते. जसें एखाद्या मनुष्यास थंडी वाजत असतांना हवेंत उष्णता आहे वगैरे उष्णतामापक यंत्रांनीं अथवा अन्य साधनांनीं सिद्ध करून दिल्यापासून त्यास जें शैत्याचें प्रत्यक्ष ज्ञान होत आहे तें मिथ्या ठरत नाहीं, तर केवळ ह्या प्रत्यक्ष ज्ञानावरून हवेच्या शैत्याबद्दलचें त्याचें अनुमान खोटें आहे असें ठरतें. तद्वत आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल अथवा अमरत्वाबद्दल जे मानसप्रत्यक्ष प्रमाणाचा उपन्यास करितात त्यांस आमचें म्हणणें इतकेंच कीं, तुम्हाला जो भास होत आहे म्हणून तुम्ही म्हणतां, तो खरा असला तरी त्यापासून आत्मा आहे किंवा तो अमर आहे ह्या गोष्टी सिद्ध होत नाहींत.”

**उत्तरपक्ष**—प्रो. रा. गो. भांडारकर.

आमचे मित्र म्हणतात कीं, कोणताही विषय घेऊन त्याविषयीं वादविवाद करणें तर तथ्यातथ्य जाणण्याचें प्रमाण काय ह्याविषयीं उभयतांचें एकमत असलें पाहिजे. तें नसल्यास वादाच्या योगें कंठशोष मात्र होतो. ही गोष्ट केवळ अंशतः खरी आहे. अमुक गोष्ट अमुक एकाच प्रमाणानें गम्य आहे असें एक

मनुष्य मानितो आणि दुसऱ्यास तें प्रमाणच मान्य नाहीं असें झाल्यास त्या गोष्टीविषयीं पुढें वाद व्हावयाचा नाहीं; आणि असें असून वाद केल्यास तो केवळ व्यर्थ होईल, यांत संशय नाहीं. परंतु त्या गोष्टीविषयीं जरी पुढें वाद झाला नाहीं तथापि जें प्रमाण एक मनुष्य मानतो आणि दुसरा मानीत नाहीं त्या प्रमाणाविषयीं वाद होण्यास कांहीं बाधक नाहीं. तें प्रमाण ग्राह्य आहे किंवा नाहीं ह्याविषयीं केवळ तत्त्वबुभुत्सेनें वाद केला असतां निष्फळ होणार नाहीं. हें वाद करण्यासारखें स्थळ आहे असें आमचे मित्रही कबूल करितात; परंतु ते म्हणतात कीं प्रमाणांसंबंधीं जो मतभेद त्याचें निरसन वादानें व्हावयाचें नाहीं. वादानें कोणत्या तरी एका मतभेदाचें निरसन होतें असें असल्यास ह्या मतभेदाचें निरसन व्हावयास काय हरकत आहे ? आतां मुळींच कोणत्याही मतभेदाचें वादानें निरसन व्हावयाचें नाहीं असें जर मानिलें तर मात्र ह्या मतभेदाचें निरसन वादानें व्हावयाचें नाहीं हें म्हणणें सयुक्तिक होईल. परंतु आमचे मित्र असें मानीत नाहींत असें त्यांच्या लिहिण्यावरून दिसतें. ते म्हणतात कीं वाद करणें असल्यास ग्राह्य प्रमाण कोणतें व अग्राह्य कोणतें ह्याविषयीं वादी प्रतिवादी यांच्यामध्यें ऐकमत्य असलें पाहिजे. ह्याचा अर्थ असा कीं, ऐकमत्य असलें म्हणजे वाद निष्फल होणार नाहीं, म्हणजे मतभेदाचें निरसन होण्याचा संभव आहे. तर मग अशा स्थितींत जर मतभेदाचें वादानें निरसन होईल तर प्रमाणांच्या ग्राह्याग्राह्यतेविषयीं मतभेदाचें निरसन व्हावयास काय बाधक आहे ? आतां तुम्ही म्हणाल कीं, ह्याविषयीं वाद केला असतां वादी प्रतिवादी ह्यांजमध्यें वाद निष्फल जाऊं नये एतदर्थ जो सामान्य अंश पाहिजे तो रहात नाहीं. तर त्यास आमचें असें म्हणणें आहे कीं, अशा प्रकारचा सामान्य अंश आहे. प्रतिवादी जर ज्ञान म्हणून कांहीं पदार्थ आहे, आणि इंद्रिय हेंच एक त्याचें प्रमाण असें मानित असला आणि वादी इंद्रिय आणि बुद्धीचा स्वाभाविक संस्कार अशीं दोन प्रमाणें मानीत असला, तर ज्ञान म्हणून कांहीं पदार्थ आहे आणि इंद्रिय त्याचें प्रमाण आहे असें मानणें हा उभयतांमध्यें अपेक्षित जो सामान्य अंश तो झाला. तो सामान्य अंश घेऊन प्रतिवादी यास असें सांगतां येईल कीं बाबा, तूं जें ज्ञान इंद्रियजन्य असें म्हणतोस त्याच ज्ञानाचा विचार केलास तर असें ध्यानांत येईल कीं, त्यामध्यें केवळ बुद्धीच्या स्वाभाविक संस्कारजन्य असा अंश पुष्कळ आहे. उदाहरणार्थ, अग्नीपासून काष्ठ जळतें हें ज्ञान इंद्रियजन्य आहे असें तूं म्हणतोस; परंतु ह्यामध्यें इंद्रियाचा अंश किती याचा विचार कर. अग्नि आणि काष्ठ यांचा संयोग

झाला आणि जळणें हें नांव ज्या स्थितीचें ती स्थिति त्या काष्ठास पूर्वी नव्हती असें असून आतां प्राप्त झाली इतकेंच मात्र तूं पाहिलेंस; परंतु ती स्थिति हें कार्य आणि अग्नि हें कारण हा जो प्रत्यय तुला होऊन अग्नीपासून काष्ठ जळलें असें तूं म्हणतोस तो प्रत्यय उत्पन्न झाला कसा ? हें कार्य आणि तें कारण हें ज्ञान तुला डोळयांनीं झालें नाहीं तर कोठून ? त्याचप्रमाणें जळणें ही स्थिति काष्ठामध्यें पूर्वी नव्हती आणि आतां आहे हें जें ज्ञान तुला झालें, त्या ज्ञानामध्यें "पूर्वी" आणि "आतां" हे अंश कोठून आले ? डोळयांच्या द्वारें जळणें आणि न जळणें ह्या स्थितीचें मात्र ज्ञान झालें, परंतु त्यांचा जो पूर्वापर भाव तो तुला कसा कळला ? तर कार्यकारणभाव आणि पूर्वापरभाव ह्यांचें ज्ञान बुद्धीच्या स्वाभाविक संस्कारानें झालें. म्हणजे बुद्धीमध्यें असा स्वाभाविक संस्कार आहे कीं कोणत्याही पदार्थास पूर्वी नव्हतें असें स्वरूप प्राप्त झालें म्हणजे तें कार्य मानून त्याजला उत्पन्न करणारें कांहीं तरी कारण आहे असें मानणें. त्याचप्रमाणें एकदम नाहींत अशा दोन स्थितींचें ज्ञान झालें म्हणजे कालाचा संबंध त्यांत आणून एक पूर्वी आणि दुसरी नंतर असें मानण्याचा बुद्धीस संस्कार आहे. म्हणजे काळाचें ज्ञान केवळ ह्या स्वाभाविक संस्कारानें होतें, इंद्रियांनीं होत नाहीं. काळ दिसत नाहीं, हुंगतां येत नाहीं, चाखतां येत नाहीं, ऐकतां येत नाहीं आणि त्याचा स्पर्श होत नाहीं. म्हणून बुद्धीचा स्वाभाविक संस्कार हें एक प्रमाण मानलेंच पाहिजे. अशा प्रकारें वाद झाला असतां तो निष्फळ असें म्हणतां येत नाहीं. जर ज्ञान म्हणून पदार्थ नाहीं, आणि एकही प्रमाण नाहीं असा जगदान्ध्य पक्ष घेऊन कोणी चालेल तर मात्र त्याच्याशीं वाद करणें हें सर्वथा निष्फळ आहे. अल्पज्ञ मित्र म्हणतात कीं, वादविवाद न करितां "निरनिराळ्या पक्षांचें उत्तम प्रतिपादन जेथें जेथें होत असेल तेथें जाऊन जी माहिती मिळेल तिचा प्रांजलबुद्धीनें विचार करावा." तर मग वादविवाद याचा दुसरा अर्थ काय ? वादविवाद म्हणजे निरनिराळ्या पक्षांचें प्रतिपादन. आतां तें तत्त्वबुभुत्सेनें न करितां परस्परांस जिंकण्याचे बुद्धीनें केलें तर त्यापासून तादृश फळ निष्पन्न न होवो. परंतु हा दोष वादविवाद करणाऱ्या व्यक्तींचा, वादविवाद म्हणून जी क्रिया आहे तिचा नव्हे, आणि अहंकारपूर्वक जरी वाद झाला तरी त्यांत निरनिराळ्या पक्षांस अनुकूल अशा अनेक गोष्टींचें प्रतिपादन होत नाहीं असें विरळा.

पुढें मानसप्रत्यक्ष म्हणून एक प्रमाण कांहीं गृहस्थांस अभिमत आहे असें म्हणून आमचे मित्र त्याचा विचार करितात. मानसप्रत्यक्ष हा शब्द जर त्या

गृहस्थांनीं वापरला असेल तर तो बरोबर नाहीं असें प्रथम सांगितलें पाहिजे. कारण, आत्म्याच्या निरनिराळया वृत्तींचें जें ज्ञान त्यासच मानसप्रत्यक्ष म्हणण्याचा परिपाठ आहे. तर अतीन्द्रिय पदार्थांचें जें ज्ञान होतें तें वर वर्णिलेल्या बुद्धीच्या स्वाभाविक संस्कारानें. जसें देश काल आणि कार्यकारणभाव यांचें ज्ञान होतें त्याचप्रमाणें एकत्व, अनेकत्व, साम्य, वैषम्य अनाद्यनंतत्व, शक्ति, अनंतशक्ति, व्यवस्था, परमेश्वर, सत्य असत्य; योग्य अयोग्य, बरें वाईट, अथवा बरें हें सर्वदा वंदनीय, वाईट हें सदा निंद्य, बऱ्याचा परिणामीं जय झालाच पाहिजे, वाइटाचा नाश झालाच पाहिजे इत्यादिक ज्ञान होतें. इंद्रियांचा व्यापार चालून आपल्या आत्म्याची निरनिराळया प्रकारची वृत्ति होते ती वृत्ति उत्पन्न करणारें बाह्य जगत् आहे, ज्या वृत्तीचें मानसप्रत्यक्ष होतें त्या वृत्ति ज्याच्यामध्यें असावयाच्या असा आत्मा म्हणून पदार्थ आहे, आणि हें सर्व विश्व आपल्या सामर्थ्यानें चालविणारा असा परमेश्वर हें बुद्धिसंस्कारजन्य ज्ञान, त्याचप्रमाणें जो पदार्थ आहे असें बुद्धीनें गृहीत केलें आहे तो तसाच सतत रहावयाचा हें मानणें हाही बुद्धीचा स्वाभाविक संस्कार आहे. म्हणूनच एकदा अग्नीनें पाय जाळला कीं तो पुनरपि तसेंच करील असें ज्ञान होऊन बालकही त्या अग्नीपासून दूर राहातें. एका ठिकाणीं एक पर्वत पाहिला, तर तो नेहमीं त्या ठिकाणीं आमच्या दृष्टीस पडेल अशी खात्री स्वाभाविक असते. नाशाचें जें ज्ञान तें अनुभवानें होतें म्हणून ज्या ठिकाणीं आनुभविक जीं नाशाचीं कारणें त्यांचा संभव नाहीं त्या ठिकाणीं मूळचा स्थिरतारूप जो बुद्धिसंस्कार तोच असतो. म्हणूनच परमाणूंच्या संयोगानें निष्पन्न झालेले पदार्थ नाशवंत आहेत असा अनुभवाच्या योगें जरी आपला ग्रह होतो तरी स्वतः त्या परमाणूंस नाश नाहीं असें आम्ही म्हणतों. कारण संयुक्त पदार्थांचा मात्र नाश होतो असें अनुभवास येतें. असंयुक्त जे परमाणु त्यांच्या नाशाविषयीं अनुभव नाहीं; म्हणून असणाऱ्या पदार्थांस नाश नाहीं हा जो बुद्धीचा स्वाभाविक संस्कार तो जागृत होऊन परमाणु अनश्वर आहेत असें आम्ही म्हणतों. नाश म्हणजे संयुक्त जे अवयव त्यांचें पृथक्करण. परमाणु हे असंयुक्त पदार्थ, म्हणून त्यांचें पृथक्करण व्हावयाचें नाहीं, म्हणजे नाश व्हावयाचा नाहीं. त्याचप्रमाणें अहंप्रत्ययाचे योगें ज्या पदार्थांचें ज्ञान होतें असा जो आत्मा हा पदार्थ असंयुक्त, शुद्ध, एक आहे अशा प्रकारचें त्याचें ज्ञान होतें. "मी" असें जें ज्ञान त्याचा विषय शुद्ध एकच आहे. त्या "मी"स अनेक भाग अथवा अवयव नाहींत असें उघड ज्ञान होतें. तस्मात् अशा निरवयव पदार्थाचें पृथक्करण होणें नाहीं, म्हणजे त्यास

नाश नाहीं, असें वर सांगितलेल्या बुद्धीच्या संस्कारानें साहजिक ज्ञान होतें. ह्यावरून आत्म्याचें अमरत्व सिद्ध होतें. त्याचप्रमाणें हें विशाल ब्रह्मांड पाहून सौंदर्य, उन्नति, अपार आनंद, इत्यादिकांचें ज्ञान बुद्धिसंस्कारापासून होतें आणि त्यांचें व अनंत सामर्थ्य ब्रह्मांडांत नांदत आहे ह्याचें ज्ञान होऊन विस्मय आणि पूज्यत्व बुद्धि आणि गंभीर आनंद ह्या वृत्ति आपल्या आत्म्याच्या ठायीं उदित होतात. बुद्धिसंस्कारजन्य ज्ञान अविश्वसनीय म्हटलें तर इंद्रियजन्य ज्ञानही अविश्वसनीय असें म्हणावें लागेल. कारण अल्पज्ञ मित्रांनीं दिलेल्याच उदाहरणामध्यें थंडी नसतां ज्याप्रमाणें प्रकृतीमध्यें कांहीं फेरफार झाल्यामुळें थंडीचा भास होतो, त्याचप्रमाणें आमची अशी कांहीं विलक्षण प्रकृति आहे कीं, आम्हांस वृक्षाचा बाह्य भास होतो, मनुष्याचा भास होतो, सर्व विश्वाचा भास होतो असें कां म्हणूं नये? आरशाच्या पाठीमागें कोणी मनुष्य, किंवा दुसरा कांहीं पदार्थ नसतां जसा तो तेथें दिसतो, सूर्याचें मंडल लक्षावधि योजनें विस्तीर्ण असून जसें तें सुमारें वीतभर लांब दिसतें, प्रातःकाळीं किंवा सायंकाळीं जसा क्षितिजावर सूर्य नसून तो आहे असा दिसतो, कांहीं कांसएक पदार्थांचे दोन जसे दिसतात, हें विश्व वास्तविक तद्वत दिसतें असें कां मानूं नये? तस्मात्, अशा प्रकारें आपणास डोळे व इतर इंद्रियें फसवितात, तथापि सामान्यतः त्यांजपासून होणारें जें ज्ञान त्याविषयीं साहजिक विश्वास उत्पन्न होऊन बाह्य जगत् आहे असें ज्याप्रमाणें आम्ही मानतों, त्याचप्रमाणें बुद्धिसंस्कारजन्य ज्ञानाविषयीं साहजिक विश्वास उत्पन्न होऊन देश, काळ, जीवात्मा, परमात्मा इ० आहेत असें मानितों. बुद्धिसंस्कार हे केवळ आध्यात्मिक आहेत म्हणून त्यांच्याशीं जुळणारें असें बाहेर कांहीं नाहीं असें म्हटलें असतां इंद्रियजन्य ज्या आत्मवृत्ति त्याही आध्यात्मिक आणि त्यांजला जुळणारें असें बाहेर कांहीं नाहीं. त्याचीं उदाहरणें तर वर दिलीं आहेत. त्याचप्रमाणें कांहीं बुद्धिसंस्कार सर्व मनुष्यांमध्यें सारखेच उत्पन्न होत नाहींत, म्हणून ते अप्रमाण असें मानिलें असतां कोणास कांहीं हवा थंड लागते तीच दुसऱ्यास उष्ण लागते, कोणास कांहीं पदार्थ रुचकर असा लागतो, तोच दुसऱ्यास पचपचीत लागतो, कोणास कांहीं पदार्थ पांढरा दिसतो, तोच दुसऱ्यास पिवळसर दिसतो, कोणास एका ठिकाणीं एक व्यक्ति दिसते, दुसऱ्यास त्याच ठिकाणीं दोन दिसतात अशा प्रमाणें इंद्रियजन्य ज्ञान सर्वांस सारखें होत नाहीं म्हणून तें अप्रमाण असें मानावें लागणार नाहीं काय? तर कांहीं तरी बुद्धिसंस्कारजन्य ज्ञान त्याच कारणाकरितां कां बरें आपण स्वीकारितां? शरिरास विकृति झाली म्हणजे अशा प्रकारचें विलक्षण

ज्ञान होतें असें जर म्हणाल तर बुद्धीस विकृति झाली म्हणजे असे विलक्षण संस्कार उत्पन्न होतात असें कां म्हणू नये? शरीर प्रकृत दशेमध्यें असतां जसें बाह्य पदार्थांचें होणारें जें ज्ञान तें यथार्थ असतें, तसेंच प्रकृत दशेमध्यें बुद्धि असतां, आत्मा, सत्य, बरें अथवा शुभ, विश्वांतील सौंदर्य, गांभीर्य, आणि अनंत सामर्थ्य, आणि एतद्गुणविशिष्ट परमात्मा परमेश्वर यांचा होणारा जो साक्षात्कार तो यथार्थ असतो. कांहीं मनुष्यांस असा साक्षात्कार जर होत नसेल तर त्यावरून हें सर्व मिथ्या असें मानतां येत नाहीं; कारण, कांहीं मनुष्यांचे डोळ्यांत फूल पडलें आणि वृक्षपाषणादि बाह्य जग त्यांना दिसलें नाहीं म्हणून तें मिथ्या असें कोणी मानील काय? तर प्रत्येकाचें कर्तव्य हें आहे कीं हे जर बुद्धीचे स्वाभाविक संस्कार त्याचे ठायीं लुप्तप्राय झाले असतील तर साधूंचे जे ग्रंथ आहेत ते वाचून, गंभीरपणानें, तत्वबुभुत्सेनें, हें विश्व आहे काय, मी काय, बरें वाईट काय, याचा विचार करून तें जें अंतश्चक्षूमध्यें फूल पडलें आहे तें काढून टाकावें. हें सर्वसाधारण जनांस उद्देशून आम्ही सांगतों. एका व्यक्तीस उद्देशून नव्हे.

## पापाची शिक्षा

पापाबद्दल शिक्षा ह्या जन्मीं व मृत्यूनंतरही होते. ह्या जन्मीं शिक्षा होते ती मनुष्याच्या स्वतःच्या मनाची टोंचणी, इतर लोकांपासून होणारा उपहास किंवा जाच, द्रव्यहानि, शरीरहानि व राजदंड इतक्या प्रकारांनीं होते. मृत्यूनंतर शिक्षा कशी होते याबद्दल निश्चय कांहींच करितां येत नाहीं. अनेक तर्क आहेत व अनेक अपवाद आहेत. तथापि मृत्यूच्या वेळीं मनुष्याची जी पुण्य किंवा पापस्थिति असते तेथूनच त्याची पुढें सुधारणा व्हावी ही कल्पना सयुक्तिक दिसते. कित्येकांच्या मतें पुन्हा मनुष्यजन्म प्राप्त होऊन आत्म्याची सुधारणा व्हावी हीही कल्पना कांहीं अंशीं ग्राह्य आहे. तथापि पूर्वस्थितीचें ज्ञान नसतें ह्यामुळें ह्या नव्या जन्मांतील स्थितीस शिक्षा असें म्हणतां येणार नाहीं हा अपवाद येतोच. ह्या जन्मानंतर अनेक काळ सुख, अथवा नर्क प्राप्त होणें हें अन्य धर्मांचें मत किंवा संचित पुण्यापुरत्या सुखभोगास्तव व पुन्हां अधःपतन आणि अन्ययोनीप्रवेश ह्या आमच्या जुन्या धर्मांच्या कल्पना विशेष त्याज्य आहेत.

रानडे, पंडित, भांडारकर.

## वडिलांच्यासंबंधानें व परस्परांसंबंधानें कर्तव्यें इ.

बळवंतराव गोडबोले—अमूक एक गोष्ट अशा प्रकारची आहे, तिच्या संबंधानें आपण अशा रीतीनें वागणें अगर न वागणें हें आपलें कर्तव्य आहे; व त्या-

प्रमाणें न वागल्यास अगर वागल्यास परमेश्वराचे आपण दोषी होऊं; अशा रीतीची आपली खात्री झाल्यावर आपल्या वडिलांची समजूत आपल्याहून निराळी आहे यामुळें आपल्या अशा वागण्यानें अथवा न वागण्यानें त्यांस वाईट वाटणार आहे अशा आपत्तीचे प्रसंगीं आपण केवळ वडिलांस संतोषविण्याकरतां आपल्या समजुतीविरुद्ध त्यांच्या इच्छेप्रमाणें वागणें हाच आपला धर्म आहे कीं काय ?

रा. ब. रानडे–आपली समजूत जरी एक प्रकारची झाली, तरी तिजप्रमाणें आपण एकदम आचरण करूं नये. त्या समजुतीप्रमाणें आपले विचार आहेत असें बोलावें, आपल्याप्रमाणें आपल्या वडिलांचे व दुसऱ्यांचे विचार होण्याचा प्रयत्न करावा, आणि आपल्या विचारांप्रमाणें पुष्कळांचे विचार झाल्यावर त्याप्रमाणें इतरांनीं दुसऱ्या कांहीं कारणानें आचरण न केलें तरी आपण करावें. पण जोंपर्यंत पुष्कळांची समजूत आपल्या समजुतीहून निराळी आहे तोंपर्यंत आपल्या समजुतीप्रमाणें आचरण करणें बरोबर नाहीं.

**कित्येक***—प्रत्येकानें आपल्या समजुतीप्रमाणें वागावें. आपल्याहून दुसऱ्यांची समजूत निराळी असली तर ती बदलण्याचा प्रयत्न आपण करावा, परंतु त्यांची समजूत बदलेपर्यंत वाट पहाण्याची गरज नाहीं. अशी वाट पहात राहिल्यानें सुधारणेचें पाऊल कधींच पुढें पडावयाचें नाहीं. प्रत्येक मनुष्य परमेश्वरापाशीं आपल्यापुरता बांधलेला आहे.

प्रश्न–अमुक गोष्ट जनसमूहाच्या हितास अवश्य आहे असें आपल्यास दिसल्यावर व ती न करणें हें ईश्वराच्या आज्ञेच्या विरुद्ध आहे असें वाटल्यावर ती जर पुष्कळ लोकांच्या समजुतीविरुद्ध किंवा रूढीविरुद्ध असेल तर ती आपण करावी किंवा नाहीं ?

**रा. ब. रानडे**—ती करतील ते धन्य, पण न करतील ते दोषी नाहींत.

**कित्येक**—लोक विरुद्ध असले तरी प्रयत्न केला असतां ती गोष्ट होणें साध्य आहे अशी स्थिति असल्यास ती करावी हेंच धर्मदृष्टीनें आपलें कर्तव्य; साध्य नसल्यास, साध्य होण्याची वेळ नजीक आणण्याविषयीं झटणें हें कर्तव्य होय.

## ब्राह्मधर्म हा हिंदुधर्म आहे कीं नाहीं ?

**रा. ब. रानडे**—ब्राह्मधर्म हा हिंदुधर्माचाच भाग होय. ज्या धर्मांत दुसऱ्या मनुष्याच्या म्हणजे मध्यस्थाच्या साहाय्यावांचून केवळ आपल्याच प्रयत्नानें मनुष्य

---

* ह्या कित्येकांत कोण होते तें कळण्यास आधार नाहीं.

ईश्वराप्रत जाऊं शकतो तो हिंदुधर्म. हें लक्षण ब्राह्मधर्मास लागू पडतें, याजकरितां ब्राह्मधर्म ही हिंदुधर्मवृक्षाचीच एक शाखा होय. ब्राह्मधर्माचीं जीं विधानार्थी व निषेधार्थी मतें आहेत तीं हिंदुधर्मास मान्य आहेत. परमेश्वर एक आहे व मनुष्य आपल्या प्रयत्नानें त्याची प्राप्ति करून घेऊं शकतो ह्याही गोष्टी हिंदुधर्मांत आहेत, त्याचप्रमाणें मूर्तिपूजा हा ईश्वरभक्तीचा खरा मार्ग नव्हे व मनुष्यमनुष्यांत ईश्वरकृत उंचनीचपणा नाहीं ह्याही गोष्टी हिंदुधर्मास मान्य आहेत. हल्लीं ह्या देशांत अनेक धर्मपंथ असून ते प्रत्येक आपणास हिंदु म्हणवितात त्यांच्याकडे दृष्टि दिल्यास, ह्या वरील गोष्टी एकाच पंथांत जरी सर्व न आढळल्या तरी एकेकांत एकेक अशा रीतीनें आढळणाऱ्या आहेत. तेव्हां हे सर्व जर हिंदुधर्माचे भाग होतात तर त्याप्रमाणें ब्राह्मधर्मही आहे असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं.

**रा. ब. शंकरराव पंडित**—माझें मत जरी रा. ब. रानडे ह्यांच्याहून अगदीं निराळें नाहीं, तरी अशा रीतीनें विचार करूं गेल्यास, ख्रिस्ती धर्म हाही हिंदुधर्म होऊं शकेल. ख्रिस्तीधर्मांत ज्या मुख्य गोष्टी आहेत त्याही हिंदुधर्माच्या कांहीं भागांत सांपडतील. दुसऱ्याच्या पुण्यानें आपला उद्धार होतो हीही गोष्ट हिंदुधर्मांत आहे.

**प्रो. भांडारकर**—ब्राह्मधर्माचें मुख्य लक्षण व तें इतर धर्मांहून निराळें असें आहे कीं, मनुष्य हा केवळ आपल्या प्रयत्नानें परमेश्वराप्रत जाऊं शकत नाहीं, तर मुख्यत्वेंकरून परमेश्वराच्या कृपेनेंच ही गोष्ट होते.

**रा. ब. रानडे**—मनुष्य आपल्या प्रयत्नानें परमेश्वरप्राप्ति करून घेऊं शकतो, हें जें माझें म्हणणें, त्यावर भांडारकर ह्यांनीं परमेश्वरसाहाय्य पाहिजे म्हणून जें सुचविलें तें मला मान्य आहे. हीं दोन्हीं ब्राह्म धर्माचीं लक्षणें हिंदु धर्मांत आहेत. याजकरितां ब्राह्मधर्म हा हिंदुधर्माचाच एक भाग आहे असें जें माझें म्हणणें आहे त्यास बाध येत नाहीं.

**प्रो. भांडारकर**—हिंदु हा शब्द प्राचीन ग्रंथांत नाहीं. यापुढें हिंदुधर्म म्हणजे काय ह्यास ग्रंथाधार मिळणें अशक्य आहे. हिंदु शब्दाची उत्पत्ति पहातां पंजाबांत ज्या पांच नद्या आहेत त्या व सरस्वती आणि दुसरी एक मिळून ज्या सात नद्या त्यांस सप्त हिंदु असें म्हणत, व परसिअन भाषेच्या नियमाप्रमाणें सच्या ठिकाणीं ह असा अपभ्रंश होऊन सप्तसिन्धूच्या जागीं हप्तहिंदु असा शब्द झाला. पुढें हप्त हें पद नाहींसें होऊन हिंदु हा शब्द राहिला. ह्या उपपत्तीवरून पहातां ह्या नद्यांच्या आसमंतांत राहणारे लोक ते हिंदु असें प्रथम होतां होतां ह्या नद्यांच्या

अलीकडील सर्व लोकांस तो शब्द लागू होऊन पुढें सर्व देशभर त्याची व्याप्ति झाली. ह्या अर्थाच्या धोरणानें जितके लोक हिंदु व जितके धर्म हिंदु ठरतात त्या मानानें पाहिलें तर ब्राह्मधर्म हा हिंदुधर्म आहे कीं नाहीं हा विचार अगदीं शुष्क होतो, याचें पर्यवसान केवळ शब्दभेदावर येतें, आणि ह्या वादांत कांहीं अर्थ नाहींसा होतो. ज्या प्रश्नावर येथें वादविवाद चालू आहे त्याचें विचार करण्यासारखें स्वरूप हें आहे कीं, ब्राह्मधर्म हा ह्या देशांत चालू असलेल्या धर्मांशीं मिळण्यासारखा आहे कीं नाहीं, तर ह्या प्रश्नाचें निराकरण आजच करतां येण्यासारखें नाहीं. कारण ब्राह्मधर्माचें खरें स्वरूप अद्याप (१८८१) पूर्णदशेस आलें नाहीं, त्याची अद्याप रचना होत आहे. पण त्याचें स्वरूप ह्या देशांतील धर्मांच्या स्वरूपांत मिळाण्यासारखें होईल इकडे लक्ष ठेवून त्याची रचना झाली पाहिजे. जसे सर्व मनुष्यांचे अवयव एकच असून प्रत्येकाच्या स्वरूपांत अंतर असतें, त्याप्रमाणें सर्व धर्मांचीं मुख्य लक्षणें जरी एकच आहेत तरी प्रत्येकाचें स्वरूप निरनिराळें रहावयाचेंच; करितां ह्या देशांतील ब्राह्मधर्माचें स्वरूप ह्या देशांतील इतर धर्मांप्रमाणेंच असलें पाहिजे.

दुसऱ्या एका प्रसंगीं "सर्वांशीं ब्राह्मधर्माचें स्वरूप प्राप्त होईल इतका हिंदुधर्म सुधारतां येईल काय" या विषयावर वादविवाद झाला. त्या प्रसंगीं प्रो. भांडारकर, रा. रा. काशिनाथपंत तेलंग आदिकरून मंडळी होती. एकंदर विचाराचा ओघ असा होता—

हिंदुधर्माची व्याख्या करणें अशक्य आहे. परंतु मुसलमान लोकांनीं प्रथमतः हिंदु हें नांव सिंधुनदीच्या ह्या बाजूस रहाणाऱ्या सर्व लोकांस दिलें. त्याप्रमाणें आपण सर्वही हिंदु व ब्राह्मधर्मही हिंदु म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. तथापि हल्लीं हिंदु धर्माचा लोकमान्य अर्थ म्हणजे वेदांवर ज्यांची श्रद्धा ते हिंदुधर्मानुयायी, किंवा मूर्तिपूजक जे ते हिंदुधर्मानुयायी अशा प्रकारचा आहे. तेव्हां त्यांत ह्या धर्मांचा समावेश होत नाहीं. म्हणजे वेद ब्राह्मधर्मप्रतिपादक होण्याइतके सुधारतां येणार नाहींत. कारण, कसें तरी करून त्यांचा अर्थ आपल्या मतांस अनुकूल पडेल असें करणें ब्राह्मधर्मानुयायी लोकांस मान्य होणार नाहीं. आणि त्याप्रमाणेंच आपला कोणताही जुना धर्मग्रंथ सर्वांशीं ब्राह्मधर्मप्रतिपादक नाहीं. तर या पक्षीं विचार केला असतां हिंदुधर्माची सुधारणा करून तो ब्राह्मधर्माचें स्वरूप पावेल असें दिसत नाहीं. तथापि ब्राह्मधर्माचा पाया हिंदुधर्मांत आहे असें म्हणतां येईल. परमेश्वर एकच आहे, तोच आराध्य आहे, इ० सर्व मानवकुलांचा परस्परांशीं

बंधुभगिनीचा संबंध आहे इ० ब्राह्मधर्मांचीं मुख्य मतें व आवाहन, स्तुति, ध्यान, भक्ति इ० जीं उपासनेचीं मुख्य अंगें तीं हिंदु धर्मांत आहेत. म्हणून एवढया-पुरता ब्राह्मधर्म हा हिंदुधर्माची सुधारणा असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

---

**रा. ब. रानडे**—परधर्मी लोकांस हिंदुधर्मांत घेतां येत नाहीं अशी जी सर्वत्र समजूत आहे ती चुकीची आहे. अशा लोकांस हिंदुधर्मांत घेतल्याचीं उदाहरणें आहेत.*

* * * *

## धर्मवृत्ति व धर्मतृष्णा ह्यांची वाढ.

**रा. ब. रानडे**—परोपकारार्थ मनुष्यानें झटावें हाच मुख्य धर्म होय. मनुष्यानें फार वेळपर्यंत ध्यानस्थ बसणें, रागद्वेषादि वृत्तींचा दिवसेंदिवस लय होईल अशा स्थितीप्रत जाण्याचा प्रयत्न करणें व एकंदरींत आपल्या सर्व इंद्रियांस स्तब्धता आणण्याकडे कल ठेवणें ही जी धार्मिक वृत्तीची जुनी समजूत ती आपल्याला सोडली पाहिजे व तिचा अगर आपल्या इंद्रियांचा व्यापार विशेष वाढेल, आजपर्यंत आलेली शांति कमी होईल, रागद्वेष जास्त वाढतील असा प्रयत्न केला पहिजे.

**एक**—मनुष्यानें आपल्या गुणांकडे न पाहातां दोषांकडे नेहमीं पहात असावें, आपल्याला मरण येणार आहे ही सतत आठवण ठेवावी, जें कांहीं करावयाचें त्यांत परमेश्वराचा संबंध मनांत आणीत जावा, धर्मग्रंथांचें वाचन ठेवावें; भोजनाचे वेळीं, निजते वेळीं, परमेश्वरस्मरण नियमानें करावें.

**बाबू अमृतलाल बोस**—( १८८१ ) धर्मतृष्णा प्रथम उत्पन्न झाली पहिजे. नंतर तिची शांति करण्याचे मार्ग पाहिले पाहिजेत. ईश्वराच्या अनंत गुणांचा अनुभव आपणास येईल अशी आपली वृत्ति करण्याकरितां नित्य ईश्वरोपासना केली पाहिजे.

**प्रो. भांडारकर**—धर्मतृष्णा ही मनुष्यमात्रामध्यें स्वाभाविकच असते. इतकेंच कीं ती वारंवार मंद होत असते. ती जागृत करण्याकरितां मनुष्यानें सावध असलें पाहिजे. ही आपोआप जागृत होण्यासही परमेश्वरानें पुष्कळ साधनें करून ठेविलीं आहेत. सृष्टींत नाना तऱ्हेचे फलपुष्पादि चित्रविचित्र, समुद्रासारखे अफाट, पर्वतासारखे प्रचंड असे पदार्थ आहेत, त्यांच्या केवळ दर्शनानेंच धर्म-

---

*Rise of The Maratha Power पहा.

तृष्णा जागृत होते. तसेंच धर्मतृष्णेचा लोप करणारें जें विषयसुख त्याच्या प्राप्ती-चीही अशीच योजना करून ठेविली आहे कीं, तिच्या योगानेंही ह्या तृष्णेची जागृति व्हावी. मनुष्याची विषयेच्छा सतत वृद्धिंगत होत असते आणि तिची तृप्तीही तशीच होत राहती तर मनुष्य सतत ह्या विषयसुखांतच गढून गेला असता. परंतु तसें न करितां वारंवार निराशा व्हावी अशीच योजना ठेविली आहे. तसेंच मृत्यूसारखे प्रसंगही वारंवार यावे अशी योजना आहे, तिच्या योगानें धर्मतृष्णेची जागृति होत असते.

## प्रार्थनेंत काय मागावें ?

आवाहन, ईश्वरस्तवन व ध्यान हीं अंगें पूर्णपणें झाल्यास परमेश्वराचे सान्नि-ध्यांत अंतःकरण तल्लीन होऊन जातें. अशा वेळेस आपले दोष व दुर्बलता हीं मनुष्याच्या मनांत सहजीं येऊन त्याच्यानें परमेश्वराजवळ साहाय्य मागितल्याशि-वाय रहावत नाहीं. अशा स्थितींत प्रार्थना करणें हा विचार करावा लागत नाहीं, ती स्वाभाविक रीतीनेंच होऊन जाते. अन्नवस्त्र इत्यादि बाह्य वस्तु व भक्ति, पवित्रता, सद्भाव, साधुत्व इ० आध्यात्मिक वस्तु ह्या दोन्ही ईश्वरी कृपेनेंच आप-णास प्राप्त होतात. त्यांपैकीं आध्यात्मिक वस्तूंच्या प्राप्तीसाठीं प्रार्थना केली असतां आपणास त्या देवाकडून मिळूं शकतात. त्या अनन्यभावें मागितल्या असतां प्रार्थना सफळ होते असा एक तत्संबंधीं नियम आहे. याप्रमाणें मागितल्या असा असतां प्रभु परमेश्वर त्या देतो ह्याविषयीं साधूंचीं पवित्र चरित्रें, भक्तांचा अमूल्य अनुभव सर्वत्र प्रमाण आहे. आणि थोडाबहुत सर्वांस याचा अनुभव येतो. कोणाचीही चित्त-वृत्ति क्षुब्ध झाली असतां किंवा शत्रूविषयीं द्वेषभावानें अंतर जळत असतां, जर त्यानें अनन्यभावानें देवास शरण जाऊन त्याची अशा दुष्ट विकाराच्या व द्रोही भावाच्या निरसनार्थ प्रार्थना केली, तर तत्काळ विवेक जागृत होतो, अज्ञान दूर होतें, मन शांत होतें व शत्रुत्व अगदीं जातें, निर्वैरवृत्ति होऊन शत्रूचा मित्र होतो, विन-म्रभाव व सर्वांविषयीं प्रेम हीं उद्भूत होतात. आणि विषयपरतेमुळें जरी ही स्थिति टिकली नाहीं तरी क्षणभर तरी असा अनुभव होतो. मनुष्य धर्मसंपन्न जे होतात ते ही आत्मोन्नतीविषयीं प्रार्थना सफळ होते म्हणूनच होतात व ह्या प्रकरणीं धार्मिक लोकांचा फारसा मतभेदही नसतो. परंतु बाह्य विश्वाविषयीं परमेश्वराचे नियम अबा-धित आहेत. म्हणजे ते कशानेंच बदलणार नाहींत असा पदार्थविज्ञानशास्त्रवेत्त्यांचा शोध व अनुभव आहे. म्हणून त्या वस्तूंच्या प्राप्तीसाठीं ईश्वराची प्रार्थना करण्याची जरूर नाहीं, एवढेंच नव्हे, तर केली असतां सफळ होऊं शकत नाहीं. अन्नवस्त्रादि

वस्तु कृपेची साउली असा जो परमेश्वर तो आपणास देतो व देणार ह्यांत संशय नाहीं, पण त्या मागितल्यानें आपणास मिळतील असें नाहीं. पर्वतावरून एखादा खडक सुटून आपणावर पडत आहे व त्या योगें आपला खचित नाश होणार असें पाहूनही जर कोणी तो खडक थांबून नाश न व्हावा अशी प्रार्थना करील, तर तो थांबेल असें नाहीं. दुःसह महारोगानें पीडिलेला मनुष्य आपण तत्काळ रोगमुक्त व्हावें असें देवाकडे मागेल तर तो ज्याप्रमाणें रोगमुक्त होणार नाहीं, तसेंच आपणास पाहिजे त्यावेळेलाच पाऊस पडावा, किंवा इच्छेस येईल तेव्हां एकदम धान्यसमृद्धि व्हावी असें इच्छून जर कोणी शेतकरी ईश्वराची प्रार्थना करील तर ती सिद्धीस जाणार नाहीं. तेव्हां आध्यात्मिक वस्तूविषयींची प्रार्थना मात्र सफळ होते, बाह्य वस्तूविषयींची होत नाहीं असा निर्णय समजावा.

## प्रेरणा किंवा आदेश.

जो परम समर्थ व परम दयाळु परमेश्वर सर्व विश्वाचा चालक तो मनुष्याच्या मनालाही प्रेरणा करितो. परमात्मज्ञान, सत्यअसत्य, पापपुण्य, इत्यादि त्याच प्रेरणेच्या योगानें मनुष्यास समजतें. ही प्रेरणा दोन प्रकारें होते. एक प्रकारची होते ती आपणास समजून होते व दुसऱ्या प्रकारची समजून होत नाहीं. परमेश्वराविषयीं ज्ञान, आत्मज्ञान, आपल्या कर्तव्यतेचें ज्ञान, सत्य भाषणाविषयीं प्रवृत्ति, ही सर्व पहिल्या प्रकारची प्रेरणा होय. ही भक्तीनें व प्रार्थनेनें अधिकाधिक होते. परमेश्वरापासून सत्य, तत्त्व, नित्य इत्यादिकांचें अधिकाधिक ज्ञान प्राप्त होतें आणि शेवटीं देवाकडे मागून व त्याचो प्रेरणा होतां होतां मनाची अशी वृत्ति होते कीं, कितीही दुःख, व्यथा, संकटें इत्यादि प्राप्त झालीं तरी धीर व सत्य न सोडण्याविषयीं व विकार न पावण्याविषयीं परमेश्वरापासून बोध सहज होतो व सामर्थ्य प्राप्त होतें. समजून जी प्रेरणा होते ती आध्यात्मिक संबंधानें असते, बाह्य वस्तूविषयीं नसते. कोणताही एखादा मनुष्य किंवा वस्तु बरी किंवा वाईट हें त्यांच्या स्थितीवरून बुद्धीनें व विचारानें पाहिलें पाहिजे. देवानें त्याचसाठीं हीं साधनें दिलीं आहेत; व कळून प्रेरणा होते ती—उदाहरणार्थ—अशी कीं, मनुष्यें आपलें हित होईल अशा ज्या पुष्कळ गोष्टी करितात त्यांपासून इतरांचेंही कल्याण होतें. शेतकी, व्यापार, राज्यकारभार इत्यादि गोष्टी बहुधा अशाच असतात. या गोष्टींपासून मनुष्यजातीचें पुष्कळ कल्याण होतें तें ईश्वरी प्रेरणेनेंच होतें. मात्र कल्याणकर्त्यांच्या लक्षांत तें असतेंच असें नाहीं. ईश्वरी प्रेरणा अबाधित व सत्य असते, परंतु कामक्रोधादि मध्यें येऊन खरी प्रेरणा एकीकडे राहते

म्हणून आपल्याच मनाचे तरंग ईश्वरी प्रेरणा असें वाटण्याची भीति आहे, म्हणून सावध असलें पाहिजे. प्रेरणा शब्दांनीं सांगितली जाण्यापेक्षां अंतःकरणाला तिचा चांगला अनुभव होतो. कांहीं प्रसंगीं प्रेरणा सहज आपोआप होते. विश्व पाहून ईश्वर व त्याचा महिमा याविषयीं एकदम विचार येतात. केव्हां केव्हां विवेक आपोआप जागृत होतो. आणि पुष्कळ वेळां हें वाईट आहे हें करूं नको, हें बरें आहे तें कर, असा स्पष्ट व सहज बोध मनाला होतो. असन्मार्ग सोडून सन्मार्गी लाग, जन्माचें सार्थक्य कर, जनांच्या कल्याणार्थ देह झिजीव, असाही अंतःकरणांत ईश्वराचा ध्वनि प्रवृत्तिरूपानें बहुत वेळां सहज आज्ञा करितो. प्रेरणा स्वाभाविक असली पाहिजे व मनाची स्थिति अगदीं स्वाभाविक, दुर्ग्रहरहित असली म्हणजे प्रेरणाही स्वाभाविक होते. ती मनालाच होते. देवानें कानांत सांगितलें, स्वप्नांत सांगितलें, हा व चिठ्ठ्या वगैरे घालून देवाची इच्छा विचारणें हा सर्व भ्रम आहे. बुद्धि व मन ह्यांच्या विरुद्ध हा प्रकार आहे. खरी प्रेरणा मंगल असते. मंगल परमात्मा अमंगल प्रेरणा करणार नाहीं. आणि हेंहि ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, आध्यात्मिक संबंधाची जी पहिल्या प्रकारची प्रेरणा तिच्याविषयीं मात्र परमेश्वराजवळ प्रार्थना केल्यानें ती होण्याची शक्यता आहे, आणि आपणास जरी अशी समजून आणि न समजून प्रेरणा होते, तरी मनुष्यमात्रास जें कांहीं चांगलें समजतें, जें कांहीं तो चांगलें करितो व चांगलें बोलतो व त्याच्याकडून जें कांहीं चांगलें घडतें तें सर्व ईश्वरी प्रेरणेनें होतें.

प्रो. भांडारकर ( १८८१ ).

## अंतःकरणामध्यें धर्मवृद्धि व लोकांमध्यें धर्मप्रसार.

चोहींकडे बहुधा धर्मप्रसार करण्याविषयींच बोलणें ऐकूं येतें. स्वतःच्या अंतःकरणांत धर्माची वृद्धि झाली पाहिजे असें कोणी फारसें बोलत नाहीं. तर ही स्वतःविषयींची उपेक्षा किंवा विस्मरण नाहींसें होऊन आपलें मन धर्माकडे वळेतोंपर्यंत कोणीही इतरांमध्यें धर्मप्रसार करण्याविषयीं केवळ शब्दवाद केल्यानें व यत्नही केल्यानें फारसा लाभ होईल असें वाटत नाहीं. स्वतःच्या अंतःकरणांत जसजशी धर्मवृत्ति वाढते, कामक्रोधादिकांचें शमन होतें, सर्व प्रकारें लीनता प्राप्त होत जाते, स्वार्थपरता नष्ट होते, तसतसा इतरांस बोध करण्यास अधिकार, आवेश व शक्ति प्राप्त होतात आणि श्रोत्यांच्या मनावर तो ठसतो. आणि असेंही होतें कीं, धर्मनिष्ठ पुरुषांकडे लोकांचीं मनें आपोआप वळतात. मात्र पूर्णता प्राप्त झाल्यावरच बोध करणें सुरू करावें असें मुळींच म्हणणें नाहीं. तथापि

निदान परमार्थसाधनाच्या मार्गी स्वतः निष्ठेनें लागलेंच पाहिजे. स्वतःच्या अंतः-करणामध्यें धर्मवृद्धि करण्याकरितां ईश्वराची आराधना, ध्यान, प्रार्थना, भक्ति, भजन, कीर्तन, श्रवण, पुराण, सत्समागम, ग्रंथावलोकन हे उत्तम, प्रसिद्ध व लोकमान्य उपाय आहेतच. मात्र जागृत राहून नियमानें हीं कार्यें आपल्याकडून झालीं पाहिजेत.

—प्रो. भांडारकर.

## धर्मशील मनुष्याचीं लक्षणें.

( रा. ब. रानडे यांचे विचार. )

धर्मशीलपणाचें एक लक्षण असें समजावें कीं, आपला आत्मा स्वतंत्र आहे, आपण दुसरा सांगेल तें डोळे मिटून ऐकून त्याप्रमाणें ताबडतोब कृति करूं नये, आपण स्वतः विचार करावा आणि आपल्यास जें नीट दिसेल तें स्वीकारावें अशी बुद्धि असणें. दुसरें लक्षण असें कीं, दुसरे लोक कितीही पापी असले तरी त्यांस आपण नीच मानूं नये, आपण त्यांच्या स्थितींत असतों, तर आपणही कदाचित् त्यांच्यासारखेच दुराचारी झालों असतों असा विचार करून आपणाकडे उणेपणा घेत जावा. तिसरें लक्षण असें कीं, आपल्याला जें कांहीं कर्तव्य आहे तें आपल्या स्वतःकरितां, जगाकरितां कांहीं कर्तव्य नाहीं, अशी समजूत नसावी आणि जगाकरितां आपण कांहीं तरी केलेंच पाहिजे अशी प्रखर इच्छा असावी.

—पुणें संगतसभा.

## नीति व धर्म.

( प्रो. रामकृष्णपंत भांडारकर. )

नीतीनें वागणें हें एक स्वार्थासाठीं वागावें, किंवा लोककल्याणासाठीं वागावें असे बहुधा दोन पक्ष दिसतात. स्वार्थ हा तर नीतीचा पाया होणेंच नाहीं. अनीतीनेंही स्वार्थसाधन होतें. अनीतीच्या मार्गानें श्रीमान् झालेले असे पुष्कळ लोक असतात, स्वार्थ म्हणजे अनीतीच होते. तेव्हां हा पक्ष सहज पडतो. आतां लोककल्याणार्थ नीति असावी. कारण, लोककल्याण करणें हा मनुष्याचा स्वतंत्रपणें स्वभाव आहे असें म्हणण्याचा जो पक्ष त्यापेक्षां नीतीनें आचरण करणें हाच मनुष्याचा स्वभाव आहे असें म्हणणें योग्य व सत्य होय. सुकृत करणें हा मनुष्यासारखा मोठा अधिकार पावलेल्या प्राण्याचा स्वभावच आहे. नीतीनें आपलें व परांचें कल्याण बहुतेक प्रसंगीं होतेंच हें निर्विवाद आहे, परंतु सर्वेच प्रसंगीं तें होईल असें नाहीं. तथापि नीति सोडून नीतिमान् पुरुष वागत नाहींत. कारण,

नीति ही मनुष्याचें कर्तव्य आहे, व ती सत्य आहे, आणि ती कर्तव्य आहे असें बहुधा सर्व मानितात. आणि कर्तव्य म्हटलें म्हणजे मग त्यासाठीं कांहीं झालें तरी त्याचा त्याग न करणें, हें कर्तव्यतेचें खरें ज्ञान होय; आणि नीति ही सत्य आहे, तेव्हां ती अमुक गोष्टीच्या लाभार्थ पाहिजे, नाहीं तर नको असें म्हणणें हीच अनीति आहे. आणि कोणतेंही सत्य अमुक एक लाभ करून घेणें आहे म्हणून तें पाहिजे असें म्हणतां म्हणतां सर्वच स्वार्थ होतो आणि मग नीतीचीही वाट अशीच. तर अशी जी ही नीति कीं, जिच्याप्रमाणें आपली इच्छा मनुष्यानें वळविली पाहिजे, त्याच्या इच्छेप्रमाणें ती वळणार नाहीं, ती नीति एक नित्य व शाश्वत नियम आहे आणि हा एक ईश्वराचाच धर्म होय. हा नियम मान्य तर आहे, परंतु तो ईश्वराचा धर्म आहे, असें जर मनुष्याच्या ध्यानांत कोणत्याही कारणांवरून नसलें तर त्यानें तें ध्यानांत आणून नीतीचा व धर्माचा हा मोठा व निकट संबंध पहावा. धर्माशिवाय खरी नीति नाहीं आणि नीतिशिवाय खरा धर्म नाहीं. नीतीचा खरा व पूर्ण विकास धर्मावांचून होणेंच नाहीं. धर्मनिष्ठ असे जे नीतिमान् पुरुष त्यांच्याच हातून नीतीचीं मोठीं कार्यें होतात. धर्मावांचून नीति टिकणारही नाहीं. कारण ती खरी नव्हे. कामक्रोधादिकांस दाबांत ठेवणें, प्रसंग पडल्यास संसाराचा व प्राणाचा त्याग करणें, नीतीच्या मार्गाबाहेर एकही पाऊल न टाकणें अशी स्थिति ईश्वरावर प्रेम असल्यावांचून व देवाचीच इच्छा प्रमाण असें सर्व व्यवहारांत झाल्यावांचून कदापि होणें नाहीं, आणि अशी जी धर्मपूर्वक नीति त्याच नीतीनें लोकांचेंही खरें कल्याण होणार आहे.

## अवतार.

ईश्वर नित्य व अचल आहे. म्हणून त्याच्या गुणधर्मांत कांहीं कमी जास्त होणें नाहीं. त्याचें कधीं स्वरूपांतर होणें नाहीं. यास्तव सदेह इ० होणें हें त्याच्या स्वभावाविरुद्ध आहे. परमेश्वर साक्षात् डोळ्यांसमोर उभा राहून त्यानें कांहीं अद्भुत चमत्कार करून दाखविले तर त्यावर मनुष्याचा भरंवसा निर्विवादपणें बसून भाव तत्काळ जडेल व श्रद्धा आणि भक्ति ह्या दृढ होण्याचा अधिक संभव आहे असें कित्येकांचें म्हणणें असतें. या म्हणण्याची अखेरी अशी होणार आहे कीं प्रत्येकाजवळ एकेक परमेश्वर उभा असला पाहिजे! आतां सर्वशक्तिमान, सर्वव्यापी परमेश्वरानें सर्वकाळ सर्व प्रसंगीं व सर्व स्थळीं सर्वांच्या अंतरात्म्यामध्यें निवास करून साक्षात्कार करणें हें किती बरें, सहज व मनुष्यास सुलभ आहे, आणि अद्वितीय जो तो त्यानें अनेक होणें हें किती बरें त्याच्या स्वरूपाला

आणि मनुष्याच्या बुद्धीला विरुद्ध आहे ? आणि तो अदृश्य असतांही सर्व प्रकारें मनुष्याचें कल्याण व उद्धार करण्यास समर्थ प्रभु आहे. तेव्हां सावयवरूपानें अवतार घेतल्यानें त्याच्या एकत्वास व गुणास गौणत्व येतें. आणि पूर्ण प्रभूच्या ठायीं न्यूनत्व स्वप्नीं तरी कोणाच्या येणार ? दुसरें असें कीं, दृश्य झाल्यानें ईश्वर आम्हांला अधिक प्रत्यक्ष होईल असेंही नाहीं. आपणास आमचा देह देखील दूर आहे, परंतु आपल्या आत्म्याला अत्यंत संलग्न म्हटला म्हणजे परमात्मा होय. परमात्मा व जीवात्मा यांचा कोणत्याही प्रसंगीं व कोणत्याही स्थितींत वियोग होत नाहीं. तेव्हां सर्व स्थितींत अति निकट व प्रत्यक्ष तो मनुष्यास आहे. अहोरात्र त्याचा साक्षात्कार आपणास होतच आहे. विषय, प्रपंच, स्वार्थ ह्यांनीं आपल्या अंतःकरणाच्या वृत्ति कलुषित होतात, विवेक अंध होतो. आणि त्यामुळें परमात्मा समीप असतांही दिसत नाहीं असें होतें. सारांश, बाह्य दर्शनानें त्याचा साक्षात्कार कमी असेंच खरें. परमेश्वर सर्वशक्तिमान आहे. तर तो मनुष्यादिकांच्या स्वरूपानें अवतार घेऊं शकेल. न शकेल तर त्याच्या सर्वशक्तित्वाला बाध येतो असेंही पुष्कळांचें म्हणणें असतें खरें. परंतु सर्वशक्तिमान, सर्वव्यापी, सर्वांतर्यामी परमेश्वरानें अशीं क्षुद्र रूपें धारण करणें ही कांहीं शक्ति आहे कीं काय ? पतन पावणें ही शक्ति होते काय ? मग दुर्बलता ती कोणती ? तर क्षुद्र होणें हा दोष आहे. म्हणून परमपवित्र परमेश्वर अवतार घेऊन अशा दोषास पात्र होईल काय ? कदापि होणार नाहीं. म्हणजे असें होणें त्यास अशक्य आहे. तसेंच, नाहीं होणें, पातक करणें, इ० परमेश्वरास अशक्य आहे. कारण, असें करणें हें त्या परमपूर्ण व शाश्वत स्वरूपास हीनता आणणारें आहे. तर तो अंतःकरणगम्यच आहे. तथापि साधु व धर्मात्मे महापुरुष हे ईश्वराचे अवतार आहेत असें जें म्हणतात तें एका अर्थी खरें आहे. प्रत्येक मनुष्यामध्यें जें कांहीं चांगलें म्हणून दिसतें तें सर्व ईश्वराचा अंश आहे आणि भक्तांच्या ठायीं हा अंश अधिक असतो. म्हणून सर्व मनुष्यें व विशेषेंकरून भक्तजन तदंशीं ईश्वराचे अवतारच आहेत असें म्हणण्यास चिंता नाहीं. परंतु सर्वांतर्यामी, प्राणरूपी परमात्म्यास सदेह अवतार घेण्याची कोणत्याही कारणानें आवश्यकता नाहीं. परमेश्वर सदासर्वदा मनुष्याबरोबर आहे. त्याच्या अंतःकरणांत त्याचा अधिवास आहे, तो त्यास सद्बोध व प्रेरणा करितो, सुखशांति देतो, सतत साहाय्य करितो. ही आपली सर्वांची जननी आम्हां लेकरांस सोडून एक क्षणभर देखील रहात नाहीं; आपला नेहमीं सांभाळ करिते व कल्याण करिते.

---

# आर्यमहिला समाज.

प्रार्थनासमाजानें स्वतः स्त्रियांच्या शिक्षणासाठीं स्वतंत्र संस्था जरी स्थापिलेल्या नाहींत, तरी स्त्रीशिक्षणाचा पुढाकार घेणारांत प्रार्थनासमाजाचे सभासदच पुढारी होते हें सर्वांस मान्य आहे. उच्च शिक्षणाचा विचार केला तरी मुंबई विद्यापीठांतून पदव्या घेतलेल्या पहिल्या हिंदु स्त्रिया प्रार्थनासमाजापैकींच आहेत असें आढळून येईल. ज्या वेळीं स्त्रियांच्या शिक्षणाचा सर्व बाजूंनीं विचार झालेला नव्हता त्या वेळीं प्रौढ स्त्रियांच्या शिक्षणाचा व त्यांना ज्ञानाची गोडी लावण्याचा प्रश्न प्रार्थनासमाजानेंच पुढें आणिला आहे. १८७७ सालच्या सुबोधपत्रिकेच्या एका अंकांत पुढील सूचना आढळतेः—

There seems to be sincere desire on the part of our countrymen to impart education to the other sex. But ideas on this subject are most different and most incoherent. We cannot afford to Europeanize our Hindu sisters, nor can we afford to let them remain where they are, so backward in some of the most valuable concerns of human life. We wish that some sound principles on this subject should be laid down for the guidance of those who have undertaken the duty of female education. We propose that a meeting of gentlemen who have taken interest in the reformation of the other sex should be called in Bombay, and some adjustment of principles possible under the circumatances should be made. We wait for suggestions on this subject.

त्याचप्रमाणें पुण्याची मुलींची शाळा व येथें पंडिता रमाबाई आल्या असतां स्थापन झालेलें शारदासदन यांच्या बाबतींत प्रार्थनासमाजाच्या पुढाऱ्यांनींच पुढाकार घेतला होता हें सर्वांस माहीत आहे. परंतु ह्या दोन्ही योजनांस मूर्त स्वरूप येण्याच्या पूर्वींच संसारांत पडलेल्या व तरुण स्त्रियांस ज्ञानसंपन्न

करण्याच्या बाबतींत अल्पस्वल्प प्रयत्न प्रार्थना समाजानें मुंबईस प्रथम सुरू केले व ह्या कार्यासाठीं स्त्रियांची सभा भरवितां भरवितां त्या सभांचें रूपांतर आर्य-महिला समाजांत कसें झालें त्याची हकीकत आतां येथें नमूद करितों.

१८७७ सालीं बाबू प्रतापचंद्र मुझुमदार समाजासंबंधानें काम करण्यासाठीं मुंबई शहरीं आले होते व त्या वेळीं कित्येक महिने त्यांचा येथें मुक्काम होता हें वाचकांस माहीत झालेंच आहे. १८७२ सालीं त्यांच्याच खटपटीनें थीईस्टिक ॲसोशिएशन स्थापन झाली होती. दुसऱ्या खेपेस म्हणजे १८७७ सालीं ते जेव्हां पुन्हां येथें आले त्या वेळीं स्त्रियांच्या शिक्षणाचा प्रश्न त्यांनीं हातीं घेतला. त्यांनीं असें पाहिलें कीं, मंदिरांतील उपासनांस स्त्रिया क्वचितच येतात व येथें जरी पडद्याची अडचण नाहीं, तरी सुद्धां ज्याअर्थी स्त्रियांची संख्या इतकी अल्प आहे त्या अर्थी तूर्त तरी हा पुरुषांचाच धर्म होऊं पहात आहे. स्त्रियांची ही अज्ञानाची स्थिति घालविल्यावांचून पुरुषांच्या सर्व विचारांशीं समरस होण्याची पात्रता त्यांच्यांत यावयाची नाहीं असें वाटून त्यांनीं जगांत काय चाललें आहे, नवीन ज्ञानानें किती विलक्षण क्रांति घडवून आणिली हें स्त्रियांस पटवून त्यांस ज्ञानार्जनाची गोडी लावावी अशी योजना करण्याचें त्यांनीं ठरविलें व ह्या योजनेनुसार प्रयत्न करावयास ते लागले. परंतु ह्या बाबतींतही त्यांच्यापुढें एक मोठी अडचण उभी राहिली; आणि ती भाषेची. बाबू मजकुरांस आपले विचार हिंदी भाषेच्या द्वारें प्रकट करितां येत होते, ही त्यांतल्यात्यांत एक समाधानाची गोष्ट होती. तरीपण मराठी जाणणारांमध्यें त्यांस एक उत्तम साहाय्यक मिळाले व ते डॉ. सखाराम अर्जुन हे प्रसिद्ध गृहस्थ होत. ह्यांची स्त्रीशिक्षणासंबंधाची आस्था अतिशय होती, म्हणून प्रथमपासूनच ते प्रतापचंद्रांना साहाय्य करावयास सिद्ध झाले व अशा प्रकारें खेतवाडींतील १७६ नंबरच्या घरीं—जेथें बाबू प्रतापचंद्र यांचा मुक्काम होता तेथें—ता. ४ दिसेंबर रोजीं त्यांनीं एक स्त्रियांची सभा भरविली. सर्वांच्या खटपटीनें त्या दिवशीं पन्नास एक स्त्रिया हजर होत्या. ह्या पहिल्याच दिवशीं हिंदी व मराठीमध्यें सूर्य, चंद्र, पृथ्वी, तारे ह्यांसंबंधाची माहिती त्यांस सांगण्यांत आली व ती स्त्रियांस फार मनोरंजक व बोधपर वाटली. ह्या दिवशीं लागणारीं सर्व उपकरणें डॉ. सखाराम अर्जुन ह्यांनीं एका पारशी मित्राकडून आणिलीं होतीं त्यामुळें सर्व व्याख्यान सुलभ रीतीनें देण्यास पुष्कळ मदत झाली.

दुसऱ्या सभेच्या वेळीं डाक्टर साहेबांनीं स्त्रिया सभेस जमण्यापूर्वीच टेबलावर तीन मायक्रॉस्कोप्स—सूक्ष्मदर्शक यंत्रें—आणून ठेविलीं ! हीं यंत्रें पाहून स्त्रियांना काय वाटलें असेल त्याची आज कल्पनाच केली पाहिजे. त्या दिवशीं लहान लहान किडे व दुसऱ्या तशाच प्राण्यांची रचना कशी असते हें सर्वांस त्या यंत्रांच्या द्वारें दाखवून दिलें; अशा प्रकारें कधीं बलूनसारखे शास्त्रीय विषय, कधीं व्यावहारिक ज्ञान, कधीं आजची परिस्थिति असे विषय घेऊन स्त्रियांचीं मनें विकसित करण्याचा प्रयत्न सुरू झाला. पुढें बाबू प्रतापचंद्र हे स्वदेशीं गेल्यावर डा. सखाराम अर्जुन ह्यांनीं मोठ्या आस्थेनें हें काम चालविलें. पूर्वी आठवड्यांतून एकच वेळ ह्या सभा भरत असत. पण नंतर समाजाच्या मुखशाळेंत त्या आठवड्यांतून दोन वेळां, पुढें तर आठवड्यांतून तीनतीन वेळां भरूं लागल्या होत्या. ह्यावरून त्या वेळीं डा. सखाराम अर्जुन यांनीं किती मेहनत घेतली असली पाहिजे, ह्याची आपल्याला अल्प तरी कल्पना होते. नंतर ह्याच सभांतून स्त्रिया स्वतः निबंध वाचूं लागल्या. त्या वेळीं कांहीं पुरुष ( एक दोन ) सभेस हजर असत व व्याख्यानांतील विषयांच्या चर्चेस मदत करीत असत. अशा प्रकारें ही सभा चालून मध्यंतरीं कांहीं दिवस कांहीं अडचणीमुळें बंद पडली होती. नंतर "स्त्रियांच्या ज्ञानवृद्धीसाठीं कांहीं दिवसांपूर्वी प्रार्थनामंदिराच्या मुखशाळेंत सभा भरत असे ती अलीकडे बंद होती, ती पुन्हा आजपासून सुरू होईल व त्या वेळीं एका विद्वान बाईनीं **स्त्री शिक्षणास अडचणी** ह्या विषयावर लिहिलेलें व्याख्यान वाचण्यांत येईल," असें ता. ३० जान्युआरी १८८० रोजीं जाहीर झालें. ह्या व्याख्यात्या बाई म्हणजे प. वा. अण्णासाहेब भांडारकर ह्यांची कन्या सौ. गंगूताई भांडारे होत. ही सभा पुन्हां सुरू करण्याच्या कामीं रा. रा. सदाशिव पांडुरंग केळकर ह्यांनीं पुढाकार घेतला. वरील सभेंत सौ. गंगूताईनीं जे विचार प्रदर्शित केले त्यांवरून एका सुशिक्षित स्त्रीस आपल्या भोंवतालची स्थिति कोणत्या प्रकारची असल्याचा अनुभव येत होता त्याची चांगली कल्पना होते. म्हणून त्यांतील कांहीं भाग पुढें दिला आहे:—

"पहिल्यानें आईबापांच्या मनांत मुलींस शाळेंत पाठविण्याचा विचार पुष्कळ कारणांनीं येत नाहीं. यद्यपि आलाच तर "तिला शिकून काय रोजगार करावयाचा आहे ?" असें म्हणतात. त्यांतून तिचे आईबाप गरीब असले, तर तिच्या शिक्षणाविषयीं विचार त्यांच्या ध्यानींमनीं देखील येण्याचा संभव नाहीं. ज्यांस आपल्या मुलीस शिकविण्याचें सामर्थ्य आहे त्यांचे विचार निराळ्याच प्रकारचे असतात,

कीं मुलीस विद्या शिकविल्यानें तिला दुर्मार्गी वळण्यास हें एक चांगलें साधनच होईल याची भीति आहे. दुसरें, अनेक जातींच्या व बहुत प्रकारच्या मुली शाळेंत येतात, त्यांच्या संगतीनें आपली मुलगी बिघडेल ह्याचें त्यांस भय वाटतें. न जाणो शिक्षणाच्या योगानें वाचण्याचा नाद तिला लागला, तर वेळेनुसार वाईट पुस्तकें हातीं मिळालीं असतां तीं ती वाचील व तेणेंकरून तिचें मन बिघडेल. आतां खरोखरच, लोकांच्या, समजुतीप्रमाणें जर एखादी शिकलेली मुलगी दुर्मार्गी निपजली, तर हा स्त्रीशिक्षणाचा परिणाम असें कोणी म्हणेल तर माझें त्यास असें उत्तर आहे कीं, न शिकलेल्या स्त्रिया बिघडलेल्या पुष्कळ पहाण्यांत येतात त्या कां? जर कदाचित् कोणी शिकलेली स्त्री वाईट निघाली तर तिच्या त्या शिक्षणास खरें योग्य शिक्षण म्हणतां येणार नाहीं. जी स्त्री शिक्षणाच्या योगानें व योग्य विचारानें आपलें वर्तन सत्य व सन्मार्गी ठेवील तिनेंच खरी व योग्य विद्या संपादन केली, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

मुलीचें वय सात किंवा आठ वर्षांचें झालें नाहीं तोंच मातापितरांस तिच्या लग्नाचा विचार हल्लीं चालत असलेल्या चालीप्रमाणें करावा लागतो, हा एक सर्वांहून मोठा अडथळा आहे. ह्या वयांत एकदांचें लग्न झालें, कीं शिक्षण हें नांव विसरून जाऊन एकामागून एक येणाऱ्या अडथळयांचा एक हारच तिच्या गळ्यांत पडतो. म्हणजे तिच्या शिक्षणास वर जे कांहीं अडथळे सांगितले ते कांहींच नव्हत. त्यांहून विशेष व अनिवार अडथळे येतात ते असे. मुलीचें लग्न होतांच थोड्या दिवसांनीं तिला सासरीं पाठवावें लागतें. तेथें गेल्यावर सासूसासरा वगैरे घरांतील माणसांच्या आज्ञेंत तिला चाकराप्रमाणें वागावें लागतें. नवरा समक्ष असतां तिला सांदी कोपऱ्यांत दडावें लागतें व कित्येक स्त्रियांस तर नवऱ्यास पहातांच आपलें तोंड पदराखालीं झांकावें लागतें. अशा प्रकारानें माहेराहून सासरीं व सासऱ्याहून माहेरीं जाण्यायेण्यामध्येंच सर्व वेळ जातो. हा प्रकार सासर दुसऱ्या गांवीं असेल तर होतो. नाहींतर एकाच गांवांत जर दोन्ही असलीं तर रोज किंवा एकदोन दिवसांनीं तरी इकडून तिकडे व तिकडून इकडे जावें यावें लागतें. मग शिक्षणास वेळ तो कोठून राहणार? याशिवाय सासूसासरा व आईबाप गरीब असले तर जिकडे जावें तिकडे कामकष्ट करावे लागतात आणि लहान मुलें घरीं असलीं तर तीं सांभाळण्यांत तरी निदान वेळ जातो. इतका वेळ अशा रीतीनें जातो न जातो इतक्यांत ऋतुप्राप्त होण्याची वेळ समीप येते किंवा तो प्राप्तही होतो. मग तर काय पुसावें? येवढया मोठ्या

मुलीस शाळेंत कसें पाठवावें असें त्यांच्या मनांत येतें व त्या मुलीलाही 'आतां मी मोठी झालें मला शाळेंत जाणें आतां बरें दिसत नाहीं' असें वाटूं लागतें. त्यानंतर झालें शिक्षण व झाली विद्या ! ह्या सर्वांची वळकटी करून एका कोपऱ्यांत ठेवावी लागते. पुढें मुलेंही लवकरच होऊं लागतात; त्यांच्या शुश्रूषेंत व संसार-संबंधीं कामांत सर्व जन्म जातो."

या भाषणानंतर सभेंत पुन्हा जीव आला. स्त्रिया नियमानें निबंध वाचूं लागल्या. श्री. सौ. रमाबाई रानडे, रा. ब. रानडे यांचा येथें मुक्काम असतांना, नियमानें सभेस येऊं लागल्या. त्यांनीं एकदां "स्त्रियांस आवश्यक विद्या कोणती" ह्या विषयावर व पुन्हा थोड्या दिवसांनीं "स्त्रियांचें संसारांत कर्तव्य" ह्या विषयावर स्त्रियांच्या मेळ्यांत निबंध वाचले. तरुणपणींच्या रमाबाईंच्या विचारांचा मासला येथें राहणें जरूर आहे असें वाटून कांहीं भाग येथें घेतल्यास अनुचित होणार नाहीं.

"विद्या म्हणजे ज्ञान असा एक अर्थ होतो. तर ज्ञान हें सर्वच माणसांस अवश्य आहे, तेव्हां स्त्रियांसही तें पाहिजेच. कित्येक स्त्रिया गाणें शिकतात, वाद्यें वाजवितात, इंग्लिश, परशियन, संस्कृत गुजराथी वगैरे अनेक भाषांचा अभ्यास करितात; ह्या सर्व विद्या जर आल्या तर त्यांपासून स्त्रियांस अधिकाधिक ज्ञान होईल. तसेंच मराठींतील ग्रंथ म्हणजे व्याकरण, इतिहास, भूगोल व गणित हेही शिकले पाहिजेत. इतिहासाच्या अभ्यासानें आपल्या देशांत पूर्वी होऊन गेलेले थोर व शूर पुरुष, आणि पतिव्रता स्त्रियांचीं मनोवेधक चरित्रें दृष्टीस पडतात; तसेंच पूर्वी कोणाकोणामध्यें कोणकोणत्या कारणानें लढाया झाल्या. त्यांचे परिणाम काय झाले, वगैरे आपणास कळतें. भूगोल शिकल्यापासून देश, राष्ट्रें, शहरें, नद्या, पर्वत, पृथ्वी गोलाकार आहे वगैरे अनेक गोष्टींची माहिती होते. व्याकरण शिकलें म्हणजे भाषा शुद्ध बोलतां येते. कोणास पत्र लिहिणें झालें तर कर्ता, कर्म आणि क्रियापद हीं कोठकोठें घालावीं हें आपणांस चांगलें समजतें. सदरहू विषयांपैकीं बहुतेक विषयांची स्त्रियांस आवश्यकता आहे. प्रत्येक स्त्रीस बहुतकरून मुलाची आई व्हावें लागतें. तेव्हां आईचा व मुलाचा जितका निकट संबंध असतो, तितका बापाचाही नसतो, मग इतर माणसांचा कोठून असणार ! म्हणून आई जर सुशिक्षित असली तर मूलही सुशिक्षित होतें. जर आईस चांगली विद्या अगर शिक्षण नसलें तर मुलास कोठून येईल ? म्हणून प्रथम स्त्रियांस चांगली विद्या येणें अवश्य आहे. मूल चांगलें

किंवा वाईट निपजणें हें बहुतकरून आईच्या सुशिक्षितपणावर अवलंबून आहे. लहानपणीं मुलांस मुख्य शिक्षण म्हटलें म्हणजे आईनें द्यावें लागतें. लहानपणीं मूल एकादा वाईट शब्द बोललें तर त्यास मना करणें हें आईचें कर्तव्यकर्म आहे. जर आईनें मुलास वाईट शब्द बोलण्याविषयीं मना केलें नाहीं तर तें तसेंच नेहमीं बोलेल. तर ह्या शिक्षणाला शाळा काय करील? म्हणून स्त्रियांस उत्तम तऱ्हेचें शिक्षण असणें हें योग्य आहे." त्याच सभेमध्यें एकदां प्रो. भांडारकर यांची कन्या शांताबाई ह्यांनीं स्त्रियांस इंग्रजी व संस्कृत शिकण्यापासून फायदे सांगितले होते. प्रो. भांडारकरांच्या देखरेखीखालीं त्यांचें शिक्षण झालें होतें, व आजही डा. भांडारकरांच्या चरित्रकारांना भांडारकरांवरील हा जो आरोप कीं, त्यांस इंग्रजांचें सर्व कांहीं चांगलें दिसत असे, त्यास उत्तर द्यावें लागत आहे. तेव्हां भांडारकरांनीं आपल्या मुलीच्या मनावर कोणते विचार बिंबविले होते ते कळल्यानें ह्या आरोपास उत्तर मिळून स्वतः शांताबाईच्या विचारांची आपल्याला कल्पना होईल:—

"इंग्लंड देशांतील लोकांच्याही सर्वच चाली चांगल्या असतात असा कांहीं भाग नाहीं. जशा आमच्यामध्यें तशा त्यांच्यामध्येंही वाईट चाली आहेत. आणि कांहीं चाली जरी वाईट नसल्या, तरी देशपरत्वें उत्पन्न झाल्या असल्यामुळें त्या हिंदुस्थान देशांत रहाणाऱ्या लोकांस सुखकारक होतील असें नाहीं. म्हणून ह्या दोन प्रकारच्या ज्या चाली त्या आम्ही न घ्याव्या हें बरें. यासाठीं आम्हांस त्या घेईसें करणारा खोटा ग्रह तो आमच्या मनामध्यें स्थिर होणार नाहीं असें केलें पाहिजे. तसें करण्यास आपल्या चाली, आपली विद्या वगैरे गोष्टींचा योग्य अभिमान आम्हांस असला पाहिजे. असा कीं, त्यामुळें आम्ही जें जें इतर लोकांमध्यें पहातों तें तें आपल्यामध्यें जें आहे, त्याच्यापाशीं ताडून पाहून योग्य रीतीनें कोणतें वाईट, कोणतें चांगलें याविषयीं निर्णय करून, चांगलें तेंच घेऊं आणि आपल्यामध्यें जें कांहीं वाईट आहे तेंच मात्र टाकून देऊं. तो अभिमान आपणांमध्यें येण्यासाठीं आमचा आपल्या विद्येशीं परिचय असला पाहिजे. परंतु तिचा थोडकाच अंश मराठींत आहे. तुकाराम, रामदास इत्यादिकांचे धर्मासंबंधीं अभंग व श्लोक व कांहीं संस्कृत पुस्तकांचीं भाषांतरें. बाकीच्या आमच्या सर्व विद्येसाठीं आम्हांला संस्कृतच शिकलें पाहिजे. संस्कृतामध्यें ज्या कांहीं संसारांत उपयोगीं पडणाऱ्या बोधपर आणि मनोरंजक गोष्टी आहेत, त्यापेक्षां चांगल्या तशा तऱ्हेच्या दुसऱ्या कोणत्याही भाषेंत नसतील. उदाहरणार्थ, पांडवांचा धर्म व नीति

लक्ष्मणाची रामावरील भक्ति, नळ व दमयंती ह्यांचें परस्परांवरील प्रेम, द्रौपदी व सीता ह्यांच्या पातिव्रत्याविषयीं गोष्टी. ह्या गोष्टींचे चुटके आम्ही लहानपणापासून ऐकत असल्यामुळें त्यांचा जसा आमच्या मनावर ठसा उमटेल, त्यांचा जसा आमच्या कृत्यांवर परिणाम घडेल, तसा कोणत्याही भाषेंतील गोष्टींचा घडणार नाहीं. या सर्व कारणांमुळें इंग्रजी शिकलें असतांही, संस्कृत शिकण्याची किती आवश्यकता आहे हें दिसून येईल."

अशा प्रकारें निरनिराळ्या व्याख्यानांच्याद्वारें स्त्रियांच्या ज्ञानांत भर घालण्याचा क्रम रा. सदाशिवराव केळकर यांच्या साहाय्यानें चालू असतां पुन्हा एकवार सभा थंड पडूं लागली ! ता. ३१ आक्टोबर १८८१ च्या पत्रिकेनें म्हटलें कीं, स्त्रियांचा वर्ग, मेळा किंवा सभा भरण्याचा उद्देश हा कीं, आपल्या लोकांच्या " स्त्रियांचें ज्ञान वाढावें, त्यांस कोणत्याही विषयाचा विचार करण्याची व आपले विचार बोलून दाखविण्याची संवई लागावी; नीति, सन्मार्ग, व धर्म यांचा यत्किंचित तरी बोध व्हावा, आणि कांहीं नाहीं तरी निदान परस्पर परिचय, दळणवळण व स्नेह व्हावा, सारांश कोणीकडून तरी आमच्या स्त्रियांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करावा. याशिवाय समाजाच्या संबंधानें दुसरा कांहीं एक प्रयत्न होत नाहीं व समाजीय बंधूंच्याही कुटुंबांची परस्पर गांठ पडणें व समागम होणें हें कांहीं घडत नाहीं. यावरून या सभेची गरज केवढी आहे हें सहज लक्षांत येईल. हल्लीं या सभेंत कोणी बाया एखाद्या विषयावर लहानच निबंध लिहून आणून वाचतात आणि तो वाचल्यावर त्याच्यासंबंधानें स्त्रिया आपापसामध्येंच कांहीं बोलावयाचें असलें तर ते बोलून दाखवितात, आणि शेवटीं सभेची व्यवस्था ठेवणारे कोणी एकदोन पुरुष असतात ते कांहीं भाषण करितात......ह्या सभेच्या योगें आमच्या लोकांच्या स्त्रियांच्या स्थितींत बरीच सुधारणा करण्याची सभा उपस्थित करणारांस व ती चालविणारांस मोठी उमेद होती व अजून आहे. परंतु एका गोष्टीमुळें मात्र नाउमेद वाटूं लागली आहे, ती ही कीं सगळ्या आठ दहा जणीच सभेस येतात. समाजाच्या सभासदांपैकीं दोघांच्या घरच्या बायका मात्र हमेशा येतात, तसेंच बाहेरच्या दोघां गृहस्थांच्या स्त्रिया नियमानें येणाऱ्या आहेत आणि यामुळेंच सभा चालली आहे.......ह्या सर्व गोष्टींकडे आमचे मित्र कृपा करून लक्ष देतील आणि आपापल्या कुटुंबांतील स्त्रियांस सभेस जाण्याविषयीं प्रवृत्त करितील तर ते आपल्या एका मोठ्या कर्तव्यास जागले असें होईल."

असा चाबूक मिळाल्यावर पुन्हा कांहीं दिवस काम जोमानें चालूं लागलें. डा. सखाराम अर्जूनसारखे गृहस्थ "लग्नाचा किंवा विवाहाचा हेतु" अशा विषयांवर अनेक व्याख्यानें देऊन आपल्या उदार विचारांचा स्त्रियांस लाभ देऊं लागले. डा. सदाशिव वामन काणे व गोविंदराव वा. कानिटकरही शास्त्रीय विषयांवर व्याख्यानें देत असत. नंतर पंडिता रमाबाईचा काळ आला. त्यांचीं पुण्यास व मुंबईस अनेक व्याख्यानें झालीं. लोकांच्या मनांत त्यांचे संबंधानें मोठी आदर-बुद्धि जागृत झाली व पुण्यासारख्या ठिकाणीं स्त्रियांची उन्नति करण्यासाठीं त्यांनीं ता. १ मे १८८२ रोजीं पुणें मुक्कामीं आर्यमहिलासमाज ह्या संस्थेची स्थापना केली. त्या वेळीं त्यांनीं केलेल्या भाषणावरून त्या वेळच्या पंडिता बाईच्या विचारांची चांगली कल्पना होते. त्यांनीं त्या वेळीं पुण्यास फडतरे ह्यांच्या वाड्यांत आर्यमहिलासमाज संबंधानें भाषण करितांना म्हटलें कीं, "आपल्या देशांतील प्राचीन काळची स्थिति पाहूं गेल्यास असें दिसून येतें कीं, त्या वेळीं स्त्रियांची स्थिति सध्यांप्रमाणें नव्हती. त्या काळीं स्त्रियांस विद्या शिकवीत असत, त्यामुळें सीता, गांधारी, मैत्रेयी ह्यांसारख्या स्त्रिया आमच्या देशांत होऊन गेल्या. हल्लींची स्त्रियांची स्थिति पाहिली तर फार शोचनीय आहे. त्यांस विद्या नाहीं, ज्ञान नाहीं. कोणी म्हणतात स्त्रियांस विद्या शिकवून मग पुरुषांनीं काय करावें ! पण हल्लीं तरी पुरुषांची स्थिति कोठें चांगली आहे ? ते केवळ लांकडाच्या बाहुल्यांप्रमाणें होऊन दास्यत्वांत पडले आहेत. हें पुरुषत्वाचें लक्षण नव्हे. स्त्रियांची स्थिति सुधारली असतां पुरुषांचीही स्थिति सुधारेल. ज्या देशांतील स्त्रियांची स्थिति सुधारते त्याच देशाची एकंदर स्थिति सुधारते. जशा स्त्रिया असतात तशी त्यांची संतती होते. पण हल्लीं स्त्रियांची स्थिति पाहिली तर त्यांच्या मध्येंच कित्येक दुर्गुण शिरले आहेत. त्या सासुरवासांत असल्यामुळें खोटें बोलण्याची त्यांस संवय लागते व ही संवय पुढें मुलांस लागते. अशा रीतीनें देशांतील लोक सत्य, तेज व साहसहीन होतात. स्त्रियांची स्थिति सुधारण्यास उपाय काय याचा विचार करण्यासाठीं आज आपणास येथें बोलाविलें आहे. आपण जो निश्चय करूं तो दृढतेनें मात्र चालविला पाहिजे. आपण सर्वांनीं सत्याचें व्रत धरिलें पाहिजे व तें आमरण चालविलें पाहिजे. कोणास वाटेल कीं, आम्हीं स्त्रियांनीं काय सुधारणा करावी ? आम्ही पडलों परतंत्र. तर मी त्यांस असें सांगतें कीं, त्या स्वतंत्र आहेत, त्यांनीं आपलें स्वातंत्र्य रक्षिलें मात्र पाहिजे. त्यांजपेक्षां पुरुषांस जास्त हक्क किंवा स्वातंत्र्य असण्याचें कांहीं कारण नाहीं. वास्तविक पाहिलें

तर संसारांतील कृत्यांचें जास्त जोखीम स्त्रियांवर आहे. याजकरितां त्यांसच पुरुषांपेक्षां जास्त हक्क असले पाहिजेत. सध्या पुरुष त्यांजवर जास्त अंमल चालवीत आहेत, व त्यांस केवळ घरांतील निर्जीव वस्तूंप्रमाणें लेखीत आहेत, ह्या स्थितींतून उद्धार करून घेण्यास आपण झटलें पाहिजे. आपण सर्वांनीं मिळून एक सभा स्थापन करावी असा माझा विचार आहे. ह्या सभेस द्रव्यद्वारा व संमतिद्वारा आपण साह्य केलें पाहिजे. कोणास वाटेल आपण पुरुषांच्या विरुद्ध उपाय करणें म्हणजे कांहीं पाप केलें असें होईल. तर त्यास मी असें सांगतें कीं, सध्यां तुम्ही फार पाप करीत आहां. पुरुष पुष्कळ वाईट गोष्टी करितात आणि तुम्ही त्याविषयीं निषेध न करितां स्वस्थ बसतां हेंच मोठें पाप आहे. आपल्यास अनीतीची किंवा अन्यायाची गोष्ट करावयाची नाहीं, तर न्याय व नीति ह्यांस अनुसरून चालावयाचें आहे. द्रव्यसाहाय्य करणेंही आपल्यास कठीण नाहीं. उगीच कांहीं तरी भाकडकथा सांगणारे जे पुराणिक त्यांस तुम्ही द्रव्य देत असतां, हरतऱ्हा करून दागिने करीत असतां, त्यांतूनच जर आज सभेच्या कामाकरितां थोडें द्रव्यसाहाय्य करावयाचें मनांत आणाल तर आपल्यास फारसें कठिण पडणार नाहीं."

वरील भाषण ता. ३० एप्रिल रोजीं झालें व ता. १ मे १८८२ रोजीं आर्यमहिला समाजाची स्थापना झाली.

---

## आर्यमहिला समाजाचे उद्देश व नियम.

१ आह्मा स्त्रीवर्गाचा अभिलाष पूर्ण होण्याकरितां स्थापन केलेल्या या समाजाचें नांव आर्यमहिला समाज असें ठेविलें आहे.

२ भारतवर्षांतील सर्व सभ्य स्त्रियांवर फार दिवसांपासून चालत असलेल्या अंधपरंपरेच्या चालीप्रमाणें जे ( बाल्यावस्थेंत विवाह करणें, अज्ञत्वामुळें पराधीन व दास्य स्थितींत राहणें वगैरे,) अत्याचार होत आहेत त्यांपासून स्त्रियांची मुक्तता होण्याकरितां आणि स्त्रियांच्या धर्म, नीति व व्यवहार वगैरेंची हल्लीं असलेली शोचनीय स्थिति जाऊन पुढें त्यांची उन्नति व्हावी याकरितां झटणें हे दोन ह्या समाजाचे मुख्य हेतु होत.

३ भारतवर्षांतील सर्व प्रदेशांत राहणाऱ्या हिंदुस्थानच्याच रहिवासी म्हणविणाऱ्या सर्व स्त्रिया या समाजाच्या मुख्य सभासद होतील.

४ ज्या कोणी विदेशीय स्त्रिया कृपा करून या समाजाचें सहाय करूं इच्छितील त्या सहाय सभासद होतील.

५ कुलीन आणि सच्चरित्र अशा स्त्रियाच या समाजाचे सभासदपदीं येऊं शकतील.

६ या समाजाच्या द्वारें होणारीं सर्व कृत्यें व्यक्तिविशेषाचीं नसून सार्वजनिक आहेत, यास्तव ह्या समाजांतील सभासदांनीं कांहीं विशेष आग्रह अथवा पक्षपात करूं नये.

७ ह्या समाजांत सर्व सभासदांचा सारखा अधिकार आहे, म्हणून कोणी कोणाच्या जाती, कुल, धन इत्यादि पदांवर नजर देऊं नये.

८ या समाजाकडून जें कांहीं कार्य होणें तें सभ्य मंडळीपुढें त्याबद्दल काय तो निश्चय होऊन सर्वांचीं मतें घेतल्यानंतर ज्या पक्षाला जास्ती सभासदांचें अनुमोदन आहे असें समजेल तोच पक्ष अवलंबन करण्यांत येईल.

९ ह्या समाजाचें सभासद व्हावें अशा ज्या स्त्रियांची इच्छा असेल त्यांनीं समाजिक कृत्याच्या साहाय्याबद्दल कमींत कमी दरवर्षाची साहा रुपये वर्गणी दिली पाहिजे.

१० ज्या स्त्रिया सधन असतील त्यांनीं आपल्या शक्तीप्रमाणें वर्गणीबद्दल किंवा विशेष दान म्हणून जास्ती रुपये दिले पाहिजेत.

११ ज्या स्त्रिया अगदीं गरीब असतील त्यांजपासून वर्गणीबद्दल ३ रुपयांपेक्षां कमी घेतलें जाणार नाहीं.

१२ सभासदांनीं दिलेल्या वर्गणीपैकीं खर्चवेच वजा करून बाकी राहिलेला पैसा समाजाच्या नांवानें ब्यांकेंत ठेवला जाईल.

१३ या समाजाचें सभासद व्हावें अशी ज्या स्त्रियांची इच्छा असेल त्यांनीं " या सार्वजनिक कृत्यामध्यें पक्षपात आणि दुराग्रह सोडून, आमचा प्राण आहे तोंपर्यंत आम्हीं आमच्यानें होईल तितकें साहाय्य करूं" अशी सर्वसाक्षी परमेश्वराला आणि धर्माला स्मरून प्रतिज्ञा केली पाहिजे.

१४ आपल्या प्रतिज्ञेच्या आणि समाजाच्या नियमांविरुद्ध ज्या स्त्रिया आचरण करतील त्यांचें नांव सभासदांच्या यादींतून काढून टाकलें जाईल.

येथें कदाचित् अशी शंका येण्याचा संभव आहे कीं ता. १ मे १८८२ रोजीं ही सभा जर पुण्यास स्थापना झाली तर तिचे नियम येथें देण्याचें कारण काय? तर कारण असें आहे कीं, पुढें जेव्हां पंडिताबाईनीं येथें ह्या समाजाची

स्थापना केली त्या वेळीं तेच नियम चालू केले व जेथें जेथें आर्यमहिला समाजाची स्थापना होईल तेथें तेथें हेच नियम चालू करण्याचा त्यांचा विचार होता. अशा प्रकारें पुण्यास आर्यमहिला समाजाचें काम सुरू झालें व मुंबईस त्या वेळीं व नंतरही स्त्रियांची सभा स्वतंत्रपणें चालूच होती. डा. काणे यांचीं रुधिराभिसरणावरील व रक्ताशयावरील व्याख्यानें नुक्तींच संपलीं होतीं. अशा वेळीं महाराष्ट्रांतील अनेक स्थळें पहात व व्याख्यानें देत देत पंडिता रमाबाई नोव्हेंबरमध्यें मुंबईशहरीं येऊन दाखल झाल्या. त्या वेळीं त्यांचीं प्रार्थनामंदिरांत व इतर ठिकाणीं व्याख्यानें झालीं. ता. २५ नोव्हेंबर १८८२ रोजीं **आर्यमहिला समाजाचे उद्देश** या विषयावर रमाबाईचें सुमारें तासभर सुरस व उपयुक्त असें भाषण झालें. हें भाषण ऐकण्यासाठीं सुमारें दोनशें स्त्रिया व चार शें पुरुष हजर होते. एवढयावरून पंडिताबाईंच्या आगमनानें मुंबई शहरांत किती चळवळ उडून राहिली होती त्याची सहज कल्पना होते. ही सभा रा. रा. बाळ मंगेश वागळे ह्यांच्या अध्यक्षतेखालीं झाली होती, व आर्यमहिला समाजाची स्थापना करण्यासाठीं गुरुवार ता. ३० नोव्हेंबर रोजीं सभा भरविण्याचें वरील दिवशीं ठरलें. त्याप्रमाणें सौ. गंगूताई भांडारे ह्यांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरली व त्यावेळीं सुमारें दीडशें स्त्रिया हजर होत्या. त्यावेळीं सौ. काशीबाई कानिटकर ह्यांनीं आर्यमहिला समाजाचे नियम वाचून दाखविले व पंडिताबाईंनीं जमलेल्या बायांस आर्यमहिला समाजाचे उद्देश समजावून सांगितले. ह्या दिवशीं म्हणजे ता. ३० नोव्हेंबर रोजीं मुंबई शहरीं आर्यमहिला समाजाची स्थापना झाली. सुमारें १६ स्त्रिया सभासद झाल्या; कांहींनीं विचार करण्यास वेळ मागून घेतला. कांहींनीं कांहीं शंका काढल्या व त्यांचें समाधान झाल्यावर ८ स्त्रियांनीं दुसऱ्या दिवशीं नांवें घातलीं. अखेरीस असें जाहीर करण्यांत आलें कीं इतके दिवस येथें स्त्रियांची सभा भरत असे ती आतां आर्यमहिला समाजाची स्थापना झाल्यापासून तींत सामील झाली आहे. असा हा मुंबईंतील आर्यमहिला समाजाच्या स्थापनेचा इतिहास आहे.

ह्या बाबतींत सुबोधपत्रिकेनें जी एक सेवा बजाविली तिचा येथें उल्लेख करणें अगत्याचें आहे. आर्यमहिला समाजाची स्थापना पुणें येथें करितांना पंडिताबाईंनीं जें प्रास्ताविक भाषण केलें व ज्याचा सारांश वर दिला आहे, ह्या वेळीं रा. रा. सदाशिवराव केळकर सुबोधपत्रिकेचे संपादक होते. पंडिताबाईविषयीं त्यांच्या ठिकाणीं जागृत अभिमान वसत असे व त्यांनीं त्यांस अनेक प्रकारें साहाय्यही

केलें. तथापि त्या वेळीं स्वतः रमाबाई अगर त्यांच्या सहाय्यक ह्यांचा पुरुषावरील आरोप त्यांस पसंत पडला नाहीं; म्हणून सुबोधपत्रिकेनें असें म्हटलें कीं, "स्त्रियांचे हक्क पुरुषांनीं हिरावून घेतले आहेत ते त्यांजपासून परत हिरावून घ्यावयाचे आहेत असें ह्या विषयाला स्वरूप देण्याची कांहीं अवश्यकता नाहीं. समाज स्थापन झाला त्या वेळीं त्यांनीं असे उद्गार काढले होते व दुसऱ्याही स्त्रियांना आम्ही अशा प्रकारें बोलतांना ऐकिलें आहे. आपले हक्क पुरुषांनीं हिरावून घेतले आहेत हें तरी स्त्रियांना समजूं केव्हां लागलें आहे कीं आधीं विद्याप्राप्तीचा जो पहिला हक्क तो पुरुषांनींच त्यांस प्रथम दिला तेव्हां. ज्यांस हा हक्क मिळत नाहीं त्यांस आपला हक्क गेला असेंही समजत नाहीं. ज्या स्त्रियांस आपले हक्क मिळावेसे वाटतात त्यांस ते मिळण्याची तयारी आधींच झालेली असते. कारण ह्या सर्व गोष्टी समजूं लागण्यास मूळ कारण जी अर्वाचीन विद्या ती पुरुषांस आधीं प्राप्त झाली आहे. तिच्या योगानें त्यांसच स्त्रियांचे हक्क काय हें समजूं लागलें आहे व ते त्यांचे त्यास देण्यास ते तयार झाले आहेत. आज असा मात्र प्रकार आहे कीं, तुमचा अमुक एक हक्क आहे, तो तुम्ही घ्या, असें पुरुष म्हणत असतां तो आपला हक्क नव्हे, तो आपल्याला नको असें स्त्रिया म्हणत आहेत! तेव्हां आमच्या स्त्रियांस हल्लींच्या स्थितींत उपदेश करावयास पाहिजे तो हक्क जिंकून घेण्याचा नव्हे, पण मिळत आहे त्याचा अव्हेर न करितां, स्वीकार करण्याचा होय. ही गोष्ट सांगण्याचें कारण असें आहे कीं, हल्लीं शूद्र लोकांत जसा विनाकाण ब्राह्मणांच्या नांवानें खडे फोडण्याचा प्रकार चालू झाला आहे तसा आमच्या स्त्रियांत न व्हावा."

पूर्वीच्या स्त्रियांच्या सभेचें जरी रूपांतर १८८२ सालीं वर म्हटल्याप्रमाणें आर्यमहिलासमाजांत झालें, तरी पुष्कळ वर्षेंपर्यंत व्याख्यानांच्या द्वारा स्त्रियांमध्यें जागृति ठेवण्यापलीकडे विशेष कार्य आर्यमहिला समाजाकडून झालें नाहीं. रमाबाई रानडे मुंबईस असतांना त्या सभेच्या अध्यक्ष होत्या व त्या वारंवार समाजाच्या सभांस हजर राहून उत्तेजन देतही असत. आर्यमहिला समाजाच्या चिटणिसाचें काम पुष्कळ भगिनींनीं केलें आहे. पण त्यांपैकीं श्री रमाबाई भांडारकर ह्यांच्या नांवाचा येथें आदरपूर्वक उल्लेख करणें अगत्याचें आहे. चोहोंबाजूंनीं समाजाविषयीं अनास्था दिसत असतां रमाबाईनीं समाजाचें काम निर्धारानें चालविलें. बायका जमोत अगर न जमोत, व्रतस्थ स्त्रियांप्रमाणें, नियमानें सभेस हजर राहून सभेचें काम चालविण्याचें व्रत त्यांनीं वीस बावीस वर्षें चालविलें. व्याख्यान द्यावयास, कोणी स्त्री अगर पुरुष न मिळाल्यास, सभेच्या ठिकाणीं कांहीं तरी उपयुक्त

ग्रंथांतील निवडक भाग वाचून दाखवून सभेचें काम त्या बंद करीत. व्याख्यानांची जमवाजमव करण्यापलीकडे समाजानें जरी विशेष कार्य केलें नाहीं, तरी ज्या भगिनी समाजास चिटकून राहिल्या, त्यांच्याकडून येणारी वर्गणी खर्चवेंच वजा करितां त्यांनीं सांठविली, व काम सोडतांना ती नव्या सेक्रेटरींच्या हवालीं केली. रमाबाईनीं आर्यमहिला समाजास कायम ठेविलें, कोणाचें विशेष साहाय्य नसतां, संस्थेचें काम फार वर्षे चालविलें व काम सोडावें लागलें त्या वेळीं समाजाची पैशा संबंधाची स्थिति असमाधानकारक ठेविली नाहीं. ह्या त्यांच्या सेवेबद्दल आर्यमहिला समाज सदोदित त्यांचा ऋणी राहील.

## नवा मनु.

रमाबाई भांडारकरांनीं आर्यमहिला समाजाचें काम सोडल्यानंतर डा. काशीबाई नवरंगे यांनीं हें काम आपल्याकडे घेतलें व त्यांनीं समाजामध्यें नवजीवन उत्पन्न केलें व समाजाकडून त्या कांहीं कार्य करवूं लागल्या. पूर्वीप्रमाणें साप्ताहिक व्याख्यानांची व्यवस्था कायम ठेविलीच. स्त्रिया व पुरुष व्याख्याते त्या कष्ट करून मिळवीत. व्याख्यानमाला मधून मधून त्या सुरू करीत असत. समाजाचे वार्षिक उत्सव त्यांनीं सुरू केले. समाजाच्या उत्सवांतील स्त्रियांचे मेळे व्यवस्थित रीतीनें होऊं लागले. उत्सवांत नंतर ज्या वेळीं स्त्रियांसाठीं उपासना होऊं लागली, त्या वेळीं श्री रमाबाई रानडे ह्यांस प्रथम उपासना करण्यास विनंति केली व नंतर पुढें स्वतः तें कार्य त्यांनीं केलें व निरनिराळ्या भगिनींस उपासना करण्यास विनविलें. शिवाय समाजाचे सभासद त्यांनीं पुष्कळ वाढविले व अशा रीतीनें उत्पन्नाची बाब वाढल्यानंतर खर्चाच्या वाटाही त्यांनीं सुरू केल्या. शाळांतील व कॉलेजांतील मुलींस शिक्षणासाठीं आर्यमहिला समाज मदत करूं लागला. अशा रीतीनें सभासदांस गरीब मुलींच्या शिक्षणाचें श्रेय मिळूं लागलें. दरवर्षी पंढरपूर येथील मुलांसाठीं खेळणीं अगर खाऊसाठीं दिवाळीच्या वेळीं विशेष वर्गणी जमा होऊं लागली.

डा. काशीबाईनीं आर्यमहिला समाजाच्या द्वारें आणखी एक नवें व मोठें कार्य सुरू केलें. मुंबई शहरांत दूध दिवसेंदिवस अधिकाधिक महाग होत चाललें आहे. सर्व बाबतींत महागाई वाढल्यामुळें गरीब स्थितींतील कुटुंबांना दूध दुर्मिळ झालें आहे. त्यामुळें गरीब स्थितींतील गरोदर स्त्रिया, बाळंतिणी व त्यांचीं मुलें ह्यांचे दुधावांचून हाल होत असतात. हें पाहून अल्पप्रमा-

णावर फुकट दूध वांटण्यासाठीं लहानसा फंड त्यांनीं उभारिला, व गिरगांव आणि परळ येथें फुकट दूध वांटण्याची व्यवस्था झाली. परळसंबंधाची जबाबदारी सौ. प्रभावतीबाई सोहोनी ह्यांजवर टाकण्यांत आली. रा. सोहोनी परळ येथें होते तोंपर्यंत तेथें व नंतर वांद्रें येथें दूध फुकट वांटण्याचें काम व्यवस्थितपणें सौ. प्रभावतीबाईंनीं केलें. हल्लीं परळ येथें सोशल सर्व्हिसलीगच्या दवाखान्यांत येणाऱ्या बाया व मुलांपैकीं योग्य बायांस व मुलांस दूध मिळतें. शिवाय सौ. लेडी लक्ष्मीबाई चंदावरकर ह्यांच्या स्मरणार्थ जी दहा हजार रुपयांची देणगी मिळाली आहे, तिच्या व्याजांतून पंढरपूर येथील मुलांस दूध मिळण्याची व्यवस्था झाली आहे.

येथें लेडी चंदावरकर ह्यांच्या अध्यक्ष ह्या नात्याच्या कामगिरीचा उल्लेख करणें अगत्याचें आहे. सुमारें १७ वर्षें सौ. लक्ष्मीबाई आर्यमहिला समाजाच्या सन्मान्य अध्यक्ष होत्या. तेवढ्या अवधींत त्यांनीं सर्व सभासदांशीं प्रेमानें व लोभानें वागून सर्वांस आपलेंसें केलें होतें. तरुण सभासदांस प्रोत्साहन देऊन त्यांस पुढें आणणें, त्यांच्या कृतीचें कौतुक करून त्यांस उत्तेजन देणें, कोणतेंही उपयुक्त कार्य करावयाचें चिटणीसांनीं योजिल्यास त्यांस उत्साहपूर्वक साहाय्य देणें; परिस्थिति चट्कन् लक्ष्यांत घेऊन योग्य व पोक्त सल्ला देणें; सर्व सभांस हजर राहून कामें करणारांशीं व इतरांशीं सारखेपणानें वागणें इ० गुण ह्या त्यांच्या कारकीर्दींत उत्तम प्रकारें अनुभवास आले. आर्यमहिला समाजाच्या भरभराटीस श्री. सौ. लेडी लक्ष्मीबाई चंदावरकर ह्यांच्या नेतृत्वाचें अशा प्रकारें साहाय्य कारणीभूत झालें आहे.

आणखी एका गोष्टीचा येथें उल्लेख करणें गैर होणार नाहीं. गेलीं तीन वर्षें डा. काशीबाई नवरंगे ह्या आर्यमहिला समाजाच्या अध्यक्ष होत्या. व कु. कृष्णाबाई जव्हेरे त्यांच्या देखरेखीखालीं सेक्रेटरीचें काम करीत असत. परंतु यंदा त्यांस ही जबाबदारी घ्यावयास सवड नसल्यामुळें अध्यक्ष डा. काशीबाई सेक्रेटरी होऊन पूर्ववत् तें काम पहात आहेत! इतकी कर्तव्यनिष्ठा जागृत आहे तोंवर आर्यमहिला समाजास कांहीं भीति नाहीं!

# यंग थीईस्ट्स यूनिअन.

सन १९०४-०५ सालीं असें दिसून आलें कीं, प्रार्थनासमाजामध्यें सभासद असणाऱ्या तरुणांची संख्या उत्तेजक असून ती वाढत्या प्रमाणावर आहे. कांहीं तरुण सभासद नव्हते, परंतु प्रार्थनासमाजाच्या तत्त्वांचा त्यांस चांगला समज पडला होता व अशा तरुणांना एकत्र आणणारी कांहीं तरी मध्यवर्ती संस्था असावी असें मंडळीस वाटूं लागलें होतें. त्याचप्रमाणें समाजांतील तरुण सभासदांचें अधिक संघटण व्हावें, त्यांच्या वारंवार भेटी व्हाव्या, त्याचप्रमाणें समाजानें अंगीकृत जीं अनेक कार्यें तीं करण्यास लागणारी पूर्व तयारी करावयास त्यांस अवसर सांपडणें जरूर आहे असेंही वाटूं लागलें होतें. हें सर्व मनांत असतांना १९०५ सालीं दसऱ्याच्या दिवशीं **यंग थीईस्ट्स् यूनिअन** नामक संस्था स्थापन झाली. प्रार्थनासमाजाच्या सभासदांस त्या वेळपर्यंत आलेला अनुभव लक्ष्यांत घेऊन ह्या संस्थेची स्थापना व्हावी व ही संस्था प्रार्थनासमाजाच्या कार्यास सर्वपरि पोषक व्हावी असा मूळपासून उद्देश होता. तेव्हां प्रथम प्रार्थनासमाजाचा सभासद होतांना जी प्रतिज्ञा * करावी लागत असे तिजकडे मंडळीचें लक्ष गेलें. पूर्वीची प्रतिज्ञा अशी होतीः—

"धर्माच्या वर लिहिलेल्या मूलतत्त्वांवर माझी पूर्ण श्रद्धा आहे आणि त्यांस अनुसरून आचरण करणें हें माझें कर्तव्य आहे असें मी समजतों अशी परमेश्वराला स्मरून मी प्रतिज्ञा करितों" एवढयानें त्यांचें समाधान होत नव्हतें. म्हणून मागील अनुभव लक्ष्यांत घेऊन पुढील अटी कबूल असणारांनाच युनिअनचें **सभासद** होतां येईल असें ठरविण्यांत आलेंः—

"All persons who are members of the Bombay Prarthana Samaj *and* who solemnly take the vow of acting upto the principles of the Samaj in private and in public, in letter as well as in spirit, on all domestic and social occasions (*e. g.* they should bind themselves never to practise idolatry and never to observe caste distinction in any form and under any

* हल्लींच्या प्रतिज्ञेमध्यें फरक झाला आहे.

excuse ) and who solemnly promise to instruct their children in the Theistic Religion and perform all their domestic ceremonies in strict conformity with the principles of the Samaj are entitled to become and to remain members of the Union. Provided that if a person wishing to become a member is a lady whose husband is not a member she may take the oath with regard to herself alone and not necessarily to her children."

ह्या अटी आम्ही जशाच्या तशा दिल्या आहेत. त्यावरून पहिली गोष्ट लक्षांत येते ती ही कीं, प्रथम प्रार्थनासमाजाचें सभासद झाल्यावांचून कोणासही यूनिअनचें सभासद होतां येत नसे. त्यावरून प्रार्थनासमाजास सर्वपरि साहाय्यक अशी ही संस्था असावी असें त्या वेळीं ध्येय होतें; एवढेंच नव्हे तर कोणत्याही रीतीनें यूनिअन समाजाच्या कार्याच्या आड येत आहे असें कोणासही वाटूं नये अशी खबरदारी नियमांची रचना करितांनाच घेण्यांत आली होती, हें पुढील कलमावरून स्पष्ट होतें:—

Provided that the Union shall not take anything in the programme of its work that will be in contravention of the aims and objects of the Prarthana Samaj of Bombay or that will lead the Union to break away from its connection with the Samaj.

असें उच्च ध्येय पुढें ठेवून स्थापन झालेल्या ह्या संस्थेनें साहा उद्देश दृष्टीपुढें ठेविले होते. ( १ ) प्रार्थनासमाजाच्या सभासदांस व सभासद नसणाऱ्या, पण समाजाचें ध्येय मान्य असणाऱ्या त्यांच्या आप्तांस, एकत्र आणावयाचें, त्यांच्यांत दळणवळण वाढवावयाचें व त्यांचा एक संघ बनवावयाचा. ( २ ) सभासदांच्या बौद्धिक व आध्यात्मिक जीवनाची वाढ होण्यासाठीं धर्मविषयक ग्रंथांचें अध्ययन करावयाचें, प्रार्थनाशीलता वाढण्यासाठीं प्रार्थनासभा स्थापन करून, पुढें सभासदांची मंदिरांतील सामाजिक उपासना चालविण्याची सिद्धता होईल अशी तयारी करावयाची. ( ३ ) सभासदांमध्यें

अधिक दळणवळण व्हावें, अधिक निकटभाव वाढावा म्हणून सभासद, त्यांच्या कुटुंबांतील माणसें व हितचिंतक ह्यांचीं सम्मेलनें भरविणें व अशा रीतीनें सर्वांमध्यें निकटभावाची वाढ करणें. ( ४ ) समाजाकडून जीं निरनिराळीं कामें होत आहेत तीं समजून घेऊन तीं करण्याची गोडी उत्पन्न करणें व समाजाची व्यवस्थापक मंडळी जीं कामें करण्यास सांगेल तीं करणें. ( ५ ) ह्या यूनिअन-सारख्या संस्था जेथें समाज असतील अगर नसतील तेथें स्थापून अशा संस्थांत दळणवळण वाढविणें व त्यांचे वार्षिकोत्सव होतील तेव्हां अगर इतर वेळीं तेथें सवडीनुसार जाऊन परस्पर संबंध अधिक निकट करणें (६) निरनिराळया ठिकाणचे समाज, त्यांचीं कामें, ब्राह्मधर्माचा होत असलेला प्रसार, ह्यासंबंधाची विश्वसनीय माहिती मिळवून ती वर्षअखेर प्रसिद्ध करणें. अशा प्रकारें ह्या यूनिअननें पुष्कळ कार्य आपल्यापुढें ठेवून प्रार्थनासमाजामध्येंच तरुण पिढी सर्व प्रकारें अनुष्ठानिक व्हावी असे प्रयत्न चालविले होते. संस्थेचे पहिले अध्यक्ष रा. रा. बाबण बापू कोरगांवकर व चिटणीस रा. रा. वामनराव सोहोनी होते.

यूनिअननें वरील हेतूंच्या सिद्धीसाठीं साप्ताहिक उपासना, दर आठवड्याचें सम्मेलन, मधून मधून विशेष सम्मेलनें, वार्षिक उत्सव वगैरे कांहीं वर्षें केले. त्याचप्रमाणें समाजाच्या कार्यास हातभारही लाविला. मंदिरांतील खुर्च्या अगदीं मोडकळीस आल्या होत्या, त्या बदलून विशेष वर्गणी जमवून सुमारें २०० रुपयांच्या खुर्च्या यूनिअननें समाजास दिल्या. सर नारायण चंदावरकर हे वारंवार संस्थेसंबंधानें विचारपूस करीत. रा. रा. विठ्ठलराव शिंदे व डा. वासुदेवराव सुखटणकर हे समाजाचे प्रचारक असतांना त्यांचें ह्या संस्थेकडे विशेष लक्ष्य असे. रा. शिंदे हे कित्येक वर्ष उदार धर्मविषयक ग्रंथांचें अध्ययन करण्याचा एक वर्ग चालवीत होते. त्याचप्रमाणें डा. सुखटणकरांनीं भगवद्गीतेवर ह्या संस्थेच्या विद्यमानें पुष्कळ व्याख्यानें दिलीं होतीं. परंतु ह्या दोघांचाही समाजाशीं प्रचारक ह्या नात्यानें असलेला संबंध सुटल्यानंतर अनुष्ठानासंबंधाचा विशेष कडकपणा संस्थेच्या भरभराटीच्या आड येत आहे असें वाटून, व केवळ समाजाच्या सभासदांमध्यें काम करण्यापेक्षां बाहेरच्या तरुणांत काम करण्यास अधिक अवकाश मिळावा ह्या हेतूनें यूनिअनचे हेतु, ते साधण्याचे उपाय व सभासद होण्याच्या अटी पूर्वीपेक्षां अगदीं निराळ्या म्हणजे कमी गुंतागुंतीच्या केल्याः—

( १ ) मुंबईतील सुशिक्षित लोकांमध्यें सामाजिक व धर्मविषयक सुधारणेसंबंधानें अधिक अनुकूल मत करणें व त्यांचेपुढें उच्च ध्येयें ठेवणें. ( २ )

तरुण स्त्रीपुरुषांना निरनिराळ्या धर्मांच्या ग्रंथांचें अध्ययन करावें असें वाटल्यास त्यासंबंधानें व्यवस्था करणें. (३) भौतिक उन्नति होत असतां आध्यात्मिक जीवनाविषयीं त्यांच्यापुढें उच्च ध्येय ठेवून तें साधण्यास त्यांस साह्याय्य करणें. हे हेतु साधण्यासाठीं ( १ ) आठवड्याच्या धर्मविषयक सभा, ( २ ) मधून मधून थोरामोठ्यांचीं व्याख्यानें, ( ३ ) संभाषणात्मक व सामाजिक सम्मेलनें असे उपाय ठरविले होते. सभासद होण्याविषयींची अटही अगदीं साधी केली होती ती अशी:—

"All those who declare themselves to be Theists, and are prepared to aid and encourage, always and under all circumstances religious and social reform shall be admitted as members of the Union."

ह्याचा परिणाम असा झाला कीं, कांहीं काळ कॉलेजांतील विद्यार्थी वगैरे ह्यांचा बराच भरणा सभासदांमध्यें झाला; व्याख्यानें वगैरे पुष्कळ झालीं; परंतु जे आंत आले त्यांचें धर्मविषयक चळवळींकडे विशेष लक्ष नसल्यामुळें ह्या संस्थेकडील त्यांचें लक्ष कमी होत गेलें. व त्या वेळीं बाहेरचे लोक पुष्कळ यावे म्हणून जो कोणी आपल्याला आस्तिक म्हणवील व ज्याची सामाजिक व आध्यात्मिक जीवनासंबंधानें एकंदर दृष्टी प्रागतिक स्वरूपाची असेल त्यास यूनिअनचें सभासद होतां येतें असा प्रकार विशेषसा लाभदायक नाहीं असा अनुभव आल्यावरून साधारणपणें पहिल्या धोरणानेंच यूनिअनचे कामास पुन्हा सुरवात झाली. मात्र प्रथमच अमलांत असलेल्या नियमांमध्यें असलेली गुंतागुंत व नियमांची विपुलता हीं गाळून टाकण्यांत आलीं. त्याचप्रमाणें प्रार्थना अगर ब्राह्मसमाजाचा सभासद प्रथम असल्यावांचून कोणासही यूनिअनचें सभासद होतां येत नसे, ही अडचण दूर करण्यांस आली व करमणुकीचे वगैरे कांहीं प्रकार सुरू करण्यांत आले.

आज यूनिअनचें ध्येय साधारणतः वरील प्रमाणेंच आहे. प्रार्थना ब्राह्मसमाज अगर तत्सम संस्थांतील, व ह्या समाजांचीं ध्येयें व तत्त्वें मान्य असणाऱ्या इतर तरुणांस एकत्र करणें, त्यांच्यामध्यें बौद्धिक उन्नतीप्रमाणेंच आध्यात्मिक उन्नतीसंबंधानें आस्था उत्पन्न करणें, निरनिराळ्या धर्मपर विषयांच्या अध्ययनाची व्यवस्था करून प्रार्थनाशील आध्यात्मिक जीवनाची त्यांस गोडी लावून समाजकार्यें करण्याची पात्रता त्यांच्यांत आणणें, वारंवार सामाजिक संमेलनें भरवून

परस्परांमध्यें अधिक दळणवळण वाढविणें, समाजाचीं परोपकाराचीं व इतर जीं आज कामें चालू आहेत त्यांच्यासंबंधानें तरुणांमध्यें आस्था उत्पन्न करणें व सामाजिक व धार्मिक जीवनाचीं त्यांच्यापुढें उच्च ध्येयें ठेवणें हे हेतु असून पूर्वीच्याच अटींवर मात्र समाजाच्या बाहेरच्यांसही यूनिअनचें सभासद होतां येतें. हल्लीं वरील सर्व उद्देशांनुसार काम चालू असून, यूनिअनसंबंधानें एक विशेष गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. यूनिअन स्थापन झाल्याला वीस वर्षें होऊन गेलीं. तेवढया अवधींत समाजांतील तरुणांची नवी पिढी तयार झाली आहे. रा. रा. वामनराव सोहोनी यूनिअनचे पहिले सेक्रेटरी होते. आज त्यांचे एक चिरंजीव सेक्रेटरीचें काम करीत आहेत. ह्या संस्थेची उपयुक्तता अधिक वाढविण्याचे प्रयत्न चालून, समाजाचे प्रचारक डा. चिटणीस हे त्या कार्यांत अधिक मन घालूं लागले असून निरनिराळ्या दिशेनें त्यांनीं कांहीं चळवळी सुरू केल्या आहेत. आज मुंबई शहरांत केवळ सामाजिक व आध्यात्मिक उच्च ध्येयें आदर्शवत् पुढें ठेवून तीं साध्य करण्याचा प्रयत्न करणारी अशी संस्था दुसरी नाहीं. निरनिराळ्या धर्मग्रंथांचें आदरपूर्वक अध्ययन करून तद्द्वारा धर्मसंबंधानें उदार धोरण प्रसृत करणारी ही एकच संस्था आहे. त्याचप्रमाणें सर्व धर्मग्रंथांतील सत्याचें परमादरानें सेवन करणें हें ध्येय तरुणांपुढें ठेवून त्यांस धर्माची गोडी लावण्यासाठीं खटपट करणारी ही एकच संस्था आहे. तसेंच सामाजिक उच्च ध्येय व आध्यात्मिक उच्च ध्येय यांची ताटातूट न करितां, त्या ध्येयानुसार कार्यें करण्याची पात्रता आणण्याची तयारी करणारी ही एकच संस्था आहे. योग्य व उत्साही कर्तृत्ववान माणसांच्या हातीं ह्या संस्थेचीं सूत्रें गेलीं म्हणजे हीच संस्था योग्य प्रकारची जागृति अधिक प्रमाणावर करूं लागेल व तो काळही जवळ येत आहे असा भरंवसा आहे.

---

## ब्राह्म पोस्टल मिशन.

डा. जे. टी. संडरलंड हे प्रथम मुंबई शहरीं १८९५ सालीं अमेरिकन व ब्रिटिश युनिटेरिअन ॲसोशिएशनचे प्रतिनिधि म्हणून आले. त्या वेळपर्यंत इंग्लंड व अमेरिका येथें उदार धर्मविषयक चळवळी अस्तित्वांत असल्याचें येथील लोकांस माहित होतें, तरी त्यांचा व निदान मुंबईतील समाजाच्या मंडळीचा प्रत्यक्ष संबंध आलेला नव्हता. परंतु डा. संडरलंड हिंदुस्थानांत आल्यावर त्यांनीं सर्वत्र प्रवास करून प्रार्थना व ब्राह्मसमाजांविषयीं सर्व माहिती जमा केली. त्यांनीं येथें असतांना निरनिराळ्या ठिकाणीं व्याख्यानें दिलीं व वरील दोन्ही देशांतील उदार चळवळींसंबंधानें माहिती देऊन निकटभाव जागृत केला. एवढेंच करून ते थांबले नाहींत. त्यांनीं स्वदेशीं गेल्यावर फार मोठी कामगिरी केली. हिंदुस्थानांतील विद्यार्थ्यांस मँचेस्टर कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचें व इतर उदार विषयांचें अध्ययन करण्यासाठीं ठेविलेली शिष्यवृत्ति, त्याचप्रमाणें अमेरिकन युनिटेरिअन ॲसोशिएशनच्या वतीनें मेडिव्हिल कॉलेजमध्यें ह्याच विषयांचें अध्ययन करण्याची झालेली व्यवस्था त्यांच्याच खटपटीमुळें झाली. त्याचप्रमाणें रेव्ह. फ्लेचर विल्यम्स * व रेव्ह. हारवूड हे हिंदुस्थानामध्यें उदार धर्मविषयक चळवळ जी चालू आहे तीस साहाय्य करण्यासाठीं जे आले होते ते डा. संडरलंड ह्यांनींच प्रथम केलेल्या चळवळीमुळें. मँचेस्टर कॉलेजची शिष्यवृत्ति स्थापन केल्यानंतर रा. रा. विठ्ठल रामजी शिंदे हे जेव्हां ह्या शिष्यवृत्तीचा लाभ घेऊन विलायतेस गेले तेव्हां त्यांनीं तेथील युनिटेरिअन ॲसोशिएशनच्या कामाची चांगली माहिती करून घेतली, व तेथील पोस्टल मिशनच्याद्वारें चाललेल्या धर्मप्रचाराच्या कामाचा त्यांच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला. आपल्या प्रांतीं अशा प्रकारचें काम ताबडतोब सुरू झालें तर बरें असें वाटून आपले मित्र रा. रा. वासुदेव अनंत सुखटणकर ह्यांस त्यांनीं हा विचार कळविला. रा. विठ्ठलरावांनीं युनिटेरिअन ॲसोशिएशनकडून पुष्कळ लहानमोठीं पुस्तकें व त्याचप्रमाणें कांहीं देणगीही मिळविली, व १९०२ सालीं पुणें येथें रा. रा. सुखटणकरांनीं ब्राह्म पोस्टल मिशन सुरू केलें. पोस्टल मिशनचे हेतु दोन होते. (१) प्रार्थना व ब्राह्मसमाज ह्या संस्थांचीं तत्त्वें व कार्य पत्रव्यवहार करून, लहानमोठीं पुस्तकें वांटून प्रसार

---

* रेव्ह. फ्लेचर विल्यम्स ह्यांचा कलकत्त्यासच अंत झाला, हे अत्यंत मनमिळाऊ व आस्थेवाईक प्रचारक होते.

करणें ( २ ) व ह्या आणि इतर उदार संस्थांसंबंधानें माहिती मिळवून तिचा लोकांत प्रसार करण्यासाठीं निरनिराळया ठिकाणीं शाखा काढणें. ह्या मिशनची काम करण्याची पद्धत साधारणपणें अशी होती. सुबोधपत्रिका, इंडियन मेसेंजर व इतर पत्रांत धर्मसंबंधीं लहानमोठीं पुस्तकें अगदीं फुकट अगर फक्त टपालहांशील किंवा अल्प किंमत घेऊन वांटण्यांत येतात अशी जाहिरात* देण्यांत येत असे. कधीं कधीं धर्मविषयक प्रश्नांचीं उत्तरें देण्यांत येतील असें जाहीर केलें जात असे. कधीं कधीं अमुक पुस्तकें पत्रें येतांच फुकट पाठविलीं जातील व त्यांतील विषयांसंबंधानें पत्रांच्याद्वारें चर्चा केली जाईल असेंही कळविण्यांत येत असे. याचा परिणाम असा झाला कीं, पुष्कळ लोक लहान मोठीं पुस्तकें मागवूं लागले. पुस्तकें मागविल्यानंतर त्यांच्याशीं पत्रव्यवहार होत असे. कधीं कधीं ही मंडळी आपल्या शंकांचें समाधान करून घेण्याच्या उद्देशानें पत्रव्यवहार करीत व त्यांचें समाधान करण्याचा प्रयत्न होत असे. वासुदेवराव सुखटणकर हें कार्य करीत असतांना त्यांनीं प्रार्थनासमाजासंबंधानें डा. भांडारकरांकडून The Position of the Prarthana Samaj in the Religious World हें उत्सवांत झालेलें व्याख्यान लिहिवून घेऊन तें स्वतंत्र रीतीनें छापविलें होतें. परंतु विशेषतः युनिटेरिअन ॲसोशिएशनकडून येणाऱ्या पुस्तकांची निवड करून तीं वांटण्यांत येत असत. युनिटेरिअन ॲसोशिएशन पहिलीं सात आठ वर्षें टपालखर्चासाठीं व त्याचप्रमाणें प्रवास करण्यासाठीं दरसाल लहानशी देणगी देत असे. ह्या मिशनसंबंधानें पहिल्या १० वर्षांची जी माहिती प्रसिद्ध झाली आहे ती फार बोधपर आहे. रा. रा. शिंदे स्वदेशीं आल्यानंतर रा. सुखटणकर विलायतेस गेले व तें काम पुढें मुंबईस रा. शिंदे मि. सय्यद ह्यांस साहाय्यास घेऊन करूं लागले. त्या सात आठ वर्षांच्या अवधींत एकंदर ३४३८ ब्राम्हधर्मावरील पुस्तकें, १२७०० लहान लहान

---

*Liberal Religious Reading.

FREE ! FREE ! !

J. T. Sunderland—The Larger Meaning of Unitarianism.

S. F. Williams—The Religion the Age wants.

These publications sent free.

Also information on Brahmoism and Unitarianism.

Apply by letter to—

V. A. SUKHTANKAR,

392 Somwar, Poona City.

पत्रकें, ६३३ युनिटेरिअन पुस्तकें व ५००० युनिटेरिअन पत्रकांचा प्रसार करण्यांत आला. ह्यांतील पुष्कळशीं फुकट वाटण्यांत आलीं व कांहींची अल्प किंमतही घेण्यांत येत असे. जे कोणी पुस्तकांची मागणी करीत, अगर पत्रव्यवहार करीत त्यांचीं नांवें एका पुस्तकांत दाखल करण्यांत येत असत व त्यांच्याशीं वारंवार पत्रव्यवहार करून उदार धर्मवार्ता त्यांस कळावी अशी व्यवस्था करण्यांत आली होती. रा. शिंदे यांनीं दोन वेळां मुंबई इलाख्यांतील कांहीं ठिकाणीं प्रवास करून व्याख्यानें दिलीं. ह्या दोन्ही सफरींचा खर्च युनिटेरिअन ॲसोशिएशननें त्यांस त्या वेळीं दिला होता. पुढें प्रार्थनासमाजाशीं धर्मप्रचारक ह्या नात्यानें असलेला त्यांचा संबंध सुटल्यानंतर हें काम बंद पडलें होतें, तें आतां पुन्हा डा. चिटणीस ह्यांच्या देखरेखीखालीं लवकरच सुरू करण्यांत येणार असून त्याची पुस्तकें वगैरे मागविण्याची पूर्व तयारी हल्लीं चालू आहे.

---

# डा. भांडारकर पुस्तकालय व वाचनालय.

शेट दामोदरदास गोवरधनदास आपला परदेशचा प्रथम प्रवास संपवून जेव्हां स्वदेशीं परत आले त्या वेळीं लोकांच्या ज्ञानांत भर घालण्यासाठीं फुकट वाचनालयें स्थापण्याचा त्यांनीं निश्चय केला. ह्या निश्चयानुसार त्यांनीं कोटांत People's Free Reading Room नामक संस्था मोठ्या प्रमाणावर स्थापन केली. परंतु तेवढयानें त्यांची तृप्ति झाली नाहीं. मुंबईसारख्या बकाली शहरांत कोटांत एके ठिकाणीं वाचनालय स्थापून मुंबई शहराची वाचनाभिरुची वाढावयाची नाहीं हें लक्ष्यांत घेऊन, गुरुवर्य डा. भांडारकरांच्या नांवें एक फुकट लायब्ररी व वाचनालय स्थापण्यांत आली तर बरें असा विचार त्यांच्या मनांत आला व त्याप्रमाणें त्यांनीं एक हजार एकशें रुपयांची देणगी १८९७ सालीं समाजाच्या हवालीं केली. व कांहीं वर्षांनीं म्हणजे १९०२ सालीं जुलै महिन्यांत आणखी एक हजार रुपये दिले. ह्या देणगीच्या वेळींही आपलें नांव जाहीर होऊं नये अशी त्यांनीं अट घातली होती म्हणून "हें पुस्तकालय व वाचनालय स्थापन करण्यास ज्या बंधूंनीं १००० रुपये दिले त्यांचें नांव प्रसिद्ध करण्यास आम्हांस परवानगी नाहीं" असें समाजाच्या रिपोर्टांत लिहिलें आहे. ह्या ग्रंथालयांत विशेषतः निवडक अशीं धर्मसंबंधीं व नीतिविषयक ग्रंथांचाच भरणा अधिक आहे. विकत घ्यावयाच्या पुस्तकांची निवड प्रो. श्रीधरपंत भांडारकरांनीं कोणत्या संस्थेच्या विद्यमानें ग्रंथालय स्थापन व्हावयाचें तें लक्ष्यांत घेऊन केली आहे. हें ग्रंथालय उघडण्यापूर्वींच ब्रिटिश अँड फॉरेन युनिटेरिअन ॲसोशिएशन, स्वीडनबर्ग सोसायटी, रायल एशियाटिक सोसायटी, बडोद्याची ग्रंथसंपादक व प्रचारक मंडळी इ० संस्थांकडून बक्षिस म्हणून कित्येक पुस्तकें आलीं होतीं त्यांचा लायब्ररीच्या संग्रहांत समावेश करून १८९७ सालीं डिसेंबर महिन्यांत समाजाचे सन्माननीय अध्यक्ष डा. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या हस्तें डा. भांडारकर ग्रंथालय व वाचनालय Dr. Bhandarkar Free Library and Reading Room उघडण्यांत आलें. त्या वेळीं न्या. मू. रानडे ह्यांनीं महत्त्वाचें भाषण केलें. तें करतांना त्यांनीं म्हटलें कीं, "आपणांपैकीं कित्येकांना डा. भांडारकर हे आपले पूर्व पिढींतील एक गृहस्थ असें वाटत आहे. परंतु जो मी आज कित्येक बाबतींत त्यांनींच दाखविलेल्या मार्गाचें अवलंबन करीत आहें, त्यामाझी व त्यांची ४० वर्षांपूर्वीं झालेली ओळख जणूं काय परवांच झाली असें

वाटत आहे. ह्या अवधींत सुदैवानें त्यांचा व माझा असा परिचय झाला आहे कीं, त्याच्यायोगें त्यांच्या गेल्या ४०–४५ वर्षांच्या कारकीर्दीतील त्यांच्या हातून घडलेलीं सत्कृत्यें अवलोकून त्यांच्याविषयींचें माझें प्रेम व माझा आदर हीं वृद्धिंगतच पावलीं आहेत....कोणी म्हणतात कीं प्रार्थनासमाज हा काय प्रार्थना करण्याचा एक दिवाणखाना आहे. आणि एकेश्वरी धर्माचा प्रसार करणारीं लायक माणसें कांहीं ह्या प्रांतीं झालीं नाहींत. परंतु मजप्रमाणेंच आपल्या आयुष्यभर डा. भांडारकरांचा ज्यांस परिचय झाला आहे व ते जीं कांहीं थोर कार्यें करीत आहेत, त्यांची योग्यता ज्यांस माहित आहे, त्यांस असल्या विधानांची किंमत सांगणें नलगे. आमचा हा दिवाणखाना ( Hall ) खरोखरच प्रार्थना करण्याचा दिवाणखाना आहे आणि माझ्या दृष्टीनें याचें अधिक चांगलें वर्णनच करितां यावयाचें नाहीं. परंतु आमच्या मतांचा प्रसार करणारीं लायक माणसेंच झालीं नाहींत, किंवा आज नाहींत, हें मात्र वस्तुस्थितीस सोडून आहे. डा. भांडारकर यांची योग्यता ब्राह्मसमाजाच्या थोर पुढाऱ्यांपेक्षां मुळींच कमी नाहीं. डा. भांडारकर हे केवळ विद्वान गृहस्थ नाहींत. पुष्कळसे श्रम केल्यानें विद्वत्ता कोणासही प्राप्त होते. ते विद्वान असून त्याच्याहीपेक्षां फार थोर आहेत. ते मार्गदर्शक आहेत. पण ते मार्गदर्शक आहेत असें म्हणण्यानेंही त्यांच्या योग्यतेची खरी कल्पना होत नाहीं. ते आमचे गुरु आहेत. त्यांचें उदाहरण आम्ही आमच्या दृष्टीपुढें ठेविलें आहे व त्यांच्या द्वारा आमच्या आयुष्यांत आम्हांस पुष्कळच बोध झाला आहे."*

अशा प्रकारें डा. भांडारकरांच्या सन्मानार्थ स्थापिलेलें हें केवळ पुस्तकालय Library नसून वाचनालयही आहे. वाचनालयामध्यें सुबोधपत्रिका वर्तमानपत्रासाठीं मोबदला येणारीं वर्तमानपत्रें ठेवण्यांत येतात. लायब्ररीमधलीं पुस्तकें घरींही वाचावयास नेण्याची परवानगी आहे. मात्र सभासद नसणारांस पांच रुपये अनामत ठेवावे लागतात. ह्या लायब्ररीमध्यें तत्त्वज्ञानविषयक ग्रंथसंग्रह पुष्कळ मोठा आहे. ज्या वेळीं हें वाचनालय स्थापन झालें त्या वेळीं प्रार्थनामंदिरामध्येंच पुस्तकाचीं सर्व कपाटें वगैरे ठेविलीं होतीं. परंतु १९१६ सालीं लायब्ररी व वाचनालय राममोहन आश्रमाच्या तळमजल्यावर नेलीं व हल्लीं वाचनालय तेथें असून लायब्ररीचीं कांहीं कपाटें राममोहन स्कूलच्या भागांत ठेविलीं आहेत.

---

* He has been an example and a teacher from whom we received the best instruction in our career.

# राममोहन आश्रम.

प्रार्थनासमाजाची १८६७ सालीं स्थापना झाली खरी; परंतु प्रार्थनामंदिर बांधून तयार होईपर्यंत पुढें सात वर्षें गेलीं हें प्रार्थनामंदिराच्या हकीकतीवरून वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच आहे. परंतु मंदिर जरी झालें, व उपासना, व्याख्यानें वगैरेंची जरी सोय झाली, तरी दुसऱ्या अडचणी मंदिराच्या उभारणीनें दूर होणें शक्य नव्हतें. परगांवाहून कोणी धर्मप्रचारक, अगर दुसऱ्या एखाद्या समाजाचा सभासद आला तर त्यांची उतरण्याची सोय मंदिरांत करितां येत नसे. त्यांनीं एकतर मुखशाळेंत रहावें, किंवा शक्य असल्यास कोणा सभासदाच्या येथें उतरावें असा प्रकार होता. त्याचप्रमाणें समाजाच्या सभासदांचीं सामाजिक संम्मेलनें, उत्सवांतील प्रीतिभोजन ह्यांसाठींही कोणातरी सभासदाच्या घरीं जावें लागे. पूर्वी डा. आत्माराम पांडुरंग, माडगांवकर, सर नारायण चंदावरकर, माधवदास रघुनाथदास, ह्यांपैकीं कोणाच्या तरी घरीं हे प्रसंग घडवून आणावे लागत. ही फार दिवसांची अडचण दूर करण्याचें परमेश्वराच्या कृपेनें, शेट दामोदरदास गोवरधनदास ह्यांनीं मनावर घेतलें व समाजाच्या आवारांतील मोकळ्या जागेंत एक इमला बांधावयाचा व त्यास **राममोहन आश्रम** असें नांव द्यावयाचें असा आपला विचार आहे असें त्यांनीं समाजाच्या व्यवस्थापक मंडळीस कळविलें व ह्या आश्रमाच्या वार्षिक खर्चासाठीं आपण ३००० रुपयांच्या सरकारी नोटा बाजूस काढून त्याही समाजाच्या हवालीं करूं असें त्यांनीं म्हटलें. ह्या त्यांच्या योजनेस अनुसरून बुधवार ता. २९ फेब्रुआरी सन १९०३ रोजीं सकाळीं आश्रमाचा पाया गुरुवर्य डा. रामकृष्ण गोपाळ भांडारकर ह्यांच्या हस्तें घालण्याचा समारंभ झाला. ह्यासाठीं मंदिराच्या आवारांत एक सुंदर मंडप उभारला होता; ह्या वेळीं बाबू बिपिनचंद्र पाल मुंबईस होते व गेइटी थिएटरांत व प्रार्थनामंदिरांत त्यांचीं व्याख्यानें होत होतीं. ते त्याचप्रमाणें भाई बलदेव नारायण समारंभाच्या वेळीं हजर होते. ह्या समारंभाच्या वेळीं सभासद व हितचिंतकांनीं मंडप भरून गेला होता. प्रथमतः भाई बलदेव नारायण ह्यांनीं एक पद्य म्हटलें व नंतर त्यांनींच प्रसंगास उचित अशी प्रार्थना केली. त्यानंतर त्यावेळचे समाजाचे चिटणीस रा. रा. नारायण भास्कर पंडित ह्यांनीं आश्रमासंबंधानें थोडी माहिती सांगितल्यावर बाबू बिपिन चंद्र पाल यांचें भाषण झालें. त्यावेळीं त्यांनीं असें म्हटलें कीं, "मुंबईच्या मंडळींनीं ह्या आश्रमाला जें राममोहन आश्रम हें नांव

दिलें आहे त्यावरूनही ह्या समाजाच्या धोरणाची व कामाची सहज कल्पना होण्यासारखी आहे. ब्राह्मसमाजामध्यें पुष्कळ मतभेद आहेत व एकाचे तीन समाज झाले आहेत हें जरी खरें आहे, तरी राजा राममोहन राय संबंधानें सर्वांच्या ठिकाणीं सारखीच आदरबुद्धि वसत आहे. आज कोणाला आपलें धर्मप्रचाराचें कार्य आपल्या राष्ट्रीय भावनेस अनुसरून करावें असें वाटत असलें, किंवा कोणास सर्व देशांतील धर्मांची उन्नति ध्यानांत घेऊन सर्वांस सारखें उपयोगी पडेल असें आपल्या धर्मप्रचारकार्याचें धोरण ठेवावयाचें असलें, तरी राजा राममोहन यांच्या धोरणाचा स्वीकार केल्यास कांहीं अडचण भासणार नाहीं. राजा राममोहन रायांचें धोरण सार्वभौमिक असूनही राष्ट्रीय होतें. म्हणून राजा राममोहन हे सर्व पक्षांतील लोकांचे गुरु, पुढारी व मार्गदर्शक आहेत आणि ह्या आश्रमाला तुम्ही त्यांचें नांव देऊन त्यांच्या धोरणाचा पुरस्कार करीत आहां ही फार आनंदाची व समाधानाची गोष्ट आहे.''

ह्या समारंभासाठीं गुरुवर्य डा. भांडारकर पुण्याहून मुद्दाम आले होते. त्यांचें नंतर भाषण झालें त्याचा सारांश असा होताः—

''मुंबईच्या मंडळींनीं प्रथम प्रार्थना समाजाची स्थापना केली, पण १८६८ सालापासून मंदिराच्या उभारणीचे विचार त्यांच्या मनांत घोळूं लागले. आपलें स्वतःचें मंदिर असल्यावांचून आपल्या कार्यास स्थायिकपणा यावयाचा नाहीं व असा स्थायिकपणा आल्यावांचून पुढील कार्यें उत्साहानें पार पडावयाचीं नाहींत असें आम्हांस वाटत होतें, म्हणून त्या दिशेनें प्रयत्न सुरू झाले व हें सुंदर मंदिर १८७४ सालीं उभारलें गेलें. त्यानंतर आतां कामें फार वाढलीं आणि निरनिराळ्या कार्यांसाठीं मंदिराव्यतिरिक्त एका इमारतीची फार गरज भासूं लागली. परंतु द्रव्याच्या अभावीं ह्या गैरसोयींना कसें तरी तोंड द्यावें लागत होतें. अखेरीस आपले दानशूर मित्र व बंधु ह्यांच्या ही अडचण लक्ष्यांत येऊन त्यांनीं एकट्यानें हा आश्रम उभारण्याचें महत्कार्य आपल्या शिरावर घेतल्यामुळें आतां लवकरच आपल्याला पाहिजे त्याप्रमाणें स्वतंत्र इमारत लाभणार आहे. ही जो आतां ह्या जागेवर इमारत व्हावयाची आहे, जिचा पाया आपणा सर्वांसमक्ष परमेश्वराच्या प्रेरणेनें आज घातला गेला आहे, तिचें नांव **राममोहन आश्रम** असें ठेवणें हें किती सार्थ आहे त्याची फोड ह्यापूर्वीं झालीच आहे. राजा राममोहन ह्यांचें धोरण जसें राष्ट्रीय त्याचप्रमाणें सार्वभौमिक होतें हें खरें; तथापि त्यांच्या राष्ट्रीय धोरणामध्यें महर्षीस सुधारणा कराव्या लागल्या. कारण, सत्य, न्याय, व

विवेक ह्यांस जें विपरीत वाटेल त्याचा स्वीकार न करणें हा ब्राह्मसमाजाचा कटाक्ष आहे. आजच्या काळाला सत्य, न्याय, प्रेम, विवेक, पावित्र्य, सदाचार, भक्ति ह्यांस प्राधान्य देऊन ईश्वराचें पितृत्व व मातृत्व व मनुष्याचें भ्रातृत्व प्रतिपादणारा धर्म हवा आहे, आणि हेंच कार्य आमचा प्रार्थनासमाज येथें व राजा राममोहन यांचा ब्राह्मसमाज बंगाल व इतर प्रांतीं करीत आहे. आतां आपला देश उन्नत दशेस कोणत्या उपायांचें अवलंबन केल्यानें पोंचेल असा प्रश्न वारंवार विचारण्यांत येतो. त्याला माझें एकच व निश्चित असें जें उत्तर आहे तें हे कीं, आपल्या लोकांच्या शीलावर सर्व कांहीं अवलंबून आहे. सत्य, न्याय, प्रेम, सदाचार ह्यांच्याविषयीं प्रेम जितकें आचरणांत दिसून येईल त्या प्रमाणानें आमचें शील बनेल. त्याचप्रमाणें माझी अशी दृढ श्रद्धा आहे कीं, सामाजिक उन्नतीवांचून राजकीय उन्नति व्यर्थ आहे. तसेंच आपल्या अंतःकरणांत परमेश्वराविषयीं निष्ठा व स्वकर्तव्यजागृति झाल्यावांचून कोणतींही कार्यें आपल्या हातून नीट रीतीनें होणार नाहींत. ब्राह्म व प्रार्थनासमाज ज्या धर्मतत्त्वांचा पुरस्कार करीत आहेत तीं अशीं आहेत कीं त्यांच्या योगें कर्तव्यजागृति होते. हीं तत्त्वें कोणत्याही दिशेनें होणाऱ्या प्रगतीस अवरोध करणारीं नाहींत; व जोंपर्यंत वरील सत्य, न्याय इ० तत्त्वानुरोधें उन्नति होत आहे तोंपर्यंत ती ह्या धर्मास बाधक व्हावयाची नाहीं. म्हणून देशाच्या उद्धारासाठीं ह्या धर्मतत्त्वांचा जितका अधिक प्रसार होईल तितका हवा आहे. धर्मप्रचाराचे दोन मार्ग आहेत. एक तरवारीच्या साहाय्यानें व दुसरा लोकांचीं मनें वळवून. दुसऱ्या मार्गाचें बौद्धधर्मानुयायांनीं अनुसरण केल्यामुळें एके काळीं तो सर्वत्र पसरला होताच. त्याच मार्गाचें आपल्यालाही कालमानानुसार अनुसरण करावयाचें आहे. त्यासाठीं स्वार्थाचा त्याग करून धर्मप्रसाराचें कार्य करणारीं माणसें आतां पुढें आलीं पाहिजेत." हा संभारंभ झाल्यानंतर इमारतीच्या कामास सुरुवात झाली. प्रथमतः दोन मजली इमारत उठविण्याचा शेट दामोदरदास यांचा विचार होता. परंतु नंतर आणखी एक मजला उभारून त्याच्या अर्ध्या भागांत एक खोली व अर्ध्या भागांत उघडी गच्ची करण्याचें त्यांनीं ठरविलें. अशा प्रकारें ही सुंदर इमारत तयार झाल्यानंतर १९०४ सालीं समाजाच्या ३७ व्या वार्षिकोत्सवामध्यें ता. १२ मार्च रोजीं तिचा **प्रवेश समारंभ** न्या. मू. नारायणराव चंदावरकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. समारंभास येणाऱ्या मंडळींची बसावयाची व्यवस्था आश्रमाच्या तिसऱ्या मजल्यावरच केली होती. समारंभास बरीच मंडळी हजर होती. प्रथम प्रसंगास अनुरूप अशीं दोन पद्यें म्हटल्यानंतर

अध्यक्ष न्या. मू. नारायणराव चंदावरकरांनीं प्रार्थना केली. नंतर ते म्हणाले कीं, "ही सुंदर इमारत आपले बंधु शेट दामोदरदास यांच्या औदार्याचें फळ आहे. ह्या इमारतीला एकंदर पंधरा हजार रुपये खर्च झाला आहे. दोन मजल्यांच्या वर एक शांत निवांत जागा असावी असें वाटून त्यांनीं एक मजला वर चढविला; अर्थात् त्यामुळें इमारतीचा खर्चही वाढला. तो सर्व त्यांनीं मोठ्या आनंदानें केला व वर इमारतीच्या दागदुजीसाठीं तीन हजार रुपयांच्या नोटा त्यांनीं समाजाच्या स्वाधीन करण्याचें ठरविलें आहे. तीस वर्षांपूर्वी जेव्हां आपल्या मंदिराचा पाया घातला त्या वेळीं समाजाशीं कोणत्याही रीतीचा संबंध नसणाऱ्या लोकांनीं, एवढेंच नव्हे तर समाजाशीं सहानुभूति नसणाऱ्या लोकांनींही मंदिराच्या फंडास मदत केलेली मला आठवते. पाया घालण्याच्या वेळीं समारंभास जे हजर होते त्यांपैकीं आतां बहुतेक सर्व परलोकीं गेले आहेत. एकच गृहस्थ, आपले सन्मान्य बंधु वासुदेवराव नवरंगे, हयात आहेत. परंतु प्रकृतीस स्वास्थ्य नसल्यामुळें ते आज हजर नाहींत. त्यावेळीं रा. रा. नारायणराव परमानंदांसारखे गृहस्थ पुढारी होते व ते आपापल्या समजुतीप्रमाणें धर्माची वाढ होण्यासाठीं प्रयत्न करीत होते हें जाणून अगदीं विरुद्ध मतांच्या लोकांनींही आपल्याला मदत केली. आज तसाच आश्रय आपल्याला मिळेल कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं.* ह्या दृष्टीनें पहातां आपल्यापैकीं एका उदार वृत्तीच्या बंधूंनीं ही सुंदर इमारत बांधून आपल्या हवालीं केली ही फार अभिमानाची व आनंदाची गोष्ट होय. अशा प्रकारच्या इमारतीची आपल्याला फार आवश्यकता होती. आपलें मिशन काम दिवसेंदिवस वाढण्याचा हा काळ आहे. सध्यांच दोन मिशनरी आपलें काम करीत आहेत. परंतु बाहेरगांवांहून समाजाचे मिशनरी व इतर पाहुणे आले म्हणजे त्यांच्या उतरण्याची व्यवस्था करणें मोठें अडचणीचें वाटे, आतां ती गैरसोय दूर झाली आहे. पंडित शिवनाथ शास्त्री ह्यांच्यासारखे प्रचारक येथें येऊन राहिले म्हणजे त्यांच्या सहवासांत रहावयास मिळणें हा एक मोठा अधिकारच आहे असें मी समजतों, आणि अशा प्रकारचें आश्रमस्थान असल्यानें तें सर्वांस सोइस्कर होणार आहे. म्हणून ईश्वरी प्रेरणेनें आपल्या सन्मान्य बंधूंनीं आपल्याला ही जी देणगी दिली आहे तिचा आपल्या हातून सदुपयोग होवो अशी माझी परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे."

---

* ह्याच अनुभवाची पुनरावृत्ति राममोहन स्कूलसाठीं मंदिरावर एक मजला वर चढविण्याचें काम चालू असतांना झाली हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

**राममोहन आश्रम** समाजाच्या हवालीं करितांना शेट दामोदरदास ह्यांनीं कांहीं अटी घातल्या होत्या; प्रत्येक मजल्याचा कोणत्या रीतीनें उपयोग करावयाचा ह्याविषयीं त्या अटी होत्या. परंतु आतां सर्व इमारतींत राममोहन शाळा भरविण्यांत येत आहे. समाजानें कांहीं नवीन कार्य सुरू केल्यास त्यासाठीं इमारतीचा उपयोग करण्याची मुभा शेट दामोदरदास ह्यांनीं ठेविली आहे. तीस अनुसरून हल्लीं तळमजला व वरील दोन मजले राममोहन स्कूलच्या ताब्यांत असून, अगदीं वरच्या मजल्यावर समाजाचे धर्मप्रचारक डॉ. चिटणीस हे रहात असतात.

---

## पंढरपूर येथील
# बालहत्याप्रतिबंधक गृह.

## ( The Foundling Home, Pandharpur ).

महाराष्ट्रामध्यें ज्या कित्येक संस्था आपलें योजिलेलें काम बिनबोभाट पण निग्रहपूर्वक करीत आहेत, त्यांपैकींच पंढरपूर येथील बालहत्याप्रतिबंधक गृह ही संस्था आहे. ही संस्था पंढरपूर येथें असून तिची सर्व व्यवस्था मुंबईच्या प्रार्थनासमाजाच्या वतीनें होत असते हें सर्वांस आतां माहित झालें आहे. ह्या संस्थेचें स्वरूप काय आहे, ती जें कार्य करीत आहे त्याचें महत्त्व किती आहे व महाराष्ट्रानें ह्यापासून कोणता बोध घेणें अगत्याचें आहे ह्याविषयीं अल्प विवेचन करावयाचें आहे.

आपल्या इलाख्यांत बालहत्या किती होत असते त्याची माहिती सर्वांस असणें शक्य नाहीं. मुंबईसारख्या बकाली वस्तीच्या ठिकाणीं चौपाटीवरील वाळूंत, रस्त्याच्या गटारांच्या नाल्यांत, कचरा टाकण्याच्या गाडींत, भर रस्त्यावर, मेलेलें अगर नुक्तेंच जन्मलेलें, मूल सांपडल्याची बातमी आपण वर्तमानपत्रांतून वाचली, म्हणजे आपल्याला त्याचें कांहीं विशेष वाटत नाहीं. कोर्टामध्यें खटला आला व कांहीं कमी अधिक माहिती प्रसिद्ध झाली म्हणजे ह्या विषयाकडे नव्हे, पण त्या त्या खटल्याकडे थोडें बहुत लक्ष्य जातें. तथापि मुंबईसारख्या शहरापेक्षांही तीर्थांच्या ठिकाणीं अशा प्रकारच्या अर्भकांची हत्या अधिक होत असते असा सर्वत्र अनुभव आहे. ज्या ज्ञातींत विधवाविवाहाची चाल नाहीं, अशा ज्ञातींतील गतभर्तृकांस दुर्मार्गास प्रवृत्त करणारे कामांध पुरुष सर्व ठिकाणीं आढळतात. कित्येक वेळां विवाहाची आशा दाखवून भाबड्या बायांस स्वार्थी व दुराचरणी पुरुष अंतीं फशीं पाडतात व त्यांचें पाऊल वांकडें पडतें; त्यांचें पाप उघडकीस आलें कीं त्या लोकनिंदित होतात, त्यांस खड्यासारखें वेंचून काढण्यांत येतें व निदान अशा एकाद्या स्त्रीइतकाच पापी जो पुरुष तो उजळ माथ्यानें समाजांत वावरत असतो. पतित बाईस संतती होण्याची वेळ आली म्हणजे तिजवर दुर्धर प्रसंग ओढवतो; गर्भपात करण्यासाठीं नाना प्रकारचे मूर्खपणाचे उपाय योजिले जातात; त्यांयोगें शरीराची हानि होते; हा दुष्ट हेतु साध्य होत नाहीं व शेवटीं केवळ अब्रू राखण्यासाठीं अशा बाया बालहत्या करण्यास प्रवृत्त होतात. अशी होणारी बालहत्या तरी जितकी टाळवेल तितकी टाळावी हा पंढरपूर येथील बालहत्याप्रतिबंधक

गृहाचा हेतु आहे. ही संस्था जिल्ह्याचीं अगर मोठ्या वस्तीचीं दुसरीं ठिकाणें सोडून पंढरपूर येथेंच कां स्थापण्यांत आली असा प्रश्न कधीं कधीं विचारण्यांत येतो. त्याचें उत्तर असें आहे. पंढरपूर हें एक महाराष्ट्रांतील फार मोठें व अति पवित्र असें मानिलेलें तीर्थक्षेत्र आहे. त्यामुळें तें भाविक जनांच्या अत्यंत आदरास पात्र झालेलें आहे. दरवर्षी विशेषतः आषाढी कार्तिकी एकादशीच्या दिवशीं महाराष्ट्रांतीलच केवळ नव्हे, तर दूरदूरच्या प्रदेशीं रहाणाऱ्या यात्रेकरूंचे थवेच्या थवे अनेक प्रकारच्या हालअपेष्टा सहन करून येथें येतात हें पाहून त्यांची उत्कट श्रद्धा प्रत्ययास येते. परंतु क्षेत्राच्या ठिकाणीं अनेक अनिष्ट प्रकारांस उत्तेजन मिळतें हा जो नित्याचा अनुभव तो पंढरपुरींही येतो; एवढेंच केवळ नव्हे, तर त्या ठिकाणीं एका विशेष प्रकारच्या पापकृत्यास फार वर्षांपासून पूर्ण अवसर मिळत असला पाहिजे असा अनुभव १८७५ सालीं पंढरपुरास मुन्सफ असतांना रा. ब. लालशंकर उमियाशंकर यांस आला. त्या शहरीं संकटांत सांपडलेल्या स्त्रिया गांवांतील कांहीं ठराविक लोकांच्या घरीं बाळंतपणासाठीं राहतात व बाळंत झाल्यावर मूल वाळवंटांत अगर दुसऱ्या कोठें तरी अडचणीच्या जागीं जिवंत अगर मेलेलें टाकून चालत्या होतात असें त्यांनीं ऐकिलें होतें. कधीं कधीं हीं परोपकारी माणसें बायांपाशीं असेल नसेल तें सर्व द्रव्य, दागिने व कपडे हिरावून घेतात व त्यांस घराबाहेर लावून देतात अशाही बातम्या त्यांच्या कानांवर येत असत. एके दिवशीं संध्याकाळीं आपल्या नित्याच्या वहिवाटीस अनुसरून ते चंद्रभागेच्या वाळवंटामध्यें सहल करीत असतांना त्यांस कांहीं एका मऊ पदार्थाची ठेंच लागली. म्हणून खालीं वळून पहातात तों कापडांत गुंडाळलेलें तें एक जिवंत मूल असें त्यांस आढळलें! त्या बालकास त्यांनीं आपल्या स्वतःच्या घरीं नेलें व त्याची त्यांच्या पत्नीनें योग्य प्रकारें जोपासना केली. ऐकीव बातमी प्रत्यक्ष अनुभावानें खरी ठरल्यावर लालशंकरभाईंचें लक्ष त्या विषयाकडे विशेष लागलें व अशा अर्भकांच्या प्राणरक्षणासाठीं काय तजवीज करितां येईल हा प्रश्न त्यांच्यापुढें उभा राहिला. लोकांना आपला विचार कळवावयाचा, पैशासंबंधानें लोकांस विनंतिपत्रें पाठवावयाचीं व नंतर संस्था काढावयाची तर त्यांत कालक्षेप होणार हें लक्षांत घेऊन लालशंकरभाईंनीं आपल्या कांहीं निकटच्या मित्रांच्या साहाय्यानें बाहेर सांपडणाऱ्या मुलांचे प्राण वांचविण्यासाठीं एक लहानशी संस्था काढिली. हाच बालहत्याप्रतिबंधक गृहाचा उपक्रम. परंतु एवढयानें हा प्रश्न निकालांत निघत नव्हता. बाहेर सांपडलेल्या मुलांच्या जोपासनेची ही व्यवस्था झाली;

परंतु जीं मुलें बाहेर दिसत नाहींत व मृत्युमुखीं पडतात, अगर ज्यांची वाढ होण्यापूर्वीच निराळया प्रकारची व्यवस्था होते, त्यांचेसंबंधानें काय उपाययोजना करावी हा प्रश्न पुढें येतांच त्याचें स्वरूप किती विस्तीर्ण आहे त्याची लालशंकर ह्यांस ताबडतोब कल्पना झाली. म्हणजे रस्त्यांत किंवा अन्य ठिकाणीं सांपडलेल्या अर्भकांचे प्राण वांचवावयाचे, तर त्यांच्या मातांचाही तपास लाविला पाहिजे. नाहींतर ह्या अर्भकांचें प्राणहि वांचविणें फार अवघड जातें. त्याचप्रमाणें ज्याप्रमाणें मूल जन्मल्यानंतर त्याची जोपासना होणें जरूर आहे त्याचप्रमाणें त्याच्यापूर्वी बालकांच्या मातांची जोपासना होणें जरूर आहे. अब्रूच्या बचावासाठीं प्रथम भलत्यासलत्या उपायांची योजना झाल्यानें भावी मातांची प्रकृति ढांसळते, ते उपाय व्यर्थ गेले म्हणजे काळजीनें त्या अर्धमेल्या होतात, अशा स्थितींत झालेली प्रसूति आणि नंतर सांपडलेलीं मुलें दुबळीं असलीं तर त्यांत आश्चर्य मानण्यासारखी कांहीं गोष्ट नव्हे. यासाठीं अर्भकांचे प्राण जर वांचवावयाचे तर त्यांच्या मातांचीही जोपासना बाळंतपणाच्या आधींपासून योग्य प्रकारें होणें जरूर आहे असें त्यांस आढळून आलें. शिवाय, खुद्द पंढरपूर शहरासारख्या ठिकाणीं अब्रूच्या बचावासाठीं येणाऱ्या बायांवर कशा आपत्ति येतात हें वर दाखविलें आहेच. हें सर्व टाळण्यासाठीं अशा असहाय स्थितींत असलेल्या स्त्रियांच्या प्रसूतीची व्यवस्था करून कांहीं दिवस त्यांस आपल्याच देखरेखीखालीं ठेवून त्यांची व त्यांच्या बालकांची जोपासना करण्यासाठीं एक सूतिकागृह स्थापण्याची आवश्यकता त्यांस भासूं लागली. रानावनांत, रस्त्यांत, वाळवंटांत, निवडुंगाच्या दाट काट्यांत, पाण्याच्या नाल्याच्या बाजूला, गटारांत, शौचकूपांत किंवा उघड्या मैदानांत मुलें सांपडल्यानंतर त्यांच्या प्राणरक्षणासाठीं नाना प्रकारच्या उपाययोजना करण्यापेक्षां त्यांच्या भावी मातांसच प्रसूतीपूर्वी ह्या गृहांत ठेविल्यानें बालहत्येचें व प्रसूतीनंतरच्या मृत्यूचें प्रमाण कमी होईल असें वाटून प्रसूतिगृहाची स्थापना करण्यांत आली. सन १८७९ पर्यंत रा. ब. लालशंकर व त्यांचे मित्र डाक्टर नारायण अनंत दांडेकर ह्यांनीं ही संस्था चालविली. त्यानंतर १८८१ जूनपर्यंत ती एक स्थानिक कमिटी चालवीत होती व त्यांस सहाय करण्यास रा. रा. गणेश रघुनाथ करकरे ह्यांस नेमिलें होतें. ही संस्था १८८१ सालीं मुंबईच्या प्रार्थना समाजाच्या हवालीं केली गेली व आजपर्यंत मुंबईचा प्रार्थना समाजच तिची सर्व व्यवस्था पहात आहे.

बालहत्याप्रतिबंधक गृहाच्या एकंदर व्यवस्थेचा प्रश्न फार नाजूक आहे, तितकाच तो फार व्यापक आहे. हें गृह अनीतीला उत्तेजन देतें असें कोणी

म्हटलें तरी तें निमूटपणें ऐकून घेऊन, आपल्या समोरचें काम व्यवस्थापकांस पहावें लागतें. पंढरपुरास एक बालहत्याप्रतिबंधक गृह आहे, पण सर्वत्र जीं नुकतींच जन्मलेलीं मुलें सांपडतात व बालहत्या होतात, त्यादेखील पंढरपुरास एक गृह आहे म्हणूनच कीं काय ? त्याचप्रमाणें, खुद्द पंढरपूर शहरीं हें गृह नव्हतें त्याच्या पूर्वींपासून शहरांतील निरनिराळया भागांत राहून बाया ज्या प्रसूत होत होत्या, आणि अद्यापहि होत आहेत, आपलीं बाळें टाकून जात आहेत, त्यांचेबद्दल आक्षेपकांस कांहीं उत्तर देतां येतें काय ? ह्यासाठींच हा प्रश्न फार नाजूक आहे असें आम्ही म्हणतों. तसेंच पुष्कळ वेळां चालकांच्यापुढें आणखी एक नवीनच प्रश्न येऊन उभा राहतो. अर्थात् हा प्रश्न म्हणजे अनाथ स्त्रियांचा होय.

**अनाथ स्त्रीगृह.** ( Home for the Homeless )

पुष्कळ वेळां असें होतें कीं, कित्येक बायांना कोणी तरी आणून पंढरपुरांत सोडतें; गृहाकडे आणून अधिकाऱ्यांच्या हवालींही करण्यास ते धजत नाहींत. अशा बाया विचारपूस करीत कशा तरी येऊन गृहांत दाखल होतात. कोणी त्यांस गृहाजवळ आणूनही सोडतात. जागा असली तर अधिकारी त्यांस फुकट दाखल करून घेतात. परंतु प्रसूतीनंतर त्यांस कोठें जावयास स्थळ नसतें. त्यांना ह्या स्थितींत आणणारांस आतां त्यांची जरूरी नसते. त्यांचे आप्त स्वकीय त्यांस मृत समजतात व त्यांचा पत्ता जरी चालकांस लागला, तरी अशा स्त्रियांस परत घ्यावयास कोणी तयार नसतें ! आईबाप, बंधु, इतर अगदीं निकटचे आप्त स्वकीय त्यांजवर बहिष्कार घालतात. मूळच्या घराचा पत्ता बहुतकरून मिळत नाहीं, मिळाला तरी त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. अशा स्थितींत ना घर ना दार, ना जवळ पैसा अडका, अशी त्यांची स्थिति होते व पुढें काय करावें हें त्यांस सुचत नाहीं. चालकांस ही नवीनच काळजी उत्पन्न होते. ह्या स्त्रियांपैकीं कित्येक मध्यम वर्गांतील असतात. मग ज्यांना कोठें जावयास ठिकाणच नाहीं त्यांस येथेंच ठेवण्यांत येतें. कारण त्यांस तसेंच बाहेर जाऊं दिल्यास उघडपणें दुर्मार्गाला त्या लागण्याचा संभव असतो. येथें त्यांना सन्मार्गाला लावण्यासाठीं शक्य ती खटपट करण्यांत येते. प्रथम ज्यांस लिहावयास व वाचावयास येत नसतें त्यांस तें शिकविण्यांत येतें. त्यांचें लक्ष्य संस्थेच्या कामाकडे लागावें अशी योजना होते. त्यांच्या कानांवर देवधर्माच्या गोष्टी जाण्याची व्यवस्था होते. त्यांस एकत्र करून भजन होतें. सारांश, मागील प्रसंगाची कोणत्याही प्रकारें आठवण न देतां त्यांस सुधारण्याचे प्रयत्न होतात. त्यांच्यापैकीं कोणास पुन्हा संसारांत पडण्याची इच्छा असल्यास,

योग्य संधि येतांच, त्यांचे विवाह जुळविले जातात. अशा कित्येक स्त्रियांचे विवाह झाले असून, आज त्या आनंदानें आपला संसार करीत आहेत. ह्या माहितीवरून ह्या निराश्रित स्त्रीगृहाच्याद्वारें किती उपयुक्त कार्य होत आहे त्याची कल्पना होईल.

## शिक्षा झालेल्या स्त्रिया.

वरील गृहाच्या द्वारें दुसरें एक उपयुक्त कार्य होत असतें. बालहत्येचे पुष्कळ खटले कोर्टामध्यें येऊन आरोपाची शाबिती झाल्यावर बायांस शिक्षा होत असते. अशा स्त्रियांना इतर कैद्यांप्रमाणें न मानतां त्यांस सुधारण्यास अवसर असावा म्हणून अशा स्त्रियांस आमच्या ताब्यांत दिल्यास ह्या दिशेनें आम्ही प्रयत्न करण्यास तयार आहों असें मुंबईच्या प्रार्थना समाजानें सरकारला कळविलें. सरकारनें ही समाजाची विनंति मान्य केली व नव्या कायद्यानुसार केलेल्या नियमान्वयें मुंबई सरकार ज्या स्त्रियांना संस्थेकडे पाठवितें त्यांस अनाथ स्त्रीगृहांत दाखल करण्यांत येतें. १९२४-२५ सालीं सरकारनें शिक्षा झालेल्या चार स्त्रियांस व १९२५-२६ सालीं पांच स्त्रियांस सरकारनें ह्या गृहांत दाखल होण्यासाठीं पाठविलें. ह्यावरून हें निराश्रित स्त्रियांचें गृह कसें उपयुक्त कार्य करीत आहे त्याची कल्पना होईल.

## गृहाची एकंदर व्यवस्था.

आतां येथें येणाऱ्या स्त्रियांची व्यवस्था साधारणपणें कोणत्या धोरणावर ठेविली जात आहे, मुलांची जोपासना कशी होत आहे; त्यांच्या दुधाची व्यवस्था कशी आहे व संस्थेचे नियम काय आहेत त्याची येथें कल्पना करून देणें अगत्याचें आहे. त्याच्या योगें हें काम किती वाढलें आहे व किती श्रमपूर्वक त्याची व्यवस्था होत आहे तें वाचकांच्या ध्यानांत येईल. बालहत्याप्रतिबंधकगृह ह्या संस्थेंत १९२३-२४ सालीं १२७, १९२४-२५ सालीं १२२ व १९२५-२६ सालीं १२२ बायांना प्रसूतीसाठीं दाखल करण्यांत आलें. ह्या १२२ पैकीं १०५ विधवा होत्या, १२ नवऱ्यानें सोडलेल्या होत्या; आणि ५ अविवाहित होत्या. १२२ पैकीं फक्त ३८ स्त्रियांना लिहितांवाचतां येत होतें. एवढ्या स्त्रिया येतात तरी कोठून असा प्रश्न नेहमीं लोकांपुढें येतो. गतवर्षी पुढील ठिकाणाहून ह्या गृहांत दाखल होण्यासाठीं स्त्रिया आल्याः—

मुंबई, पुणें, ठाणें, खानदेश, वऱ्हाड, निझामप्रांत, अहमदनगर, सातारा, रत्नागिरी, नाशिक, मध्यप्रांत, काठेवाड, मिरज, सांगली, जमखिंडी, अहमदाबाद, जोधपूर, कच्छ, कुलाबा, धारवाड, बेळगांव इ०.

त्यांची जातवारी संख्येच्या प्रमाणावर अशी पडतेः—

ब्राह्मण, मराठा, गुजराथी, चितोड वाणी, मारवाडी, रजपूत, सोनार, कोमटी, माळी, खत्री, प्रभु, जैन, धनगर, कासार, लोहार, ठाकूर इ० इ०. पूर्वी बालहत्याप्रतिबंधकगृह व अनाथ बालकाश्रम यांची व्यवस्था पहाण्यासाठीं एक खात्रीचा गृहस्थ नेमला जात असे. डाक्टरीच्या कामासंबंधानें जी कांहीं मदत लागेल ती पंढरपूर येथील डाक्टर देत असत. पण त्यांचा व्यवस्थेशीं फारसा * संबंध नसे. आतां तेथें एम. बी. बी. एस. ची परीक्षा पास झालेले एक गृहस्थ सर्व व्यवस्था मोठ्या दक्षतेनें व उत्साहानें पहात आहेत. पुष्कळ वर्षें श्री. सावित्रीबाई कामत ह्यांनीं समाजापासून कांहींही वेतन न घेतां मेट्रनचें व मिडवाइफचें काम समाजाचें काम म्हणून केलें. सध्यां अनाथ बालकाश्रमामध्येंच जी लहानाची मोठी झाली, ह्या संस्थेनेंच जिच्या सर्व शिक्षणाचा भार उचलिला अशी आमचीच एक मुलगी नर्स व मिडवाईफ होऊन तेथील मेट्रनचें व इतर कामें पहात आहे. तिच्या हाताखालीं १० दाया असून, शिवाय ३५ बाया संस्थेचीं निरनिराळीं कामें करीत आहेत. पूर्वी मुख्य इमारतीच्या एका खिडकीमध्यें एक पाळणा ठेविला होता. कोणीही बाहेरून मूल आणून ठेविलें कीं त्यास आंत घेऊन त्याचें प्राणरक्षण करून पुढील जोपासना करण्याचें काम संस्थेवर पडे. परंतु आतां मुलांची संख्या वाढल्यामुळें आणि जागाही पुरेशी नसल्यामुळें बाहेरून येणाऱ्या मुलांस जागा असली तरच दाखल केलें जातें.

## मुलांचें दूध.

मुलांना त्यांच्या मातांचेंच दूध मिळणें अगत्याचें आहे, म्हणून बायांना त्यांचे बाळंतपणानंतर दोन महिने आश्रमांत ठेविलें जातें. त्यानंतर मातांचें दूध मिळणें

* फारसा असें म्हणण्याचें कारण असें कीं, पुष्कळ वर्षें समाजाकडून जागच्या जागीं देखरेख करण्यासाठीं दरसाल एक स्थानिक कमिटी नेमण्यांत येत असे. तींत डाक्टर एक सभासद असत. परंतु अनुभवान्तीं ह्या कमिटीपासून फायद्याच्या ऐवजीं एकंदरीनें त्रास होण्याचा संभव अधिक दिसूं लागल्यामुळें आतां ही कमिटी नेमण्यांत येत नाहीं.

शक्य नसतें; म्हणून दूध असणाऱ्या दाया मिळविण्याचा प्रथम प्रयत्न केला जातो. पंढरपूर हें लहानसेंच शहर असल्यामुळें अशा दाया जितक्या हव्या असतात तितक्या मिळत नाहींत. ज्या मिळतात त्याही सर्व लक्ष्य मुलांकडे देणाऱ्या असतातच असें नाहीं. त्यामुळें गाईचें दूध व ग्लॅक्सो यांचा उपयोग करणें भाग पडतें. बाटल्यांतून मुलांस दूध पाजावयाचें म्हणजे स्वच्छतेसंबधानें फार काळजी घ्यावी लागते. शक्य तेवढी काळजी घेऊन ठरलेल्या वेळीं बाटल्या स्वच्छ ठेवून, योग्य देखरेखीखालीं, मुलांस दूध पाजण्यांत येतें; आणि ह्याविषयीं सोलापूर येथील सिव्हिल सर्जनसाहेबांची खात्री झालेली आहे. ही एकच गोष्ट आश्रमाचे मेडिकल आफिसर, मेट्रन व त्यांच्या हाताखालील मंडळी हें काम अत्यंत दक्षतेनें करीत असतात हें सिद्ध करावयास पुरेशी आहे. शिवाय मोठ्या तोंडाच्या बाटल्या मुद्दाम आणिल्या जातात. ह्या बाटल्या सहज स्वच्छ करितां येतात.

ग्लॅक्सो सर्व मुलांसाटीं वापरणें फार खर्चाचें आहे. तथापि निरुपाय म्हणून पुष्कळ खर्च करून मुलांची जोपासना करण्याच्या कामीं ग्लाक्सो वापरला जात आहे. डाक्टरांची एकंदर व्यवस्था, अर्भकांसंबंधानें घेतली जाणारी काळजी ह्यायोगें मृत्यूचें प्रमाण पुष्कळ कमी झालेलें आहे. १९२४–१९२५ अखेरच्या आंकड्यावरून हजारीं ३९८ व १९२५–२६ च्या आंकड्यावरून हजारीं ३८६ पडलें. पूर्वीच्या मानानें हें मृत्युप्रमाण फारच कमी आहे. पुष्कळ मुलें जन्मतः अगदीं दुबळीं, रोगट व वजनानें अगदीं कमी असतात. प्रसूति होण्यापूर्वी औषधें वगैरे घेऊन गर्भ पाडून टाकण्याच्या झालेल्या सर्व प्रयत्नांमुळें तीं पुढें रोगट निपजतात. कधीं कधीं मुलें दाखल होण्यापूर्वी कांहीं तासच्यातास रस्त्यावर पडलेलीं असतात. त्यामुळें थंडीवारा व उपास ह्यांचाही त्यांच्या प्रकृतीवर परिणाम होतो.

## प्रसूतिगृहाचे नियम.

१ ज्या बायांचें चुकून वांकडें पाऊल पडलें असून त्या अडचणींत असतील त्यांस प्रसूतीकरितां या गृहांत घेतलें जाईल.

२ प्रवेश फी रु. ५, पोटगी खर्च १५ रु., सुइणीबद्दल रु. २, देणगी खातर रु. २५ इतका खर्च द्यावा लागेल. ही रक्कम आगाऊच दिली पाहिजे. पहिल्या महिन्याबद्दल एकंदर रु. ४७ भरावे लागतील. पहिल्या महिन्याच्या आंत जरी आई गेली तरी महिन्याचा भरपूर आकार घेतला जाईल. त्यापुढें मात्र जितके दिवस ती राहील तितक्याच दिवसांची पोटगी द्यावी लागेल.

३ बाळंत झाल्यावर दोन महिने मुलास सांभाळण्यास राहावें लागेल.

४ वरील खर्च देण्याची ज्या बाईची शक्ति नसेल तिलाही या गृहांत घेतलें जाईल, पण तिला बाळंतपणाचे पूर्वीचे दिवस व बाळंतपणानंतर ९ **महिने** गृहांतच सुपरिंटेंडेंट सांगतील तीं कामें करून राहावें लागेल.

५ वरील दोन्ही अटी कबूल नसल्यास तिनें बाहेर कोठें तरी बाळंत होऊन दोन महिन्यांचें मूल आणून दिलें असतां **आश्रमांत जागा असेल त्याप्रमाणें** तें फुकट घेण्यांत येईल.

६ ऐपतवाल्याचें मूल गृहांत घ्यावयाचें असल्यास त्याबद्दल निदान २०० रुपये फी द्यावी लागेल.

७ येथील बायांस रोज दोन्ही वेळां साधें जेवण म्हणजे, वरण, भात, भाजी, आमटी अगर कढी, चटणी, लोणचें अगर पापड, जोंधळ्याची अगर बाजरीची भाकरी, तूप, ताक व दोन वेळां चहा मिळेल. याशिवाय कोणास दूध हवें असेल तर तें त्यांस गृहाकडून मिळेल, पण त्याचा आकार निराळा द्यावा लागेल.

८ बाईजवळ ताट, वाटी, तपेली व कांहीं ऊबदार कपडे इतकें सामान असलें पाहिजे. निराश्रित बायांस तें गृहांत मिळेल.

९ एकदां आंत आलेल्या बाईस, गृह कायमचें सोडीपर्यंत कोणत्याही सबबीवर शहरांत अगर अन्यत्र ठिकाणीं जाऊं दिलें जाणार नाहीं.

१० एखाद्या बाईच्या मनांतून आपलें स्वतःचें मूल आपल्याबरोबर न्यावयाचें असेल तर गृह सोडते वेळीं तिला तसें करतां येईल. पण गृह सोडल्यानंतर आपलें मूल जर तिला हवें असलें तर तिनें सुपरिंटेंडेंट ह्यांच्या तर्फे मुंबई प्रार्थनासमाजाची परवानगी मिळविली पाहिजे.

११ पत्रव्यवहार सुपरिंटेंडेंट तर्फे केला पाहिजे.

१२ एखाद्या बाईच्या नादानें दुसरी बाई बिघडण्याचा जर संभव असला तर तिला तत्क्षणीं बाहेर घालवून दिलें जाईल.

१३ बायांची अब्रू राखण्याकरितां त्यांची व मुलांसंबंधीं सर्व माहिती गुप्त राखण्यांत येईल आणि मेट्रन खेरीज **कोणासही बायांच्या खोलींत जातां येणार नाहीं.**

१४ ज्या ज्या वेळीं कोणत्याही स्त्रीस कांहीं माहिती वगैरे सांगण्याची असेल त्या त्या वेळीं सुपरिंटेंडेंट हे मेट्रनच्या समक्ष विचारतील अगर सांगतील.

वरील सर्व हकीकतीवरून बालहत्याप्रतिबंधक गृहकार्याची वाचकांस कल्पना होईल. ह्या बाबतींत हिंदु समाजाची खरोखर स्थिति खालावलेली आहे याची लोकांस कल्पना नाहीं. एकदां एक बाई मध्य प्रांतांतून भर उन्हाळ्याच्या दिवसांत पायीं प्रवास करीत आपल्या अब्रूचा बचाव करण्यासाठीं पंढरपुरास आली, त्यावेळीं चालून चालून तिचे पाय सुजले होते व भेगा पडून रक्त वाहूं लागलें होतें ! अशा बाईला वाटखर्चासाठींही पैसा न पुरविणाऱ्या इसमाचें वर्णन कोठल्या भाषेनें करावें ? त्याचप्रमाणें अठ्ठेचाळीस वर्षांच्या जन्मांध बाईवर ह्या गृहामध्यें येण्याचा प्रसंग ज्या समाजांतील एक मनुष्य आणतो त्या समाजाला बालहत्याप्रतिबंधक गृह अनीतीस उत्तेजन देतें असें म्हणतां येतें काय ? अशा प्रकारच्या संस्था असण्याची आवश्यकता भासणें ही कोणत्याही समाजास भूषणास्पद गोष्ट नव्हे हें खरें; तथापि बालहत्याप्रतिबंध करणें व त्या अर्भकांचें संगोपन करून त्यांस वाढविणें हीं कार्यें अत्यंत पुण्यप्रदच होत. प्रार्थनासमाज चुकून वाईट पाऊल पडलेल्या बायांच्या सुधारणुकीसाठीं किती प्रयत्न करीत आहे व त्यांची योग्य प्रकारें काळजी घेऊन त्यांस सन्मार्गवर्ती करण्यासाठीं ज्या कांहीं योजना करीत आहे त्यांस यश येत आहे हें परमेश्वराच्या कृपेचें फळ होय व हें कार्य देवाचें कार्य आहे अशाच भावनेनें तें प्रार्थनासमाजानें आपल्याकडे घेतलें व इतकीं वर्षें चालविलें आहे.

---

## पंढरपूर येथील
# अनाथ बालकाश्रम
## ( The ORPHANAGE AT PANDHARPUR ).

सन १८७६–७७ सालीं महाराष्ट्रांत भयंकर दुष्काळ पडला होता. आणि त्यांतल्या त्यांत सोलापूर व कलादगी जिल्ह्यांमध्यें अगदीं कहरच उडाला होता. सरकारनें दुष्काळी कामें सुरू केलीं होतीं, तीं अपुरी पडलीं होतीं; लोक अन्नान्न दशेस आल्यामुळें घरेंदारें सोडून जात होते व गांवच्यागांव ओसाड पडले होते. अशा वेळीं मुंबईस प्रार्थनासमाजानें वर्गणी जमवून सोलापूर व कलादगी जिल्ह्यांत निरनिराळ्या ठिकाणीं गरजवंतास अन्न व कपडे वांटण्याची व्यवस्था केली होती. रा. ब. कल्याण सिताराम चित्रे ह्यांनीं कलादगी शहरीं काम केलें. ह्या गांवीं जेव्हां दुष्काळाचा कहर होता त्या वेळीं शिजविलेलें अन्नही देण्याची व्यवस्था केली

होती. रा. रा. चित्रे आपल्या एका पत्रांत म्हणतात " आतां शिजविलेलें अन्न देण्याचें बंद केलें आहे; कारण, बाहेरगांवचे लोक येथें येण्याचें बंद झालें. येथील रहिवासी अनाथ लोकांस सरकारी अन्नछत्रांत अन्न मिळत असे. कांहीं वैदिक ब्राह्मणांस व संभावित कुटुंबांस आठ दिवसांनीं दोन किंवा एक पायली धान्य कुटुंबाचें मान पाहून दिलें. वाटखर्चास रोख पैशाची पुष्कळ अनाथांस जरूर असल्यामुळें, लांब जाण्याचें मान मनांत आणून प्रत्येक मनुष्यास दोन आण्यांपासून १ रुपयापर्यंत दिले. बायकांस लुगडीं चोळ्या, पुरुषांस धोतरें, मुलांस अंगरखे टोप्या, कांहीं बायांस पायांतील चपल्या दिल्या. " ह्यावरून प्रार्थनासमाज वर्गणी जमवून दुष्काळग्रस्तांस मदत करण्यासाठीं कोणत्या दिशेनें परगांवीं काम करीत होता त्याची स्पष्ट कल्पना होते. सोलापूर जिल्ह्यांत प्रखर दुष्कळ पडल्याचें आम्हीं वर म्हटलेंच आहे व त्या दुष्काळाच्या प्रखर स्वरूपाचें अल्प वर्णनही केलें आहे. हजारों बालकांचे आईबाप व जवळचे आप्त मृत्युमुखीं पडल्यामुळें तीं अनाथ झालीं होतीं. दुष्काळपीडित लोकांपैकीं अशक्त व पंगु लोकांकरितां सरकारनें तालुक्याच्या ठिकाणीं अन्नसत्रें उघडलीं होतीं. त्याप्रमाणें पंढरपूर येथेंही एक मोठें अन्नसत्र होतें. ह्या सत्रांत मुलेंही पुष्कळ होतीं. दुष्काळाचा तडाखा कमी होतांच सरकारनें अन्नसत्रें बंद केलीं. मोठालीं माणसें आपापल्या गांवीं उद्योगधंद्याला गेलीं; पण आईबाप, आप्तस्वकीय नसलेलीं मुलें निराश्रित होण्याची व अगदीं उघडीं पडण्याची वेळ आली. सरकार जो कोणी मागेल त्यास हीं मुलें सढळ हातानें देऊं लागलें! त्यावेळीं सुबोधपत्रिकेनें पुढील उद्गार काढिले:—

**Famine Orphans**—The duty of providing for the orphans left by the ravages of a famine, we submit, is as imperative as that of preventing those ravages, and this duty has now devolved on those who have been relieving the distress caused by famine in our Presidency. But we regret to be informed that the orphans are being given away to any one who asks for them without any guarantee that they shall not be treated as semi-slaves. It is true we have just now no institutions which would at once take over

any number of such helpless children, and therefore it is the more necessary to support any efforts put forth in this direction. We learn that a committee has been formed by a theistic friend at Pandharpur to take care of the orphans, and the Bombay Prarthana Samaj and the Theistic Association are willing to work in the same direction if they are provided with a certain amount of funds to begin with. An application to this effect has been made to the Bombay Relief Committee, and we do not know if the Committee can dispose the money at their disposal more suitably. ( Dec. 2-1877 )

वर ज्यांचा उल्लेख केला आहे ते दुसरे तिसरे गृहस्थ नसून प्रार्थनासमाजाचे सन्मान्य सभासद रा. ब. लालशंकर उमियाशंकर होत. ते कमिटीला अर्ज वगैरे करून थांबले नाहींत. मुंबईच्या समाजाची मंडळी पैसे व धान्य गोळा करीत होतीच; परंतु लालशंकर भाईंनीं दुष्काळपीडितांस सहाय्य करण्यासाठीं धनधान्य मिळविण्यास सुरुवात केली. त्यांनीं गुजराथेंतून एक लाख रुपये किमतीचें धान्य आणून " गरीब लोकांस किरकोळ, स्वस्तदरानें खऱ्या मापानें विकलें. तेणेंकरून हजारों मनुष्यांचे प्राण वांचले " ( सु. प. ) आणि मग वर म्हटल्याप्रमाणें मोठीं माणसें गेलीं व मुलें वांटून वांटून बाकी राहिलीं तीं सर्व लालशंकर भाईंनीं आपल्या ताब्यांत घेतलीं. " दुष्काळामध्यें ज्यांचे आईबाप वारले, किंवा ज्यांस सोडून गेले, अगर ज्यांची व आईबापांची चुकामुक झाली, किंवा लोकांस देऊन देऊन जीं मागें राहिलीं अशा बेवारशी मुलांचा सांभाळ करण्याकरितां गृहें स्थापन करण्याचा इरादा पुणें मुंबई वगैरेच्या ठिकाणच्या लोकांनीं प्रदर्शित केला; परंतु रा. सा. लालशंकर याखेरीज दुसरे कोणाकडूनही ह्या गरिबांची सोई झाली नाहीं" (सु.प.) आपल्या दृष्टीसमोर असलेल्या मुलांचें पुढें काय होणार याची चिंता लालशंकर ह्यांस उत्पन्न झाली व अनाथबालकाश्रमाच्या स्थापनेची गोष्ट त्यांनीं आपले मित्र डा. नारायण अनंत व त्या वेळचे मामलेदार रा. सा. आप्पाजी रावजी ह्यांजपाशीं काढिली व त्यांच्या अनुमतानें त्यांनीं ह्या कामास एकदम सुरुवात केली. मुलांच्या निर्वाहाकरितां पैसा, धान्य व कापड जमविण्याकरितां त्यांनीं झटून यत्न

चालविला व येथील समाजाच्या मंडळीकडून त्याच प्रमाणें धनवान दयाळू व्यापारी लोकांकडून लालशंकर ह्यांस चांगलें सहाय झालें. पंढरपूर येथील सत्रांतील मुलें त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतलीं व ह्या स्वतंत्र कामास १८७८ पासून प्रारंभ झाला. प्रारंभीं सुमारें १५० मुलें होतीं. त्यांच्या रहाण्याची वगैरे सर्व व्यवस्था लालशंकर भाईंनीं उत्तम केली. " त्यांस खेळावयास घराजवळ मोठें पटांगण तयार केलें व तेथेंच एक तालीमखाना सुरू केला. हीं मुलें नित्य सकाळ संध्याकाळीं ईशस्तवनपर अभंग गातात."* लालशंकर भाई व त्यांचे सहाय्यक यांचा विचार आपल्या ताब्यांत असलेल्या मुलांत आणखीही भर पडावी असा होता. त्यांनीं वर्तमानपत्रांत जाहिराती देऊन व सरकारी अमलदारांस कळवून चोहोंकडचीं मुलें गोळा केलीं. तीं सुमारें पांचसहाशें जमलीं ! परंतु ह्या मुलांत उपासमारीमुळें अगदीं अशक्त झालेलीं व दुखणेकरू मुलेंच अधिक होतीं. ह्यामुळें सुमारें निम्में मुलें मरण पावलीं. त्याचप्रमाणें शेतीभाती नीट चालूं लागल्यावर कित्येक मुलांचे आईबाप त्यांच्या शोधास येतांच त्यांस आपापलीं मुलें ओळखावयास सांगून खात्री होतांच त्यांचीं मुलें त्यांच्या ताब्यांत करण्यांत आलीं. बाकी राहिलेल्या मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न आतां लालशंकर यांच्या पुढें आला. ह्यांपैकीं जीं वयानें मोठीं होतीं त्यांस कांहींतरी धंद्याचें शिक्षण द्यावें अशा हेतूनें सोलापूर येथील गिरणीच्या व्यवस्थापकांस त्या मुलांपैकीं कांहीं मुलें निरनिराळीं कामें शिकण्यासाठीं घेण्याची विनंति केली. ती त्यांनीं मान्य करितांच ४० मुलें तेथें शिक्षणासाठीं पाठविलीं. तीं जोंपर्यंत शिकत होतीं व त्यांस आपला चरितार्थ चालवितां येत नव्हता तोंपर्यंत त्यांचा खर्च आश्रमानें चालविला. ह्यावेळीं मि. फ्राय नांवाचे गृहस्थ सोलापूरचे कलेक्टर होते. हे गृहस्थ फार कनवाळू होते. लालशंकर भाईकडून ह्या मुलांची हकीगत कळतांच ते मुलांविषयीं बरीच काळजी घेऊं लागले. पुढें वयांत आलेल्या मुलांच्या विवाहाचा प्रश्न जेव्हां निघाला तेव्हां गिरणीचे मालक शेट मुरारजी गोकुळदास व कलेक्टर साहेब मि. फ्राय ह्या दोघांनीं मिळून लग्नाचा खर्च उदारबुद्धीनें दिला !

जीं मुलें खुद्द पंढरपुरांत होतीं त्यांस उद्योगधंदा शिकविण्याकरितां त्या वेळचे मध्यभागाचे कमिशनर मि. राबर्टसन ह्यांच्या साहाय्यानें पंढरपूर म्युनिसिपालिटीकडून सालिना तीन हजार रुपये खर्चासाठीं मिळवून तेथें एक उद्योगशाळा

---

* सुबोधपत्रिका ३१ मार्च १८७८.

स्थापिली. ती आतां **राबर्टसन** स्कूल आफ इंडस्ट्री ह्या नांवानें चालू आहे. प्रथम अनाथ आश्रमांतील मुलांसाठीं ही संस्था जरी स्थापन झाली तरी तींत बाहेरचीं मुलें घेण्यांत येत असत; आतां ही संस्था म्युनिसिपालिटीनें सर्वस्वी आपल्या ताब्यांत घेतली आहे. १८७९ सालीं रा. ब. लालशंकर ह्यांची गुजराथेंत बदली झाली. त्यावेळीं आतां मागें ह्या संस्थेचें कसें व्हावयाचें ही काळजी त्यांस उत्पन्न झाली. डा. दांडेकर होतेच; पण त्यांस साहाय्य करण्याकरितां एक स्थानिक कमिटी नेमून मुंबईच्या प्रार्थनासमाजाकडून रा. रा. गणेश रघुनाथ करकरे ह्यांस शिक्षक नेमिलें. हे गृहस्थ फार सज्जन व दयाळू आणि व्यवस्थित होते. ते समाजाचे सभासद असून उत्तम कीर्तन करीत असत. ह्यांच्या कामासंबंधानें ता. २२ जून १८७९ च्या सुबोधपत्रिकेंत पुढीलप्रमाणें उल्लेख आहे:—

"पंढरपूर येथील अनाथ बालरक्षक गृहावर येथील प्रार्थनासमाज मंडळीनें रा. रा. गणेश रघुनाथ करकरे यांस शिक्षक नेमिलें आहे. सदरील शिक्षकाकडून अनाथ मुलांविषयीं माहिती आली आहे ती येणेंप्रमाणें:—एकंदर रजिस्टरावर १४६ मुलें आहेत. पैकीं १९ एकपासून पांच वर्षांच्या आंत आहेत, व १२७ मुलें व मुली साहापासून चौदा वर्षांच्या आंत आहेत. ह्यांत २२ मुलें शाळेंत शिकतात. १०० इमारतीचे कामावर मजुरीस जातात. सुमारें २० मुलें नारूनें व तापानें आजारी आहेत. ह्या समूहांत **मुसलमान**, मराठे, लिंगाईत, **चांभार, महार** अशा निरनिराळ्या ज्ञातींतील मुलें आहेत. समाजाकडून गेलेले शिक्षक सर्व दिवसभर मुलांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था देखील जातीनें पहातात. तेणेंकरून पूर्वीपेक्षां दोन दोन पायल्या धान्य कमी लागून मुलांस पोटभर अन्न मिळतें. रा. रा. नारायण अनंत दांडेकर, सरकारी दवाखान्याचे डाक्टर यांचीही देखरेख चांगली आहे हें त्यांस भूषण आहे." हा उतारा येथें कां घेतला आहे त्याची कल्पना वरील जाड टाईपांच्या अक्षरांवरून सर्वांस होण्यासारखी आहे. पूर्वीपासून जेव्हां जेव्हां वेळ आली, त्या त्या वेळीं अस्पृश्य मानलेल्या जातींतील अनाथ बाळांस प्रार्थनासमाजानें व ह्या अनाथ बालकाश्रमानें दूर केलेलें नाहीं. त्यांच्यासाठीं अर्थात् निराळी व्यवस्था होत असे हें येथें सांगावयाची जरूर नाहीं. रा. रा. करकरे ह्यांची व्यवस्था स्थानिक कमिटीला व समाजाला पसंत होती. "साडेतीन महिने ह्या गृहस्थांस तेथें जाऊन झाले. इतक्या दरम्यान शरीरप्रकृतीस कांहीं काळ आरोग्य नसतां यांनीं जी खटपट केली व जे श्रम केले ते प्रशंसनीय आहेत. आतां रा. सा. लालशंकर तेथून गेल्यामुळें, यजया-

वत व्यवस्थेचा बोजा एकटे डाक्टरसाहेब नारायण अनंत यांजवर पडला आहे." ह्या उल्लेखावरूनही त्यांच्या कामाची कल्पना होते. परंतु एक किंवा दोन माणसांच्या खटपटींवर एवढी मोठी संस्था ठेवणें इष्ट नाहीं. स्थाइक स्वरूपाच्या संस्थेच्या हातांत तिचीं सूत्रें आलीं पाहिजेत. म्हणून लालशंकर भाईच्या डोक्यांत पुढील व्यवस्थेसंबंधानें जे विचार घोळत होते, त्यांस मूर्त स्वरूप देण्यापूर्वी लालशंकर भाईनीं पंढरपूर अनाथ बालकाश्रमाला प्रत्यक्ष भेट दिली, व तेथील व्यवस्था स्वतः पाहिली. लालशंकर भाई अनाथाश्रमांतील मुलांना पित्याच्या ठिकाणीं होते व मुलांनाही ते आपल्या पित्याप्रमाणें कसे वाटत होते, याची साक्ष ह्या चिरस्मरणीय भेटीच्या वेळीं पटली.

## लालशंकरभाई व अनाथ मुलें.

" येथील अनाथ मुलांस रा. रा. लालशंकर हे नाताळाच्या मुट्टींत येणार असें कळल्यापासून त्यांचे डोळे त्यांच्या वाटेकडेस लागले होते. ता. २४ दिसेंबर १८७९ रोजीं रा. सा. टपालाचे गाडींतून आले. त्यांस सामोरे डाक्टर साहेब व फडणीस साहेब नदीपलीकडे गेले होते. रा. सा. लालशंकर हे गाडींतून आले हें पाहून सर्व मुलांस आनंद झाला, तो वर्णन करवत नाहीं. लहान थोर मुली व मुलगे ह्यांच्या तोंडांतून 'रावसाहेब, रावसाहेब' असा एकच घोष चालला होता. नदींतून बाहेर गाडी येतांच रावसाहेब खालीं उतरण्याचा मात्र अवकाश तों मुलांनीं त्यांचे पायांवर मस्तकें ठेविलीं. उभयतांचे कंठ सद्गदित झाले, इतकेंच केवळ नाहीं तर जवळ जी मंडळी आली होती तीसमुद्धां बोलवेना. तो देखावा अवर्णनीय खरा.

नंतर दुपारून सुमारें ४ वाजतां रावसाहेबांनीं अनाथ आश्रमगृहांत येऊन सुतार व लोहार यांची शाळा पाहिली. नंतर मुलांनीं थोडी कसरत करून दाखविल्यावर शाळेंत शिकणाऱ्या मुलांची त्यांनीं परीक्षा घेतली....नंतर **संगीतांतील** ३ पदें म्हणून सरतेशेवटीं त्यांतील **एका मुलीनें स्वतः** परमेश्वराची प्रार्थना केली. तींत देवानें आमचें भयंकर दुष्काळांतून कसें रक्षण केलें, व आज आम्हांस किती आनंदाचा दिवस दाखविला वगैरे प्रकारें ईश्वराचे उपकार मानून त्याचें साहाय्य मागितलें. दुसरे दिवशीं म्हणजे ता. २५ रोजीं रावसाहेबांनीं सकाळीं व संध्याकाळीं पंढरपूर प्रार्थनासमाजांतील ईश्वरोपासना चालविली व उपदेश केला. मंडळी पुष्कळ जमली होती. ता. २६ रोजीं सकाळीं १० वाजतां रावसाहेब सोलापुरास जावयास निघाले. त्या वेळीं मुलांचे भेटीकरितां आर्फनेजमध्यें आले

होते. सर्व मुलांनीं ईश्वर स्तुतिपर अभंग म्हटले व नंतर सर्व मुलांचा निरोप घेण्याच्या उद्देशानें रावसाहेब मुलांस " येतों हं " म्हणून विचारूं लागले त्यावेळीं वियोगजन्य दुःख न आवरून सर्व मुलें मोठा आक्रोश करूं लागलीं. तें पाहून सर्व मंडळींचे नेत्र आंसवांनीं भरून कंठ दाटून कोणास कांहीं बोलवेनासें झालें. जसें गाय वत्सास सोडून दुसरे ठिकाणीं ज्या वेळीं जाते त्या वेळेस त्या वत्साची जी अवस्था होते किंवा मुलास त्याची कृपाळू माता निरुपायास्तव सोडून स्थलांतर करिते त्यावेळीं त्या बालकाची जशी स्थिति होते तद्वत् रावसाहेबांच्या जाण्याच्या योगें मुलांची झाली. रावसाहेबांचें ह्या मुलांवर इतकें लक्ष्य होतें व त्यांची वर्दळ ( त्रास ) इतकी ते सोशीत होते कीं तशी वर्दळ त्या मुलांची सख्खी आई सुद्धां सोसणार नाहीं असें वाटतें. रावसाहेबांनीं प्रत्येक मुलांस एकेक धोतर व एकेक चिरडी दिली." ( मु. प. ४ जानुआरी १८८० ).

## प्रेमाचा संबंध.

मुलें व व्यवस्थापक ह्यांच्या मध्यें हाच प्रेमाचा संबंध कायम ठेवण्याचा प्रयत्न हल्लींही असतो. रा. रा. केरो रावजी भोसले हे अनाथ आश्रमाचे सुपरिंटेंडंट असतेवेळीं एकदा सौ. यशोदाबाई भट ही संस्था पहावयास गेल्या असतांना त्यांनीं मुद्दाम लिहिलेल्या लेखांत म्हटलें " मीं ही संस्था पाहिली, तेव्हां मला संस्थेला लागणाऱ्या खर्चापेक्षांसुद्धां त्या इतक्या मुलांना संभाळण्याच्या जोखमोबद्दल श्री. भोंसले यांचें कौतुक वाटलें. ते आम्हांला आश्रम दाखवीत असतांना कित्येक मुलें त्यांचे अंगाला प्रेमानें बिलगत. अहाहा ! केवढी बरें त्यांना ह्याबद्दल धन्यता वाटावी. कारण, लहान मुलांचे संरक्षक आईबाप त्यांना पारखीं झालेलीं तीं मुलें ! किंबहुना मातींत पुरलीं जाणारीं तीं पोरें, त्यांना न बिलगावीं तर कोणास ? लहान मुलांना जें प्रेमानें वागवील त्यांसच तीं प्रेमानें चिकटतात. परंतु अशा निराश्रित परक्यांच्या अज्ञान मुलांना सहानुभूतीनें वागविणें हें काम मात्र मोठ्या अंतःकरणाखेरीज होणें नाहीं."

## इमारत.

बालहत्याप्रतिबंधक गृह व अनाथ बालकाश्रम ह्या दोन्ही संस्थांस कायमचें गृह बांधून देण्यायें श्रेय प. वा. शेट चतुर्भुज मुरारजी ह्या येथील श्रीमान गृहस्थांस आहे. हल्लींची इमारत बांधण्यासाठीं त्यांनीं ११००० रुपये दिले. व ह्या देणगीचा उपयोग करून ज्या वेळीं दगडी इमारत बांधली गेली त्या वेळीं मध्यें मोठा दिवाणखाना, व

दोहों बाजूंस चार चार खोल्या, मागें पुढें दोन मोठाले ओटे होते. मागील बाजूस १८९१ सालीं बांधलेला पाण्याचा हौद आहे. हा हौद बांधण्याचा खर्च शेट लिलाधर शामजी ह्यांनीं दिला. वरील इमारतीच्या मागें १९१२ सालीं विधवांसाठीं ६ नवीन खोल्या बांधल्या. परंतु इमारतीचो जागा आतां मुळींच पुरत नाहीं. विधवांच्या रहावयाच्या जागे नजीकच्या मोकळ्या जागेत दोन नवीन हाल बांधण्यांत आले आहेत. तरी जागा पुरत नाहीं. म्हणून सुपरिंटेंडंटना रहाण्यासाठीं आर्फनेजच्या कांपाऊंडाजवळच एक घर भाड्यानें घेतलें असून तेथें कांहीं मुलगे व मुली ठेविल्या असून त्यांची व्यवस्था अगदीं निरनिराळी आहे. हल्लींच्या इमारतीचा पाया त्या वेळचे गव्हर्नरांनीं सन १८७८ सालीं घातला. व पुढील सालीं इमारत तयार झाली. पुढील आवाराभोंवतीं प्रथम भिंत नव्हती ती १८९६ सालीं प. वा. तुकाराम तात्या यांनीं आपले मित्र प. वा. नारायण महादेव परमानंद ह्यांच्या स्मरणार्थ बांधून दिली. आतां ही इमारत फार जुनी झाली आहे. तिच्या भिंतींना चिरा पडल्या आहेत व ती मोडकळीस आली आहे. त्याचप्रमाणें ही इमारत शहराच्या मध्यभागीं असल्यामुळें जरी कित्येक फायदे आहेत, तरी गैरफायदेही पुष्कळ आहेत. गांवांत कोणतीही सांथ उद्भवली कीं तिचा परिणाम ह्या संस्थांतील अर्भकांवर तत्काळ होतो व मृत्युसंख्या एकदम वाढूं लागते. हें लक्ष्यांत घेऊन, सांपत्तिक स्थिति असमाधानकारक असतांही, आर्फनेजच्या उत्तरेकडील बाजूस ज्या रस्त्यानें नित्य यात्रा येते त्या रस्त्यावर सुमारें ६ एकर जागा विकत घेतली आहे व येथें पुढें इमारती बांधल्या जाव्यात अशी इच्छा आहे. त्याचप्रमाणें, मुलें व मुली कांहीं वयानंतर शिक्षणासाठीं मुंबईस आणावीं असा विचार पुष्कळ दिवस चालू आहे. ज्या ठिकाणीं बालहत्या प्रतिबंधक गृह व तेथें येणाऱ्या बाया आहेत त्या ठिकाणीं ज्यांस समजूं उमजूं लागलें आहे अशीं मुलें ठेवणें हितकर नाहीं. हें जाणून मध्यंतरीं त्यांस पुण्यासारख्या मध्यवर्ती व शिक्षणाची सर्व सोयी असणाऱ्या ठिकाणीं आणून अनाथबालकाश्रमाची शाखा स्थापण्याचा विचार चालू होता.इतक्यांत मुंबईतील प्रसिद्ध कॉन्ट्राक्टर रा. रा. रामकृष्ण महादेव साळवी, जे. पी. यांनीं सुमारें १००० वार जागा विलेंपालें येथें आर्फनेजला बक्षिस दिली. रा. साळवी ह्यांच्या ह्या उदार देणगीमुळें अनाथ बालकाश्रमाच्या शाखेचा प्रश्न सुटला असें प्रथम मंडळीस वाटलें. परंतु त्या जागेच्या बाजूनें नव्या स्कीमप्रमाणें रस्ते होतील अशी जी आशा होती ती निष्फळ झाली व जागा आहे, परंतु तेथें जावयास रस्ता नाहीं अशी अडचण येऊन पडली ! म्हणून ज्या जागेला लागून रस्ता आहे

व ज्या जागेतून रा. साळवी ह्यांनीं बक्षिस दिलेल्या जागेकडे जातां येतें असा ९०० वार जागेचा तुकडा विकत घेतला असून ह्या दोन्ही जागा आतां एक केल्या असून ह्या साठाव्या वार्षिकोत्सवामध्यें विलेंपार्ले येथील आश्रमाच्या पायाचा दगड बसविण्यांत येणार आहे. परंतु आतां ह्या दोन्ही इमारतींच्या उभारणीचा मोठा काळजीचा प्रश्न समाजाच्या पुढें आहे. पूर्वी जेथें १० वर्षांपूर्वी **बारा हजार रुपये** खर्च होत होता व तेवढ्या रकमेंत दोन्ही संस्थांचा खर्च भागत होता तेथें आतां **बत्तीस हजार** रुपये पुरत नाहींत, ह्यावरून ह्या संस्थांची व त्याचप्रमाणें संस्थांसंबंधाच्या खर्चांत झालेली वाढ सहज लक्ष्यांत येण्यासारखी आहे. हल्लीं संस्थांना चौदा हजार रुपयांचें कर्जही आहे. मुलींच्या शिक्षणासाठीं पंढरपुरास सोयी नाहींत. त्यामुळें त्यांस मुंबईस अगर पुण्यास ठेवावें लागतें. मुंबईची शाखा चालू झाली म्हणजे शिक्षणाचा प्रश्न सुटेल.

## संस्थांसंबंधानें लोकमत.

बालहत्याप्रतिबंधक गृह व अनाथ बालकाश्रम ह्या संस्था सर्वस्वी लोकाश्रयावर अवलंबून आहेत, आणि सर्व पक्षांच्या व सर्व जातींच्या लोकांनीं व अनेक धर्मांच्या अनुयायांनीं आरंभापासून ह्या संस्थांस आश्रय दिलेला असून सर्वांनीं एकमतानें ह्या संस्थांसंबंधानें अनुकूल मत जाहीर केलें आहे. त्याचप्रमाणें संस्था पहावयास येणाऱ्या सर्व लहान थोर अधिकाऱ्यांनीं आपला झालेला अनुकूल ग्रह व्यक्त केला आहे. असे सर्व अभिप्राय सालोसालच्या रिपोर्टांमध्यें प्रसिद्ध होत आले आहेत. तथापि कांहीं अभिप्राय पुढें दिले आहेत. ह्या दोन्ही संस्थांना वाडिया चॅरिटीस मधून सालीना पांचशें रुपयांची देणगी मिळत असून चालू वर्षांपासून मुंबई सरकारनेंही सालिना पांचशें रुपयांची देणगी द्यावयास सुरुवात केली आहे. इतिहासाचीं हीं पानें तयार होत असतांना नामदार गव्हर्नर साहेब सर लेस्ली वुइल्सन ह्यांनीं स्वतः कृपावंत होऊन दोडशें रुपयांची देणगी संस्थेस दिल्याचें शुभ वर्तमान आलें. आजपर्यंत दोन प्रसंगीं इलाखाधिपति पंढरपुरास गेले असतां अनाथाश्रम व बालहत्याप्रतिबंधक गृहास भेट देण्याचा सुयोग आला होता. १९०६ च्या पूर्वी कोणाही इलाखाधिपतीनें आर्फनेज ह्या संस्थेसंबंधानें विचारपूस केल्याचें माहीत नाहीं. परंतु १९०६ सालीं लॉर्ड लॅमिंग्टन साहेब तेथें गेले असतां, त्यांना तेथें अधिक काळ रहावयास सवड नव्हती तरी त्यांतल्यात्यांत सवड काढून त्यांनीं संस्था पाहिली व "...it occurred to me to be answering

admirably its purpose" असा अभिप्राय कळविण्याची त्यांनीं कृपा केली. पुढें नऊ वर्षांनीं म्हणजे १९१५ सालीं लॉर्ड वुइलिंग्डन व त्यांची पत्नी यांनीं आश्रम व बालहत्याप्रतिबंधक गृह ह्या दोन्ही संस्थांस भेट दिली. त्या वेळीं त्यांचें स्वागत करण्यासाठीं प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष सर नारायण चंदावरकर तेथें मुद्दाम गेले होते. नामदार लार्ड विलिंग्डन व त्यांची पत्नी ह्यांस संस्था पाहून किती समाधान वाटलें तें त्यांनीं आपल्या अभिप्रायामध्यें व्यक्त केलें आहे. अभिप्रायांत ते म्हणतात:—

"I visited this Orphanage and was very much interested to find a home for young children where they can be and evidently are brought up to lead healthy useful lives. I was much impressed by the care and attention paid to these children of all ages and cordially wish the institution a long career of usefulness and charity."

नामदारांनीं स्वतः ह्या वेळीं शंभर रुपयांची देणगी दिलीच, परंतु वाडिया चॅरिटीझच्या ट्रस्टींकडून पांच हजार रुपये कोणत्यातरी परोपकारी संस्थांस वांटण्यासाठीं जे त्यांच्यापाशीं आले होते त्यांपैकीं एक हजार रुपये त्यांनीं ह्या संस्थांना दिले. त्याचप्रमाणें सर नारायण यांच्या तर्फे कोणा एका गृहस्थाकडून गव्हर्नर साहेबांच्या भेटीची आठवण म्हणून ह्या संस्थेसाठीं एक हजार रुपयांची देणगी मिळाली. अशा प्रकारें लार्ड विलिंग्डन ह्यांच्या भेटीच्या योगें ह्या संस्थांस लाभ होऊन इलाखाधिपतींना ह्या एका कोपऱ्यांत पडलेल्या संस्था कोणत्या प्रकारें काम करीत आहेत व अर्भकांचें संगोपन करणें हें किती बिकट काम आहे त्याची कल्पना झाली. हा ह्या संस्थांच्या दृष्टीनें मोठा लाभ झाला, तथापि पंढरपूरच्या म्युनिसिपालिटीनें फक्त एक वर्ष मात्र ह्या संस्थेला मदत केली, पण ती जणूं काय चूकच झाली असें वाटून ती चूक आतां सुधारण्यांत आली आहे! ह्या बाबतींत मि. मॅकॉनकी साहेब सोलापूरचे कलेक्टर असतांना त्यांनीं म्युनिसिपालिटीला हालविण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ! ह्या साहेबांनीं दोन वेळां आर्फनेज पाहिलें. पहिल्या वेळीं त्यांनीं जो अभिप्राय लिहून दिला तो असा होता:—

"आश्रम पाहिला. हिंदुस्थानांत अशा प्रकारची मी हीच पहिली संस्था पाहिली. दरमहा १७० रु. खर्च येत आहे (सन १८९८) व तो सर्व मुंबई प्रार्थनासमाजाकडूनच होत असतो. म्युनिसिपालिटी ह्या कामीं कांहींच मदत करीत नाहीं हें बरें नाहीं. अनाथ मुलांचा संभाळ करून त्यांना वाढविल्यानें व्यभिचारास उत्तेजन मिळतें असें म्युनिसिपालिटीस वाटत असेल असें मला वाटतें; पण ज्याअर्थी अशी संस्था असली किंवा नसली तरी व्यभिचार हा चालूच राहणार, त्याअर्थी आईबापांच्या दुराचारामुळें जीं निरपराधी मुलें निराधार झालेलीं असतात, त्यांची जोपासना करणें हें मोठें चांगलें व परोपकाराचें काम होय."

ह्यांच्याचप्रमाणें मेसर्स करटिस, मेडन, हॅच, माउंटफर्ड, बोनस, हूड, मेजर स्टीन, बालकराम, दनमोटा, वाच्छा, स्पेन्सर, त्याचप्रमाणें लो. मा. बाळ गंगाधर टिळक, सर विठ्ठलदास ठाकरसी, सर चिनूभाई माधवलाल, मुकुंदराव जयकर, सर चुनिलाल मेथा, डा. अजिंक्य, डा. म्हात्रे, चरणदास चतुरभूज, मोतिलाल चुनिलाल, बॅरिस्टर वेलिंकर, प्रिन्सिपाल भाटे, सोलापूर येथें डिस्ट्रिक्ट जज्ज असलेले मि. नानावटी, सोलापूरचे सिव्हिल सर्जन, डे. हेल्थ कमिशनर वगैरे गृहस्थांनीं त्याचप्रमाणें कित्येक स्त्रियांनीं ह्या संस्था पाहून कौतुक, आनंद, व आभार प्रदर्शित केले आहेत.

अनाथ बालकाश्रमाच्या कामीं सुधारणा करण्यास पुष्कळ जागा आहे ह्याची पूर्ण जागृति प्रार्थनासमाजास आहे, हें जेथें केवळ दाहा वर्षांपूर्वी सालिना बारा हजारांचा खर्च होता तेथें आज बत्तीस हजार खर्ची पडत आहेत यावरून लक्ष्यांत येण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें एकेक दोनदोन पैसे देणाऱ्या प्रेक्षकांकडून १७२५ रुपये एका वर्षांत जमा होणें ही गोष्टही लोकांतील संस्थेविषयीं वाढती जिज्ञासा व्यक्त करिते. परंतु केवळ उत्तम अभिप्राय मिळाल्यानें, अगर हजारों लोकांच्या नजरेखालून आमचें काम गेल्यानें भागत नाहीं. उत्तम अभिप्राय व पुष्कळ लोकांनीं आम्ही काय करीत आहों हें पहाणें जरूर आहेच. पण, हें कार्य चालविण्यास पुरेसें द्रव्यसाहाय्य मिळालें पाहिजे. आज आश्रमाची इमारत जुनी झाली आहे ही गोष्ट प्रार्थनासमाज जाणून आहे. पण, सोईवार जागा लक्ष्यांत येतांच, ती विकत घेण्यापेक्षां समाजास अधिक कांहीं करतां येत नाहीं. विलेंपारलें येथें सोईवार इमारतीचे प्लॅनही तयार आहेत, पण दात्यांची वाट पहात बसावें लागत आहे. करितां, प्राण वांचविण्याचें व वांचविलेल्या अर्भकांचें संगोपन करणें

हें पुण्यकार्य आहे असें ज्यांस वाटत आहे, त्यांनीं उदारहस्तें द्रव्यसाहाय्य करून हें देवाचें कार्य अधिक उत्साहानें करवून घ्यावें एवढीच विनंति आहे.

**अनाथबालकाश्रमाचे नियम.**

१ या आश्रमाची सर्व व्यवस्था व जबाबदारी मुंबई प्रार्थनासमाजाकडे आहे.

२ आश्रमामध्यें ज्यांचे आईबाप अगर कोणी नातलग नाहींत, अशा अनाथ मुलांस घेतलें जाईल. मात्र तीं वयानें सोळा वर्षांच्या आंत असावींत. मुंबई प्रार्थनासमाजास जितकीं मुलें पोसण्याचें सामर्थ्य असेल, तितकी संख्या पुरी झाली म्हणजे अधिक मुलें नाकारण्याचा अधिकार समाजास आहे.

३ दहा वर्षांचे वर एकादें मूल उनाड निघालें आणि त्याच्या संगतीनें इतर मुलें बिघडण्याचा संभव असला, तर त्यास आश्रमामधून कमिटीच्या सल्लयानें काढून टाकण्याचा अधिकार सुपरिंटेंडेंट यांस आहे.

४ आश्रमांतील कोणताही मुलगा २१ वर्षांचा झाला म्हणजे त्यास आश्रम सोडावा लागेल. मुलगी स्वतंत्र रीतीनें आपला उदरनिर्वाह करण्यास समर्थ होई-पर्यंत व्यवस्थापकांच्या ताब्यांत राहील.

**सूचना**—आश्रमांतील अगर आश्रमासंबंधीं कोणत्याही प्रकारची सूचना अगर तक्रार कोणासही करणें असेल तर ती मुंबई प्रार्थनासमाजाचे सेक्रेटरी यांजकडे पत्रद्वारें करावी, अगर आफिसमध्यें ठेविलेल्या व्हिजिटर्सच्या बुकांत नोंद करावी.

५ येथून कोणास मुलें पाहिजे असतील त्यांनीं मुंबई प्रार्थनासमाजाकडे आपल्या सर्व माहितीसह अर्ज करावा.

६ सदरहु नियमांत फेरफार करणें व नवीन नियम करणें याबद्दल अधिकार **मुंबई प्रार्थनासमाजासच** आहे.

---

# राममोहन इंग्लिश स्कूल

व

## सर नारायण चंदावरकर प्राथमिक शाळा.

प्रार्थनासमाजाचा पन्नासावा वार्षिकोत्सव १९१७ सालीं साजरा झाला. ह्या पन्नासाव्या उत्सवाच्या वेळीं समाजाचे खजिनदार असलेले व नंतर समाजाचे चिटणीस झालेले आमचे बंधु रा. रा. गिरिजाशंकर त्रिवेदी ह्यांच्या मनांत असा

विचार आला कीं, प्रार्थनासमाजाची स्थापना होऊन आतां अर्धशतक झालें, पण तेवढया अवधींत प्रार्थनासमाजाचे पुढारी जरी राष्ट्रोन्नतीच्या सर्व कार्यांत पुढाकार घेऊन मार्गदर्शक झाले होते, तरी त्यांनीं नमुनेदार शिक्षणसंस्था काढून, आपल्या श्रेष्ठ ध्येयानुसार शिक्षण देण्याचा अद्याप प्रयत्न केलेला नाहीं. बंगाल्यांत साधारण-ब्राम्हसमाजाचे पुढारी अनेक शिक्षण संस्था चालवीत आहेत. आणि आपल्या प्रांतीं एखादी नमुनेदार शिक्षणसंस्था समाजाच्या मंडळीनें चालवून दाखविण्याचा हल्लींचा काळ आहे हें लक्षांत घेऊन समाजाची शाळा स्थापिली जावी असें त्यांच्या मनानें घेतलें व ह्या कार्यासाठीं फंड वगैरे जमविण्याच्या भानगडींत न पडतां प्रार्थनासमाजाच्या पन्नास वर्षांच्या स्मरणार्थ एक इंग्रजी शाळा स्थापण्यासाठीं त्यांनीं पांच हजार रुपये समाजाच्या व्यवस्थापक मंडळीच्या स्वाधीन केले. रा. रा. त्रिवेदी ह्यांच्या दृष्टीपुढें आणखी एक विचार होता. प्रार्थनासमाजांतील कांहीं तरुणांचें उच्च शिक्षण पूर्ण झालें होतें. हे तरुण लहानपणापासून प्रार्थनासमाजामध्यें वाढले होते; प्रार्थनासमाजाच्या ध्येयाची त्यांस चांगली ओळख झाली होती, त्या ध्येयानुसार वागणें म्हणजे काय हें ते जाणत होते; अशा ह्या आपल्याच समाजांतील तरुणांच्या हातीं मुलांचें शिक्षण देऊन त्यांच्या करवीं समाजध्येयानुसार नवी पिढी तयार व्हावी हें अत्यंत इष्ट आहे. खरें पहातां मुलांना शाळेमध्यें उठल्या सुटल्या धर्मशिक्षण देण्याची जरूरीही नाहीं. शिक्षकांचें शील, शिक्षकांचें वर्तन, शिक्षकांचे विचार, फार काय, शिक्षकांची भाषा, शिक्षकांचें मुलांशीं व इतर शिक्षकांशीं वर्तन यांचा मुलांच्या मनावर जो परिणाम होत असतो तो तास अर्धातास मिळणाऱ्या धर्मशिक्षणाच्या परिणामाहून अधिक महत्त्वाचा असतो. ह्यासाठीं चारित्र्यवान् शिक्षकांच्या हातून आपली शाळा चालली जावी अशीही त्यांची कल्पना होती. त्यांच्या देणगीचा प्रार्थनासमाजानें मोठ्या आनंदानें स्वीकार केला व राममोहन आश्रमामध्यें स्थापन होणाऱ्या शाळेला **राममोहन इंग्लिश स्कूल** असें नांव देण्याचें ठरून जून १९१७ मध्यें शाळेच्या कामास प्रारंभ झाला. एकदम सर्व वर्ग सुरू करणें इष्ट व शक्य नसल्यामुळें पहिल्या तीन इयत्ताच प्रथम सुरू करून नंतर दर वर्षी एकेक वर्ग वाढवावा असें ठरलें. रा. देवदत्त विठ्ठल श्रीखंडे, बी. ए. हेडमास्तर व रा. रा. बळवंत गंगाधर गद्रे बी. ए. व कु. कृष्णाबाई जव्हेरे ह्यांस शिक्षक नेमण्यांत आलें. प्रथमपासून ह्या शाळेंत मुलगे व मुली ह्यांचें शिक्षण एकत्र करावयाचें असें ध्येय ठेवण्यांत आलें. त्याचप्रमाणें धर्मशिक्षणाची हेळसांड

बहुतेक सर्व शाळांतून होत असते; परंतु मुलांना धर्मांच्या श्रेष्ठ तत्त्वांची त्यांचें शिक्षण चालू असतांनाच ओळख होणें अत्यंत अगत्याचें आहे असें वाटून ह्या शाळेंत धर्मशिक्षणाची योजना प्रारंभापासून अमलांत आणिली. पहिल्या वर्षी शाळेचें सामान तयार करण्यासाठीं माडगांवकर कुटुंबाकडून प. वा. दीनानाथराव माडगांवकर ह्यांच्या स्मरणार्थ ६०० रुपयांची देणगी मिळाली व नंतर पहिल्या वर्षांच्या अखेरीस जें जवळजवळ एक हजार रुपयांचें नुकसान झालें तेंही वरील कुटुंबाकडून मिळालेल्या नव्या देणगीमुळें भरून निघालें. पुढें दरवर्षी एकेक वर्ग वाढवीत जाऊन १९२२ सालीं इंग्रजी सातही यत्ता शिकविण्याची व्यवस्था शाळेंत झाली. मध्यंतरीं १९२१ सालीं रा. रा. वामनराव सोहोनी हे डिप्रेस्ड क्लासेस मिशनशीं असलेला संबंध सोडणार असें कळतांच आपल्या शाळेला त्यांच्या अनुभवाचा व शिस्तीचा फायदा मिळाला पाहिजे असें वाटून त्यांस राममोहन स्कूलचें सुपरिंटेंडंट नेमण्यांत आलें. शाळेची सुरुवात ज्या वेळीं झाली त्या वेळापासून नेमलेले हेडमास्तर रा. देवदत्त श्रीखंडे व रा. सोहोनी ह्यांनीं शाळेची सर्वांगीण सुधारणा केली व शाळेच्या विद्यमानें अनेक संस्था चालू केल्या. शाळा स्थापन होऊन एक वर्ष झालें नाहीं तोंच शाळेला आश्रमाची जागा पुरेनाशी झाली व नवीन वर्गांची व वाढत्या शाळेची व्यवस्था कशी करावी ही काळजी उत्पन्न झाली. अखेरीस जुन्या मंदिरावर एक मजला उभारावा हा विचार कायम होऊन वर्गणीचे आंकडे मिळविण्याची खटपट सुरू झाली व प्रथम समाजाच्या पुढारी सभासदांनीं मोठे आंकडे घातले व त्यांनींच जिवापाड श्रम करून पैसे मिळविले व म्हणूनच पूर्वीच्या मंदिरावर हल्लीं असलेला सुंदर मजला झाला. वर मजला देणें हें सुलभ काय नव्हतें. कारण, पूर्वीचें काम तसेंच ठेवून वर मजला चढविणें अशक्य होतें. म्हणून प्रथम मंदिराच्या भागामध्यें कांक्रीटचे मोठमोठे खांब देऊन त्यांच्या आधारावर वर मजला चढवितां आला. एकंदर खर्च बावन हजार रुपये झाला असून अद्याप नऊ हजार रुपये कर्ज आहे. सर नारायण चंदावरकर व रा. रा. सत्यवंत वासुदेव नवरंगे ह्यांनीं प्रत्येकीं पांच हजार रुपये उसने दिल्यामुळें इमारत लवकर पूर्ण करणें शक्य झालें. नव्या मजल्याच्या कामास आगष्ट १९२१ मध्यें सुरुवात होऊन १९२२ च्या डिसेंबर महिन्यांत काम पूर्ण झालें. वरच्या मजल्यावर ४ मोठ्या खोल्या केल्या असून सुमारें १५० मुलांची सोय झाली आहे. ह्या नव्या मंदिराचा प्रवेश समारंभ सर नारायण चंदावरकर यांच्या अध्यक्षतेखालीं ता. १६ मार्च १९२३ रोजीं झाला. ह्या इमा-

रतीचें काम चालू असतांना रा. बळवंतराव माडगांवकर ह्यांनीं विशेष मेहनत घेतली व त्यांच्याच खटपटीमुळें एन्जीनीअर मि. गोभाई ह्यांनीं सर्व कामावरील देखरेख कांहींही वेतन न घेतां केली ह्याबद्दल वरील दिवशीं प्रवेशसमारंभाच्या वेळीं, परमेश्वराची प्रार्थना केल्यानंतर, सर नारायण चंदावरकर ह्यांनीं मि. गोभाई ह्यांचे मनःपूर्वक आभार मानले. ह्या नवीन मजल्यासाठीं मिळालेल्या वर्गणीचे आंकडे शेवटीं परिशिष्टामध्यें जोडले आहेत त्यांवरून मंदिर उभारतांना जो अनुभव आला तोच अनुभव ह्या वेळींही आला असें दिसून येईल. वर्गणी जमविण्याच्या कामीं सर नारायण चंदावरकर, बळवंतराव माडगांवकर, बाबण बापू कोरगांवकर व रा. जनार्दन गंगाधर गद्रे, ह्यांनीं विशेष खटपट केली म्हणून इतके मोठमोठे आंकडे पडले व वर्गणी जमली. रा. माडगांवकर व कोरगांवकर ह्या दोघांस ह्या नवीन इमारतीच्या कामाचे चिटणीस नेमलें होतें. परमेश्वराच्या कृपेनें हें मोठें काम तडीस तर गेलें. आतां जें कर्ज राहिलें आहे त्याची फेड करण्याच्य कामींही पुन्हा एकवार खटपट करणें जरूर आहे.

राममोहन स्कूलची दिवसेंदिवस भरभराट होत आहे. इतर शाळांप्रमाणें ह्या शाळेंतही डिबेटिंग सोसायटी, शाळेची लायब्ररी वगैरे आहेच. राममोहन स्कूलची स्काऊट ट्रुप व गाइडस् कंपनी आहे. त्याचप्रमाणें आतां लहान मुलांचा वुल्फ कब पॅक जमविला आहे. गाईडस् कंपनी कु. कृष्णाबाई जव्हेरे त्यांच्या देखरेखीखालीं चालत असून त्या आतां कॅप्टनची परीक्षा पास झालेल्या आहेत. हिंदु गाइडस् मध्यें कॅप्टनची परीक्षा त्या प्रथमच पास झालेल्या आहेत. हें सर्व होत असतांना खालपासून वरच्या वर्गांतील नित्याच्या अभ्यासाची हेळसांड होऊं नये याविषयीं खबरदारी घेण्यांत येते. १९२३ सालापासून युनिव्हर्सिटीच्या परीक्षेस विद्यार्थी पाठविण्यास सुरुवात झाली आहे. गेल्या वर्षी १३ मुलांतील ९ मुलें पास झालीं. आजपर्यंत एकंदर जीं तेवीस मुलें युनिव्हर्सिटीची परीक्षा पास झालीं त्यांत ९ मुली आहेत. राममोहन स्कूलमध्यें इतर शाळांपेक्षां विशेष काय आहे, त्याचा उल्लेख एका रिपोर्टामध्यें केला आहे तो असाः—

*What our school stands for ?*—Like all similar schools in Bombay our school aims at preparing students for the University and other examinations, but it also aims higher. Its aim is the personal development of its pupils, and with a view to achieve

this object we pay careful attention to the requirements of our pupils individually. Moral and religious instruction of an unsectarian character is given daily for the first fifteen minutes of the school. Parents are frequently kept informed of the progress of their children. The subjects, they may be weak in and which therefore require special attention, are brought to the notice of guardians. Any physical defects such as short or weak eyesight, minor bodily ailments are at once brought to their notice and remedies suggested. We encourage boys and girls to join the Scout Troop and Guides Company, so that the students may develop initiative and resourcefulness. They are encouraged to take active part in sports and the work of the Debating Societies. Parents are invited to see us even on holidays and in time out of school hours, as may be convenient to them. We have reason to believe that our attempts in these directions are appreciated, but not as much as the interest of the students demands they should be. In spite of all that we do, the fact remains that many parents are not yet in touch with us. It may be that the exigencies of the life of the middle classes of Bombay, from among whom most of our students come, are responsible for the unresponsiveness of parents.

शाळेला ज्या मोठ्या देणग्या मिळत असतात त्यांचा येथें उल्लेख करणें जरूर आहे. सर नारायण चंदावरकर ह्यांच्या नांवें त्यांचे चिरंजीव दरमहा पांच रुपयांच्या चार स्कालरशिप्स अस्पृश्य वर्गातील विद्यार्थ्यांसाठीं देत असतात. प. वा. वामनराव नवरंगे ह्यांचे स्मरणार्थ नवरंगे कुटुंबाकडून १० हजार रुपयांची जी देणगी

मिळाली आहे तिच्या व्याजापैकीं दरसाल ३५० रु. च्या स्कालरशिप्स व बक्षिसें देण्याकडे विनियोग होत असतो. त्याचप्रमाणें प. वा. गणेश नारायण देवल ह्यांच्या नांवें श्री. सीताबाई देवल दरमहा ५ रुपयांची एक स्कालरशिप देत असतात. तसेंच प. वा. भास्करराव कुडाळकर ह्यांच्या स्मरणार्थ दरसाल पांच रुपयांचें बक्षिस मिळण्याची व्यवस्था त्यांच्या चिरंजीवांनीं केली आहे. त्याच प्रमाणें प. वा. शेट दामोदरदास ह्यांच्या नांवें एक बक्षिस देण्याची व्यवस्था त्यांच्या एका चहात्यानें केली आहे.

राममोहन इंग्लिश स्कूलचा हा त्रोटक इतिहास संपवितांना येथें एका गोष्टीचा विशेष उल्लेख केला पाहिजे. ही शाळा स्थापन झाल्यापासून गेल्या वर्षाच्या अखेरपर्यंत रा. रा. देवदत्त विठ्ठल श्रीखंडे ह्यांचा हेडमास्तर या नात्यानें शाळेशीं संबंध होता तो दक्षिण हैद्राबाद येथें ते रहावयास गेल्यामुळें आतां कायमचा सुटला आहे. रा. श्रीखंडे हे उत्तम शिक्षक होते. आपलें ह्रद्गत मुलांस कळविण्याची हातोटी त्यांस उत्तम साधली होती. सेंट झेविअर हायस्कूल व कॉलेजमध्यें फ्रेंचभाषेचें व इतर शिक्षण देण्यांत त्यांचा हातखंडा असे. तेथील त्यांच्या अनुभवाचा राममोहन स्कूलच्या विद्यार्थ्यांना दहा वर्षें फायदा मिळाला. प्रथमपासून शाळेच्या ऊर्जितावस्थेसाठीं व आपलें उच्च ध्येय कायम ठेवण्यासाठीं त्यांनीं अत्यंत परिश्रम केले. त्यांचा मुलांना दराराही असे व त्यांचें मुलांवर प्रेमही असे. योग्य वेळीं मुलांशीं मिळून मिसळून ते वागत, त्याचप्रमाणें वेळ येतांच मुलांना हे आपले हेड मास्तर आहेत याची जाणीव होत असे. त्यांचा प्रथमपासूनचा शाळेशीं असलेला संबंध सुटल्यामुळें शाळेचें मोठें नुकसान झालें आहे. त्यांच्या जागीं कमिटीनें आतां रा. रा. शंकर विष्णु फडणीस, बी. ए. ह्यांना हेडमास्तर नेमिलें आहे. हल्लीं शाळेंत सहा पदवीधर शिक्षक आहेत व त्यांपैकीं रा. इंगळे सायन्स टीचर ह्यांस गतवर्षी स्कूल लीव्हींग परीक्षेच्या बोर्डानें परीक्षक नेमलें होतें.

**सर नारायण चंदावरकर प्राथमिक शाळा**—राममोहन स्कूलचें पहिलें वर्ष संपल्यानंतर चालकांस एका गोष्टीचा कटु अनुभव येऊं लागला. तो असा कीं, पहिले इयत्तेंत मुलांचें दाखल होणें त्या त्या मुलांच्या पालकांच्या इच्छेवरच केवळ अवलंबून नसतें ! मराठी शाळांचे हेडमास्तर इंग्रजी शाळांचीं नांवें सुचवितात व तेथें बहुतकरून आपल्या मुलांचा भरणा पालक करितात. दुसरी अडचण आपल्याला हवीं त्या प्रकारचीं मुलें नेहमीं मिळतातच असें नाहीं. मुलें दुसऱ्या शाळांत शिकत असल्यामुळें त्यांच्या शिक्षणांत कांहीं सुधारणा करितां येत

नाहीं. याला उपाय म्हणजे स्वतःची प्राथमिक शाळाही असणें. पण तो योगायोग सहज जुळून येणारा नव्हे. राममोहन स्कूलसाठींच जेथें जागा अधिक हवी होती तेथें प्राथमिक शाळेची भर कशी घालावयाची असा विचार पुढें येत असे. इतक्यांत न्यू बाळशिक्षण शाळेचे उत्पादक व मालक रा. रा. नागेश जिवाजी निमकर हे आपल्या शाळेसंबंधानें काळजींत असल्याचें कळलें. ज्या इमारतींत शाळा भरत असे त्या इमारतींतून इंप्रुव्हमेंट ट्रस्टच्या कृपेमुळें त्यांस शाळा काढावी लागली. नंतर ते एक मंडप घालून तेथें शाळा भरवीत असत. त्यांच्या शाळेला समाजानें जागा दिली नसती तर शाळा बंद पडली असती. हें पाहून समाजानें शाळेस जागा दिली व आतां तीस सर नारायण चंदावरकर प्राथमिक शाळा असें नांव दिलें आहे. ज्या वेळीं शाळा ताब्यांत घेतली तेव्हां तींत ६० मुलें होतीं. आतां आणखी शंभरावर मुलें आलीं असून अधिक मुलांस बसवावयास जागा नाहीं म्हणून शाळेंत घेतां येत नाहींत. समाजाच्या दोन्ही बाजूंच्या ग्यालऱ्या व मंदिराचा पुढील भाग ह्या प्राथमिक शाळांच्या वर्गांसाठीं वापरण्यांत येत असतो. ह्या शाळेंतही मुलगे व मुली घेण्याची पूर्वीपासून रा. निमकरांची वहिवाट होती ती अर्थातच कायम ठेविली आहे. ह्या शाळेंतील विद्यार्थ्यांसाठीं दरसाल ३५ रुपये किमतीचीं बक्षिसें देण्यासाठीं ७ टक्के व्याजाच्या रु. पांचशेंच्या नोटा डा. काशीबाई नवरंगे ह्यांनीं सर नारायण चंदावरकर ह्यांच्या स्मरणार्थ दिल्या आहेत. ह्या उदार देणगीबद्दल डा. काशीबाई ह्यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच. ही शाळा नमुनेदार करण्याचे प्रयत्न हळुहळु चालले आहेत व लवकरच चालकांच्या प्रयत्नांस यश येईल अशी उमेद आहे.

# साप्ताहिक ईश्वरोपासना.

" देवास अनन्यभावें शरण गेलें असतां, तोच एक माझा त्राता, माझा सखा असा विश्वास ठेवून त्याची भक्ति केली, त्याचें सप्रेम ध्यान केलें, त्याचें जें अचिंतनीय वैभव, अतर्क्य माहात्म्य, जी दुरधिगम लीला, आणि जो असीम आनंद, हीं सर्व विश्वामध्यें नांदत आहेत त्यांचें स्पष्ट चित्र अंतःकरणापुढें ठेविलें म्हणजे शांत विमल असा आनंद आपल्या अंतःकरणास होतो ही अनुभवाची गोष्ट आहे."

—डॉ. भांडारकर.

---o---

प्रार्थनासमाजानें अनेक कार्यें हातीं घेतलीं, अनेक कार्यें पूर्ण केलीं, आजही अनेक कार्यें त्याच्या हातून कमीअधिक प्रमाणानें होत आहेत. परंतु स्थापनेच्या काळापासून सतत साठ वर्षें जें कार्य चाललें आहे व ज्यांत केव्हांही खंड पडलेला नाहीं असें कार्य म्हणजे मंदिरांतील साप्ताहिक उपासना होत. ह्या उपासना आठवड्यांतून एकदाच व्हाव्यात असा नियम नाहीं. परंतु प्रतिसप्ताहीं निदान एक वेळ तरी उपासना झालीच पाहिजे असा मात्र नियम आहे व प्रार्थनासमाजमंदिराच्या उद्देशपत्रकामध्यें त्याचा स्पष्ट उल्लेख * केलेला आहे. तथापि प्रार्थनामंदिरामध्यें पूर्वी आठवड्यांतून तीनदां व प्रतिदिवशींही उपासना होत असत. गुरुवर्य डा. भांडारकरांच्या एका व्याख्यानांत " सुमारें पंधरा वर्षामागें (१८९७ सालांतील हे उद्गार आहेत.) प्रति सप्ताहीं एकदां कधीं दोन तीनदां या मंदिरांत प्रार्थना व उपासना करण्याचा ज्याचा प्रघात होता " † असा स्वतां ते ज्या उपासना चालवीत असत त्यासंबंधानें उल्लेख आढळतो. तरी केवळ साप्ताहिक उपासना जरी घेतल्या तरी ता. २९ मार्च १९२७ ह्या दिवशीं उत्सवांतील व इतर उपासना हिशेबांत घेतल्यास कमींत कमी चार हजार प्रसंगीं ईश्वरोपासनेसाठीं ह्या ठिकाणीं प्रार्थनासमाजाचे सभासद व इतर लोक जमले असा हिशेब निघतो व याचा उल्लेख गतवर्षीच रा. रा. नटराजन् ह्यांनीं आपल्या धर्मपर व्याख्यानांत केलाही होता. गेलीं ४ वर्षें दर रविवारीं सकाळींही मंदिरांत ईश्वरोपासान होत असते व ती बहुतकरून समाजाचे सेक्रेटरी रा. रा. य. वा. भांडा-

---

* प्रार्थनामंदिर प्रकरण पृ. १०५ पहावें.

† प. वा. वामनराव मोडक ह्यांच्या मृत्यूनंतर दिलेलें " तरुणांचें धर्मसंबंधानें कर्तव्य " हें व्याख्यान पहा.

रकर चालवीत असतात. इतकें ईश्वरोपासनेस समाजाच्या संस्थापकांनीं महत्त्व कां दिलें त्याचें थोडेंसें येथें विवेचन करणें अवश्य आहे.

"देवाची उपासना म्हणजे मंत्रतंत्राचा उपयोग करणें, किंवा हटयोग्याप्रमाणें देवाचें नुसतें ध्यान करीत बसणेंही नव्हे. देवाच्या ठायीं पूज्यबुद्धि व परम प्रेम ठेवणें, म्हणजे त्याची भक्ति करणें, भक्तीनें त्याचें भजन, ध्यान करणें, सत्यास व धर्मासच अनुसरून आपली वृत्ति आणि आचरण ठेवून, त्याचें सत्य स्वरूप व धर्मस्वरूप आपल्या अंतःकरणांत विकसित करणें, यावत् मनुष्य आणि इतर प्राणी यांजविषयीं प्रेम आपल्या हृदयांत स्थिर करून आणि त्यास अनुसरून त्यांचें कल्याण करण्याविषयीं झटून देवाचें प्रेमस्वरूप आपल्या अंतःकरणांत विकसित करणें, त्याची इच्छा सर्व गोष्टींमध्यें प्रमाण धरून, आपली एकीकडे सोडून देऊन, स्वात्मा त्याजला समर्पण करणें, ही देवाची उपासना."* आतां ह्या उपासनेसंबंधानें आपण असें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, देव सर्वसमर्थ आहे, त्याच्यावर आपण अवलंबून आहों, तो आमचा कल्याणकर्ता असा विश्वास उत्पन्न होऊन त्याजविषयीं प्रेम आणि पूज्यत्वबुद्धि अंतःकरणांत सहज उदित होतात. मग प्रेमाचा विषय जो आपला कल्याणकर्ता, त्याच्या सन्निध जावें, पूज्यबुद्धि ज्याविषयीं आहे, त्याजपुढें आपला आत्मा अत्यंत नम्र करावा, असे भाव अंतःकरणांत उत्पन्न होऊन मनुष्य देवाचें भजनपूजन करावयास लागतो. असा शुद्ध भजनपूजनाचा मार्ग प्रार्थनासमाज प्रचारांत आणण्याचा प्रयत्न करीत असतां, त्याच्या कार्यासंबंधानें प्रत्यक्ष माहिती न मिळवितां, त्याच्यासंबंधानें लोकांमध्यें नाना प्रकारचे गैरसमज मात्र पसरलेले आहेत. त्यांपैकींच एक मोठा गैरसमज असा आहे कीं, इंग्रजी विद्येचा प्रथम येथें प्रसार झाल्यानंतर साहेबांचें अनुकरण करण्यासाठीं स्थापन झालेली संस्था म्हणजे प्रार्थनासमाज.† परंतु हा समज सर्वथैव चुकीचा आहे. कारण, गुरुवर्य डॉ. भांडारकरांनीं असें स्पष्ट दाखवून दिलें आहे कीं, प्रार्थनासमाजाची स्थापना मुळीं जी झाली ती "आरंभीं पाश्चात्यांच्या मार्गें आणि इंग्रजी विद्येच्यायोगें, चालू जीं धर्ममतें आणि धर्माचार यांविषयीं अश्रद्धा उत्पन्न झाली. मिल्ल आणि स्पेन्सर ह्यांच्या ग्रंथांच्या अध्ययनानें अज्ञेयतावाद आणि नास्तिकता फैलावूं लागली. असाच प्रकार चालत राहून कोणत्याच गोष्टीविषयीं 'श्रद्धा नाहीं' असें झालें असतां परिणाम अत्यंत अनिष्ट होईल. सद्वृत्ति आणि सदाचार यांचीं मुळें जळून जातील, विषयोपभोग

---

* डॉ. भांडारकर. † ह्याच ग्रंथाचें पृष्ठ ४६ व त्याचप्रमाणें प्रा. शांताराम अनंत देसाई ह्यांनीं लिहिलेला निबंध "ब्राह्मधर्म व वैदिकधर्म" पहा.

हेंच काय तें एक श्रेय होईल," असें कित्येक मंडळीस वाटून, हे परिणाम टाळण्यासाठीं "देवाच्या अस्तित्वाचा ह्या विश्वामध्यें चोहींकडे मनुष्यास अनुभव येऊं लागला, म्हणजे जिकडे तिकडे तो देवास पहातो. अशी त्याची स्थिति झाली म्हणजे त्याला अत्यंत शांति प्राप्त होते. देवाच्या दर्शनानें म्हणजे समागमानें शांतिरूप सुख प्राप्त होतें. असें झाल्यानें मनुष्य सर्व बंधनांतून विमुक्त होतो, आणि त्याचा आत्मा अत्यंत शुद्ध होतो. अशा प्रकारें दुःखें निरस्त होऊन सुखप्राप्ति करून देणारा व अंतःकरण पवित्र करणारा जो देवाचा समागम" त्याची गोडी आपणास लागावी एतदर्थ साप्ताहिक उपासना स्थापित झाली. वास्तविक पहातां इतके लाभ होण्यासाठीं आठवड्यांतून एकदां सर्वांनीं मिळून परमेश्वराशीं समागम करणें पुरेसें नाहीं. म्हणून प्रत्येक व्यक्तीनें करावयाची उपासना व सामाजिक उपासना करण्यापासून दुसरे अनेक लाभ आहेत. मनुष्य एकटा बसून स्वतःविषयीं विचार करूं लागला, म्हणजे तो आध्यात्मिक उन्नतीच्या बाबतींत स्वार्थपर होण्याचा संभव असतो. उन्नतीच्या बाबतींतही स्वार्थपरता घातक आहे. व्यक्तिमात्रावर इतरांच्या उन्नतीचीही जबाबदारी आहे. सर्वांनीं एक आकांक्षा मनांत धरून एकत्र होणें; सर्वांच्या कल्याणाची दिशा एक आहे असा जागृत भाव मनांत असणें; ह्या गोष्टींचा मनुष्याच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम होतो. अशा प्रकारें एक ध्येय असणारीं माणसें जितकीं वारंवार एकत्र होतील व एकमेकांच्या विचारांचा व संगतीचा परस्परांवर परिणाम करितील, तितकें तें इष्ट आहे हें जाणून सामाजिक उपासनेस महत्त्व प्राप्त झालें. "परमेश्वरासंबंधानें शाब्दिक ज्ञान आनुभविक व्हावें एतदर्थ, त्याची नियमानें वेळोवेळीं आराधना करणें, भजन करणें, त्याचें नाम आणि त्याचा प्रभाव गाणें, त्याच्या स्वरूपाचें एकांतीं ध्यान करीत बसणें, आपल्या अंतःकरणाची वारंवार परीक्षा करणें, आणि दोष दिसतील त्यांचें निवारण करण्यासाठीं निष्कपटभावानें यत्न करणें, आपलें ऐहिक अहित झालें तरी सत्यासच अनुसरून आचरण करण्याविषयीं झटणें, इत्यादि अनेक उपाय आहेत." परंतु पुष्कळ वेळां असा अनुभव येतो कीं, "ध्यान करीत बसलें असतां, अंतःकरणापुढें देवाचें उन्नत स्वरूप उभें रहावें तें न राहतां, आपले ऐहिक विषयच पुढें स्फुरतात आणि यत्नेंकरून ते मनांतून घालविले तर हृदयापुढें केवळ शून्य दिसतें." तर "भजनप्रार्थनेच्या वेळीं परमेश्वराचें स्वरूप आविर्भूत व्हावें आणि सर्वत्र परमेश्वर दिसून वृत्ति तन्मय व्हावी, ध्यान करीत असतां परमेश्वरच हृदयापुढें स्फुरावा आणि चंचळ

मनास स्थिर करून, परमेश्वराच्या ठायीं दृढतेनें संलग्न करण्याचा दुसरा उपाय सत्संगति हा आहे," हें ध्यानांत वागवूनही सामाजिक उपासनेस महत्त्व प्राप्त झालें. उपासनेचें महत्त्व एकदां लक्षांत आलें व उपासनेची अभिरुची उत्पन्न झाली, म्हणजे मग उपासनेच्या फलाची वाट पहावी लागत नाहीं. उपासना हेंच उपासनेचें फळ अशी मनाची वृत्ति होते. एकदां महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर ह्यांनीं स्वतःचा अनुभव निवेदन करितांना सांगितलें कीं, "या क्षणीं परमेश्वर प्रत्यक्ष प्रकट झाला आहे. या क्षणीं आम्ही त्याच्या छायेखालीं राहून, आमच्या अंतःकरणांतील सर्व शोक, ताप विसरून गेलों आहों, याप्रकारें जेव्हां त्याच्या अमृतस्वरूपाचा सहवास आपणास घडतो तेव्हां त्या सहवासाचें फळ तत्काळ प्राप्त होतें. हें प्रत्यक्ष फल; याची वाट पाहावी लागत नाहीं. त्याच्या उपासनेचें फळ उपासना करतांनाच प्राप्त होतें. या क्षणीं चोहोंकडून आम्हांस आनंद प्राप्त होत आहे. तो जसा प्रत्यक्ष प्रकट होतो, तसें तो प्रत्यक्ष फलही देतो. तें फल पुढें प्राप्त होईल अशी वाट पहावी लागत नाहीं."†

प्रार्थनामंदिरांत ज्या साप्ताहिक उपासना होत असतात त्यांची पद्धत साधारणपणें ठरलेली आहे हें उपासनांस हजर राहणारांस अनुभवानें माहित आहेच. परंतु ही जी ठरलेली पद्धत ती पूर्वीपासून तशी नव्हती हें स्थापनेच्या वेळच्या वर्णनामध्यें आलेंच आहे.* स्थूल मानानें सामाजिक उपासनेचे साहा भाग

---

† न्या. मू. रानडे ह्यांच्या उपासना अत्यंत प्रेमळ व लाभदायक होत असत, हें त्या उपासना ज्यांनीं अनुभविल्या आहेत त्यांस स्वानुभवानें माहीत आहेच. एकंदर सर्व उपासना ऐकून मनावर जो परिणाम होत असे त्याचें सुंदर व हृदयस्पर्शी वर्णन श्री. रमाबाईंनीं धर्मपर व्याख्यानांच्या प्रस्तावनेंत असें केलें आहेः—

"मुंबईस प्रार्थनामंदिरांत उपासना चालविण्याचे जेव्हां जेव्हां प्रसंग येत, त्या वेळीं एकदां त्या प्रेममय रसाळ वाणीचा ओघ सुरू झाला कीं, हृदय उचंबळून यावें, मन तल्लीन व्हावें, क्षणांत प्रापंचिक दुःखांचा विसर पडावा, आशा व आस्था यांचा हृदयांत प्रवेश व्हावा; इतकेंच नाहीं, तर आपण कधीं कधीं साक्षात् स्वर्गसुखच अनुभवीत आहों असें वाटावें. हा प्रकार उपासना सुरू झाल्यापासून तों ती संपेपर्यंत चालत असे; एवढेंच नव्हे तर तेथून घरीं आल्यावरसुद्धां त्या प्रेमळ पण मनावर पूर्णपणें संस्कार करणाऱ्या शब्दांनीं जागृत केलेले धर्मविचार पुढें एकसारखे तासच्या तास मनांत घोळत राहात; व आपल्याला आज कांहीं जास्त अधिकार प्राप्त झाला आहे असें वाटून आनंद होई."

* पृ. ४५

करितां येतात. उपासना चालविण्याचें कार्य ज्याला करावयाचें असतें त्याला उपासनेची तयारी स्वतःसाठीं व इतरांसाठींही करावी लागते. मंदिरांतील उपासना चालविणें हें मोठें गंभीर कार्य आहे. उपासकास तें कार्य करूं लागण्यापूर्वी मनाची तयारी करावी लागते. ज्याचें धर्म व नीतिपर विषयांचें अध्ययन नित्य चालू आहे, ज्याचे वाचनास केव्हांही खळ पडत नाहीं; ज्यास मननाची व आत्मिक उन्नतीविषयक अनेक विषयांचा स्वतःशीं विचार करण्याची संवय आहे; आत्मस्थितीसंबंधानें जो वारंवार विचार करून, आपल्या उन्नतीचा मार्ग चोखाळीत असतो, स्वदोषविचिकित्सा व परदोषसहिष्णुता ह्यांविषयीं जो तत्पर असतो, त्यास साप्ताहिक उपासनेचें कार्य, वाग्देवी प्रसन्न असल्यास, सुलभ जातें व त्याच्या उपासनेचा सर्वांवर परिणाम होतो. उपासना चालविणारानें जी तयारी करावयाची असते, ती ही उपासना इतरांसाठीं ज्याप्रमाणें आहे त्याचप्रमाणें ती स्वतःसाठीं पण आहे, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून करावयाची असते. आणि असें झालें तरच एकंदर उपासना उभयपक्षीं लाभदायक होते, व तें एक सहज कार्य म्हणून हातून होऊं लागतें. अशी तयारी करून उपासक मंदिरांत प्रविष्ट झाल्यावर निश्चित वेळीं त्यानें उपासनेस प्रारंभ करावयाचा असतो. बंगाल्यांत उपासना सुरू होण्यापूर्वी घंटानाद अगर शंखनाद करण्याचा प्रघात आहे. परंतु आपल्या प्रांतीं ही पद्धत पडली नाहीं व घंटा अगर शंखनादाची आवश्यकता केव्हांही भासली नाहीं. उपासक जी तयारी करून येतो तिच्याविषयीं वर दोन शब्द लिहिले. उपासकाप्रमाणें उपासनेस हजर रहाणारांनींही तयारी करून यावयाची असते. रस्त्यानें जात असतांना कुतुहल बुद्धीनें जे मंदिरांत प्रवेश करून केवळ मौज पहाण्यासाठीं कांहीं वेळ बसतात, त्यांच्याविषयीं कांहींही लिहावयाचें नाहीं. परंतु मंदिरांतील उपासनेस म्हणून जे मुद्दाम येतात त्यांनीं संध्येला ज्याप्रमाणें शुचिर्भूत होऊन बसावयाचें असतें त्याप्रमाणें बाह्य व आंतरिक शुद्धता राखून उपासनेस उद्युक्त व्हावयाचें असतें. त्यांची उपासनेविषयीं जितकी उत्सुकता तितका अधिक उत्साह उपासना चालविणारास वाटतो. उपासनेची ठरलेली जी वेळ असेल ती होतांच उपासनेस प्रारंभ होतो व प्रारंभीं एक पद्य म्हणण्यांत येतें. प्रथमारंभीं कांहीं वर्षें उपासनेस म्हणण्यासारखी शिस्त नव्हती. किती व केव्हां पद्यें म्हणावयाचीं ह्यासंबंधानें उपासकांची साधारण समजूत झालेली नव्हती. परंतु १८७७ सालीं उपासना चालविणारांस पुढीलप्रमाणें सूचना करण्यात असा विचार झालाः—

( १ ) चार वेळांपेक्षां अधिक वेळ गायन करवूं नये. ( २ ) एका वेळीं एका चरणाचीं दोन गीतें असलीं तर चालतील. अनेक चरणांचें एकच गीत असावें. ( ३ ) उपासना एकपासून दीड तासाच्या आंत आटपावी. ( ४ ) उपासना मोठ्या व स्पष्ट वाणीनें करावी. ( ५ ) शेवटचें गाणें–आरति–मराठी किंवा गुजराती असावें. ह्या सूचनांस अनुसरूनच साधारपणें उपासना होत असतात. मंदिरांतील उपासनेची साधारणतः सहा अंगें अगर साहा भाग आहेत, ( १ ) उद्‌बोधन, ( २ ) स्तवन व कृतज्ञतादर्शन, (३) ध्यान व प्रार्थना, (४) उपदेश, ( ५ ) प्रार्थना, ( ६ ) आरति.

**उद्‌बोधन** हें उपासनेचें महत्त्वाचें अंग आहे. ह्या वेळीं उपासकानें जमलेल्या सर्व मंडळीची वृत्ति उपासनोन्मुख करावयाची असते. सर्वांनीं निश्चित बुद्धीनें उपासनेस यावयाचें असा मूळ उद्देश असल्यामुळें त्या वेळीं व्यवहारांतील विचारांस क्षणमात्र बाजूस सारून केवळ परमेश्वरविषयक विचारांमध्यें मन गढून गेलें पाहिजे. परंतु मन हें ओढाळ गुरूं असल्यामुळें, तें भलतीकडेस जाण्याचा संभव असतो व तें तसें जातेंही. प्रत्यक्ष तुकोबांसारख्या साधु पुरुषाला ‘ स्मरणींच विस्मरण ’ असाही अनुभव आला, यावरून मनाची चंचलता प्रत्यक्ष होते. अर्थात् उद्‌बोधनाच्या वेळीं उपासनेसंबंधानें स्वतःच्या उत्साहांत शिथिलता येऊं न देतां, उपासनेस आलेल्या मंडळीची वृत्ति उपासनेस अनुकूल करावयाची असते. त्या वेळचें उपासकाचें भाषण अशाच प्रकारचें असावें असा हेतु आहे. अशा प्रकारें उद्‌बोधनानंतर ज्यांत देवाचें स्तवन आहे असें एक पद्य म्हटल्यानंतर परमेश्वराचें **स्तवन** करण्यांत येतें. ईश्वराचें वैभव, पावित्र्य, तेज, सामर्थ्य व प्रेमस्वरूप इत्याद्यनेक गुणांनीं आपल्या मनावर ठसा उमटविला म्हणजे त्याचें स्तवन करण्याची स्फूर्ति आपणांत साहजिकच होते. कारण मनुष्यधर्मच तसा आहे. पण, ह्यासंबंधानें नेहमीं असा आक्षेप घेण्यांत येतो कीं, आपण देवाचें स्तवन करण्याची काय आवश्यकता आहे ? आपल्या स्तवनाच्या योगें त्याचें वैभव, सामर्थ्य, पावित्र्य, तेज व प्रेम वाढतें काय ? हा किंवा अशा प्रकारचा आक्षेप जे घेतात त्यांस स्तुतीचें रहस्य कळत नाहीं. कारण, सर्वोत्तम गुणांची स्तुति करण्याची जी साहजिक प्रवृत्ति होते त्यांतील अर्थ हा आहे कीं, स्तुति करणारास ते ते गुण पूज्य आहेत, प्रिय आहेत; ते त्याला स्पृहणीय आहेत, म्हणजे आपणामध्यें अंशतः तरी असे गुण असावे अशी इच्छा त्याच्या अंतःकरणांत गर्भित असते, आणि अशी इच्छा गर्भित असली म्हणजे त्या मनुष्यामध्यें ते गुण उदित होऊन

त्याची उन्नति होण्याचा संभव असतो. कांहीं अधन्यतेच्या योगें अशा सर्वोत्तम गुणांची स्तुति करण्याची स्फूर्ति ज्याची नष्ट होऊन गेली आहे त्याच्या उन्नतीचा मार्ग खंडित झाला असें समजावें. म्हणून स्तुति करण्याची जी आपली स्वाभाविक प्रवृत्ति तिचा आपण उत्तरोत्तर विकास केला पाहिजे. व्यवहारांतसुद्धां आपण गुणमय व्यक्तींची निरपेक्ष भावानें जेव्हां स्तुति करितों, तेव्हां तरी हाच अर्थ घ्यावयाचा. त्या व्यक्तींचे कित्येक गुण आपणांस वंदनीय वाटतात म्हणून त्या व्यक्ति आपणास पूज्य होतात, म्हणजे त्यांचे ते ते गुण आपणास स्पृहणीय वाटतात व ते आपणांमध्यें यावेत असा त्या स्तुतीचा आशय असतो. सारांश, उत्तम गुणांची वंद्यता आणि त्यांविषयीं प्रेम हेंच स्तुतीचें कारण असतें. दुसरा विचार असा आहे कीं, ईश्वराचें स्तवन करणें म्हणजे त्याचें जें अनाद्यनंत, गंभीर, अद्भुत, आनंदमय, प्रेमस्वरूप तें आपल्या अंतश्चक्षूपुढें ठेवणें, आणि असें तें स्वरूप अंतःकरणापुढें ठेविल्याशिवाय देवाविषयीं पूज्यबुद्धि आणि भक्ति आपल्या हृदयांत कशी उत्पन्न होईल ? म्हणून स्तवन हें उपासनेचें एक महत्त्वाचें अंग मानिलेलें आहे. कलकत्त्यास स्तवनास प्रारंभ करण्यापूर्वी

सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म ।
आनंदरूपं यद्विभाति ।
शांतं शिवमद्वैतम् ।
शुद्धमपापविद्धम् ॥

हा मंत्र मोठ्यानें व सर्वांनीं म्हणण्याचा प्रघात आहे. हा मंत्र म्हटल्यावांचून उपासना सांग होत नाहीं असेंही त्यांस वाटतें. ह्या प्रांतीं बहुतेक उपासक परमेश्वराच्या स्तवनपर हा मंत्र उच्चारून नंतर स्तवनास प्रारंभ करितात; तथापि तो न म्हटला तर उपासना सांग होत नाहीं असा ह्या प्रांतीं कटाक्ष नाहीं. स्तवनांतर्गत **कृतज्ञतादर्शन** हें एक उपांग आहे. ईश्वराविषयीं कृतज्ञता दर्शविणें यांतील अर्थही गंभीर आहे. कृतज्ञताबुद्धीमध्यें व्यवहारांत उपकार करणारा जो त्याविषयीं प्रेम व आदर, त्याच्या कल्याणाची इच्छा आणि त्याचें अप्रिय न करण्याची वृत्ति असे भाव असतात. असा जर मनुष्यानें केलेल्या उपकाराविषयीं आपला ग्रह साहजिक रीतीनें होतो, तर ज्यानें आपणास ह्या सुंदर सृष्टीमध्यें निर्माण केलें आणि आम्हांस सुखाचीं व उन्नतीचीं साधनें सतत देऊन जो एकसारखें आम्हांवर कृपाछत्र धरीत आहे, रात्रंदिवस आपल्यावर जो प्रेमाचा, दयेचा वर्षाव करीत आहे, त्या जगदीश्वराबद्दल जर आपल्या ठायीं कृतज्ञताबुद्धि उत्पन्न होऊन आपण

ती दर्शविली नाहीं, तर आपलें मनुष्यपण कसलें ? पण, असें सहसा होत नाहीं. ज्याचा धर्ममार्गांत प्रवेश झाला आहे, व ईश्वरनिर्मित वस्तूंची बाह्योपचारें पूजा न करितां ह्या सर्व पृथ्वीवर आणि आकाशामध्यें त्याचीं जीं अद्भुत कृत्यें आहेत आणि अत्यंत सौंदर्य जें नांदत आहे तद्वारा साक्षात् त्या आनंदस्वरूपास जो पहातो, जो त्याच्या योजनांचें चिंतन करितो, त्याची दया मनांत आणितो, भाविक भजनाचे योगेंकरून अत्यंत समाधान होतें आणि सर्व चिंता व त्रास निरस्त होतात ह्याचा विचार करितो, तो त्याच्याच कृपेच्यायोगें आपले सर्व व्यवहार चालले आहेत, त्यानें आपणावर अनंत उपकार केले आहेत, अनेक संकटांतून पार पाडलें आहे व आपल्या विसाव्याचें ठिकाण तोच आहे हें ध्यानांत आणितो, त्याच्या अंतःकरणांत गंभीर कृतज्ञताबुद्धि अवश्यमेव उत्पन्न होते आणि ती प्रकाशित करण्याविषयीं त्याची साहजिक प्रवृत्ति होते. आणि ह्या कृतज्ञता-बुद्धीच्या योगें देवाविषयीं प्रेम वाढून त्यास अप्रिय अशी गोष्ट न करण्याविषयीं वृत्ति सबळ होऊन आपलें अंतःकरण उन्नत होतें. सारांश, व्यक्तिमात्राच्या आत्म्याच्या उन्नतीसाठीं ईश्वराचें स्तवन करणें व आपली कृतज्ञताबुद्धि दर्शविणें हें आवश्यकच आहे.

अशा प्रकारें स्तवन झाल्यानंतर कांहीं वेळ स्तब्ध राहून परमेश्वराचें ध्यान करावें असा प्रघात आहे. स्तवनामध्यें ज्या गुणांचें वर्णन झालें ते गुणविशिष्ट जो परमेश्वर त्याचें ध्यान केल्यानंतर परमेश्वराची **प्रार्थना** करणें हा भाग ईश्वरोपासनेंत येतो. उपासकानें उपासना चालवितांना प्रार्थनापर भाग शेवटीं आणावयाचा असतो. परंतु सर्व उपासकांच्या ही गोष्ट नेहमींच लक्षांत राहते असें नाहीं. त्यामुळें स्तवन, कृतज्ञतादर्शन व प्रार्थना असा क्रम न राहतां मागचें पुढें किंवा पुढचें मागें असा प्रकार क्वचित होतो. ज्यांस ही प्रणाली माहीत नाहीं ते उद्बोधनानंतर होणारा जो भाग त्या सर्वांस प्रार्थना असें म्हणतात. व त्यावर पुष्कळांचा कटाक्षही असतो. त्यांना प्रार्थनेची आवश्यकता पटत नाहीं. न्या. मू. रानडे ह्यांना पत्र पाठवून एका श्रोत्यानें भागवतधर्मावरील व्याख्यानें होत असतांना एकदां प्रांजल बुद्धीनें व शुद्ध भावानें असा प्रश्न केला होता कीं, आपण निरूपण करितां तें ठीकच आहे; परंतु निरूपणाच्या आद्यंतीं जी प्रार्थना करितां तिची मात्र आवश्यकता काय ती कळत नाहीं. ह्या शंकेस न्यायमूर्तींनीं दिलेलें उत्तर फार महत्त्वाचें आहे. ते म्हणाले "परमेश्वर संपूर्णपणें ज्ञानगम्य आहे, असें जें ज्ञानमार्गानुयायी लोकांचें म्हणणें आहे त्यांत वादास बरीच जागा आहे; परंतु

तें खरें आहे असें आपण गृहीत धरून चाललों तरी, केवळ ज्ञानविषय जें ब्रह्म तें कळलें म्हणजे आपल्या हृदयाचें पूर्ण समाधान होईल असें नाहीं. कारण, ज्ञान संपादन करण्याची इच्छा व बुद्धि यांचा आपण जीं कृत्यें करितों त्याच्याशीं किती संबंध असतो हें तपासून पाहिलें, तर जिज्ञासा व बुद्धि ह्यांच्या तृप्तीनें मनास शांति होत नाहीं असें आढळेल. परमेश्वरप्राप्त्यर्थ भक्ति होण्यापूर्वी त्याच्या स्वरूपाचें ज्ञान आपल्या शक्तीप्रमाणें झालें पहिजे हें जरी खरें आहे, तरी तें ज्ञान केवळ बुद्धीनें कांहीं प्राप्त होणारें नाहीं. कारण, परमेश्वर हृदयगम्य किंवा हृदयांतर्गत ज्या वृत्ति त्यांनाच गम्य आहे ह्यांत कांहीं संशय नाहीं. वृत्तींवर बहुधा आपलें आचरण अवलंबून असतें, म्हणून वृत्तींचें अथवा हृदयाचें खरें समाधान होईल व त्यांस चांगलें वळण लागेल असें करण्यासाठीं भगवंताला वृत्तींच्या आंत आणावयाचा प्रयत्न करणें आवश्यक आहे. तसें होण्यास आपल्या अंतःकरणाची सिद्धता पाहिजे. ही होण्यास कांहीं बाह्य उपायांची योजना लागते; जसें सुस्नान, सुस्थल, रम्य एकांत स्थल वगैरे. सुस्नान केलें असतां चमत्कारिक प्रकारची मनाची प्रसन्नता असते; तसेंच उंच पर्वत, खोल दरी, शांत व विस्तृत नदी, अफाट समुद्र, ह्यांमध्यें दिसणारी परमेश्वराची अगाध लीला पाहून त्याच्याविषयीं पूज्य भाव व भक्ति विशेष रीतीनें जागृत होतात. एकांतस्थळीं बसलें असतां अन्यविषयव्यावृत्ति होऊन एकाग्रता होण्यास ठीक पडतें, तथापि ह्या साधनांनीं परिपूर्ति होत नाहीं. इंद्रियें व मनोवृत्ति परमेश्वराकडे वळवून त्याच्यामध्यें रममाण होतील व वृत्ति व हृदय ईश्वरमय होतील असें करण्यास सर्वोत्तम साधन प्रार्थना होय. उपासनेंत प्रार्थनेला मुख्य जागा देण्यासंबंधानें सर्व धर्मांची एकवाक्यता आहे. ह्यावरून ईश्वरप्राप्तीच्या व ईश्वरभजनाच्या सर्व साधनांत प्रार्थना प्रधान आहे असें सिद्ध होतें. उपासना म्हणजे ओतप्रोत प्रार्थनेनें युक्त असणें. आदीं व अंतीं तर प्रार्थना असतेच, व मध्यें जरी निरूपण अथवा उपदेश असतो, तरी प्रारंभीं प्रार्थना, मध्यंतरीं प्रार्थना व शेवटास प्रार्थना केली तर वावगें नाहीं इतकेंच नाहीं, तर योग्यच होईल. निरूपण अथवा उपदेश हा उपासनेचा गौण भाग व प्रार्थना हेंच तिचें खरें स्वरूप म्हटलें असतां चालेल.* प्रार्थनेसंबंधानें आणखी असेंही म्हणतां येतें कीं, भौतिक सृष्टीच्या व्यापारामध्यें देवानें आपणास न टळणाऱ्या नियमांनीं जरी बद्ध करून घेतलें आहे, तथापि जीवात्म्याचा आपणाशीं जो आध्यात्मिक व्यव-

* न्या. मू. रानडे ह्यांचीं धर्मपर व्याख्यानें-आवृत्ति तिसरी पृ. १७-१८.

द्वार त्यामध्यें त्यानें आपणास बद्ध करून घेतलेलें नाहीं. जीवात्म्याचा परमेश्वराशीं जो कटाक्ष असेल, त्यास जुळणारा असाच परमात्म्याचा त्याच्याशीं कटाक्ष असतो. आपलें आनंदमय, प्रेममय, शुद्ध, सर्वव्यापी स्वरूप दृष्टोपुढें यावें असा अनन्यभावें शरण आलेल्या भक्ताचा मनोरथ असल्यास तो तें स्वरूप त्याच्या अंतश्चक्षूंपुढें प्रकट करितो. आध्यात्मिक आपत्तीच्यायोगें भक्त पीडित होऊन देवापुढें शुद्धभावानें येऊन प्रार्थना करिता झाल्यास ती आपत्ति देव तत्काळ दूर करितो, आणि त्यास शांति देतो. एखादें अनुचित कृत्य केल्याबद्दल एखाद्याला मोठा अनुताप होऊन मनांत अस्वस्थता प्राप्त झाली आहे, खाण्यापिण्यांत, बसण्यांत उठण्यांत, चैनींत, सुखांत त्याला कांहींच आनंद वाटत नाहीं, अशा वेळीं त्यानें अगर त्याच्या निकटच्या माणसांनीं त्याच्या शारीरिक सुखासाठीं कितीही प्रयत्न केले, तरी त्याला समाधान वाटेल काय? त्याच्या मनाची अस्वस्थता नष्ट होईल काय? नित्याच्या अनुभवावरून असें सांगतां येतें कीं, असल्या बाह्योपचारांनीं त्याचें समाधान होत नाहीं. त्याच्या आत्म्याला खरें स्वास्थ्य हवें असतें, आणि तें त्याला एकच ठिकाणाहून प्राप्त होणें शक्य असतें. हें ठिकाण म्हणजे जगत्चालक, जगन्नियामक, सर्वसाक्षी, कृपानिधान, प्रेमस्वरूप परमेश्वर होय. अशा वेळीं आपल्या अनुचित आचरणाबद्दल, आपण देवास सोडून वागल्याबद्दल किंवा आपल्या अपराधाबद्दल, अनुतप्त अंतःकरणानें देवाच्या चरणांचा आश्रय केल्यानें, देवापाशीं क्षमा मागितल्यानें, अंतःकरणपूर्वक देवाची प्रार्थना केल्यानें मनाला जें समाधान प्राप्त होतें, जो आनंद, जें स्वास्थ्य व शांति प्राप्त होते तसें समाधान, स्वास्थ्य, आनंद व शांति अन्य कोणत्याही उपायांनीं प्राप्त होत नाहीं, असा साधकांचा अनुभव आहे. आतां अशा प्रकारें प्रार्थनेचें महत्त्व लक्ष्यांत आल्यावरही कोणकोणत्या गोष्टींविषयीं प्रार्थना करावी हा प्रश्न नेहमीं उपस्थित होतो. त्याचें समाधान गुरुवर्य डा. भांडारकरांनीं **प्रार्थना** ह्या लेखामध्यें फार सुंदर रीतीनें केलें आहे तें जिज्ञासूंनीं अवश्य वाचावें. त्यांत त्यांनीं असें स्पष्टपणें दाखवून दिलें आहे कीं, "देवाची प्रार्थना करणें हा एक मार्ग देवानेंच लावून दिला आहे. ज्याच्या मतीस जसा संस्कार झाला असेल, त्याप्रमाणें तो प्रार्थना करील. कोणी आपणांस द्रव्य मिळो, संतती होवो, प्रतिष्ठा मिळो, शत्रूंचा नाश होवो अशी प्रार्थना करितील; कोणी अशा प्रकारची प्रार्थना न करितां, अहंकार, काम, क्रोध, मत्सर इत्यादिकांपासून आपली सुटका व्हावी, आपलें अंतःकरण स्वच्छ व्हावें, सर्वांविषयीं अंतःकरणामध्यें प्रेम रूढ व्हावें, द्वेष

नाहींसा व्हावा, देवाची भक्ति साध्य व्हावी, देवानें आपल्या अंतःकरणांत वास करावा, अशा प्रकारची प्रार्थना करितील. पहिल्या प्रकारची प्रार्थना मूढ जनांची; दुसऱ्या प्रकारची तुकाराम, नामदेवासारख्या साधुजनांची. आम्ही तिचेंच अवलंबन केलें पाहिजे, आणि दुसऱ्यांसही करण्याचा उपदेश केला पाहिजे."*

पहिली प्रार्थना झाल्यानंतर उपासकानें निरूपण अगर उपदेशात्मक भाषण करण्याचा प्रघात आहे. प्रार्थनासमाजाची स्थापना झाल्यापासून त्या भागासंबंधानें विचारांचा विकास कसा होत आला आहे ह्याविषयीं पूर्वी विवेचन झालें आहे. न्या. मू. रानडे ह्यांच्यासारख्या अधिकारी माणसांनीं "निरूपण अथवा उपदेश हा उपासनेचा गौण भाग, प्रार्थना हेंच तिचें खरें स्वरूप" असें स्पष्ट सांगितलें असतांही, लोकांचें लक्ष्य उपदेशाकडेच अधिक असतें व त्याप्रमाणें उपासकही निरूपण अगर उपदेश ह्याची तयारीही अधिक करितो, असा अनुभव आहे. उपदेशास बहुतेक भक्तिपर विषय घेण्याची पद्धत आहे. साधकाच्या साधनास व एकंदर जीवनास सहायभूत होण्यासारखा उपदेश असावा. पुष्कळ वेळां प्रार्थनासमाजाचें कार्य, ध्येय व धर्मसिद्धान्त अशा विषयांवरही उपदेश होतात. परंतु उपदेशक कोणीही असो, व त्याचा विषय कांहींही असला, तरी परधर्मनिंदा उपदेशांत आणूं नये, असा प्रार्थनासमाजाचा कटाक्ष आहे. कारण प्रार्थनासमाजाचा व सर्व प्रस्थापित धर्मांचा संबंध आदराचा आहे. म्हणून निरनिराळ्या धर्मांच्या सिद्धान्तांसंबंधानें टीका जी करावयाची ती आदरपूर्वक व्हावी व कोणत्याही धर्माची निंदा वेदीवरून न करण्याचा सर्व उपासकांचा कटाक्ष असतो. असें धोरण ठेवून उपदेश अगर निरूपण झाल्यानंतर झालेल्या निरूपणास अनुसरून लहानशी प्रार्थना करून आरति म्हटल्यानंतर साप्ताहिक उपासना संपूर्ण होते.

मंदिरांतील साप्ताहिक उपासना कोणी चालवावयाच्या ह्यासंबंधानें कांहीं नियम नाहीं. सभासदांपैकीं उपासना चालविण्याची पात्रता असणाऱ्या सभासदांपैकीं, एका पुरुष अगर स्त्री सभासदास समाजाचे चिटणीस उपासना चालविण्याची विनंति करितात. जेव्हां जेव्हां समाजाच्या वतीनें प्रचारकांची नेमणूक झालेली असते त्या त्या वेळीं प्रचारक एकंदरीनें अधिक वेळां उपासना चालवितात. मुंबईस कोणत्याही प्रार्थना अगर ब्राह्मसमाजाच्या सभासदास अगर युनिटेरिअन गृहस्थास उपासना चालविण्यास हरकत नाहीं.

---

* डा. भांडारकर ह्यांचे धर्मपर लेख व व्याख्यानें–पृ. १५४-५५. संगतसभा प्रकरणांत 'प्रार्थनेंत काय मागावें' ह्या सदराखालीं प्रसिद्ध झालेला निर्णय पहा.

# धर्मानुष्ठान व ध्येयपालन.

**" हा ( प्रतिमा पूजनाचा ) असन्मार्ग सुटून सन्मार्गाची लोकांत प्रवृत्ति व्हावी व सर्व संसारांतील धर्मसंबंधीं कृत्यें ह्या मतास अनुसरून व्हावीं हा ह्या समाजाचा उद्देश आहे."** ( १८६७ )

**" ह्या लहानशा बीजापासून मोठा वृक्ष वाढावा अशी आमची इच्छा आहे. "** —बाळ मंगेश वागळे ( १८६७ )

---

वरील उद्देश दृष्टीपुढें ठेवून १८६७ सालीं मुंबईच्या प्रार्थनासमाजाची स्थापना झाली, त्याला आतां साठ वर्षें झालीं. हा उद्देश दृष्टीपुढें ठेवून ज्यांनीं समाजाची स्थापना केली त्यांपैकीं एकही व्यक्ति आज इहलोकीं नाहीं. ह्या साठ वर्षांत समाजाचा हा हेतु कितपत सिद्धीस गेला आहे व तो सिद्धीस गेला नसल्यास कां गेला नाहीं याचा विचार करून उपाययोजनाही सुचविण्याचा हेतु आहे.

आपण ज्या नवीन मतांचा स्वीकार करीत आहों तीं मतें सर्व व्यवहारांत आणावयाचीं, त्यांचा त्याग करून धर्मसंबंधीं कृत्यें करावयाचीं नाहींत, असा उद्देश प्रथमपासून होता हें उघड आहे. त्याचप्रमाणें हा विचार आचारांत आणणें सुलभ कार्य नाहीं ह्याची जाणीव त्यांच्यांत नव्हती असेंही नाहीं. वरील उद्देश ठरवितांनाच रा. रा. मोरोबा विनोबा ह्यांनीं इषारा * दिला होता व हा इषारा लक्ष्यांत घेऊनच हिंदु रिफार्मर पत्राच्या संपादकांनीं असा उपदेश केला होता कीं, आपल्याला संसारांत अनेक गोष्टी आपल्या इच्छेच्या विरुद्ध कराव्या लागत आहेत. ह्याचा नित्य अनुभव येत असतांना हा असा कडक नियम करण्यापेक्षां तो प्रथम थोडा सौम्य स्वरूपांत ठेवणें बरें, हें आपण जाणत आहों.† तथापि रा. मोरोबा विनोबांचा इषारा अगर हिंदु रिफार्मर पत्राच्या संपादकाची सावधगिरीची सूचना लक्ष्यांत न घेतां वरील हेतु स्थापित झाला. असा प्रकार असून हेतु ठरवितांना जो निग्रह दाखविण्यांत आला, त्याच निग्रहानें पुढें सभासदांचें वर्तन झालें किंवा नाहीं हें पाहतां मनाचा विरस होतो असें येथें म्हणणें भाग आहे. ह्यासंबंधानें येथें अधिक ऊहापोह करण्यापूर्वी ज्या समाजाच्या तत्त्वांचा आधार ह्या समाजाचीं तत्त्वें सिद्ध करितांना घेतला असें डा. भांडारकरांनीं आपल्याला सांगून + ठेविलें

---

* पान ५१ पहा.

† पृष्ठ ५१ पाहा.

+ पृष्ठ ८३ पाहा.

आहे त्या ब्राह्मसमाजाच्या इतिहासांतील एका विशेष प्रसंगाची येथें आठवण करून घेणें जरूर आहे. आदि ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज ह्यांच्या स्थितींत पूर्वीपासून साम्य आहे. आदि ब्राह्मसमाज सोडून केशवचंद्र सेन निराळे झाले, केशवचंद्र सेनांना सोडून पंडित शिवनाथ शास्त्री वेगळे झाले, व त्यांनीं निरनिराळे समाज स्थापिले, परंतु मुंबईच्या समाजांत केशवचंद्रांच्या विचारांचे किंवा पंडित शिवनाथ शास्त्री ह्यांच्या मतांचे सभासद जरी होऊन गेले, तरी एका प्रार्थनासमाजाचे दोन समाज झाले नाहींत, हें ज्याप्रमाणें खरें आहे, त्याचप्रमाणें ब्राम्हसमाजाच्या इतिहासांत जो विशेष प्रसंग घडला तसा कांहीं प्रकारही येथें झाला नाहीं हें येथें नमूद करणें अगत्याचें आहे. एके दिवशीं समाजाच्या छापखान्यांत देवेंद्रनाथ ठाकूर विचारमग्न स्थितींत बसलेले असतांना त्यांच्या मनांत जो विचार आला तो असा कीं, समाजामध्यें उपासना होत आहेत, पण त्यांस बंधनें नाहींत. कोणी उपदेश करावा व त्यांनीं काय सांगावें ह्यासंबंधानें कांहीं समजूत पटलेली नसल्यामुळें मूळ हेतूचा विपर्यास करणारे उद्गार उपासकांच्या वाणींतून निघतात; म्हणून त्यांनीं " ब्राम्हधर्म ग्रहण " सुरू केलें, व जो कोणी प्रतिमापूजनाचा त्याग करावयास सिद्ध होईल त्यासच सभासद करून घ्यावयाचें असें त्यांनीं ठरविलें; स्वतः व आणखी २०–२५ इसमांनीं ह्या नियमानुसार एका उत्सवाच्या मुख्य दिवशीं ब्राम्हधर्म ग्रहण केलें व नंतर देवेंद्रांनीं आपल्या पित्याच्या पुण्यतिथीच्या दिवशीं सर्व आप्तांचा विरोध होत असतांना जुन्या पद्धतीनें श्राद्ध न करितां नव्या पद्धतीनें श्राद्ध करून करारीपणाचा कित्ता घालून दिला व ब्राह्मसमाजांत दाखल होणें म्हणजे काय याची कल्पना जनतेस करून दिली. मग आमचें ध्येय वर म्हटल्याप्रमाणें इतकें स्पष्ट असतां, त्याचें परिपालन आमच्या हातून कां झालें नाहीं हा खरोखर विचार करण्यासारखा प्रश्न आहे. आतां मुंबईच्या समाजाच्या इतिहासाकडे पाहिलें तर असें दिसून येईल कीं, अशा प्रकारें आमचा धर्म आचाराच्या कक्षेंत निग्रहानें आणणारा व केवळ ब्राह्म धर्माला वाहिलेला गृहस्थ समाजस्थापकांच्या अगर त्यांच्या नंतरच्याही पिढींत कोणी झाला नाहीं, हें येथें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. हा मुद्दा गुरुवर्य डा. भांडारकरांनीं देखील कबूल केला आहे, " या धर्माचा अजून शंकराचार्य निघत नाहीं ही वाईट वाटण्यासारखी गोष्ट आहे " असें जेव्हां उपहासाच्या दृष्टीनें केसरीकारांनीं म्हटलें त्यावेळीं भांडारकरांनीं असें उत्तर दिलें कीं " आम्हांसही त्याविषयीं वाईट वाटतें. मोडक आणि

**भांडारकर** अशांसारिख्या 'संसारकरू' मनुष्यांच्या हातून ह्या धर्माच्या प्रसाराविषयीं फारशी खटपट होणें अशक्य ही गोष्ट उघड आहे, असें आमचेंही मत आहे. तथापि **सर्व सामाजिकांनीं यथाशक्ति यथावसर आस्था-पूर्वक** उद्योग करीत गेलें पाहिजे. असें झालें असतां कांहीं काळानें ईश्वरकृपेनें ह्या धर्मसंघामध्यें एखादा शंकराचार्यसुद्धां उत्पन्न होईल."* आतां जेथें स्वतःच्या आचरणानें उदाहरण घालून देणारीं देवेंद्रनाथ, केशवचंद्र, ह्यांच्यासारखीं माणसें नाहींत, तेथें **सर्व सामाजिकांनीं** यथाशक्ति व यथावसर कितपत उद्योग केले हें जरी पाहिलें तरी आपल्याला काय उत्तर मिळतें तें पाहूं या.

येथें एका गोष्टीसंबंधानें दोन शब्द लिहिणें अगत्याचें आहे. मागें काय झालें त्याचें निरीक्षण करितांना व जें दृष्टोत्पत्तीस येईल त्याची नोंद करितेवेळीं व्यक्ति-विषयक विचार टाळण्याचा आमचा निश्चय आहे. म्हणून टीकापर भागांत कोणाही व्यक्तीस अनुलक्षून विचार आहेत अशी कोणी आपली समजूत करून घेऊं नये. जें सत्यदर्शन झालें तें वाचकांपुढें ठेवणें हें कर्तव्य आहे व पुढील पिढीस जागृति-कारक आहे अशी आमची दृढ समजूत आहे. ह्या दृष्टीनें साठ वर्षांच्या इतिहासाकडे पहातां काय दिसतें ? १८६७ सालीं मोरोबा विनोबांना सभेमध्यें साधारणपणें दाब-ण्यांतच आलें, व त्या वेळीं हा मतभेदाचा व अनिष्ट विषय काढल्याबद्दल त्यांस दूषणही मिळालें, † आणि त्याच वेळीं रा. रा. बाळ मंगेश वागळे ह्यांनीं सर्वांस सांगितलें कीं, **ह्या लहानशा बीजापासून मोठा वृक्ष वाढावा अशी आमची इच्छा आहे**. म्हणून बीजारोपण झाल्यापासून वृक्ष वाढीस लावण्याच्या कामीं कसा काय उद्योग झाला त्याचें आतां निरीक्षण करूं या. हें निरीक्षण करावयास लागलें कीं, कोणत्या उपायांचें अवलंबन केल्यानें हें बीज वाढून त्याचा मोठा वृक्ष होणें, अगर हा रोपा वाढीस लागून त्याचा वृक्ष बनणें शक्य होतें त्याचा विचार झाला पाहिजे. आणि हा विचार सोपा आहे. प्रार्थनासमाजाचे जे धर्मसिद्धान्त ते केवळ

---

* पृ. ९८ भां. व्या. पाहा.

† "तुम्ही हें प्रकरण सभेंत आणिलें नसतें तर बरें होतें असें एक दोन अ-सामींनीं त्यांना तेव्हांच सांगितलें. नंतर बाळ मंगेश वागळे म्हणाले कीं, आम्हांस ह्याबद्दल कोणास कांहीं सांगणें नाहीं, प्रतिज्ञा करून सभासद झाल्यावर मग आमचा काय बेत आहे तो सहज समजेल."

( वर्तमानदीपिका. १८६७ )

विचारांस मान्य होऊन चालणारे नाहींत. ही विचाराची मान्यता आचाराच्या द्वारें जर प्रगट झाली तरच उपयोगाची. प्रथम देव एक आहे, त्याचप्रमाणें प्रतिमापूजन हा असन्मार्ग आहे हीं १८७३ पूर्वीचीं दोन मतें आपण घेऊं या. ह्या मतांची मान्यता सभासदांच्या आचरणावरून जर ठरवावयाची तर, सभासदांच्या आचारामध्यें ह्याविरुद्ध केव्हांही प्रकार व्हावयास नकोत हें अगदीं उघड आहे. परंतु तशा प्रकारें प्रत्यक्ष आचाराच्या द्वारें तत्त्वाभिमान व्यक्त झाल्याचीं उदाहरणें पहिल्या दाहाबारा वर्षांत किती सांपडतील ? प्रतिमापूजन हा असन्मार्ग होय असें जाहिर करण्यासाठीं समाजाची स्थापना झाली. हा असन्मार्ग मुद्दन लोकांमध्यें सन्मार्गाची प्रवृत्ति व्हावी व संसारांतील सर्व धर्मसंबंधीं कृत्यें ह्या मतास अनुसरून व्हावीं हा जर आमचा मूळ उद्देश, तर तो पार पाडण्यासंबंधानें प्रथमपासूनच कटाक्ष असावयास पाहिजे होता. पण तसा कटाक्ष कोणीही ठेविल्याचें दिसत नाहीं ! नाहीं म्हणावयास सन १८७० सालीं वर दर्शविलेला असन्मार्ग सोडून सन्मार्गानुसारें एक विवाह झाल्याचा दाखला सांपडतो. हा विवाह म्हणजे प्रार्थनासमाजाचे एक संस्थापक रा. रा. वासुदेव बाबाजी नवरंगे यांचा होय. ह्या विवाहाची हकीकत अशी आहे:—

## पहिला ब्राम्हविवाह.

रा. रा. वासुदेवराव हे त्या वेळीं स्टेशनरीचा व मारगन कंपनीच्या धातु गाळण्याच्या मुशींचा व्यापार करीत होते. त्यांनीं विलायतेहून परत येतांना आपल्या स्वतःच्या नांवें ह्या कंपनीची एजन्सी मिळविली होती. येथें आल्यावर विवाह करण्याचें ठरविलें. वासुदेवरावांच्या चरित्रावरून वाचकांस हें कळून येईलच कीं, ज्यांस लोक विद्वान म्हणतात तसे ते नव्हते, तरी विद्वान लोकांचा त्यांस सहवास झालेला असल्यामुळें त्यांचें मन चांगलें संस्कृत झालें होतें. केशव चंद्र सेन दोन्ही प्रसंगीं मुंबईस आले असतांना त्यांच्या सहवासाचा वासुदेवरावांनीं पूर्ण फायदा घेतला होता व त्यांचीं व्याख्यानें त्यांनीं प्रसिद्ध केलीं होतीं व ते स्वतः ब्राह्मसमाजाचे सभासद झाले होते. अशा स्थितींत विवाह करण्याचा जेव्हां त्यांचा निश्चय झाला व योग्य वधूही त्यांस आढळली त्या वेळीं विधीचा प्रश्न पुढें आला. वासुदेवराव निग्रही व करारी स्वभावाचे असल्यामुळें विधि कोणत्या रीतीनें करावयाचा हा कांहीं चिंतेचा प्रश्न नव्हता. त्यांची वधु कृष्णाबाई, पांडुरंग भट बापट ह्यांची कन्या ही सखारामभट जोशी यांची गतभर्तृका होती. म्हणजे हा विधवाविवाह होता आणि तो कसा पार पाडावयाचा हा प्रश्न त्यावेळीं वासुदेराव-

चांपुढें होता. त्या वेळीं ब्राम्हविवाहासंबंधानें कायदा झालेला नव्हता; तथापि कलकत्यास प्रतिमापूजनाचा त्याग करून विवाह होऊं लागले होते. परंतु तो विधि कायद्यास संमत होईल ह्याविषयीं कांहीं खात्री नसल्यामुळें, तेथें कांहीं एक प्रकारचा विधि करून वधु व वरामध्यें लेखी करारनामे होत असत. वासुदेवरावांनीं बंगाल्यांत चालू असलेल्या पद्धतीप्रमाणें विवाह उरकून व करारनाम्याचा नमुना घ्यावयाचा ठरवून तो विधि तेथून येथें मागविला. व ज्या ठिकाणीं प्रार्थनासमाजाच्या साप्ताहिक उपासना होत असत, म्हणजे जुन्या बर्फाच्या गिरणीच्या ठिकाणीं, अर्थात् ज्या जागेवर पुढें प्रार्थनामंदिराची उभारणी झाली त्या जागेत, बुधवार ता. २४ आगस्ट १८७० रोजीं मिति श्रावण वद्य १३, शके १७९२, प्रमोदनाम संवत्सर, ह्या दिवशीं वासुदेवरावांचा विवाह ब्राह्मविधीनुसारें झाला. समाजाचे आद्य आचार्य रा. रा. भिकोबादादा चव्हाण ह्यांनीं पौरोहित्य केलें. हा विधि झाला त्या वेळीं समाजाचे सन्मान्य अध्यक्ष डॉ. आत्माराम पांडुरंग व दुसरे इतर पुष्कळ लोक हजर होते. ह्या विवाहाची हकीकत प्रथम मुंबईच्या कोठल्याही पत्रांत न येतां, ती केशवचंद्र सेन ह्यांच्या 'इंडिअन मिरर' पत्रांत आली. त्याबद्दल ज्ञानोदयासारख्या पत्रालाही फार आश्चर्य वाटलें कीं, ही महत्त्वाची बातमी कलकत्त्याच्या पत्राच्या द्वारें आपल्याला प्रथम कळावी.* 'इंडियन मिरर' पत्रामध्यें ही बातमी प्रसिद्ध करितांना पुढील मजकूर आला आहे.

"The Bridegroom, a Conkanee Brahman, of Rutnagiri who is about 44 years of age is a thoroughly enlightened gentleman of considerable strength of character and firmness of principle. Some years ago he visited England and is since living in excommunication. He is one of the most zealous members of the Prarthana Samaj and has also chosen to enter into membership of the Brahma Samaj of India.

---

* It is a matter of great surprize to us that none of the local journals took any notice of it ( the marriage ) and that it should have been communicated to us by a Calcutta contemporary !

—*Dnyanodaya, 15th Oct. 1870.*

The marriage was solemnized by Mr. Bhikoba Chavan, Minister of the Samaj, in the presence of Dr. Atmaram Pandurang and other respectable witnesses."

त्या वेळीं भिकोबादादांनीं जो विधि केला त्याचें वर्णन, अगर प्रत्यक्ष तो विधि कोठें आमच्या पहाण्यांत आला नाहीं, याबद्दल फार वाईट वाटतें. तथापि त्या समयीं वधुवरांनीं जे करारनामे केले ते छापलेले आम्हीं पाहिले आहेत. ह्या ठिकाणीं आम्ही वरानें केलेला करारनामा उतरून घेतों.

## वराचा करार.

" मी, वर, वासुदेव नवरंगे, बाबाजी नवरंगे यांचा पुत्र व जिवाजी नवरंगे यांचा नातु, परमेश्वर जो माझा साक्षी आहे त्याचेसमोर व हा विधि करणारे भिकोबा लक्ष्मण चव्हाण यांचेसमोर, व येथें जो समाज जमला आहे त्यासमोर, सत्य स्मरून गंभीरपणानें सांगतों कीं, कृष्णाबाई, पांडुरंग भट बापट ह्यांची कन्या व त्रिंबक भट बापट ह्यांची नात, व मयत सखाराम भट जोशी यांची विधवा स्त्री हिचें पाणिग्रहण राजीखुशीनें व अक्कलहुशारीनें करून तिजशीं ब्राह्मधर्माप्रमाणें लग्न करितों. मी मरेपर्यंत पतिधर्माप्रमाणें हिचें पालनपोषण करीन आणि हिच्याच संगतीं राहून विश्वासूपणें व निष्कपट भावानें वर्तेन. जर आम्हांस मुलें झालीं तर त्यांच्याशीं मी पितृधर्मानुसार प्रेमानें वर्तेन. परमेश्वर जो आमचा कृपाळू पिता, तो मला हे करार पाळण्याची शक्ति देवो.* "

मिति श्रावण वद्य १३ शके १७९२

प्रमोद नाम संवत्सर, बुधवार ता. २४ आगस्ट १८७० ( सही इंग्रजी )

मुक्काम मुंबई, Wasoodev Babajee Nowrangay.

**मोरो विठ्ठल वाळवेकर,**
**भिकोबा लक्ष्मण चव्हाण,**
**आत्माराम पांडुरंग.**

---

* वधूनेंही असाच करारनामा केलेला असून वराचें व वराच्या पित्याचें व आजोबाचें नांव त्यांत असून " जर आम्हांस मुलेंबाळें झालीं तर त्यांशीं मी मातृधर्माप्रमाणें प्रीतीनें वर्तेन. त्यांत मी अंतर करणार नाहीं " एवढाच फरक असून त्याच साक्षीदारांच्या सह्या आहेत.

प्रतिमापूजनाचा त्याग करून झालेला हा प्रार्थनासमाजांतील पहिला विवाह होय. त्यानंतर दुसरा विवाह जो झाला तो रा. रा. सदाशिव पांडुरंग केळकरांचा. तो १८७८ सालीं झाला. १८७८ पर्यंत ह्या दोन विवाहांव्यतिरिक्त समाजाच्या मंडळींत विधि अवश्यक असणारीं जीं शुभ व इतर कार्यें झालीं त्या वेळचे सर्व विधि जुन्या रीतीनुसार झाले असले पाहिजेत हें उघड आहे. म्हणजे कोणत्याही कारणानें का होईना, प्रतिमापूजन जो असन्मार्ग त्याचा त्याग न करितां सभासद वागत होते असें म्हणणें भाग आहे. कांहीं अंशीं अहमदाबाद प्रार्थनासमाजाचा जो एक नियम आहे कीं, व्यक्तिगत ईश्वरोपासनेच्या वेळींही कांहीं प्रतिमा वगैरे असतां नये, त्याचप्रमाणें, तसा नियम नसतांनाही राजरोसपणें सभासदांच्या हातून होणाऱ्या प्रतिमापूजनाकडे डोळेझांक होत आली ह्यांत कांहीं संशय नाहीं. सन १८७३ सालीं प्रतिमापूजन हा असन्मार्ग होय असा भाग जरी गाळून टाकला, तरी त्याच्याऐवजीं प्रतिमापूजन हा ईश्वरोपासनेचा खरा प्रकार नव्हे अशी रचना आली, आणि जो खरा प्रकार नव्हे, त्याचा लौकिकासाठीं आम्ही अंगीकार करीत होतों असें ह्यावरून उघड होतें. असे प्रकार जेव्हां होऊं लागले त्या वेळीं साहजिकपणें सभासदांच्या वर्तनावर जाहीररीतीनें वर्तमान पत्रांतूनही टीका होऊं लागली. आमच्या मंडळीमध्यें विधींसंबंधानें कांहींच जागृति नव्हती असें म्हणतां येत नाहीं. परंतु थोडी जी जागृति झाली तीही जोराची नव्हती. १८७४ सालीं साहापर्यंत सभासदांचीं कुटुंबें एकत्र झालीं म्हणजे जुन्या विधींचा त्याग करावयास आपण तयार आहोंत असें दोघां सभासदांनीं जाहीर करणें हा ह्या जागृतीचाच परिणाम हें जरी खरें असलें, तरी असला हिशेबी प्रकार ह्या कामीं उपयोगाचा नाहीं असें ह्या दोघांपैकीं एकांच्या पुढें लक्षांत आलें व तसा अभिप्राय स्पष्टपणें त्यांनीं व्यक्तही केला. त्याचप्रमाणें कोणते विधि असणें इष्ट आहे व ते करण्याची पद्धत ठरविण्यासाठीं समाजानें १८७९–८० सालीं एक कमिटी नेमिली होती. व विवाहाखेरीज बाकी सर्व विधि तयार होते असें रा. ब. पंडितांनीं जाहीरही केलें होतें. परंतु ते तयार असलेले विधि केव्हांही पुढें आले नाहींत व आजपर्यंत कोणते विधि केलेच पाहिजेत व ते करण्याची पद्धत ह्यांसंबंधानें समाजानें आजही कांहीं निकाल लावलेला नाहीं. तथापि थोडीबहुत व तीही इतर दिशेनें जागृति झाली होती असें जरी गृहीत धरिलें तरी तीस प्रारंभ १८७४ सालीं अस्पष्टरूपानें झाला एवढेंच म्हणतां येतें. अर्थात असा हा धरसोडीचा प्रकार पाहून, समाजाच्या पुढाऱ्यांच्या वर्तनावर वर्तमानपत्रांतून

टीका झाली तर त्यांत आश्चर्याचें काय आहे ? प्रार्थनामंदिराचा प्रवेशसमारंभ मोठ्या थाटानें झाल्यानंतर, एका पुढारी सभासदांच्या कुटुंबांत व्रतबंध झाला. त्या वेळचा विधि जुन्या रीतीनें झालेला पाहून जिकडून तिकडून टीका झाली. १८७४ सालांतीलच ह्या टीकेचे कांहीं नमुने आम्ही पुढें देत आहों.

(१) "आम्हांस एका मित्रानें आश्चर्य रीतीनें सांगितलें कीं......यांच्या मुलाची मुंज झाली. तेव्हां ब्राह्मणांच्या रीतीप्रमाणें गणपतिपूजन वगैरे मूर्तिपूजेचे विधि व भिक्षावळ झाली. भिक्षावळीचा अर्थ असा आहे कीं, आतां हा मुलगा ब्राह्मण झाला म्हणून भिक्षा मागण्याचा अधिकार त्याला प्राप्त झाला आहे. त्याचप्रमाणें काशीयात्रेस जाण्याची बतावणीही मौंजविधीच्या संबंधानें करावी लागते. मूर्तिपूजा करणें गैरशिस्त आहे असें प्रार्थनासमाजाचें मत असतां... आपल्या येथें ह्या विधींत मूर्तिपूजा कशी होऊं दिली ?" ज्या वर्तमानपत्रांत वरील पत्र प्रसिद्ध झालें आहे त्या पत्राचे संपादक म्हणतातः—

"यावरून सदरील मित्रांस मोठें आश्चर्य वाटतें; पण ह्यांत आश्चर्य मानण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. प्रार्थनासमाजमंदिराच्या प्रवेशसमारंभाच्या वेळीं जे नियम वाचून दाखविले त्यांत मूर्तिपूजेविषयीं एक नियम होता खरा; पण, त्यांत प्रार्थनासमाजांतील लोक मूर्तिपूजा करणार नाहींत असें लिहिलेलें नव्हतें. तर **या मंदिरांत** मूर्तीची किंवा कोणत्याही साकार पदार्थांची उपासना केली जाणार नाहीं अशा अर्थाचे शब्द होते. आणि ह्या मौंजिकार्यांत जे मूर्तिपूजेचे विधि झाले ते मंदिरांत झाले नाहींत, तर खाजगी रीतीनें एका सभासदाच्या घरीं झाले. तर येणेंकरून पूर्वोक्त नियमास यत्किंचितही बाध येतो असें आम्हांस वाटत नाहीं. ह्या लोकांनीं हिंदुधर्माचा किंवा त्यांतील कोणत्याही गोष्टीचा त्याग केला आहे असें लोक कशावरून समजतात ? प्रार्थनासमाजांत मिळाल्यावरून इतकेंच झालें आहे कीं, समाजाच्या देवळांत मात्र हिंदुधर्मास अनुसरून कांहीं करावयाचें नाहीं, पण त्या इमारतीच्या बाहेर त्यांतील कर्मकांड यथासांग चालवून जातीच्या लोकांस संतुष्ट करण्यास किमपि मनाई नाहीं. पुराणांतील वांगीं पुराणांत. माधवराव रानडे ह्यांनीं लग्न केलें तेव्हां सुबोधपत्रिकेनें कडक लिहिलें. आतां तिचा आवेश कोठें गेला ?"

( २ ) याच प्रसंगास अनुलक्षून इंदुप्रकाशांत एक पत्र प्रसिद्ध झालें आहे, त्यांत लेखक म्हणतातः—...मुलाचा व्रतबंध झाला तेव्हां त्यांनीं किती देवता पुजल्या ? आरंभीं तर मंडपस्थापना. तिला दोन नारळ बांधले त्यांची पूजा.

नंतर सुपारी म्हणजे गणपति याची पूजा. घटकापात्राची पूजा. हर हर! किती देवतांच्या पूजा अशा गृहस्थास कराव्या लागल्या! त्या मंदिरांत "पुंडलिक वरदा हरि विठ्ठल, पार्वतीपते हर हर महादेव, सीताकांत स्मरण जय जयराम" हे शब्द बिलकुल नाहींत. निराकाराचें मात्र नांव, आणि त्याप्रीत्यर्थ नवी कविता. तर गायत्रीमंत्र तीन वेळां मुलाचे कानांत सांगितला तो कोणचा? त्या प्रार्थनासमाजांत नवीन पाडविलेला कीं वडिलोपार्जित चालत आहे तोच? (इंदुप्रकाशास उद्देशून) आपण विद्वान शास्त्रज्ञ आहां आणि हे प्रार्थनासमाजांतील विद्वान व सुधारेवाले जातीच्या भीतीकरितां बोलतात तसे वागत नाहींत. करितां आपणास कांहीं बोध करणें असल्यास येत्या अंकांत कांहीं प्रसिद्ध करावें." या विनंतीस अनुसरून इंदुप्रकाशकार लिहितात "(या पत्राचा) गंभीरपणें विचार करितां आमच्या प्रार्थनासमाजांतील मित्रांस धर्मसंबंधीं अवश्य संस्काराच्या संबंधानें ही नेहमीं मोठी अडचण पडत आहे ती त्यांनीं **स्वमतास अविरुद्ध अशी एकादी संस्कारपद्धति करून दूर करावी आणि** बोलण्यांत व व चालण्यांत **मेळ ठेवावा** अशी आम्ही त्यांस मित्रभावानें सूचना करितों."

(३) याच प्रकरणासंबंधानें ठाण्याचे अरुणोदयकर्ते रा. रा. काशिनाथपंत फडके म्हणतात, "या वेळेस त्यांच्या समाजाचें मुख्य व पहिलें कर्तव्य, एकच सत्य ईश्वरावर विश्वास व प्रीति ठेवून त्याची उपासना किंवा सेवा करणें याचा त्यांस विसर पडला काय? असें करण्यास त्यांस त्यांच्या स्थितीनें भाग पाडलें असें म्हणण्यास कारण दिसत नाहीं. शिवाय मुंबईसारख्या शहरांत जेथें चार मंडळीचें त्यांस सहाय आहे अशा ठिकाणीं ही गोष्ट त्यांच्या हातून होण्यास त्यांच्या मनानेंच उलट खाल्ली असें म्हणण्याशिवाय दुसऱ्या कारणास जागा दिसत नाहीं." अशा प्रकारें ज्यांच्यावर टीका झाली ते समाजमतांनुसार वागले नाहींत म्हणून त्यांच्यावर असा भडिमार झाला, तरीसुद्धां पुष्कळ वर्षेपर्यंत तत्त्वनिष्ठेसंबंधाची कृतीच्या रूपानें प्रत्ययास येणारी जागृति अनुभवास येऊं लागली नव्हती. एवढेंच नव्हे, तर कांहीं अंशीं आपल्या दुर्बलतेविषयीं युक्तिवाद लढविण्याचे प्रकार झाले असें म्हणणें भाग आहे. प्रार्थनासमाजाची जेव्हां स्थापना झाली त्या वेळीं संसारांतील धर्मसंबंधीं सर्व कृत्यें समाजमतांस अनुसरून व्हावीं हा उद्देश असल्याचें जाहीर झालें, व प्रतिमापूजनाविरुद्ध जाहीर रीतीनें उपदेश होऊं लागले. असें असून प्रत्येक शुभ कार्याच्या वेळीं ज्या मतांच्या प्रतिपादनासाठीं निराळी संस्था काढिली तीं मतें बाजूस ठेवून ज्या वेळीं वर्तन होऊं लागलें, त्या

वेळीं झालेली टीका पाहून हात आंवरण्याच्या ऐवजीं प्रार्थनासमाज व ब्राह्मसमाज- ह्यांच्यांतील काल्पनिक भेद दाखविण्याची रिकामी खटपट झाली नसती तर आम्ही आपल्याला कमी हास्यास्पद करून घेतलें असतें. मुंबईच्या प्रार्थनासमाजानें प्रार्थना- समाज हें नांव कां घेतलें तर म्हणे " आपण आपल्याला ब्राम्ह म्हणजे ब्रम्हनिष्ठ म्हणवावें अशी आपली योग्यता नाहीं, तसेंच आपल्यास ब्राह्मसमाजाचे सर्व नियम त्यांत कांहीं एक फेरबदल न करितां मान्य होतील असें नाहीं. **केवळ आपल्या- सारख्या विचारांच्या** मनुष्यांसह एकत्र मिळून निराकार, निर्विकार, अत्यंत शुद्ध, मंगल, परमकृपाळु परमेश्वराची उपासना करून लीन भावानें आध्यात्मिक बलाविषयीं त्याची प्रार्थना करावी. **इतकाच आपला तूर्त अधिकार आहे.** ह्यांतील गोष्टींकडे दृष्टि देऊन पूर्वोक्त प्रार्थना समाजाच्या स्थापकांनीं आपल्यास शोभेल असें नांव ठेविलें " ही अशी वकिली ज्यांनीं केली त्यांनीं प्रार्थनासमा- जाच्या स्थापकांनीं " प्रतिमापूजनेचा असन्मार्ग सुटून सन्मार्गाची लोकांस प्रवृत्ति व्हावी व संसारांतील सर्व धर्मसंबंधीं कृत्यें या मतास अनुसरून व्हावीं हा ह्या समाजाचा उद्देश आहे " असें कां म्हटलें त्याचा विचारच केला नाहीं असें उघड होतें. त्यांनीं " आध्यात्मिक बलाविषयीं त्याची प्रार्थना करावी इतकाच तूर्त आपला अधिकार आहे " असें कां नाहीं म्हटलें ? त्याचप्रमाणें प्रार्थनासमाजाचा सभासद आणि आपणास **ब्राह्म** म्हणविणारा ह्यांच्यामध्येंही विनाकारण कृत्रिम भेदभाव दाखविण्यांत आला तो असाः—

" प्रार्थनासमाजांतील कित्येक लोक ज्यांस ब्राह्मधर्माप्रमाणें सर्व बाह्य आचार, व्यवहार, विवाहादिक सर्व संस्कार, वगैरे एकंदर संस्था नवीन पद्धतीनें आपण एकदम सुरू करावी, लोकमतांत फेरफार होण्याची वाट पाहात न बसतां आपण त्यांपासून निराळें व्हावें, अन्नव्यवहारादि नित्य जातिभेदाचे चालू निर्बंध बाळ- गल्यावांचून करावा, व जातिभेदसूचक जीं यज्ञोपवीतादि बाह्य चिन्हें त्यांचा त्याग करावा असें वाटतें आणि हें सर्व **ब्राह्म** ह्या नांवानें व्यक्त होतें असें जे समजतात ते आपल्याला ब्राह्म म्हणवितात. " आतां हा भेदभाव ज्याप्रमाणें कृत्रिम आहे त्याचप्रमाणें तो अत्यंत हानिकारक व प्रगतीस सर्व प्रकारें बाधक कसा आहे तो अल्प विचारांतीं लक्षांत येण्यासारखा आहे. प्रार्थनासमाजाचे सभासद व ब्राह्म ह्यांच्यांत जर भेदभाव राखावयाचा होता तर प्रतापचंद्र मुझुमदारांना *

* " समाजाच्या मूलतत्त्वांच्या पुनर्घटनेचें कार्य चालू असतांना व्यवस्थापक मंडळीनें असें ठरविलें कीं, समाजधर्माचें वळण लागावें, धर्माचा प्रवेश कुटुंबामध्यें

साहा साहा महिने मुंबईत मुद्दाम बोलावून आणून ठेवून घेण्याची काय जरूर होती? त्याचप्रमाणें लोकमतांत फेरफार होण्याची वाट पहावयाची म्हणजे काय? ज्या वेळीं प्रार्थनासमाजाची स्थापना केली, त्या वेळीं लोकमतांत फेरफार होण्याची वाट स्थापकांनीं पाहिली काय? सर्व हिंदु म्हणविणारां-पेक्षां निराळेंच मंदिर जेव्हां उभारलें, तेव्हां लोकमतांत फेरफार झाला होता काय? फेरफार होईतों वाट पहाण्याचा विचार कोणीही प्रथम पुढें केलेला नाहीं. अर्थात् नंतर तो पुढें करणें म्हणजे आपल्या दुर्बलतेवर झांकण घालण्याचा प्रयत्न केल्यासारखेंच होय. स्थापकांचा असा हेतु असता, तर त्या दिशेनें मूळपासून कांहीं प्रयत्न झाले असते. मूळ हेतूच असा आहे कीं, सभासदांनीं विशिष्ट मतें स्वीकारावयाचीं व त्या बरहुकुम स्वतः आचरण ठेवावयास लागावयाचें. ह्यांत लोक-मतांत फेर व्हावयाची वाट पहात बसण्याचा प्रश्नच निघत नाहीं. तसें असतें तर साहा कुटुंबें एकविचाराचीं झाल्यावर निराळें व्हावयाचें, असा ज्यांनीं १८७४ सालीं विचार केला होता त्यांनींच अमुक एक कुटुंबें एकत्र झालीं म्हणजे यंव करूं, त्यंव करूं असें म्हणण्याच्या भानगडींत न पडतां, जें आपल्याला योग्य व सत्य वाटतें तें बिनदिक्कत आचरणांत आणण्याचा काळ आतां आला आहे असें सन १८८१ सालीं म्हटलें नसतें. अशा प्रकारें आम्ही दुर्बलता दाखवून तिची तरफदारी करण्याचा प्रयत्न केला म्हणून आम्हांमध्यें दुबळेपणाचें साम्राज्य माजलें असें म्हणणें प्राप्त आहे.

विचारांत घेण्यासारखी दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं, प्रार्थनासमाज स्थापन होण्याचीं कारणें देतांना प्रत्यक्ष आमच्या वतीनें जीं कारणें दिलीं आहेत त्यांचाही विचार केला असता तर लोकमताचा रिकामा बागुलबोवा करण्याकडे कल वळला नसता. सन १८८३ सालीं मुंबईच्या प्रार्थनासमाजानें " मुंबई येथील प्रार्थना-समाजाची हकीकत " नामक जें पुस्तक प्रसिद्ध केलें त्यांत असें स्पष्ट म्हटलें आहेः—

" इंग्रजी विद्येचा प्रसार झाल्यापासून सुशिक्षित लोकांमध्यें सत्यासत्य, योग्या-योग्य, कर्तव्याकर्तव्य ह्यांविषयीं विचार करण्याची शक्ति वाढत चालली. लोक-

---

व्हावा व बंगाल्यांत ह्या बाबतींत कसे प्रयत्न होत आहेत ते आपल्याला येथील मंडळीस कळावें म्हणून केशवचंद्र सेन किंवा त्यांना येणें शक्य नसल्यास प्रताप-चंद्र मुझुमदार ह्यांस येथें बोलवावें. " (पृ० ८६)

रूढीस अनुसरून व धर्माच्या नांवानें ज्या शेंकडों गोष्टी आपण नेहमीं करितों त्यांत कित्येक अगदीं निरर्थक आहेत, व कित्येक तर हानिकारक आहेत याकरितां त्यांचा त्याग केला पाहिजे व कित्येक गोष्टींचा प्रचार आपणांत नाहीं पण त्यांची फार आवश्यकता आहे, याकरितां त्या चालू केल्या पाहिजेत असें कित्येक सुशिक्षित लोकांस वाटूं लागलें. कांहीं दिवसपर्यंत असे नुसते विचार मनांत येतां येतां पुढें त्या विचारांप्रमाणें प्रत्यक्ष आचरण घडलें पाहिजे असें मनांत येऊन जेथें इंग्रजी विद्येचा विशेष फैलाव झालेलीं अशीं ह्या देशांतील मुख्य कलकत्ता, मुंबई व मद्रास हीं शहरें तेथेंच वरील उद्देशाच्या सिद्ध्यर्थ प्रथम मंडळ्या स्थापन होऊं लागल्या." ह्यावरून असें स्पष्ट होतें कीं, प्रार्थनासमाज ही संस्था दुबळेपणाचा पसारा घालण्यासाठीं स्थापन झाली नाहीं. विचारांस कृतीचें स्वरूप देण्यासाठीं स्थापन झाली. दुबळेपणाचा आरोप सभासदांनीं तिच्यावर केला व तोही आपला स्वतःचा दुबळेपणा झांकण्यासाठीं. तथापि निदान कांहीं सभासदांस तरी आपण जें कांहीं केलें तें गैर केलें असें वाटत होतें हें "समाजांतील एकदोन सभासद आपण समाजमतांस न मिळणाऱ्या अशा रीतीनें आपल्या मुलांचे उपनयनादि विधि केले म्हणून कांहीं दिवसपर्यंत खिन्न झालेले मला ठाऊक आहेत" अशी जी ग्वाही डा. भांडारकरांनीं दिली आहे तिचेवरून स्पष्ट होतें. ह्यावरून प्रार्थनासमाज ह्या संस्थेचें ध्येय लोकांमध्यें दुर्बलता आणणारें नाहीं एवढी गोष्ट स्पष्ट होते.

"धर्मोन्नत्यर्थ व धर्मबलानें सामाजिक सुधारणा घडून याव्या एतदर्थ प्रार्थनासमाजाची स्थापना झाली" हें म्हणणें ठीक आहे; पण "केवळ आपल्यासारख्या विचारांच्या मनुष्यांसह एकत्र मिळून निराकार, निर्विकार, अत्यंत शुद्ध, मंगल, कृपाळु परमेश्वराची उपासना करून लीन भावानें आध्यात्मिक बलाविषयीं त्याची प्रार्थना करावी आणि लोकमतांत फेरफार होण्याची वाट पहात बसावें" असें प्रतिपादणें हेंच आमच्या ठिकाणीं अनुष्ठानासंबंधानें औदासिन्य उत्पन्न करण्यास कारण झालें नसेल काय? "धर्मबलानें सामाजिक सुधारणा घडवून" आणावयाच्या व "आध्यात्मिक बलाविषयीं" देवाची प्रार्थना करावयाची याचा फार निकट संबंध आहे. "देवा माझी पापापासून सुटका कर" अशी कितीही करुण स्वरानें देवाची प्रार्थना केल्यानें मनुष्याची, आत्मप्रयत्नावांचून, पापापासून सुटका होणें शक्य आहे काय? मनुष्याच्या अंतःकरणांत प्रथम पश्चात्ताप जागृत होईल, नंतर पापनिवृत्तीविषयीं तो उचल घेईल, परंतु पापापासून दूर राहण्याचा

त्यानें प्रयत्न करावयास नको काय? आध्यात्मिक बल प्राप्त झालें आहे किंवा नाहीं हें कृतीवरूनच ठरावयाचें, पण ही अशी कृति कोणी करावयास तत्पर झाला, तर त्यास लोकमतांत फेरफार होण्याची वाट न पहाणारा म्हणून ब्राह्म असें म्हणून जर त्यास हिणवूं लागलों तर धर्मबलाच्या साहाय्यानें सामाजिक सुधारणा कोणच्या काळीं होणार? सारांश, कोणत्याही दृष्टीनें विचार केला तरी आमच्या मंडळांची वरील दिशा चुकलेली होती असें म्हणणें भाग आहे. आध्यात्मिक बलाच्या साहाय्यानें सामाजिक सुधारणा घडवून आणावयाच्या यांत कांहीं गैर नाहीं. तें आमचें ध्येय अगदीं बरोबर आहे आणि ब्राह्मसमाजाचें ध्येयही त्यापेक्षां निराळें नाहीं हें पंडित शिवनाथ शास्त्री यांच्या पुढील विचारांवरूनही स्पष्ट होण्यासारखें आहे:—

The Theistic Church of India lays all the insistence that is possible with its limited energy on living and loving communion with the Supreme as the chief spiritual aim of its members. It is not simply a theological body delighting in clever expositions of nice points of liberal religion, nor is it merely a reformatory organisation, seeking to reform the many social abuses, by which our dear country is afflicted. Of course social reform forms an important part of the programme of its work; but that is only its secondary aim, a part of the conscientious and consistent operation of its principles but its main effort is directed towards enabling men and women to raise themselves to the contemplation of and loving communion with, the Supreme.

—*The Mission of the Brahma Samaj, pp. 29-30.*

म्हणजे याचा अर्थ असा होतो कीं परमेश्वराचें सहाय मागून जें सामर्थ्य प्राप्त होईल त्याचा विनियोग सामाजिक सुधारणेच्या व इतर कार्यांकडे लागणें हें क्रमप्राप्त आहे. जें सत्य आहे, जें न्याय्य आहे, जें आपल्या विवेकास मान्य आहे, जें पवित्र आहे तें आचरणांत आणणें हा आपला धर्म आहे, हें आपलें कर्तव्य

आहे, हें कर्तव्य करण्यास परमेश्वर बल देत असतांना, लोकमतांत फेर झाला नाहीं म्हणून ती जी कर्तव्याची उठलेली ऊर्मी तीस दाबून टाकणें म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराचाच उपमर्द करणें होय.

आम्हांला वस्तुतः एके बाजूला आध्यात्मिक सामर्थ्याच्या वाढीची तळमळ व दुसऱ्या बाजूला देव जो कर्तव्याचा मार्ग दाखवीत आहे त्या मार्गाचें बिन-दिक्कत अनुसरण करणें ह्या दोन्ही गोष्टी एक समयावच्छेदेंकरून व्हावयास हव्या आहेत. ब्राह्मधर्मानुसारें व्यक्तीची उन्नति ती ही अशी. केवळ सामाजिक सुधारणेच्या बाबींस प्राधान्य देऊन शोभेसाठीं ब्राम्ह म्हणवून घेणें हें खऱ्या ब्राम्हाचें ध्येय नव्हे. त्याच्या योगें प्रार्थना किंवा ब्राम्हसमाजांचें विशिष्टत्व नष्ट होईल हें ध्यानांत वागविलें पाहिजे. ब्राह्म नसणारेही बहुत लोक सामाजिक प्रगतीचा पुरस्कार सर्वत्र करीत आहेत. त्यांच्यांत व ब्राम्हधर्मानुयायी म्हणविणारांतील भेद वर दर्शविला आहेच.

असो. आतां आज मुंबईच्या समाजाची अनुष्ठानाच्या बाबतींत काय स्थिति आहे त्याविषयींही प्रांजलपणें दोन शब्द येथें नमूद करितों.

कलकत्त्याहून विवाहविधी मागवून त्या विधीनुसारें आद्य आचार्य मिकोबादादा चव्हाण यांनीं पहिला विवाह लाविला, त्याची आपल्याला आतां माहिती झाली आहे. दुसरा विवाह रा. रा. सदाशिव पांडुरंग केळकर यांचा. ह्या विवाहासाठीं सदाशिवरावांनीं डा. भांडारकरांजवळ बसून विधि तयार करून घेतला. आपल्या समाजाच्या तत्त्वांविरुद्ध विधि करून विवाह होऊं द्यावयाचा नाहीं, असा त्यांचा निश्चय होता. परंतु विधि तयार नाहीं म्हणून ते अडून बसले नाहींत, अगर चालू ओघाबरोबर वहात गेले नाहींत. तथापि हा विधी समाजास सर्वस्वी मान्य होताच असें कांहीं म्हणतां येत नाहीं. निदान समाजाच्या मान्यतेचा त्यावर छाप बसला नव्हता. जर तो मान्य असता, तर त्या वेळचे सेक्रेटरी रा. रा. भास्करराव भागवत ह्यांना चुकीची दुरुस्ती करण्याची आवश्यकता भासली नसती. सदाशिवरावांच्या लग्नाच्या निमंत्रणपत्रिकेवर भास्कररावांची सही होती. नांवाखालीं सेक्रेटरी, प्रार्थनासमाज असें म्हटलें होतें, त्याचप्रमाणें पत्रिकेमध्यें हकीकत प्रसिद्ध करितांना प्रार्थनासमाजमतांनुसार विधि झाला असें म्हटलें होतें. परंतु सेक्रेटरी अशी सही घालण्यांत चूक झाली व हा विधी समाजाच्या सर्व सभासदांस मान्य आहेच असें ह्यावरून समजावयाचें नाहीं अशी पुस्ती जोडण्यांत आली व जुने सर्व विधि पाहून त्यांतील कोठले ठेवावयाचे ते ठेवून तो सर्व समाजमतांनुसार बनविण्यासाठीं

एक कमिटी नेमिली. ह्या विधींत विवाहविधिही घातला होता. त्यावरून डा. भांडारकरांनीं तयार केलेला विधि सर्वानुमतें सर्व पुढारी लोकांस पसंत नव्हता कीं काय अशी शंका यावयास जागा आहे. तथापि सदाशिवरावांचा विवाह झाल्यानंतर एक महिन्यानें रा. ब. शंकरराव पंडित यांचा विवाह जो झाला तो ह्याच पद्धतीनें झाला. ह्यानंतर मुंबईच्या प्रार्थनासमाजामध्यें ह्या पद्धतीनुसार कित्येक विवाह झाले. कित्येक विवाह अर्धवट ह्या पद्धतीनें झाले आहेत. अर्धवट म्हणजे कसे त्याचा येथें खुलासा झाला पाहिजे. पूर्वी पुष्कळ प्रसंगीं असें होत असे कीं, वर व वधू दोन्ही समाजापैकीं नसत. वर समाजापैकीं असला म्हणजे विधीपैकीं वरगृहीं होणारा भाग समाजमतानुसार होत असे. वरगृहीं विवाहामध्यें पुण्याहवाचनावांचून दुसरें कांहीं विशेष व्हावयाचें नसतें. एवढें झालें म्हणजे वधुगृहीं बाकीचे सर्व विधि जुन्या पद्धतीप्रमाणें होत. कधीं कधीं अशा विवाहसमयीं विवाहविधिही समाजमतानुसार झाले; परंतु देवदेवक बसविणें व दुसरे कांहीं प्रकार वधुगृहीं जुन्या रीतीनें झाले. परंतु आतां प्रत्यक्ष सभासदांस जुने विधि करणें सहसा जमावयाचें नाहीं असें वाटतें. कारण सन १९२० सालीं समाजाच्या साधारण सभेमध्यें एक असा नियम झाला आहे कीं ज्याच्या योगें प्रत्येक सभासदास अशी प्रतिज्ञा करावी लागते कीं, माझ्या कुटुंबांतील सर्व कार्यें मी एकेश्वर विधीनुसारें करीन व सर्व प्रसंगीं प्रतिमापूजनाचा त्याग करीन. ह्या प्रतिज्ञेचाही भंग करणें कोणास अशक्य आहे असें नाहीं. खरें पहातां अशा प्रकारची प्रतिज्ञा करावयास न लागतां सर्व सभासदांनीं पूर्वीपासून ध्येयपालनाविषयीं दक्षता दाखवावयास पाहिजे होती. पण तशी दाखविली गेली नाहीं. ह्याउप्पर प्रत्येक सभासदाला परमेश्वरास साक्ष ठेवून आपल्या कुटुंबांतील गृह्य कार्याच्या वेळीं कोणती गोष्ट करावयाची व कोणती न करण्याची प्रतिज्ञा केली आहे याची आठवण राहील. १९२० सालापासून आतांपयत जे सभासद झाले त्यांच्या हातून प्रतिज्ञाभंग झाल्याचें अद्याप ऐकिवांत नाहीं.

ह्या सर्व विवेचनावरून ब्राह्मधर्माच्या अनुष्ठानासंबंधाच्या आजपर्यंतच्या प्रार्थनासमाजांतील इतिहासाची वाचकांस कल्पना होइल. **परंतु केवळ सर्व विधि समाजमतांनुसार केले म्हणजे तेवढ्यानें ध्येयपालन होत नाहीं, ब्राह्मधर्मानुष्ठानही पूर्ण होत नाहीं.** अनुष्ठान व इतर बाबतींतील ध्येयपालन ह्या दोन्ही गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून प्रत्येक सभासदाच्या जीवनांत घडून आल्या पाहिजेत, असें वर म्हटलेंच आहे. "देवाच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान संपादन करून

म्हणजे ज्ञानी होऊन, देवच आपली एक उत्तम गति असें समजून त्याला चिकटून राहून, आपला सर्व आचारविचार करणें हेंच एक प्रार्थनासमाजाचें ध्येय आहे." असें डा. भांडारकरांनीं म्हटलें आहे* आणि हें ध्येय स्त्री व पुरुष अशा दोहोंसही सारख्या रीतीनें लागू आहे ही एक गोष्ट प्रथम लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. प्रचलित हिंदु धर्मांत धर्मसाधनाच्या बाबतींतही स्त्रीपुरुषांस समान अधिकार नाहींत. अध्ययन व कर्तव्यें ह्यासंबंधानें स्त्रियांना अगदीं कमी दर्जाचें स्थल दिलेलें आहे. प्रार्थना अगर ब्राह्मसमाज हा असला कृत्रिम भेद न करितां स्त्रियांवरही ध्येयनिष्ठा व ध्येयपालन ह्यांसंबंधानें सारखी जबाबदारी आहे असें मानतो. ज्याप्रमाणें पुरुषास समाजाचें सभासद होतां येतें त्याप्रमाणें स्त्रीसही सभासद होतां येतें; ज्याप्रमाणें पुरुष साधक बनून स्वतःच्या कुटुंबांत, इतरांच्या कुटुंबांत व सामाजिक उपासना चालवितो त्याचप्रमाणें स्त्रीसही तो अधिकार पोंचतो. कोणीही व्यक्ति केवळ पुरुष आहे म्हणून त्याला तो अधिकार ज्याप्रमाणें प्राप्त होत नाहीं, त्याचप्रमाणें कोणीही व्यक्ति केवळ स्त्री आहे म्हणून तिचा तो अधिकार जात नाहीं. कलकत्याच्या साधारण समाजांत ज्याप्रमाणें स्त्रिया सभासद आहेत, स्त्रिया उपासना चालवितात, त्याचप्रमाणें मुंबईच्या समाजांत स्त्रिया सभासद असून स्त्रिया उपासनाही चालवितात. उमाबाई केळकर ह्या मुंबई समाजाच्या पहिल्या सभासद होत. ह्यावरून इतकें उघड होतें कीं, ब्राह्म धर्माच्या ध्येयाचें परिपालन व संवर्धन स्त्रीपुरुषांनीं मिळून करावयाचें असतें. तें जेथें होतें तेथें ब्राह्म धर्माचें उज्ज्वल स्वरूप पहावयास सांपडतें. उत्तम ग्रंथांचें नित्य वाचन, मनन, व्यक्तिगत व कौटुंबिक प्रार्थनेविषयीं जणूं काय व्रतस्थ असणें, सामाजिक उपासनेविषयीं आस्था बाळगून त्यांस कुटुंबांतील सर्व व्यक्तींसह नियमानें हजर राहणें, सर्व संसार, संसारांतील सर्व कार्यें, परस्परांशीं होणारे सर्व व्यवहार, उपजीविकेसाठीं करावे लागणारे सर्व उद्योग, ह्या सर्वांत धर्मसाधन आहे. ज्या वेळीं आपण न्यायानें, नीतीनें, धर्मबुद्धीनें प्रेरित होऊन संसारांतील कार्यें करीत असतों, त्या वेळीं केवळ कर्मसाधन करीत नसतों तर तें धर्मसाधनच होय; ही भावना जागृत ठेवून वागणें; परमेश्वराचें ज्ञानस्वरूप, प्रेमस्वरूप, आनंदस्वरूप, व सर्वशक्तिमत्व ह्या आपल्या संसारांत नित्य दिसतें, अनुभवास येतें त्याचें ज्ञान करून घेऊन समरस होणें हें आमचें ध्येय आहे. अनुदार विचार, अनुदार

---

* धर्मपर व्याख्यानें पृ. ४६७.

कृति, अनुदारपणा दर्शविणारी वृत्ति, हें आमचें ध्येय नव्हे. सर्व कार्यांमध्यें, सर्वस्थळीं व सर्वकाळीं परमेश्वर परमात्मा आपल्या सांगाती आहे हा विश्वास दृढ करून, परमेश्वराची इच्छा जाणण्याचा प्रयत्न करून, तदनुसार निश्चयानें प्रेमपुरःसर वागणें हें आमचें ध्येय. आतां असा विश्वास असून, हें आपलें ध्येय आहे, अशी निष्ठा असून ध्येयापासून पतन होणें, किंवा देवाचें भजन, ध्यान आणि त्याला प्रिय अशीं सदाचाराचीं कृत्यें न करणें, स्वार्थाकडेच दृष्टि असणें, परार्थाची उपेक्षा होणें, प्रपंचाकडेच सर्व लक्ष्य असणें, असे प्रकार होणें अशक्य नाहीं, एवढेंच नाहीं तर, वारंवार असे प्रकार होतातही. तेव्हां अशा वेळीं पश्चात्ताप पावून आत्मपरीक्षण करून परमेश्वरास शरण जाणें, त्याची करुणा भाकणें व जें सामर्थ्य प्राप्त होईल त्याचा उपयोग ध्येयपालनाकडे करणें, व केव्हांही आपल्या अनुष्ठानामध्यें बिघाड होऊं न देणें, परमेश्वराची आज्ञा त्यानें दिलेल्या विवेकानुसार वागणें अशीच आहे, अशी खूणगांठ बांधून विनत भावानें वागणें हें प्रार्थनासमाजाच्या सभासदाचें कर्तव्य आहे. केवळ विधीकलाप ब्राह्मधर्मानुसारें केल्यानें कोणी ब्राह्म होत नाहीं; अगर केवळ उपासना मार्ग पत्करिल्यानें, व सर्व बाबतींत धर्मतत्त्वानुसार न वागल्यानें कोणीही प्रार्थनासमाजाचा योग्य सभासद होत नाहीं. दोन्ही बाजूकडे सारखी दृष्टि पाहिजे. ध्येयपालनामध्यें ह्या सर्व गोष्टी येतात.

## गुरुवर्य डा. भांडारकरांचा अभिप्राय.

शेवटीं १९१३ सालीं, मृत्यूपूर्वी एक तप आधीं, गुरुवर्य डा. भांडारकर ह्यांनीं धर्मानुष्ठान व ध्येयपालन ह्यासंबंधानें दिलेला अभिप्राय त्यांच्याच शब्दांत येथें देऊन हें प्रकरण संपवितों.

"प्रार्थनासमाजाचा धर्म हा एकांतिक भक्तिधर्म आहे, म्हणजे अनेक देवता न मानून एकाच ईश्वराचें प्रेमपूर्वक भजनपूजन करावें आणि तें भजनपूजन आध्यात्मिक योगानें म्हणजे बाह्य चिन्हांचा आश्रय न करितां करावें. तेव्हां आध्यात्मिक योगानें भजनपूजन निरपवाद रीतीनें व्हावें एतदर्थ **प्रपंचांतील सर्व प्रसंगीं अनेक देवता व बाह्य चिन्हें यांचा परित्याग करून केलें पाहिजे** तरच त्या धर्माचा परिणाम आपल्या आत्म्यावर व आचरणावर झाला असें समजावयाचें. अमूकच एका प्रसंगीं देवाशीं अध्यात्मयोग करावा आणि दुसऱ्या प्रसंगीं अनेक देवतांचीं चिन्हें पुढें ठेवून त्याची पूजा करावी हें मनुष्यास

आध्यात्मिक उन्नतीस प्रतिबंधक आहे. उच्च स्थलापासून त्याला गर्तीमध्यें पाडून टाकण्यासारखें आहे. अशा प्रकारचें सरासरी चाळीस वर्षांमागें मी मुंबईस होतों तेव्हां समाजांतील मंडळींनीं परस्परांशीं एक कराराचें पत्रक तयार करावें असा बेत घाटत होता. ( मामा परमानंदांनीं १८७४ सालीं लिहिलेल्या व त्यांच्या चरित्रांत दाखल केलेल्या पत्रासंबंधानें हा उल्लेख आहे.–सं. ) त्यांत प्रपंचांतील सर्व धर्मकृत्यें आपल्या मतास अनुसरून आध्यात्मिक योगानें करावीं व त्यामुळें ज्ञातींनीं बहिष्कार घातला असतां परस्परांस चिकटून रहावें असें आपणास बांधून घ्यावें असा आशय होता. पण अशा प्रकारच्या कराराच्या पत्रकांनीं सुधारणा होणें नाहीं. तुकोबानें म्हटल्याप्रमाणें, सुधारणुकीच्या कमामध्यें आपुलिया बळें आपण कांस घालावी आणि मागें फिरोनियां दुसरा सांगिया साह्यकारी कोणी येत आहे कीं काय असें पाहूं नये, **हें तत्त्व आतां सर्वांनीं** गृहीत केलें आहे. परंतु **ह्या तत्त्वास अनुसरून आचरण ज्यांचें होत नाहीं असे पुष्कळ आहेत.** ज्ञाति किंवा संबंधी ह्यांस भिऊन आपल्या धर्ममतांच्या विरुद्ध अनेक देवतांचें आणि मूर्तींचें अवलंबन निमूटपणें करितात; हें कांहीं आपल्या धर्ममार्गास श्रेयस्कर नाहीं. त्याच्या प्रगतीस फारच प्रतिरोधक आहे. करितां या गोष्टीचा शांतपणें विचार केला पाहिजे.

विवाहविधि, किंवा उपनयनविधि, अथवा गणेशचतुर्थी किंवा होळी ह्यांच्या संबंधानें कांहीं तरी निमित्त सांगून यांतील मूर्तिपूजेचा आपल्या आचरणांत प्रवेश करवावा हें सर्वथा उचित नाहीं. सणांच्या संबंधानें तरी लोकांकडून अगर संबंध्यांकडून आपणास विशेष त्रास होण्यासारखा नाहीं. परंतु उपनयन व विवाहविधि यांच्या संबंधानें होण्यासारखा आहे. उपनयन **जर करावयाचें असेल तर** तें नवीन सुधारलेल्या प्रकारानें करणें इष्ट आहे, आणि करावयाचें नसेल तर धर्मप्रवेशाच्या विधीचा दुसरा कोठला तरी प्रकार योजिला पाहिजे. उपनयनापेक्षां विवाहविधीचा विषय हा विशेष कठीण आहे. त्यांत दोन पक्ष असतात. ते दोन्ही पक्ष प्रार्थनासमाजानुयायी असल्यास अडचणच नाहीं. ( नाहीं कशी ? वधुपिता, वरपिता दोघेही समाजाचे सभासद, दोघेही पदवीधर, वरही पदवीधर व वधूही चांगली सुशिक्षित, पण विधि मात्र सर्व जुना असा प्रकार घडलेला आहे.–सं. ) नवीन पद्धतीनें त्या विधीचें अनुष्ठान त्यांनीं करावें. **जातीविषयीं किंवा संबंधियांविषयीं भीति मनामध्यें** आणून **जुन्या पद्धतिकडेस जाण्याचे दिवस आतां उरले नाहींत.** कोणी म्हातारेतुतारे ह्या गोष्टीस प्रतिकूल अस-

ल्यास त्यांस अनुकूल करून घेतलें पाहिजे. १८७२ चा तिसरा कायदा ह्याचें अवलंबन केलें असतां, मी हिंदु, मुसलमान किंवा ख्रिस्ती इ० धर्माचा अनुयायी नाहीं अशी शपथ घ्यावी लागते ती घेण्यास कित्येकांची तयारी नसते. असें जर आहे, तर एक मार्ग राहिला कीं कायदेशीर रीतीनें मुलाचा पितृरिक्थावर वारसा स्थिर रहावा म्हणून तदनुसारें पित्यानें मृत्युपत्र करण्याचा प्रघात घातला पाहिजे. अशा रीतीनें तिसऱ्या कायद्याचा आश्रय न करितांना पुष्कळ विवाह झाले कीं, तत्संबंधीं आमच्या पंथाची चालच रूढीमध्यें येईल. मात्र असें झालें पाहिजे कीं तिसऱ्या कायद्याच्या आश्रयानें झालेलीं कांहीं लग्नें आहेत, आणि त्याशिवाय झालेलीं दुसरीं आहेत; असें न होतांना सर्वच त्याचा आश्रय न घेतां झालीं पाहिजेत म्हणजे ती चाल रूढ होईल. आजपर्यंत कायद्याच्या आश्रयाशिवाय झालेलीं अशीं लग्नें बरींच आहेत आणि त्याच्या आश्रयानें केलेलीं अशींही आहेत. हें द्वैविध्य मात्र नसावें. आतां जेव्हां उभयपक्ष भिन्न पंथाचे आहेत, तेव्हां वरपक्ष जर समाजानुयायी आहे, तर वधुपक्षास अनुकूल करून घेतलें पाहिजे. आणि अशांचींही उदाहरणें आहेत. आणि वरपक्ष जुन्या पंथाचा असल्यास बऱ्याच अंशीं अडचण येईल तथापि ती दूर करण्याचे प्रकार नाहींत असें नाहीं. एकंदरींत आपल्या धर्ममार्गावर जर आपली पूर्ण श्रद्धा आहे, **तर आपले सर्व विधि आणि सण केवळ आपल्या मार्गासच अनुसरून झाले पाहिजेत.**”

# सुबोधपत्रिका.

## ( सत्यमेव जयते. )

[ पूर्वभाग ]

१८७२ सालीं थिईस्टिक ॲसोशिएशनची स्थापना झाल्यानंतर मंडळी स्वस्थ बसली नाहीं. मंडळीचा मुख्य जो उद्देश कीं "परस्परांच्या साहाय्यानें शुद्ध भाविक आचरण आणि धर्मसंबंधीं सत्य हीं आपण स्वतः साध्य करून अन्यत्र प्रसृत करावीं, आणि सदाचार आणि व्यावहारिक सुधारणा यांची वृद्धि करावी" तो केवळ सभा करून, त्यांत निबंध वाचून व त्यांवर वादविवाद होऊन पूर्ण होणें नाहीं हें मंडळीच्या लक्ष्यांत आलें व हा हेतु ( धर्मसंबंधीं सत्य प्रसृत करणें ) सिद्धीस नेण्यासाठीं उपाययोजना करण्याकडे मंडळीचें लक्ष्य वेधलें. 'धर्म, सदाचार व व्यवहार' ह्या विषयांवर अल्प किमतीचीं पुस्तकें प्रसिद्ध करण्याच्या विचारांत मंडळीचें एक साप्ताहिक पत्र असावें हा विचार पुढें आला व तो सर्वमान्य झाला. मंडळीचें साप्ताहिक पत्र असावें, हा विचार अगदींच नवीन नव्हे हें येथें सांगितलें पाहिजे. हिंदु रिफार्मर पत्राच्या संपादकांनीं समाजाचा हेतु व नियम ह्यांसंबंधानें ता. १ आगस्ट १८६७ रोजींच्या आपल्या अंकांत ज्या वेळीं मित्रत्वाच्या नात्यानें टीका केली त्याच वेळीं असें सुचविलें होतें कीं, "ज्या कोणास ह्या सभेचीं मतें जाणून घेणें आहेत किंवा परब्रह्मधर्मासंबंधानें कांहीं माहिती किंवा खात्री करून घेणें आहे, तर ह्या मंडळीकडून त्यासंबंधानें कांहीं योजना असावी. लोकांनीं जर सभेच्या चिटणिसांस लिहावें तर उत्तरें देण्यांतच त्यांचा सर्व काळ निघून जाईल. व आम्ही त्यांस कांहीं पगारही देत नाहीं, तेव्हां हें ओझें त्यांवर कसें घालावें ? अथवा कित्येक संभावित ( गृहस्थ ) एकेश्वरभक्तींत तत्पर खरे, परंतु कांहीं शंका येतात त्या चिटणिसांकडे लिहून पाठविण्यास संकोच वाटतो. कारण, ( तसें केलें तर ) आपलें नांव दिलें पाहिजे. नाहीं तर उत्तर कसें मिळणार अशा अडचणी येतात. **याकरितां मंडळीनें एक वर्तमानपत्र प्रसिद्ध करावें;** अगर हल्लीं शहरांत जीं प्रसिद्ध होत असतात त्यांस आपला आश्रय देऊन तें मंडळीचेंच अंगभूत आहे असें मानून धर्मसंबंधीं पत्रव्यवहार, प्रश्नोत्तरें किंवा व्याख्यानें वगैरे जें प्रसिद्ध करणें तें करावें. येणेंकरून सर्व हिंदुस्थानभर पत्रद्वारा आपल्या मताची प्रवृत्ति होऊन आपल्या सत्कृत्यास बळकटी येत जाईल" ह्यांतील

जी दुसरी सूचना कीं शहरांत प्रसिद्ध होणाऱ्या पत्रांपैकीं एखादें अंगभूत समजून त्यास आश्रय द्यावा, ती मंडळीस पसंत न पडून वर म्हटल्याप्रमाणें एक लहानसें साप्ताहिक पत्र काढण्याचा मंडळीचा विचार कायम झाला व त्या पत्रास **सुबोध पत्रिका** हें नांव द्यावयाचें व पत्राचें धोरण जें सत्य तेंच प्रतिपादावयाचें; कारण सत्याचा नेहमीं अंतीं जय होतो ह्याचें निदर्शक वाक्य–सत्यमेव जयते–हें घालावयाचें असें ठरून ता. ४ मे रविवार १८७३ रोजीं लहान रायल साइजमध्यें ८ पृष्ठांचा ( विविधज्ञानविस्तार आकार ) पहिला अंक प्रसिद्ध झाला. याचा खप फार व्हावा व गोरगरिबांसही हें घ्यावयास सुलभ जावें म्हणून प्रत्येक अंकाची किंमत फक्त एक पैसा ठेवण्यांत आली होती. वास्तविक पहातां ह्या ठिकाणीं पहिल्या अंकाचा नमुना व त्यांतील उद्देशाविषयींचा लेख येथें देणें जरूर होतें. परंतु तसें करणें शक्य नाहीं हें येथें नमूद करणें अवश्य आहे. सुबोधपत्रिका हें पत्र एका संस्थेच्या मालकीचें खरें, परंतु त्याची व्यवस्था निरनिराळ्या व्यक्तींकडे, निरनिराळ्या ठिकाणीं गेल्यामुळें पहिल्या २५ वर्षांतील सर्व वर्षांचे अंक समाजापाशीं नाहींत. ते निरनिराळ्या ठिकाणांहून आणविण्याचा प्रस्तुत लेखकाचा प्रयत्नही व्यर्थ गेला आहे! त्यामुळें सुबोधपत्रिकेचा प्रथमांक निघाल्यावर दुसऱ्या पत्रानें काय लिहिलें तेवढें देऊनच आम्हांस वाचकांची जिज्ञासा तृप्त करणें भाग आहे. ता. १५ मे १८७३ च्या ज्ञानोदयांत आम्हांला पुढील मजकूर सांपडला:—

" **नवें पत्र**—येथील प्रार्थनासमाजानें एक नवीन लहानसें मराठी पत्र चालू केलें आहे, त्याचें नांव **सुबोधपत्रिका.** हें सुमारें ज्ञानोदयाच्या (आजच्या नव्हे, पूर्वींच्या–सं. ) सांचाचीं ८ पृष्ठें असून सुंदर टैपांनीं छापलेलें आहे. हें दर रविवारीं सकाळीं निघतें आणि याचा खप फार व्हावा व गरीब गुरिबांससुद्धां घेतां यावें म्हणून याची किंमत फार थोडी म्हणजे दर प्रतीस एक पैसा व सालिना १२ आणे ठेविली आहेत. यांत " धर्म नीति व्यवहार वगैरे उपयुक्त विषयांवर" निबंध, व्याख्यानें, भाषान्तरें, प्रसिद्ध ग्रंथांतील निवडक वेंचे हीं प्रसिद्ध केलीं जातील. हें पत्र व त्याचा उद्देश ह्यावरून आम्हांस फार संतोष वाटतो. "

आतां ह्या पत्राच्या व्यवस्थेमध्यें कसा फरक झाला याची थोडीशी कल्पना करून देण्यापूर्वी येथें एका गोष्टीचा उल्लेख करणें जरूर आहे. सन १८९९ पर्यंत सुबोधपत्रिका हें पत्र नांवाचें थीइस्टिक ॲसोशिएशनच्या मालकीचें होतें. तथापि प्रथमपासून तें प्रार्थनासमाजाच्या ध्येयानुसार चाललेलें आहे. एकेश्वर

मंडळीचें ज्यांस सभासद व्हावयाचें त्यांस प्रतिमापूजन अमान्य असावेंच लागत नसे; प्रतिमापूजन हा ईश्वरोपासनेचा खरा मार्ग नव्हे, असें म्हणावयास कबूल नसूनही कोणासही मंडळीचें सभासद होतां येत असे. तरी पण पत्र समाजाच्या ध्येयानुसार चालविलें गेलें. ह्याचें मुख्य कारण असें कीं, समाजाच्या बाहेरची मंडळी जरी थीइस्टिक ॲसोशिएशनमध्यें होती, तरी संपादकीय व इतर जबाबदारी ही समाजांतील कित्येक सभासद आपल्यावर घेत आले. नांवाची मालकी मात्र ॲसोसिएशनची होती. मराठी पत्र जेव्हां निघालें त्याच सुमारास सुबोधपत्रिकेची गुजराथी आवृत्तिही निघूं लागली होती. व ह्या गुजराथी आवृत्तीचे कांहीं सुटे अंक प्रस्तुत लेखकानें पाहिलेले त्यास स्मरतात. समाजाचे एक वृद्ध सभासद सांगतात कीं, रा. जयशंकर भट नांवाच्या गृहस्थांनीं प्रथम दोन्ही आवृत्तींसंबंधानें खटपट करण्याचें मनावर घेतलें. मे महिन्यांत पत्र निघालें, व पुढें ज्या वेळीं पाऊस पडावयाचा त्या वेळीं पडला नाहीं, अवर्षणाची भीति वाटूं लागली म्हणून समुद्रकिनारीं महायज्ञ सुरू करण्यांत आला. त्या वेळीं हें महायज्ञाचें खूळ कमी व्हावें व यज्ञावर पावसाचें येणें व न येणें अवलंबून नाहीं याविषयीं सुबोधपत्रिकेनें लोकांची योग्य समजूत घालण्याचा प्रयत्न केला व त्या यज्ञाच्या संधींत पत्रिकेच्या शेंकडों प्रती रा. जयशंकर हे संपवीत असत असें हे वृद्ध गृहस्थ कळवितात. त्या वेळीं सुबोधपत्रिका काळकादेवीवरील एका छापखान्यांत छापिली जात असे. परंतु नंतर गुजराथी आवृत्ति बंद करण्यांत आली व ह्या गृहस्थांनीं तिची जबाबदारी सोडिली, व रा. रा. सदानंद बाळकृष्ण पालेकर ह्या गृहस्थांनीं सुबोधपत्रिकेची जबाबदारी आपल्यावर घेऊन तिची सर्व व्यवस्था उत्तम ठेविली. प्रथमतः ते त्या वेळच्या नांवाजलेल्या ईगल प्रिंटिंग प्रेसमध्यें पत्रिका छापून घेत असत; परंतु नंतर त्यांनीं स्वतः Indian Printing Press नांवाचा एक छापखाना काढिला व पत्रिकेची व छापखान्याची व्यवस्था आपला एक पुतण्या रा. आत्मारामपंत यांजवर सोंपविली. ह्या छापखान्यांत पत्रिका छापिली जात असतांना तिनें समाजाची व लोकांची अत्युत्तम सेवा बजाविली. रा. पालेकरांच्या कारकीर्दीतच पत्रिका इंग्रजी व मराठी भाषांत प्रसिद्ध होऊं लागली. ह्यांच्या ताब्यांत पत्रिका असतांनाच तिचा आकार लागोपाठ दोन वर्षें* वाढत

---

* पत्रिकेचा आकार वाढवावा हा विचार रा. रा. सदानंदजी ह्यांच्या मनांत बरेच दिवस घोळत असावा तथापि विचार निश्चित न झाल्यामुळें व सर्व सामा-

गेला; ह्यांच्या ताब्यांत पत्रिका असतांनाच तींत सर्व प्रकारचा भरपूर मजकूर येऊं लागला; आत्मारामपंतांनीं निरनिराळ्या लेखकांच्या घरोघर फिरून लेख जमवावे; गुरुवर्य डा. भांडारकर म्हणत कीं, मी तर पुढें पुढें ह्याच तरुण इसमास विनोदानें सुबोधपत्रिकेचा संपादक म्हणूं लागलों; इतकी ह्या कामीं हा तरुण गृहस्थ आस्था दाखवीत असे कीं, तो दाराशीं आला असतां त्याला रिक्तहस्तें पाठविणें जिवावर येत असे ! अशा प्रकारें पत्रिकेचें पुष्कळ वर्षें मुलाप्रमाणें पालन केलेले हे गृहस्थ रा. रा. सदानंदजी पालेकर ता. ३ दिसेंबर १८९३ रोजीं मधुमेहाच्या विकारानें परलोकवासी झाले. त्या वेळीं सुबोधपत्रिकेनें पुढील उद्गार काढिले:—

---

नाची व लेखकांची जुळवाजुळव न झाल्यामुळें नव्या वर्षाचे ४ अंक त्यांनीं लहान आकाराचेच काढले व पांचव्या अंकापासून, म्हणजे ता. १ जून १८७९ पासून मोठा आकार करून भरपूर मजकूर देण्याची व्यवस्था केली. त्या वेळीं दीड रुपया वर्गणी करितांना पुढील खुलासा केला होताः—

" गेल्या साहा वर्षांत याची किंमत एक पैसा होती. या पत्राची योग्यता कितीही असो त्याचा विचार करणें वाचकांकडेस आहे. परंतु तें लिहून केवळ छापून काढण्यासही एक पैसा किंमत थोडी आहे असें कोणीही कबूल करील. तथापि ह्या स्वस्त दरानें गरीबगुरिबांस हें पत्र प्राप्त व्हावें म्हणून होईल तितका प्रयत्न करण्यांत आला. परंतु लोकांकडून मिळावें तसें उत्तेजन न मिळाल्यामुळें आम्हांस खर्च भागविण्यास फार अडचण पडली. शिवाय आमच्या वर्गणीदारांमध्यें असे धर्मात्मे मिळाले कीं वर्षाच्या वर्षें पत्र घेऊन पैसा चुकविण्यास ते आळस करीत आहेत. एकंदरींत पत्राची किंमत वाढविणें जरूर पडलें आहे." अशा प्रकारें दोन वर्षें नुकसान सोसून त्यांनीं स्वतःच्या जबाबदारीवर हें पत्र चालविलें. पण, भरभराटीचीं कांहीं लक्षणें दिसेनात. तेव्हां आठव्या वर्षाच्या अखेरीस त्यांनीं पुढील निर्वाणीचा बाण सोडला ! " ह्या आठ वर्षांत वर्गणीदारांनीं करावी तशी मेहेरबानी करून वर्गणी वेळेवर न भरल्यामुळें लोकांवर पुष्कळ बाकी थकली आहे. त्यामुळें हें वर्ष पुरें झाल्यावर पत्रिका चालू राहण्याची भ्रांति वाटते. म्हणून ह्या आणीबाणीच्या वेळेस सर्व वर्गणीदारांस सुचविण्यांत येतें कीं, जर ते आपलें कर्तव्य बजावून बाकीचा निकाल विलंब न लावितां करतील तरच पत्राचे चालविणारे मोठ्या खुशीनें पत्र चालू ठेवितील." ह्या सूचनेचा परिणाम

"सदानंदजींची वृत्ति त्यांच्या नांवाप्रमाणें असून, त्यांचें अंतःकरण व आचरण हीं दोन्ही निर्मळ असत. ते येथील प्रार्थनासमाजाच्या प्रमुख सभासदांपैकीं एक होते, इतकेंच नाहीं, तर समाजास तन, मन, धन यांहींकरून आस्थेनें मदत करीत असत. अलीकडे प्रकृति अस्वस्थ असल्यामुळें मंदिरांत उपासनेस येणें त्यांच्याकडून नियमानें होत नसे. तथापि आपल्या घरींच कुटुंबांतील माणसांसह चार घटका प्रेमानें ईश्वरप्रार्थना करून ब्रह्मानंदसुखाचा अनुभव घेत असत आणि सदानंदजींचा हा नित्यक्रमच असे. आमच्या सुबोधपत्रिकेला तर ते केवळ धर्मपित्याप्रमाणें होते. तिची व्यवस्था बरेच दिवस त्यांजकडे होती व त्या वेळीं तिच्या उत्कर्षांकरितां द्रव्याचें बरेंच नुकसान सोसून योग्य वाटेल तितके परिश्रम करण्यास त्यांनीं मागें पुढें पाहिलें नाहीं. सदानंदजी हे बाळ मंगेश वागळे व नारायणरावजी परमानंद यांचे सहाय्यायी होते." पालेकरांनीं पत्रिकेसाठीं बरीच झीज सोसिली व कदाचित त्यांनीं आणखीही अशाच प्रकारें ती चालविली असती. तथापि रा. आत्मारामपंतांच्या मृत्यूमुळें त्यांनीं पत्रिकेची व्यवस्था व जबाबदारी सोडिली व ती रा. रा. रामभाऊ माडगांवकरांनीं आपल्याकडे घेतली. रामभाऊंनीं त्या वेळीं एक शास्त्रीबोवा लेखक म्हणून ठेविले होते. त्यांच्या वेळींही सुबोधपत्रिकेची व्यवस्था पूर्वीप्रमाणेंच चालली होती. नंतर रा. रा. सदाशिवराव केळकर समाजाचे मिशनरी झाल्यापासून त्यांचे बरेचसे लेख पत्रिकेमध्यें येऊं लागले. माडगांवकरांनंतर रा. रा. मोरोपंत वाळवेकरांकडे १८९४ एप्रिल अखेर पत्रिकेची व्यवस्था असे. त्यांनीं स्वतःच्या मालकीचें सुबोध-

---

असा झाला कीं, पत्र बंद करूं नये अशीं पुष्कळ पत्रें आलीं. परंतु "कित्येकांनीं पत्र बंद करून जुनी बाकी पाठविली नाहीं. तेणेंकरून पत्रिकेचा कर्जाचा बोजा फार वाढला आहे. कित्येक सूज्ञ व या सार्वजनिक कामाचे हितचिंतक अशा मित्रांनीं आपणांकडील बाकी पाठविली व पत्र बंद न व्हावें अशा उत्सुकतेनें सूचनाही केल्या......अशा वर्गणीदारांच्या आग्रहास्तव व कांहीं अंशीं इतकीं वर्षें चाललेलें पत्र बंद न होईल तर बरें, असें वाटल्यावरून पुन्हां आम्हीं तें चालवून पहाण्याचा निश्चय केला आहे." अशा प्रकारें पत्र आणखी चालवून पहातांना, त्याचा आकार त्यांनीं पुन्हा वाढविला. कागद अधिक चांगला घेतला, व पुरवण्या घालून मजकूर आणखी वाढविला! तरी पण सांपत्तिक स्थिति म्हणण्यासारखी सुधारली नाहीं. रा. सदानंदजींनीं आपला खर्च मात्र वाढविला व तो मोठ्या औदार्यानें सहन केला.

प्रकाश नांवाचें पत्र काढलें होतें. तें त्यांनीं सुबोधपत्रिकेमध्यें सामील केलें व सुबोध-पत्रिका आठ नऊ वर्षें आपल्या जबाबदारीवर चालविली. पुढें रा. रा. सदानंदजी पालेकर ह्यांचे चिरंजीव रा. रा. दीनानाथ पालेकर ह्यांनीं कांहीं महिने पत्रिकेची व्यवस्था पाहिली. त्यांनीं सुबोधपत्रिकेचें स्वरूप कांहींसें बदललें. म्हणजे पूर्वी 'मुंबई' ह्या सदराखालीं समाजासंबंधाच्या बातम्या वगैरे येत. तें काढून टाकून इंग्रजी व मराठी बाजूंकडे "प्रार्थनासमाज" हें हेडिंग सुरू करून येथील व बाहे-रच्या समाजासंबंधाच्या बातम्या ह्या सदराखालीं देण्याचा क्रम सुरू केला. थोड्याच महिन्यांनीं पत्रिकेची सांपत्तिक जबाबदारी जरी त्यांनीं नाकारिली तरी ही अंतर्व्य-वस्था कायम राहिली. त्यांच्यानंतर "डा. भांडारकर, न्या. मू. म. गो. रानडे, शेट दामोदरदास गोवरधनदास, रा. रा. ना. ग. चंदावरकर, व रा. रा. दी. वि. गाडगांवकर ह्यांच्या साहाय्यानें रु. १५०० ची रक्कम उभी करून ती. रा. रा. ना. रा. घुमरे ह्यांस पत्रिका छापून प्रसिद्ध करण्याकरितां कांहीं अटीवर दिली."* रा. घुमरे पत्रिका आपल्या ज्ञानमित्र छापखान्यांत छापीत असत. मध्यंतरीं एक वर्ष रा. के. आनंदराव ह्यांच्या साहाय्यानें पत्रिकेची व्यवस्था यशस्वी झाली होती. त्यांनीं अनेक प्रकारें खटपट करून नुकसान न होतां पत्रिका चालविली. एवढें एक वर्ष खेरीज करून नुकसान झाल्यावांचून पत्रिका केव्हांच प्रसिद्ध झालेली नाहीं. ही व्यवस्था कांहीं वर्षें चालली व १८९९ सालीं सुबोधपत्रिका समाजानें आपल्या ताब्यांत घेतली व ह्यापुढें नुकसानीसंबंधाची सर्व जबाबदारी समाजावर आली.

मध्यंतरीं १९०५–६ सालीं प. वा. डा. काणे यांच्या देणगीचे जे पंधराशें रुपये आले होते त्याच्या साहाय्यानें सुबोधपत्रिका छापखाना स्वतंत्रपणें घालून त्यांत सुबोधपत्रिका छापण्याचा प्रयत्न झाला; ह्यासाठीं नारायणराव घुमरे यांचा सर्व छापखाना व आणखी कांहीं नवीन सामान घेण्यांत आलें होतें. डॉ. भांडारक-रांच्या धर्मपर व्याख्यानांच्या पहिल्या आवृत्तीचीं पुष्कळशीं पृष्ठें देशी कागदावर ह्याच छापखान्यांत छापिलीं आहेत. परंतु छापखाना चालविण्यास योग्य व्यवस्था-पक न मिळाल्यामुळें छापाखाना नुकसान सोसून विकावा लागला.

कांहीं वर्षें रा. रा. सदाशिव पांडुरंग केळकर हे कामगार नांवाचें पत्र चालवीत असत. त्याच्या पुष्कळशा प्रती ग्रीव्हस् कॉटन कंपनीच्या तर्फे त्यांनीं

* १८९४-९५ सालचा रिपोर्ट.

चालविलेल्या गिरण्यांत खपत असत. त्यांनीं पुढें आपलें पत्र बंद करून कामगार पत्र सुबोधपत्रिकेंत सामील केलें व पत्रिकेच्या प्रती गिरण्यांतून जाऊं लागल्या. सुमारें आठशें प्रती अशा प्रकारें खपत असत. पुढें ह्या गिरण्या चांगल्या चालेनातशा झाल्या; पत्रिकेमध्यें कामगारांस उपयुक्त असा मजकूर येण्याचें थांबलें; त्यामुळें ग्रीव्हस कॉटन कंपनीनें आपला आश्रय बंद केला; गिरण्यांचा व त्या कंपनीचा संबंध सुटला व सुबोधपत्रिकेमध्यें कामगाराचें नांवाचें अस्तित्व जें दिसत होतें तें नाहींसें झालें. हल्लीं सुबोधपत्रिकेची सांपत्तिक स्थिति फार असमाधानकारक आहे. कांहीं वर्षांपूर्वी पुन्हा एकदां खटपट करून पत्रिकेस वार्षिक देणगी देणारे मिळविण्यांत आले. अशा देणग्या देणाऱ्यांपैकीं सालिना दीडशें रुपयांपासून पन्नास रुपयांपर्यंत देणगी देणारे अद्याप टिकून आहेत. शिवाय प. वा. वामन वासुदेव नवरंगे ह्यांच्या स्मरणार्थ नवरंगे कुटुंबाकडून जी दाहा हजार रुपयांची समाजास देणगी मिळाली तिच्या व्याजांतून दरसाल अडीचशें रुपये सुबोधपत्रिकेस मिळत असतात. तरी छपाईचा खर्च फार वाढलेला असल्यामुळें व जाहिरातींचें उत्पन्न कमी झाल्यामुळें सुबोधपत्रिकेसाठीं दरसाल एक हजार रुपयांचें नुकसान समाजास सोसावें लागतें. आज पुष्कळ वर्षें पत्रिका कर्नाटक छापखान्यांत छापिली जात आहे. त्याचे पत्रिका छापण्याचे दर इतर छापखान्यांच्या मानानें अधिक नाहींत तरी समाजाला ते भारी पडत आहेत. तथापि समाजाचें धर्मप्रसाराचें काम सुबोधपत्रिका सतत ५३ वर्षें करीत आहे हें ध्यानीं वागवून हें पत्र इतकें नुकसान सोसून समाज चालवीत आहे. समाजाकडे सुबोधपत्रिका आल्यापासून पुष्कळ व्यवस्थापक झाले. त्यांपैकीं कांहींचीं नांवें:—रा. रा. द्वा. गो. वैद्य, ए. एम्. सय्यद; जयराम नाना; ग. ल. वैद्य; ग. य. चिटणीस; ग. ल. भांडारे; इ. हल्लीं सुबोधपत्रिकेच्या व्यवस्थापकाचें काम रा. रा. विष्णु बल्लाळ वेलणकर ह्यांजकडे आहे व ते तें व्यवस्थित रीतीनें करीत आहेत.

याशिवाय सुबोधपत्रिकेच्या कायमच्या फंडासाठीं आपली तीन हजार रुपयांची विम्याची पालिसी रा. द्वा. गो. वैद्य यांनीं समाजाच्या स्वाधीन केली आहे. त्याचप्रमाणें रा. वा. धों. केळकर ह्यांनीं ४ टक्के व्याजाचा पोर्टट्रस्टचा एक हजार रुपयांचा बॉंड सुबोधपत्रिकेस दिला आहे. मात्र त्यांच्या मागें त्याचें व्याज पत्रिकेस मिळावयाचें आहे. तसेंच डा. काशीबाई नवरंगे ह्यांनीं ६ टक्के व्याजाच्या दोन हजारांच्या नोटा गतवर्षी समाजाच्या हवालीं केल्या त्यांच्या व्याजापैकीं दरसाल प. वा. वासुदेवराव नवरंगे ह्यांच्या स्मरणार्थ रु. १०० सुबोधपत्रिकेस मिळावयाचे आहेत.

## सुबोधपत्रिकेनें केलेल्या कार्याचें स्वरूप.

हें स्वरूप सुसंगत रीतीनें येथें नमूद करणें अवघड व अशक्य कार्य झालें आहे. कारण, पूर्वी म्हटल्याप्रमाणें, समाजाच्या ताब्यांत १८७३ पासूनच्या पत्रिकेच्या फाइली नाहींत व त्या कोणा सभासदाच्या घरींही नाहींत. पूर्वी म्हणजे १९०१ सालापर्यंत येथील नेटिव्ह जनरल लायब्ररीमध्यें प्रभाकर, हिंदु रिफार्मर, सुबोध पत्रिका वगैरे पत्रांच्या अगदीं जुन्या फायली होत्या; परंतु लायब्ररी खेतवाडींत नेण्याच्या वेळीं ठेवण्याचा खर्च कमी करण्यासाठीं ह्या जुन्या फाइली विकून टाकण्यांत आल्या असें कळतें ! समाजाचे एक हितचिंतक रा. मिटबांवकर ह्यांनीं १८७७ दिसेंबरपासून १८८२ पर्यंतच्या फाइली समाजास बक्षिस दिल्या तेवढयाच अगदीं जुन्या फाइली हल्लीं अस्तित्वांत आहेत. ह्या फाइली मिळाल्यामुळेंच ईश्वरविषयक ज्ञान, ह्या विषयावरील विस्तृत लेख, संचिताचा नाश, केसरी व प्रार्थनासमाज, केसरीच्या उद्दाम उड्या, सणांत शिमगा व ग्रंथांत पुराणें, वेद व पुराणें, त्याचप्रमाणें सनातन एकांतिक अथवा एकेश्वरी धर्म इ. विषयांवरील गुरुवर्य डा. भांडारकरांचे लेखांचा संग्रह करणें शक्य झालें; ह्या सर्व लेखांनीं जवळ जवळ १४० पृष्ठें व्यापिलीं आहेत हें पाहिलें म्हणजे रा. मिटबांवकरांनीं दिलेल्या ह्या देणगीनें समाजाचें किती अमोल कार्य झालें आहे याची कल्पना होते. त्याचप्रमाणें सुबोधपत्रिकेच्या सर्व वर्षांच्या फाइली समाजापाशीं नसल्यामुळें जी एकंदर हानि झाली आहे तिचा विचार मनांत येतांच मन खिन्न झाल्यावांचून रहात नाहीं. ह्या पहिल्या २५ वर्षांत जे अनेक महत्त्वाचे लेख व त्याचप्रमाणें महत्वाचे उपदेश पत्रिकेंत प्रसिद्ध झाले त्यांपैकीं पुष्कळांस समाज आतां कायमचा मुकला आहे. तथापि ह्या झालेल्या हानीबद्दल खेद करीत न बसतां जुन्या मंडळीनें सुबोधपत्रिकेच्या द्वारा जें लोकशिक्षणाचें, विचारजागृतीचें, सत्यविचारप्रसाराचें कार्य केलें आहे त्याचा विचार मनांत आला म्हणजे मन आनंदानें भरून येतें व असें वाटतें कीं, धन्य हे लोक कीं ज्यांनीं आपल्या दोषांची जागृति असून आपल्या ध्येयाचें पावित्र्य राखण्याचा नेहमीं प्रयत्न केला. आपल्या व आपल्या सभोंवतालच्या लोकांच्या दुबळेपणाची छाया आपल्या उच्च ध्येयावर सुबोधपत्रिकेच्या संपादकांनीं केव्हांहि पडूं दिलेली नाहीं. नातेवाईक, मित्र, सभासद, थोर योग्यतेचा पुरुष हा विचार सुबोधपत्रिकेच्या संपादकांनीं आपणांस शिवूं दिला नाहीं. व एका सत्याच्या रक्षणार्थ, धर्माचें उच्च ध्येय व उच्च साध्य दृष्टीपुढें ठेवून, कोणाच्याही दोषांकडे विनाकारण कानाडोळा न करितां निर्भीडपणें सुबोधपत्रिकेनें कार्य केलें आहे

राजकारण हा पत्रिकेचा मुख्य विषय नव्हे, तथापि राजकारणाच्या सावलीस उभें रहावयाचें नाहीं असा बाणा पत्रिकेनें केव्हांच बाळगिला नाहीं. उलट We shall try to avoid as much as possible all debate. But, when we cannot avoid it, we shall try to discuss principles and personalities असें आश्वासन इंग्रजी बाजू जोडल्यानंतर पहिल्याच अंकांत देऊन ज्या वेळीं अनेक विषयांची चर्चा सुरू झाली, त्या वेळीं अनेक विषयांवर निर्भीडपणें विचार पत्रिकेंत येऊं लागले. स्त्रीशिक्षण, उच्च शिक्षण, नीतिविषयक चर्चा, राजकीय चळवळ, निरनिराळ्या घडणाऱ्या प्रसंगांपासून घेण्यासारखे धडे असे विषय घेऊन सर्वत्र स्पष्टोक्ति व स्पष्ट विचार आलेले आढळतात. ब्रम्हानंद केशवचंद्र सेन यांच्याकडे सर्व हिंदुस्थानाचें लक्ष ज्या काळीं होतें त्या काळीं त्यांच्या हातून ध्येयपालन झालें नाहीं हें सुबोधपत्रिकेनें दाखवून दिलें व त्यापेक्षां केशवचंद्र सेनांनीं लग्न मोडलें असतें तर ब्राह्मसमाजाच्या कीर्तीत भर पडली असती असें पत्रिकेनें म्हटलें. केशव बाबू जेव्हां उठतां बसतां ख्रिस्तमहिमा गाऊं लागले, त्या वेळीं सुबोधपत्रिकेनें त्यांची कानउघाडणी करून सांगितलें कीं, इकडे दयानंद सरस्वतींनीं वेदांचा अर्थ करितांना आपल्या कल्पना व आपले विचार त्यांस जुळतील अशा कल्पनांचा व अर्थांचा वेदवचनांवर आरोप करणें हें ज्याप्रमाणें आम्हांस त्याज्य वाटतें त्याचप्रमाणें केशव बाबूंचें ख्रिस्ताच्या वचनांचा मनमानेल तसा अर्थ लावणें व आपल्या लाडक्या कल्पना बायबलमध्यें घालून तदनुसार अर्थ करणें हेंही आम्हांस अयोग्य वाटतें. दोघेही धर्मकार्य करण्याचा आविर्भाव दाखवून सत्यहानि करीत आहेत.

सुबोधपत्रिकेची स्पष्टोक्ति केवळ आपल्या लोकांपुरतीच होती आणि सरकारचा संबंध आला म्हणजे मग मूग गिळले जात असाही कोणी समज करून घेण्याचें कारण नाहीं. १८७८ तील गोष्ट. स्त्रीशिक्षणाची चळवळ मुंबईत सुरू होती. मुलींना इंग्रजी शिक्षण कसें द्यावयाचें, काय काय शिकवावयाचें, त्यासंबंधानें चर्चा चालू असे, अशा वेळीं अलेक्झांड्रा गर्लस्कूलचा बक्षिस समारंभ त्या वेळचे गव्हर्नर सर रिचर्ड टेंपल ह्यांच्या अध्यक्षतेखालीं झाला व त्यांनीं भाषण केलें. त्यांनीं पाश्चात्य स्त्रिया शिक्षणामुळें कशा पुढें गेल्या आहेत, सर्व देशांतील स्त्रियांत त्यांचा दर्जा कसा उच्च आहे, वगैरे गोष्टींचा तेवढा उल्लेख केला होता हें पाहून गव्हर्नर साहेबांस थोडा अकलेचा वळसा द्यावयास पत्रिकेनें मागेंपुढें पाहिलें नाहीं. पुढील वाक्यें पहा "In all that His Excellency said there was

however nothing new as calculated practically to meet present wants or defects.... we wish that in future Sir Richard Temple will speak less frequently in public, so that we may have better chances of having from him something really practical, something that may be a real contribution to the cause of progress "

प्रार्थनासमाज कोणताही धर्मग्रंथ सर्वांशानें ग्राह्य मानीत नाहीं; परमेश्वर सावयवरूपानें अवतार घेत नाहीं; सर्व धर्मग्रंथांतील ग्राह्यांशाचें परम आदरानें सेवन करावयास समाज तयार आहे; हें सर्व खरें; पण हें ज्ञान व्हावयाचें कशाच्या जोरावर ? विवेकाच्याच ना ? पण, विवेकाची सांगी सर्वत्र सारखी कोठें असते ? म्हणून विवेकग्राह्य जें तेंच घ्यावयाचें हें म्हणणें विवेकालाच पटत नाहीं अशी जेव्हां विरुद्ध टीका मधून मधून होऊं लागली त्या वेळीं पत्रिकेंत एका इंग्रजी* लेखांत म्हटलें:—

Theists should no doubt find in the dictates of conscience the voice of God. But in what conditions must the conscience itself be to be the vehicle of the voice of God? It must be educated as Reason, Taste and Human faculties must be, in the light of knowledge of all kinds that mankind has hitherto acquired and of the progress it has made from barbarism to civilization. The conscience that teaches that a Brahman howsoever base, sinful and inhuman, should be worshipped with all devotion, is according to our lights not an enligh-

---

*डा. भांडारकर इंग्रजी बाजूलाही लेख लिहीत असत असें त्यांनीं स्वत: सांगितलें होतें व त्यांनीं तसे लेख दाखविलेही होते. हा लेख त्यांपैकीं एक असावा.

हा उतारा फार मोठा आहे, तरी पण तो जशाचा तसाच येथें अशासाठीं घेतला आहे कीं, समाजाचे संस्थापक व पुढारी विवेकाला ज्या वेळीं महत्त्व देत असत त्या वेळीं Conscience संबंधानें त्यांच्या मनामध्यें कोणता आदर्श होता हें स्पष्ट व्हावें. आजही वरील आदर्श उपयोगाचा नाहीं असें कोण म्हणेल ?

tened conscience. The conscience that commands the followers of the orthodox faith in any country to murder heretics and makes toleration a sin, does not convey to us the voice of God. Secondly a devotion to self-interest, and a habit of subjection to the ruling passions, often corrupts and warps conscience so as to make it not the voice of God, but of the power that is constantly thwarting the purposes of God, in the existence of which the followers of certain religious believe. Thirdly the declarations of conscience with regard to the same act are different according as the relation of surrounding circumstances are different. Killing a man who is inoffensive is wrong, but a judge killing a man who has himself murdered another man, is not. In both cases the act of killing is the same, but the relations are different. Thus, then, it appears, to us that the responsibility of a theist who would follow his conscience unflinchingly as the voice of God is very great. He must educate and enlighten his conscience, avail himself of all kinds of knowledge, of the moral ideas and teachings of all good men, just as an educator of his Taste must place before him all the modes of beauty that were ever approved by men of genius subject himself to a severe discipline so as to be free from the slavery of passion and self-interest and view each particular case in all its relations before he discovers in it a command from God. Otherwise he will in all cases completely deceive himself and fall away from the path of God and there is no enormity that he may not come to believe to be a virtue."

प्रार्थनासमाजाच्या सभासदांच्याविरुद्ध लिहिण्याचे प्रसंग आजपर्यंत सुबोधपत्रिकेला अनेक वेळां आले आहेत. त्या वेळीं पत्रिकेनें स्पष्टपणें टीका करण्याचें उदाहरण घालून दिलें आहे व त्याचेंच अनुकरण व अनुसरण आजपर्यंत होत आलें आहे. १८८० सालीं रा. रा. गोपीनाथजी सदाशिवजी हाटे यांच्या प्रायश्चित्ताचा प्रश्न मुंबईत जोरांत होता. हे प्रार्थनासमाजाचे आस्थेवाईक सभासद होते. पत्नीच्या स्मरणार्थ त्यांनीं प्रार्थनासमाजास दिलेलें Organ समाजानें नवें आरगन बक्षिस मिळेपर्यंत वापरलें. हे गृहस्थ १८७९ सालीं विलायतेहून परत आले. तेथें ते पालिठाणाच्या ठाकुरांच्या कांहीं कामासाठीं गेले होते. परत आल्यानंतर वर्ष दीड वर्ष सर्व कांहीं यथास्थित चाललें होतें. त्यांचीं मुलें ज्ञातींत जात होतीं. लग्नकार्यास त्यांस आमंत्रणें येत होतीं. परंतु नंतर ज्ञातींत दोन पक्ष होऊन त्यांस त्रास देण्याच्या हेतूनें कोणी हें प्रकरण पेटविलें व त्या वेळीं गोपिनाथजींनीं कांहीं लोकांपुढें मान वांकवून प्रायश्चित्त घेऊन लोकांस अनन्वित उदाहरण घालून दिलें. त्यापूर्वी रा. ब. शंकर पांडुरंग पंडितांनीं प्रायश्चित्त न घेण्याचें उदाहरण घालून दिलें होतें. त्यांच्यासंबंधानें बहिष्कार प्रकरण उद्भवलेंही नाहीं! गोपिनाथजींच्या ह्या कृत्याबद्दल सुबोधपत्रिकेनें विरुद्ध टीका करून प्रथम प्रायश्चित्त न घेण्याचा उपदेश केला व तरी त्यांनीं तें घेतल्यानंतर त्यांनीं नव्या पिढीस पिच्छेहाटीचें उदाहरण घालून दिल्याचें दाखवून दिलें. व म्हटलें कीं, " जातिप्रकरणांत आपण जितकें अधिक मन घालावें आणि त्यास जितकें अधिक भ्यावें तितकें तें अधिकच पाठीस लागतें. आपण बेपर्वाईनें वागून बराच वेळ धीर धरिला म्हणजे तें आपोआप दबतें व सर्व नीट होतें.... आपलें सर्वांहून श्रेष्ठ कर्तव्य करण्यांत ज्या अडी येतात त्या एकीकडेस ठेविल्या असतां आपलें ऐहिक नुकसान व लोकांत अपकीर्ति होत असली तरी कर्तव्यास धरून चालावें. हें कृत्य विचारशून्य नव्हे स्तुत्यर्ह होय असें आम्हांस वाटतें. " नारायणीं घडे जेणें अंतराय। हो का बाप माय त्यजावे ते " ह्या साधूच्या वाक्याचाही हाच भावार्थ आहे असें आम्ही समजतों." त्याचप्रमाणें माधवराव रानडे, चिंतामणराव भट वगैरे मंडळींनीं जेव्हां प्रायश्चित्तें घेतलीं, तेव्हां हे मोठे लोक आहेत, विद्वान् आहेत, श्रीमंत आहेत, आपले पुरस्कर्ते आहेत हा विचार सुबोधपत्रिकेनें आपल्याला शिवूं दिला नाहीं व ह्या पुढाऱ्यांनीं प्रार्थनासमाजाच्या ध्येयाला सर्व प्रकारें कमीपणा आणून लोकांस फार वाईट उदाहरण घालून देऊन संस्थेच्या कार्यांत मोठी धोंड उत्पन्न केल्याचें दाखवून दिलें. त्याचप्रमाणें एका वृद्ध, धर्मशील, समाजासंबंधानें

अत्यंत आस्था दाखविणाऱ्या गृहस्थांनीं एका उदार विचारांच्या सुशिक्षित तरुणाशीं आपल्या मुलीचा विवाह केवळ रजिस्टर करून लावून दिला, नवा विधि केला नाहीं, प्रार्थना केली नाहीं, चार मित्रांस बोलाविलें नाहीं, ह्याबद्दल त्या वयोवृद्ध गृहस्थास दूषण द्यावयास पत्रिकेनें मागें पुढें पाहिलें नाहीं. तथापि ध्येयपालनाच्या दृष्टीनें पहातां पहिल्या तीस वर्षांत एका बाबतींत बरीच ढिलाई झाल्याचें पत्रिकेच्या उपलब्ध फाइली वाचून आम्हांस नाइलाजानें म्हणावें लागतें. १८७८ त रा. ब. शंकरराव पंडितांचा सोलापूर मुक्कामीं सदाशिवराव केळकरांच्या विवाहाच्या वेळीं तयार झालेल्या नव्या पद्धतीनुसार ज्यावेळीं विवाह झाला त्या वेळीं पत्रिकेनें लोकांस जागें करण्यासाठीं असा स्पष्ट इषारा दिला कीं, " **ह्याप्रमाणेंच जर इतर सभासद् आपल्या येथील कार्यें करितील तर बोलणें एक आणि करणें निराळें अशा रीतीचा जो दोष लोक त्यांस देतात त्यास जागा राहणार नाहीं.**" असा इषारा, पत्रिकेनें पुढें दिला नाहीं किंवा समाजांतील मंडळींत राजरोसपणें जुन्या रीतीचे मुलांमुलींचे विवाह झाले तरी ह्या ध्येयपतनाबद्दल कोठें चर्चा झालेली, अगर समाजमतांस अनुसरूनच विवाह व्हावेत अशी जोराची चळवळ सुरू केलेली आम्हांस आढळली नाहीं.

पहिल्या पंचवीस वर्षांच्या अवधींत ज्यांनीं संपादकाचें व लेखकाचें, व ज्यांनीं आजपर्यंत इंग्रजी संपादकाचें कार्य केलें त्यांच्याविषयीं येथें थोडी माहिती देणें जरूर आहे.

मामा परमानंदानीं सुबोधपत्रिकेची सेवा अगदीं अखेरपर्यंत केली. त्यांच्या ह्या सेवेचें वर्णन त्यांच्या अल्पचरित्रांत पहावयास सांपडेल. ते कधींमधीं मराठींतही लहान लहान लेख लिहीत असत व हे बहुतकरून पहिल्या चार वर्षांच्या अंकांत आले असावेत. डा. भांडारकरांचे पुष्कळसे मराठी लेख धर्मपर लेखांत संग्रहित आहेत. त्यांचे मराठी लेख एकत्र करण्याची प्रथम कल्पना मामांची. त्यांनीं ईश्वरविषयक ज्ञान या विषयावरील सर्व लेख एकत्रित करून ते पुन्हा वाचून पाहून त्यांत कमीअधिक करण्यासाठीं डा. भांडारकरांपाशीं दिले होते. परंतु त्या वेळीं तें कार्य त्यांचे हातून झालें नाहीं. लिहिलेले लेख नष्ट झाले व आतां ते पुन्हा छापण्याची संधि येणें शक्य नाहीं असें त्यांस वाटत असतां ते एकत्रित करण्याचा योग जमून आला. ते कधींकधीं इंग्रजींतही लेख लिहीत असत. ते अंतस्थ पुराव्यावरून सहज ओळखतां येतात. विशेषतः ईश्वरविषयक ज्ञानावरील कांहीं लेखांचा सारांश, बुद्धधर्मनीति व बुद्धचरित्रांतील कांहीं प्रसंग

यासंबंधाचे इंग्रजी लेख त्यांचेच असावेत. रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांचे कांहीं लेख व व्याख्यानें इंग्रजी बाजूकडे आलेलीं आहेत. आम्हांस असें कळतें कीं, रा. रा. रामभाऊ माडगांवकर इंग्रजी व मराठी अशा दोन्ही बाजूंकडे कधींकधीं लिहीत असत. परंतु ते लेख कोणते हें कळावयास मार्ग नाहीं, याबद्दल फार दिलगिरी वाटते. रा. रा. केळकरांचे पुष्कळ लेख पत्रिकेंत आले आहेत. त्यांचा उल्लेख त्यांच्या चरित्रांत पहावयास सांपडेल. त्यांचे लेख स्पष्ट, भाषा शुद्ध, विचारसरणी सरळ, पुष्कळ वेळां लेखांत मार्मिक विनोद व लेख अघळपघळ असत. त्यांचे लेख वाचून त्यांच्या स्पष्ट विचारसणीबद्दल व साध्या, सुंदर भाषेबद्दल मोठा आदर वाटे. रा. रा. दीनानाथराव माडगांवकर हे कित्येक वर्षें सुबोधपत्रिकेचे संपादक होते. त्यांचे बहुतेक लेख आध्यात्मिक व भक्तिपर आहेत. परंतु त्यांच्या लेखांत जो मुख्य दोष असे तो हा कीं, लहान लहान वाक्यें त्यांस लिहितांच येत नसत. दाहा पंधरा ओळींचें एक वाक्य असा प्रकार वारंवार घडे. रा. रा. वासुदेव गोपाळ भांडारकर हे कित्येक वर्षें सुबोधपत्रिकेचे इंग्रजी बाजूचे संपादक होते. ह्यांचे लेख भक्तिपर व तत्त्वज्ञानविषयक व सामाजिक विषयांवर असत. ह्यांचे अग्रलेख अतिशय विचारपूर्वक व गंभीर विचारांनीं ओतप्रोत भरलेले असत. Tears of an Aged Parent, Hindu Social Life ह्या विषयांवर एकेक लेखमाला त्यांनीं लिहिली. ज्या अंकांत Tears गळलेलीं आहेत ते अंक उपलब्ध नाहींत. ह्या लेखकानें ते लेख वाचले आहेत. रा. रा. श्रीधरपंत भांडारकर हे पत्रिकेच्या दोन्ही बाजूंस फुरसतीच्या व कधीं कधीं अगदीं अडल्या वेळींही लेख लिहीत असत. १८९३ सालच्या अंकांत त्यांचे पुष्कळ लेख आले आहेत. मामा परमानंदांवरील इंग्रजी लेख श्रीधरपंतानींच लिहिलेला आहे. त्याचप्रमाणें सुबोधसंग्रह नामक पुस्तकांत जे धर्मपर लेख ग्रथित केले आहेत ते सर्व त्यांचेच आहेत. कांहीं दिवस रा. रा. जगन्नाथ नारायण परमानंद, बी. ए. हे पत्रिकेंत इंग्रजी बाजूकडे लहान लहान स्फुट लेख लिहीत असत. त्यांची लेखनशैली त्यांच्या तीर्थरूपांसारखीच आहे. त्यांनीं Rambler अशा सहीनेंही कांहीं स्फुट लेख पत्रिकेसाठीं लिहिले आहेत. सर नारायण चंदावरकरांचे लेख सुबोधपत्रिकेंत पुष्कळच आलेले आहेत. त्यांच्या लेखांच्या संग्रहामध्यें त्यांपैकीं कांहीं आले आहेत व त्यांच्या पुष्कळ लेखांचें व व्याख्यानांचें रूपांतर मराठींत झालेलें वाचकांस माहीत आहेच. त्यांची इंग्रजी भाषेवरील सत्ता, गाढ विद्वत्ता, लेखनशैली, विचारसरणी, भक्तिभाव अपूर्व होतीं. इंग्रजी

बाजूच्या संपादकांपैकीं रा. रा. वामन सदाशिव सोहोनी, यज्ञेश्वर वासुदेव भांडारकर व यशवंत नारायण टिपणीस ह्यांनीं पुष्कळवर्षे इंग्रजी बाजू सांभाळली. सर नारायण यांचीं पुष्कळशीं व्याख्यानें रा. रा. टिपणीस ह्यांनीं लिहिलेलीं आहेत. रा. सोहनी यांचा स्फुट लेख लिहिण्यांत हातखंडा असे. रा. यज्ञेश्वरपंत अध्यात्मिक विषयावर मननीय लेख लिहीत असत. हल्लीं डा. गजानन यशवंत चिटणीस सुबोधपत्रिकेच्या इंग्रजी बाजूचे संपादक आहेत.

---

## सुबोधपत्रिका
### ( उत्तरभाग )

( लेखक—रा. रा. नरहर रघुनाथ फाटक, बी. ए. न्या. मू. रानडे ह्यांच्या चरित्राचे कर्ते. )

मराठी भाषेंतल्या वृत्तपत्रांचा इतिहास लिहितांना ज्या वृत्तपत्राला कोठेंना कोठें विशेष स्थान देणें अवश्य आहे, त्याचा प्रार्थनासमाजाच्या इतिहासांत प्रमुखपणें सविस्तर निर्देश न झाला तर ती मोठीच उणीव राहील या भावनेनें पुढील हकीकत लिहिली जात आहे. रा. द्वारकानाथ गोविंद वैद्य हे आज तीस वर्षे सुबोधपत्रिकेच्या संपादकाचें कार्य करीत आहेत. एका शतकाच्या चतुर्थांशाची सीमा ओलांडणाऱ्या दीर्घकाळांत ज्यानें या साप्ताहिकाची संपादकीय धुरा वाहिली त्याच्या कामगिरीची माहिती त्यानेंच लिहावयास घेतलेल्या प्रार्थनासमाजाच्या इतिहासांत गोवणें औचित्याला सोडून होईल याची जाणीव त्यास असल्यामुळें ही माहिती आपल्या पुस्तकांत मुळींच नको, असेंच त्याचें निश्चत मत होतें. परंतु इतिहासाचा उणेपणा घालविण्याच्या हेतूनें रा. वैद्यांचें मत धाब्यावर बसवून हें लहानसें कार्य प्रस्तुत लेखकानें स्वीकारलें आहे. यामुळें औचित्यांत उत्पन्न होणाऱ्या व्यंगाची जबाबदारी सर्वस्वी लेखकावर आणि ही माहिती प्रार्थनासमाजाच्या इतिहासांत समाविष्ट करावयास भाग पाडणाऱ्या इष्टमित्रांवर आहे.

रा. वैद्यांचा पत्रिकेशीं तीस वर्षांमागें संबंध जडला. १८९६ सालीं ते प्रार्थनासमाजांत दाखल झाले व १८९७ सालच्या आगस्ट महिन्यांत सुबोधपत्रिकेची व्यवस्था त्यांच्याकडे आली. तेव्हांपासून आजपर्यंत ही व्यवस्था वर म्हटल्याप्रमाणें त्यांच्या हातीं आहे. प्रार्थनासमाज हा एक नव्या मतांचा

धर्मपंथ, त्याच्या तत्त्वांचा प्रसार करण्यासाठीं सुबोधपत्रिकेचा अवतार झालेला. अवताराच्या आरंभीं ज्यांनीं या धर्मपंथाला जन्म दिला त्या धडाडीच्या कर्त्या पुरुषांनीं पत्रिकेला लेखनसाह्य करून वाढविलेलें आणि नांवारूपास चढविलेलें, त्यांची जागा भरून काढणें व त्यांची जबाबदारी तितक्याच कुशलतेनें सिद्धीस नेणें हें कार्य सोपें नव्हतें. तथापि रा. वैद्य यांनीं तें कार्य स्वीकारलें आणि आजवर अविरत जोमानें चालविलें, यांतच त्यांच्या आंगचें सामर्थ्य दिसून येतें. आपला पंथ धर्माच्या जीर्णोद्धाराचा आहे व त्याकरितां जगांत सर्वत्र सुरू असलेल्या धर्मचर्चेकडे चौफेर नजर ठेवणें अवश्य आहे, अशी खूणगांठ मनाशीं बांधूनच रा. वैद्य सुबोधपत्रिकेचें संपादकीय कर्तव्य बजावीत आहेत. परंतु इतर वृत्तपत्रांचे संपादक आणि रा. वैद्य यांच्यांत एक महत्त्वाचा फरक आहे. आपलीं मतें व तत्त्वें बुद्धिवादानें लोकांच्या गळीं उतरविलीं पाहिजेत हें त्यांना पूर्णपणें ठाऊक असल्यानें सामान्य राजकीय वृत्तपत्रांमध्यें दुसऱ्यावर येन केन प्रकारेण मात करावयाच्या इच्छेस अनुसरणारा स्वमताभिमानाचा जो आवेश दृष्टीस पडतो तो त्यांच्या लेखनांत बिलकूल आढळत नाहीं. समाजाच्या मतांबाहेरच्या विषयावर रा. वैद्य कधींच लिहीत नाहींत असा मात्र याचा अर्थ नव्हे. दुसऱ्या वृत्तपत्रांप्रमाणें सुबोधपत्रिकेंत नाना विषयांचा ऊहापोह असतो. अविचारमूलक चळवळी निघाल्यास त्यांवर निर्भीड टीका करण्याला रा. वैद्य मागें पुढें पहात नाहींत, पण दुसरीं वृत्तपत्रें त्याच विषयावर लिहूं लागल्यास जो कडवा सडेतोडपणा दाखवितील त्या कडव्या सडेतोडपणाला रा. वैद्य बळी पडल्याचीं उदाहरणें बहुधा दाखवितां येणार नाहींत. तथापि यावरून कोणीं असा समज करून घेऊं नये कीं, रा. वैद्य आपले विचार संदिग्ध ठेवतात. असा प्रकार मुळींच नाहीं. दुसऱ्यांच्या मानानें त्यांच्या भाषासरणींत मार्दवाचा आणि युक्तिवादाचा भाग अधिक असतो. पण त्यामुळें त्यांच्या विचाराची दिशा स्पष्ट लक्षांत येण्याला अडचण पडत नाहीं.

येथवर रा. वैद्य यांच्या सामान्य लेखनशैलीचें विवेचन झालें. ही शैली त्यांच्या कार्यास पोषक आहे. पण सुबोधपत्रिकेंत लिहिलेल्या प्रचलित विषयांवरील लेखांहून त्यांनीं बजावलेल्या दुसऱ्या कामगिरीची थोरवी विशेष आहे. रा. वैद्य यांनीं या कामगिरीच्याद्वारें केवळ प्रार्थनासमाजाचीच सेवा केलेली नसून मराठी भाषेची सेवा केलेली आहे. रा. वैद्य सुबोधपत्रिकेच्या संपादकीय आसनावर येण्यापूर्वी प्रार्थना समाजाच्या व्यासपीठावरून कळकळीचे समाजभक्त आपल्या अध्यात्मप्रचुर धर्म-

विचारांचा उपदेश सारखा करीत होते. पण या उपदेशाचा ओघ ग्रंथाच्या संच-यांत धरून त्याचा महाराष्ट्रांतल्या भावी पिढयांना उपयोग करून देण्याची कल्पना रा. वैद्यांचे अगोदर कोणासच झालेली नव्हती. भांडारकर, मोडक, रानडे यांनीं धर्म-प्रवचनें करावीं, तीं ऐकत असतां श्रोत्यांनीं तल्लीन होऊन डुलावें आणि काम संप-ल्यावर घरोघर निघून जावें, या भंगुर स्थितीला पायबंद लावून ग्रंथरूपानें समाजां-तील उपदेशाला चिरस्थायित्व आणण्याचें कार्य रा. वैद्य यांनीं केलेलें आहे. हें कार्य जर त्यांनीं केलें नसतें तर समाजाविषयीं लोकांचे प्रतिकूळ ग्रह लयास जाऊन त्यांची दृष्टि निवळण्याचा मार्गच खुंटला असता. जे धर्मपंथाचे जनक आणि प्रवर्तक त्यांच्या विचारांचा संग्रह केल्यानें त्यात्या पंथांतल्या लोकांना स्फूर्तीचा, समा-धानाचा आणि निष्ठेचा सांठा सांपडतो, हें सुप्रसिद्ध आहे. दरदिवशीं नव्या परि-स्थितीच्या अनुरोधानें रंग पालटणाऱ्या राजकारणांतल्या सांप्रदायिकांना जर आपल्या पंथप्रवर्तकांच्या विचारांचा गाथा निर्माण करण्याची आवश्यकता भासते, तर ज्याचा मानवी जीविताशीं अत्यंत जिव्हाळ्याचा अकृत्रिम संबंध त्या धर्म-विषयांत क्रान्ति करणारांच्या विचारांचें त्या त्या पंथालाच नव्हे तर सर्वसामान्य बहुजनसमाजाला किती महत्त्व असेल याची कल्पनाच करणें उत्तम ! प्रार्थनासमा-जाच्या बाबतींत रा. वैद्यांनीं हें आद्यप्रवर्तकांच्या विचारसंग्रहाचें काम केलेलें आहे. त्यासाठीं त्यांना कष्ट सोसावे लागले. भांडारकर प्रभृति प्रार्थनासमाजाचे पुढारी आपलें धार्मिक हृद्गत बोलून जात. ते विचार कागदावर उतरून ठेवून पुढच्या लोकांकरितां जतन करण्याची फिकीर बाळगीत नव्हते. त्यांचे विचार एकाग्र चित्तानें अंतःकरणांत सांठवून पुनः त्यांच्याच तळमळीच्या व कळवळीच्या शब्दांनी कागदावर व्यक्त करावयाचें हें काम सोपें नाहीं. अतिशय उत्कट आस्था असल्याशिवाय तें कोणीं पत्करलेंच तर शेवटास जावयाचें नाहीं. शंका असेल त्यांनी अनुभव घेऊन पहावा. त्याच त्याच मुद्दयांचीं व त्याच त्याच ठराविक भाषेमध्ये प्रकट होणारीं राजकीय व्याख्यानें जशींच्या तशीं अहवाल रूपानें वृत्तपत्रांत द्यावयाचीं म्हटल्यास लघुलेखन पद्धतीच्या अभावीं किती त्रास पडतो याचा अनुभव असणारांना प्रतिप्रसंगीं धर्मासारख्या रुक्ष कठिण विषयांत अंगउपांगांचे अधिकारी व्यक्तींच्या मुखांतून बाहेर पडणारीं प्रवचनें अस्सलाबरहुकूम उतरून काढण्याच्या मानसिक श्रमाबद्दल जास्त सांगावयास नको. पण रा. वैद्य यांनी अशा श्रमसायासाची पर्वा न बाळगतां रानडे भांडारकर यांच्या प्रवचनांचा संग्रह केला. ही त्यांची सुबोधपत्रिकेचे संपादक या नात्यानें विशेष कामगिरी आहे

याशिवाय त्यांनीं निर्माण केलेलें वाङ्मय पुष्कळच आहे. १८९७ मध्यें त्यांनीं पत्रिकेची संपादकीय लेखणी हातांत धरली असली तरी त्यांच्या प्रचलित राजकीय व धार्मिक विषयावरील व्यासंगाचा ठाव काढूं लागल्यास वरील सालाच्या पुष्कळच मागें जावें लागतें. साधारणतः जगाचा व्यवहार समजण्याची प्रगल्भता बुद्धीला आल्या पासून ते या विषयांच्या माहितीचीं टिपणें, चिकट बुकें ठेवीत आले आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं. सुबोधपत्रिकेचे संपादक, प्रार्थना-समाजाचे सभासद व चिटणीस या नात्यानें महाराष्ट्रांतल्या विशिष्ट विचार-परंपरेचें प्रतिनिधित्व त्यांच्याकडे आलेलें आहे. ही विचारपरंपरा लोकांत आज नकळत मान्य व रूढ झालेली असली तरी तिच्या उत्पादकाविषयींचे दुष्ट ग्रह लोकांत थोड्या फार अंशांनीं अद्यापि कायम आहेत. हे ग्रह दूर करण्याची संधि रा. वैद्य बहुधा दवडीत नाहींत. त्यांनीं लिहिलेल्या अनेक लहान लहान चरित्रपर पुस्तकांत त्यांची ही दृष्टि प्रत्ययास आल्याशिवाय रहात नाहीं. पण पूज्य व्यक्ती-बद्दलचे अनिष्ट अगर कुत्सित ग्रहावर हल्ला चढविण्याला जी साधनसामग्री जवळ पाहिजे, ती त्यांच्यापाशीं अद्ययत आहे. त्यांच्या लेखनांतल्या महत्त्वाच्या विधा-नाला भक्कम आधार नाहीं असें कधींच घडत नाहीं. त्यामुळें त्यांचें वाङ्मय कोणास रुचो अगर न रुचो, तें वाचनीय आहे, त्यापासून कित्येकदा कांहींतरी अज्ञात अशा नव्या गोष्टी कळतात, अशी कबुली प्रांजल मनाच्या वाचकाला द्यावी लागते. ज्या विचारपरंपरेचे ते वारसदार आहेत, ती विचारपरंपरा लोकांच्या आचरणांत आढळली तरी लोकप्रिय नाहीं, हें माहीत असूनहि रा. वैद्य यांनीं त्या परंपरेंतल्या प्रतिनिधि व्यक्तींचीं चरित्रें किंवा चरित्रविषयक निबंध लिहिलेले आहेत. ही बाब लक्षांत ठेवल्यास त्यांच्या अंगचा आणखी एक गुण दृष्टोत्पत्तीस येतो. त्यांची मनोरचना समाजापुरती संकुचित नाहीं. समाजाच्या संस्थापकांप्रमाणें सार्वत्रिक व सर्वांगीण उन्नतीचें चिंतन करणारी व्यापक आहे, हाच तो गुण होय. रा. वैद्यांनीं उत्पन्न केलेल्या किंवा चरित्रपर वाङ्मयाचा निर्देश वाचून कोणास अशी शंका येईल कीं, संपादकीय कामगिरीपेक्षां दुसरें वाङ्मय उत्पन्न करण्याची कामगिरी त्यांनीं अधिक चांगल्या रीतीनें पार पाडलेली आहे; पण पहिल्या प्रतीच्या संपादकाचीं लक्षणें माहीत असणारांना या शंकेचें निराकरण तेव्हांच करतां येईल. आपली जबाबदारी जाणून वागणारा संपादक आपल्या वृत्तपत्राला उपाशी ठेवून दुसरीकडे वाङ्मय निर्माण करील, असें कधींच घडत नाहीं. तो जें जें म्हणून रुचेल तें तें आपल्या वृत्तपत्राच्या द्वारें जगापुढें मांडीत असतो. रा. वैद्य हे या

नियमाला अपवाद नाहींत. त्यांनीं आपल्या बहुतेक सर्व वाङ्मयाचीं लेणीं सुबोधपत्रिकेला चढवून मगच तीं स्वतंत्र पुस्तकरूपानें लोकांच्या हवालीं केलीं आहेत.

सुबोधपत्रिकेचे संपादक या नात्यानें रा. वैद्य यांच्या कामगिरीचें परीक्षण करतांना सकृद्दर्शनीं एकदम लक्षांत न येणारी एक गोष्ट विचारांत घेणें अवश्य आहे. सुबोधपत्रिकेचें ध्येय व तदनुसार होणारें लेखन याविषयीं मतभेद होऊं शकेल, पण हें कार्य जसें लोकप्रियतेचें नाहीं तसेंच किफायतीचेंही नाहीं. माणसाला प्रोत्साहन देणाऱ्या या दोन्ही गोष्टींचा अभाव असून सुद्धां रा. वैद्य यांनीं निष्ठापूर्वक आपलें काम चालविलें आहे. ही एकच बाब त्यांच्या अंतःकरणाच्या उदात्त रचनेची साक्ष देण्याला समर्थ आहे. दागिन्याचा उत्कृष्टपणा हा जसा केवळ सोन्याच्या बावनकशीपणावर अवलंबून नसतो, सोनाराच्या कसबाचा गुण त्यास लाभावा लागतो, या न्यायानें पाहिल्यास, रा. वैद्यांच्या अंतःकरणाची रचना उदात्त होण्याला कांहीं उपजत प्रवृत्ति व कांहीं थोर पुरुषांच्या सहवासाचा व प्रत्यक्षाप्रत्यक्ष शिकवणीचा लाभ यांचा मिलाफ कारणीभूत झालेला आहे. या ठिकाणीं रानडे भांडारकरप्रभृति थोर पुरुषांचा सगळाच मगदूर रा. वैद्य यांच्यांत उतरला आहे, असें भासविण्याचा बिलकूल हेतु नाहीं. त्यांचा मार्ग शक्य तेवढा आक्रमण करण्याचा रा. वैद्यांचा प्रयत्न समजण्याकरितां या गुणांचा उल्लेख केला आहे. केवळ मानसिक उन्नतीपुरताच हा त्यांचा प्रयत्न नसून बौद्धिक विषयांतहि त्यांचा परिपाठ असाच आहे. आपले विचार जितक्या सावधपणानें व साधार रीतीनें हे प्रार्थनासमाजाच्या सांप्रदायांतले पूर्वज मांडीत होते, तितक्याच साधार पद्धतीनें रा. वैद्य आपले विचार वाचकांना सादर करतात. यासाठीं तत्त्वज्ञानपर आणि अध्यात्मपर वाङ्मयाचें त्यांचें परिशीलन यथाशक्ति चालू आहे. त्यांच्या इतकें धर्मेतिहासाचें वाङ्मय नजरेखालीं घातलेलीं माणसें महाराष्ट्रांत थोडींच दाखवितां येतील.

हा मजकूर वाचीत असतांना पुष्कळांच्या मनांत अशी शंका उभी राहील कीं, सुबोधपत्रिकेच्या पुढील ३० वर्षांचा इतिहास देतांना रा. वैद्यांच्या व्यक्तिविषयक गुणांचें विवेचन कशाला? सुबोधपत्रिकेंत या तीस वर्षांमध्यें कोणत्या विषयाचा ऊहापोह झाला, कोणकोणत्या सार्वजनिक महत्त्वाच्या वादांत पत्रिकेनें भाग घेतला इत्यादि माहिती वाचकांनीं मथळा पाहून अपेक्षिली असेल. पण असा वृत्तान्त निवेदन केला असता तर तो कंटाळवाणा झाला असता हें उघड आहे. संपादकांच्या गुणांचें ज्ञान करून दिल्यानें त्यांची कामगिरी ध्यानांत येणारी आहे व त्या करितांच संपादकांच्या गुणविवेचनाचा मार्ग येथें पत्करला आहे.

---

# रविवारची धर्मशिक्षणाची शाळा.

शाळांतून धर्मशिक्षणाची सोय नाहीं; कुटुंबांमध्यें आपल्या मुलांना प्रार्थनासमाजास मान्य असलेल्या धर्मतत्त्वांनुसार शिक्षण मिळत नाहीं पण तसें शिक्षण मिळण्याची अत्यंत आवश्यकता आहे हें जाणून प. वा. भिकोबा लक्ष्मण चव्हाण ह्यांनीं ५० वर्षांपूर्वी धर्मशिक्षणाचा वर्ग समाजांतील मुलांसाठीं सुरू केला. भिकोबादादा हे अत्यंत सात्विक वृत्तीचे, व धर्मप्रचाराविषयीं अत्यंत कळकळ बाळगणारे गृहस्थ होते. त्यांनीं मोठ्या प्रेमानें मुलांस उपदेश करावा. त्यांचा विनयशील स्वभाव, त्यांचें मार्दव, त्यांची सहनशील वृत्ति यांचा विद्यार्थ्यांच्या मनावर ताबडतोब परिणाम होत असे. रा. रा. बाबण बापू कोरगांवकर हे त्यांच्या वर्गांतील पहिले विद्यार्थी. त्यांच्या मनावर त्या वेळीं इतका परिणाम झाला कीं, आजही भिकोबादादांची आठवण झाली व त्यांच्याविषयीं दोन शब्द बोलण्याचा प्रसंग आला कीं त्यांचा कंठ सद्गदित होतो. प. वा. गोविंदराव काणे वकील ह्या वर्गामध्यें शिक्षण देत असत. परंतु पुढें जे स्वतः वर्गाचे विद्यार्थी होते तेच रा. कोरगांवकर ह्या वर्गाचे शिक्षक झाले व पुष्कळ वर्षें त्यांनीं हा वर्ग चालविला. ह्या वर्गांतील शिक्षणाचा साधारण क्रम असा असतो. मुलांना प्रार्थनासंगीतांतील पद्यांच्या चाली अवगत व्हाव्या म्हणून त्यांस त्या सांगून त्यांच्याजवळून तीं म्हणवून घ्यावयाचीं. जेथें अर्थ बिकट आहे असें वाटेल तेथें त्याचें स्पष्टीकरण करावयाचें; गोष्टीच्या, अगर अभंग किंवा पद जें म्हटलें असेल त्याच्या आधारें थोडा सोप्या भाषेंत उपदेश करावयाचा; एखादें सोपें पुस्तक वर्गासाठीं लाविलें असेल तर त्यांतील पाठ घ्यावयाचा व आणखी एखादें पद्य म्हणवून घेतल्यावर प्रार्थना करून वर्गाचें काम संपवावयाचें. पुष्कळ वर्षें साधारणपणें ह्या पद्धतीनें वर्ग चालल्यावर, पुष्कळ दिवस त्याच्या शिक्षकाचें काम रा. रा. वामनराव सोहोनी ह्यांनीं केलें. त्याचप्रमाणें डा. सुखटणकर ह्यांनींही God and the Soul व दुसरीं कांहीं पुस्तकें प्रौढविद्यार्थ्यांच्या वर्गामध्यें शिकविलीं. मधून मधून विद्यार्थ्यांची संख्या वाढली असतांना अनेक वर्ग करावे लागत. स्त्रियांपैकीं सौ. मनोरमाबाई गद्रे, प. वा. सौ. कृष्णाबाई गरूड, कु. कृष्णाबाई जव्हेरे ह्यांनीं लहान मुलांचे वर्ग कांहीं दिवस घेतले आहेत. विलायतेंत व अमेरिकेंत धर्मशिक्षणाची शाळा ही एक फार महत्त्वाची संस्था समजली जाते. तेथील शिक्षणाचा कार्यक्रम आगाऊ ठरतो; तेथें काय कसें शिकवावयाचें तें प्रथम ठरून नंतर त्यासंबंधाचीं पुस्तकें तयार होतात. आमच्या येथें तसा

प्रयत्न झालेला नाहीं. नाहीं म्हणावयास रा. कोरगांवकरांनीं कांहीं वर्षांपूर्वी बाल-संगीत व बालधर्मानुशासन ह्या नांवाचें एक लहानसें पुस्तक रविवारच्या शाळें-तील मुलांसाठीं म्हणून तयार केलें होतें. कांहीं दिवस तें ह्या वर्गामध्यें शिकवि-लेंही जात होतें. ग्रंथपरिचय ह्या सदराखालीं ह्या पुस्तकासंबंधानें अधिक माहिती सांपडेल. हल्लीं रविवारच्या शाळेची व्यवस्था रा. रा. वि. ब. वेलणकर ह्यांजकडे असून ते कांहीं मित्रांची मदत घेऊन जशीं मुलें असतील त्या मानानें वर्ग करून शिक्षणाची व्यवस्था करीत असतात. चंदावरकर प्राथमिक शाळा झाल्यावर त्या शाळेंत शिकणारीं पुष्कळ मुलें ह्या वर्गांत नियमानें येऊन येथील शिक्षणाचा लाभ घेत असतात. रा. वेलणकर ह्यांनीं एक पद्य म्हणवून घेणें, प्रार्थना करणें, एखादी गोष्ट सांगून तिच्याद्वारें मुलांस बोध करणें असाच शिक्षणाचा क्रम ठेवला आहे. तथापि ह्या शाळेसाठीं एखादें दुसरें पुस्तक आतां काढलें पाहिजे व शिक्षणाची तऱ्हा संडेस्कूलच्या पद्धतीवर कांहींशी केली पाहिजे असें वाटूं लागलें आहे.

---

# ग्रंथपरिचय.

**प्रार्थनासंगीत**—प्रार्थनासमाजास मान्य जीं धर्मतत्त्वें आहेत त्यांचा प्रसार करण्याचीं साधनें अनेक आहेत. परंतु ग्रंथप्रसाराच्या द्वारें मतप्रसार झाला पाहिजे हा विचार थिईस्टिक ॲसोसिएशन ज्या वेळीं स्थापन झाली त्या वेळींही मान्य झाला होता. म्हणूनच ह्या संस्थेच्या विद्यमानें Cheap Literature Society नामक संस्था निघाली; व ह्या संस्थेनें कांहीं लहान लहान पुस्तकें छापून प्रसिद्ध केलींही. परंतु ह्या संस्थेच्या द्वारें म्हणण्यासारखें कार्य झालें असें कांहीं म्हणतां येत नाहीं. जे महत्त्वाचे ग्रंथ प्रसिद्ध झाले ते प्रत्यक्ष समाजानें प्रसिद्ध केलेले आहेत किंवा समाजाच्या सभासदांनीं व इतरांनीं आपापल्या जबाबदारी-वर प्रसिद्ध केले आहेत. आणि समाजानें प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांचा आधीं परिचय करून द्यावयाचा म्हणजे **प्रार्थनासंगीत** हें पुस्तक दृष्टीपुढें येतें. ह्या पुस्तकाची हल्लीं सातवी आवृत्ति प्रचारांत आहे. ह्यावरून पुस्तक लोकप्रिय झालेलें आहे असें सहज म्हणतां येतें. ह्या पुस्तकाचा इतिहास असा आहेः–१८६७ सालीं डा. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या घरीं जेव्हां साप्ताहिक उपासनांचा क्रम सुरू करण्यांत आला त्यावेळीं समाजाचें गायनाचें स्वतंत्र पुस्तक नव्हतें. उपासनेचे जे तीन मुख्य भाग आहेत त्यांस आरंभ करितांना एक पद्य म्हणण्याचा प्रघात आहे. बंगाल्यांत राजा राम मोहन रायांनीं सर्व रचिलेलीं पद्यें मागें पडून महर्षि देवेंद्र-नाथांनीं **ब्रह्मसंगीत** नामक जें पुस्तक तयार केलें तें अधिक लोकप्रिय झालें. आमच्या येथें वर म्हटल्याप्रमाणें आमचें स्वतःचें पुस्तक नव्हतें. म्हणून राव-साहेब पाळंदे ह्यांचें जें रत्नावलि नाम पद्यांचें पुस्तक होतें त्यांतून पद्यें म्हटलीं जात असत. ह्या संग्रहांतील पद्यें व अभंग स्वतः रावसाहेब पाळंदे ह्यांनीं रचि-लेलीं होतीं व तीं कोणत्याही धर्माच्या अनुयायास म्हणतां येण्यासारखीं होतीं. हें पुस्तक जेव्हां प्रसिद्ध झालें त्या वेळीं ज्ञानोदयाच्या संपादकांनीं त्याची बहुत स्तुति करून त्यांतील कांहीं पद्यें नमुन्यासाठीं उतरून घेतलीं होतीं हें त्या पत्राच्या जुन्या फाइली चाळतांना आम्हीं पाहिलें आहे. हल्लींच्या प्रार्थनासंगीतांतील ११३, १२८, १९७, २०३ व २९५ हीं पद्यें पाळंदे ह्यांनीं रचिलेल्या पद्यां-पैकीं आहेत. त्यावरून त्यांच्या पद्यांची योग्यता लक्षांत येईल. त्यानंतर डा. भांडारकर, रामभाऊ माडगांवकर, भिकोबा दादा चव्हाण, वामनराव मोडक इ० सभासदांनीं पद्यें रचिलीं व तीं संग्रहित करून प्रार्थनासंगीत नांवाचें लहानसें

पुस्तक प्रसिद्ध करण्यांत आलें. नवीन जीं पद्यें तयार केलीं तीं बहुतेक जुन्या च्विजा प्रथम रावजीबोवा बेलबागकर ह्यांच्यापाशीं शिकल्यानंतर त्यांतील शब्दांबद्दल आमच्या धर्मसंबंधीं अभिप्रायास जुळणारे असे शब्द घालून तयार केलीं. उत्सवाच्या प्रसंगासाठीं नवीन पद्यें रचून तीं लहानशा पत्रकाच्या रूपानें प्रथम छापावयास सुरुवात झाली. एका प्रसंगीं अशा पत्रकामध्यें तुकारामाचे कांहीं अभंग घेतले व ते सर्व मंडळींना फार आवडले. " तेव्हां पुढें संगीताच्या सर्व आवृत्तींमध्यें तुकाराम नामदेव आदिकरून संतांचे अभंग घालूं लागलों व त्याचप्रमाणें दुसऱ्या अनेक कवींचीं पद्येंही आम्ही त्या संगीतामध्यें समाविष्ट करूं लागलों. "* अशा प्रकारें प्रार्थनासंगीताच्या पांच आवृत्ति जेव्हां संपून गेल्या तेव्हां नवी आवृत्ति पुष्कळच फेरफार करून काढण्याचा विचार मुक्रर झाला. पूर्वींच्या आवृत्तींहून पुष्कळ अंशानें निराळी आवृत्ति कां प्रसिद्ध करण्याचें ठरलें त्याचें स्पष्टीकरण असें आहे. 'नवीन आवृत्ति छापावयाची तर पूर्वींची जशीच्या तशीच छापणें हें प्रशस्त वाटलें नाहीं. अनुभवाच्या योगें त्यांत पुष्कळ सुधारणा करण्याची आवश्यकता दिसून आली होती. संग्रहही पूर्वींपेक्षां मोठा + व्हावा अशी इच्छा झाली होती; आणि पुस्तकही बऱ्याच गृहस्थांच्या अवलोकनांत येऊन प्रसिद्ध व्हावें हें योग्य असा ग्रह झाला होता; आणि पुस्तक पाहिलें असतां ह्या सर्व गोष्टी साधण्याचा यथामति यत्न केला आहे असें दिसून येईल. पदांचे चार भाग केले आहेत. पहिल्या भागांत उद्बोधनाच्या उपयोगाचीं पदें घातलीं आहेत; दुसऱ्या भागांत देवाची स्तुतिच केवळ ज्यांत आहे अशीं पदें आहेत. तिसऱ्या भागांत दुसरे प्रकार असून ज्यांत प्रार्थना आहे अशा पदांचा समावेश केला आहे, आणि चवथ्या भागांत केवळ उपदेशपर पदांची योजना केली आहे. अभंगांमध्यें आणखी एक पांचवा भाग केला आहे. त्यांत भक्ताच्या अंतरात्म्याच्या स्थितीचें किंवा अंतःकरणाच्या आशयाचें देवापाशीं निवेदन केलें आहे. पदांच्या संग्रहामध्यें केशवस्वामी, शिव-

---

* डॉ. भांडारकर.

+ प्रार्थना संगीताची आवृत्ति पांचवी व सहावी ह्यांतील फरक पुढील माहितीवरून चांगली समजून येईल. पांचव्या आवृत्तींत पदें १९६ होतीं; सहावींत ३५४ होतीं. पांचवींत अभंगसंख्या २५१ होती; सहाव्या आवृत्तींत ६७३ अभंग होते, त्यांपैकीं ५४६ तुकोबाचे होते.

दिन केसरी, रंगनाथ, एकनाथ, अमृतराय, कबीर, नानक इ. साधूंचीं पूर्वीपेक्षां अधिक पदें घातलीं आहेत; आणि देवनाथ, सुरदास आदिकरून साधूंचीं पूर्वीच्या आवृत्तींत नव्हतीं त्यांचा समावेश ह्या आवृत्तींत केला आहे. देवाच्या संनिध जाऊन त्याच्या समागमानें वागणें ह्या कार्यास वेळोवेळीं आड येणारे जे आपल्या अंतःकरणाचे दोष त्यांचें अवलोकन करून त्यांचा निरास करणें आणि तें कार्य सिद्धीस नेऊन आपलें अंतःकरण शांत, उन्नत, निर्भय, कर्तव्यदक्ष, प्रेममय असें करणें हा जो साधनक्रम त्याचें अवलंबन करूं इच्छिणारास तुकारामबुवा गुरुस्थानीं आहेत. त्यांनींही जपून आपल्या अंतःकरणास आळा अशाच प्रकारें घातला आणि देवाचे पाय साधले. त्यांचा उन्नतपदाप्रत जाण्याचा क्रम चालू असतांना वेळोवेळीं जे उद्गार त्यांनीं काढले ते आधुनिक साधकास फारच उपयोगाचे आहेत....जुन्या कवींच्या पद्यांत सामान्यतः एकेश्वर किंवा एकान्तिक मार्गास न जुळणारे असे शब्द किंवा विचार जेथें आढळले त्या ठिकाणीं ते बदलून दुसरे फार करून त्याच अभिप्रायाचे घातले आहेत; परंतु ते बदललेले शब्द किंवा विचार त्याच साधूचे असा वाचणाराच्या मनांत संशय उत्पन्न करण्याचा दोष येऊं नये म्हणून त्या पद्याच्या अंतिम चरणामध्यें येणारें कवीचें नांव मागच्या आवृत्तींत गाळलें होतें. परंतु सर्व महत्वाचे विचार कवीचे असून थोड्या फेरफारासाठीं मूळ कवीचा मागमूस न ठेवणें इष्ट वाटलें नाहीं म्हणून नवीन घातलेले शब्द बारीक टायपांत घालून मूळ कवीचें नांव कायम ठेविलें.'* आणि हल्लीं जी सातवी आवृत्ति उपयोगांत आहे, तिचा आकार बदलला असून तो आतां आटपसर झाला आहे. साहाव्या आवृत्तींतील कधींही म्हणण्यांत न येणारीं, ब्राह्मधर्माच्या ध्येयास अनुकूल नसणारीं किंवा ज्यांत विशेष अर्थगांभीर्य नाहीं अशीं पद्यें ह्या आवृत्तींतून कमी केलीं असून त्यांच्या जागीं मराठी व हिंदी पदें घातलीं आहेत. ही नवी आवृत्ति तयार करण्याच्या कामीं प. वा. दीनानाथराव माडगांवकरांनीं केलेल्या उद्योगाचा विचार मनांत आला कीं, मन क्षणभर स्तंभित होऊन जातें. तुकोबांच्या कित्येक अभंगांचे सांप्रदायिक अर्थ समजून घेण्यासाठीं पंढरपूर येथें बाबूराव ह्यांच्या सान्निध्यांत त्यांच्या मठांत जाऊन ते राहिले. ह्या नव्या आवृत्तोमध्यें कोणीं कोठलीं आधुनिक पद्यें रचलीं आहेत त्यांची यादी दिली आहे. पूर्वीच्या पिढींतील लोकांना ही माहिती सहज झालेली होती. कित्येकांच्या देखत पद्यें तयार झालीं होतीं. परंतु आतां ही माहिती असणारीं माणसें थोडीं आहेत. म्हणून पुढील

---

* सहाव्या आवृत्तीची प्रस्तावना पहा.

पिढींच्या फायद्यासाठीं कोणीं कोठलीं पद्यें रचिलीं ती माहिती मिळाली त्याप्रमाणें दिली आहे. येथें ब्रम्हसंगीत व प्रार्थनासंगीत ह्यांत जो ठळक भेद आहे त्याचा विचार करणें जरूर आहे. ब्रम्हसंगीतांतील बहुतेक सर्व पद्यें आधुनिक आहेत. आमच्या प्रार्थनासंगीतांतील बहुतेक पद्यें प्राचीन आहेत. ब्रम्हसंगीतांतील पद्यें अर्वाचीन काळांतील भक्तांनीं पूर्ण भक्तिभावानें तयार केलेलीं असल्यामुळें ब्राह्मधर्मास सर्वस्वी अनुकूल भाव त्यांत आला आहे. त्याचप्रमाणें ब्राम्हधर्माचा जो विशेष तो त्यांच्या पद्यांमध्यें जितका आहे तितका प्रार्थनासंगीतांतील प्राचीन पद्यांमध्यें नाहीं. स्पष्टीकरणासाठीं दोन उदाहरणें घेतों. आधुनिक काळीं रचिलेलीं प्रार्थनासंगीतांतील " बंधु हो त्यजुनि अभिमाना " व " दे दे प्रभो वरप्रदान दे दे " हीं दोन पद्यें घ्या. अवतारवाद न मागणें व त्याचप्रमाणें सर्व धर्मांविषयीं आदराचा संबंध हे जे प्रार्थना समाजाचे दोन विशेष ते रा. रा. वामनराव मोडकांनीं रचिलेल्या पद्यांत जसे आहेत तसे प्राचीन कवींच्या पद्यांत असणें शक्य नाहीं. कारण ही विचाराची दिशाच मुळीं आधुनिक आहे. त्याचप्रमाणें " विद्याधन आणि सदन। वाटेतरी देई मान। परि यांचा गर्व मनिं लव न शिरूं दे " असें देवापाशीं कोणत्या जुन्या संतानें मागितलें आहे ? जुने संतकवि ह्यांची संसारासंबंधाची दृष्टि व ब्राम्हधर्माची दृष्टि यांत जो भेद आहे तो ह्याच्या मुळाशीं आहे. व त्यामुळें प्राचीन कवींची रचना व आधुनिक साधकांची कविता ह्यांत मूलतः फरक दिसून येतो. दुसरी एक गोष्ट. आमच्या संगीताची चालू म्हणजे सातवी आवृत्ति जरी पाहिली तरी तींत प्रासंगिक पदांचा भरणा अगदींच थोडा आहे. ब्रम्ह संगीतामध्यें अनेक प्रसंगांस उद्देशून रचिलेलीं पद्यें पुष्कळच आहेत. तथापि आमच्या प्रार्थना संगीताचें मुख्य जें सौभाग्य आहे तें हें कीं, तुकोबासारख्या अत्यंत श्रेष्ठ साधकाच्या उक्ति ह्यांत इतक्या आहेत कीं, प्रत्येक साधकास त्यांपासून समाधान व शांति प्राप्त झाल्यावांचून रहात नाहीं. जुन्या पदांचा व अभंगांचा इतका संग्रह दुसऱ्या कोणत्याही एका मराठी पुस्तकांत आजपर्यंत झालेला नाहीं. प्रार्थना संगीत जुन्या व नव्या विचारांच्या आस्तिक जनांत प्रिय आहे व तें प्रार्थना समाजास मान्य असणाऱ्या धर्ममतांचा प्रसार करीत आहे यांत कांहीं संशय नाहीं. ह्या पुस्तकांत शेवटीं *दिंड्या, साक्या,* श्लोक व स्तोत्रें ह्यांचाही मोठा भरणा आहे.

**प्रार्थनासंग्रह.**—प्रार्थनासमाजानें प्रसिद्ध केलेलें हें दुसरें पुस्तक होय. समाजाची स्थापना झाल्यानंतर पहिले पहिले उपासक आपल्या उपदेशपर भाषणाप्रमाणें आपल्या प्रार्थनाही लिहून आणीत असत. समाजाचे आद्य आचार्य

रा. रा. भिकोबा दादा चव्हाण यांची १८७० सालच्या उत्सवांतील उपासनेसाठीं लिहिलेली प्रार्थना आज सुदैवानें उपलब्ध आहे ती मासल्यासाठीं येथें देतोंः–

## प्रार्थना.

हे सर्वलोकनाथ परमेश्वरा ! सूर्य, अग्नि, वायु, उदक, पृथ्वी, जीव इत्यादि सर्व पदार्थांचा तूं उत्पन्नकर्ता आहेस; अनंत ब्रह्मगोल हीं तुझीं कार्यें आहेत. हीं अद्भुत कार्यें तुझे अनंत गुण, अचिंत्य शक्ति, अतुल थोरपण, अपार वैभव, पवित्र चरित्र आणि विमळ कीर्ति हीं दाखवितात. येणेंकरून तुझा सदा सर्वत्र जो मोठा सत्कार व जयजयकार होत आहे, त्यापुढें आम्ही तुझ्या जयजयकाराचा उत्सव करतों, हा जसा मध्यान्हींच्या सूर्यास काडवाती पाजळून आरती करावी तसा आहे. हे महाप्रभो ! हा उत्सव कसाही असो, परंतु तुजप्रीत्यर्थ हा आम्हा दीन लेंकरांस जर मनापासून मोठा असा वाटत असला, तर तुज दीनवत्सल व नित्यप्रसन्न प्रभूसही तो अप्रसन्न करणार नाहीं असा आम्हांस भरंवसा आहे. हे दीनबंधु देवा, या लहानशा बाल मंडळीनें तुजप्रीत्यर्थ तुझी प्रार्थना करण्याचा, तुझी स्तुति गाण्याचा, तुझें महत्व वर्णायाचा, तुझे उपकार मानायाचा, आपल्या दोषांविषयीं क्षमापन करायाचा, आणि आपल्या बंधुजनांस प्रीतिपूर्वक भेटायाचा, जो हा आज प्रेमळ वार्षिक उत्सवाचा समारंभ चालविला आहे, यांत तूं सर्व जगाचा बाप आणि दीनांचा सखा देव संतोष मानीत विराजला आहेस.

या वेळेस कामधेनु, कल्पतरु, चिंतामणि असल्या अद्भुत वस्तूंची इच्छा पुरविणारा जो तूं परम समर्थ, उदारांचा राणा, देवाधिदेव, त्यास आह्मी निःस्वांनीं ( दरिद्र्यांनीं ) शुद्ध प्रीतीवांचून दुसरें काय द्यावें ? ती तर आह्मी देऊं म्हणायास आमचा अधिकार नाहीं, म्हणून, हे सर्वसत्ताधीशा प्रभो, तूं आमच्या सर्व अपराधांची क्षमा कर, आणि तुझ्या चरणास जसे साजतील तसे आमचे सर्व मनोभाव शुद्ध करून घेण्यास तूंच हात घाल. हे बापा, याप्रमाणें तुझां लेंकरें आणि आमचे सर्व देशबंधु तुझी आराधना करण्यास एकत्र मिळतील अशा महोत्सवाचें वर्ष कधीं येईल ? तुझ्या कृपेनें तो सोन्याचा दिवस पाहायला आतां आमचे तरुण आहेत. यांचे नेत्र लौकर भाग्यवान कर हे विज्ञप्ति.

प्रथम प्रथम अशा प्रकारच्या प्रार्थना सर्व उपासकांस लिहितांही येत नसत. ही अडचण मंडळीच्या तेव्हांच लक्षांत आली होती. म्हणून जेव्हां धर्मप्रचारव्यवस्था कायम झाली व रा. रा. सदाशिव पांडुरंग केळकर हे धर्मप्रचारक या नात्यानें प्रो. भांडारकर व वामनराव मोडक यांच्या सहवासाचा स्वतःच्या लाभा-

साठीं कांहीं महिने पुण्यास रहावयास गेले, त्या वेळीं "प्रार्थनासंग्रह व सामाजिक उपासना" हें पुस्तक त्यांनीं भांडारकर व मोडक ह्यांच्या साहाय्यानें तयार केलें व छापिलें. त्याच्या पूर्वी परमेश्वराच्या आराधनेचा प्रकार नांवाचें एक लहानसें पुस्तक बंगालीवरून तयार झालेलें होतें. आतां लेखी प्रार्थना व उपासनेस बसलें असतांना त्या वेळीं अंतःकरणाची ज्याप्रमाणें स्थिति असेल तीस अनुरूप तोंडावाटे निघणारे प्रार्थनापर उद्गार ह्यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. उपासनोन्मुख वृत्ति करून उपासक ज्या वेळीं प्रार्थना करूं लागतो त्या वेळीं त्याच्या भावभक्तीनुसार त्याच्या तोंडावाटे शब्दप्रवाह वाहूं लागतो. कित्येक उपासकांच्या प्रार्थना अत्यंत प्रेमळ व अंतःकरणास जागृत करणाऱ्या अशा असतात. व त्यांच्या उपासनेस हजर असणाऱ्यांच्या मनावर अशा प्रार्थनेचा तत्काल परिणाम झाल्यावांचून रहात नाहीं. बंगाली लोक भावनाप्रधान तर खरेच; तथापि त्यांच्यापैकीं कित्येकांच्या प्रार्थना इतक्या परिणामकारक असतात व असत कीं सर्व साधकांचीं अंतःकरणें त्या उचंबळवून टाकीत असत ह्यांत संशय नाहीं. वार्षिकोत्सवसमयीं पंडित शिवनाथशास्त्री जी प्रार्थना करीत, ती चालू असतांना उपासनेस हजर असलेल्या लोकांपैकीं कित्येक लोक हुंदके देऊं लागत. आणि साधनाश्रमाच्या स्थापनेच्या दिवशीं जमलेल्या सर्व लोकांच्या मनावर इतका परिणाम झाला कीं, उपासनास्थलीं पुरुषांनीं रुपये, नोटा धडाधड दिल्या, व कित्येक स्त्रियांनीं आपले दागिने आश्रमाच्या खर्चासाठीं पंडित शिवनाथशास्त्री ह्यांच्या स्वाधीन केले! आमच्या येथेंसुद्धां कित्येक उपासकांच्या प्रार्थना चालू असतांना एकाग्र नसलेलें चित्त एकाग्र झाल्याचा, व एकाग्र चित्त पूर्णपणें रंगून गेल्याचे अनुभव आलेले आहेत. सारांश, त्या त्या वेळीं न वाचतां होणारी प्रार्थना अत्यंत लाभदायक होते. परंतु पुष्कळांस प्रार्थना करणें साधत नाहीं. पुष्कळांस प्रार्थनेमध्यें काय मागावें, स्तवनाच्या वेळीं स्तुतिपर भाग कसा आणावा ह्या गोष्टी साधत नाहींत. त्याचप्रमाणें उपासना चालविण्याची संवय नसली म्हणजे प्रार्थना करणें सहज जमत नाहीं. पुरुषांची जेथें अशी स्थिति तेथें स्त्रिया व मुलें हीं मागें असलीं तर त्यांत आश्चर्य तें कसलें? म्हणून १८८२ सालीं ह्या सर्व गोष्टींचा विचार करून वरील पुस्तक समाजानें प्रसिद्ध केलें. ह्यांत सामाजिक उपासनेच्या वेळीं, उपासना चालविणारानें कोणकोणत्या गोष्टी केल्या पाहिजेत व त्या कशा केल्या पाहिजेत, काय काय खबरदारी घेतली पाहिजे ह्या संबंधानें योग्य सूचना असून सामाजिक उपासनेचे नमुनेही दिले आहेत. ह्या पुस्तकांतील प्रार्थना साहाय्यक स्वरूपाच्या

आहेत, एवढें लक्षांत ठेवलें असतां त्यांचा अत्यंत उपयोग होत असल्याचा अनुभव येतो. ह्या पुस्तकाचा सभासद व हितचिंतक ह्यांनीं जितका उपयोग करावयास पाहिजे तितका केलेला दिसत नाहीं असें अनुभवानें म्हणावें लागतें. पुस्तकाच्या प्रारंभीं ईश्वरोपासनेंतील निरनिराळ्या भागांचें वर्णन करितांना आराधना सफल झाली असें केव्हां म्हणतां येतें तें सांगतांना म्हटलें आहे कीं, "आमची ईश्वराविषयीं पूज्यबुद्धि व खरा कृतज्ञताभाव हीं अंतःकरणामध्यें जागृत होऊन त्यांच्या अन्वयें योग्य वर्तन झालें आणि ईश्वर आपल्या सन्निध वास करीत आहे असा साक्षात् अनुभव होण्याची उत्कंठापूर्वक इच्छाही पूर्ण झाली आणि आपला उद्धार व्हावा, ही इच्छा सफल झाली म्हणजे ह्या आराधनेचा उद्देश सिद्धीस गेला असें समजावें."

दुसरी आवृत्ति पहिल्या आवृत्तीपेक्षां फार सुंदर व महत्त्वाची आहे. न्या. मू. रानडे यांच्या प्रार्थना अत्यंत प्रेमळ असत. ह्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेलीं माणसें अद्यापि पुष्कळ आहेत. त्यांचीं भागवतधर्मावर जीं व्याख्यानें झालीं, त्यांपैकीं पहिलीं तीन रा. रा. भुजंगराव मानकरांनीं उतरून घेतलीं होतीं. अर्थात् त्यांनीं त्या वेळीं प्रार्थनाही लिहून घेतल्या होत्या. त्या ह्या दुसऱ्या आवृत्तीमध्यें समाविष्ट केलेल्या आहेत. त्याचप्रमाणें एक वर्षी पुण्यास प्लेगचा कहर चालू असतांना गुरुवर्य डा. भांडारकर मुंबईतच येऊन राहिले होते. त्या वेळीं प्रार्थनासमाजांतील एक अत्यंत आस्थेवाईक तरुण रा. रंगनाथ सदानंद पालेकर, समाजाच्या एका जुन्या सभासदांचे एक चिरंजीव, त्यांच्याकडे निरनिराळ्या वेळीं जात त्या वेळीं ते प्रार्थना करीत व रंगनाथ त्या प्रार्थना लिहून घेत असत. त्या प्रार्थना निरनिराळ्या प्रसंगांस व वृत्तींस अनुसरून आहेत. पुस्तक छापवून घेण्याचें काम समाजानें रा. रा. वासुदेव सुखटणकरांवर सोंपविलें होतें व त्या वेळीं त्यांनीं कांहीं लिहवून घेतल्या असाव्यात. अशा रीतीनें ही दुसरी आवृत्ति तयार होऊन १९०३ सालीं प्रसिद्ध झाली. परंतु त्या आवृत्तीसंबंधानें एक विशेष गोष्ट येथें नमूद करावयाची आहे. कोणत्याही साधकास अत्यंत लाभदायक व साहाय्यक असे स्वाशयनिवेदनपर विचार ह्या आवृत्तींतील नवीन प्रार्थनांमध्यें आहेत. म्हणजे हें पुस्तक केवळ उपासनांच्या वेळीं ज्या प्रार्थना करावयाच्या त्या वेळींच साहाय्यक होणारें आहे असें नव्हे, तर प्रत्येक साधकास स्वतःच्या उन्नतीसाठीं, जागृतीसाठीं व समाधानासाठीं ह्यांतील कांहीं प्रार्थनेंतील विचार अत्यंत साहाय्यभूत वाटल्यावांचून रहाणार नाहींत. ह्या दृष्टीनें पुढील कांहीं उतारे पहाः—

( १ ) हे दयाळु पित्या, असत्य, व अमंगल आचरण आम्हांस अत्यंत भयप्रद वाटेल असें कर आणि सत्य आणि पवित्रपणा ह्यां विषयींची गोडी आम्हास इतकी लाव कीं, कसल्याही मोहाच्या प्रसंगीं आम्ही त्यांस सोडून लेशमात्रही जाणार नाहीं. त्याचप्रमाणें धर्मसंबंधाच्या आमच्या कल्पना उदात्त झाल्यानंतर कसल्याही प्रसंगीं त्यांच्या विरुद्ध आचरण करण्याचा आम्हांस अधिकार नाहीं. आम्ही आपलीं धार्मिक कृत्यें नेहमीं त्यासच अनुसरून केलीं पाहिजेत. पण हें करणें आम्हांस फार कठिण जातें. कितीएक पिढ्या चालत आलेले धर्माचार चुकीचे दिसत असूनही ते सोडून देण्यास मन घेत नाहीं; नातलग, स्नेही, सोयरींसंबंधीं यांचें मन दुखेल म्हणून भीति वाटते, लोकांचा आपणावर रोष होईल, ते निंदा करितील, छळ करितील, आपणाशीं सर्व संबंध तोडतील व त्यायोगें आपले व आपल्या मुलांबाळांचे हाल होतील वगैरे विचार मनांत येऊन आम्ही भेदरून जातों व आपल्या समजुती-विरुद्ध वागण्यास आम्ही तयार होतों. कितीएक वेळां त्याप्रमाणें जरी आमचें धैर्य खचलें नाहीं, तरी अशा सुधारणा एकदम प्रचारांत आणिल्यानें लोक दचकून जातील व प्रतिक्रियेस सुरवात होऊन समाजाचें हित होण्याऐवजीं नुकसानच होईल वगैरे विचार मनांत घेऊन आम्हास आमच्या श्रद्धेच्याविरुद्ध आचरण करावयास लावतात. दयामय ! अशा समयीं तूंच आमच्या अंतःकरणांत अवतीर्ण हो व आपल्या शक्तिमान् पवित्र व प्रेमळ स्वरूपाचें दर्शन दे व असा प्रसाद कर कीं त्यायोगें अडचणी कितीही भयंकर दिसल्या तरी त्यांची दिक्कत न वाटतां सत्यास चिकटून रहाण्यास आम्हास उत्साह प्राप्त होईल. "–प्रार्थना ४९ वी.

(खालील दोन उतारे डा. भांडारकरांनीं लिहिलेल्या प्रार्थनांतून घेतले आहेत.)

( २ ) देवा ! तूं माझ्या मतीवर चोहींकडून प्रकाश पाडून सत्याचें ज्ञान करून देतोस; परंतु त्या ज्ञानावर माझा भरंवसा नसल्यामुळें मी जनरहाटीस अनुसरून राहतों. किंवा त्या ज्ञानास अनुसरून वागलों, तर ती माझी वागणूक जनरहाटीस विरुद्ध होईल आणि जन माझी निंदा करितील, मजला बहिष्कार घालतील म्हणून भिऊन मी त्वां दिलेलें ज्ञान नष्ट करून टाकितों. तूं तेजाप्रत मजला नेत असून मुद्दाम मी अंधकारांत राहतों; तूं हातीं धरून मला उन्नतीच्या मार्गावर नेत असून तुझा हात मी झिडकारून टाकतों आणि अज्ञजनांचा हात धरून चालतों, किंवा जनांमध्यें आपली मान्यता व्हावी म्हणून त्यांस रुचतात त्या मतांचें व त्यांस आवडतो त्या मार्गाचें मी मंडन करितो. जरी तीं मतें आणि तो मार्ग भ्रांतिमूलक आहे अशी माझी खात्री आहे किंवा थोड्या विचारानें खात्री होण्या-

सारखी आहे ह्यापेक्षां अधिक मोठा अधमपणा तो कोणता ? तूं कृपा करीत असून ती तुझी कृपा नको म्हणतों आणि भ्रांत मनुष्याची कृपा साधावयास जातों. असा जर मी आहें तर तुझ्या दयेची आशा मला तिळमात्र नाहीं. तुजपासून शांति आणि उन्नति, धैर्य आणि उत्साह हे गुण प्राप्त व्हावयाचे ते कसे प्राप्त होतील ! मी जाणूनबुजून आपला नाश करून घेत आहें. ह्या लोकलज्जेनें आणि लौकिकाच्या इच्छेनें माझा घात केला. तर देवा, इतका जरी अधम मी, तथापि तुझें लेंकरूं, म्हणून मजवर दया कर आणि ही लौकिकाची चाड माझी घालीव आणि तुझाच हात धरून जें कांहीं परमसत्य आहे त्याचेंच अवलंबन करून वागेन, नम्रतेनें तुजवर अंतःकरणाच्या ठायीं पूर्ण निष्कपट भाव ठेवून तूं दर्शविलेल्या मार्गानें चालेन असें कर." प्रार्थना. १२

(३) नुसतें तोंडा वाटे तुझें नाम उच्चारून तुझी प्रार्थना केली तर कार्यसिद्धि व्हावयाची नाहीं. खरोखरी तूंच मजला एक गति. स्वतः मी अत्यंत दुर्बळ; तुझ्या योगेंच मजला शांति आणि समाधान, तुझ्या योगेंच अंतःकरणशुद्धि, तुझ्या योगेंच धैर्य, तुझ्या योगेंच संकटांचा नाश असा अंतःकरणाचा दृढ प्रत्यय होऊन अनन्यभावें तुजपाशीं आलों तरच मजला फळप्राप्ति व्हावयाची. तस्मात् अशा प्रकारची जो ही माझी विटंबना कीं, बाह्यात्कारें तुझें भजन करितों; परंतु अंतःकरण शुष्क, अंतःकरणास द्रव नाहीं, अंतःकरण उन्मत्त तिजपासून मला सोडीव आणि जेव्हां जेव्हां नामोच्चारण करीन तेव्हां तेव्हां पूर्ण भावानें माझें अंतःकरण तुझ्या ठायीं संलग्न होईल असें कर. आणि असें झालें असतां तत्काळ फळप्राप्ति. पूर्णभावानें भजन व प्रार्थना करणारा जो त्याला तूं विलंब न लावितां शांति देतोस, समाधान देतोस, त्याचें अंतःकरण शुद्ध करतोस. अशा प्रकारें सद्यःफळदाता तूं असून तुझी उपेक्षा करणें हा केवळ अधमपणा आमचा ! तस्मात् हा नाहींसा कर आणि आमचा भाव शुद्ध कर. प्रार्थना. २६

**प्रार्थना समाजांत विशेष काय आहे?** हें सुमारें ६५ पृष्ठांचें पुस्तक मुंबईच्या समाजानें १९०२ सालीं प्रसिद्ध केलें. ह्याच्या नांवावरून त्यांतील विषयाची चांगली कल्पना होते. ह्याच्या प्रस्तावनेंत असें म्हटलें आहे कीं, "प्रार्थना समाज स्थापन झाल्यापासून त्याच्या हेतूं संबंधानें, स्वीकृत कार्याविषयीं व तें करण्याचें ज्यांनीं आपापल्या अल्पशक्त्यनुसार शिरावर घेतलें त्यांचे संबंधानें आजपर्यंत लोकांचा फार गैर समज झालेला आहे. कोणाला ह्यांत अनुकरणावांचून कांहीं दिसत नाहीं तर कोणाला हें सर्व ढोंगच वाटत आहे.

आजपर्यंत प्रार्थना समाजाच्या मतांच्या प्रसारासंबंधानें जसे प्रयत्न व्हावयास पाहिजेत तसे ते झालेले नाहींत व त्यास जितकी अनुकूल परीस्थिति असावयास पाहिजे तितकी ती आढळलेलीही नाहीं. असें असून आज ह्या संस्थेची उन्नतीच होत असलेली आढळणार आहे. तरी पण प्रार्थनासमाजाचे जे मूळ सिद्धान्त आहेत त्यांचेविषयीं जनांत बरेंच अज्ञान असल्यामुळें, समाजासंबंधानें फार गैरसमज होत असतो असा नेहमींचा अनुभव आहे. म्हणून प्रार्थनासमाजाच्या सिद्धान्तांचें ज्यांत साधारणपणें सविस्तर विवेचन आहे अशा पुस्तकाची उणीव आजपर्यंत बरीच भासत आली आहे. ही उणीव अंशतः तरी भरून निघावी ह्या हेतूनें प्रस्तुतचें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत येत आहे."

हे सर्व लेख प्रथम **सुबोध पत्रिके**मध्यें प्रसिद्ध झाले; त्यांतील कित्येक डा. भांडारकरांच्या देखरेखीखालीं लिहिले गेले व नंतर पुस्तक छापण्यापूर्वी त्यांनीं ते पुन्हा काळजीपूर्वक वाचून पाहिले. ह्यांत (१) उपोद्घात (२) सगुणोपासनेचें अत्यंत विमल स्वरूप (३) प्रार्थनासमाज द्वैतवादीच आहे (४) परमेश्वराविषयीं अत्यंत उन्नत सिद्धान्त; (५) प्रार्थनासमाजास ग्रंथप्रामाण्य मान्य नाहीं (६) मानसिक उपासना (७) प्रार्थना विचार (८) कित्येक आक्षेप व त्यांस उत्तरें अशीं प्रकरणें आहेत. हें पुस्तक आतां उपलब्ध नाहीं.

**न्या. मू. रानडे ह्यांचीं धर्मपर व्याख्यानें.**

प्रार्थनासमाजानें प्रसिद्ध न केलेलीं पण प्रार्थनासमाजाचेंच कार्य करणाऱ्या पुस्तकांचा आतां येथें उल्लेख करण्याचें योजिलें आहे.

माधवराव रानडे १८६८ सालीं समाजांत दाखल झाले, तेव्हांपासून १९०० साल अखेरपर्यंत तीस बत्तीस वर्षे ते धर्मपर व्याख्यानें मधून मधून देत होते. ह्या दीर्घकाळांत त्यांनीं दिलेल्या विशेष महत्त्वाच्या व्याख्यानांचे सारांश जरी प्रसिद्ध झाले असते, तरी तो संग्रह अत्यंत मोलवान झाला असता. परंतु पूर्वी भांडारकर रानडे सारख्या सभासदांनीं व्याख्यानें द्यावीं आणि जीं कांहीं थोडीं बहुत माणसें जमलीं असतील त्यांनीं तीं ऐकावीं व नंतर पुढें आणखी दुसरीं ऐकावीं असें रहाटगाडगें चालावें! माधवरावांचीं जुनीं दोनतीनच धर्मपर व्याख्यानें आमच्या पहाण्यांत आलीं. मात्र माधवराव न्यायमूर्ति होऊन आल्यावर हा प्रकार कांहींसा बदलला व ह्याचें श्रेय सर्वस्वी प्रथमतः प. वा. दीनानाथ विष्णु माडगांवकर ह्यांस दिलें पाहिजे. ते मार्गदर्शक झाले व त्यांच्या मागून झालेल्या संपादकानें ह्या बाबतींत त्यांच्या पावलावर पावलें टाकण्याचा प्रयत्न

केला. माधवरावांच्या धर्मपर व्याख्यानांचा इतिहास हा असा आहे. माधवराव रानडे १८९३ सालीं मुंबईंत आल्यानंतर त्यांचीं प्रार्थनामंदिरांत भागवत-धर्मावर दर पंधरा दिवसांनीं व्याख्यानें झालीं. ज्या वेंच्याच्या आधारें हीं व्याख्यानें झालीं ते एकनाथी भागवतांतील वेंचे व भागवतधर्मावरील पहिलीं तीन व्याख्यानें सुलभ ग्रंथप्रसारक मंडळीनें छापून प्रसिद्ध केलीं. पहिलीं तीन व्याख्यानें रा. रा. भुजंगराव मानकर ह्यांनीं आपल्या लघुलेखन पद्धतीनें लिहिलेलीं आहेत. दुसरीं कांहीं प. वा. काशीनाथपंत मित्र व रा. नारायण भास्कर पंडित ह्यांनीं लिहिलीं. त्यानंतर रा. दीनानाथराव व हल्लींचे संपादक ह्या व्याख्यानांचे सारांश लिहूं लागले. हीं महत्वाचीं व्याख्यानें एकत्र करून छापल्यास लोकांस तीं अत्यंत लाभदायक होतील असें एकदां न्या. मू. रानडे ह्यांस आम्हीं सुचविलें असतां, रा. माडगांवकर ह्यांच्या विचारानें हें कार्य करावें असें त्यांनीं सुचविलें. परंतु त्यावेळीं रा. दीनानाथरावांची दृष्टि मंद झालेली असल्यामुळें हा विचार मागें पडला व न्या. मू. च्या निधनानंतर पुन्हा तीच सूचना श्री. रमाबाई ह्यांच्या पुढें ठेविली व १९०२ सालीं व्याख्यानांची पहिली आवृत्ति निघाली व १९२४ सालीं तिसरी आवृत्ति प्रसिद्ध झाली. ह्या तिसऱ्या आवृत्तीला एक चरित्रात्मक लेख जोडलेला आहे. माधवरावांच्या व्याख्यानांची योग्यता किती थोर आहे त्याची कल्पना गुरुवर्य डा. भांडारकरांनीं ह्या व्याख्यानांसाठीं जो उपोद्घात लिहिला आहे त्यावरून कोणासही होण्यासारखी आहे. ह्या उपोद्घातामध्यें गुरुवर्य लिहितातः—

**रा० ब० रानडे** यांच्या उपदेशांमध्यें नेहमीं कांहीं तरी मार्मिक अंश असे, आणि कोणत्या तरी एका तत्त्वाचा विकास केलेला असे. पुण्यामध्यें त्यांचा मुक्काम असतांना त्यांच्या उपदेशांचें श्रवण मला नित्य होई. त्या उपदेशांपैकीं या पुस्तकांत फारसे नाहींत. मुंबईस गेल्यानंतर त्यांनीं केलेल्या उपदेशांचा बहुतकरून संग्रह आहे; तथापि दोन्ही ठिकाणीं झालेल्या उपदेशांची सरणी एकच. एकनाथस्वामींचीं वचनें घेऊन भागवतधर्माचें त्यांनीं जें उपपादन केलें त्यांतील सारांश असा आहे कीं, ज्ञानमार्ग आणि योगमार्ग हेच दोन खरे मानिले, तर पुष्कळ साध्या मनुष्यांस उन्नतीची आशा नाहीं असें होऊं लागेल. कारण कीं, ते मार्ग अत्यंत दुष्कर, एखाददुसऱ्यासच साध्य. केवळ कर्ममार्गाचें अवलंबन केलें असतां जडता प्राप्त होते, अंतरात्मा विकसित होत नाहीं; परंतु भागवतमार्ग सर्वांस—साध्याभोळ्यांस सुद्धां साध्य आणि त्याच्या योगें प्रेमळता, दया, क्षमा

इत्यादि गुण अंतरात्म्याच्या ठायीं विकसित होतात. शिवाय हा मार्ग सर्व जातींच्या पुरुषांस आणि स्त्रियांस मोकळा आहे; त्याप्रमाणें वरील तीन नाहींत. म्हणून भागवतमार्ग म्हणजे देवाच्या ठायीं शुद्ध भावानें अनुराग आणि तत्पूर्वक त्याचें भजन आणि पूजन हाच श्रेष्ठमार्ग. शिवाय इतर मार्गांमध्यें केवळ सुख हाच उद्देश असतो. धर्माचें अवलंबन कां करावें याचें उत्तर सुखद होईल म्हणून. विषयोपभोगानेंही सुख होतें, मग त्याचा त्याग कां करावा, याचें उत्तर त्यानें सुख अल्प व धर्मानें होणारें मोठें. तेव्हां हें तत्त्व स्वीकारिलें असतां अशी मति होण्याचा संभव असतो कीं, सध्या डोळ्यांपुढें सुख होत आहे तें टाका आणि ज्याच्याविषयीं आपणांस आणि प्रत्यक्ष ज्ञान नाहीं तें मेल्यानंतर होईल असा भरंवसा ठेवून धर्माचरणाचे कष्ट सोसा, इतका वेडेपणा कोणीं करावा! तेव्हां डोळ्यांपुढचें सुख तेंच खुशाल भोगावें अशा मतीच्या योगानें धर्मभ्रष्टता होण्याचा संभव आहे; म्हणून धर्मानें साध्य सुख या मताचा परित्याग करून आपल्या स्वभावाचा जो दिव्य अंश त्याचा विकास करणें आणि दया, क्षमा, शांति इत्यादि जी दैवी संपद् ती संपादन करणें हें धर्माचें साध्य असेंच घेऊन चाललें पाहिजे; आणि हें मत भागवतधर्मामध्यें मुख्य मानिलें आहे. अलीकडील इंग्रजी ग्रंथामध्यें धर्माचें साध्य happiness नव्हे, तर blessedness हें आहे, हेंच मत **रा० ब० माधवरावांनीं** आपल्या व्याख्यानांत विशदपणानें आणिलें आहे. तें सर्वांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे. दुसऱ्या एका व्याख्यानामध्यें साध्य, सिद्ध आणि साधक हा त्रिवर्ग त्यांनीं प्रतिपादिला आहे. साध्य म्हणजे कर्ममार्गी, सिद्ध म्हणजे ज्ञानमार्गी व योगमार्गी साधक म्हणजे भक्तिमार्गी आणि त्यांच्याही संबंधानें वरील विचारांचें उपपादन केलें आहे. दुसऱ्या कांहीं व्याख्यानांमध्यें "अवघें देखें जन ब्रह्मरूप" हें तुकोबांचें वचन घेऊन सर्व मनुष्यांमध्यें दिव्य भाग म्हणजे देवाचा अंश जो आहे त्याचेंच अवलोकन आपण करावें हा उपदेश आहे. परंतु आपणास अशी वाईट खोड लागली आहे कीं, दुसऱ्यांचे दोषच आम्ही पाहतों आणि कधीं कधीं बहुतकरून "पुढिलांचे मना आणी गुणदोष। पूज्य आपणास करावया" या तुकोबांच्या उक्तीप्रमाणें आपली महती व्हावी हा उद्देश गर्भित असतो. हा प्रकार अत्यंत निंद्य, सर्वप्रकारें अधमपणाचा. तेव्हां यापासून आपण नेहमीं फार दूर राहण्याविषयीं सावध असावें. हा विषय **रा० ब० माधवरावजींच्या** उपदेशामध्यें त्यांच्या नैसर्गिक सौजन्याच्यायोगें वारंवार येत असे. तो उपदेश सर्वथा ग्राह्य आहे; परंतु सर्व प्रसंगीं प्रसिद्धपणें पापें करणारे जे आहेत त्यांची आणि सतत पुण्यशील जे त्यांची एक

कोटि होऊन पुण्यपापाचा भेद समाजांत नष्ट झाला. असा परिणाम होऊं नये याविषयीं सावधानता असली पाहिजे. आपल्या समाजामध्यें पूर्वीपासून चालत आलेले जे धर्मपंथ त्यांतील ग्राह्यांशाचा आपण अवश्य संग्रह करावा असा कटाक्ष ठेवूनही रा० ब० माधवरावांनीं कांहीं व्याख्यानें दिलीं होतीं आणि या पुस्तकांतही त्या प्रकारचीं व्याख्यानें आहेत, विचारी पुरुषांस हें मत पूर्णपणें मान्य आहे.

**वामन आबाजी मोडक ह्यांचीं धर्मपर व नीतिपर व्याख्यानें**—हें पुस्तक जें प्रसिद्ध झालें आहे त्याचें सर्व श्रेय रा. रा. रामचंद्र भिकाजी जोशी ह्यांजकडे आहे. ह्यांतील पुष्कळसे लेख वामनरावांचे स्वतःचे असून कित्येक बंगालीवरून लिहिलेले आहेत. महर्षि देवेंद्रनाथांचें ब्राह्मजनांस प्रेमसमर्पण, जीवात्म–परमात्मयोग, ईश्वरविषयक ज्ञानाचें महत्त्व, इ० हीं भाषांतररूप आहेत. ह्यावरून वामनरावांस बंगाली भाषा किती उत्तम अवगत होती त्याची वाचकांस कल्पना होईल. त्यांचे सर्व लेख अत्यंत भारदस्त, विचारसरणी अत्यंत मनोहर, एकंदर रचना सुंदर व मनास पटणारी अशी आहे. ह्या पुस्तकास रामभाऊंनीं लिहिलेलें वामनरावांचें चरित्र जोडलें आहे, त्यांतील बराचसा भाग ह्या पुस्तकांतील चरित्रात्मक भागांत घेतलेला आहे. व्याख्यानांच्या पुस्तकांत त्यांचा गीतार्थसार हा विस्तृत निबंध दिलेला असून तो फार महत्वाचा आहे.

वामनरावांचे लेख, व्याख्यानें व कीर्तनें ह्या विषयीं डा. भांडारकरांनीं उपोद्घातांत म्हटलें आहेः—" परमेश्वर व सदाचरण ह्यांविषयीं अंतःकरणामध्यें दृढभाव असला पाहिजे; आणि दुसरें असें कीं, स्वात्मपरीक्षण करून सत्यनिष्ठा, दया, क्षमा, शांति इत्यादि सत्संस्कार संपादिले पाहिजेत. अशा प्रकारचा समाजाचा धर्म. त्याचाच विकास हे जे रा. रा. वामनराव ह्यांनीं लिहिलेले निबंध रा. रा. रामभाऊ जोशी ह्यांनीं परिश्रम करून एकत्रित केले आहेत त्यांमध्यें सांपडेल. रा. रा. वामनराव मुंबई व पुणें येथें समाजाची उपासना वारंवार चालवीत त्यावेळेस त्यांचा उपदेश श्रोत्यांच्या मनावर उत्तम ठसा उत्पन्न करणारा असा असे......सारांश आमच्या समाजसंस्थेच्या इमारतीच्या खांबांपैकीं रा. वामनराव हे एक प्रमुख खांब होते."

**डा. भांडारकर ह्यांचे धर्मपर लेख व व्याख्यानें.** ह्या ग्रंथाची तिसरी आवृत्ति हल्लीं प्रसिद्ध आहे. त्यावरून हा ग्रंथ लोकादरास पात्र झाला आहे असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. पहिली आवृत्ति १९०९ मध्यें प्रसिद्ध झाल्यानंतर

बहुत वृत्तपत्रांनीं व मासिकांनीं त्याचा बहुत आदरानें सत्कार केला. रा. ब. महाजनि ह्यांनीं १९०९ च्या सप्टेंबर महिन्याच्या विविधज्ञान विस्तार मासिकाच्या अंकामध्यें एक वीस पृष्ठांचा लेख लिहून ह्या ग्रंथाची योग्यता दाखवून दिली व तसें करितांना न्या. मू. रानडे व रा. रा. वामन आबाजी मोडक ह्यांच्या व्याख्यानांचाही उपयोग करून प्रार्थनासमाज, त्याचीं तत्त्वें व कार्य ह्याविषयीं लोकांस माहिती करून दिली आहे. पहिल्या आवृत्तीच्या निवेदन पत्रिकेमध्यें स्वतः डा. भांडारकरांनीं पुढील माहिती दिली आहेः—

"धर्मसंबंधीं कांहीं निबंध १८७८–१८८२ पर्यंत लिहून सुबोधपत्रिकेमध्यें मीं छापविले. ते सर्व एकत्र करून आणखी त्यांस नवीन जोडून एक पुस्तक तयार करावें अशी आमचे परलोकवासी परम मित्र रा. रा. नारायण महादेव परमानंद यांची फारच इच्छा होती, म्हणून १८७९ च्या आरंभीं माझी पुण्यास बदली झाली त्या वेळेस ज्या अंकांमध्यें माझे निबंध आले होते ते एकत्र करून त्यांनीं माझ्या स्वाधीन केले. परंतु आणखी निबंध लिहून पुस्तक तयार करणें हें काम पुण्यास असतांना किंवा परत मुंबईस बदली होऊन तेथें १८८१ अखेरपर्यंत होतों तेथपर्यंत सिद्धीस गेलें नाहीं आणि पुढें परत पुण्यास आल्यानंतर त्या कामाची उपेक्षाच झाली, आणि हें कधीं तरी होईल अशा प्रकारची आशाहि राहिली नाहीं. परंतु जुने सुबोधपत्रिकेचे अंक दुर्मिळ असतांही माझे सर्व निबंध एकत्र करून पुस्तकरूपानें छापणें हें काम आमचे तरुण मित्र रा. रा. द्वारकानाथ गोविंद वैद्य यांनीं दोन तीन वर्षांवर पत्करलें आणि दुसरे ६ निबंध मजकडून लिहवून तेही त्यांस जोडले. शिवाय धर्मपीठावरून झालेले उपदेश टिपणें घेऊन लिहून काढण्याचा प्रघात मुंबईस १८९७ सालीं पडला. मीं १८८२ पासून तों आतांपर्यंत मुंबईस जेव्हां जेव्हां जात असे, तेव्हां तेव्हां उपदेश करण्याचे प्रसंग वारंवार येत. परंतु ते उपदेश १८९७ पर्यंत कोणीं टिपणें न घेतल्यामुळें प्रसिद्ध झाले नाहींत. १८९७ पासून पीठावरून जे उपदेश केले, ते पुष्कळ प्रसंगीं आमच्या मित्रांनीं लिहून काढून सुबोधपत्रिकेंत छापिले. पुण्यास अशा प्रकारें लिहून काढण्याचा फारसा प्रघात नव्हता. तथापि दोन तीन पुण्यांतीलहि उपदेश पत्रिकेंत छापले गेले. या सर्व उपदेशांचा या पुस्तकांत संग्रह केला आहे. मुंबईंतील उपदेशांपैकीं कांहीं रा. रा. दीनानाथ विष्णु माडगांवकर यांनीं लिहून काढले, परंतु त्यांतील बहुतेक रा. रा. द्वारकानाथ गोविंद वैद्य यांनींच तयार केले. पुण्यांतील उपदेश डॉ. वासुदेव अनंत सुखठणकर यांनीं

लिहून काढले. त्यांचा विषय 'भाव अथवा परमेश्वरप्राप्तीचा उपाय' हा होता. ते एकत्र करून त्या नांवानें या पुस्तकांत छापले आहेत.

पुस्तकांतील निबंध आणि बहुतेक उपदेश अथवा व्याख्यानें मीं तपासलीं आहेत. शेवटचीं कांहीं व्याख्यानें दृष्टि फारच कमी झाल्यामुळें मीं तपासलीं नाहींत. तथापि रा. रा. वैद्य यांनीं मजला वाचून दाखविलीं, तीं मीं पसंत केलीं आहेत.

हें पुस्तक तयार होऊन प्रसिद्ध होत आहे याविषयीं सर्व श्रेय माझे मित्र रा. रा. द्वा. गो. वैद्य यांचें आहे. त्यांनीं पुष्कळ श्रम घेऊन स्वतः जुन्या अंकांतील कांहीं प्रकरणें शोधून काढून आपले हातानें लिहून छापखान्यांत पाठविण्यासाठीं तयार केलीं. या सर्व श्रमांबद्दल मी त्यांचा आभारी आहें, असें केवळ रूढीस अनुसरून शब्द न बोलतां 'ईश्वर त्यांचें कल्याण करो,' असा मी त्यांस आशीर्वाद देतों. पुस्तकाचे संपादक सर्व प्रकारें तेच आहेत."

ह्या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीमध्यें १७ नवीं व्याख्यानें घातलीं आहेत. ह्या व्याख्यानांचा विशेष असा आहे कीं त्यांतील सोळा डा. भांडारकरांच्या शब्दांत आहेत. प्रार्थना मंदिरामध्यें तीं झालीं व आम्ही अगर दुसऱ्या कोणी तरी त्यांचा सारांश लिहिला व तो डा. भांडारकरांच्या नजरेखालून गेला असें नव्हे, तर एकदां व्याख्यानें झाल्यानंतर हीं व्याख्यानें डा. भांडारकरांनीं पुन्हा स्वतः निवेदिलीं व तीं त्यांच्या समक्ष कोणी तरी उतरून घेतलीं व तीं आमच्या हातीं येण्यापूर्वीं त्यांस पुन्हां वाचून दाखविण्यांत आलीं. तिसरी आवृत्ति डा. भांडारकरांच्या ८२ व्या वाढदिवशीं प्रसिद्ध झाली. तींत वरील पद्धतीस अनुसरून वीस नवीन व्याख्यानें घातलीं आहेत. दुसऱ्या आवृत्तीला सर नारायण चंदावरकर ह्यांनीं लिहिलेली प्रस्तावना जोडलेली असून एक शंभर पृष्ठांचा चरित्रात्मक लेख जोडला आहे. दुसरी आवृत्ति प्रसिद्ध झाल्यावर रा. रा. विठ्ठलराव शिंदे ह्यांनीं ह्या ग्रंथाचें महत्त्व दाखविणारा एक लेख लिहिला. त्यांतील कांहीं भाग असा होताः—

" मधाबद्दल फुलाचे अधिक आभार मानावेत कीं मधमाशीचे, हें सांगणें एक वेळ सोपें जाईल; पण वरील सद्ग्रंथाचे उत्पादक व संपादक ह्यांच्याविषयीं वाचकांची जी उपकृतबुद्धि होणार आहे तिचा निर्णय करणें मुळींच सोपें नाहीं. फुलांतील मधुर द्रव्याची सांठवणी केल्याशिवाय त्यास मुळीं मधपणाच येत नाहीं हें जसें खरें आहे तसेंच फुलावर लुब्ध होणें हा जो मधमाशीचा आद्य गुण तो

तर फुलाशिवाय मुळींच शक्य नाहीं हेंही खरें आहे. प्रस्तुत उत्पादकांनीं स्वतः पहिल्या आवृत्तीच्या निवेदनपत्रिकेंतच जरी म्हटलें आहे कीं 'ह्याविषयीं सर्व श्रेय माझे मित्र रा. रा. द्वा. गो. वैद्य ह्यांचेकडे आहे' तरी ह्या पुस्तकाचें श्रेय कोणाकडे आहे, हें ठरविण्याची कठिणता कमी होत नाहीं. कारण यद्यपि रा. वैद्यांनीं हें पुस्तक प्रकाशित करण्यांत, सर्व तरुणांनीं उदाहरण घेण्यासारखा उद्योग आणि उत्साह दाखविला आहे तरी दुसरे पक्षीं ज्या गुणांमुळें ते ह्या परमपूज्य गुरुवर्यांचे अनन्य अनुगामी झाले आहेत ते लक्ष्यांत आणतां त्यांना मिळालेल्या प्रस्तुत श्रेयाचें मूळस्थान पुनः गुरुवर्यच होतात.

आमचें मराठी वाङ्मय अद्यापि कंगालस्थितींतच आहे, हें कोणी कितीही स्वाभिमानी असला तरी त्याला कबूल करावें लागेल. तशांत धर्मपर पुस्तकांची—विशेषतः आधुनिक संस्कृतीला साजेल अशा ग्रंथांची—तर मोठीच उणीव आहे; इतकेंच नव्हे तर अशा वाचनाची अद्यापि अभिरुचिदेखील आमच्या वाचकवर्गांत झाली आहे किंवा नाहीं ह्याबद्दल आजपर्यंत जबर शंकाच वाटत होती. पण थोड्याच काळांत रा. वैद्यांना ह्या पुस्तकाची वाढविलेली दुसरी आवृत्ति काढण्याचा प्रसंग आला—नव्हे त्यांनीं आणिला ह्याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तितकें थोडेंच.

प्रस्तुत पुस्तकाचे 'धर्मपर लेख,' 'व्याख्यानें' आणि 'चरित्र' असे तीन भाग होतात. पहिल्या म्हणजे लेखांच्या भागाचा काळ म्हणजे प्रार्थनासमाजाच्या जवळ जवळ आरंभाचा काळ (१८७८–८२) होता. म्हणून अर्थात्च ह्रा वादविवादात्मक झाला आहे. डा. भांडारकर समाजाचे सभासद होण्यापूर्वी समाजाच्या तत्त्वांची मांडणी व शब्दरचना जी कठोर आणि अपूर्ण होती तिला डाक्टरसाहेबांनीं हल्लींचें सौम्य व पूर्ण स्वरूप दिलें; इतकेंच नव्हे, तर त्यांचा मराठी जाणणाऱ्यांमध्यें अधिक विस्तारानें प्रसार केला. तो ज्या लेखांच्याद्वारें केला त्यांची ही मालिका होय. पूर्वीप्रमाणें हल्लीं जरी समाजमताला बाहेरून उघड उघड विरोध येत नाहीं तरी ह्या भागाची उपयुक्तता कमी झाली आहे असें नाहीं. कारण समाजमतांतील तपशीलवार माहिती करून घेऊं इच्छिणारांना ह्या भागापासून विशेष फायदा होण्यासारखा आहे, इतकेंच नव्हे तर स्वतः गुरुवर्यांनींच सावधगिरीची सूचना केल्याप्रमाणें समाजाच्या निषेधक बाजूची पूर्ण जाणीव कायम ठेवण्यासाठीं समाजाच्या सभासदांनाही हा भाग आवश्यक आहे.

पण ज्याला सर नारायणरावांनीं Invigorating tonic to the mind, sanctifying discipline of life ( मनाला हुरूप आणणारें पौष्टिक, व जीवित शुद्ध करणारी प्रणाली ) असें ह्मटलें आहे, तो भाग ह्मणजे व्याख्यानांचाच होय. पहिल्या भागाप्रमाणें ह्यांत तोडीस तोड आणि फेंकीस फेंक हा प्रकार नसल्यामुळें कित्येकांस हा तितका रुचण्याचा संभव नाहीं. पण वरवर वाचणारांच्या करमणुकीकरितां, किंवा कोटीक्रमाची जुळवाजुळव करणाऱ्या वावदुकाकरितां हा भाग नाहीं. हा विध्यात्मक व पौष्टिक भाग आहे. धर्मपर व्याख्यानांचा अथवा उपदेशाचा उद्देश प्रतिपक्षाचा पाडाव करण्याचा किंवा एखाद्या सिद्धांताची प्रतिपत्ति करण्याचा नसतो. उपदेश हा ईश्वरोपासनेचा एक भाग आहे. ध्यान, भजन, प्रार्थना इ. च्या द्वारा चित्त निर्मळ, निर्लेप आणि ग्रहणशील झाल्यावर अभ्यंतरीं उमटणारी, 'अबोलण्या' ईश्वराकडून मिळालेली ती एक खूण आहे. हा बसल्या बैठकीला भरकन् वाचून टाकण्याचा भाग नव्हे. थकल्या भागल्या वेळीं एकच उपदेश वाचला कीं कार्यभाग होणार आहे. हा निराळाच छापून काढला असता तरी बरें झालें असतें. तिसरा भाग चरित्राचा; तो ह्या दुसऱ्या आवृत्तीचा एक विशेष असल्यामुळें हिला विशेष मोहकपणा आला आहे. डा. भांडारकरांसारख्या मोठ्या माणसांचें चरित्र म्हणजे एक राष्ट्रीय धनच. तें खरें पाहिलें असतां ह्यांत पुष्कळच मोठ्या प्रमाणावर संपादित झालें पाहिजे; तें योग्य वेळीं होईलच. पण तूर्त हातीं घेतलेल्या कार्याला अनुरूप असा लेख लिहून रा० वैद्यांनीं वाचकांना डाक्टरसाहेबांचें विस्तृत चरित्र जाणण्याबद्दल जो चटका लावून दिला आहे, तो वाखाणण्यासारखा आहे. रानडे आणि भांडारकर हीं दोन्हीं नांवें त्यांच्या प्रतिपक्षांच्याही तोंडीं मिळूनच असावयाचीं. आधुनिक महाराष्ट्रमेरूचीं हीं दोन अति उंच शिखरें. एक अनेक संस्था, चळवळी, आणि प्रेरणांचीं बीजें पेरणारा मुत्सद्दी व दुसरा त्या सर्वांची शास्त्रोक्त उपपत्ति स्थापन करणारा मार्गदर्शक; एक प्रवर्तक व दुसरा पंडित. पण दोघेही एकाच आधुनिक उदार धर्माच्या मंडपांत बसून एकाच राष्ट्रयज्ञाचीं कामें चालविणारे, परस्पर सहाय्यक अध्वर्यू. डा. भांडारकर हे केवळ शाळेंतील व कॉलेजांतील अध्यापक नाहींत, तर सामाजिक व आध्यात्मिक सुधारणेचेही अध्यापक आहेत हें त्यांच्या चरित्रलेखांत चांगलें दाखविलें आहे."

शेवटीं, प्रार्थनासमाजाच्या बाहेर राहूनही ज्यांना समाजाच्या कार्याविषयीं चांगली माहिती आहे त्या रा. रा. नरहर रघुनाथ फाटक ह्यांनीं ह्या इतिहासाच्या

पुस्तकासाठीं डा. भांडारकरांच्या लेखासंबंधानें पुढील अभिप्राय मुद्दाम लिहून पाठविला आहे त्यावरून ह्या ग्रंथाचें महत्त्व बाहेरील मंडळीसही किती वाटत आहे त्याची सर्वांस योग्य कल्पना होईल:—"इंग्रजी विद्येच्या संस्कारानें आंदोलन सुरू झाल्यापासून क्रिया प्रतिक्रियारूपाचें बरेंच वाङ्मय बाहेर पडलें. परंतु पद्धतशीर रीतीनें ईश्वराच्या अस्तित्वाचा, प्रभावाचा आणि भक्तीचा सध्याच्या काळीं प्रसार पावलेल्या आधिभौतिक शास्त्राचें ज्ञान जमेस धरून तर्कशुद्ध विचार सांगणारें टिकाऊ वाङ्मय फारसें दाखवितां येणार नाहीं. प्रार्थनासमाजाचा उदय होऊन त्याच्या पुरस्कर्त्यांचीं मतें लोकांसमोर येऊं लागल्यानंतर जुन्या मताच्या शास्त्रीपंडितांनीं त्यांचें खंडन करण्यासाठीं साप्ताहिक सभा भरविल्याचा वृत्तान्त आढळतो. त्या सभांच्या स्फुरणानें कांहीं पुस्तकेंहि त्या काळीं बाहेर पडलीं, परंतु त्यांचीं नांवेंसुद्धां आज कोणाला माहीत नसलेल्या स्थितींत तीं आज आहेत. प्रार्थनासमाजाच्या कार्यामागें धर्माच्या जीर्णोद्धाराचा हेतु असल्यामुळें त्याला असल्या वादव्यापासून कांहींच बाधा झाली नाहीं. जे कित्येक संग्राहक स्वरूपाचे ग्रंथ समाजामार्फत प्रसिद्धि पावले आहेत तें सर्व मतप्रसाराच्या कार्याचीं फळें होत. हिंदुस्थानांतली जुनी तत्त्वविचारांची परंपरा तोडून टाकून आणि नवे तत्त्वविचार ख्रिस्तीधर्मापासून उसने घेऊन त्यांचें कलम येथील धर्मभूमींत सजविण्याचा प्रयत्न समाजानें चालविला आहे असा ज्यांचा ग्रह असेल त्यांनीं हा ग्रह क्षणभर बाजूला ठेवून जर रानडे, मोडक, भांडारकर यांच्या प्रवचनांचें परिशीलन केलें तर त्यांची दृष्टि निवळण्याला उशीर लागणार नाहीं; पण त्यांतल्या त्यांत जर विशेष रीतीनें कोणाच्या प्रवचनसंग्रहाची शिफारस करावयाची म्हटली तर ती गु. व. डॉ. भांडारकर यांच्याच संग्रहाची करावी लागेल. भांडारकरांच्या संग्रहांतला पुष्कळसा भाग लेखांचा असल्यानें तो त्यांच्याच लेखणींतून उतरलेला आहे. प्रवचनांतलीं थोडीं प्रवचनें दुसऱ्यांच्या लेखणींतून अहवालरूपानें आलेलीं आहेत. बाकीचीं बहुतेक प्रवचनें त्यांनीं तपासलेलीं किंबहुना कांहीं प्रसंगीं लिहून दिलेलीं असल्यामुळें भांडारकरांचें धर्मह्रुत अस्सला बरहुकूम जसेंच्या तसें या संग्रहांत प्रतिबिंबित झालेलें आहे, असें म्हणतां येतें. त्यांच्या संग्रहाचा दुसरा विशेष विविधतेचा आणि व्यापकतेचा आहे. ईश्वराच्या अस्तित्वावरच समाजाच्या धर्मविचारांची उभारणी झालेली आहे. तथापि या विषयाचें शास्त्रोक्त पद्धतीनें सांगोपांग विवेचन केलेलें मराठी भाषेंत अन्यत्र क्वचितच आढळेल. इंग्रजीभाषेंत असे अनेक ग्रंथ आहेत. भांडा-

रकरांनीं या विषयावर लिहिलेली सुबोधपत्रिकेंतली लेखमाला निराळ्या पुस्तकांप्रमाणें लहानपणीं मुलांना शिकविण्याच्या व प्रौढवयस्कांना मनाच्या समाधानासाठीं किंवा प्रसादसंपादनासाठीं अखंड वाचनांत ठेवण्याच्या योग्यतेची आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे समाजाच्या इतिहासाचें, धर्मविचाराचें भांडारकरांचा प्रवचनसंग्रह हें एक वाङ्मयमंदिर आहे. सामान्यतः विशिष्टस्वरूपाच्या मतप्रतिपादनामध्यें जो दुराग्रह व हटवादीपणा आढळतो, तो त्यांत नाहीं, पण ईश्वरासंबंधीं निरंतर विचारानें जी एक प्रकारची अधिकारमय साक्षात्कारबुद्धि मनुष्यामध्यें उत्पन्न होते, तिचें प्रतिबिंब या संग्रहांत पहावयास सांपडतें. कोणतीहि गोष्ट तर्काच्या कसोटीवर घासून तिची पूर्ण परीक्षा केल्याशिवाय स्वीकारावयाची नाहीं असा भांडारकरांचा बाणा असल्यामुळें दुसऱ्यांना उपदेशावयाच्या विचारांतहि त्यांनीं तोच बाणा कायम ठेविला आहे. त्यायोगानें त्यांच्या भाषासरणींत तर्ककर्कशपणा आलेला आहे. गैरसमज उत्पन्न करणाऱ्या किंवा अर्थांत संदिग्धपणा राहूं देणाऱ्या रसाळ मार्दवापेक्षां गहनविषयाच्या प्रतिपादनाला असा भाषेचा नीरसकठोरपणाच अधिक उपयोगी असतो. भांडारकरांच्या या संग्रहांतली आणखी एक सांगण्यासारखी महत्वाची गोष्ट म्हणजे उपनिषद, पुराणें, गीता इत्यादि ग्रंथांतून घेतलेले उत्कृष्ट निवडक वेंचे ही होय. आपल्या प्राचीन वाङ्मयांत सांठविलेले ईश्वरविषयक तत्वज्ञानाचे जे उज्ज्वल आणि मनाची पराकाष्टेची उन्नति दाखविणारे समर्पक विचार आहेत, ते भांडारकरांच्या संग्रहांत फार मोठ्या प्रमाणामध्यें एकत्रित झाले असल्यानें बोधग्राही बुद्धीनें त्यांच्या संग्रहाचा सहज वरवर चालना करणारांनाहि या विचारांच्या परिचयाचा अनायासें लाभ घडतो.

**सर नारायण चंदावरकर ह्यांचीं धर्मपर व्याख्यानें**—सर नारायण चंदावरकर हे इंदुराला दिवाण असतांना इंदुप्रकाशचे मालक शेट दामोदर सावळाराम ह्यांच्या मनांत सर नारायण ह्यांच्या व्याख्यानांचा मराठी अवतार लोकांस सादर करण्याचा विचार आला. व त्यांनीं हें काम सुबोध पत्रिकेच्या संपादकांवर सोंपविलें. संपादकांनीं रा. केसकर व इतर मित्र ह्यांच्या साहाय्यानें हें कार्य संपविलें. पुस्तकाच्या प्रस्तावनेंत त्यांनीं असें म्हटलें आहे कीं "सर नारायण ह्यांचीं सर्व व्याख्यानें इंग्रजींत होतात; तीं सर्वांस उत्तम प्रकारें कळतातच असें नाहीं. तसेंच ज्यांस इंग्रजी बिलकुल समजत नाहीं अशा लोकांना सर नारायण यांच्या विचारांची ओळख करून देण्याची संधि रा. रा. यंदे आणून द्यावयास सिद्ध

असतां आपण माघार घेणें हें इष्ट नाहीं असें वाटून संपादकांनीं भीत भीत हें कार्य हातीं घेतलें. ह्यांत एकंदर ३९ व्याख्यानें असून सर नारायण ह्यांच्या चरित्रा-संबंधानें एक विस्तृत लेख जोडलेला आहे. हा चरित्रलेख सुबोधपत्रिकेच्या संपादकांनींच लिहिला. ह्यांतील व्याख्यानें जरी भाषांतररूप आहेत तरी तीं वाचीत असतां एका विचारवान्, धैर्यवान्, प्रतिभासंपन्न, सच्छील, व विवेक-मंडित पुरुषाच्या सहवासांत आपण आहों व पवित्र विचार, पवित्र भावना यांचा आपल्या मनावर सुपरिणाम होत आहे असा अनुभव येतो."

**धर्मपर व्याख्यानें**—सुबोधपत्रिकेमध्यें प्रसिद्ध झालेले कित्येक लेख व प्रार्थना मंदिरांत होणारीं व्याख्यानें एकत्रित करवून वर्षांतून दोन निदान एकतरी पुस्तक छापून प्रसिद्ध करावें असा विचार रा. रा. बी. बी. केसकर ह्यांस प्रथम सुचला व सुबोधपत्रिकेच्या संपादकांच्या सहाय्यानें त्यांनीं धर्मपर व्याख्यानांचे पांच भाग प्रसिद्ध केले. ह्या भागांत पुष्कळ महत्त्वाचे लेख व धर्मपर व्याख्यानें संग्रहित केलीं गेलीं आहेत. अशा प्रकारचा प्रयत्न मुंबईत प्रथमच करण्यांत आला व त्या वेळीं असे प्रयत्न शिस्तवार केले तर निर्फळ होत नाहींत असें दिसून आलें.

**ब्राह्मधर्मप्रतिपादक वाक्यसंग्रह**—हें पुस्तक प्रथमतः बंगालींत प्रसिद्ध झालें. त्याचें मराठी रूपांतर प. वा. कर्नल कीर्तिकर ह्यांनीं तयार करून प्रसिद्ध केलें. ह्यांत प्रथम वेद व उपनिषदें, नंतर महाभारत इ० ग्रंथांतील वेंचे आहेत, नंतर ख्रिस्ती, महमदी, पारसी वगैरे अनेक धर्मग्रंथांतील वेंचे दिलेले आहेत. मूळ पुस्तकास हल्लीं श्लोकसंग्रह हें नांव असून त्यांत, आणखी कांहीं धर्मग्रंथां-तील वेंचे घेतलेले आहेत. हें मराठी पुस्तक हल्लीं उपलब्ध नाहीं. परंतु बंगाली पुस्तकांत संस्कृत वचनें बालबोधींत असून इतर धर्मांतील वचनें इंग्रजींत व सर्वांचें भाषांतर बंगालींत दिलेलें आहे. सर्व धर्मग्रंथांतील उत्तम वचनांची ओळख करून घ्यावयास हें एक उत्तम साधन आहे.

**सुलभभजनसंग्रह**—पूर्वी सुलभ संगीत ह्या नांवाचें एक लहान पुस्तक होतें. त्याची सुधारलेली आवृत्ति ब्राह्मपोस्टल मिशननें प्रसिद्ध केली. प्रार्थनासंगीताची किंमत त्या वेळीं १ रुपया होती म्हणून गरीबांस थोड्या किंमतींत घेतां येईल व फार न शिकलेल्या साधारण लोकांस व मुलांस समजेल अशा संगीताची पुष्कळ दिवस भासत असलेली उणीव ह्या पुस्तकानें भरून काढिली. ह्या पुस्तकांत जुन्या प्रसिद्ध

भक्तांचीं सुरस पदें, भजनें व आधुनिक कवींचीं पदें घातलीं होतीं. कांहीं बंगाली पदें त्याच भाषेंत ठेवून कांहींचें मराठींत भाषांतर केलें. मूळ कवींच्या पाठांत फारच थोड्या ठिकाणीं थोडा फेरफार केला. तिसऱ्या आवृत्तीच्या वेळीं सर्वांस आंतील विषयांची सहज कल्पना व्हावी म्हणून ह्याचें नांव **सुलभ भजन संग्रह** असें बदललें असून, ही तिसरी आवृत्ति हल्लीं संपली असून चवथी आवृत्ति लवकरच तयार होणार आहे. हें सुलभ भजन संग्रहाचें पुस्तक चांगलें लोकप्रिय झालें आहे.

**राजा राममोहन राय ह्यांचें चरित्र**—१८७६ च्या सुमारास प. वा. भास्करराव भागवत ह्यांनीं राजा राममोहन ह्यांचें अल्प चरित्र प्रसिद्ध केलें. त्यानंतर मिस कॉलेट ह्यांनीं लिहिलेलें चरित्र प्रसिद्ध झालें व त्याची सुधारून वाढविलेली आवृत्ति बाबू हेमचंद्र सरकार ह्यांनीं प्रसिद्ध केली. परंतु मराठींत त्यांचें चरित्र नव्हतें. ही वाण रा. केसकर ह्यांनीं राजा राममोहन ह्यांचें चरित्र लिहून दूर झाली आहे. ह्यांत राजांच्या चरित्रांतील सर्व महत्त्वाच्या प्रसंगांची साधारण माहिती दिलेली आहे. चरित्रास सुबोधपत्रिकेच्या संपादकांनीं लिहिलेला विस्तृत उपोद्धात जोडलेला आहे. हें चरित्र मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीनें प्रसिद्ध केलें असून त्याचें गुजराथींत भाषांतर झालें आहे.

**बालसंगीत** आणि **बालधर्मानुशासन**—१९१५ सालीं रा. रा. बाबण बापू कोरगांवकर ह्यांनीं बालसंगीत आणि बालधर्मानुशासन ह्या नांवाचें एक ३५ पृष्ठांचें पुस्तक प्रसिद्ध केलें. ह्या पुस्तकास जोडलेल्या सूचनेंत रा. कोरगांवकर म्हणतात, "हें चिमुकलें वेंच्यांचें पुस्तक विशेषतः येथील प्रार्थनासमाजाच्या विद्यमानें चालत असलेल्या धर्म व नीतिशिक्षणाच्या शाळेंतील मुलांमुलींकरितां योजिलें आहे. तथापि त्याचा उपयोग, आपल्या मुलांस धर्मशिक्षण देऊं इच्छिणाऱ्या इतर शिक्षकांस व आईबापांसही होण्यासारखा आहे, व ते तसा उपयोग करतील तर मुलांचें हित होईल. मुलांचे आईबाप यांतील पहिलें पुस्तक दहा वर्षांच्या आंतील मुलांकडून, व **दुसरें पुस्तक** त्यांपेक्षां वडील मुलांकडून, जुन्या संध्येच्या ऐवजीं नित्य नेमानें पाठ करून घेतील, तर त्यांना योग्य वळण लागून त्यांच्या मनावर इष्ट परिणाम झाल्यावांचून रहाणार नाहीं, असें वाटतें. यांतील दुसऱ्या पुस्तकांतील वेंचे सर रामकृष्णपंत भांडारकर यांनीं उपनयन झाल्यानंतर जुन्या संध्येच्या ऐवजीं मुलांना पाठ करण्याकरितां म्हणून काढले आहेत. त्यांचें मराठी कविताबद्ध रूपांतर जें वचनांच्या खालीं दिलें आहे तें माझ्या एका सन्माननीय प्रिय मित्रानें (रा. रा. दी. वि. माडगांवकर) केलें

आहे. शेवटीं जे नियम दिले आहेत ते माझे मित्र रा. रा. वामन रा. जोशी यांचे आहेत."

**न्या. मू. रानडे यांचें चरित्र.** लेखक—रा. रा. नरहर रघुनाथ फाटक, बी. ए. न्या. मू. रानडे ह्यांचें हें विस्तृत चरित्र त्यांच्या मृत्यूनंतर बावीस वर्षांनीं प्रसिद्ध झालें. त्याच्यापूर्वी रा. ब. मानकरांनीं नांवाला दोन खंडामध्यें लिहिलेलें चरित्र अस्तित्वांत होतें, परंतु तें नुसतें टांचण होतें. माधवरावांच्या चरित्रांतील सर्व महत्त्वाच्या प्रसंगांचें व त्यांच्या चारित्र्याचें ज्यांत साधार विवेचन आहे अशा चरित्राची भासत असलेली वाण ह्या पुस्तकानें भरून निघाली आहे व गेल्या वर्षी प्रो. केलाक ह्यांनीं रानड्यांचें जें इंग्रजी चरित्र लिहिलें आहे त्यास फाटकांनीं लिहिलेल्या चरित्राचा आधार पुष्कळ अंशानें घेतलेला आहे. रानड्यांना ज्यांनीं डोळ्यांनीं सुद्धां पाहिलें नव्हतें, अशा एका तरुणानें अल्पावधींत लिहिलेला हा चरित्रग्रंथ आहे असें सांगितलें म्हणजे रा. फाटक ह्यांचा उद्योग, आस्था व शोधकबुद्धि ह्यांविषयीं चांगली कल्पना होते व फाटकांनीं रानड्यांच्या सर्वांगीण जीवनाशीं समरस होण्याचा केलेला प्रयत्न पाहून मोठें कौतुक वाटतें. धर्मपर व्याख्यानाला जो चरित्रात्मक लेख जोडला आहे तो केवळ चरित्रपर नाहीं. त्यांत रानड्यांच्या चरित्राचें रहस्य जाणण्याचा प्रयत्न केलेला आहे. व हरिभाऊ आपटे, रा. ब. महाजनि अशा गृहस्थांनीं त्याबद्दल लेखकाचें अभिनंदन केलें आहे. तथापि ज्या कोणास रानड्यांचें विस्तृत चरित्र व त्यांच्या कोठल्याही चळवळीविषयीं विश्वसनीय माहिती हवी असेल त्यांस ती फाटककृत चरित्रामध्यें निःसंशय मिळेल इतकें सांगितलें म्हणजे ह्या चरित्रग्रंथाचें महत्त्व लक्षांत येईल.

**ब्राह्मविवाहविधि**—१८७८ सालीं रा. रा. सदाशिवराव केळकरांच्या विवाहाच्या वेळीं डा. भांडारकरांनीं जो विवाहविधि तयार केला तो प्रथम त्या वेळीं सुबोधपत्रिकेंत छापून प्रसिद्ध झाला. नंतर रा. सदाशिवरावांनीं आपल्या ज्ञानदीप मासिकामध्यें एकंदर विवाहविधीविषयीं टीका केली व कांहीं सुधारणा करून ब्राह्मविवाहविधि पुन्हां छापिला व त्याच्या कांहीं स्वतंत्र प्रतीही प्रसिद्ध केल्या. त्या दुर्मिळ झाल्यावर रा. रा. बा. बा. कोरगांवकर ह्यांनीं हा सर्व विधि मोठ्या टाइपांत सुंदर रीतीनें छापविला असून त्याच्या सर्व प्रती प्रार्थनासमाजाच्या हवालीं केल्या आहेत. हा विधि छापण्याचा सर्व खर्च एका उदार बंधूनें दिला आहे. अलीकडे होणारे समाजांतील सर्व विवाह बहुतकरून ह्याच विधीच्या आधारें होत असतात.

**दैनिक मनन**—इंग्रजीमध्यें Daily Strength for Daily Needs यासारखीं रोज वाचण्यासारखीं पुष्कळ पुस्तकें आहेत. रोज कांहीं तरी एक विचार मनामध्यें आणून त्यासंबंधानें मनन करणें, अगर असा विचार दृष्टीपुढें ठेवून दैनिक कार्यास सिद्ध होणें हें अत्यंत लाभदायक असतें. वर म्हटलेल्या प्रकारचीं पुस्तकें इंग्रजींत पुष्कळ आहेत, पण मराठींत खिस्ती वाङ्मय सोडल्यास एकही नाहीं व तसें एकादें पुस्तक तयार झाल्यास तें कोणत्या प्रकारचें असावें त्याची कल्पना करून देण्यासाठीं केवळ एक महिन्यासाठीं रा. द्वा. गो. वैद्य यांनीं हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. ह्यांत ३१ दिवसांसाठीं निवडक वेंचे दिले असून ते महर्षि देवेंद्रनाथ, डा. भांडारकर, न्या. मू. रानडे, वामनराव मोडक, सर नारायण चंदावरकर, स. पां. केळकर, रवींद्रनाथ ठाकूर, इ० च्या लेखांतून अगर व्याख्यानांतून घेतले आहेत. परंतु ज्यांनीं हें एक महिन्यापुरतें पुस्तक तयार केलें. त्यांस सबंध वर्षासाठीं दैनिक मनन तयार करण्यास अद्याप फुरसूद सांपडली नाहीं.

**रा. रा. शिंदे ह्यांचे लेख व व्याख्यानें**—रा. रा. विठ्ठल रामजी शिंदे हे युनिटेरिअन स्कालरशीप घेऊन ऑक्सफर्ड येथें अध्ययनासाठीं जातेवेळीं त्यांस सुबोधपत्रिकेसाठीं सर्व प्रकारचे लेख लिहिण्याची संपादकांनीं विनंति केली होती. त्याच्या पूर्वी पत्रिकेंत रा. सदाशिवराव केळकर ह्यांनीं लिहिलेलीं पत्रें प्रसिद्ध झालींच होतीं. रा. विठ्ठलराव हे किती प्रतिभासंपन्न लेखक आहेत याची साक्ष त्यांच्या लेखांवरून ते विलायतेंतून परत येण्यापूर्वीच लोकांस पटली होती. प्रचारकाचा पेशा पत्करल्यानंतर त्यांनीं वेळोवेळीं जीं धर्मपर व्याख्यानें दिलीं व जे लेख लिहिले त्यांतील बहुतेक सुबोधपत्रिकेंत व इतर पत्रांत आले आहेत. ते सर्व रा. रा. बी. बी. केसकर ह्यांनीं एकत्रित केले, व इंदुप्रकाश छापखान्याचे मालक शेट दामोदर सावळाराम यंदे यांनीं १९१३ सालीं प्रसिद्ध केले. ह्या पुस्तकास रा. शिंदे यांचें प्रार्थनासमाजाच्या दुसऱ्या एक सभासदानें लिहिलेलें एक लहानसें चरित्रही जोडलेलें आहे. त्या वेळपर्यंत प्रसिद्ध झालेले सर्व लेख व व्याख्यानें यांचा हा संग्रह वाचनीय असून ह्यांतील कित्येक व्याख्यानें विवेकास जागृत करणारीं आहेत. मन त्रस्त झालें असेल तेव्हां, अगर विश्रांतीच्या वेळीं ह्या पुस्तकांत प्रसिद्ध झालेलीं रा. शिंदे यांचीं केवळ विलायतेहून लिहिलेलीं पत्रें जे कोणी वाचतील त्यास रा. शिंदे यांचें निरीक्षणसामर्थ्य, कल्पकता, भाषेंतील काव्य व रस अवलोकून समाधान वाटल्यावांचून राहणार नाहीं.

# इतर समाज.

मुंबईच्या प्रार्थना समाजाची स्थापना १८६७ सालीं झाल्यानंतर त्याच्या मतांचा प्रसार तशाच संस्था स्थापन होऊन किती झाला असा प्रश्न वारंवार विचारण्यांत येतो. प्रार्थनासमाजाच्या मतांचा प्रसार होण्याचे दोन मार्ग आहेत. पहिला मार्ग म्हणजे निरनिराळ्या ठिकाणीं समाजांची स्थापना होणें व त्यांनीं धर्मप्रसाराचें काम करणें. दुसरा मार्ग मुंबईच्या अगर दुसऱ्या कोणत्याही समाजाचे सभासद ज्या ज्या ठिकाणीं असतील तेथील सभासदांनीं आपल्या मतांचा प्रसार करण्यासाठीं प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष प्रयत्न करणें हा आहे. हे जे प्रयत्न चाललेले असतात त्यांचा लोकांच्या मनावर परिणाम होतो व त्यामुळें त्यांचे विचार व आचार यांमध्यें परिवर्तन होत असतें. ह्या दृष्टीनें पाहिलें असतांना, गेल्या साठ वर्षांत प्रत्यक्ष रीतीनें पुष्कळ समाजांची स्थापना होऊन धर्मप्रसार झाला असें जरी म्हणतां आलें नाहीं, तरी प्रार्थनासमाजाच्या साठ वर्षांच्या जीवनाचा विचारी लोकांच्या चारित्र्यावर जाणून अगर न कळत झालेला परिणाम समाधानकारकच आहे. लोकांच्या धर्मविषयक विचारांत उत्पन्न झालेलें औदार्य, पुष्कळांनीं स्वतःपुरता प्रतिमापूजनाचा केलेला त्याग, वगैरे गोष्टींचा जे कोणी विचार करितील, त्यांस प्रार्थनासमाजाच्या गेल्या साठ वर्षांच्या कामगिरीची कल्पना सहज होण्यासारखी आहे. त्याचप्रमाणें पुष्कळ ठिकाणीं आजपर्यंत लहान लहान समाज स्थापन झाले. परंतु तें काम पुढें चालविणारी मंडळी त्या त्या ठिकाणीं पुढें न आल्यामुळें ते ते समाज अंतीं नामशेष झाले. ठाणें येथें रा. रा. गोपाळ मोरेश्वर साठे, जनार्दन बाळाजी मोडक, कर्नल कीर्तिकर वगैरे मंडळी असतांना कांहीं वर्षें **सद्धर्मसमाज** नामक समाज होता. प्रार्थनासमाज ह्या नांवावर टीका झाल्यामुळेंच निराळेंच नांव देण्याची आवश्यकता ह्या मंडळीला वाटली असावी. ह्या समाजाच्या विद्यमानें होणाऱ्या उपासना वरील गृहस्थ चालवीत असत. १८७९ सालीं ह्याचा तिसरा वार्षिकोत्सव साजरा केल्याचा उल्लेख आढळतो. महाराष्ट्राचाच विचार केला तर नाशिक व पंढरपूर येथील प्रार्थनासमाजांचा येथें उल्लेख केला पाहिजे. नाशिक येथें रा. ब. रानडे यांची बदली होतांच त्यांनीं तेथें प्रार्थनासमाजाची स्थापना रा. रा. गोपाळ गणेश पंडित, मास्तर, ह्यांस हाताशीं घेऊन केली. त्यांच्या मागें रा. रा. केतकर वकिलांनीं ही संस्था अखेरपर्यंत चालविली. अमुक एक वेळीं उपासना व्हावयाची असें ठरलेलें होतें त्यावेळीं रा. केतकर अथपासून इतिपर्यंत उपासना चालवीत. **पंढरपुरास** रा. ब. लालशंकर

गेल्यावर त्यांनीं समाजाची स्थापना केली व तेथील पाटील वकिलांच्या सहाय्यानें हा समाज कित्येक वर्षे चालला. आर्फनेजमध्यें मुलांवर देखरेख करण्यासाठीं पाठविलेले रा. करकरे तेथें असतांना समाजास चांगलें स्वरूप आलें होतें; पण पुढें तो फार दिवस टिकून राहिला नाहीं.

**सातारा सनातनधर्म प्रार्थनासमाज.**—नामशेष झालेल्या समाजांत आज सातारा येथील समाजास घालावें लागत आहे याबद्दल आम्हांस अत्यंत खेद होत आहे. कारण, एके काळीं सातारा समाज सुस्थितींत होता व तेथील कामही व्यवस्थित रीतीनें होत होतें. वस्तुतः सातारा येथें १८८६ सालीं प्रार्थना समाजाची स्थापना झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. त्या सालीं रा. रा. सीताराम यादवराव जऱ्हेरे यांची पुण्याहून सातान्यास बदली झाली. त्या वेळीं प्रार्थना अगर ब्राम्हसमाजाचा एकही सभासद सातान्यास नव्हता. साप्ताहिक उपासना जमविण्याचें कांहीं साधन नसल्यामुळें सीतारामपंतांस चुकल्यासारखें वाटूं लागलें. तथापि सातारा येथील ओळखी वाढल्यावर रा. वामनराव साखळकर वगैरे कांहीं मित्र जमवून लवकरच प्रार्थनासमाजांतील पद्धतीप्रमाणें सातान्यास साप्ताहिक उपासना होऊं लागल्या. १८८९ सालीं रा. जऱ्हेरे मुंबईस आले असतांना त्यांची व बाबू अमृतलाल बोस यांची मुंबईत गांठ पडली व त्यांनीं बाबूजींस सातान्यास येण्याचा आग्रह केला. सातान्यास बाबूंचीं तीन व्याख्यानें झालीं व शहरांतील सुशिक्षित लोकांस तेणेंकरून समाजाची माहिती झाली. इतक्यांत रा. ब. चिंतामण नारायण भट ह्यांची सातान्यास बदली झाली. तेव्हां सीतारामपंतांस आनंद झाला. कारण, चिंतामणराव पुणें समाजाचे सभासद होतेच. चिंतामणराव तेथें आल्यानंतर त्यांच्या सहवासानें कांहीं वकील मंडळीही समाजास येऊं लागली व जेथें पूर्वी कांहीं नव्हतें त्या ठिकाणीं १८९५ सालीं ज्या वेळीं बाबू सत्येन्द्रनाथ ठाकूर सातान्यास जज्ज म्हणून आले त्या वेळीं समाजाची जाहीर रीतीनें स्थापना करण्यांत आली. त्या वेळीं आणखी कांहीं वकील व इतर मंडळी समाजाला येऊन मिळाली. उपासना चालविण्यासाठीं एक स्वतंत्र जागा घेतली व बाबू सत्येंद्रनाथ, सीतारामपंत, काळे, नाबर, इ. वकील ह्यांच्या साहाय्यानें समाजाचें काम मोठ्या उत्साहानें चालूं लागलें, व सत्येंद्रनाथ तेथें असतांना मोठ्या थाटाचे उत्सव झाले. टागोरांचें सर्व मोठें कुटुंब आपलें घरचें कार्य समजून उत्सवाच्या सर्व कार्यांत भाग घेत असे. मुंबईहून दोन वर्षे रा. रा. दीनानाथ सदानंद पाळेकर उत्सवासाठीं गेले व तेथील

सर्व उत्साह, उत्तम गायन, ठाकठिकीची व्यवस्था, लोकांची अनुकूलता पाहून त्यांना अत्यंत समाधान वाटलें. परंतु ही समाधानाची स्थिति फार दिवस टिकून राहिली नाहीं. १८९८ सालीं बाबू सत्येंद्रनाथ पेन्शन घेऊन आपल्या गांवीं गेले; रा. ब. चिंतामणराव भट हे ह्याच सुमारास पुणें येथें प्लेगला बळी पडले; ह्याच वेळीं रा. ब. मराठे साताऱ्यास बदलून आल्यामुळें सीतारामपंतांनीं त्यांच्या साहाय्यानें काम चालू ठेविलें; काळे, नावर वकील पुष्कळ दिवस टिकून राहिले; रा. ब. मोरोपंत जोशी साताऱ्यासच राहावयास आले. त्यांची कन्या कु. मथुराबाई ह्यांचें समाजास बरेंच साहाय्य होऊं लागलें. ह्या सुमारास रा. जव्हेरे ह्यांनीं अस्पृश्य वर्गांच्या उन्नतीचा प्रश्न हातीं घेतला व ब्राम्हधर्माचा संदेश त्यांस पोंचविला. ते लोक समाजाच्या उपासनेस येऊं लागले व कांहीं सभासदही झाले; पण, त्यामुळें कांहीं सभासदांनीं आपलें अंग काढून घ्यावयास सुरुवात केली. कर्नल कीर्तीकर साताऱ्यास होते तोंपर्यंत समाज बऱ्या स्थितींत होता; परंतु नंतर त्यास उतरती कळा लागली. रा. ब. काळे, रा. ब. जोशी व रा. जव्हेरे एवढेच काय ते राहिले. रा. ब. जोशी वृद्धापकाळामुळें बाहेर पडत नाहींत, सर्व प्रकारें त्यांस मनःपूर्वक साहाय्य करणाऱ्या, आपलें ज्ञान वाढीस लावून त्याचा लाभ इतरांस देणाऱ्या, धर्माचा विषय प्रिय असणाऱ्या मथुराबाई अकालीं कालवश झाल्या ह्या त्यांच्या कौटुंबिक आपत्तीमुळें रा. ब. जोशी यांना कांहीं करतां येणें शक्य नव्हतें. जोंपर्यंत सीतारामपंत साताऱ्यास होते तोंपर्यंत त्यांनीं समाजाचें काम चालू ठेविलें. समाजाच्या वतीनें अस्पृश्य वर्गांतील लोकांसाठीं सुरू केलेली रात्रींची शाळा कशी चालू ठेवावयाची हा प्रश्न आतां रा. जव्हेरे ह्यांच्यापुढें उभा राहिला. ते साताऱ्यास होते तोंपर्यंत त्यांनीं समाजाची व शाळेची काळजी घेतली. लोक येवोत अगर न येवोत आपण आपलें काम करावयाचें हा त्यांचा बाणा होता. समाजाचे उत्सवही ते वारंवार करीत असत, व त्यासाठीं न्या. मू. रानडे, डा. भांडारकर ह्यांस साताऱ्यास पाचारण करीत. त्याचप्रमाणें पुणें व मुंबई येथील इतर मंडळी जाऊन उत्सव साजरा करीत. अखेरीस पेन्शन घेतल्यामुळें सातारा शहर सोडून पुण्यास येण्याचें रा. सीतारामपंत ह्यांनीं ठरविलें. त्या वेळीं समाजाचें काम चालविण्याचें कोणी न पत्करल्यामुळें रात्रींची शाळा चालविणारांच्या हवालीं हें काम करून विषण्ण मनानें रा. सीतारामपंत पुण्यास आले. त्यानंतर कांहीं दिवस उपासना चालू होत्या, पण आतां त्या चालू नाहींत असें कळतें. रा. सीतारामपंत साताऱ्यास असतांना कऱ्हाड येथेंही एक समाज स्थापन झालेला होता. पण तो दोन वर्षें चालून बंद पडला.

## अहमदनगर प्रार्थनासमाज.

इतिहासः—ह्या समाजाची चळवळ प्रथम इ. स. १८७४ सालीं सुरु झाली. त्या वेळीं शिवराम बापूजी परांजपे हे गृहस्थ तेथील इंग्रजी शाळेचे हेडमास्तर होते. त्यांचे तालिमींतील सिताराम यादवराव जव्हरे हे त्या वेळीं विद्यार्थिदशेंत असतांनाच ह्या चळवळींत प्रमुखपणें भाग घेत होते. रामभाऊ वाळवेकर, मोहनलाल वकील, कोंडो राणूजी घाटे, गोविंदराव गोडसे वगैरे मंडळींनीं त्यांच्या प्रोत्साहनानें एक लहानशी प्रार्थनासभा सुरू केली. कालेंकरून शंकर पांडुरंग पंडित व मोरो चिंतामण जोशी ह्यांची डेप्युटी कलेक्टरचे व विष्णु म. भिडे ह्यांची सबजज्जचे जागीं नगर येथें बदली झाल्यानें त्यांचा ह्या कामीं मोठा पुरस्कार मिळाला. लालशंकर उमियाशंकर हे सबजज्ज असतां त्यांच्या श्रमानें इ. स. १८८८ सालीं कार्तिक वद्य एकादशीचे मुहूर्तावर हल्लीचें मंदीर उभारण्यांत येऊन त्याचा प्रवेशसमारंभ झाला. ह्याच आतां समाजस्थापनेचा दिवस कल्पून वार्षिक उत्सव करण्यांत येतो. ह्या समारंभाचे वेळीं पुण्याहून गुरुवर्य भांडारकर, रानडे, चिंतामणराव भट, शिवरामपंत गोखले, नाशिकहून गंगाधरपंत केतकर वगैरे मंडळी हजर होती.

शंकर पांडुरंग पंडित ह्यांनीं ह्या समाजाची बरीच सेवा केली. त्यांच्या वजनामुळें व नियमेतपणामुळें बरीच मंडळी उपासनेस जमूं लागली. ते साप्ताहिक उपासना चालवून, गुरुवारची संगतसभाहि करीत. पुढें जे रावसाहेब काकडे पोलीस इन्सपेक्टर झाले व बळवंत रामचंद्र शिंदे हल्लीं सेक्रेटरी आहेत, सहदेवरावजी बागडे जे शेवटपर्यंत खजीनदार होते व रावबहादुर मारुतिराव भुजंगराव पुढें समाजाचे अध्यक्ष झाले, ही आणि इतर पुष्कळ मंडळी शं. पां. पंडित आणि मो. चिं. जोशी ह्यांच्याच उत्साहामुळें समाजास लाभली. पंडितांच्या नजरेखालीं, शिंदे मास्तर मुलांचा वर्ग चालवीत असत. सरकारी कामांत विशेषतः न्यायाचे बाबतींत पंडितांच्या कडकपणामुळें नगर जिल्ह्यांत बंदोबस्त झाला व समाजाचाहि बोलबाला वाढला. पुढें जो मिशन फंड स्थापून मुंबईस सदाशिवराव केळकरांची प्रचारक म्हणून योजना झाली ती देखील कल्पना व तयारी मुख्यतः पंडितांचीच होती असें म्हणतात. पुणें येथील भवानी पेठेंत साताराचे महाराज शहाजी राजे ह्यांनीं जो ब्राह्मसमाज काढिला होता त्यांत एक ब्राह्मविवाह लावण्यांत आला. त्याचें पौरोहित्य पंडित महाशयांनींच केलें. ह्यावरून त्यांचें अनुष्ठानाकडे कसें लक्ष होतें हें दिसतें. नगर येथें पंडितांची अद्यापि जी जुनीं माणसें कळकळीनें आठवण

काढितात ती केवळ ते विद्वान् व कर्तृत्ववान् सरकारी अधिकारी म्हणूनच नव्हे तर ब्राह्मधर्माचें अनुष्ठान स्वतः करून इतर भाळ्याभोळ्यांकडून करविणारे व प्रचारकार्याची घटना करणारे म्हणूनच होय. तथापि ह्या समाजाची भरभराट सारखी झाली असें मात्र म्हणतां येत नाहीं. प्लेग, दुष्काळ, पुढाऱ्यांची बदली इत्यादि अनेक कारणांमुळें हा समाज ह्या शतकाचे आरंभीं बराच खालवला होता.

**मधली स्थितिः**—इ. स. १९०५ सालापासून पुढें मी ह्या समाजाला मधून मधून जाऊं लागलों. त्या वेळीं व पुढें संत, हिवरगांवकर, धनेश्वर, ऋषी वगैरे तरुण मंडळींनीं समाजाचें काम नेटानें चालविलें होतें. फ्रेंड्स लिबरल् ॲसोशिएशन नांवाची संस्था स्थापन होऊन तिच्या विद्यमानें समाजाबाहेरहि व्याख्यानें देण्याचा उपक्रम तेव्हां झाला. पण समाजाचा मुख्य भार ह्या वेळीं प. लो. वा. सहदेवराव बागडे ह्यांवरच पडला होता. त्यांच्या साह्यानें एक स्पृश्य कामकरी वर्गासाठीं व एक अस्पृश्यांसाठीं अशा दोन रात्रींच्या शाळाहि काढण्यांत आल्या. पण कांहीं वर्षांनीं त्या बंद पडल्या. रावबहादूर मारुतिराव भुजंगराव हे फार वृद्ध झाले होते. त्यांनीं आपल्या स्वकुळ साळी वर्गांतील होतकरू विद्यार्थ्यांना शिक्षण देण्यासाठीं ५००० रु. दिले होते. शिवाय ह्या वेळीं केवळ प्रार्थनासमाजाच्या कामासाठीं म्हणून त्यांनीं १००० रु. वेगळे दिले व पुढें त्यांत सहदेवराव ह्यांनीं आणखी स्वतःचे १००० रु. भरीस घातले. ह्या पूर्वी कायमनिधि सुमारें ३०० रु. होता. तो आतां निदान २५०० तरी असावा असा अजमास आहे. हा आंकडा निश्चित नव्हे.

**हल्लींची स्थिति** मात्र मुळींच समाधानकारक नाहीं, असें कष्टानें म्हणावें लागतें. गेल्या वर्षांत मी तेथें तीनदां गेलों. प्रथम लिबरल् ॲसोसिएशननें व्याख्यानास बोलावलें म्हणून गेलों, पण मुख्य उद्देश आठवडाभर राहून समाजाची स्थिति निरखावी, झाल्यास कांहीं करावें असा होता. गांवांतील सुशिक्षितांचें व श्रीमंतांचें समाजाकडे आतां मुळींच लक्ष नाहीं. सर्व भार खजीनदार रा. विठ्ठलराव बीडकर व सेक्रेटरी ब. रा. शिंदे ह्या दोघांवर पडला आहे. बहुतेक वृद्ध मंडळी दिवंगत झाली आहे. उरल्यापैकीं राव सा. काकडे, म्हातेकर, सायन्ना पेंटा हे अगदींच थकले आहेत. होतकरू तरुण कोणी दिसत नाहींत. पुणें समाजाचे अनंतराव भट हे नुकतेच तेथें गेले आहेत. बाह्य अनास्था व अंतस्थ मतभेद ह्यांमुळें समाज जेरीस आला आहे. गेल्या पांच वर्षांत उत्सव झाला नाहीं असें सेक्रेटरींनीं उपक्रम उपासनेंत सांगितलेलें ऐकून चटका लागला! ह्याच्या दोषाचा भाग मजकडे आलेला मी देवाजवळ कबूल केला!!

**भावी आशा**—वाहिलें तें वाहो जावो। राहिलें तें सांभाळा॥ असें तुकोबा म्हणतात. "अहमदनगरचा समाज" हा तो कांहीं नव्हे निराशेचा ठाव। भलें पोटीं वाव राखिलिया॥ असा मला पूर्ण स्वानुभव गेल्या उत्सवाच्या आठवड्यांत आला. इलेक्शनचा गोंधळ गाजून व राजकारणाचा गांवाला वीट येऊन, तोंड-पालटीची जरूर आतां आहे असें सायंकाळीं येणाऱ्या श्रोतृसमाजाच्या चेहऱ्यावर जणूं लिहिल्यासारखें दिसत होतें. सुशिक्षित हिंदु मंडळी देशाभिमानानें थकली होती. पण मागसलेला व अस्पृश्य मानलेला वर्ग व विशेषतः ख्रिस्ती बांधव वेळे-वर सर्व प्रसंगीं येऊन व मन देऊन ऐकत असत. आमच्या देवळांत एक व्याख्यान करूनच तृप्त न राहतां जुन्या पद्धतीचे कीर्तनासाठीं ख्रिस्ती मंडळींनीं तगादा लाविला. ह्यावरूनच वाऱ्याची दिशा कळली. वागडे मंडळींनीं, विशेषतः मुख्य गृहिणी श्री. पार्वतीबाईंनीं, माझ्या बहिणीच्या विनंतीस मान देऊन व आपल्या स्वतःच्या वाहनांतून दारोदार जाऊन बायकांच्या मेळ्यासाठीं व कीर्तनासाठीं मागसलेल्या वर्गाच्या बायकांना आमंत्रण दिलें, व त्या सर्व जणी आल्याहि. मला वेळ नव्हता तरी आग्रहानें तरुण मंडळींनीं प्रीतिभोजन करविलें व शेवटीं साधा-रण सभेच्या पुढें आबालवृद्ध स्त्रीपुरुषांना व समाजांतल्यांना व बाहेरच्यांना मीं ज्या कांहीं थोड्या नम्र सूचना केल्या त्या अमलांत आणण्याचा ते प्रयत्न करतील असेंहि दिसलें.

तरी वरील आशा म्हणजे खातरजमा नव्हे. तिचा अनुभव घ्यावयाचा असल्यास अहमदनगराबाहेरूनच मुख्य मदत आली पाहिजे. तिला प्रेरणा ईश्वर देवो, एवढीच प्रार्थना आहे.

विठ्ठल रामजी शिंदे.

# पुणें प्रार्थनासमाज.

## मूळकल्पना, तिचा उगम व विकास.

सन १८७० सालापूर्वी पुणें येथें "फ्रेंडली मीटिंग" या नांवाची एक सभा रविवार पेठेंत फडके यांच्या वाड्यांत भरत असे. त्या सभेंत शिक्षणविषयांवर व सामाजिक विषयांवर व्याख्यानें होत असत. इंग्रजी विद्येच्या व्यासंगानें या सभें-तील मंडळीस आपल्या कांहीं जुन्या चालीरीतींत बदल व्हावयास पाहिजे असें वाटावयास लागलें व तदनुरोधानें त्यांनीं प्रयत्नही चालू केले. इतक्यांत सन १८७० सालचे नोव्हेंबर महिन्यांत प. लो. वामन आबाजी मोडक यांचें

“ धर्माची आवश्यकता ” या विषयावर तेथील विश्रामबागेंत एक सुंदर व्याख्यान झालें. त्यानें लोकांत धर्माबद्दल बरीच जागृति उत्पन्न केली, व तिचा दृश्य परिणाम झाला. तो असा कीं, त्याच सालीं नोव्हेंबर महिन्यांत रा. रा. केशवराव गोडबोले ह्यांच्या येथें विश्वनाथशास्त्री केळकर, रामचंद्र दिनकर परांजपे, गणपतराव कोटक, विश्वनाथ सदाशिव देवधर, राजाराम बाळकृष्ण सेवक, बाबाजी रघुनाथ वईवुडे, गोपाळरावजी मुळे, गणपतगिर रतनगिर, इ० मंडळी जमली व दिसेंबर महिन्याचे पहिल्या रविवारीं म्हणजे ता० ४ दिसेंबर १८७० मिति मार्गशीर्ष शुद्ध १२ शके १७९२ रोजीं पुणें प्रार्थनासमाज संस्थापित झाला. त्यांत “ फ्रेंडली मीटिंग ” मधीलच बहुतेक मंडळी होती. तेव्हांपासून प्रत्येक रविवारीं ईश्वरोपासना नियमानें होऊं लागली. त्या वेळीं समाजाचें असें स्वतंत्र मंदिर नसल्यामुळें मंडळी पाळीपाळीनें प्रत्येक समाजसभासदाचे घरींच जमून उपासना चालवीत असत.

पहिला वार्षिक उत्सव प. लो. राजाराम बाळकृष्ण सेवक यांचे घरीं झाला. पुढें मंडळी भुतकरांचे वाड्यांत जमत असे. दुसरा वार्षिक उत्सव त्याच वाड्यांत सन १८७२ मध्यें झाला. सन १८७३ व ७४ सालीं शिंपी आळींत व १८७५ व ७६ या दोन सालीं भिडे यांच्या वाड्यांत साप्ताहिक उपासना होत असत व उत्सवही तेथेंच करीत असत.

समाजाकरितां स्वतंत्र जागेची आवश्यकता आतां मंडळीस विशेष वाटूं लागली. यामुळें सन १८७७ सालीं हल्लींची जागा मंडळींनीं ८१७ रुपयांस ता. २३ नोव्हेंबर रोजीं खरेदी घेतली. ही जागा समाजासाठीं मिळविण्याचें सर्व श्रेय प. लो. रा. ब. रानडे यांसच आहे. जागा मिळतांच हल्लींचें श्रीहरिमंदिर उभारण्याचेपूर्वी ज्या ठिकाणीं उपासना, उत्सव, वगैरे होत, तें जुनें मंदिर बांधण्यास सुरुवात झाली. सन १८७७ सालचा उत्सव मंदिर तयार नसल्यामुळें याच खुल्या जागेंत तंबू वगैरे देऊन मंडळीनें साजरा केला. जुनें मंदिर पुढें लौकरच म्हणजे सन १८७८ चे मे महिन्यांत तयार झालें. मंदिरास रु. १३३०८२८६ खर्च लागला. पुढें मंदिराचें आणखी किरकोळ काम वाढलें. त्यामुळें पूर्वी जमा झालेली रक्कम रु. २२७९८८ सर्व खर्च होऊन समाजास रु. ६२४ कर्ज राहिलें. तें कर्ज त्या वेळचे समाजाचे चिटणीस प. लो. रा. सा. चिंतामण सखाराम चिटणीस यांनीं फेडिलें. हें मंदिर तयार झाल्यानंतर साप्ताहिक उपासना, वार्षिक उत्सव वगैरे समाजकार्यें त्यांत नियमानें होऊं लागलीं. मंदिराचें काम पुरें झालें त्या दिवसाचें स्मरण रहावें

यासाठीं मित्रमेळा म्हणून सहामाही उत्सव करण्याचा क्रम सन १८९५।९६ पर्यंत चालू होता.

सन १८७८ सालीं ज्या वेळीं हें जुनें मंदिर बांधिलें त्याच वेळीं मंडळींचे मनांत ज्यांत एक हजार मनुष्य बसतील असें एक प्रशस्त मंदिर जुन्या मंदिराच्या पुढील खुल्या जागेंत–जेथें हल्लीं श्रीहरिमंदिर उभारलें आहे–बांधावें असें येऊन त्याचा नकाशा व खर्चाचा अंदाजतक्ताही तयार केला होता. परंतु त्या वेळीं तो बेत तसाच राहिला. परंतु अलीकडे पुन्हां देवाच्या कृपेनें मंडळीच्या मनांत स्फूर्ति झाली व समाजास स्थायिकरणा यावा यासाठीं समाजाकरितां एक कायमचें पक्कें दगडी मंदिर असावें असें मंडळीनें ठरविलें व त्यासाठीं पैसे गोळा करण्याचे खटपटीस सुरवात झाली.

तारीख २८ माहे मे सन १९०७ रोजीं हल्लींच्या श्रीहरिमंदिराचा पाया घातला. मंडळीच्या खटपटीस श्रीहरिकृपेंकरून सर्वतोपरि यश आलें व शके १८३१ चे आरंभीं श्रीहरिमंदिराचें काम पुरें झालें; व त्यांत मंडळीनें चैत्र वद्य ६ शके १८३१ रविवार तारीख ११ माहे एप्रिल सन १९०९ रोजीं मोठ्या समारंभानें प्रवेश केला व त्याच वेळीं समाजाचे अध्यक्ष परमपूज्य गुरुवर्य डॉक्टर सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्याकरवीं समाजमंदिराचा हरिचरणीं समर्पणविधिही मंडळीनें केला. त्या सर्व समारंभाची हकीकत पुढें दिली आहे.

समारंभाच्या कार्यक्रमपत्रिका छापून शहरांत चोहोंकडे वांटल्या होत्या. समाजमंदिरास द्रव्यद्वारें साहाय्य ज्यांनीं केलें होतें त्यांस, इतर प्रकारें ज्यांनीं सदर कार्यास हातभार लाविला होता त्यांस, इतर ठिकाणच्या व खुद्द पुण्यांतील समाजाचे हितचिंतकांस व इतर ठिकाणच्या समाजबंधूभगिनींस मुद्दाम त्या प्रसंगाकरितां निमंत्रिलें होतें. समाजाच्या निमंत्रणास मान देऊन खुद्द पुण्यांतील व बाहेर गांवची पुष्कळ मंडळी समारंभ साजरा करण्यास आली होती. समारंभाचे दिवशीं म्हणजे चैत्र कृष्ण ६ शके १८३१ ता. ११ एप्रिल सन १९०९ रोजीं सकाळीं सहा वाजतां मंदिराचे दरवाजापाशीं सुस्वर मंगलवाद्यें वाजूं लागलीं. नवीन मंदिराचे उत्तरेस व पुढें मंडप घातले असून कमानी, पताका, लतापुष्पें इत्यादींनीं बाह्य प्रदेश उत्तम रीतीनें सुशोभित केला होता. नवीन मंदिरास मंडळीच्या विचारें श्रीहरिमंदिर असें नांव दिलें होतें; व तीं अक्षरें मंदिराच्या मधल्या कमानीवर रंगविलीं होतीं.

सर्व निमंत्रित लोक व समाजबंधू प्रथमतः जुन्या मंदिरांत एकत्र जमले; व बरोबर आठ वाजतां तेथून निघून समारंभानें श्रीहरिमंदिराच्या पश्चिमेकडील दरवाजासमोरील ओटीवर येऊन दाखल झाले. बंद असलेल्या मधल्या दरवाजाजवळ अग्रभागीं समाजाचे अध्यक्ष परमपूज्य गुरुवर्य डॉक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर हे उभे होते. अशा रीतीनें मंडळी उभी असतां त्या मंगल व गंभीर प्रसंगाकरितां मुद्दाम रचलेलीं व निवडलेलीं पद्यें म्हणण्यास गुरुवर्यांनीं सुरुवात केली. सुमारें अर्धा तास याप्रमाणें सर्व मंडळीसमवेत भजन झाल्यावर गुरुवर्यांनीं आपल्या हातानें नवीन मंदिराचा दरवाजा उघडला व सर्व मंडळीसह आंत प्रवेश केला. मंदिराचा अंतर्भाग पताका, पुष्पें, लतापल्लवादिकांनीं फारच मनोहर प्रकारें सुशोभित केला होता. आंत प्रवेश केल्याबरोबर मन एकप्रकारच्या आनंदानें भरून जाऊन पूज्यभाव जागृत झाला व वृत्ति उल्हसित झाल्या. सर्व मंदिरांत रा. रा. नारायण माधव रानडे यांनीं आपले वडील प. लो. न्या. मू. माधव गोविंद रानडे यांचे स्मरणार्थ दिलेल्या सतरंज्या आंथरल्या होत्या. समोरच्या भिंतीस समाजाचे सभासद रा. रा. गणेश रावजी गांधी यांनीं आपला पुत्र प. लो. माधव याचे स्मरणार्थ दिलेलें घड्याळ लाविलें होतें. रेव्हरंड जॉन स्माल हॉलचे व्यवस्थापकांनीं आमच्या विनंतीस मान देऊन तेथील खुर्च्या वगैरे सामान मुद्दाम या समारंभाकरितां दिलें होतें; तेंही व्यवस्थेनें मांडिलें होतें. मंदिराचे पूर्व अंगास मध्यभागीं दगडाची वेदी उभारली असून तिला रंग देऊन तिजवर वेलबुट्टी काढिली होती. वेदीचे पुढील बाजूस तांबड्या रंगांत " आधारः सर्वभूतानां प्रसीदतु स नो हरिः" हा श्लोकपाद कोरिला होता. वेदीवर संगमरवरी दगडाचा पांढरा तक्ता बसविला होता.

आंत प्रवेश होऊन मंडळी आपल्या जागीं बसल्यावर भजनें व पद्यें गावयास सुरवात झाली. याप्रमाणें कांहीं वेळ सुस्वर भजन झाल्यानंतर गुरुवर्य डॉक्टर भांडारकर वेदीचे मध्यभागीं असलेल्या व्यासपीठावर विराजमान झाले; व त्यांनीं गंभीर अशी ईशप्रार्थना करून श्रीहरिमंदिर प्रभुचरणीं समर्पण केलें. नंतर त्यांचे आज्ञेवरून मंदिराचे उपयोग व उद्देश यांसंबंधीं प्रतिज्ञा चिटणीस रा. रा. वीरकर यांनीं वाचून दाखविली. नंतर उत्सवानिमित्त ईश्वरोपासना झाली.

दुपारीं मंदिराचे उत्तरेस उभारलेल्या मंडपांत परगांवच्या व येथील निमंत्रित पाहुण्यांसह प्रसादार्थ भोजन झालें. नंतर सायंकाळीं आरंभीं दिलेला संक्षिप्त इतिहास चिटणिसांनीं वाचला व प्रवेश समारंभ व समर्पणविधि आटोपला. पुढें

याच प्रसंगास जोडून आठ दिवसपर्यंत मंडळीनें समाजाचा ३८ वा वार्षिक उत्सव नेहमींप्रमाणें मोठ्या आनंदानें साजरा केला.

श्रीहरिमंदिराची इमारत ५७ फूट लांब व २८ फूट रुंद असून वरील गॅलरी-सुद्धां सुमारें आठशेंपेक्षां जास्त मनुष्यांचा समावेश होईल इतकी मोठी आहे. मंदिराचे एंजिनीअर समाजसभासद रा. सा. गणेश सखाराम खरे हे होते. त्यांनीं स्वतः ४०० रु. वर्गणी देऊनही आपला बहुमोल वेळ खर्चून फार श्रम घेतले याबद्दल समाज त्यांचा आभारी आहे. सन १९०८ चे एप्रिल महिन्यांत रा. सा. खरे यांची पुण्याहून नगर जिल्ह्यांत बदली झाली. त्यानंतर रा. सा. कुमठेकर यांजकडून मंदिराचे कामीं बरेंच साहाय्य झालें, त्याबद्दल त्यांचेही आभार मानणें जरूर आहे. तसेंच रा. सा. खरे येथून गेल्यानंतर समाजाचे त्या वेळचे दुसरे चिटणीस रा. रा. माधवराव लोटलीवर—ज्यांना निर्दय काळानें आम्हा सर्वांतून अकालीं ओढून नेलें—यांनीं येथील म्युनिसिपालिटीच्या असिस्टंट सेक्रेटरीचें फार जबाबदारीचें व अत्यंत जिकिरीचें आपलें काम संभाळून मंदिराचें राहिलेलें काम पुरें करण्याकरितां जे अश्रांत श्रम घेतले त्याबद्दल समाजाची मंडळी त्यांची फार आभारी आहे. शेवटीं हें सांगणें भाग आहे कीं, श्रीहरीचें हें मंदिर जसें श्रीहरीच्या कृपेचें तसेंच समाजाचे अध्यक्ष परमपूज्य गुरुवर्य डॉक्टर भाण्डारकर व उपाध्यक्ष रा. ब. का बा. मराठे या उभयतांच्या उदार धर्मविषयींच्या दृढ श्रद्धेचें, कळकळीचें व श्रमाचें सर्वस्वी फळ आहे. श्रीहरिमंदिरास ज्यांनीं द्रव्य साहाय्य केलें त्या राजेरजवाडे, संस्थानिक, शेटसावकार व इतर संपन्न व गरीब गृहस्थ व स्त्रिया, येथील व परगांवचे समाजबंधू व समाजभगिनी वगैरेंचे जाहीर रीतीनें आभार मानावे तितके थोडेच आहेत.

श्रीहरिमंदिर तयार झाल्यापासून समाजाचीं सर्व कार्यें तेथेंच होत आहेत. जुनें मंदिर दुरुस्त करून त्याचा एक टुमदार आश्रम करावा असा मनोरथ मंडळीचे मनांत वागत होता. उत्सवाचे वेळीं व इतर प्रसंगीं परगांवाहून येणाऱ्या पाहुणे मंडळीची उतरण्याची वगैरे फार गैरसोय होत असे, ती असा आश्रम झाल्यास दूर होईल. समाजाचें ग्रंथसंग्रहालय व वाचनालय ह्यांकरितांही अशा जागेचा विशेष उपयोग होणारा आहे. तसेंच समाजाचीं मासिक संमेलनें वगैरे होतात अशा प्रसंगीं अशा आश्रमाची जरूरी वारंवार भासते. ह्या सर्व अडचणी लक्षांत घेऊन गुरुवर्य डा. भांडारकरांचें स्मारक करण्याच्या हेतूनें जुन्या मंदिराच्या जागेचा एक आश्रम बांधण्याचें मंडळीनें ठरविलें व त्याप्रमाणें भांडारकरआश्रम करण्यासाठीं

वर्गणी जमविण्याच्या कामास प्रारंभ होऊन १९२० सालीं पायाचा दगड बसविला व १९२१ सालीं सर नारायण चंदावरकर ह्यांच्या हस्तें आश्रमाचा प्रवेशसमारंभ झाला.

पुणें समाजानें गेल्या सत्तावन वर्षें नियमानें ईश्वरोपासना चालू ठेविल्या. ह्या समाजास गुरुवर्य डा. भांडारकरांच्या सहवासाचा ४२-४३ वर्षें सतत लाभ झाला. रा. रा. वामनराव मोडक, चिंतामणराव भट, गणपतराव कोटकर, काशिनाथपंत मराठे, वगैरे मंडळींचा लाभ ह्या समाजाला बहुत काळ झाला. त्याचप्रमाणें केशवराव गोडबोले, विश्वनाथपंत संत, माधवराव लोटलीकर, व नारायणराव वीरकर ह्यांच्यासारखे उद्योगी व आस्थेवाईक सेक्रेटरी लाभले त्यामुळेंच समाजाचें काम सुरळीतपणें चाललें. वीरकरांना प्रो. जोग ह्यांचें सर्व सहाय्य असे. गेल्या वर्षी रा. वीरकर परलोकवासी झाले त्यामुळें समाजासंबंधाची सर्व जबाबदारी हल्लीं प्रो. जोग यांजवर येऊन पडली आहे. रा. वीरकर ह्यांनीं पुष्कळ वर्षें मनोभावें समाजाची सेवा केली. शहरांतील लोकांचें साहाय्य असो वा नसो, लोकांची समाजासंबंधानें कितीही अनुदार टीका होवो, रा. वीरकर मोठ्या आनंदानें समाजाची सेवा करीत राहिले. विशेषतः ते ज्या मंडळीमध्यें वावरत असत त्यांतील बहुतेकांचें उदार अगर कोणत्याही धर्मविषयक चळवळीकडे लक्ष नसे, तरीसुद्धां त्यांच्या सहवासाचा अगर विचारांचा आपल्यावर कांहींही परिणाम न होऊं देतां ते समाजाच्या सेवेंत राहिले.

पुण्याच्या प्रार्थनासमाजाच्या विद्यमानें झालेल्या एका मोठ्या कामगिरीचा येथें उल्लेख करणें हें आमचें कर्तव्य आहे. गुरुवर्य डा. भांडारकर, प्रो. वासुदेवराव पटवर्धन, गणपतराव खरे, काशीनाथपंत मराठे आदिकरून मंडळीला तुकोबांच्या अभंगांचा पद्धतशीर अर्थ लावणें अगत्याचें आहे असें वाटूं लागलें व पुण्यास तुकाराम सोसायटी ह्या नांवाची संस्था स्थापन झाली. ही संस्था साधारणपणें बिन खर्चाची होती. परंतु संस्थेच्या विद्यमानें जें कार्य झालें आहे त्याचें महत्त्व फार आहे. गुरुवर्य डा. भांडारकरांच्या साहाय्यानें दर आठवड्याच्या सभेंत माडगांवकरांच्या तुकारामाच्या अभंगांच्या गाथेंतील अभंगांचा अर्थ मंडळी लावूं लागली. सर्व प्रसिद्ध आवृत्तींतील पाठ ताडून पहाणें, सारख्या अर्थाचे अभंग अगर शब्द आले असतां त्यांचें टांचण ठेवणें, साखरे बुवा ह्यांनीं लाविलेले अर्थ बरोबर आहेत किंवा नाहींत तें पहाणें, त्याचप्रमाणें रा. दीना-

नाथराव माडगांवकर ह्यांनीं सुचविलेल्या अर्थाचा वादामध्यें समावेश करणें, व जो वाद होईल व त्यांत निरनिराळ्या चरणांचे जे अर्थ सुचविले जातील त्या सर्वांचें व्यवस्थित रीतीनें टांचण करून घेऊन नंतर एका ठरलेल्या पद्धतीनुसार अर्थ लिहून काढण्याचें काम प्रो. पटवर्धन ह्यांनीं मंडळीचे चिटणीस ह्या नात्यानें उत्तम रीतीनें केलें. हें काम कसें झालें आहे याची कल्पना सुबोधपत्रिकेच्या वाचकांस चांगल्या रीतीनें झालेली आहे. सुबोधपत्रिकेच्या संपादकांनीं पत्रिके-मध्यें प्रसिद्ध करण्यासाठीं सोसायटीनें तयार केलेल्या अर्थांची प्रत मागविली व ही तुकारामाच्या अभंगांची चर्चा पंधरा वर्षें त्या पत्रांत प्रसिद्ध झाली. मध्यंतरीं कांहीं काळ चर्चा येण्याचें बंद होतें. ह्या बाबतींत संपादकांस रा. रा. शिवराम नारायण गोखले ह्यांचें साहाय्य झालें. त्यांनीं लेखनासंबंधानें जर सहाय केलें नसतें, तर ही चर्चा सुबोधपत्रिकेंत प्रसिद्ध झाली नसती. असो. पुढें गुरु-वर्य डा. भांडारकरांची वाढती दुर्बलता व वार्धक्य ह्यांमुळें त्यांच्या सहवासाचा, अनुभवाचा व ज्ञानाचा लाभ होणें अशक्य झालें; प्रो. पटवर्धन ह्यांजवर काळानें झडप घातली; रा. ब. मराठे, गणपतराव खरे आदिकरून मंडळी परलोकवासी झाली, त्यामुळें तुकाराम मंडळीही बंद झाली, मात्र आतां लवकरच प्रथम निदान चारशें अभंगांची चर्चा प्रो. केळकर प्रसिद्ध करणार आहेत.

पुणें प्रार्थनासमाजाच्या द्वारें धर्मप्रचार कार्यास जें साहाय्य झालें आहे त्याचा येथें उल्लेख केल्यावांचून ही हकीकत पूर्ण होणार नाहीं. रा. रा. शिवराम नारायण गोखले ह्यांनीं समाजकार्यासाठीं १८९८ सालीं आपल्याला सर्वस्वी वाहून घेतलें. तेव्हांपासून आतांपर्यंत ते आपल्या सामर्थ्यानुसार देवाची सेवा करीत आहेत. त्याच्या पूर्वीही ते धर्मप्रचाराचें कार्य करीत होते व मुंबईच्या समाजाकडून अल्प-स्वल्प साहाय्य होत होतें. गेलीं ४० वर्षें ते समाजाची सेवा करीत आहेत. पुणें येथें मंदिरांतील उपासना वारंवार चालविणें, परिचयांतील लोकांच्या भेटी घेणें, निरनिराळ्या कुटुंबांमध्यें जाऊन त्यांची विचारपूस करणें, त्यांच्या येथें ठरलेल्या दिवशीं व वेळीं भजन करणें अगर उपासना चालविणें, नगर, मुंबई, सातारा येथें जरूर असेल त्यावेळीं जाऊन धर्मप्रचाराचें कार्य करणें, गुरुवर्य डा. भांडारकर ह्यात होते तोंपर्यंत त्यांच्या येथें जाऊन त्यांच्या सहवासाचा लाभ घेणें हीं कामें त्यांनीं केलीं व आज वाढती शारीरिक दुर्बळता जरी आहे तरी होतील तितकीं कामें ते करीत असतात.

धर्मप्रचारकार्यासंबंधानें दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं, रा. रा. मोती बुलासा, विठ्ठल रामजी शिंदे, डा. वासुदेवराव सुखटणकर हे जे तरुण धर्मप्रचारकार्यास सिद्ध झाले ते पुणें समाजाचे सभासद असतांना. त्याचप्रमाणें धर्मप्रचारकार्याच्या कामीं गुरुवर्य डा. भांडारकर, न्या. मू. रानडे, रा. रा. वामनराव मोडक, काशीनाथपंत मराठे, गणपतराव आंजरलेकर, गणपतराव कोटकर व सीतारामपंत जव्हेरे ह्यांचें पुष्कळ साहाय्य झालें आहे. डा. भांडारकर ह्यांनीं नगर व सातारा येथें उत्सवासाठीं मुद्दाम प्रवास केले. त्याचप्रमाणें मुंबईसही पुष्कळ प्रसंगीं केवळ उत्सवासाठीं येऊन त्यांनीं आपल्या ज्ञानाचा लाभ दिला. अशा प्रकारें आजपर्यंत पुण्याच्या प्रार्थनासमाजानें जें कार्य केलें त्याची रूपरेषा वर दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

याशिवाय मुंबई शहरांत व महाराष्ट्रांतील आणखी कांहीं ठिकाणीं समाज अगर उपासना मंडळया निघाल्या. उदाहरणार्थ १८७८ सालीं व नंतर एक वर्ष भुलेश्वराच्या बाजूला साप्ताहिक उपासना गुजराथींत होत असत व त्या मंडळींनीं आपला निराळा उत्सवही साजरा केल्याचा उल्लेख आढळतो. गिरगांवांत डा. मालवणकर ह्यांच्या घरीं कित्येक वर्षें आठवड्यास रात्रीं उपासना होत असत. त्याचप्रमाणें फ्रेंच ब्रिज जवळ वाटोळया चाळींतही साप्ताहिक उपासना पुष्कळ वर्षांमागें होत असत. भायखळा येथें एक भजन समाज होता. त्यांतील बहुतेक सभासद अस्पृश्य मानलेल्या जातींतील होते. ह्या समाजाच्या विद्यमानें एक स्त्रियांची सभाही चालत होती. त्याचप्रमाणें खडकी, मनमाड, कोल्हापूर, मालवण, सासवड, थूगांव इ. ठिकाणीं प्रार्थनासमाजाशीं कोणत्या ना कोणत्या कारणानें संबंध आलेल्या मंडळींनीं कांहीं काळ उपासना चालविल्या होत्या. रा. रा. गणेश आकाजी गवई हे येथें असतांना परळ येथें निराश्रित सहायकारक मंडळीच्या बोर्डींगमध्यें होते. पुढें १९०९ सालीं त्यांनीं जाहीरपणें ब्राम्हधर्माची दीक्षा घेतली. साधनाश्रमामध्यें राहून धर्मविषयक शिक्षण प्राप्त करून घेण्यासाठीं ते कलकत्त्यास गेले पण तेथील हवा न मानवल्यामुळें ते परत आले व थूगांव येथें ब्राम्ह समाज चालवीत होते व आपल्या लोकांच्या उन्नतीसाठीं निरनिराळ्या प्रकारें कार्य करीत होते. हल्लीं हे नागपुरास आहेत. हे नव्या कौन्सिलचे मध्यप्रांतांतील अस्पृश्य मानलेल्या वर्गांतील सरकारनें निवडलेले पहिले सभासद होत. हल्लीं ते नागपूर येथें एक बोर्डींग चालवीत असून ते आपल्याला ब्राह्म म्हणवितात व ब्राह्मधर्मास अविरुद्ध तत्त्वावर बोर्डींग चालवीत असतात असें कळतें.

# अहमदाबाद प्रार्थनासमाज.

रा. ब. लालशंकर उमियाशंकर यांचें ह्या पुस्तकांतील अल्पचरित्र जे कोणी वाचतील त्यांच्या हें सहज लक्ष्यांत येईल कीं, लालशंकर भाईच्या ठिकाणीं रावसाहेब महिपतराम रूपराम व सर रमणभाईंचे तीर्थरूप, ह्यांचे संबंधानें अत्यंत आदरभाव बसत असे. ते वारंवार सांगत कीं, महिपतराम भाईच्या प्रत्यक्ष चिरंजिवाला आपल्या पित्यासंबंधानें जो आदर असेल त्याही पेक्षां माझा आदरभाव अधिक आहे. अहमदाबाद समाजाचें जनकत्व भोलानाथ साराभाई व महिपतराम रूपराम ह्यांजकडे येतें. महिपतराम पुढें अहमदाबाद समाजाचे पहिले सेक्रेटरी झाले त्यावरून त्यांची खटपट अहमदाबादसारख्या मागसलेल्या प्रांतांत ५७ वर्षांपूर्वी किती असली पाहिजे याची आपल्याला कल्पना करितां येते. शिवाय लालशंकर भाईच्या चरित्रांत महिपतराम भाईसंबंधानें जागोजाग जो उल्लेख आला आहे त्यावरूनही त्यांच्या उदार विचारांविषयीं कल्पना होते. मुंबईस स्थापन झालेल्या प्रार्थनासमाजाची आमच्या गुर्जर भाईंना माहिती मिळाली होती. तेथील व ब्राम्हसमाजांतील उपासनांविषयीं गुजराथच्या ह्या दोन पुढाऱ्यांनीं माहिती जमविली होती. १८७१ सालीं असें झालें कीं, महाराणी व्हिक्टोरिया यांचे ज्येष्ठ चिरंजीव, बादशहा एडवर्डसाहेब, जे त्यावेळीं प्रिन्स ऑफ वेल्स होते, ते डिसेंबर महिन्यांत फार आजारी होते. त्यांस त्वरित आराम वाटावा म्हणून सर्व लोकांनीं सार्वजनिक प्रार्थना करण्याचें ठरविलें. अर्थातच ह्या प्रसंगीं सर्व धर्मांचे, सर्व जातींचे लोक येणार म्हणून सर्वांस म्हणतां येतील अशीं पद्यें व प्रार्थना रा. ब. भोलानाथ ह्यांनीं रचिल्या व पद्यें व्यवस्थित रीतीनें तालसुरावर गवयाच्या साहाय्यानें म्हटलीं गेलीं व प्रार्थना गंभीरपणें झाल्या, त्यांचा तेथें जमलेल्या मंडळीवर इतका शुभ परिणाम झाला कीं, ता. १७ डिसेंबर १८७१ हाच स्थापनेचा दिवस धरून अहमदाबाद येथें साप्ताहिक उपासना सुरू झाल्या. रा. सा. महिपतराम त्यावेळीं ट्रेनिंग कॉलेजचे मुख्य होते. त्यांनीं ट्रेनिंग कॉलेजमध्यें उपासना चालविण्यास परवानगी मिळविली. ज्याप्रमाणें गुजराथी क्रमिक पुस्तकांत देवधर्मासंबंधानें धडे आले म्हणजे कोणत्याही धर्माची निंदा केली जात नाहीं व सर्वांस जो सर्वसाधारण धर्म व भाव त्यासंबंधानेंच विवेचन असतें, त्याचप्रमाणें येथें धर्मांचा ऊहापोह होईल व नीति व धर्म ह्यांविषयीं सर्वांस आदरणीय असे विचार येथें प्रदर्शित केले जातील असें सरकारी अधिकाऱ्यांस कळविण्यांत आलें व ट्रेनिंगच्या विद्यार्थ्यांस धर्माचें ज्ञान सहज होण्याचें एक चांगलें साधन

प्राप्त झालें आहे असें पाहून त्यावेळच्या अधिकाऱ्यांनीं उपासना ट्रेनिंग कॉलेज मध्यें करण्यास आनंदानें परवानगी दिली व ट्रेनिंग कॉलेजचे विद्यार्थीही उपासनांस नियमानें हजर राहूं लागले. परंतु मंडळीला प्रथमपासूनच स्वतःच्या मंदिराची अवश्यकता भासूं लागली. म्हणून एक व्यवस्थापक मंडळीची नेमणूक झाली. पहिल्या व्यवस्थापक कमिटीचे अध्यक्ष रा. ब. भोलानाथ साराभाई व उपाध्यक्ष रा. ब. गोपाळराव हरि देशमुख होते. ह्यावरून प्रसिद्ध लोकहितवादींचा प्रारंभापासून ह्या प्रार्थनासमाजाशीं संबंध होता असें होतें. पुढेंही पुष्कळ वर्षें त्यांचा निरनिराळ्या प्रार्थना समाजांशीं संबंध होता. पेनशन घेतल्यानंतर मुंबईस आल्यावर ते आर्यसमाजाचे अध्यक्ष झाले. कमिटीचे पहिले सभासद रा. सा. महिपतराम रूपराम (सेक्रेटरी), मोहनलाल कल्याणजी मेहता (असि. सेक्रेटरी), बाबाराव भोलानाथ (खजिनदार), जित्संगराव हरसिंहराव, रणछोडलाल छोटालाल, व लालशंकर उमियाशंकर हे होते. नंतर आपापसांत प्रथम मंदिरासाठीं वर्गणी जमा करण्यांत आली, ती अर्थात् अपुरी होती, म्हणून तसेच प्रयत्न चालण्याचें ठरलें. अखेरीस रा. ब. बेचरदास अंबादास ह्यांनीं ता. ९ डिसेंबर १८७३ रोजीं अहमदाबाद समाजासाठीं, प्रार्थनामंदिर बांधण्यासाठीं चार हजार रुपयांची देणगी देण्याचा निश्चय केला, त्याच दिवशीं ती खर्चीं घातली व समाजास तसें कळविलें. समाजानें ह्या उदार देणगीचा स्वीकार केला. पुढें आणखी एक हजार पांचशें एकेचाळीस रुपये रा. ब. नीं दिले. व समाजानें ७३४३ रुपये जमवून हल्लींचें सुंदर मंदिर उभारलें. सामानसुमानासाठीं लागलेले १०५३ रुपयेही समाजानेंच जमविले. प्रवेशसमारंभ ता. ३ मे १८७६ रोजीं झाला. मंदिराभोंवतीं मोठें कंपाऊंड असून मिशनरींना रहाण्यासाठीं स्वतंत्र जागा आहे. जुन्या काळीं ज्या वेळीं लालशंकरभाईंनीं अहमदाबाद सोडलें नव्हतें, त्यावेळीं त्यांनीं दिवाळीसारखा गुर्जरबंधूंचा अतिमहत्वाचा सण समाजास साजेल अशा रीतीनें साजरा करण्यास प्रारंभ केला. रा. ब. भोलानाथ, रा. सा. महिपतराम व लालशंकर भाई ह्यांनीं एकेक दिवस सर्व सभासदांना सहकुटुंब आपापल्या घरीं आमंत्रण करून भजन, प्रार्थना ह्यांचा क्रम सुरू केला व अशा प्रकारें सामाजिक सम्मेलनें करून मंडळीमध्यें अधिक निकटभाव जागृत करण्याचा मार्ग सुरू झाला. दुसरें, स्वतः भोलानाथभाई हे उत्तम भागवत व त्याचप्रमाणें नांवाजलेले कवि असल्यामुळें त्यांनीं भक्तिरसपूर्ण काव्यें,—पद्यें, आरत्या—रचण्यास सुरवात केली. हें त्यांचें काव्य सर्व गुजराथभर फार लोकप्रिय झालें. हीं भक्तिरसानें परिपूर्ण पद्यें घरोघर गाण्यांत येऊं लागलीं;

व ह्या गायनांचा आस्वाद घेण्यासाठीं पुष्कळ मंडळी साप्ताहिक उपासनांस येऊं लागली. ह्याच वेळीं महर्षि देवेंद्रनाथ ह्यांचे चिरंजीव बाबू सत्येंद्रनाथ अहमदाबाद येथें जज्ज होऊन आल्यामुळें त्यांच्या ज्ञानाचा व सहवासाचा अहमदाबादच्या बंधूंस फार फायदा झाला. सत्येंद्रनाथांस गुजराथी भाषा चांगली अवगत होती, व ते गुजराथींतच उत्तम प्रकारें ईश्वरोपासना चालवून सुंदर उपदेश करूं लागले. प्रस्तुत लेखकास त्यांचे कांहीं उपदेश वाचावयास मिळाले, त्यावरून असें वाटूं लागलें आहे कीं, ते उपदेश स्वतंत्रपणें छापून प्रसिद्ध करण्यासारखे आहेत. ह्याठिकाणीं दोनच लहान उतारे घेतों.

( १ ) मूर्तिपूजानी जरूर शी छे? ईश्वरनी ज्ञानशक्तीनो प्रकाश शुं आ जगतमा नथी? सूर्य रोज पूर्व दिशाथी उठीने तेनो महिमा गातां गातां नियमित काले पश्चिम दिशामा अस्त थायछे; चंद्रमा पोताना रश्मिथी जगतने रंजन करेछे, त्यारे तेनुं सौंदर्य प्रकाश पामेछे. दूर जोवानी जरूर नथी. आपणा शरीरनो रचना उपरथी विचार करिये तो तेमां केवुं आश्चर्य, कौशल्य जोवामां आवेछे? सुंदर कठिण एक भागनो बीजा भाग साथे केवो आश्चर्यकारक संबंध! आपणा नेत्रनो रचना जोइये तो तेमां केवुं विचित्र कौशल्य मालूम पडेछे! तेना उपर अजवाळुं पडेछे, तेनी साथे जगतना छबी ते उपर प्रगट थायछे अने आपणुं रूप देखाडेछे; चक्षु जे कोमल पदार्थ तेने कोई रीते हरकत न पोंचे ते ते वास्ते ढांकवाने पांपण तथा केश पंक्ति तेना उपर राखेलो छे, ज्यारे आपण निद्रा करिये त्यारे ते ढांकणां तेना उपर आवीने रक्षण करेछे. ते निद्रानी असहाय अवस्थामां ते ईश्वरज आपणुं रक्षण करेछे अने पछी आपणे जाग्रत थईने ज्यारे तेना प्रसादनुं स्मरण करिये छिये, जेनी कृपाथी आपण शरीरने बळ आप्यूं, तेना सामा हाथ जोडीने कृतज्ञतापूर्वक नमस्कार करिये त्यारेज तेनी खरी उपासना थायछे. एवी रीते जगतनी प्रत्येक घटनामां ईश्वरना ज्ञानशक्ति अने मंगलभाव प्रत्यक्ष जोवामां आवेछे. एवा ईश्वरना स्मरणने वास्ते मूर्तिनी शी जरूर छे? ज्यां ज्यां नजर करिये त्यां तेना हस्ताक्षर जोवामां आवेछे.

( २ ) जे लोको खरेखरा मूर्तिपूजक छे, मूर्तिउपर खरो विश्वास राखेछे, ते लोकउपर दोष मूकवानो मारो हेतु नथो; पण मूर्तिपूजाविशे जेनो खातरी नथी, उलटुं तेने भूल भरेली क्रिया गणे छे, ते लोको ज्यारे तेज मार्गमा चाले छे त्यारे तेज लोको खरेखरा दोषने पात्र थायछे. एवा लोकने बे दोष स्पर्श करेछे; एक तो जाणी जोईने ईश्वरनी अवमानता करवी, बीजुं, आपणो विश्वास एक अने चालवुं जुदुं

तो ते कपटता तथा प्रतारणा कहेवाय. हवे कोई लोकोना मनमां व्यथा थाय एम बोलवानो मारो उद्देश नथी; पण साचुं तो बोलवूं जोइये; अने सत्य प्रचार धर्म छे. आ गुजरातमां मूर्ति पूजानो चाल प्रसिद्ध छे. घणी वखत अवतारो अही आवीने उतर्या छे. ते प्रांतना एक भागमां आ प्रार्थनासमाजनो धर्म अंकुरित थयो छे. ज्यां बधा लोको एवा मार्गमां चाले छे ते मध्ये एक ईश्वरनी उपासना हाल प्रगट थइ छे; हवे आ बीज एकदम शुष्क थइ जाय अथवा ईश्वर प्रसादथी ते सारवान तथा फळवान वृक्ष थइने तेनी शाखा प्रशाखा भारत भूमिमा विस्तार पामे, ए तमारी चालउपर आधार राखे छे. आ धर्मना विचारनी तमारा मनमा असर थाय, तमारुं कार्य पवित्र थाय त्यारेज ए धर्मबल लोकोमा प्रसारित थाय; फक्त बे घडी आंखो मिचीनें ईश्वरनी स्तुति करवाथी बस थयूं एम नथी. जेवो तमारो विश्वास तेवो तेनो कार्यमां अमल थवो जोइये. सत्यने काया तथा मने करीने पालवुं जाइये. **सत्यान्न प्रमदितव्यं.**

अशा रीतीनें अहमदाबाद समाजानें काम चालू ठेविलें. सत्येंद्रनाथांचीं व्याख्यानें, त्याचप्रमाणें दुसरीं लहान लहान पुस्तकें छापावयाला प्रारंभ केला, व त्यास धर्मतत्व असें नांव देण्यांत आलें. निरनिराळया ठिकाणीं नवीन समाजांची स्थापना झाली. खेडा, नडियाद, पेटलाद, सोजित्र, बडोदें, भडोच, अंकलेश्वर, सुरत इ० ठिकाणीं प्रार्थनासमाजांची स्थापना झाली. ज्ञानसुधा ह्या नांवाचें एक मासिक अहमदाबादच्या समाजाच्या विद्यमानें सुरू करण्यांत आलें. अखेरीस ही जुनी मंडळी एकामागून एक गत होऊं लागली; लालशंकरभाई नोकरीनिमित्त बाहेर पडले; मोठमोठ्या अधिकाऱ्यांच्या आगमनामुळें निरनिराळया ठिकाणीं स्थापन झालेले परंतु त्या त्या ठिकाणीं मूळ न धरून राहिलेले समाज अधिकाऱ्यांच्या मागें नाहींसे झाले व अखेरीस सगळ्या गुजरात प्रांतासाठीं धर्मप्रसार करणारा एक अहमदाबाद प्रार्थनासमाज राहिला. त्याचें सुंदर मंदिर आहे, थोडा बहुत पैसा आहे, शिक्षित मंडळी सभासदांमध्यें आहे; परंतु एकही सभासद अनुष्ठानिक नाहीं. एकही विवाह आजपर्यंत मूर्तिपूजेचा त्याग करून झालेला नाहीं. एकाही कुटुंबानें कोणताही विधि प्रसिद्धपणें ब्राह्म पद्धतीनुसारें केलेला नाहीं. नाहीं म्हणावयास छपन्न वर्षांच्या कारकार्दीत अहमदाबाद शहरीं फक्त एकच विवाह ब्राह्मविवाहपद्धतीनें प्रार्थनामंदिरांत झाला, पण तो रा. पांडुरंग सदाशिव केळकर यांचा व तो विधि चालविण्यासाठीं मुंबईहून एका सभासदांस जावें लागलें. समाजानें प्रथम थोडी हालचाल केली होती. महर्षि देवेंद्र-

नाथांच्या काळीं तयार झालेली अनुष्ठानपद्धति मागवून ती संस्कृत भाषेंत प्रसिद्ध केली होती. परंतु त्यांतील विधिसंबंधानें समाजाचें एकमत केव्हांच झालें नाहीं. सभासदांनीं उपासनेच्या वेळीं प्रतिमापूजन केलें नाहीं म्हणजे झालें, असा जो नियम आहे त्यानें सर्व विधि करण्याच्या वेळीं प्रतिमापूजन करावयास कांहीं हरकत नाहीं असा राजमार्ग मोकळा केला आहे असा सभासदांचा ग्रह आहे व तेथें प्रतिमापूजनाचा सर्व प्रसंगीं त्याग करणारे व उपासनेच्या वेळीं त्याग करणारे असा जो भेद आहे त्यावरून हेंच सिद्ध होत आहे. * असो. पुष्कळ वर्षें समाजाचीं सर्व कामें मोठ्या आस्थेनें नुकतेच सर झालेले रा. ब. रमणभाई नीलकंठ करीत आहेत. त्यांनीं कमींत कमी ४० वर्षें समाजाची सेवा केली आहे. त्यांची विद्वान् पत्नी सौ. लेडी विद्यागौरी यांचें रमणभाई ह्यांस सर्व बाबतींत सहाय आहे. त्यांनीं आजपर्यंत अत्यंत त्यागपूर्वक समाजाचें कार्य चालविलें. पण आज त्या समाजाची स्थिति कोणत्याही रितीनें समाधानकारक नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागत आहे.

## मध्यभारतवर्षीय ब्राम्हसमाज-इंदूर.

नोकरीनिमित्त मुंबईच्या समाजाचे सभासद रा. रा. बाळकृष्णराव जाधव (पाटकर) हे इंदुरास गेले असतांना रा. ब. कीर्तने, डा. गणपतसिंग, रावसाहेब श्रीनिवास राव, जज्ज, एंनजीनीअर एकनाथपंत वगैरे मंडळी १८८० सालीं डा. गणपतसिंग ह्यांच्या येथें एकत्र होऊन प्रार्थनासंगीतांतील पद्यें म्हणूं लागली व निरनिराळ्या धर्मपर विषयांवर वादविवादही मधूनमधून होत असत. इतक्यांत इंदूर येथील दोघे गृहस्थ परधर्माचा स्वीकार करण्याच्या बेतांत आहेत असें बाळकृष्णराव वगैरे मंडळीस कळलें. ह्या दोघांच्याही भेटी घेऊन त्यांस प्रार्थनासमाजाची माहिती सांगण्यांत आली व त्यानंतर त्यांनीं आपला बेत सोडला व ते वरील मंडळींत दाखल झाले. असा क्रम सुमारें तीन वर्षें चालल्यावर धर्मप्रचार करण्यासाठीं बाबू शिवचंद्र सेन हे लाहोरहून इंदुरास आले व बाळकृष्णराव व श्रीनि-

---

* As a principle the Samaj prohibits idolatry on the part of its members in their daily worship only; implying thereby that that it may be allowed on the occasions of marriage and other ceremonies.

—*Theistic Directory 1912.*

वासराव ह्यांच्या साहाय्यानें लाला भगवानदास सहाई ह्यांच्या घरीं कांहीं मंडळीस बोलाविलें व त्या दिवशीं पहिली जाहीर ईश्वरोपासना त्यांनीं चालविली आणि नंतर बाबू शिवचंद्र ह्यांनीं कांहीं व्याख्यानेंही दिलीं. ता. ६ मे १८८३ रोजीं समाजाच्या कामास जाहीर रीतीनें प्रारंभ झाला. म्हणून हाच स्थापनेचा दिवस गणला जात असे व नवीन मंदिर तयार होईपर्यंत वार्षिकोत्सवही मे महिन्यामध्येंच साजरा केला जात असे. १८८३ सालीं अध्यक्ष श्रीनिवासराव; उपाध्यक्ष लाला भगवान सहाई; सेक्रेटरी बाबू श्यामचरण दत्त; ट्रेझरर-बाबू रसिकलाल दास; उपासक-बाळकृष्णराव जाधव; सभासद—रामचंद्र गणेश मिटबावकर; दत्ताराम पिळगांवकर; व्यंकटेश माधव; आत्मारामपंत जाधव; भवानराव; व डा. गणपतसिंग; अशी इंदुर प्रार्थनासमाजाची पहिली व्यवस्थापक कमीटी नेमून समाजाचें काम सुरू झालें व पुढें सात आठ वर्षांनीं मंदिरासाठीं जागा व पैसे जमवून मंदिराच्या कामास सुरुवात होऊन १८९२ च्या एप्रिलमध्यें मंदिराचें काम पूर्ण झालें व १७ व्या तारखेस ह्या समाजानें **मध्यभारतवर्षीय ब्राह्मसमाज** असें नांव धारण केलें. त्याच वेळीं दीक्षित व अदीक्षित असे सभासदांचे दोन वर्ग केले. दीक्षित—म्हणजे जे कोणी सभासद होते वेळीं तत्त्वानुरोधें सर्व बाबतींत चालण्याची प्रतिज्ञा घेतात ते. अदीक्षित सभासदांस अशी प्रतिज्ञा घ्यावी लागत नाहीं. मंदिर बांधल्यापासून ह्या समाजाचा उत्सव चैत्र पौर्णिमेस दर वर्षी होत असतो.

ह्या समाज लहान जरी आहे तरी येथें जे सभासद आहेत त्यांतील बहुतेक दीक्षित आहेत. ह्या समाजाच्या विद्यमानें स्त्रियांची सभा, संगतसभा व साप्ताहिक उपासना चालू आहेत. ह्या समाजाचा व मुंबईच्या समाजाचा सभासदांच्या दृष्टीनें फार निकट संबंध आहे. मूळ स्थापकांपैकीं बाळकृष्णपंत व व्यंकटेश माधव ऊर्फ देवाजीराव मुंबईच्या समाजाचे सभासद होते. त्याचप्रमाणें रा. ब. डॉ प्रभाकरपंत, डॉ. वासुदेवराव सुखटणकर, रा. आत्मारामपंत केळकर वगैरे मुंबईचेच सभासद. १८९५ सालीं सदाशिवराव केळकर इंदुर येथें रहावयास गेले व पुष्कळ वर्षें ते तेथें राहिल्यामुळें त्यांच्या सहवासाचा व त्यांच्या चारित्र्याचा लाभ तेथील लोकांस दीर्घकाळ झाला. रा. ब. डॉ. प्रभाकरपंत भांडारकर ह्यांचीं धर्मपर व्याख्यानें, कीर्तनें व पुराणें ह्यांच्या द्वारें समाजाची त्यांनीं निरपेक्षपणें सेवा केली व आपल्या आदर्शवत् आचरणाच्या योगें सर्वांस ते अत्यंत आदरणीय झाले. प्रो. शांताराम अनंत देसाई हे ह्या समाजाचे पुष्कळ वर्षें सेक्रेटरी होते. हे आपल्याला शंकराचार्यांचे भक्त व अनुयायी म्हणवीत, व शंकरा-

चार्यांचा वेदान्त व ब्राम्हसमाजाचें तत्त्वज्ञान ह्यांत त्यांच्या दृष्टीनें कांहीं विरोध नव्हता. यांनीं विद्यार्थि ह्या नांवाचें एक त्रैमासिक कांहीं वर्षें चालविलें व त्याच्या द्वारें गहन विषयांवर अनेक लहान मोठे निबंध प्रसिद्ध केले. रा. रा. व्यंकटेश माधव ऊर्फ देवाजीराव ह्यांनींही वेदवेदांताचें चांगलें अध्ययन केलें होतें. त्यांनीं आपला विवाह रा. रा. सदाशिवराव केळकर ह्यांनीं वाढविलेल्या मुलीशीं केला. बाळकृष्णराव व आत्मारामपंत जाधव, रामभाऊ मिटबावकर, देवाजीराव, डा. गणपत सिंग, सदाशिवराव केळकर, डॉ. प्रभाकरपंत व प्रो. देसाई हे त्या समाजाचे खांब समजले जात. ह्यांपैकीं आतां रा. रा. आत्मारामपंत हयात असून ते समाजाचे अध्यक्ष आहेत व डॉ. सुखटणकर सेक्रेटरी आहेत. मुंबईच्या समाजाचे अध्यक्षांचे चिरंजीव रा. रा. यशवंतराव भांडारकर हे इंदुर समाजाचे जुने सभासद असून आजपर्यंत त्यांनीं समाजामध्यें उपासना चालवून, व्याख्यानें देऊन पुष्कळ समाजकार्य केलें आहे. ते कांहीं काळ समाजाचे अध्यक्षही होते.

---

# प्रार्थनासमाजाचें विशिष्टत्व.

The Theistic Church in Western India occupies a position of its own. Although in thoroughly fraternal relations with the Eastern Samajes, it is of indigeneous growth and of independent standing. It has never detached itself so far from the Hindu element of Brahmaism as many of the Bengali Samajes, and both in religious observances and social customs, it clings far more closely to the old models. It is more learned and less emotional in its tone, and far more cautious and less radical in its policy than the chief Samajes of Bengal. But it is doing good work in its own way and it has enlarged its operations considerably within the last few years.

*Miss S. D. Collet in 1880.*

हिंदुस्थानांत शिक्षणाचा प्रसार होऊन आपली स्थिति व इतर देशांची स्थिति ह्यांची तुलना करण्याचें, व आपले विचार व आचार ह्यांतील दोषस्थळें दिसण्याचें सामर्थ्य प्राप्त झाल्यानंतर ज्या संस्था स्थापन झाल्या, त्यांत बंगाल्यांतील ब्राह्मसमाज ही संस्था जुनी अशी मानिली जाते. आमच्या इकडे अशा जागृतीनंतर प्रथम एक गुप्तसभा, त्यानंतर परमहंस सभा व परमहंस सभेचा अवतार संपल्यानंतर कांहीं वर्षांनीं प्रार्थना समाजाची १८६७ सालीं स्थापना झाली. त्यापूर्वी ब्राह्मसमाजाचे प्रसिद्ध प्रचारक केशव चंद्रसेन येथें येऊन गेले होते. त्यांनीं धर्मपर विषयावर व्याख्यानें दिलीं, परंतु मुंबईची जनता ऐहिक सुखाच्या मागें विशेष प्रकारें लागलेली त्यांना दिसली व धर्माचा आस्थेनें विचार करावयास लोक तयार नसल्याचा कष्टमय अनुभव त्यांस आला. ते येऊन गेल्यानंतर प्रसिद्धपणें सामाजिक प्रगतीचें कार्य करणारी संस्था स्थापन करण्यासाठीं प्रथम ज्या सभा झाल्या त्यांचें पर्यवसान प्रार्थनासमाजाच्या स्थापनेंत कसें झालें हें आतां

आपण जाणत आहों. आतां ब्राह्मसमाजाच्या प्रत्यक्ष नाहीं तर अप्रत्यक्ष वजनामुळें ज्या समाजाची स्थापना झाली, स्थापनेनंतर ज्याच्या विद्यमानें केशवचंद्र सेन ह्यांचीं ते दुसऱ्यांदा येथें आले असतांना व्याख्यानें झालीं व उपदेशही झाले, ज्यानें लोकांस *ब्राह्मधर्माचें वळण लागावें म्हणून प्रतापचंद्र मुझुमदारांसारख्या प्रसिद्ध प्रचारकांस येथें साहा साहा महिने ठेवून घेतलें, ज्याचीं धर्मतत्त्वें ब्राम्हसमाजाच्याच वळणावर आहेत, तो प्रार्थनासमाज ब्राम्हसमाजांतच सामील कां झाला नाहीं, किंवा तीनचार वेळ प्रयत्न होऊनही, त्यानें ब्राम्हसमाज हें नांव कां घेतलें नाहीं, त्याचें विशिष्ट स्वरूप कांहीं आहे किंवा कसें, असल्यास तें काय आहे, ह्याविषयीं आजपर्यंतचा अनुभव लक्ष्यांत घेऊन ह्या शेवटल्या भागांत अल्प विवेचन करण्याचें योजिलें आहे.

प्रथमतः हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं, प्रार्थना समाजानें ज्यावेळीं बाबू प्रतापचंद्र मुझुमदारांना येथें धर्मप्रचाराचें काम करण्यासाठीं साहा महिने ठेवून घेतलें त्याच वेळीं प्रथम ही नांव बदलण्याची चळवळ सुरू झाली होती. त्यावेळीं एकंदर जो कल झाला त्यावरून असें दिसून आलें कीं, मुंबईतील मंडळी ब्राम्हसमाज हें नांव घ्यावयास अनुकूल होती. ता. ६ ज्यानुआरी १८७८ सुबोध पत्रिकेच्या अंकामध्यें पुढील उद्गार आहेत त्यावरून हें अगदीं स्पष्ट होत आहे. "The proposition that this Prarthana Samaj should change its name for that of the Bramha Samaj of Western India–is under consideration........but the sense of the meeting then ascertained proved to be all but unanimous in favour of the proposition" परंतु बाबू मजकुरांस ब्राम्ह समाजाच्या उत्सवासाठीं कलकत्त्यास जावयाचें होतें, म्हणून त्यांस अधिक दिवस येथें राहतां येणें शक्य नव्हतें आणि जेव्हां नंतर हा प्रश्न पुढें आला त्यावेळीं नियमाप्रमाणें अनुकूल पक्षाला तीन चतुर्थांश मतें न मिळा-

* सन १८८२ सालीं खानेसुमारीच्या वेळीं धर्म ह्या सरदाराखालीं इंग्रजी तक्त्यांत "Hindu" असें घालावें व मराठी तक्त्यांत "ब्राह्मधर्म" घालावें असें सुचविण्यांत आलें होतें. १९१२ सालीं "ब्राह्मधर्म" असें धर्माच्या सदराखालीं घालावें असा ठराव झाला आहे.

त्यामुळें ही नांव बदलण्याची सूचना पसंत पडली नाहीं.× तिन्ही वेळां ह्या प्रयत्नास यश जें आलें नाहीं त्याचें कारण मताधिक्य आहे तेंच नांव कायम ठेवावें ह्या बाजूकडे होतें हें होय. १८९२ सालीं जेव्हां दुसऱ्यांदा असा प्रयत्न झाला त्यावेळीं माधवराव रानडे ह्यांनीं ह्या सूचनेच्या विरुद्ध आपलें मत कळवितांना एक विस्तृत पत्र लिहिलें होतें त्याचा सारांश पुढील प्रमाणें आहेः ब्राम्हसमाज हें नांव जुनें जुनें म्हणतां तर प्रार्थना समाज हें नांवही आतां पंचवीस वर्षांचें जुनें झालें आहे, तेव्हां हें जुनें नांव सोडून बंगाल्यांत जें नांव कांहीं ठिकाणीं आहे तें मुद्दाम घेण्याची कांहीं जरूर नाहीं. शिवाय बंगाल्यांत तरी ब्राम्हसमाज हें नांव सर्वसाधारण नाहीं. आदिब्राम्हसमाज, भारतवर्षीय ब्राम्हसमाज किंवा नवविधान ब्राम्ह समाज व साधारण ब्राम्ह समाज असे तेथें तीन समाज आहेत व परस्परांमध्यें प्रेमभाव बिलकुल नाहीं. आम्ही नांव बदलावयाचें म्हणजे ह्यांपैकीं कोणत्या तरी एका समाजापैकीं व्हावयाचें. तर इकडल्या समाजानें तिकडल्या भानगडींत मुद्दाम पडण्याची कांहीं अवश्यकता नाहीं. जर कोणत्याही एका समाजास जाऊन मिळावयाचें नाहीं, व बंगालच्या तीन समाजांपैकीं कोणत्याही एका समाजाची एक स्वतंत्र अगर त्या समाजावर अवलंबित अशी शाखा व्हावयाचें नाहीं, तर मग आहे त्या नांवांत फरक तरी कशाला करावयाचा ? दुसरें असें कीं, ब्राम्हसमाज हें नांव बंगालनें 'ब्रम्ह' ह्या शब्दावरून घेतलें आहे हें उघड आहे. आतां उपनिषदांमध्यें ब्रम्ह ह्या शब्दाचा परमेश्वर ह्या अर्थानें क्वचित उपयोग केला आहे, तरी साधारणपणें 'पुरुष' Personal God अर्थानें आपल्या प्रांतीं तो शब्द प्रचारांत नाहीं आणखी असें कीं, ब्राम्हसमाज असें म्हटलें म्हणजे ही संस्था केवळ हिंदूसाठीं आहे, असाही अर्थबोध होतो. वस्तुतः जरी बहुतेक सर्व सभासद हिंदुसमाजांतूनच यांत येत असतात व आले आहेत, तरी इतर धर्मांतील कोणी येणार नाहींत अगर आले नाहींत असेंही नाहीं. असें असतां इतर धर्मांतील लोकांस आंत येण्याच्या वाटा मुद्दाम बंद करण्याचीही कांहीं अवश्यकता दिसत नाहीं.

अशा प्रकारें नांव बदलण्याचे अनेक वेळां झालेले प्रयत्न व्यर्थ गेले आहेत

---

× यावेळीं व डा. भांडारकर रा. ब. रानडे हे ह्या सूचनेच्या विरुद्ध होते. डा. भांडारकरांनीं माधवरावांना ह्या बाबतींत लिहिलेलें पत्र पृ. ११९ वर छापलें आहे तें पहावें.

व आतां साठ वर्षांनंतर तशा प्रकारचा प्रयत्न होण्याचा रंग दिसत नाहीं. आतां प्रार्थना समाज कोणत्याही बाबतींत ब्राम्ह समाजाहून निराळा आहे किंवा कसें, आणि जर असला तर त्याचें विशिष्टत्व कोणकोणत्या गोष्टींत आहे, त्याचा येथें खुलासा करावयाचा आहे. प्रथमतः मिस कॉलेट ह्यांनीं मुंबईच्या समाजाचें १८८० सालीं जें वर्णन केलें आहे तें त्यावेळीं अगदीं बरोबर होतें एवढेंच केवळ नव्हे, तर तें आजही अगदीं बरोबर आहे असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. त्या बाई खरें पाहातां केव्हांही मुंबईत आलेल्या नाहींत, तरीपण मुंबईतील समाजाच्या लोकांचें त्यांनीं केलेलें वर्णन इतकें वस्तुस्थितिनिदर्शक आहे कीं तें वाचून ह्या बाईच्या निरीक्षणशक्तीबद्दल कौतुकच वाटतें. बंगाल्यामध्यें पूर्वी ब्राम्ह समाजाचा सभासद होणें म्हणजे आपल्या जुन्या जातीला, आप्तेष्टांना व जुन्या समाजाला मुकावें लागत असे व तेथें ब्राम्ह धर्मानुयायी जुन्या विचारांच्या लोकासंबंधानें बोलतांना आम्ही ब्राम्ह व ते हिंदु असें म्हणत. म्हणजे 'हिंदु' हा जुन्या विचारांचा समाजवाचक शब्द झाला होता. गुरुवर्य डा. भांडारकरांनीं ह्या स्थितिसंबंधानें आपला असा स्पष्ट अभिप्राय देऊन ठेविला आहे. "हिंदूंनींच प्रथम ही धर्मसुधारणेची चळवळ सुरू केली आणि सध्यां तरी ती हिंदूपुरतीच आहे. तेव्हां अशी वस्तुस्थिति असतां **आह्मी ब्राह्म** आणि **तुह्मी हिंदु** असा प्रकार केल्यास साधारण जनसमूहावर वजन राहणें शक्य नाहीं. अणि ह्या गोष्टीकडे लक्ष न दिल्यामुळें बंगाल्यांत असा प्रकार झालाही आहे; कांहीं दिवसांपूर्वी सर्वांस पूज्य अशा एका ब्राम्हण गृहस्थांचें पत्र घेऊन बंगाल्यांतील एक विद्वान गृहस्थ मजकडे आले होते. त्यांनींही हेंच सांगितलें कीं जे साधारण लोक आहेत त्यांचे मनावर ब्राम्ह समाजानें कांहीं संस्कार केलेला नाहीं. सामान्य समाजापासून ते अलग राहात आहेत, त्यामुळें तुह्मी हिंदु आणि आह्मी ब्राह्म असा विभक्तपणाचा प्रकार झाला आहे. ब्राह्मसमाजांतील लोकांस खिस्ती लोकांसारखे अगदीं अलग असे लोक मानीत आहेत." आतां प्रार्थनासमाज स्थापन झाल्यापासून आजपर्यंत प्रार्थनासमाजाचा सभासद झाल्यामुळें कोणावर बहिष्कार पडल्याचें उदाहरण सांपडणें कठिण आहे. वामनराव मोडकांनीं विधवाविवाहाच्या कार्यांत पुढाकार घेतला म्हणून त्यांस बहिष्कृत मानलें गेलें व हा बहिष्कार, त्यांनीं आपला क्रम तसाच चालू ठेवून, दाहा वर्षे सहन केला; पण प्रार्थनासमाजाचे ते सभासद होते म्हणून त्यांच्यावर बहिष्कार अस्त्र कोणी उपसलें नाहीं. रा. ब. रानडे हे पांच हौद मिशनमध्यें ज्यांनीं चाहा घेतला त्यांच्या बरोबर होते म्हणून

त्यांना प्रायश्चित्त घ्यावें लागलें व त्यामुळें प्रार्थनासमाजाच्या ध्येयापासून त्यांची च्युति झाली, परंतु ते अखेरपर्यंत प्रार्थनासमाजाचे सभासद होते; प्रार्थनासमाजाच्या प्रितीभोजनांत भाग घेत होते; पण त्याबद्दल कोणी त्यांच्यावर बहिष्कार घातला नाहीं. एवढेंच केवळ नव्हे, तर आज बंगाल्यांतही कांहींसा मुंबईच्याच धोरणास अनुसरून ब्राह्म समाजाच्या आचाराचा ओघ वाहूं लागला आहे, असें आम्हांस वाटतें. पूर्वी ब्राम्ह नसलेल्या कुटुंबांतील मुलगी ब्राह्म कुटुंबांत येणें शक्य नव्हतें. ब्राह्म कुटुंबांत आपली मुलगी जाऊं देणें हा कमीपणा ज्याप्रमाणें समजला जात असे, त्याचप्रमाणें ब्राह्म गृहस्थाच्या कुटुंबांतील मुलगी अब्राह्म कुटुंबांमध्यें सहसा येत नसे. परंतु आज तसा प्रकार राहिलेला नाहीं. विधि ब्राह्म असावेत एवढा कटाक्ष आहे; परंतु पूर्वी प्रत्येक विवाहाची १८७२ च्या तिसऱ्या कायद्याप्रमाणें नोंद होतच असे; आज साधारण ब्राह्मसमाजामध्यें रजिस्टर न करितां विवाह होऊं लागले आहेत. पूर्वी एकदां ब्राह्म झाल्यावर आप्तांचा संबंध सुटत असे; आतां जुन्या विचारांचे आप्त आपल्या ब्राह्म आप्तांच्या घरीं येऊन राहतात व फारतर म्हाताऱ्या बाया आपला स्वतःचा स्वयंपाक निराळा करतात, पण ब्राह्म कुटुंबांमध्यें, एक घरांत त्यांस रहावयास कांहीं हरकत वाटत नाहीं. मुबई समाजांत समाजाच्या मतांनुसार ज्यांनीं आपापल्या कुटुंबांतील विवाहविधि केले, त्यांच्यावर बहिष्कार पडलेले नाहींत. उलट जातीची व बाहेरची सर्व मंडळींचीं एकत्र भोजनें झालेलीं आम्ही आमच्या डोळ्यांनीं पाहिलीं आहेत. यावरून असे दिसून येईल कीं, प्रार्थनासमाजानें एकदर समाजापासून अलग न होणें हें जें त्यांचें विशिष्टत्व व त्यांचें धोरण तेंच यशस्वी होत असून साधारण ब्राह्म समाजांतील व बाहेरील कित्येक कुटुंबांनीं त्याच धोरणाचा स्वीकार केला आहे.

वर दर्शविलेली नांव बदलण्याची चळवळ जेव्हां एकदां जोरांत होती त्यावेळीं आपल्या समाजानें 'प्रार्थना समाज' हें जें नांव घेतलें त्याविषयीं आपली समजूत काय आहे ती रा. ब. माधवराव रानडे ह्यांनीं स्पष्ट केली. ते म्हणाले "तात्त्विक रीतीनें विचार करितां प्रार्थना समाज हें नांव घेण्याचें कारण असें आहे कीं, **प्रार्थना हाच मार्ग परमेश्वराची प्राप्ति होण्यास मुख्य आहे.** वरकड जपतप, यज्ञयाग, कर्मतंत्रें, व्रत वैकल्यें, तीर्थयात्रा, दानधर्म, ज्ञानविज्ञान,, ध्यानधारणा, यमनियम या व अशाच सर्व साधनांमध्यें प्रार्थना हेंच मुख्य रहस्य आहे. प्रार्थनेशिवाय हीं सर्व साधनें व्यर्थ आहेत. अशा मतांचे जे लोक

आहेत त्यांच्या मताचा बोध व्हावा म्हणून हें नांव घेतलें आहे. ह्या देशांत मुख्य चालू असलेल्या हिंदुधर्मांत उपास्य दैवत एक परमेश्वर आहे; तो आत्मस्वरूपी आहे. जीवात्म्यानें त्याची प्राप्ति करावी हेंच मुख्य श्रेय आहे इ० मतांविषयीं सर्व सांप्रदायांचे लोकांत भेद नाहीं. भेद विशेषेंकरून साधनसामग्रींत आहे; म्हणून ज्या गोष्टींबद्दल भेद नाहीं त्या गोष्टी प्रधानपणें नांवावरून प्रसिद्ध व्हाव्यात हें अवश्य नाहीं. साधनविशेषाची भिन्नता प्रकाशित व्हावी हें इष्ट आहे" हें न्या. मू. रानडे ह्यांच्या दृष्टीनें जें प्रार्थनासमाजाचें विशिष्टत्व तें लक्ष्यांत घेतां सहजगत्या एक गोष्ट सिद्ध होऊन जाते. तूर्त आपला अधिकार प्रार्थना करण्याचा आहे, लोकमतांत फेरफार झाला म्हणजे कृतीचा विचार करावयाचा, हें कांहीं प्रार्थना समाज हें नांव घेण्याचें कारण नव्हे । असो.

प्रार्थना समाजाचें विशिष्टत्व स्थापन करणारी आणखी एक गोष्ट आहे. ती धर्मग्रंथ व धर्मप्रचार ह्यांविषयींची दृष्टि. प्रार्थना समाज कोणताही एक ग्रंथ ईश्वरप्रणीत मानीत नाहीं. ब्राह्मसमाजाचें तेंच मत आहे. असें असूनही प्रार्थनासमाजानें आपली परंपरा राखण्याचा जितका प्रयत्न केला आहे तितका ब्राह्मसमाजानें केलेला नाहीं. याची साक्ष आमचें प्रार्थना संगीत उत्तम रीतीनें देत आहे. प्रार्थना समाजाचीं जीं धर्मतत्त्वें आहेत तीं आपल्या धर्मग्रंथांतील वचनांच्या आधारें प्रतिपादिलीं असतां लोकांस तीं रुचतात व पटतात. तींच तत्त्वें पटविण्यासाठीं परधर्मांतील वचनांचा आश्रय केल्यास तें बरें वाटत नाहीं. ब्राह्म समाजानें आपले जे साधुसंत होऊन गेले, ज्यांनीं भक्तिमार्गाचा प्रसार केला, त्यांच्या उद्गारांचा आपल्या संग्रहामध्यें समावेश केलेला नाहीं. जेथें ध्येयभिन्नता आहे, तेथें जुनीं वचनें घेण्यांत अर्थ नाहीं, परंतु ध्येयसादृश्य असतांना संतांच्या वचनांचा मनावर अधिक परिणाम होतो. ह्यासंबंधानें डा. भांडारकर सारख्यांचा देखील असा अनुभव आहे कीं " तुकोबासारख्यांचे अभंग व भगवद्गीता, आणि उपनिषदें, यांतील वचनें ह्यांच्या आधारें आह्मीं उपदेश केला असतां तो यावत् सर्व हिंदूंस मान्य होतो आणि ते माना डोलावतात आणि असले उपदेश वारंवार ऐकण्याची इच्छा त्यांस होते. " तेव्हां हें एक प्रार्थना समाजाचें विशिष्टत्व आहे. दुसरें असें आहे कीं, कोणताही धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत नाहीं असें मानिलें तरी सुद्धां समाजाचें धर्मपुस्तक कोणतें असा प्रश्न आपणापुढें आला असतां "त्याचें उत्तर "सर्व धर्मपुस्तकें समाजाचें धर्मपुस्तक होय' असें द्यावें" असें डा. भांडारकरांचें मत आहे. "म्हणजे निरनिराळ्या धर्मपुस्तकांत ज्या ठिकाणीं विरोध येईल

तितका अंश समाजास ग्राह्य नाहीं. त्यांतील दैवी अंश व धर्मरहस्य सर्व प्रकारें ग्राह्य आहे." अशी जरी आमची दृष्टि उदार आहे "तरी परमेश्वरानें धर्माचें तत्त्व मनुष्याच्या अंतःकरणांत ठेविलें आहे," असा प्रार्थनासमाजाचा मुख्य कटाक्ष आहे. "तथापि ही जी अंतःकरण्याची धर्मवृत्ति तिचा उल्हास आपल्या भरतखंडांतच उत्कृष्ट रूपानें झाला आहे. म्हणून ह्या देशांत संस्कृत आणि प्राकृत भाषांत जे ग्रंथ निर्माण झाले त्यांचें अवलोन करून त्यांत देशपरत्वें आणि कालपरत्वें जो विशेष अथवा विलक्षण अंश मिश्रित झाला आहे तो गाळून सामान्य, सर्व मनुष्यांच्या अंतःकरणास अभिमत होणारा असा जो अंश तो एकीकडे करून त्याचें अवलंबन करावें" हें प्रार्थनासमाजाचें धोरण आहे. ह्या दृष्टीनें पहातां "समाजास वेद मान्य, वेदांत म्हणजे उपनिषद मान्य, स्मृति मान्य, पुराणें मान्य, गीता परम मान्य, बौद्धांचे ग्रंथ मान्य, जैनांचे ग्रंथ मान्य, प्राकृत ग्रंथ मान्य, इतकेंच कीं खोट्या समजुती गाळून मान्य" इतका आपल्या धर्मग्रंथांशीं संबंध राखण्याचा ब्राह्मसमाजानें प्रयत्न केलेला नाहीं. "असत्यरूप मृत्तिका विवेकाग्नीच्यायोगें जाळून टाकून जें सुवर्णरूप सत्य वेदांमध्यें, स्मृतींमध्यें, पुराणांमध्यें आणि प्राकृतग्रंथांमध्यें परिपूर्णरूपानें आहे त्याचें दृढनिष्ठेनें, कशाचीही भीति न बाळगतां ग्रहण करणें हेंच विवेकी पुरुषांस योग्य आणि यांतच आपलें कल्याण आहे" ही गोष्ट डा. भांडारकरांनीं दाखवून दिलेली आहे, तशी ब्राह्मसमाजाच्या पुढाऱ्यांनीं दिलेली नाहीं. हें सर्व व्यक्तिमात्राच्या विश्वासासंबंधानें झालें. परंतु प्रार्थनासमाजाचा धर्म केवळ व्यक्तीपुरता नाहीं. केवळ व्यक्तीनें तो प्रचारांत आणिल्यानें त्याचें कार्य होत नाहीं. म्हणजे असें कीं, एखाद्या मोठ्या कुटुंबामध्यें प्रार्थनासमाजाचा सभासद केवळ एक पुरुष असल्यानें भागत नाहीं. व्यक्तिगत साधन तो फारतर करूं शकेल; परंतु तें सर्व मोठें कुटुंब समविचारी असलें, आध्यात्मिक जीवनाचें ध्येय सर्वांचें सारखें असलें म्हणजे प्रत्येकास साधनक्रमामध्यें परस्परांचें अत्यंत साहाय्य होतें असा साधकांचा अनुभव आहे. संसारांतील सर्व व्यवहाराच्या द्वारें साधनक्रम साधणें ही जी ब्राह्मधर्माची विशेष गोष्ट ती सर्वांची अनुकूलता असल्यानें सहज साध्य होते. अर्थात आपापल्या कुटुंबामध्यें आपल्या ध्येयांची जाणीव जी उत्पन्न व्हावयाची ती आपल्याला निकट वाटणाऱ्या ग्रंथांच्या द्वारें. कारण "परमेश्वर सर्वांस सत्य निवेदन करीत आहे. त्याच्या येथें मुसलमान, ख्रिस्ती, हिंदु हा भेद नाहीं. तो आपणा सर्वांचा पिता" हेंच ध्येय आपल्या कुटुंबांतील सर्व व्यक्तींपुढें जरी

ठेविलें, तरी तें निकट वाटणाऱ्या ग्रंथांचाही अधिक परिचय होऊन साध्य करून घेण्याकडे साहजिक अधिक कल असतो. त्याचप्रमाणें सर्व धर्मांशीं प्रार्थनासमाजाचा जरी आदराचा संबंध आहे, तरी धर्माचा प्रचार करितांना आपल्याला निकट वाटणारे जे धर्मग्रंथ त्यांच्याद्वारें धर्माचा प्रचार करणें इष्ट आहे ही जी समाजाची दृष्टि आहे ताही समाजाचें विशिष्टत्व स्थापित करते. "प्रत्येक धर्मांत विकसित तत्त्वें आहेत. उपनिषदें, भगवद्गीता ह्यांत जितक्या प्रमाणानें हीं विकसित तत्त्वें आहेत तितक्या मानानें ते ग्रंथ समाजास मान्य आहेत. आपण सर्व धर्मांतील विकसित तत्त्वांचा आदर करावयास जरी नित्य सिद्ध असलें पाहिजे, तरी आपला धर्मप्रचार जो आहे तो एतद्देशीय ग्रंथांच्या आधारें विशेषेंकरून करावयाचा" हा आमच्या धोरणांतील विशेष आहे व ह्यांतच समाजाच्या धर्मप्रचाराच्या धोरणाचें विशिष्टत्व आहे.

प्रार्थना समाजाचें विशिष्टत्व आणखी एका गोष्टीनें स्थापित झालेलें आहे, तिचा येथें उल्लेख केला पाहिजे. बंगाल्यामध्यें चैतन्यानें भक्तिमार्गाची ध्वजा रोविली. भक्तिमार्गाचा प्रसार त्यानें केला; कर्मकांडावरील विश्वास त्याच्या चळवळीनें डळमळीत झाला. परंतु त्याच्या नंतर एकीकडे त्याचा वैष्णव पंथ जरी प्रचारांत होता तरी हळुहळु तो खालावाला, व इतरत्र अतिशय गोंधळ माजला; धर्माच्या नांवावर अनाचार व दुराचार ह्याचें रान माजलें; नीतिबंधनें नाहींशीं झालीं; शाक्तपंथाचा फार जोरानें प्रसार झाला; अगदीं जुन्या वळणामध्यें अनेक भयंकर व्यसनांचा बाजार वसला; अशा वेळीं बंगाल्यांत ब्राम्हसमाज स्थापन झाल्यामुळें त्यालाही उग्रस्वरूपच धारण करावें लागलें. एकतर महाराष्ट्रप्रमाणें साधु संतांचा तेथें सुकाळ नव्हता. चैतन्याच्या वैष्णव पंथांतही सर्व विधिकलापांचा इतका गोंधळ उडाला होता कीं, पूर्वीचें त्याचें स्वरूप लोपूनच गेलें होतें. त्यामुळें ब्राम्ह समाजाला बंगालच्या साधुसंतांच्या कृतींचा लाभ घेतां आला नाहीं. परंतु महाराष्ट्राचें तसें नव्हतें हें न्या. मू. रानडे ह्यांनीं भागवतधर्मावरील आपल्या व्याख्यानांत, त्याच प्रमाणें Rise of the Maratha Power ह्या पुस्तकांतील संतांच्या कामगिरीवरील भागांत व Hindu Protestantism ह्या आपल्या व्याख्यानांत फार चांगल्या रीतीनें दाखविलें आहे. सतराव्या अठराव्या शतकांमध्यें महाराष्ट्रामध्यें जी संतमालिका उदयास आली तिनें प्रार्थना समाजाचा मार्ग पुष्कळ सुलभ केला. देवाच्या सान्निध्याच्या मार्गामध्यें पूर्वी पुष्कळ अडचणी होत्या. ज्ञानमार्ग साध्या भोळ्या लोकांना जणूंकाय बंद झालेला होता, कर्मकांडाचा पसारा

इतका वाढला होता कीं, तो उचलणें लंगड्या लुल्या माणसांस शक्य नव्हतें. संतांनीं संस्कृत भाषेचें वर्चस्व कमी केलें.* संस्कृत तेवढी देवभाषा तर मराठी कोठून आली असा प्रश्न एकनाथांनीं करून भाळ्या भोळ्या लंगड्या लुल्या लोकांसाठीं भक्तिमार्ग मोकळा करून दिलाः—

**जो श्रुतिस्मृति नेणता । भावें भजे भगवत्पथा ।**
**त्यासि विधिनिषेध बाधकता । स्वप्नींही सर्वदा प्रमाद न घडे ॥**
**श्रुतिस्मृति दोन्ही डोळे । तेयेविण जे अंधळे ।**
**तेही हरिभजनीं धांवतां भावबळें । पडेना आडखुळे सप्रेमयोगें॥**
**ऐसें आचरितां भागवत धर्म । बाधूं न शके कदा कर्म ।**
**कर्मासि ज्याची आज्ञा नेम । तो पुरुषोत्तम भजनामाजी ॥**
**एवं भागवतधर्मीं जे सेवक । स्वधर्म कर्म त्यांचे रंक ।**
**तें राहों न शके त्या सन्मुख । मा केवि बाधक हों शकेल**

ह्या संतांनीं कर्मकांडावरही शस्त्र धरलें. "ज्यासी भगवद्भजनीं विश्वासू । विधिनिषेध त्याचा दासू । देवांनि निज भजन विलासू । स्वयें जगन्निवासू सुखावे" असें त्यांनीं आश्वासन दिलें. संतांनीं केलेली तिसरी कामगिरी म्हणजे योगाविरुद्ध त्यांनीं केलेली प्रचंड चळवळ. योगाच्या द्वारें कांहीं विशिष्ट प्रकारचें सामर्थ्य प्राप्त होतें असें जरी घटकाभर कबूल केलें तरी व्यक्तीच्या आध्यात्मिक उन्नतीला तें सामर्थ्य कोणत्याही रीतीनें पोषक नाहीं. योगसामर्थ्याचें संपादन करण्याकडे आपल्या लोकांचा जो विशेष कल नाहीं त्याचें कारण तरी हेंच आहे. त्याचप्रमाणें कोणाही संतानें आपल्याला अशा प्रकारचें सामर्थ्य प्राप्त झालें आहे अशी बढाई केव्हांही मारलेली नाहीं. जातिभेद संतांनीं नाहींसा केला नाहीं. परंतु वरच्या जातींचें वर्चस्व कमी केलें. संतांची जातवारी पाहिली तर ब्राह्मण म्हणून जे श्रेष्ठ मानलेले त्यापासून अगदीं नीच मानलेल्या जातींत संत निर्माण झाले आणि याति संतासी असेना ह्या वचनानुसारें भजनाच्या आखाड्यांत, तीर्थाच्या क्षेत्रीं, देवाच्या चरणापाशीं जातगोत बाजूस ठेवून संत एकजीव झाले. त्याचप्रमाणें

---

* These men protested against the supremacy of the old Sanskrit Language as a vehicle of learning and they enriched each in his own way, the stock of their Vernacular treasures.

नानक, कबीर खेरीज करून जरी सर्व संत मूर्तिपूजक होते तरी ते अनेक देवतांचे पूजक नव्हते ( The saints were practically worshippers of one God and their attempts not to admit a multiplicity of rival gods was heroic). संतांची दुसरी कामगिरी म्हणजे परमेश्वर प्रेमरूप आहे, तो आपला सखा आहे, तो आपली माऊली आहे. कृपाळू जननी आहे हें 'प्रेमसूत्रदोरी। जातो जिकडे नेतो हरी ॥'' ' तुका म्हणे तूं गा कृपावंत भारी। ऐसें मज हरि कळों आलें' इ. वचनांच्या द्वारें महाराष्ट्राला त्यांनीं पटवून दिलें. ह्या संतांच्या कामगिरीचें थोडक्यांत गुरुवय डा. भांडरकरांनीं फार सुंदर विवेचन केलें आहेः—

Then arose the sadhus or the pious men of the medieval period who protested against this artificial religion, reasserted the doctrine of Bhakti with vigour and inculcated purity of heart and the last sadhu in this part of the country was our own Tukaram of Dehu. What the mission of these men was generally may best be seen from an abhanga of Tukaram:*—

आम्हीं वैकुंठवासी। आलों याचि कारणासी।
बोलिले जे ऋषी। साच भावें वर्ताया ॥ १ ॥
झाडूं संतांचे मारग। आडरानें भरलें जग।
उच्छिष्टाचा भाग। शेष उरला तो सेवूं ॥ २ ॥
अर्थे लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें
विषयलोभी मन। साधन हें बुडविलें ॥ ३ ॥
पिटूं भक्तीचा डांगोणा। कळिकाळासी दरारा।
तुका म्हणे करा। जयजयकार आनंद ॥ ४ ॥

आणि प्रार्थनासमाजही कमी अधिक प्रमाणानें, आजच्या कालमानास अनुसरून हेंच कार्य करण्यासाठीं अवतरलेला नाहीं काय ? आज ऋषिप्रणीत " अपाणिपादो जवनोग्रहीता ' इ० वर्णनात्मक परमेश्वर मागें पडून प्रतिमापूजनाचा मार्ग

* Basis Theism—1883.

वादविवादासाठीं तरी सरसहा अमलांत आहे; कर्मकांडाचें बंड अद्याप आहेच. साधुसंतांनी भक्तिमार्ग चोखाळला; अंतःकरणाच्या पावित्र्यावर जोर दिला; परंतु साधनमार्गामध्यें निषेधपरही कांहीं भाग आहे तो त्यांच्या कार्याच्या क्षेत्रांत आला नाहीं हें जें साधुसंतांच्या क्षेत्रामध्यें न आलेलें कार्य तें करावयाचें हें प्रार्थना समाजाचें विशिष्टत्व आहे. वरील व्याख्यानांत डा. भांडारकर म्हणतातः—

Though the medieval sadhus taught a purer form of faith, **they did not as a general rule set their face against the popular beliefs and modes of worship** with sufficient firmness and decision. This appears to me to be the principal reason why their mission was not completely successful. Let us therefore while endeavouring to realize their humility and single hearted devotion, attempt to supply this defect.

सारांश, वरील कार्यें नम्रपणें भक्तिभावानें करीत असतांना प्रार्थना समाज ज्या अनुभवसिद्ध गोष्टी मागील अनुभवावरून आपल्या पुढें ठेवण्याचा प्रयत्न करितो त्या (१) वेदांतील ऋचा आम्हास हें सांगत आहेत कीं परमेश्वर परमात्मा ह्या त्याच्या विश्वांत व मनुष्याच्या अंतःकरणांत वसत आहे तेथें त्याची पूजा करावी (२) कर्मकांडांचा ज्या वेळीं पसारा माजला होता व ज्यामुळें धर्माचें शुद्ध स्वरूप लोपलें त्यापासूनही आम्ही असें शिकलें पाहिजे कीं, आध्यात्मिक पूजाअर्चा यांचा त्याग करून चालावयाचें नाहीं. (३) बौद्ध धर्माचा विजय आम्हांला हें शिकवीत आहे कीं धर्म हा पिढीजाद धंदा नाहीं व त्याचप्रमाणें उच्च नितितत्त्वें व त्या तत्त्वांनुसारें वर्तन असल्यावांचून सर्व व्यर्थ आहे; (४) बौद्धधर्माच्या ऱ्हासापासूनही आम्हांस हें शिकावयाचें आहे कीं, नीतीचीं केवळ उच्च तत्त्वें असून भागत नाहीं, नीतीच्या उच्च तत्त्वांच्याद्वारें अंतःकरणाचें समाधान होत नाहीं त्याला त्यापेक्षां उच्च वातावरणामध्यें जावें असें वाटतें. (५) उपनिषदांच्याद्वारें आपल्याला हें शिकावयाचें आहे कीं अंतःकरणाच्या शुद्धीच्याद्वारें त्याचप्रमाणें ध्यानमनन ह्यांच्याद्वारेंच परमेश्वरप्राप्ति शक्य आहे. (६) भगवद्गीता व भक्तिमार्ग आम्हांला सांगत आहे कीं, मनुष्य केवळ आपल्या प्रयत्नानें आपलें तारण करूं शकत नाहीं. परमेश्वर त्याचा पिता, माता, बंधु सुहृत् आहे. त्याला

शरण जाणें, त्याच्या गौरवासाठीं आपण जगणें, त्याला प्रिय अशीं कार्यें करणें, फलाशा सोडून कार्यें करणें व त्याची इच्छा प्रमाण असें केवळ न म्हणतां, त्याची इच्छा तीच आपली इच्छा असें आपल्या वर्तनानें दाखविणें, आपणा स्वतःस त्याच्या चरणीं अर्पण करणें हेंच आपणास उचित आहे. मागील अनुभव आम्हांस हें सर्व शिकवीत आहे तें सर्व लक्षांत ठेवावयाचें व परमेश्वराच्या कृपेनें जें नवेंनवें ज्ञान उपलब्ध होत आहे तेंही संग्रहीत करून, भावपूर्वक निश्चयानें कार्याला लागणें हेंच आपलें कर्तव्य आहे असें प्रार्थना समाजाचे पुढारी मानीत आले आहेत आणि त्यांतच प्रार्थना समाजाचें विशिष्टत्व आहे.

---

## (१) डॉ. आत्माराम पांडुरंग.



जब आया तू जगतमें जग हंसे तू रोय ॥
करनी ऐसा कीजिये तू हंस जग रोय ॥-कबीर.

आपला नेहमींचा अनुभव असा आहे कीं, कुटुंबांत ज्या वेळीं एखाद्या मुलाचा जन्म होतो, त्या वेळीं सर्व कुटुंब आनंदांत असतें. प्रथमच मूल झालेलें असलें तर कोणी साखर वांटतो, कोणी पेढे वांटतो, कोणी वाजंत्री लावितो; सारांश, अशा वेळीं आनंदप्रदर्शनार्थ लहानमोठीं आनंदप्रदर्शक कृत्यें करण्याचा प्रघात सर्वत्र आहे. जें बालक पुढें कदाचित् आपलें ज्ञान, विद्वत्ता, धूर्तता, नम्रता व सद्गुण इत्यादि गुणांनीं सर्व जगास प्रिय होणार, किंवा ज्याचा अंत जन्म झाल्यानंतर लागलाच थोड्या दिवसांनीं व्हावयाचा, किंवा जें पुढें अत्यंत दुर्व्यसनी निपजून आपणास, आपल्या मातापितरांस व आपल्या कुटुंबांतील सर्व लहानमोठ्या माणसांस कमीपणा आणणार, अशा त्या बालकास आपल्या जन्माप्रीत्यर्थ घरांत चाललेला आनंदोत्सव मुळींच कळत नसतो व तें वरील दोहऱ्यांत सांगितल्याप्रमाणें रडत असतें. कालांतरानें, मध्यंतरींच अंत न झाला तर, तें मोठें होऊन प्रौढ वयांत येतें व वर दर्शविल्याप्रमाणें त्याचा आयुष्यक्रम, ज्याप्रमाणें परिस्थिति असेल त्याप्रमाणें राहून, एके दिवशीं त्यास ह्या जगाची यात्रा संपवावी लागते. त्या मृत झालेल्या प्राण्याचा आयुष्यक्रम कितीही वाईट असला, तरी त्याच्या जन्माच्या वेळीं ज्यांनीं आनंदप्रदर्शक कृत्यें केलीं ते जर जीवमान असले तर ते, नसल्यास त्याचे इतर आप्त इष्ट बंधु वगैरे सर्व कुटुंबांतील माणसें त्याच्या वियोगाबद्दल दुःख करीत असतात, रुदन करीत असतात, व कोणी तर सारखा आक्रोश करीत असतात, असा अनुभव आपणांस प्रत्यहीं येत आहे. कमी अधिक प्रमाणानें ही स्थिति आपल्यापुढें वारंवार येत असते. परंतु साधुवर्य कबीर यांनीं वरील दोहऱ्यांत ज्या स्थितीची महती गाइली आहे ती स्थिति ही नव्हे. मनुष्य प्राण्यानें मुद्दाम प्राप्तव्य म्हणून त्यांनीं जी स्थिति सुचविली आहे ती ही कीं, ज्याचा अंत आतां समीप आला आहे तो त्या वेळीं 'हंसत' असला पाहिजे. ही विशेष स्थिति प्राप्त न झाली तर त्याच्या जिण्याचें सार्थक झालें नाहीं असें ते ध्वनित करीत आहेत. ज्यानें समजूं उमजूं लागल्यापासून आपला वर्तनक्रम

अत्यंत शुद्ध असा ठेविला, पापाचरण हें ज्यास कधीं माहित नाहीं, स्वकर्तव्यांत जो अहर्निश दक्ष, परोपकाराकडे ज्याचा सर्व कल, मानापमानाविषयीं जो अगदीं निष्काळजी, ज्याचा स्वभाव अति नम्र, जो धर्मशील, पापभीरू, आपल्या दोषांविषयीं जो नेहमीं सावध असा जो कोणी थोर पुरुष असेल त्याची परलोकगमनास नेहमीं तयारी असावयाची. आपला परलोकीं जाण्याचा काल समीप येत चालला आहे, म्हणून मात्र तो ईशचरणीं लीन असावयाचा असा प्रकार व्हावयाचा नाहीं. दुराचरणभय व सदाचरणप्रीति हीं त्याचे ठायीं इतकीं बिंबून गेलेलीं असावयाचीं कीं, त्याचें नित्याचें आचरण ईश्वरास मिऊनच असावयाचें. अंतकाळीं क्षणिक व्यथेमुळें अशा थोर पुरुषांची शारीरिक स्थिति कोणत्याही रीतीची असली तरी त्यांनीं आपला प्राण ‘ हंसतच ’ सोडला असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. आणि अंतसमयीं, तूं हंसत असला पाहिजेस, व सर्व जग तुझ्या वियोगजन्य दुःखामुळें विपत्तींत असलें पाहिजे, असें जें साधु कबीर यांनीं सुचविलें आहे, त्याचा तरी अर्थ असाच आहे.

वरील प्रकारच्या अत्यंत थोर, सन्माननीय, सात्विक, व शुद्धाचरणी पुरुषांत मोडणारे जे **डा. आत्माराम पाडुरंग** त्यांचें अल्प जीवनचरित्र येथें देत आहों.

**डा. आत्माराम** ह्यात असतां कांहीं वर्तमानपत्रांच्या रिपोर्टरांनीं व कांहीं चरित्रलेखकांनीं त्यांस त्यांच्या चरित्राविषयीं माहिती सांगण्याविषयीं विनंति केली. परंतु अशा तऱ्हेची विनंति करणारांस ते नेहमीं ह्मणत असत कीं, “ माझें चरित्र लिहिण्यासारखें असें मीं काय केलें आहे ? माझ्या हातून विशेष कांहीं झालें आहे असें मला मुळींच वाटत नाहीं. माझें कर्तव्यकर्म मजकडून चांगल्या रीतीनें होत आलें आहे, किंवा होत आहे, अशी साक्ष माझें मन देत नाहीं. मग अशा स्थितींत तुह्मी माझें चरित्र लिहून त्यापासून जगास काय बोध होणार ? ”

अशा रीतीचे उद्गार काढून त्यांनीं आपलें चरित्र, किंवा चरित्रांतील कांहीं भाग प्रसिद्ध करणारांची जिज्ञासा अनेक प्रसंगीं तृप्त केली नाहीं. परंतु त्यांच्या मृत्यूपूर्वीं सुमारें साहा महिने त्यांचें चरित्र जाणण्याविषयीं आह्मीं आपली उत्कटेच्छा प्रगट केली. किती तरी दिवस त्यांनीं आपल्या ठराविक उत्तरानें आमची समजूत करण्याचा प्रयत्न केला. पण आमचा व आमच्या मित्रांचा अत्याग्रह पाहून, त्यांनीं आपल्या चरित्राविषयीं आह्मांस बरीच माहिती दिली. त्यांनीं दिलेल्या माहितीच्य आधारानेंच पुढील चरित्र लिहिलें आहे,

and yet which of our exclusive politicians surpassed Parmanand in sagacity and force of character? He had a firmer grain than Telang, probably a shrewder sense of the fitness of things than Nulkar, and decidedly more tolerance than that veteran, Vishvanath Mandlik.

मामांचा दुसरा गुण म्हणजे त्यांची **चित्ताची शांति.** ही शांति ढळविणाऱ्या परिस्थितीमध्यें ते सतत दहा वर्षें होते. सतत १० वर्षें प्रकृतीचें स्वास्थ्य त्यांस लाभलें नाहीं. "त्यांचें दुखणें अगदीं चमत्कारिक प्रकारचें होतें. पाहणाराला कांहीं हे आजारी आहेत असें दिसूं नये; परंतु हवेमध्यें शीत उष्णादि यत्किंचित फरक झाला कीं, यांच्या प्रकृतीमध्यें ताबडतोब फरक व्हावयाचा. फार उजेड सोसूं नये, थंडी सोसूं नये, उष्णता सोसूं नये, गोंगाट सोसूं नये; त्याचप्रमाणें खाण्यापिण्याच्या बाबतींतही फार उष्ण नको, थंड नको, तिखट नको, आंबट नको, कांहीं वेळसुद्धां सारखें उभें राहतां अगर बसतां येऊं नये."* अशा स्थितींत नेहमीं लेखनव्यवसाय चालू ठेवावयाचा व त्यांतच रोज सकाळ संध्याकाळ बाहेरच्या लोकांचा कांहींना कांहीं कारणासाठीं गराडा पडलेला असावयाचा; अशा प्रतिकूल परिस्थितींत चित्ताची शांति ढळावयास आणखी निराळीं कारणें कशाला पाहिजे होतीं? परंतु मामांची शांति केव्हांही ढळली नाहीं. व्यक्तींसंबंधानें निराशा झाली कीं त्यांचें मन खिन्न व्हावें, विश्वासाचा दुरुपयोग झाला कीं त्यांस खेद व्हावा, परंतु क्रोधाविष्ट होणें, दुरुक्ति तोंडावाटे काढणें; किंवा आपल्या नित्याच्या व्यवहारांवर अशा प्रसंगाचा परिणाम होऊं देणें ही गोष्ट त्यांस माहीत नव्हती.

ही त्यांची शांति त्यांच्या **धर्मनिष्ठेमुळें** त्यांस प्राप्त झालेली होती. धर्माच्या बाबतींत त्यांचें ध्येय जितकें उच्च होतें, तितकेंच तें ध्येय आपलेंसें करण्याचे त्यांचे प्रयत्न श्रेष्ठ व निर्धाराचे होते. ह्याची साक्ष त्यांचें नित्याचें रोजचें आचरण व लहान सहान प्रसंगही देत असत. त्यांच्या अत्युच्च ध्येयाची कल्पना करून देणारा एकच उतारा पहाः—

" Theology and religion, though distinct can be seen harmonized in a person who searches after the

* रा. रा. बा. बा. कोरगांवकरकृत त्रोटक चरित्र.

Infinite Good and illustrates all his knowledge in his actions. With an inverted eye he sees clearly that every single element of his nature is adapted to goodness and virtue; that nothing can be more manly than to have a humble pious soul. His thoughts, word and action are dictates of truth. Truth is all in all to him. He submits to truth not in the hope of any earthly interest but simply because it is the law of his nature. To him such submission therefore is voluntary and not compulsory. To him truth is as palpable as anything can be. He has not to wait, as some say, till death for reward or salvation. His salvation begins here, and grows with his growing hope. He cannot swerve an iota from morality, piety and virtue without self-condemnation. He therefore prefers trying religious life to the craft and cunning of the world, and possesses a calm and humble soul which is all the wealth he pants after, and above all pours out his heart in sincere prayer to Him "from Whom, and through Whom and for Whom are all things." This is practical religion. त्यांचें नित्याचें वर्तन, त्यांचें पवित्र शील, त्यांचे विचार, त्यांचा आचार, त्यांची भक्ति ह्या सर्वांचा विचार करितां वरील ध्येय त्यांनीं आपल्या आचरणांत ततोतंत आणण्याचा प्रयत्न केल्याचें लक्ष्यांत येईल. मामांच्या एकंदर चारित्र्याची किल्ली ह्या लहानशा लेखांत आहे असें म्हटल्यास ती कोणत्याही रीतीनें अतिशयोक्ति होणार नाहीं.

मामांचा आणखी एक असाधारण गुण म्हणजे त्यांचा **विनय.** हा त्यांचा गुण अतिकोटीपर्यंत गेला होता. लहान मोठ्यांशीं त्यांचें वर्तन विनयाचें होतें; परंतु सर्वच बाबतींत हा विनय अतिकोटीला गेल्यामुळें एका बाबतींत तरी पुढील पिढ्यांची मोठी हानि झालेली आहे. मामा वक्ते नव्हते, त्यांनीं कोठें भाषणें केलीं नाहींत,

भाषणें करण्याचे प्रसंग त्यांनीं टाळले आहेत. अगदीं तरुणपणीं Students' Literary and Scientific Society पुढें त्यांनीं पुष्कळ निबंध वाचल्याचा उल्लेख आढळतो. पण तेही निबंध, म्हणजे प्रथम सर्व लिहून. सारांश त्यांनीं जी देशसेवा केली ती सर्व लेखांच्या द्वारें. हे सर्व लेख वर्तमानपत्रांच्या दुर्मिळ फायलींत आहेत व ते मामांचे असे, मिळाले तरी, ओळखावयास अंतःपुराव्यावांचून दुसरें साधन नाहीं! त्यांनीं पुष्कळ लेख लिहिले. पण, आपलें नांव केव्हांही पुढें येऊं दिलें नाहीं त्यामुळें आज त्यांच्या लहानमोठ्या लेखांचा संग्रह करण्याचें कोणीं मनांत आणिलें तरी तें त्यास शक्य नाहीं. कित्येक चळवळींच्या रूपरेषा मामांनीं रेखिल्या; कित्येक विषयांची स्फूर्ति मामांनीं दिली; कित्येक चळवळी मामामुळें झाल्या, पण कोठेंही मामांच्या नांवाचा दाखला नाहीं. त्या वेळचे म्युनिसिपल कमीशनर क्राफर्डसाहेब यांचा सर्व कारभार चव्हाट्यावर आल्याबद्दल आज सर्वांस बरें वाटत आहे. पण क्राफर्ड विरुद्ध चळवळ मामांनीं सुरू केली, त्यांचें खरें स्वरूप त्यांनीं पुढें आणिलें, हें आज कितीकांस माहीत आहे ?* नेहमीं अशाप्रकारें मागें राहण्यांत त्यांचा एकच हेतु दिसतो. प्रसिद्धपणें कोणत्याही चळवळीचा पुढाकार घेतला कीं मानापमानाचें गोवें मागें लागावयाचें, आणि तसें झाल्यास आपलें स्वत्वच हरण होण्याचा संभव आहे.

कोणतीही गोष्ट **अगदीं पद्धतशीर करावयाची** हा त्यांचा गुण आज फार क्वचितच आढळतो. महत्त्वाच्या विषयावरील वर्तमानपत्रांतील लेख असो, किंवा सार्वजनिक चळवळीची रूपरेषा असो, अगर कोणाही अधिकाऱ्याविरुद्ध तक्रार असो, मामांनीं हातीं घेतलेलें कार्य पूर्ण पद्धतशीरपणें व्हावयाचें. एक लहानसें उदाहरण येथें देतों. नेटिव्ह ओपिनिअन पत्राचे संपादक असतांना, सरकारी शाळेंतील सातव्या इयत्तेतील एका मुलानें त्यांच्यापाशीं तक्रार केली कीं, आपले प्रिन्सिपाल साहेब शाळेंत वेळेवर येत नाहींत, कधीं तर मुळींच येत नाहींत, आणि आले तरी नियमानें वेळापत्रकाप्रमाणें वर्गांतील धडे शिकवीतही नाहींत ! मामांनीं त्या मुलाला कांहीं दिवस प्रिन्सिपालसाहेब कसे कसे शाळेंत हजर राहतात, वर्ग केव्हां घेत नाहींत, केव्हां गैरहजर राहतात, तें लिहून ठेवण्यास सांगितलें. ती माहिती

* He was the person mainly instrumental in bringing Mr. Crawford to book by legitimate means when he was Municipal Commissioner. Yet so little did he make of it that it is hardly known except to a few.—Subodha, Patrika 1893.

मिळाल्यावर त्यांनीं नेटिव्ह ओपिनिअन पत्रामध्यें ह्याविरुद्ध टीका केली; मग तें प्रकरण पेटलें! विद्याखात्याचे प्रमुख सर अलेक्झांडर ग्रँट ह्यांचा मामांवर मोठा घुस्सा झाला, त्यांनीं त्यांना आपली टीका परत घेण्याचा आग्रह केला. परंतु मामांनीं जें लिहिलें होतें त्यांतील एक शब्द परत घेतला नाहीं. ह्या लहानशा उदाहरणावरून सत्यप्रतिपादनानंतर कांहीं झालें तरी सत्यासच चिकटून रहावयाचें हा त्यांचा गुण पूर्वीपासून त्यांच्यांत कसा दृढमूल करून राहिला होता त्याची साक्ष पटते.

त्यांची साधुवृत्ति † अल्प परिचयानें कोणाच्याही लक्षांत येत असे. संसारामध्यें राहून, सर्व प्रकारचे व्यवहार करावयाचे त्याप्रकारें करून, त्यांचा रंग आपल्यावर चढूं न देतां, परहित साधून, अंहतेची छाया न पडूं देतां सुशिक्षित

---

† तेलंगाच्या पुण्यतिथीनिमित्त व्याख्यान देतांना न्या. मू. रानडे ह्यांनीं पुढील उद्गार काढिले.

We miss our Political Rishi, Mr. N. M. Parmanand, confined to his bed for ten years and more of one continuous suffering, and yet a friend from whom we never heard a word of complaint or of sorrow. In matters of religious, social or political elevation a purer life and a purer soul never lived with us and never worked with us till the last breath left him.

सर नारायण चंदावरकरांना अनेक महत्त्वाच्या विषयांवर व्याख्यान देतांना मामांची आठवण पडत असे. एकदां भागवत धर्माचें अर्वाचीन स्वरूप अशा विषयावर व्याख्यान देतांना ते म्हणाले:—

‘ तेलंगांचा पक्ष ’ ह्या विषयावर आपलें सुंदर व्याख्यान देतेवेळीं ज्यांना न्या. मू. रानडे ह्यानीं Political Rishi अस म्हटलें आहे त्या नारायण महादेव परमानंदांपुढें हेंच राष्ट्रीय ध्येय होतें. आमच्या पुढाऱ्यांत मामा परमानंद हेच एक खरेखुरे ऋषि होते, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. मामा फार गोड व उदार स्वभावाचे गृहस्थ होते, आणि शांतपणें, विशेष गाजावाजा न करितां, ईश्वरावर सर्व भार टाकून, ते आपल्या देशाच्या उद्धारासाठीं देवाचें कार्य सतत करीत होते. आणि आपले भांडारकर, रानडे, तेलंग, नूलकर हे सर्व त्यांस मार्गदर्शक समजून, सर्व प्रसंगीं त्यांच्या सल्ल्यानें, त्यांच्या विचारानें वागत व त्यांच्या उपदेशांस योग्य महत्त्व देत. ते एक आदर्शवत् गृहस्थ होते. त्यांची एकदां ओळख झाली

नुष्यास राहणें कसें शक्य आहे हें त्यांनीं दाखविलें. त्यांच्या मनाचा कोमल-
णा त्यांच्या सत्यनिष्ठेच्या आड आला नाहीं. त्यांच्या क्षमाशील वृत्तीनें त्यांस
र्तव्यपराङ्मुख केलें नाहीं. त्यांच्या हातून होणाऱ्या परोपकारानें त्यांस अधि-
ाधिक विनत केलें. लोकांचा देवावरील गैरविश्वास व स्वैरवृत्ति पाहून ह्यांचा
वेश्वास दृढावला. लोकांचा दुराचार, धनाची तृष्णा, धर्माविषयीं औदासिन्य,
र्तव्यपराङ्मुखता, स्वतःचे कष्ट, कौटुंबिक चिंता, अनेक प्रसंग अनुभवून ह्या
ंसाराला ते कंटाळले नाहींत. कारण जागृत मनुष्याचें त्यांनीं प्रतिपादिलेलें जें ध्येय

"But though setting a low value on worldly enjoyments........a man may believe the world to be a proper school of discipline and far from wishing to

---

कीं त्यांच्याविषयीं मनांत प्रेम व आदर उदित व्हावयाचीं, व त्यांचा व आपला
रिचय झाला म्हणून आपणास फार धन्यता वाटावी, इतक्या थोर योग्यतेचे
ृहस्थ मामा परमानंद होते.

एकदां 'जाणोनि नेणतें करीं माझें मन' ह्या विषयावर उपदेश करीत अस-
तांना विवेचनाच्या ओघांत सर सारायण ह्यांस मामांची आठवण झाली. तेव्हां
ते म्हणाले:—ह्या वेळीं मला मामा परमानंदांची आठवण होते. ते आधुनिक
काळचे साधुच होते. त्यांची वृत्ति नेहमीं शांत व सौम्य असून दुसऱ्याचे अपकार
ते नेहमीं विसरून जात व त्यांना क्षमा करीत. त्यांची अशी श्रद्धा होती कीं, शेवटीं
मनुष्यांमधील तमोगुणाचा नाश होऊन सत्त्वगुण हा उदित होणारच. जे कोणी
तरुण त्यांची सल्लामसलत घ्यावयास जात त्यांना ते नेहमीं उत्तेजनच देत. कदा-
चित् कोणी असें म्हणतील कीं मामांसारखीं माणसें दुबळीं होत. मी म्हणतों तसें
नाहीं. जी माणसें करारी असतात तींच सौम्य वृत्तीचीं असतात. मामांची वृत्ति
किती तरी करारी असे. त्यांच्या लेखांमध्यें किती तरी तेज, बाणेदारपणा व
सामर्थ्य असे. त्या वेळीं ते नेटिव्ह ओपिनिअन पत्राचे संपादक होते. त्यांचे
स्फुटलेख जोरदार, जसे हवेत तसे, थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ आणून देणारे
व निर्भीड असत. एखादा खोडसाळ, वेडगळ, किंवा भागूबाईपणाचा लेख कोठें
प्रसिद्ध झाल्यास त्यावर ते तुटून पडत. त्यांच्यामध्यें इतकें सामर्थ्य होतें तथापि
ते बोलत किंवा करीत त्यामध्यें स्वाभाविकच थोरपणा, सभ्यता, प्रेम व
मार्दव असे.

renounce it, choose to live in it, and then attempt to realize a life of holiness in the midst of sin, of joy and peace, in the midst of sorrow and trouble, of contemplation or divine communion in the midst of wordliness and mamon-worship and thus to qualify himself for a higher life."

तें त्यांनीं आपल्यापुढें ठेविल्याचें दिसून येतें.

एका गोष्टीसंबंधानें मात्र त्यांची बरीच निराशा झालेली होती व ती त्यांच्याशीं होणाऱ्या संभाषणांत त्यांच्या भेटीस येणाऱ्यांच्या वारंवार लक्षांत येत असे. आपल्या देशांतील नवशिक्षित तरुणांनीं त्यांची निराशा केली होती. त्यांची अशी अपेक्षा होती कीं, उच्च शिक्षणाचा लाभ झालेले तरुण देशाच्या सर्वांगीण उन्नतीसाठीं झटतील व हें ध्येय पुढें ठेऊन देशाची सेवा निरपेक्ष बुद्धीनें करावयास प्रवृत्त होतील. परंतु ही त्यांची आशा सफळ झाली नाहीं; सुशिक्षित तरुणांनीं* स्वार्थत्यागपूर्वक पुढाकार घेऊन लोकशिक्षणाचा प्रश्न हातीं घ्यावा व सरकारच्या व मिशनरींच्या प्रयत्नांवर अवलंबून राहूं नये असा त्यांचा कटाक्ष होता. शाळांतून व शिक्षणालयांतून मिळणारें शिक्षण जर दोषपूर्ण आहे तर असें वाटणाऱ्या लोकांनीं पुढें येऊन लोकशिक्षणास आपल्यास वाहून घेतलें पाहिजे. परंतु ज्या वेळीं हा विचार

---

* Amidst all the vaunted progress of higher education there were very few honest fresh recruits in the band of progress. On the contrary a strong current of reactionary had set in and those distinctions of caste and creed which so divided India and incapacitated it for organized action in any movement and which the tide of education had been expected to sweep off before it, had again come into strong favour.

In political matters while sympathising with the legitimate aspirations of his countrymen and endeavouring by his pen to urge their claims, he strongly held that moral, social and religious improvement alone could fit them to a higher political life.

—*Subodha Patrika.*

त्यांच्या मनांत विशेष प्रामुख्यानें होता, त्या वेळीं शिक्षणास वाहलेली तरुण माणसें निदान मुंबईत तरी पुढें आलेलीं नव्हतीं व सर्वांगीण उन्नतीसाठीं झटणारीं माणसें पुढें न आल्यामुळें त्यांची निराशा वाढली तर त्यांत कांहीं नवल नाहीं. शिक्षणामुळें तरुणांचीं मनें उदार होतील, विचारांत व आचारांत औदार्य दिसून येईल; वृथा जात्यभिमान ओसरेल, अनिष्ट रूढींविषयीं तिटकारा उत्पन्न होईल; धर्मांतील विचारास न पटणारा भाग सुटेल असें त्यांस वाटत होतें. तें सर्व अनुभवानें खरें ठरावयाच्या ऐवजीं एककलीपणा अधिक वाढत होता व जो तो राजकीय† चळवळीकडे धांव ठोकीत होता! आणि बाकीच्या चळवळींकडे एक तर काना डोळा, किंवा त्याहीपेक्षां अधिक वाईट गोष्ट जी कीं, जुन्या रूढी, घातक चाली, त्यांस पाठबळ देण्याची प्रवृत्ति वाढत आहे हें पाहून त्यांस खेद होत असे. तथापि ते हताश झाले नाहींत व अखेरपर्यंत त्यांनीं आपल्या प्रयत्नांत कमतरता होऊं दिली नाहीं.

## प्रार्थनासमाजाची सेवा.

मामा परमानंदांचीं दहा वर्षें आजारीपणांत गेलीं. १७-१८ वर्षें त्यांनीं सरकारची नोकरी केली. वर्तमानपत्रांचे संपादक, शिक्षक व कच्छ येथील नोकरी यांत सात आठ वर्षें गेलीं, तरीसुद्धां सतत २५ वर्षें तरी मामांनीं प्रार्थनासमाजाची सेवा केली असें म्हणतां येतें. त्यांनीं प्रार्थनामंदिरांतील वेदीवरून ईश्वरोपासना चालविल्याचें कधीं आमच्या ऐकिवांत नाहीं. त्याचप्रमाणें परमहंस सभेचे सभासद ते केव्हांही असण्याचा संभव नाहीं. कारण, त्यांचें शिक्षण ज्या वेळीं पूर्ण झालें, त्या वेळीं परमहंससभा अस्तित्वांत नव्हती. तथापि ज्या पंधरा सोळा गृहस्थांनीं प्रार्थनासमाजाची स्थापना केली, त्यांत नारायण महादेव परमानंद होते. कच्छ येथें ते सारे दोनच वर्षें जरी राहिले, तरी तेवढ्या अवधींत कच्छच्या अधिपतींनीं त्यांची थोर योग्यता जाणिली होती व त्यांचें महाराजांवर चांगलें वजन होतें. याचा साक्ष ज्या वेळीं प्रार्थनामंदिर बांधण्याचा प्रश्न पुढें आला, त्या वेळीं

---

† Of late, he began to be puzzled and biwildered at the one-sided activity of his countrymen and he deplored their want of courage to recognise and eradicate the inherent defects of society.

—*Malbari.*

कामास सुरुवात व्हावयाच्या पूर्वीच महाराजांनीं दिलेली एक हजार रुपयांची उदार देणगी, व त्यांत पुढें ७५० रुपयांची घातलेली भर ह्या दोन देणग्या पटवीत आहेत. प्रार्थनामंदिरफंडाचे मामा खजीनदार होते, व मंदिराचा फंड जमविण्याच्या कामीं त्यांनीं फार मेहनत घेतली. ज्या पांचसात मंडळीच्या विशेष खटपटीमुळें पहिलें भव्य मंदिर उभारलें गेलें त्यांत मामा हे प्रमुख होते व त्यांच्या मेहनतीचीं फळें पुढल्या पिढींना मिळालीं. ही मामांची समाजासंबंधाची मोठी कामगिरी. दुसरी गोष्ट मामा हे मोठे विचारी, दूरदर्शी, योजक व कर्तृत्ववान म्हणून प्रसिद्ध होते. प्रार्थनासमाजाच्या धर्मतत्त्वांच्या पुनर्घटनेचा प्रश्न जेव्हां पुढें आला त्या वेळीं डा. भांडारकरांना मामांच्या विचारांचें साहाय्य झालें होतें. "आज आपल्या समाजाचीं जीं साहा तत्त्वें आहेत तीं मुळापासून नव्हतीं. आजचीं तत्त्वें जुळविणें, व त्यांच्यासंबंधानें योग्य ती शब्दरचना करणें, त्यांस व्यवस्थित स्वरूप देणें हें सर्व काम आपणच केलें आहे असें मीं ऐकिलें आहे," ह्या सुबोधपत्रिकेच्या संपादकाच्या **लेखीं** प्रश्नास डा. भांडारकरांनीं **लेखीं** उत्तर देतांना असें जें म्हटलें आहे कीं "होय. खरें, परंतु समाजांतील मुख्य साहा सात व्यक्ति मिळून विचार करीत असों, त्यांस ती रचना पसंत झाली, म्हणजेच तिला नियत स्वरूप प्राप्त होत असे" तें ह्याच अर्थानें. मामांच्या विचारावांचून समाजाचें कोणतेंही महत्त्वाचें काम होत नसे इतकी त्यांची योग्यता सर्वजण जाणून होते. ते उपदेशक नव्हते, वक्ते नव्हते, आणि भाषकही नव्हते, पण उत्तम लेखक होते. लांबलचक उपदेश अगर भाषण ह्यांच्या द्वारें न होणारें कार्य ते एका लहानशा लेखाच्या द्वारें उत्तम रीतीनें करीत असत. इतकें त्यांच्या विचारांत व त्यांच्या लेखणींत सामर्थ्य होतें. १८७३ सालीं सुबोधपत्रिका पत्र सुरू झालें, तेव्हांपासून पत्रिकेसाठीं लेख लिहिण्याचा त्यांचा व्यवसाय सुरू झाला कीं काय हें आम्हांस सांगतां येत नाहीं. कारण, मामा इंग्रजी लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत. तथापि पुढें चार वर्षांनीं सुबोध पत्रिकेसंबंधाची मामांची सेवा सुरू झाली. गुजराथी सुबोधपत्रिका लवकरच बंद झाली. १८७७ सालीं सुबोधपत्रिका पत्र इंग्रजी व मराठी भाषांमध्यें प्रसिद्ध करण्याचा विचार झाला व त्याप्रमाणें दोन भाषांतील पहिला अंक ता. २ डिसेंबर १८७७ रोजीं प्रसिद्ध करण्यांत आला. इंग्रजी बाजूचें संपादकत्व साहजिकपणें मामांकडे आलें; हें पहिल्याच अंकांत स्वतःसंबंधानें जो स्फुट लेख आला आहे त्यावरूनही स्पष्ट होत आहे. तो लेख असा आहेः—

**Ourselves**—We are so small that we have hardly the space or the right to say anything about ourselves. But it becomes necessary to-day to say a word. The **Subodha Patrika** has no other object in being than to make itself useful, and we are thankful to admit that the public has to some extent at least approved of our utility. This encourages us to try to make ourselves more useful, if that is within our power. We shall therefore make the experiment of speaking a few words in English in some of our issues. Our first page hence presents a new appearance to-day. We do this however merely *as an experiment*, and may give it up if we find it fails to answer our object. This object is some what different from what newspapers ordinarily have. Neither our training, nor our ambition points to Political eminence. That we leave to our abler and more popular contemporaries. There are so many grave shortcomings in the Society to which we belong, so many moral drawbacks to the progress of our youngmen, such utter indifference to religion, and the highest interest of man among them, that we shall best satisfy our own feelings if we assign to ourselves the humble duty of being serviceable in this new sphere. Nor is this all. There is so much positive work to be done in gleaning the truth of opinion and action scattered over the wide field of thought at the present moment, so many lessons to be drawn from the events that happen around us every day, that an honest inquirer may in confining himself to this task find sufficient

edification for himself and his neighbours. We shall try to avoid as much as possible all debate. But when we cannot avoid it, we shall try to discuss principles and not personalities. The unfortunate subject of racefeeling we mean to discard carefully from our columns but when occasion requires we shall not be afraid to speak the truth without fear or favour. The *Subodha-Patrika* represents a religious body, and as religion means a spirit and not a school, we trust and pray that our utterances on all matters that we may have to take up in these columns will be pervaded by the spirit of truth, righteousness, and charity. We enter into our new labours in expectation of increased public sympathy and support.

अशी प्रस्तावना करून १८७७ सालीं मामांनीं पत्रिकेंतील लेखांच्या द्वारें जी समाजाची सेवा सुरू केली ती बहुतेक त्यांच्या अंतापर्यंत म्हटलें तरी चालेल त्यांनीं चालू ठेविली.* सुबोधपत्रिकेसाठीं ते लहान लहान लेखच लिहीत. परंतु त्यांत विचार

---

* The present paper ( Subodha Patrika ) which is primarily meant for an organ of social and religious reform owes not a little to him. In spite of pressure of official and other work he took trouble to see that it was well conducted by largely contributing to its columns himself amidst all difficulties, when every body else failed. During the ten years he was confined to bed it was only when he was prostrated by his illness so that he could neither write nor dictate that no contribution of his appeared in this paper. At all other times he was a very liberal contributor and on many occasions by far the largest.

His contributions to this paper were always pithy and to the point and the outcome of an accurate and wide knowledge of facts and the desire to speak the truth and nothing but the truth.

—*In memorium article*.

व अर्थगांभिर्य ओतप्रत भरलेलें असे. मामांचें ब्राह्मसमाजाकडे विशेष लक्ष असे. ब्राह्मसमाजाच्या चळवळीचा त्यांनीं फार आस्थेनें व आदरानें अभ्यास केला होता. ब्राह्म पुढारी वारंवार त्यांच्या येथें पाहुणे म्हणून येत व त्यांच्या येथें त्यांचा योग्यप्रकारें आदरसत्कार होऊन विचारविनिमय होत असे. १८७७ मध्यें बाबू प्रतापचंद्र मुंबईमध्यें येऊन ६ महिने राहून गेले होते. त्या वेळीं त्यांनीं ब्राह्मधर्म, ब्राह्म ध्येयें, ब्राह्मजीवन, ध्येयासाठीं स्वार्थत्याग, ह्यांविषयीं पुष्कळ महत्त्वाचीं भाषणें केलीं होतीं. मुसलमान बंधुभगिनींच्या समाजामध्येंही त्यांनीं ब्राह्मधर्माचा संदेश पोंचविला होता. ह्यासंबंधानें पत्रिकेच्या इंग्रजी बाजूकडे अनेक प्रकारचा मजकूर वारंवार येत होता. हा ब्राह्मधर्माशीं जडलेला संबंध अगदीं ताजा असतांनाच केशवचंद्रसेनांच्या मुलीचा विवाह कुचबिहारच्या अल्पवयस्क महाराजाशीं होणार अशी बातमी प्रसिद्ध झाली व त्या विवाहाविरुद्ध मोठी चळवळ सुरू झाली. त्या वेळीं सुबोध पत्रिकेच्या इंग्रजी बाजूनें ( म्हणजे मामांनीं ) आपलें विचारस्वातंत्र्य उत्तम रीतीनें प्रकट केलें. सर्वत्र होत असलेली विरुद्ध चळवळ पाहून Hindu Patriot नें केशव बाबूंची बाजू उचलून धरितांना असेंही म्हणावयास बाकी ठेविलें नाहीं कीं, खरें पहातां ही केशवचंद्रांच्या कुटुंबांतील खासगी * बाब आहे, तिला सार्वजनिक करून ब्राह्मसमाजाच्या पुढाऱ्यांसंबंधानें गैरसमज पसरविणें हें अगदीं गैर आहे. ही वकिली पाहून मामांनीं पुढील उत्तर दिलें:—We are humbly of opinion that though the marriage of one's child is a man's private affair, the position and attitude of Kashav Babu in regard to the Brahma Samaj do justify the members of that body in feeling an interest in the present case and in expressing the ground of their disapproval of it and of their apprehension as to its results. आणि अखेरीस जेव्हां कुचबिहार येथें ऐन लग्नाच्या वेळीं पुष्कळ जुने प्रकार झाले, होम झाला त्या वेळीं केशवबाबूंना अत्यंत खेद झाला वगैरे सारवासारवी इंडिअन मिररनें जेव्हां चालविली तेव्हां पत्रिकेनें काय म्हटलें पहाः—

*"...It would be simply impertinent on the part of those who respect him and value his character to drag him before the bar of public opinion for an act which is wholly private and of which he is the best judge."

"The Mirror says Babu Keshav was distressed to see in the wedding hall symbols of idol-worship, and thought of breaking up the match. *We wish he had done so,* while yet, though late, it was not impossible to retrace his steps, alike in the interests of the movement he leads and for the future welbeing of his child. Our brother...finds a ray of consolation in that the principal Brahma rites were preserved in tact. But we confess that is at best a poor consolation in the case of one who holds before him a high ideal."

ह्यावरून "केवळ आपल्यासारख्या विचारांच्या मनुष्यांसह एकत्र मिळून निराकार, निर्विकल्प, अत्यंत शुद्ध, मंगल, परम कृपाळु परमेश्वराची उपासना करून लीनभावानें आध्यात्मिक बलाविषयीं त्याची प्रार्थना करावी इतकाच तूर्त आपला अधिकार आहे" असें वाटणारांपैकीं मामा नव्हते हें यावरून उघड होत आहे. पण खरें पहातां, मामा ह्याच्या पुष्कळ पलीकडे गेले होते. ब्राम्हधर्माचें व ब्राह्मसमाजाचें जें उच्च ध्येय, ज्याचा त्याग केल्याबद्दल केशवचंद्र सेनांसही त्यांनीं दूषण दिलें आहे, तें ध्येय त्यांनीं आपल्यापुढें ठेविलें होतें व 'एकएका साह्य करूं अवघे धरूं सुपंथ' ह्या भावनेनें पुढें जाण्याचा त्यांचा निश्चय झालेला होता. हें आम्ही केवळ कल्पनेनें अगर वर्तमानपत्रांतील त्यांच्या लेखांचें धोरण लक्ष्यांत घेऊन लिहीत आहों असें कोणी समजूं नये. आमच्या वरील विधानाला सबळ पुरावा आहे. १८७४ सालांतील ती गोष्ट. प्रार्थनामंदिराच्या उभारणीसाठीं बरेंचसें द्रव्य जमवून मंदिराचें काम आतां पुरें होत आलें असें मामांनीं पाहिलें, व ते पुढील उद्योगास लागले. प्रार्थनासमाजाची स्थापना करितांना 'सर्व संसारांतील धर्मसंबंधीं कृत्यें ( प्रतिमापूजनत्याग ) ह्या मतास अनुसरून व्हावीं' हा उद्देश आपण मनांत योजिला; तत्त्वांची पुनर्घटना जरी झाली, तरी सहा मूलतत्त्वांनीं बोधित जो धर्म त्यास अनुसरून सर्व कृत्यें घडावीं हा कटाक्ष कायम असून त्याप्रमाणें जर वागणूक होत नाहीं, तर आतां मंदिर उभारल्यावर म्हणजे समाजाला स्थायिकपणा आल्यावरही पूर्वीप्रमाणेंच चालणें इष्ट नव्हे असें वाटून, पाऊल टाकण्याचा व 'अवघे धरूं सुपंथ' ह्याचा अनुभव पहाण्याचा निश्चय करून त्यांनीं

एक पत्र तयार केलें व आपल्या सहीबरोबर एका समविचारी बंधूची सही घेऊन त्यांनीं हें पत्र कित्येक सभासदांकडे पाठविलें. पुढें दिलेल्या पत्रावरून ह्या बाबतींत मामांच्या विचारांची ठेवण कशी होती त्याची साक्ष कोणासही पटल्यावांचून राहणार नाहीं:—

The Samaj Mandir is now nearly ready and will be inaugurated towards the end of this month. We shall thus soon have our own independent Church and therefore it is incumbent on members of the Samaj to avow their complete allegiance to its principles, or in other words, practically to give up all connection with idolatry and objectionable ceremonial of every kind. To effect this religious change must involve, however indirectly, the social consequence of loss of caste and the only way for the members to protect themselves for the inconveniences of this result is to form themselves into a community of their own and bring about social intercourse and intermarriage among themselves. Do you, therefore, consider this matter and let us know at your earliest convenience, whether you are prepared for the step, and if not, how far you intend to carry out the tenets of the Samaj into actual practice. Of course no usage or custom is to be discarded that is not opposed to the spirit of our faith and we shall retain our Hindu Nationality. We are prepared to consider the question seriously with a view to action if we can secure half a dozen families. हें मामांचें ध्येय होतें व त्या वेळचा उत्साह, त्या वेळची उमेद व आशा ह्यांचें हें द्योतक आहे (It breathes the ardour of the times and the hopes then entertained of the growth of a new Church and of a new

religious community). असें हें पत्र प्रसिद्ध करितांना सुबोधपत्रिकेनें म्हटलें आहे. ह्या पत्राचा कांहींच परिणाम झाला नाहीं, तें लिहिणारांस कोठूनही उत्तेजन मिळालें नाहीं, व मामांचें ध्येय मामांपाशीं राहिलें असेंच आज म्हणावें लागत आहे.

'नये मागें पाहों वाट फिरोनिया । दुसरा सांगिया साहाकारी ॥
आपुलिया बळें घालावी हे कास । न येणेंचि आस आणिकांची ॥

हें तत्त्व आचरणांत त्या वेळीं आणिलें गेलें नाहीं याबद्दल आज खेद प्रदर्शित करण्यावांचून गत्यंतर नाहीं. मामांना त्या वेळीं उत्तेजन न मिळतां उलटच प्रकार झाला असला पाहिजे; कारण एकीकडे त्यांचें वरील पत्रांतील ध्येय; दुसरीकडे आपला अधिकार तूर्त उपासना करण्याचा व प्रार्थनासमाजाचे जे कोणी सभासद "सर्व बाह्य आचार व्यवहार विवाहादिक सर्व संस्कार वगैरे एकंदर संस्था नवीन पद्धतीनें एकदम सुरू करावी, लोकमतांत फेरफार होण्याची वाट पाहात न बसतां आपण त्यांपासून निराळें व्हावें, अन्नव्यवहारादि नित्य जातिभेदाचे चालू निर्बंध बाळगल्यावांचून करावीं व जातिभेदसूचक जीं यज्ञोपवीतादि बाह्य चिन्हें त्यांचा त्याग करावा" असें म्हणतात ते ब्राह्म असें म्हणून त्यांचेपासून आपल्याला निराळे करण्याचा प्रयत्न; असा प्रकार झाल्यामुळें, त्रासाचा, लोकच्छल सहन करावा लागणारा, अडचणींत नेऊन टाकणारा मार्ग सोडून, लोकमतांत फेरफार होण्याची वाट पहात बसलों त्याचा परिणाम असा झालेला क्वचित दिसतो कीं वधु व वरपक्ष दोन्ही समाजापैकीं असूनही राजरोसपणें जुने विधि होतात!

असो. खेदाची गोष्ट इतकीच कीं, 'दुसरा संगिया साहाकारी' यांची अपेक्षा केल्यामुळें मामांना आपल्या ध्येयानुसार वागतां आलें नसावें. परंतु १८७४ सालीं जरी त्यांच्या विचारांची अशी स्थिति होती व तेवढयापुरती वरील टीका सरळ आहे असें जरी म्हणतां आलें, तरी ह्या बाबतींत असला हिशेबी प्रकार बरोबर नाहीं, हें अनुभवानेंच त्यांस कळून आलें हें येथें नमूद करणें अगत्याचें आहे. दुसरीं कुटुंबें आपल्याबरोबर आल्यावांचून जें आपल्याला सत्य वाटत आहे, तें आचरावयाचें नाहीं, असा हट्ट धरणें म्हणजे आपला स्वतःचा दुबळेपणा झांकण्याचा प्रयत्न करणें होय. ही एक प्रकारची आत्मवंचनाच. आणि १८८१ सालीं सुबोधपत्रिकेचे संपादक ह्या नात्यानें मामांकडे आलेल्या एका सभासदाच्या पत्रांत जेव्हां त्यांनीं असें म्हटलेलें पाहिलें कीं, "हल्लीं प्रार्थनासमा-

ज्याचे कित्येक सभासद आपापल्या कुटुंबांतील मुलांचे व्रतबंध प्रतिमापूजनयुक्त विधि गाळून करण्याच्या विचारांत आहेत. मात्र पन्नास कुटुंबें तरी एकत्र होऊन अशा प्रकारें वागणारांस पाठिंबा देऊन एक स्वतंत्र पंथच बनवावयास तयार झाली पाहिजेत." त्यावेळीं त्यांनीं आपलें स्पष्ट मत देऊन टाकलें. खरें पहातां न करत्याचा वार शनिवार ह्या म्हणीप्रमाणेंच हा प्रकार म्हणायाचा. कारण पूर्वी साहा कुटुंबांची अट होती ती आतां पन्नास कुटुंबांची झाली! मुंबई शहरांत त्यावेळीं पन्नास सभासदांचीं कुटुंबें तरी होतीं किंवा नाहीं याची शंका आहे. असो. मागचा अनुभव लक्षांत ठेवून मामा म्हणतातः—

We think the time has arrived when *we should give up the old fashioned notion of making practical reform conditional on certain people joining the former*. It simply gives rise to *self-deception* and a man convinces himself that he is ready to inaugurate such and such practical reform; but that *other people are cowards* and will *not join* him. If a man thinks reform necessary in a certain quarter and is willing to stand by the consequences if it is introduced he should proceed to do so at once; if not willing the less he speaks of it and makes it depend upon others the better for every body. Other people will join him in the course of time if his own conscience is keen enough to bring him out at once. There are people among us who are either afraid of excommunication or think that excommunication or the formation of a distinct community we should not seek because our reform this way will not influence and permeate the great mass of Hindu Society and we shall be simply adding to the incalculable number of existing castes. Such people should make it their duty to introduce such reforms in their families or

within their private circle as will not bring direct excommunication though they may shock the orthodox community and should make a gradual advance until they attain to their ideal. But making every thing depend upon others and remaining perfectly inactive himself are dangerous."

ही स्पष्टोक्ति ता. १० एप्रिल १८८१ च्या सुबोधपत्रिकेच्या अंकांत प्रसिद्ध झाली आहे. वरील विचारांचें सार इतकेंच आहे कीं, "आपल्याप्रमाणें आचार करावयास दुसरे तयार झाल्यावर मग आपण प्रत्यक्ष कृति करून दाखवावयाची ही आत्मवंचना आहे. जें कांहीं आपल्याला योग्य वाटतें तें आपल्याबरोबर कोणी येत आहे किंवा नाहीं याची वाट न पहातां करून दाखविण्याचा काळ आतां आलेला आहे. नाहीं तर असें होतें कीं, लोक भित्रे, त्यांच्यांत बोलण्याप्रमाणें कृति करण्याचें धैर्य नाहीं, आपली मात्र तयारी आहे, अशी आपण आपली खोटी समजूत करून घेऊन विनाकारण दुसऱ्यांवर रोष लादतों. ज्या कोणाला एखादी विशिष्ट सुधारणा अवश्य वाटत असेल व ती करून दाखविल्यावर होणाऱ्या छलास पाठ देण्याची त्याची तयारी असली, त्यानें ती तावडतोब कृतींत आणावी, इतकी तयारी नसली, तर सुधारणा आचारांत आणण्यासंबंधानें व इतरांनीं आपल्याला येऊन मिळावें अशाविषयीं तो जितकी कमी वाचाळता करील तितकें सर्वांस बरें ! आतां आपल्यामध्यें असे कित्येक लोक आहेत कीं ज्यांना बहिष्काराची मोठी भीति वाटते व त्यांचें असें म्हणणें आहे कीं, जातिबहिष्काराची आपत्ति आपण आपल्यावर मुद्दाम ओढवून घेऊं नये, किंवा निराळी स्वतंत्र जात करण्याच्या आपण भानगडींत पडूं नये. कारण, अशा रीतीनें जर आपण वागूं लागलों तर आपल्या आचरणाचा एकंदर हिंदु जनतेवर कांहीं परिणाम व्हावयाचा नाहीं व आज ज्या असंख्य जाती आहेत त्यांत मात्र एक नव्या जातीची आपण भर घालूं. आतां ज्यांचें असें मत आहे त्यांनीं इष्ट वाटत असलेल्या सुधारणा आपापल्या कुटुंबांत, व आपल्या विशेष परिचयाच्या मंडळींत प्रथम सुरू करण्यास लागावें. असें केल्यानेंही अगदीं जुन्या मंडळीचा रोष होईल, पण जातिबहिष्कार त्यायोगें व्हावयाचा नाहीं. अशा प्रकारें हळुहळु पाऊल पुढें टाकावें व आपलें ध्येय गांठावें. परंतु सर्व कांहीं दुसऱ्यांवर अवलंबून ठेवून आपण मात्र स्वस्थ बसावयाचें हें सर्वपरि घातक आहे." हे विचार समाजाच्या प्रगतीच्या दृष्टीनें किती

महत्त्वाचे आहेत तें येथें निराळें सांगावयास नको. वास्तविक पहातां, दुसऱ्याच्या तोंडाकडे पहात राहण्याच्या संवयीचा परिणाम असा झाला कीं, बंगाल्यांतील लोकांप्रमाणें आम्ही स्वतंत्र पंथ तर सिद्ध केला नाहींच व जातींत राहून तर जातींत राहून, प्रत्येक सभासदानें समाजाच्या तत्त्वांनुसार आचार करण्याचाही निश्चय केला नाहीं! तथापि मामा परमानंदांनीं सुबोधपत्रिकेचे संपादक ह्या नात्यानें आपल्यावरील जबाबदारी जाणून योग्य मार्ग दाखविला व ते आपल्या कर्तव्यास जागले. त्यांच्या उपदेशानुसार आमचे सर्व सभासद जर वागले असते, तर आपल्या तत्त्वांची आपणच अवहेलना केल्याचा दोष त्यांस लागला नसता! असो.

अगदीं अखेरपर्यंत ते समाजाचे एकनिष्ठ सेवक राहिले. अंतकाळ समीप आला तरीसुद्धां देशहिताची त्यांची तळमळ कमी झाली नाहीं. शरीरांत कांहीं त्राण राहिला नव्हता, वारंवार ते बेसावध होत होते, तरी मलबारीशेटसारखे त्यांच्या विश्वासांतले कोणी आले कीं त्यांना प्रिय असलेल्या विषयाचा ऊहापोह, ऐकणाराला कान जवळ आणावयास सांगून, ते करीत होते व मृत्यूच्या पूर्व दिवशींच पुढें येणाऱ्या व्हाइसरायाची कारकीर्द यशस्वी व्हावयास काय केलें पाहिजे, याची रूपरेषा मलबारीशेटना सांगून "Now I must say good bye to you" असें मामांनीं म्हटलें व शेटजींना निरोप दिला. त्यावेळीं त्यांना आपला येथील वास संपला असें वाटलें असावें; कारण, दुसऱ्या दिवशीं, ता. १३ सप्टेंबर रोजीं दोन प्रहरीं २ वाजतां रामकृष्णपंत भांडारकर, डा. शांताराम विठ्ठल, तुकाराम तात्या, नारायणराव चंदावरकर, भास्कर हरि भागवत, श्रीधरपंत भांडारकर वगैरे मंडळी सभोंवतीं असतांना त्यांचें प्राणोत्क्रमण झालें व ह्या आधुनिक काळांतील साधु श्रेष्ठाची इह लोकींची यात्रा * संपली. त्यांचें अपुरें राहिलेलें ध्येय पुरे करणारा समाज हें चरित्र वाचून तयार होवो असें आम्ही इच्छितों.

---

* प्रेतयात्रेस प्रारंभ होण्यापूर्वी डा. भांडारकरांनीं प्रार्थना केली. ती अनुभवून मलबारी शेटनीं मामांविषयींच्या मृत्युलेखांत पुढील उद्गार काढले आहेतः—

The funeral service, or rather the farewell prayer, given by Dr. Bhandarkar, was simple but impressive to a degree. It was said in Marathi, so that all might follow it. Everything was quiet and orderly till within a minute of the removal. What a contrast to this some other funerals I have attended, with the heartless tittle tattle and the hollow jargon muttered by hirelings, paid for so much the hour!

## ( ३ ) वासुदेव बाबाजी नवरंगे.

**नये मागें पाहों वाट फिरोनिया। दुसरा संगिया साह्यकारी ॥ १ ॥**
**आपुलिया बळें घालावी हे कास । न येणेचि आस आणिकांची ॥२॥**

" He was the conscience of the Prarthana Samaj. "

*N. G. Chandavarkar.*

रोज कित्येक क्षुद्र प्राणी जन्मास येतात व कित्येक नाश पावतात. पण त्यांचे बद्दल कोणी विलाप करीत नाहीं. कारण, त्यांच्या अस्तित्वाविषयीं किंवा नाशासंबंधानें आम्ही बेफिकिर असतों. ह्या क्षुद्र प्राण्यांची गोष्ट बाजूस ठेविली व मनुष्यप्राण्यासंबंधानें आपण विचार करूं लागलों म्हणजे आपणांस असें आढळून येतें कीं, त्याचा जन्म व त्याचें मरण हीं अनुक्रमें कमी व अधिक प्रमाणानें आनंद व दुःख उत्पन्न करितात. इतर सर्व प्राण्यांपेक्षां मनुष्य प्राण्यांस अनेक कारणांनीं श्रेष्ठता आलेली आहे. परंतु त्याच्या श्रेष्ठत्वास जीं साधनें कारणीभूत झालीं आहेत त्यांचा जितक्या अंशानें व जितक्या प्रमाणानें सदुपयोग किंवा दुरुपयोग झालेला असतो तितक्या अंशानें व प्रमाणानें त्याचें मरण दुःखास कारणीभूत होत असतें. अनेक क्षुद्र प्राणी ज्याप्रमाणें रोज नाश पावतात त्याच प्रमाणें रोज कित्येक मानवप्राणी काळाच्या जबड्यांत पडत आहेत. परंतु त्यांच्या त्यांच्या आप्तांलीपकडे सर्वांस सर्वांबद्दल खेद वाटत नाहीं आणि आप्तांस किंवा इष्टमित्रांस जें वियोगाबद्दल दुःख होतें त्याचा गत व्यक्तीच्या गुणांशीं संबंध असतोच असें नव्हे. परंतु कोणाही व्यक्तीच्या मृत्यूनंतर जेव्हां अनेक व्यक्तींस समाजास किंवा देशास अत्यंत दुःख होतें, तेव्हां त्या गत प्राण्याच्या योग्यतेचा प्रश्न लोकांपुढें असतो. अत्यंत कष्ट सोसून, हाल अपेष्टा काढून, लोकनिंदा सहन करून, आपल्या कर्तव्यामध्यें सदा सर्वदा मग्न रहाणारा, सर्वांच्या आदरास व प्रेमास पात्र होतो. अशी एक थोर, स्वकर्तव्यदक्ष, अत्यंत उद्योगी, करारी, धाडशी, सत्यप्रिय, धर्मशील व्यक्ति म्हटली म्हणजे रा. रा. वासुदेव बाबाजी नवरंगे हे होते. ह्यांचें चरित्र सर्वांस अत्यंत बोधपर आहे म्हणून त्यांच्या चरित्राचा अल्प परिचय वाचकांस करून देण्याचा विचार आहे.

### पूर्ववृत्त, जन्म वगैरे.

वासुदेवरावांच्या पूर्वजांचें मुळचें ठिकाण रत्नागिरी जिल्ह्यांतील खरवतें हें गांव. तेथें अद्यापि त्यांचे कांहीं निकट संबंधी आप्त असून कित्येकांचें येथें वारंवार येणेंही

होत असतें. परंतु निजामशाहीमध्यें त्यांचे पूर्वज कोकणांतून निघून रोजगारासाठीं नगर जिल्ह्यांत घोडनदीजवळ आले व तेथें सोमवंशीयाचें जवळें म्हणून जें गांव होतें तेथें त्यांचा मुक्काम झाला. त्या गांवची जकात वगैरे वसूल करण्याचें काम वासुदेवरावांच्या कुळाकडे होतें. त्यांचे वडील बाबाजी हे तर तेथील वकीलही होते. त्या जवळें गांवीं, वासुदेवरावांचा जन्म शके १७५०त चैत्र महिन्यांत शुद्ध पक्षांत म्हणजे सन १८२८ सालीं झाला. त्यांच्या जन्माची तारीख किंवा तिथी आज कोणास माहीत नाहींच खुद्द त्यांसही ती माहित नव्हती. या जवळें गांवीं आपल्या वयाच्या १२ वर्षेपर्यंत वासुदेवराव राहिले. तेवढया काळांत त्यांचें तेथें कांहीं शिक्षण झालें असेलसें वाटत नाहीं, फार तर अक्षरओळख झालेली असेल. नंतर वडिलांचा रोजगार जवळयास नीट चालेना म्हणून ते आपलें जुनें गांव सोडून येथें आले. तेव्हां त्यांच्या बरोबर आमचे वासुदेवरावही आले. वडिलांस गरीबी आली म्हणून ते येथें आले. अशा स्थितींत मुलाच्या शिक्षणाची काळजी ते कोठून घेणार? परंतु वासुदेवरावांस लहानपणापासूनच विद्येची अभिरुचि लागलेली. आणि मुंबईस आल्यावर येथील सर्व निराळीच स्थिति पाहून आपणही इतरांप्रमाणें शिकून नांवलौकिक संपादावा किंवा उपजीविकेचें साधन प्राप्त करून घ्यावें म्हणून वासुदेवराव शाळेंत शिकूं लागले. आपल्या शिक्षणाची व त्याचप्रमाणें आपल्या पोटापाण्याची त्यांसच चिन्ता असल्यामुळें रोज शाळेंत जाण्यापूर्वी ते आपल्या पोटापाण्याची व्यवस्था करीत असत. अर्थात् रोज माधुकरी मागत असत व भिक्षाही रोज कांहीं वेळ मागत. तेवढया वेळांत जे कांहीं पैसे मिळतील ते गांठी बांधून नंतर ते शाळेंत जात असत. असा क्रम कांहीं कालपर्यंत चालल्यानंतर त्यांनीं कोणा गोडबोले नामक गृहस्थाच्या कुटुंबांत कांहीं दिवसपर्यंत शागिर्दाचें काम केलें. तेथें रिकाम्या वेळीं सांगतील तें काम करावें व नंतर शाळेंत जावें असा त्यांचा क्रम असे. अशा प्रकारें आपल्या स्वतःच्या हिमतीवर व अनेक प्रकारचे कष्ट सोसून त्यांनीं आपलें ज्ञान बरेंच वाढविलें. परंतु त्यांत अधिक भर घालण्याची जरी उत्कटेच्छा त्यांस होती, तरी उपजीविकेस साधन नसल्यामुळें तें फारसें शक्य नव्हतें. वासुदेवराव हे मोठे उद्योगी असून आपल्या शिक्षणाविषयीं त्यांनीं जी आस्था दाखविली त्यामुळें त्यांची त्या वेळच्या शिक्षणाच्या पुढाऱ्यांची ओळख झाली होती. त्यांत शेट दादाभाई होते. त्यांनीं त्यावेळीं अशी योग्य सल्ला दिली कीं, आतां आणखी शिकण्यांत काळ न घालवितां कांहीं उद्योगास लागणें चांगलें. कारण कोणत्या प्रकारचे हाल

सोसून व अडचणी असतां वासुदेवराव आपलें शिक्षण चालवीत होते हें दादाभाईंना माहीत होतें. म्हणून लोहार चाळींतील मुलांच्या शाळेचे हेडमास्तर आजारी पडून गेले असल्याचें त्यांस कळल्यावरून त्या जागीं त्यांनीं वासुदेवरावांची योजना करविली.

### शाळा मास्तर.

वासुदेवराव उत्तम प्रकारचे शिक्षक होते. त्या वेळीं तात्या पंतोजीचाच जिकडे तिकडे सुळसुळाट होता. तथापि ह्यांनीं आपल्या हाताखालच्या विद्यार्थ्यांस केव्हांही शिक्षा न देतां उत्तम प्रकारें शिकवावें. ही त्यांची शिक्षणपद्धति शेट दादाभाईच्या लक्षांत येतांच त्यांनीं इतका उत्तम शिक्षक आपल्या शाळेंत असणें अत्यंत अगत्याचें आहे, असा विचार करून स्टूडन्टस् सायंटिफिक अँड लिटररी सोसायटीच्या शाळेंत त्यांस त्यांनीं शिक्षक नेमिलें. तेथें हे मुलींस शिवणकाम व वीणकामही शिकवीत असत! ह्या कलांचा त्यांनीं केव्हां व कोठें लाभ करून घेतला होता हें मात्र आम्हांस माहीत नाहीं. शिक्षकाचा धंदा करीत असतां वासुदेवराव स्वस्थ बसले नव्हते. आपल्या ज्ञानांत भर घालण्याचा त्यांचा क्रम सतत चालू होता. त्यांस शास्त्रीय विषयांची फार आवड असे व ही आवड त्यावेळीं ज्ञानप्रसारक मंडळीचीं शास्त्रीय विषयांवर जीं सप्रयोग व्याख्यानें होत असत त्यांच्या द्वारें ह्यांच्यांत उत्पन्न झाली होती. त्यांस नक्षत्र, तारे, व रसायन शास्त्राचे ठळक ठळक सिद्धान्त ह्यांची चांगली माहिती होती. नक्षत्रांच्या संबंधानें आपल्या मुलांस तीं शाळेंत जात तेव्हां ते माहिती सांगत असत. असो. पंतोजीच्या कामास कांहीं वर्षांनीं वासुदेवराव कंटाळले.

### व्यापारी.

शिक्षकाचा धंदा नेहमीं करीत राहिल्यास आपला विशेषसा फायदा व्हावयाचा नाहीं हें त्यांच्या लक्षांत येऊन चुकलें होतें व त्या वेळीं चांगल्या चांगल्या लोकांचा व्यापाराकडे बराच कल असल्यामुळें त्यांनीं लहानशा प्रमाणावर व्यापार करण्याचा निश्चय केला. तेथेंही त्यांस प्रथम दादाभाई यांनींच मदत केली. वासुदेवरावांनीं स्टेशनरी व पुस्तकें विकण्याचा विचार कायम केला–आणि दादाभाईंनीं एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्येंच त्यांस त्यांच्या लहानशा दुकानास जागा देवविली व आपल्या शाळेंतील सर्व विद्यार्थ्यांस वासुदेवरावांपासूनच सर्व सामान व पुस्तकें घेण्याची सूचना केली. सर्व विद्यार्थी यांजपासून माल घेऊं लागल्यामुळें त्यांचा तो धंदा बऱ्या रीतीनें चालूं लागला. पुढें पुस्तकांचें व स्टेशनरीचें

दुकान त्यांनीं रामवाडीवर घातलें. नंतर ते नेहमीं म्हणत कीं, आत्माराम सगुण ह्यांनीं एकच धंदा उचलला व त्यासच ते चिकटून राहिले, ह्मणून त्यांस चांगली प्राप्ति झाली. आपण मात्र अनेक धंद्यांत मन घातलें व अनेकांत अपयश अनेक कारणांनीं आलें. फावल्या वेळीं ते दुसरेही कांहीं उद्योग करीत असावेत. कारण, याच सुमारास दर रविवारीं एक गुजराथी पत्र–बहुतकरून रास्तगोफतारांत सामील झालेलें सत्यप्रकाश पत्र असावें, ते वांटीत असत. कोणीकडून तरी प्रामाणिकपणें धंदा करून दोन पैसे गांठीं बांधावे, सज्जनांच्या सहवासांत सतत असावें व नित्य आपल्या ज्ञानांत व अनुभवांत भर घालावी असा त्यांचा निश्चय होता व त्याप्रमाणें ते वागत होते. एकदां व्यापारांत पडल्यावर ते पूर्ण व्यापारी बनले व मग स्टेशनरी व पुस्तकें ह्यासारख्या लहानशा व अल्प प्रमाणावरील व्यापारापेक्षां मोठ्या प्रमाणावरील व्यापाराकडे त्यांची दृष्टि गेली.

येथें हें सांगणें जरूर आहे कीं वासुदेवरावांचें लक्ष जरी व्यापाराकडे होतें, तरी आपलें मन सुसंस्कृत करण्याचा त्यांचा क्रम चालू होता. त्यांची चांगल्या चांगल्या लोकांत ओळख झालेली होती व त्यांच्या सहवासानें त्यांचे विचार उदार बनत चालले होते. पुस्तकांचा व्यापार सोडल्यानंतर त्यांनीं दोघा चौघांच्या साहाय्यानें बऱ्याच मोठ्या प्रमाणावर कापडाचा व्यापार सुरू केला. कापडाचा व्यापार करीत असतांनाच त्यांस विलायतेस जाण्याचा योग जुळून आला.

## विलायतची सफर १८६३–६६

वासुदेवरावांचा विवाह लहानपणींच त्यांच्या वडिलांनीं केला होता, व ते आपल्या पत्नीसह व बंधूंसह येथें रहात असत. परंतु हे अगदीं तरुणच असतांना ह्यांची प्रथम पत्नी निवर्तली व नंतर ते बरींच वर्षेंपर्यंत विधुरावस्थेंत होते कापडाचा व्यापार सुरू केल्यानंतर मंडळीचा असा विचार झाला कीं, आपल्या तर्फे लंडन येथें देवघेव करण्यासाठीं आपलाच माणूस तेथें असावा. ह्याच सुमारास करसनदास मुळजी, राम बाळकृष्ण वगैरे मंडळी विलायतेस जाणार असें कळतांच व्यापाराच्या निमित्तानें वासुदेवरावांनीं विलायतेस जाण्याचा निश्चय केला. १८६३ सालीं ते हिंदुस्थान सोडून विलायतेस गेले. त्या वेळीं विलायतच्या प्रवासाचीं व तेथील विशेष हकीकतीचीं त्यांनीं लिहिलेलीं पत्रें इंदुप्रकाशांत प्रसिद्ध झालेलीं आहेत. ह्याच वेळीं त्यांचे तीर्थरूप यांनीं चतुर्थाश्रम घेतला होता. त्यांचें एक खरमरीत पत्र वासुदेवरावांस मिळालें. त्यांत त्यांची कानउघाडणी करण्याचा प्रयत्न स्वामींनीं केला होता. तुम्ही मुंबईंत राहून भ्रष्ट झाल्याचें ऐकत होतोंच;

आतां तर तुम्ही एकदम परदेशगमन करून सर्व कुळास कमीपणा आणणार आहां. तुम्हांला कुलाचाराची व धर्माची चाड नाहीं. तुम्ही आम्हांस खालीं पहावयास लाविलें वगैरे मजकूर त्यांत होता ! ह्या पत्राचें वासुदेवरावांनीं आपल्या वडिलांस खरमरीतच उत्तर पाठविलें कीं, आपण आतां संसाराचा, त्यांतील मोहांचा व पाशांचा त्याग करून चतुर्थाश्रमांत पाऊल टाकलें आहे; आतां आपण आमच्या ह्या भानगडींत पडूं नये; आम्ही आमचें कल्याण कसें आहे, तें जाणण्याच्या स्थितींत आपल्या कृपेनें आहों. आतां आमच्यासंबंधानें काळजी करून आपण आपल्या धर्मसाधनांत व्यत्यय आणून घेऊं नये. अशा प्रकारचें चोख उत्तर त्यांच्या करारी स्वभावास अनुरूपच होतें; हें येथें स्वतंत्रपणें सांगण्याची आवश्यकता नाहीं. विलायतेंत त्यांचा मुक्काम एकंदर तीन वर्षें होता. व शेवटचे सहा महिने खेरीज-करून तेथें चांगला व्यापार व देवघेव होत असावी, परंतु वासुदेवराव स्वतः विलायतेस असल्यामुळें येथील मंडळी खरोखर कोणत्या प्रकारें व्यापार करीत आहे व आपल्याशीं कोणत्या रीतीनें वागत आहे हें जाणण्यास त्यांस मार्ग नव्हता. त्यांचा करारीपणा व सत्यप्रीति हे गुण त्यांच्या भागीदारांत नव्हते. त्यांच्याशीं त्यांचें वर्तन साफ राहिलें नाहीं. इकडे काय व्यवहार चालले होते त्याचा वासुदेवरावांस मागमूस लागला नाहीं. आणि इकडे मंडळींनीं एक दिवस दिवाळें फुंकलें !

## एक लक्ष पस्तीस हजार रुपये.

भागीदारांनीं दिवाळें फुंकलें एवढेंच नाहीं तर, ही बातमी वासुदेवरावांस टपा-लद्वारें न कळवितां वासुदेवरावांचा अंत झाल्यावर जिवंत असलेले लोणावळ्याचे सुखवस्तु गृहस्थ रा. रा. भास्करराव ह्यांस त्यांनीं पत्र घेऊन विलायतेस पाठविलें. त्या पत्रांत असा पोक्तपणाचा उपदेश करण्यांत आला होता कीं कंपनीनें मुंबईत दिवाळें काढल्यामुळें वासुदेवरावांनीं विलायतेंत लोकांचे देणें वगैरे देण्याच्या भानगडींत पडूं नये; तर जे पैसे असतील ते सर्व घेऊन हिंदुस्थानांत निघून यावें, म्हणजे मग निराळा व्यापार सुरू करतां येईल ! हा उपदेश वासुदेवरावां-सारख्या बाणेदार, पापभीरू व सत्यप्रिय माणसास कसा रुचावा ? त्यांनीं आपणांस अशा प्रकारचा उपदेश झाल्याचें कोणास न कळवितां लोकांचें सर्व देणें देऊन टाकलें आणि हें देणें थोडें थोडकें नव्हतें. त्यांनीं एक लक्ष पस्तीस हजार रुप-यांचें देणें देऊन टाकलें व व्यापाराच्या निमित्तानें आतां कांहीं कोणाचें देणें नाहीं असें पाहून तें पत्र घेऊन आतां पुढें काय करावयाचें तें ठरविण्यासाठीं ते शेट दादाभाईकडे गेले व त्यांस तें पत्र त्यांनीं दाखविलें. त्यांत उपदेश काय होता व

आपण काय केलें तेंही त्यांस सांगितलें. हा सर्व वृत्तांत ऐकून दादाभाईंस फार आनंद झाला. वासुदेवरावांस ते पुष्कळ वर्षांपासून ओळखीत होते. तुम्हीं केलेंत तेंच योग्य होय असें त्यांनीं त्यांस सांगितलें. मात्र आतां हिंदुस्थानांत परत जाण्याची घाई करूं नये. कारण आतांच तिकडे गेल्यास भागीदारांनीं तुमच्या विचारावांचून केलेल्या कर्जाचा बोजा तुमचेवर पडेल. हा विचार वासुदेवरावांस पटला व पुढें ते सहा महिनेपर्यंत तेथें राहिले. तेवढया अवधींत न्या. मू. को ह्यांस त्यांनीं मराठी शिकविलें व अशाच प्रकारचे लहान सहान उद्योग करून ते तेथें असतां त्यांची व मुशीचे प्रसिद्ध व्यापारी मि. मॉर्गन ह्यांची दाट ओळख झाली व आपल्या मुशींचा फैलाव अधिक प्रमाणावर करण्यासाठीं वासुदेवरावांस त्यांनीं मुख्य एजन्ट नेमिलें व १८६६ सालीं जवळ पुरेसे पैसे नसल्यामुळें, पुन्हां नवो विटी व नवा दांडू ह्यांचा नवा डाव मांडण्यासाठीं त्या वेळीं विलायतेंतच असलेल्या शेट कर्सनदास माधवदास ह्यांच्या मालाच्या आगबोटींतून त्यांच्या मेहेरबानीनें वासुदेवराव परत हिंदुस्थानांत आले. आपण इतके परिश्रम करून व्यापार सुरू केला, त्यास इतक्या चांगल्या स्वरूपास आणिलें आणि भागीदारांनीं आपणास अचानक रीतीनें तोंडघशी पाडिलें, हें पाहून त्यांची किती तरी निराशा झाली असेल! आमच्या लोकांच्या गाफिलपणाबद्दल त्यांचा संताप झाला असेल! परंतु व्यापारांत हा जो मोठा धक्का बसला त्याच्या योगें ते हताश झाले नाहींत. त्यांनीं मुशीचा नवीन व्यापार येथें येऊन सुरू केला, व आपल्या हयातींत तो उत्तम प्रकारें चालविला आणि मृत्यूपूर्वीं सुमारें नऊ वर्षें आधीं आपले हातपाय बरेच थकल्यावर आपल्या व्यापाराचा सर्व बोजा आपले चिरंजीव सत्यवंत यांजवर टाकून ते घरीं स्वस्थ बसले. राजश्री सत्यवंत यांनीं आपल्या वडिलांच्याच हयातींत हा व्यापार वाढविला असून तो आतां अधिक नांवारूपास आणिला आहे.

## सामाजिक व धर्मविषयक सुधारणा.

आज काल परदेशगमन म्हणजे कांहीं विशेष आहे असें कोणास वाटत नाहीं. परंतु १८६३ सालीं ही गोष्ट बहुतेक अश्रुतपूर्वच होती. त्या वेळीं ती करणाराचा स्वभाव धाडशीच असावयास पाहिजे होता. आणि आमच्या वासुदेवरावांचा स्वभाव तसाच होता.

व्यापारासाठीं परदेशीं जाणें अगत्याचें आहे असें आढळतांच त्यांनीं मार्गांतील अडचणींचा व पुढील परिणामाचा कांहीं विचार केला नाहीं; व आतांच्या लोकांस मार्ग खुला करण्यासाठीं त्यांनीं अत्यंत अनुकरणीय असें उदाहरण घालून दिलें.

१८६६ सालीं ते परत आले. त्यानंतर पैसे देऊन अगर उपाध्यायांच्या हातापाया पडून प्रायश्चित्त घेण्याच्या भानगडींत पडण्याचा विचार त्यांच्या स्वप्नांतही आला नाहीं. आपण परदेशगमन केलें म्हणजे कांहीं अनुचित कर्म केलें असें नाहीं; आणि जर अनुचित कर्म केलें नाहीं; तर प्रायश्चित्त काय म्हणून घ्यावयाचें ? अनुचित कर्माचा दोष प्रायश्चित्त घेतल्यानें नष्ट होतो असा त्यांचा विश्वास नव्हता हें निराळें सांगावयास नको. प्रायश्चित्त घ्यावयाचें नाहीं असा विचार करून ते आपल्या उद्योगास लागले. आम्हीं वर एक दोन वेळां म्हटलें आहे कीं, वासुदेवराव हें सज्जनांच्या सहवासांत नेहमीं असत. त्यामुळें त्यांच्या विचारांचें त्यांस वळण लागलें. आमच्या वाचकांस हें माहित आहे कीं १८४० च्या सुमारास येथें परमहंस नांवाची मंडळी स्थापन झाली होती. तिचा उद्देश देशांतील जातिभेद नाहींसा करून एकेश्वर मताचा प्रसार करावा असा होता. ह्या सभेंत कांहीं भेकड माणसें असल्यामुळें उघडपणें त्यांच्या हातून कांहीं झालें नाहीं व १८६० च्या सुमारास प्रसिद्धीच्या भीतीनें ही सभा नाहींशी झाली. ह्या सभेशीं वासुदेवरावांचा संबंध होताच. पण संस्थेच्या सभासदांचा दुबळेपणा त्यांस मुळींच पसंत नसे व त्यामुळें १८६० सालीं ही संस्था विलयास गेल्याबद्दल त्यांस मुळींच खेद झाला नाहीं असें ते वारंवार म्हणत असत.

परंतु पुढें परमहंस मंडळींतील कांहीं लोकांना असें वाटूं लागलें कीं आपले प्रगतीपर जे विचार आहेत त्यांचा फैलाव करण्यासाठीं प्रसिद्धपणें प्रयत्न व्हावेत. म्हणून सन १८६६ सालीं तारीख ३० डिसेंबर रोजीं डॉ. आत्माराम पांडुरंग यांच्या येथें एक सभा झाली. तींत वासुदेवराव हजर होते. मंडळीचा प्रथम उद्देश असा होता कीं चालू जातिभेदाची चाल अति वाईट आहे असें प्रसिद्धपणें प्रतिपादावें, विधवा-विवाह सुरू करावे, स्त्रीशिक्षणास उत्तेजन द्यावें, बालविवाहाची चाल बंद करून लग्नाच्या वयाची इत्ता ठरवावी वगैरे. ह्यासंबंधानें अनेक सभा भरवून असें ठरलें कीं, ऐहिक कल्याणावर विशेष दृष्टि ठेवून हीं कार्यें हातीं घेण्यापेक्षां मनुष्याचें ह्या जन्मीं परमार्थसाधन हें जें श्रेष्ठ कर्तव्य त्याकडे विशेष दृष्टि ठेविली पाहिजे. आणि तें करीत असतां त्याच्या अंगभूत हीं कामें समजावीं. ह्या उद्देशानें १८६७ सालीं प्रार्थना समाजाची स्थापना ज्या मंडळींनीं केली त्यांत वासुदेवराव होते. वासुदेवरावांच्या चरित्रांत विशेष तो हा आहे कीं ऐहिक कल्याणास मंडळींनीं थोडें मागें टाकिलें व परमार्थ-साधनास विशेष महत्त्व दिलें त्याप्रमाणें त्यांनींही केलें. धर्मास त्यांनीं आपल्या चरित्रांत आद्यस्थान दिलें. पण

सामाजिक बाबी ऐहिक अतएव क्षुद्र असें कल्पून कित्येकांप्रमाणें स्वतःच्या सोयी-साठीं त्यांचा धिक्कार त्यांनीं केला नाहीं. मंडळीचे उद्देश त्यांनीं सर्व लक्षांत ठेविले व ते सर्व जसजसे प्रसंग आले त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या आचरणाच्या द्वारें पूर्ण केले. जातिभेदाची चाल वाईट असें प्रसिद्धपणें प्रतिपादून ते थांबले नाहींत; त्यांनीं त्याचा त्याग केला; त्या वेळीं विधवाविवाहाची चळवळ बरीच जोरांत होती. परंतु इतरांनीं विधवाविवाह सुरू करावे अशी सदिच्छा मनांत बाळगून ते राहिले नाहींत; तर १८७० सालीं त्यांनीं स्वतः बापट कुळांतील कृष्णाबाई नामक एका गतभर्तृकेशीं विवाह* केला. १८७२ चा तिसरा कायदा पास होतांच त्यांनीं विवाह रजिस्टर केला. मुंबई शहरांत रजिस्टर झालेला हा पहिलाच विवाह होय.

महाराष्ट्रीयांत झालेला हा दुसरा विधवाविवाह होय. स्त्रीशिक्षणास त्यांनीं कोणत्या प्रकारें उत्तेजन दिलें तें येथें सांगावयाला नकोच. शिक्षकाचा धंदा करीत असतां त्यांनीं कितीतरी मुलींना शिकविलें व आपल्या मुलींना उत्तम प्रकारचें शिक्षण दिलें. त्यांच्या तीन मुली, श्री. सीताबाई देवल, डॉ. काशीबाई नवरंगे व सौ. मनोरमाबाई (शांताबाई) गद्रे ह्या होत. डॉ. काशीबाई ह्या बी. ए. व एल. एम. अँड एस्. आहेत, हें आतां सर्वांस श्रुत आहे. त्या स्वतः आतां पुष्कळ परोपकाराचीं कृत्यें करीत आहेत. त्यांस सरकारनें जे. पी.ही केलें आहे. आज तीन वर्षें त्या येथील प्रार्थना समाजाच्या व्हाइस प्रेसिडेंट आहेत. वासुदेवरावांनीं कोणत्याही प्रकारें लोकांत स्वतःच्या कर्तव्याविषयीं बभ्रा न करितां आपणाला जें योग्य वाटलें तें बिनदिक्कत आचरणांत आणिलें.

## वासुदेवराव व प्रार्थनासमाज.

येथील प्रार्थनासमाजाची वासुदेवरावांनीं अनेक प्रकारें तनमनधनेंकरून सेवा केली आहे. आमच्या समाजानें ग्रंथप्रकाशनाकडे अद्यापही म्हणण्यासारखें लक्ष दिलेलें नाहीं. ही गोष्ट लक्षांत घेऊन वासुदेवरावांनीं आपल्या स्वतःच्या जबाबदारीवर कांहीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. 'हिंदु रिफॉर्मर' पत्राशीं प्रकाशक ह्या नात्यानें कांहीं काळ त्यांचा संबंध होता. त्या वेळीं त्यांस बरीच घस सोसावी लागली. तरीही त्याच वेळीं त्यांनीं केशवचंद्र सेन यांचीं व्याख्यानें छापवून तीं हिंदु रिफॉर्मर पत्राबरोबर वांटलीं व स्वतंत्रपणें विक्रीसही ठेविलीं. त्याचप्रमाणें दादोबा

---

* ह्या विवाहाची सविस्तर हकिगत धर्मानुष्ठान व ध्येयपालन या भागांत दिली आहे.

पांडुरंग ह्यांनीं लिहिलेलें धर्मविवेचन नामक पुस्तक हातीं पडावयास वासुदेवरावच कारण झाले. ह्या ग्रंथांत जे सात निर्णय सांगितले आहेत त्यांचें विवेचन अत्यंत बोधपर, व मार्मिक असें आहे. त्याचप्रमाणें भिकोबादादा चव्हाण ह्यांचीं कांहीं व्याख्यानें त्यांनीं प्रसिद्ध केलीं. अशा प्रकारें व्यक्तिमात्रास आपल्या समाजासाठीं ग्रंथप्रकाशनाचें काम कसें करितां येतें तें त्यांनीं आपल्या स्वतःच्या उदाहरणानें सर्वांस दाखवून दिलें आहे.

परोपकाराचीं कामेंही त्यांनीं किती तरी केलीं असलीं पाहिजेत. विशेषतः १८७६-७७ व १८९९ च्या भयंकर दुष्काळांच्या वेळीं घरोघर फिरून त्यांनीं अन्न व पैसे जमा केले व शेंकडों लोकांचे प्राण वांचविण्यास ते कारण झाले. १८७६-७७ च्या दुष्काळाच्या वेळीं दाणेबंदरांतून त्यांनीं धान्याच्या गोणी मिळवाव्या व स्वतः पाठीवर एक गोण घालून आणावी ! गेल्या दुष्काळाचे वेळीं ते थकले होते, तरी सुद्धां भाटवडेकरांच्या तिन्ही चाळींत स्वतः फिरून ते धान्य व पैसे जमा करीत असत. समाजाच्या रिलीफ कमिटीचे ते अध्यक्ष होते व त्यांच्या देखरेखीखालीं समाजानें गरिबांस त्या वर्षी मदत केली. ते पुष्कळ वर्षेंपर्यंत व्यवस्थापक कमिटीचे सभासद होते, त्या वेळीं त्यांच्या स्पष्टवक्तेपणामुळें कमिटीमध्यें जरी नेहमीं दोन पक्ष असत तरी त्यांच्या विचारांचा व मतांचा शांतपणें विचार करून निकाल लावावयास मंडळीची सिद्धता असे. प्रार्थनासमाजाची वासुदेवरावांनीं ह्याहीपेक्षां एक मोठी कामगिरी बजाविली आहे. अर्थात् ही कामगिरी म्हणजे स्वीकृत मतांस अनुसरून सर्व प्रसंगीं वागून भावी पिढींना ते एक उत्तमोत्तम कित्त्यासमान होऊन गेले आहेत.

समाजांतील कित्येक मंडळीचा ढिलेपणा पाहून त्यांस अत्यंत खेद होत असे; कधीं कधीं त्यांचा संतापही होत असे; आणि योग्य वेळीं योग्य ती टीका करावयास ते केव्हांही कचरत नसत. पूर्वी दरवर्षी प्रीतिभोजनानंतर आमची प्रगति होत आहे किंवा नाहीं, नसल्यास ती कां होत नाहीं यावर चर्चा होत असे. त्यावेळीं वासुदेवराव अगदीं निर्भीडपणें आमच्या प्रगतीस कोण आड येत आहे त्याचा स्पष्ट खुलासा करीत असत. पुढें पुढें तर त्यांना ह्या चर्चेचा अगदीं कंटाळा आला होता ! जर वर्तनांत फरक करावयाचा नाहीं, तर कोरडी चर्चा करीत बसण्यांत अर्थ काय ? धर्माच्या व धर्माचरणाच्या बाबतींत पॉलिसी कशास पाहिजे ? ज्या मतांचा स्वीकार केला त्याप्रमाणें वागावयाचें हा सरळ मार्ग; तो सोडून पॉलिसीचा मार्ग स्वीकारणें म्हणजे वाममार्ग पत्करणें होय असें त्यांनीं म्हणावें.

त्यांची प्रखर धर्मनिष्ठा, ईश्वरावरील त्यांचा दृढ विश्वास समाजकार्याविषयीं त्यांची अप्रतिम आस्था हे सर्व गुण अत्यंत अनुकरणीय असत. त्यांच्यामध्यें जोंपर्यंत सामर्थ्य होतें तोंपर्यंत पहाटे चार वाजतां उठून स्नान वगैरे आटोपून भजन, प्रार्थना करण्याचा त्यांचा क्रम केव्हांही चुकला नाहीं. ह्या बाबतींत त्यांच्याइतका नियमबद्धपणा फार थोड्या सभासदांनीं आजपर्यंत दाखविला आहे असें आम्हांस वाटतें.

वासुदेवरावांचा असामान्य साधेपणा व निरभिमान वृत्ति ह्यांचा ज्यांस कमी-अधिक प्रमाणानें अनुभव आला आहे त्यांचे ठिकाणीं त्यांचेविषयीं आदरबुद्धि उदित होत असे. आज ज्या सामाजिक व धर्मविषयक सुधारणा प्रचारांत याव्या म्हणून गेलीं साठ वर्षें वाद चालला आहे त्या त्यांनीं बिनबोभाट प्रचारांत आणिल्या. आपल्या मताप्रमाणें साहा कुटुंबें तयार आहेत कीं नाहींत, ‘ दुसरा संगिया साहाकारी ’ मागून येत आहे किंवा नाहीं याची मुळींसुद्धां वाट न पाहतां ‘ आपुलिया बळें ’, त्यांनीं काम घालून आपलें कर्तव्य बजाविण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या चरित्राचें जो कोणी अवलोकन करील त्यास त्यांनीं आपलें व्यक्तिविषयक, कुटुंबविषयक व सामाजिक कर्तव्य पूर्णपणें बजाविलें असें त्याच्या अनुभवास आल्यावांचून रहाणार नाहीं. इतकें असूनही आपण कांहीं विशेष केलें आहे हा विचार त्यांस स्वप्नींही कधीं शिवला नाहीं, आणि म्हणूनच

**अंतरीं निर्मत्सर । सबाह्य कोमल जिव्हार ॥**
**नाहीं द्वेष जया चित्तीं । समता ती सर्वांभूतीं ॥**
**निर्मल अंतर । शुद्ध सत्त्वाचा आगर ॥**

हे साधुवर्य तुकोबाचे उद्गार वासुदेवरावांस उत्तम प्रकारें लागू पडतात.

## वासुदेवरावांची खरी योग्यता.

वासुदेवरावांच्या खऱ्या योग्यतेचें यथातथ्य वर्णन करणें हेंही फार अवघड काम आहे. त्यांच्यांत अनेक अमोलिक असे गुण होते. त्यांचा सर्वांत मोठा गुण म्हणजे जाज्वल्य सत्यनिष्ठा होय. त्यांचा करारीपणा हा सत्यनिष्ठेचाच परिणाम होय. त्यांच्या जागीं दुसरा कोणी व्यापारी असता तर विलायतेंत असतांना जवळ जवळ दीड लक्ष रुपयांचें देणें देण्याच्या भानगडींत न पडतां ते पैसे गांठीं बांधून त्यानें हिंदुस्थानची वाट धरिली असती. परंतु देण्याची सर्व व्यवस्था होईपर्यंत मुंबईतील दिवाळ्याची बातमीही त्यांनीं कोणास दिली नाहीं !

'कोठें आमचे साधे वासुदेवराव आणि कोठें दिवाळें निघाल्यावरही लोकांचे पैसे गट्ट करणारे सर अरबथनॉट,' असे उद्गार त्यांच्या मृत्यूनंतर एका सभासदानें काढले होते. महर्षि देवेंद्रनाथांनीं कलकत्त्यास आपल्या वडिलांचें कर्ज फेडलें, कांहीं अंशीं तशाच प्रकारचें हें आमच्याकडील उदाहरण आहे.

अशा प्रकारची सत्यनिष्ठा त्यांच्यांत होती म्हणून ज्यांस ह्या गुणाची किंमत वाटे ते त्यांचा मोठा सत्कार करीत व त्यांच्यासंबंधानें सर्वांमध्यें मोठा आदर वसत असे. त्यांच्यांत स्पष्टवक्तेपणा हा एक दुसरा मोठा गुण होता. हाही त्यांच्या सत्यप्रीतीचाच परिणाम होय असें म्हटलें पाहिजे. आणि हा त्यांचा स्पष्टवक्ते-पणा केवळ परिचित लोकांतच आढळावयाचा असें नव्हे. लोक परिचित असोत वा नसोत, योग्य प्रसंग आला असतां आपलें मत स्पष्टपणें अपरिचितांस सुद्धां सांगावयास ते केव्हांही कचरत नसत. गणपतीचे मेळे जेव्हां प्रथमच प्रचारांत आले तेव्हां सुबोधपत्रिकेंत मेळ्यांच्या विरुद्ध कांहीं मजकूर आला होता. त्या वर्षी सुधारककारही मेळ्यास भाळले होते. एके दिवशीं प्रातःकाळीं आगगा-डींत कांहीं तरुण मेळ्यांची स्तुति व पत्रिकेच्या विचारांवर टीका करीत होते. वासुदेवराव त्याच डब्यांत होते. प्रस्तुत लेखकाचा व त्यांचा त्या वेळीं परिचय नव्हता व पत्रिकेशीं त्याचा कांहीं संबंधही नव्हता. त्या वेळीं तरुणांची ती अद्वा-तद्वा टीका पाहून वासुदेवराव कसे एकदम उसळले त्याची त्यास अद्याप चांगली आठवण आहे! त्यांनीं त्यांची तेथल्या तेथें चांगली कानउघाडणी केली, तिचा त्यांचे मनावर कांहीं परिणाम झाला कीं नाहीं तें आम्हांस माहीत नाहीं; परंतु त्यांचा तिखटपणा, तो निस्पृहपणा व करारीपणा पाहून त्यांच्याविषयीं आमच्या मनांत आदरबुद्धि जी उत्पन्न झाली ती पुढें परिचय झाल्यावर वाढतच गेली. असो.

## अखेरचे दिवस.

वासुदेवराव मृत्यूच्या आधीं सुमारें पांच वर्षांपूर्वी एकदां अत्यवस्थ होते. त्या दुखण्यांतून ते उठतील असें वाटलें नव्हतें. परंतु परमेश्वराच्या कृपेनें ते त्यांतून उठले. ह्याच दुखण्यांत त्यांस लहानशा प्रमाणावर पक्षघात झाला. त्या-मुळें त्यांची शक्ति हळुहळु क्षीण होत चालली होती. तरी पण सर्व प्रकारें त्यांची उत्तम व्यवस्था असल्यामुळें त्यांनीं पांच वर्षे काढिलीं. तथापि नंतर ते वारं-वार आजारी पडत व प्रत्येक वेळीं त्यांस अधिकाधिक अशक्तता येऊं लागली होती. आणि हें ते स्वतः जाणून असत. त्यांची कनिष्ठ कन्या शांताबाई ह्यांच्या

विवाहाचें जेव्हां निश्चित झालें तेव्हां लग्न उरकून घ्यावें अशी त्यांनींच घाई चालविली होती.

१९०७ मेच्या पहिल्याच आठवड्यांत डॉ. काशीबाई ह्यांचा त्याच महिन्यांत उघडलेला दवाखाना पहावयास ते स्वतः गेले. तेथील सर्व व्यवस्था पाहून त्यांस फार समाधान वाटलें. १९०७ जून ता. २ रोजीं शांताबाईचें लग्न झालें. त्या वेळीं "माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या" असे उद्गार त्यांनीं मोठ्या समाधानवृत्तीनें काढिले. परंतु त्याच दिवशीं थोडे अधिक श्रम पडल्यामुळें त्यांस पक्षघाताचा दुसरा झटका बसला व पुढें दोन दिवसांनंतर दिवसेंदिवस त्यांचें दुखणें विकोपास गेलें व अखेरीस ता. १४ जून १९०७ रोजीं त्यांस पक्षघाताचा अखेरचा झटका बसला व त्यांतच अगदीं शांतपणें त्यांचा अंत झाला.

एमरसननें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, मनुष्यप्राणी हा सुधारक बनण्यासच जन्मास येतो. त्याचे उद्गार पुढें दिले आहेतः—

What is a man born for, but to be a Reformer, a remaker of what man has made, a denouncer of lies a restorer of truth and good. हा एमरसनचा सिद्धांत वासुदेवरावांनीं आपल्या चरित्राच्या द्वारें सिद्ध करून दाखविला आहे. वासुदेवरावांच्या ह्या सर्वांग-सुंदर चरित्राशीं आपला परिचय झाला म्हणजे त्यांनीं आपली जीवनयात्रा पूर्णपणें सफळ केल्याची खात्री होते व आत्मपरिचयानें आपल्या ठिकाणीं उत्पन्न झालेला त्यांचे संबंधाचा आदर द्विगुणित होतो. परंतु त्यांच्या गुणांचें वर्णन केल्यानें, किंवा त्यांच्याविषयीं आपल्या ठिकाणीं आदरबुद्धि वागविल्यानें आपलें कर्तव्य संपत नाहीं. अगदीं गरीब स्थितींत असतां स्वतःच्या बळावर त्यांनीं सुस्थिति संपादिली. सर्वत्र नेकीनें ते वागले; समाजकार्यासाठीं त्यांनीं स्वार्थत्याग केला; अनेक सुधारणा प्रचारांत आणिल्या आणि हें सर्व त्यांचें शील उत्तम होतें, त्यांची धर्मनिष्ठा प्रखर होती म्हणून त्यांस सहज करितां आलें. आम्हीं सामाजिकांनीं त्यांचें अनुकरण करणें म्हणजेच त्यांच्याविषयींचा आपला आदरभाव व्यक्त करणें होय. परमेश्वरानें आम्हां सर्वांस हें अनुकरण करण्यास सामर्थ्य द्यावें अशी प्रार्थना करून हा चरित्रलेख येथें संपवितों.

---

## (४) रामचंद्र विष्णु माडगांवकर.

Remember now and always that life is no idle dream, but a solemn reality based upon eternity and encompassed by eternity. Find out your taste; stand to it; the night cometh when no man can work.

—*Carlyle.*

" ईश्वरप्राप्तीस प्रेमपुरस्सर भक्ति हेंच खरें साधन, चित्त शुद्ध करून, देवावर भरंवसा ठेवून, विषयांपासून मन सोडवून, परमेश्वरास अंतःकरणपूर्वक शरण जाणें हाच मुक्तीचा मार्ग, त्यास सोडून दांभिक कर्ममार्गानें जाणाऱ्यांस फलप्राप्ति होणें अशक्य " हें सत्य ज्यांनीं आपल्या अंतःकरणांत पूर्णपणें बिंबविलें होतें, प्रार्थनासमाजाशीं ज्यांचा प्रथमपासून अत्यंत निकट संबंध होता, प्रार्थनासमाज ज्यांनीं स्थापिला त्यांपैकीं जे एक होते व ज्यांना प्रार्थनासमाजासंबंधानें आपलेपणाची भावना होती, ज्यांचा दृढ उद्योग, समाजकार्याविषयींची कळकळ, करारी स्वभाव, सत्यनिष्ठा, दूरदर्शित्व व धर्मनिष्ठा हे गुण सर्वांस आदर्शवत् झाले होते, ज्यांनीं मातृभाषेची बहुमोल सेवा निरपेक्ष बुद्धीनें करून महाराष्ट्रियांस अत्यंत उपकृत करून ठेविलें आहे, आपल्या मधुर भक्तिरसानें परिपूर्ण, छंदोभंग न होऊं देतां तयार केलेल्या सुंदर पद्यांच्या द्वारें ज्यांनीं आपली कीर्ति अजरामर करून ठेविली आहे, ज्यांच्या ह्या पद्यांच्या द्वारें त्यांच्या धार्मिक जागृतीची पूर्ण कल्पना आजही होऊं शकते, प्रार्थनासमाजासंबंधाच्या ज्यांच्या तळमळीची साक्ष प्रार्थनामंदिर देत आहे, असे समाजाच्या जुन्या पुढाऱ्यांतील मार्गदर्शक व त्यांच्याशीं ज्यांचा परिचय झाला अशा सर्वांस आदरणीय झालेले जे रा. रा. रामचंद्र विष्णु (ऊर्फ रामभाऊ) माडगांवकर यांचें अल्प चरित्र येथें सादर करितों.

**जन्म व शिक्षण.** रामभाऊंचा जन्म सन १८४३ त झाला. त्यांचे वडील जुन्या समजुतीप्रमाणें देवधर्मकार्यामध्यें नित्य गढून गेलेले गृहस्थ होते. त्यांस आपल्या चिरंजिवांच्या शिक्षणाचा विचार करावयास अवकाश नव्हता व त्या दिशेनें त्यांनीं कधीं विचारही केलेला नव्हता. त्यामुळें त्यांचें सर्व प्रकारचें शिक्षण त्यांचे चुलते प्रसिद्ध गोविंद नारायण माडगांवकर ह्यांच्या देखरेखीखालीं झालें. त्यांच्या ठिकाणीं असलेला महाराष्ट्रभाषेविषयींचा अभिमान, त्याचप्रमाणें त्यांची सत्यनिष्ठा आणि जी गोष्ट प्रसिद्धपणें करण्यास कोणत्याही कारणामुळें धैर्य

होत नसे ती चोरून लपून करणें म्हणजे प्रगतीच्या दृष्टीनें अनिष्ट अतएव त्याज्य असा निश्चय ह्या गुणांचें प्रतिबिंब रामभाऊंच्या अंगीं पूर्णपणें उतरलें होतें. रामभाऊंचा विद्याभ्यास मराठी खासगी शाळेंत व नंतर इंग्रजी अभ्यास एल्फिन्स्टन हायस्कुलमध्यें झाल्यानंतर उच्च प्रतीच्या शिक्षणासाठीं ते एल्फिन्स्टन कॉलेजमध्येंच प्रविष्ट झाले. रामभाऊंच्या ठिकाणीं नीटनेटकेपणा हा गुण विशेष होता व हा ते कॉलेजांत शिकत असतांनाच त्यांच्या अध्यापकांच्याही लक्षांत आला. निरनिराळे विषय शिकवितांना अध्यापक ज्या नोटस व दुसरी माहिती सांगत असत ती रामभाऊंनीं इतकी सुवाच्य वळणदार अक्षरांनीं व काळजीपूर्वक लिहावी कीं, सर ॲलेक्झांडर ग्रँट ह्यांना त्यांच्या ह्या उद्योगाचें इतकें कौतुक वाटलें कीं त्यांनीं रामभाऊंस त्यासाठीं एक स्वतःच्या पदरचें बक्षिस दिलें. कॉलेजांतील सर्व अध्यापकांची त्यांचेवर पूर्ण मर्जी असे. रामभाऊ १८६२ मध्यें बी. ए.ची परीक्षा पास झाले. त्यानंतर त्यांस एल्फिन्स्टन कॉलेजांतच ज्युनिअर फेलो नेमण्यांत आलें. त्या वेळीं प्रसिद्ध घराण्यांत खासगी शिकवण्या करून त्यांस बरीच प्राप्ति होत असे.

**नोकरी.** जेव्हां त्यांनीं विद्याभ्यास सोडून संसाराचा गाडा चालविण्यासाठीं कोठें तरी नोकरी पत्करण्याचा विचार कायम केला त्या वेळीं त्यांच्या अध्यापकांपैकीं प्रो. ह्यूलिंग्स ह्यांनीं त्या वेळचे चेंबर ऑफ कॉमर्सचे चिटणीस मि. जेम्स टेलर यांस उद्देशून शिफारसपत्र देतांना त्यांत असें म्हटलें होतें कीं, रामभाऊंची व्यवहारदक्षता व काम करण्याची टापटीप इतक्या श्रेष्ठ दर्जाची आहे कीं ते ह्या बाबतींत माझ्याही वरचढ करतील! आणि हें अगदीं खरें होतें. त्यांत विशेष गोष्ट ही कीं, हे त्यांचे गुण ते विद्यार्थिदशेंत असतांनाच प्रो. ह्यूलिंग्ससारख्या अध्यापकांच्याही लक्षांत आले होते. ह्या त्यांच्या विशेष गुणांमुळेंच पुढें ग्रॅह्याम कंपनीमध्यें आपली कामगिरी उत्तम प्रकारें बजावून ते सर्वांस अत्यंत आदरणीय झाले. प्रो. ह्यूलिंग्स ह्यांच्या शिफारसीच्या जोरावर सेल्समनचें काम शिकण्यासाठीं दरमहा दीडशें रुपये पगारावर त्यांस प्रथम नेमण्यांत आलें. त्या वेळीं त्यांचें वय सुमारें २३–२४ वर्षांचे होतें. त्यांनीं अल्पावकाशांतच ह्या कामांत इतकें प्राविण्य संपादिलें कीं, तसें आजपर्यंत कोणासही साधलें नाहीं असें म्हणतात. ही गोष्ट त्या वेळचे ग्रॅह्याम कंपनीचे मुख्य भागीदार सर फ्रँक ॲडम ह्यांच्या लक्षांत येतांच, त्यांनीं रामभाऊंची योग्यता जाणून, ग्रॅहॅम कंपनीच्या मुंबईच्या व कलकत्याच्या शाखांसाठीं विलायतेंतील गिरण्यांतून कोरें कापड खरेदी करण्याच्या कामीं

रामभाऊंची नेमणूक केली व १८९३ च्या सुमारास त्यांस ते आपल्या बरोबरच विलायतेस घेऊन गेले. हें मोठ्या जबाबदारीचें काम असा व्यापार करणाऱ्या कोणत्याही कंपनीनें हिंदी गृहस्थावर आजवर सोंपविलें नव्हतें, तें रामभाऊंची योग्यता जाणून त्यांचेवर सोंपविल्यावर त्यांनीं तें इतक्या हुशारीनें, फायदेशीर रीतीनें व चोखपणें केलें कीं, तें पाहून कंपनीचे सर्व भागीदार आश्चर्य करीत असत. येथें असतांना त्यांस दरमहा ८०० रुपये पगार मिळत होता. विलायतेस गेल्यावर त्यांस तेथें १५०० रु. पगार मिळूं लागला. खरें पहातां त्यांची योग्यता, त्यांची कर्तबगारी व त्यांनीं कंपनीचें केलेलें हित यांचा विचार करितां हा पगार अगदीं अल्प होता. त्यांनीं जरी स्वतंत्र रीतीनें व्यापार केला असता तरी त्यांस ह्यापेक्षां अधिक प्राप्ति सहज झाली असती. परंतु ज्यांच्यापासून आपण विद्या शिकलों त्यांच्याशीं स्पर्धा करावयाचा नाहीं असा त्यांचा निश्चय होता. यजमान व त्यांचीं गिऱ्हाइकें ह्या उभयतांचें हित होईल व त्यांचे वाजवी हक्क सांभाळले जातील अशा तऱ्हेनें काम करण्याची हातोटी, त्यांस इतकी साधली होती कीं, तीमुळें उभयतांचाही त्यांच्यावर पूर्ण विश्वास बसून ते त्यांस आदरणीय झाले होते. रामभाऊंची सचोटी इतकी उच्च दर्जाची होती कीं आपल्या घरीं कांहीं लग्नकार्य प्रसंगआला असतां व्यापारी लोक नजराणा वगैरे देतील ह्या भीतीनें त्यांस ते आमंत्रणही देत नसत! परंतु पुढेंपुढें ह्या बाबतींत व्यापारी लोकांचें असमाधान त्यांच्या दृष्टीस पडलें तेव्हां त्यांस ते आमंत्रण करूं लागले; पण त्यांच्या कोणत्याही प्रकारच्या ओशाळगतींत न राहण्याचा आपला निश्चय त्यांनीं कायम ठेविला होता. त्यांचें व्यापारी वर्गावर किती वजन होतें त्यासंबंधानें एकदोन उदाहरणें येथें नमूद करण्यासारखीं आहेत. प्रार्थनासमाजानें पूर्वीपासून नायकीणींच्यासंबंधानें फार कटाक्ष दाखविला आहे. पूर्वीच्या काळीं कोणत्याही शुभ प्रसंगीं नायकिणींचें गाणें करविणें हें मोठें प्रतिष्ठितपणाचें लक्षण समजलें जात असे, हें ह्या पुस्तकांतही नमूद केलेलें आहे. प्रार्थनासमाजालाही अशा प्रकारचें गायन कोणीं आपल्या येथें करवूं नये असा ठराव सन १८७८ सालीं करावा लागला होता. त्यावरून ह्या प्रकाराचें बंड किती होतें त्याची स्पष्ट कल्पना होते. शिक्षणाचा ज्यांच्यांत प्रसार होऊं लागला होता अशा दक्षिणी लोकांनाही ज्या रूढीनें सोडिलें नव्हतें, त्या रूढीचा ताबा भाटये वगैरे व्यापारी लोकांवर किती असला पाहिजे, ह्याची सहज कल्पना करितां येण्यासारखी आहे. परंतु कापडाच्या मोठमोठ्या व्यापाऱ्यांवर रामभाऊंचें इतकें वजन असे कीं, व्रतबंध लग्नासारख्या मंगल प्रसंगीं

नाचाच्या ऐवजीं हरिकीर्तनाचा प्रघात ह्या लोकांत त्यांनीं पाडला. त्यांनीं प्रथमतः आपले मित्र रामदास भानजी ह्यांस आपल्या विचारांचा खरेपणा पटविला. नंतर त्यांसच पुढाकार देऊन ही चळवळ चालविली व ती यशस्वी केली. दुसरी गोष्ट १८९० सालीं संमतिवयाच्या बिलाविरुद्ध जेव्हां जोराची चळवळ सुरू झाली व सर्व देशभर ज्या वेळीं विरुद्ध सभा भरत होत्या त्या वेळीं बिलाच्या वतीनें जव्हेर बागेंत जी सभा झाली तींत रामभाऊंनीं जाऊन बिलाच्या तर्फे मत दिलेंच, परंतु सभेस ते जेव्हां गेले तेव्हां पुष्कळसे मोठमोठे भाटये व वाणी व्यापारी ते आपल्या बरोबर घेऊन गेले व त्या सर्वांनीं बिलाच्या तर्फे आपलीं मतें दिलीं ! रामभाऊंच्यामागें हा भलाथोरला तांडा आलेला पाहून लोकांना किती आश्चर्य वाटलें असलें पाहिजे याची कल्पनाच केली पाहिजे.

## प्रार्थनासमाजाची सेवा.

प्रार्थनासमाजामध्यें कालमानास अनुसरून नवीन पिढी दाखल झाली आहे. तशांतून रामभाऊ मृत्यूपूर्वी पुष्कळ वर्षें विलायतेंतच राहिल्यामुळें नव्या मंडळीपैकीं पुष्कळांस फार तर त्यांचें नांव ऐकून माहित आहे. त्यांच्याशीं प्रत्यक्ष सहवास झालेलीं माणसें सभासदांमध्यें आतां फार थोडीं आहेत. त्यांनीं निरनिराळ्या रीतीनें व एकनिष्ठपणें ह्या समाजाची व मातृभाषेची सेवा केली आहे तिची कल्पना आजच्या पिढीस नाहीं. ती करून देणें फार अगत्याचें आहे. त्याच्या योगानें पूर्व पिढींतील माणसांनीं प्रार्थनासमाजासाठीं कोणत्या प्रकाराची झीज सोसली आहे व कोणत्या प्रकारें प्रार्थना समाजाची सेवा केली त्याची कल्पना होईल. व त्या मानानें आजच्या पिढीचें स्थान कोठें आहे तेंही लक्ष्यांत येईल.

ज्या मूठभर गृहस्थांनीं प्रार्थनासमाजाची १८६७ सालीं स्थापना केली, स्थापना होण्यापूर्वी ज्यांनीं एकंदर परिस्थितीसंबंधानें परस्परांत पुष्कळ चर्चा केली, धर्माला आद्यस्थान दिल्यावांचून सर्व प्रकारच्या चळवळी व्यर्थ होत, किंबहुना सर्व चळवळींना धर्माचा पाया पाहिजे असें ज्यांना प्रथम वाटलें, प्रचलित धर्मामध्यें अतिशय भेसळ झाली आहे, शुद्ध धर्म नष्ट होऊन त्याच्या जागीं अवनत धर्म आला आहे अशी ज्यांची खात्री झाली त्यांत रामभाऊ होते. मामा परमानंदांबरोबर समाजासंबंधानें त्यांचीं नित्य संभाषणें व्हावींत. मामांच्या निकट सहवासाचा ज्यांच्या मनावर कायमचा परिणाम झाला व जो परिणाम आचरणाच्या रूपानें ज्यांच्या वर्तनांत पुढें आढळून येत असे त्यांत रामभाऊ

होते. विलायतेस जाईपर्यंत ते समाजाच्या व्यवस्थापक मंडळीचे सभासद निवडले जात. समाजमंदिर पाहून आम्हास आज आनंद होतो, व हें मंदिर पहिल्या सभासदांच्या अविश्रांत श्रमाचें, धर्मविषयक आस्थेचें, निरपेक्ष बुद्धीनें केलेल्या सेवेचें फल होय असें आम्ही समजतों. परंतु हें सुंदर मंदिर उभारण्याच्या कामीं खरें पाहतां चार पांच मंडळीची अविश्रांत खटपट कारण झाली. ह्या चार पांच मंडळींत रामभाऊ होते. मंदिराच्या खर्चासाठीं प्रत्येक प्रमुख सभासदानें आपलें एक महिन्याचें उत्पन्न दिलेंच होतें. परंतु अखेरीस तीन चार हजारांची तूट पडली त्यामुळें त्यावेळेचे समाजाचे खजिनदार मामा परमानंद काळजींत पडले असतां त्यांस चिंतेंतून मुक्त करण्यासाठीं जे तीन चार सभासद पुढें आले, त्यांत रामभाऊ होते. ह्यांनीं एक हजार रुपये देऊन मामांस काळजींतून सोडविलें.

व्यासपीठावरून उपदेश करण्याचें काम ते फारसे करीत नसत—फक्त तीन-चार वेळांच त्यानीं तें केलें असेल—परंतु तितक्यांतच त्यांची याहि कामीं प्रविणता दिसून आली. त्यांचीं धर्मपर व्याख्यानें फार विचारपरिप्लुत व मार्मिक असत. त्यांपैकीं एक “ मृत्यु ” या विषयावरील छापूनहि प्रसिद्ध झालें होतें.

सुबोध पत्रिका हें समाजाचें वर्तमानपत्र आजपर्यंत नुकसानानेंच चाललें आहे. हें नुकसान, पूर्वी समाजाच्या सभासदांपैकीं छापखान्याचे मालक जे असत ते सोशीत असत. म्हणजे प. वा. सदानंदराव पालेकर, रा. रा. मोरोपंत वाळवेकर यांनीं तें बरेंच वर्षें सोसलें. परंतु रामभाऊंचा स्वतःचा छापखाना नसतांहि त्यांनीं ही जबाबदारी कांहीं वर्षें आपल्या आंगावर घेतली होती. हें काम समाधानकारक रीतीनें व्हावें म्हणून त्यांनीं एक पगारी संपादक ठेवेला होता. व छापखान्याच्या कामाची व टाइपांची माहिती स्वतः इतकी करून घेतली कीं तशी खुद्द छापखान्याच्या मालकांना क्वचितच असते.

रामभाऊंना गाण्याचा नाद असे. गायनशास्त्राचें त्यांनीं शास्त्रोक्त ज्ञान करून घेतलें होतें. परंतु त्यांत आपली गति उत्तम प्रकारें झालेली नाहीं असें त्यांस वाटे. त्यामुळें ते कधीं चारचौघांत गात नसत. तथापि प्रोफेसर रामकृष्णपंत भांडारकरांनीं समाजाच्या उत्सवांत कीर्तन करण्यास जेव्हां सुरवात केली त्या वेळीं त्यांस साथ करण्यासाठीं मामा परमानंदांच्या आग्रहावरून रामभाऊ प्रथम एक दोन वर्षें त्यांच्यामागें उभे राहात असत. धर्मपर कविता रचून ज्यांनीं आपल्या समाज-

बंधुभगिनींची सेवा उत्तम प्रकारें बजावली आहे त्यांत रामभाऊंची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. त्यांस कविता करण्याचा नाद असे. आणि आमच्या संगीतामध्यें जीं आधुनिक पद्यें आहेत त्यांत रामभाऊंची पुष्कळ पद्यें* आहेत. आणि ह्या पद्यांतील कांहीं पद्यें प्रार्थनासमाजाशीं निकट संबंध असणारांच्या फार आवडीचीं व नित्य परिचयाचीं अशीं आहेत. 'प्रभुराय तो या गडे संपादूं' 'ध्याऊं या सत्य सनातन' 'विसरुनि क्षणभरी विषया' इ. त्यांच्या सुरस व आध्यात्मिक भाव जागृत करणाऱ्या पद्यांच्याद्वारें रामभाऊंनीं सभासदांची उत्तम प्रकारें सेवा बजाविली असून त्यांच्या इतर सत्कृत्यांच्याबरोबर हीं त्यांचीं पद्यें त्यांची आठवण नेहमीं जागृत ठेवावयास कारण होणार आहेत. असो. प्रार्थना संगीताच्या आजपर्यंत सात आवृत्त्या निघाल्या. पूर्वींच्या प्रत्येक आवृत्तीच्या वेळीं रामभाऊंचें साहाय्य असे. सारांश, ते विलायतेस जाईपर्यंत त्यांचा प्रार्थनासमाजाशीं अत्यंतनिकट संबंध असे व सर्व कार्यांत त्यांचें साहाय्य असे. त्यांचा अनुभव व त्यांचा पोक्त सल्ला यांचा लाभ समाजास प्रत्येक महत्वाच्या प्रसंगीं मिळत असे.

## मातृभाषेची अप्रतिम सेवा.

रामभाऊंनीं मातृभाषेची जी सेवा केली आहे तिचें मूल्य करितां येणें शक्य नाहीं. १८६२ सालीं ते पदवीधर झाल्याचें वर आलेंच आहे. त्यांस मराठी काव्यरूप वाङ्मयाची फार आवड असे व ही अभिरुचो त्यांच्यांत डॉ. भांडारकर यांनीं रोपिली. म्हणून "ज्ञानदेवी" हा ग्रंथ त्यांस अत्यंत प्रेमभावानें व आदरानें अर्पण करितांना रामभाऊ म्हणतात "( डॉ. भांडारकर यांनीं ) महाराष्ट्र कवितेची अभिरुची मजमध्यें रोपिली व सिंचिली ( त्यांचा ) स्नेह व उदाहरण हीं बहुत वर्षें माझ्या बुद्धीस पुष्टिकर झालीं आहेत." म्हणून ज्ञानदेवी ग्रंथ त्यांनीं डॉ. भांडारकरांस अर्पण केला. १८८६ सालीं त्यांनीं तुकारामाची गाथा हा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्या वेळीं इंदुप्रकाशाची प्रत सर्वांस मिळण्यासारखी नव्हती म्हणून फार परिश्रम करून, पाठभेदांकडे लक्ष्य पुरवून व चांगल्या कोशासह त्यांनीं ही आवृत्ति प्रसिद्ध केली व त्यास तुकारामाचें वाचनीय चरित्रहि जोडलें. नंतर चार वर्षांनीं म्हणजे १८९० सालीं त्यांनीं रामदासाचे समग्रग्रंथ आपल्या बंधूच्या साहा-

---

* रामभाऊंनीं रचिलेल्या प्रार्थनासंगीतांतील पद्यांचे अंक पुढें दिले आहेत:— ५; २५; ३२; ३५; ३९; ४७; ४८; ७५; १२९; १५३; १५५; १६२; १६६; १७४; १८४; २१७; ३४५; ३५१; ३५७; आरती २.

घ्यानें छापून प्रसिद्ध केले. हे ग्रंथ अल्प किंमतीस लोकांस मिळावे म्हणून आपले मित्र व त्या वेळीं सुप्रसिद्ध असलेल्या इंडियन प्रिंटिंग प्रेसचे मालक रा. सदानंद पालेकर यांस स्वतंत्र टाइप पाडावयास सांगून त्या टाइपावर ह्या आवृत्त्या त्यांनीं छापविल्या. नंतर ज्ञानेश्वरीकडे त्यांचें लक्ष गेलें. ज्ञानदेवीची उत्तम प्रत तयार करण्यासाठीं त्यांनीं महत्प्रयास केले. देवस्थळी शास्त्रीबोवांच्या मदतीनें त्यांनीं शुद्ध प्रत तयार करण्याच्या कामास प्रारंभ केला. अनेक प्रती मिळविल्या व पुष्कळ मेहनत करून त्यांनीं हा ग्रंथ तयार केला. ज्ञानदेवांनीं हा ग्रंथ लिहिला, व कित्येक जुन्या पोथ्यांमध्यें ज्ञानदेवी असें ग्रंथाचें नांव आढळतें. "कर्त्याचें खरें नांव ज्ञानदेव त्या अर्थी ज्ञानदेवी टीका हेंच मूळचें नांव असणें संभवतें" म्हणून त्याच नांवाची त्यांनीं योजना केली. रामभाऊ उत्तम प्रकारचे चिकित्सक होते व ही चिकित्साबुद्धि जागृत ठेवून त्यांनीं ज्ञानदेवी संबंधाचा आपला उद्योग केला. प्रस्तावनेंत ते म्हणतात "मूळ ज्ञानदेवींत एकनाथाच्या काळापर्यंत ( तीनशें वर्षांत ) झालेला भ्रंश, एकनाथांनीं केलेली पाठांतराची दुरुस्ती, आणि त्यानंतर ३०० वर्षेंपर्यंत झालेले प्रमाद मिळून जो ब्रह्मघोटाळा झाला आहे त्यांतून मार्ग काढून ६०० वर्षां मागल्या मुळाचा खात्रीनें थांग लावणें कठीण आहे. एखादी कांहीं भिन्न पाठाची जुनी पोथी सांपडली, तर तीच अस्सल ज्ञानदेवी असें म्हणणें जोखमाचें काम होईल. हल्लींच्या स्थितींत साध्य गोष्ट ही आहे कीं हस्तलिखित पोथ्या जमा करून पाठांचा भरणा वाढवावा, ग्रंथकाराच्या वेळेस शब्दांचीं मूळरूपें कोणतीं होतीं, विभक्तीचीं, काळाचीं वगैरे रूपें कोणतीं होतीं या बाबींचा विवेचक बुद्धीनें ग्रंथाचें सूक्ष्म रीतीनें अध्ययन करून निर्णय करावा. शब्दांचीं रूपें व त्यांचे अर्थ ज्या निरनिराळ्या स्थळीं तीं आढळतात त्या स्थळांची एकवाक्यता करून ठरविणें हेंहि बारकाईनें केलें पाहिजे. हें करण्याचा मीं प्रयत्न केला आहे." तथापि इतके श्रम करून तयार केलेली आवृत्तीहि त्यांच्या मनाजोगती झाली नाहीं ! कारण ते म्हणतात "मजकडून झालेल्या प्रयत्नानें मूळ ज्ञानदेवीकडेस जाण्याच्या मार्गाचें आक्रमण अर्धें मुर्धें झालें असेल अशी मी आशा बाळगतों. राहिलेला मार्ग क्रमणें आहेच" ह्या ग्रंथाबरोबर ज्ञानदेवीचें व्याकरण व भाषेवर निबंध लिहिण्याचें रामभाऊंच्या मनांत फार होतें, म्हणून ज्ञानदेवी ग्रंथ १२ वर्षांपूर्वी छापून तयार झाला असतांहि १९०७ पर्यंत त्यांनीं प्रसिद्ध केला नाहीं ! बारा वर्षें अभ्यास करूनहि त्यांनीं अखेरीस म्हटलें आहे कीं 'हें काम करण्याची योग्यता येण्यास ग्रंथाचा जेवढा अभ्यास झाला पाहिजे तेवढा अभ्यास

झालेला नाहीं ' म्हणून ज्ञानदेवी जशी तयार होती तशी त्यांनीं महाराष्ट्रीयांस सादर केलीच, परंतु अधिक चांगली व निराळ्याच पद्धतीवर उत्तम आवृत्ति तयार करण्यासाठीं त्यांनीं आपल्याला साहाय्यक म्हणून एक पदवीधर मुद्दाम बरोबर विलायतेस नेले व ह्या नव्या आवृत्तीचें बहुतेक काम त्यांनीं पुरें केलें असें आम्हीं ऐकिलेंही. परंतु ती छापून काढण्यास ते वांचले नाहींत, एवढेंच केवळ नव्हे, तर त्यांच्या मृत्यूनंतर जे सर्व कागदपत्र सांपडले त्यांत तेवढी ज्ञानेश्वरीचीच प्रत सांपडली नाहीं व आतां ती मिळण्याची आशा नाहीं ! हें महाराष्ट्र भाषेचें मोठें दुर्भाग्यच होय. त्या कामीं त्यांस बरीच झीज सोसावी लागली. जवळ जवळ दोन तपें त्यांनीं श्रम केले, निरनिराळ्या प्रतींचें शोधन केलें व ही नवी प्रत तयार केली. कित्येक हजार रुपयांचा त्यांस खार लागला, तरी त्यांनीं हा उद्योग चालविला व बहुतेक पूर्णावस्थेसहि नेला. आणि अंतीं आपल्या श्रमांचें चीज झालेलें पहावयास ते वांचले नाहींत एवढेंच केवळ नव्हे, तर ती शुद्ध केलेली प्रतच गहाळ झाली !

पाश्चात्य विद्येचा लाभ मिळून ज्यांच्या मनावर सुपरिणाम झाला, व जे पुढें नांवलौकिकास चढले, ज्यांनीं आपली जबाबदारी ओळखून आपली स्वतःची कर्तबगारी दाखविली, त्यांत रामभाऊ होते. त्यांच्या ठिकाणीं अनेक गुण वसत होते. त्यांची ज्ञानाची आवड, त्यांची कृतज्ञता, प्रेम व उद्यमशीलता हे त्यांचे गुण अप्रतिम होते. ज्ञानदेवी हा ग्रंथ देवस्थळी शास्त्र्यांच्या सहायानें त्यांनीं तयार केला. पण एवढें सांगून त्यांची तृप्ती झाली नाहीं. शास्त्रीबोवांचें व आपलें गुरुशिष्यांचेंच खरें नातें होतें. म्हणजे त्या ग्रंथामध्यें जर कांहीं विशेष दिसत असला, तर त्याचें श्रेय देवस्थळी शास्त्रीबोवांस देणें योग्य आहे हें जाहीर रीतीनें कबूल करणें त्यांस अवश्य वाटलें. मराठी काव्यग्रंथाची गोडी त्यांस डा. भांडारकरांनीं लाविली. पण ज्या ग्रंथावर त्यांनीं दीडदोन तपें श्रम केले तो ग्रंथ त्यांस समर्पण करून आपले आद्य मार्गदर्शक ते असें जाहीर करण्याची त्यांस आवश्यकता वाटली. त्यांची उद्यमशीलताहि फार वाखाणण्यासारखी होती. आजच्या पिढींत त्यांच्या सारखीं उद्योगी माणसें विरळा आढळतात. त्यांनीं बारा बारा तास काम करावें. पण त्यांस त्याबद्दल कांहीं वाटूं नये. तसेंच एकदां कोणतेंहि काम हातीं घेतलें कीं तें उत्तम प्रकारें तडीस जाईपर्यंत त्यांस चैन पडत नसे. ते सतत कोणत्या ना कोणत्या उद्योगांत गढलेले असत. त्यांस विश्रांति कशी ती माहीत नसे. त्यामुळें नोकरीच्या कामांत कोणत्याहि प्रकारें कसूर न करितां त्यांस इतर कामें करावयास मुबलक वेळ सांपडत असे.

त्यांच्या सारखे खरे सेल्समन आजपर्यंत कोणी झाले नाहींत म्हणून वर म्हटलें आहे. त्याच प्रमाणें ते उत्तम शेतकरी, उत्तम ग्रंथकार होते. एंजिनिअरिंगचीहि बरीच माहिती त्यांस होती. स्वतःचें घर बांधीत असतां घरास लागणाऱ्या सर्व पदार्थांची इतकी चिकित्सापूर्वक खरेदी करीत कीं ती पाहून त्या त्या जिनसांच्या व्यापारी लोकांसही त्यांचें कौतुक व आश्चर्य वाटत असे. जवाहिरांची, तसेंच घोड्यांचीहि त्यांस चांगली पारख असे. सारांश, ते कोणत्याहि धंद्यांत पडले तरी त्यांत जिवापाड मेहनत करून व बुद्धीचा पूर्ण उपयोग करून प्राविण्य मिळवावयाचें हा त्यांचा बाणा असे. ह्यांचा स्वभाव कडक, सरळ आणि विनोदी असे. त्यांच्या विनोदी भाषणांतही त्यांची इतर बाबतींतील अक्कलहुशारी तेव्हांच दिसून येत असे. वर निर्दिष्ट केलेल्या त्यांच्या गुणांमुळें ते सर्वांस आदरणीय व पूज्य वाटत असत व त्यांचें वजन सर्व प्रकारच्या व्यापारी लोकांत फार असे. त्यांचें प्रथम कुटुंब निवर्तल्यावर सुमारें पंधरा वर्षें ते विधुरावस्थेंत होते. पुढें विलायतेंत जाऊन राहिल्यावर त्यांनीं तेथील एका सुशील बाईशीं द्वितीय संबंध केला. परंतु त्या बाईचा लाभ त्यांस फार वर्षें घडला नाहीं. ह्या बाई एकदां मुंबईस रामभाऊंबरोबर आल्या होत्या, त्यावेळीं व्यापारी मंडळीनीं त्यांचा मोठा सत्कार केला; बाईचा गौरव केला. ह्या बाई तर कुटुंबांतील सगळ्या मंडळीशीं एकजीव झाल्या होत्या.

रामभाऊंच्या चरित्रापासून आजची महाराष्ट्रांतील तरुण पिढी जर धडे घेईल तर ह्या पिढींतील तरुणांचें कोटकल्याण होईल. कारण, उद्यमशीलता, नेकी, चौकसपणा, महाराष्ट्र भाषाभिमान, महाराष्ट्रकाव्यशोधनाची आवड, धर्मनिष्ठा, चिकित्साबुद्धि, धोरण व दृढनिश्चय हे जे त्यांचे विशेष गुण त्यांची महाराष्ट्राला आज अत्यंत आवश्यकता आहे. परमेश्वर सर्वांचा मार्गदर्शक होवो.

---

## (५) बाळ मंगेश वागळे.

हर्षस्थानसहस्राणि भयस्थानशतानि च

* * *

न जातु कामान्न भयान्न लोभाद्धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः ॥
धर्मो नित्यः सुखदुःखे त्वनित्ये जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः ॥

---

संसारामध्यें सुख लाभतें त्याचप्रमाणें दुःखही भोगावें लागतें; संसारावर वक्रदृष्टि असल्यामुळें, संसार ही माया आहे, हा व्यर्थ पसारा आहे, इ० विचार रोमरोमामध्यें शिरल्यामुळें, 'सुख पहतां जवा पाडें' 'दुःख पर्वता एवढें' असें म्हटलें कीं तें पटल्यासारखें वाटतें. वस्तुतः जो कोणी शांतपणें विचार करील व आपल्या स्वतःच्या आयुष्याकडे पाहील त्याच्या सुखाच्या कांहींही कल्पना असल्या तरी, हर्षस्थानसहस्राणि हेंच त्याचा अनुभव त्याला सांगत आहे असें अनुभवास येईल. हाच बोध वरील व्यासोक्तींत उपदेशिला आहे व तो प्रार्थना समाजाच्या स्थापकांपैकीं एक जे रा. रा. बाळ मंगेश वागळे त्यांस मान्य होता.

बळवंतरावांचा जन्म सन १८३८ च्या सुमारास झाला. त्यांचे तीर्थरूप रा. रा. मंगेशराव वागळे हे एक मुंबईंतील सुखवस्तु गृहस्थ होते. बळवंतरावांचें प्राथमिक शिक्षण नेहमीं प्रमाणें झाल्यानंतर त्या वेळच्या वहिवाटीप्रमाणें त्यांचें पुढील शिक्षण एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें झालें. भांडारकर, रानडे, व वागळे हे अगदीं बरोबरीचे. कालेजांत त्यांचें शिक्षण बरोबरीनें झालें व बरोबरीनें हे परीक्षा पास झाले व पुढें असा योगायोग जमून आला कीं, ज्याप्रमाणें हे तिघेही कॉलेजांत एकत्र झाले होते त्याचप्रमाणें पुढें प्रार्थनासमाज व त्याचें कार्य ह्याच्या बाबतींत पुन्हा तिघेही एकत्र झाले! प्रार्थना समाजाच्या स्थापनेचा विचार ज्या वेळीं चालला होता त्या वेळीं हे तिघे एकत्र नव्हते. रानडे पुण्यास, भांडारकर रत्नागिरीस होते. तथापि येथें चाललेला विचार त्यांस मान्य होता. असो. बळवंतरावांचा व रानडे भांडारकरांचा कॉलेजांत शिकत असतां निकट संबंध येत असे व त्याचेंच पुढें दृढीकरण झालें. १८६२ सालीं बळवंतराव दुसऱ्या वर्गांत बी. ए.ची परीक्षा पास झाले. रानडे भांडारकरही त्याच वर्षी पदवीधर झाले. पुढें १८६५ सालीं रानडे व वागळे दोघेही एम. ए ची परीक्षाही बरोबरच पास झाले आणि १८६६ सालीं रानडे व वागळे दोघेही फर्स्टक्लासांत एलएल. बीची परीक्षा पास झाले. काय-

ह्याची आनर्सची परीक्षा दोघांनींही त्याच वर्षी दिली ! म्हणजे रानडे व वागळे हे आपल्या सर्व परीक्षा त्याच त्याच वर्षी पास होत गेले आहेत. त्यानंतर पुढल्या उद्योगामुळें दोघांचे मार्ग निराळे झाले. रानड्यांनीं सरकारी नोकरी पत्करिली व वागळे ॲडव्होकेटची परीक्षा झाल्यावर मुंबईत वकिली करूं लागले. ज्या वर्षी ते युनिव्हार्सिटीच्या परीक्षांतून मोकळे झाले त्याच वर्षी इकडे प्रार्थना समाजाच्या स्थापनेचा विचार चालू होता. व त्यांत ज्या थोड्या लोकांनीं निर्धारानें भाग घेतला त्यांमध्यें रा. बळवंतराव एक होते. हा विचार ता. १७ दिसेंबर १८६६ सालीं डा. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या घरीं चालू झाला. १८८३ सालीं मुंबई येथील प्रार्थनासमाजाची हकीकत म्हणून जें एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध झालें होतें त्यांत वरील दिवशीं डा. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या घरीं जमलेल्या मंडळीचीं नांवें आहेत. त्यांत बाळ मंगेश वागळे, भास्कर हरि भागवत, नारायण महादेव परमानंद अशा क्रमानें नांवें आहेत आणि पुढें १८८७ सालीं ता. १८ दिसेंबर रोजीं बळवंतरावांचा अंत होईपर्यंत ही त्रिमूर्ति एक विचारानें चालत होती. अर्थात सर्व बाबतींत मामांच्या विचारास योग्य मान मिळत असे हें निराळें सांगावयास नको. असो.

ह्या मंडळींच्या अनेक सभा भरून ज्या वेळीं प्रार्थनासमाजाच्या स्थापनेचा विचार कायम झाला, त्या वेळीं समाजाच्या चिटणीसाचें काम कोणीं करावें असा प्रश्न निघाला. त्या समयीं बळवंतराव पहिले सेक्रेटरी निवडले गेले. एकतर ते तरुण व नुक्तेच अनेक परीक्षांत सुयश संपादून मोकळे झाले होते व दुसरें असें कीं, प्रार्थनासमाजाचीं तत्त्वें व ध्येयें ह्यासंबंधानें त्यांच्या विचारांस स्थिरता आलेली होती. त्याचप्रमाणें आपल्या स्वतःच्या अनुभवावरून आजूबाजूची परिस्थिति ते जाणून होते. नवीन शिक्षण प्रसृत झालेल्या लोकांमध्यें धर्मासंबंधानें कोणत्या बाजूला कल आहे हेंही ते जाणत होते. म्हणून १८६७ सालीं जुलै महिन्यांत नियमांचा वगैरे खरडा ज्या वेळीं त्यांनीं सर्वांपुढें ठेविला त्या वेळीं लहानसें भाषण करितांना त्यांना असें सांगावें लागलें कीं, 'ही संस्था जी निघाली आहे तिचें मुख्य कारण असें कीं, नवशिक्षित मंडळीचा हिंदु धर्मावर व त्यांतील सर्व चालीरीतींवर विश्वास नाहीं; महमदी अगर ख्रिस्ती धर्म विचारास पटत नाहीं, म्हणून त्यांचा स्वीकार करतां येत नाहीं, त्यामुळें देवधर्म सुटला असें होतें. हें असें होणें इष्ट नाहीं. म्हणून पूर्ण विचार करून कांहीं मंडळीच्या अनेक सभा भरून, व त्यांत चर्चा होऊन, ही संस्था स्थापन झाली आहे. ही संस्था आज केवळ बीज-

रूपानें आहे. ह्या लहानशा बीजाचा मोठा वृक्ष व्हावा अशी आमची इच्छा आहे.' ह्यावरून बळवंतरावांची त्या वेळीं झालेली नेमणूक किती योग्य होती हें स्पष्ट होतें. पुढें बळवंतराव आपल्या उद्योगधंद्याला लागल्यावर त्यांस पूर्वीप्रमाणें फुरसूद मिळेनाशी झाल्यावर भास्करराव भागवत समाजाचे सेक्रेटरी झाले. मुंबईमध्यें ॲडव्होकेट ह्या नात्यानें वकिली करणारे रा. वागळे हेच पहिले हिंदु गृहस्थ होत. थोड्याच अवधींत त्यांनीं आपल्या धंद्यांत सुयश संपादिलें व सरकारनें त्यांची योग्यता जाणून त्यांस स्मालकाज कोर्टाचे जज्ज नेमिलें. इकडे बडोद्यास दादाभाई नौरोजी दिवाण झाले. त्यांस बडोद्यासाठीं आपल्या विश्वासांतील व कायदेज्ञान-पटु गृहस्थ बडोद्यास न्यायाधीश ह्या नात्यानें हवा होता. तेव्हां त्यांस बळवंतराव हे त्या कामास सर्वपरि लायक गृहस्थ वाटले व त्यांस आग्रहानें बडोद्यास घेऊन गेले. संस्थानामध्यें जाऊन नोकरी करण्यापेक्षां इकडे मुंबईंत राहून स्वतंत्रपणें धंदा करणें त्यांस अधिक पसंत होतें; परंतु केवळ दादाभाईच्या आग्रहामुळें ते गेले व तेथें गेल्यावर अल्पकाळानेंच त्यांस संस्थानी वातावरणाचा कंटाळा आला! सुदैवेंकरून स्वतः दादाभाईही तेथें फार दिवस राहिले नाहींत. त्यामुळें ज्याप्रमाणें त्यांनीं बळवंतरावांना बरोबर नेलें त्याप्रमाणें आपण स्वतः परत येतांना त्यांनीं बळवंतरावांना परतही आणिलें! येथें आल्यावर बळवंतराव परत आपला धंदा करूं लागले. ते कित्येक वर्षें इंडियन नॅशनल ॲसोशिएशनचे सेक्रेटरी होते. ते मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो होते. अखेरीस १८८७ सालीं डिसेंबर महिन्यांत सुमारें दोन आठवडे बळवंतराव आजारी होते व हें त्यांचें दुखणें वाढून ता. १८ दिसेंबर रोजीं त्यांस अकालीं देवाज्ञा झाली. मृत्युसमयीं त्यांचें वय अवघें ४९ वर्षांचें होतें.

बळवंतरावांस आपल्या अंगच्या गुणांचा विशेष प्रकाश पाडण्याची योग्य संधि येण्यापूर्वीच त्यांचेवर मृत्यूचा अकालीं घाला पडला. समाजाचे ते एक पुढारी होते व मंदिरामध्यें वारंवार उपासनाही चालवीत असत. ते मोठे प्रेमळ अंतःकरणाचे होते व निस्सीम मातृभक्त होते. मातेला कोणत्याही बाबतींत तिळ-मात्र दुखवावयाचें नाहीं असा त्यांच्या कृतसंकल्प असल्यामुळें पुष्कळ वेळां आपल्या स्वतःच्या विचारांविरुद्ध व केवळ मातेच्या संतोषाकरितां त्यांस वाग-ण्याचे प्रसंग येत. आध्यात्मिक उन्नतीसंबंधानें त्यांचे नित्य विचार चाललेले असत व ते स्वतः मननशील होते. एका उत्सवामध्यें मुख्य दिवशीं प्रातःकालीं त्यांनीं ईश्वरोपासना चालविली. त्या वेळीं त्यांनीं सांगितलें कीं, 'दिवसाचे जे निरनिराळे भाग त्यांमध्यें जसा प्रातःकाळ उत्तम, तसेंच वर्षाचे जे निरनिराळे भाग त्यामध्यें

प्रथम दिवसाचा जो प्रातःसमय तो अत्युत्तम म्हटला पाहिजे. एरव्हींच्या प्रातःसमयीं जे विचार धर्मोत्सुक लोकांच्या मनांत येतात तेच विचार नव्या वर्षाचे प्रातःकाळीं विशेष स्फुरणानें येतात. त्या वेळीं पहिला विचार सुदिन प्राप्त झाला म्हणून देवाचे आभार मानणें हा असतो. परंतु इंद्रियनिंद्रेतून ज्याप्रमाणें जागा झालों, त्याचप्रमाणें पापनिंद्रेतून जागा झालों आहें काय असा विचार ह्यावेळीं मनांत आला पाहिजे. केवळ जागें होऊन चालत नाहीं. जर जागा झालों तर पुण्याचे मार्ग स्वीकारावयास मी तयार आहें काय हा विचार पुढें येतोच. मन सांगतें कीं, परमात्मा परमेश्वर पवित्र पुण्यशील आहे, तुला त्याजवांचून दुसरें कोणी नाहीं. तर पवित्र होण्याची, पुण्यशील होण्याची तयारी कर. हे विचार मनांत आले म्हणजे मन वरवर जाऊं लागतें. जसें पक्ष्यांस उजाडलें कीं, वर आकाशांत जाण्याची स्वाभाविक इच्छा होते, घरटीं सोडून हवेंत फिरावेंसें वाटतें, मधुर ध्वनीचा उपयोग करून स्वतःस व इतरांस आनंदित करण्याची प्रेरणा होते, तद्वत मनाची स्थिति होते. वर दृष्टि करून मंगल स्वरानें प्रभूची स्तुति करावी अशी उमेद येते. शाळेंत जाणारीं मुलें ज्याप्रमाणें चांगला कित्ता घोटाळतात त्याचप्रमाणें पवित्रपणा, दयाळूपणा, पूर्णता यांचा कित्ता जो परमात्मा तो पुढें ठेवून आपलें वळण पवित्र करावेंसें वाटतें. त्याच वळणानें मन दृढ करावेंसें वाटतें... आपण सर्व एका प्रभूचीं लेकरें आहोंत हें लक्षांत ठेवून, भेद उपेक्षा हीं सर्व टाकलीं पाहिजेत व त्याबरोबर जें जें दुष्ट, नीच, मलीन, क्रूर, भयकारक तें तें काढून जें जें पवित्र उच्च, शुभ्र याचा स्वीकार, करून परोपकार, धर्म, ज्ञान आणि भक्ति प्रेम आणि सद्भाव, हीं आपलीं करून आपल्या आयुष्यक्रमांत चालण्यास सिद्ध झालें पाहिजे. म्हणजे ' देह जावो अथवा राहो । देवापायीं माझा भावो ' असा दृढ निश्चय होईल.'

## ( ६ ) भास्कर हरि भागवत.

प्रार्थनासमाजांतील आजच्या पिढीला ज्यांचें नांव फारतर ऐकून माहित असण्याचा संभव आहे, पण ज्यांच्या कामगिरीसंबंधानें त्यांस कांहींही कल्पना नाहीं, ते रा. रा. भास्कर हरि भागवत प्रार्थनासमाजाच्या आद्य सभासदांपैकीं एक होत. त्यांनीं आपल्या काळीं समाजाची पुष्कळ वर्षे मनोभावें सेवा केली व निरपेक्षबुद्धीनें समाजाचें काम एकनिष्ठेनें कसें करावयाचें याचा धडा घालून दिला हें लक्षांत घेऊन त्यांच्या चरित्राची जी माहिती मिळाली आहे तिच्या आधारें त्यांचें अल्प चरित्र येथें सादर करितों.

भास्कररावांचे तीर्थरूप हरिपंत हे जिल्हा रत्नागिरी ता० राजापुरपैकीं कशेळी गांवचे रहिवाशी. तेथें हे उपाध्यायाची वृत्ति करून रहात असत. त्यांस दोन चिरंजीव होते. रामकृष्णपंत व दुसरे भास्करराव. भास्कररावांचा जन्म १८३७ सालच्या सुमारास झाला असावा. रामकृष्णपंतांचें चिरंजीव प्रसिद्ध राजारामशास्त्री भागवत हे होत. रामकृष्णपंत मुंबईस नोकरीनिमित्त आलेले होते व त्यांना एका आफिसांत नोकरीही होती. म्हणून त्यांनीं आपल्या कनिष्ठ बंधूला शिक्षणासाठीं मुंबईसच आणिलें. कारण, त्या वेळीं कशेळी येथें शिक्षणाची कांहीं व्यवस्था नव्हती व स्वतः रामकृष्णपंत हे मुंबई शहरांत रहात असल्यामुळें ह्या शहरांत होत असलेला विद्येचा प्रसार पाहून आपल्या बंधूला आपण शिक्षणासाठीं येथें आणावें असें त्यांस वाटलें तर त्यांत कांहीं नवल नाहीं. येथें आल्यानंतर त्यांचें प्राथमिक शिक्षण नाना शंकरशेटच्या शाळेंत झाल्यावर इंग्रजी शिक्षणासाठीं त्यांस त्यांच्या बंधूंनीं एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें पाठविलें. तेथें त्यांचें शिक्षण होत असतांना त्यांचा व नारायण महादेव परमानंद यांचा संबंध जो जडला तो मामांच्या मृत्यूपर्यंत कायम होता. मामांच्या सद्गुणांचा व चारित्र्याचा ज्यांच्यावर कायमचा परिणाम झाला व ज्यांनीं मामांची योग्यता उत्तम प्रकारें जाणिली होती त्यांपैकींच एक भास्करराव होते असें म्हणावयास हरकत नाहीं. भास्कररावांची प्रवेश परीक्षा १८५९ मध्यें उत्तीर्ण झाल्यानंतर पुढील अभ्यासासाठीं त्यांच्या बंधूंच्या इच्छेनुसार त्यांचा एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें प्रवेश झाला. तेथें सुमारें दोन वर्षे अभ्यास केल्यावर परिस्थिति तितकी अनुकूल नसल्यामुळें त्यांस कॉलेज सोडावें लागलें. कॉलेज सोडल्यानंतर ते कांहीं दिवस एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें शिक्षक होते. शिक्षकाचें काम करीत असतांनाच त्यांस येथील स्माल-

काज कोर्टामध्यें दुभाष्याची ( Interpreter ) जागा मिळाली व २० आक्टोबर १८९४ रोजीं त्यांचा अंत होई तों ते ह्याच जागेवर होते.

भास्करराव जरी सरकारी नोकर होते, तरी सरकारची नोकरी करून द्रव्यसाधन केल्यानें आपली इतिकर्तव्यता झाली असें मानणारांपैकीं ते नव्हते. आपल्या देशाची त्या काळची स्थिति ते पहात होते. नव्या शिक्षणामुळें लोकांच्या विचारांमध्यें होणारें परिवर्तन ते अनुभवित होते. सुशिक्षितांमध्यें जुने विचार व आचार ह्यांच्यावरील श्रद्धा उडाली होती; परंतु नवीन पिढी श्रद्धाहीन निपजून देशाचें कल्याण व्हावयाचें नाहीं असें त्यांस वाटत होतें. १८६४ सालीं मुंबईमध्यें संपत्तीचा धूर कसा लोटला होता हें त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें होतें; आणि अमेरिकन वॉर संपतांच ह्याच मुंबई शहरावर चोहों बाजूंनीं कशी आपत्ति कोसळली होती व कालचीं संपत्तिमान माणसें आज कशीं धुळीस मिळालीं होतीं हें त्यांच्या दृष्टीपुढें होतें. हा सर्व प्रकार पाहून मुंबईंतील जीं थोडीं माणसें जागृत झालीं होतीं, त्यांपैकीं भास्करराव हे एक होते. त्यामुळें १८६६ सालीं जेव्हां कांहीं मंडळी प्रथम सामाजिक विषयांचा खल करण्यासाठीं जमूं लागली त्या सभांस भास्करराव हजर असत. त्या सभा जरी प्रथम सामाजिक प्रगतिपर विषयांची चर्चा करण्याकरितां झाल्या तरी अंतीं ऐहिक कल्याणावर विशेष दृष्टि ठेवून सामाजिक सुधारणेचीं कार्यें हातीं घेण्यापेक्षां परमार्थसाधनाकडे विशेष दृष्टि ठेवणें व त्या परमार्थसाधनामध्यें सामाजिक कार्यें येतील अशी वृत्ति ठेवणें हें योग्य होय असें शेवटीं ज्या मूठभर लोकांस वाटलें व ज्यांनीं प्रार्थनासमाज ह्या संस्थेची स्थापना करण्याचें ठरविलें त्यांमध्यें भास्करराव होते. आणि भास्करराव हे नुसते नामधारी सभासद नव्हते हेंही लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. प्रार्थनासमाजाच्या स्थापनेचा विचार होत असतां जी थोडी मंडळी जमत असत ती सर्व स्थापनेपर्यंत टिकून राहिली नाहीं. कांहीं बाहेर पडले. कांहीं दूर झाले. भास्करराव पहिल्यापासून हजर होते, नंतर पहिल्या सभासदांत त्यांनीं आपलें नांव घातलें व बहुतेक शेवटपर्यंत त्यांनीं प्रार्थनासमाजाची निरनिराळ्या रीतीनें सेवा केली.

ज्या वेळीं समाजाची स्थापना झाली, नियम वगैरे कायम झाले, त्या वेळीं भास्करराव समाजाचे सेक्रेटरी नव्हते; पहिले सेक्रेटरी रा. रा. बाळ मंगेश वागळे हे होते; परंतु नंतर कित्येक वर्षें ते सेक्रेटरी किंवा खजिनदार ह्यांपैकीं कोठलें तरी एक काम करीत होते. त्याचप्रमाणें १८८१ सालीं धर्मप्रचार व्यवस्थेचा विचार जेव्हां निघाला, त्या वेळीं आपल्या प्राप्तीपैकीं २ टक्क्याप्रमाणें दरमहा

धर्मप्रचारकार्यास देण्यास जे सभासद सिद्ध झाले त्यांत भास्करराव होते. जोंपर्यंत धर्मप्रचारव्यवस्थेचें काम चालू होतें तोंपर्यंत भास्कररावच त्याचे चिटणीस होते. धर्मप्रचारव्यवस्थेचे सर्व रिपोर्ट त्यांच्याच सहीचे आहेत. एवढेंच केवळ नव्हे तर १८९४ सालीं त्यांच्या मृत्यूनंतर धर्मप्रचार व्यवस्थेचें काम मागेंच पडलें व तें अंतीं समाजाकडे आलें ही हकीकत धर्मप्रचारव्यवस्थेच्या भागांत आलीच आहे. प्रार्थनासमाजाची स्थापना झाल्यानंतर त्याच्या विरुद्ध झालेली जी टीका तीस जें उत्तर प्रसिद्ध झालें आहे तें मामा परमानंदांच्या देखरेखीखालीं भास्कररावांचेंच असावें अशी कल्पना करावयास पुष्कळ जागा आहे. भास्करराव नित्य मामांच्या सहवासांत असत. ज्या वेळीं ज्ञानप्रकाश पत्रानें वेडीवांकडी टीका केली, त्या वेळीं नेटिव्ह ओपिनिअन पत्राच्या इंग्रजी बाजूचे संपादक मामा होते व प्रार्थनासमाजाच्या स्थापनेच्या पूर्वी व स्थापनेचा विचार मुकरर झाल्यानंतर नेटिव्ह ओपिनिअनमध्यें प्रतिमापूजनाविरुद्ध एक सरळ, व भारदस्त **संपादकीय** लेख आला होता; व शेवटीं, पुण्याच्या ज्ञानप्रकाशांतील लेखाला मुंबईच्या नेटिव्ह ओपिनिअनमध्यें प्रार्थनासमाजास अनुकूल उत्तर प्रसिद्ध झालें होतें. त्याचप्रमाणें त्या वेळच्या मंडळीमध्यें लेख वगैरे लिहिण्याची हौस भास्कररावांसच होती असें आम्हांस कळलें आहे. ह्या सर्व कारणांचा विचार करितां, सदरील लेख मामा परमानंदांच्या देखरेखीखालीं भास्कररावांनीं लिहिला असावा हेंच सयुक्तिक दिसतें. ज्ञानप्रसारक मासिकासाठीं ते वारंवार लेख लिहीत असत; त्याचप्रमाणें करसनदास मुळजी ह्यांनीं आपल्या विलायतच्या प्रवासाचें जें गुजरातींत पुस्तक प्रसिद्ध केलें आहे त्याचा मराठी भाषेंत तर्जुमा प्रसिद्ध झालेला आहे. हें भाषांतराचें काम भास्कररावांनींच केलें. यावरून त्यांस त्या वेळीं गुजराती भाषा उत्तम प्रकारें अवगत होती असें होतें. परंतु लेखक अगर ग्रंथकर्ते ह्या नात्यानें त्यांनीं जी सर्वांत मोठी कामगिरी केली ती मराठी भाषेंत राजा राममोहन राय ह्यांचें चरित्र लिहून होय अस आम्ही म्हणतों. आजही महाराष्ट्रामध्यें राजा राममोहन ह्यांचे चरित्राची माहिती नसणारीं सुशिक्षितांमध्येंही पुष्कळ माणसें सांपडतात. दरवर्षी हिंदुस्थानांतील अनेक भागांत राममोहन रायांची पुण्यतिथि साजरी होत असते; न्या. मू. रानडे व सर नारायण चंदावरकर यांच्या फार महत्त्वाच्या व्याख्यानांत राममोहन रायांच्या चरित्राचें रहस्य निवेदिलेलें आहे; मिस कॉलेट ह्यांनीं लिहिलेलें राममोहन रायांचें इंग्रजी चरित्र प्रसिद्ध आहे व मराठीमध्येंही रा. रा. केसकर ह्यांनीं लिहिलेलें चरित्र प्रसिद्ध झालेलें आहे. तेव्हां

इतकी सामग्री सिद्ध असतांना राजा राममोहन यांच्या संबंधानें गाढ अज्ञान असणारी मंडळी जर सुशिक्षितांमध्येंही आज सांपडते तर १८७५ सालीं ती किती असली पाहिजे याची कल्पना करणें कठिण नाहीं. हें चरित्र एका लहानशा इंग्रजी चरित्रावरून लिहिलें असावें. त्यांत राममोहन रायांच्या विशेष कामगिरीचें चांगलें वर्णन आहे. त्यावरून असं उघड होत आहे कीं, भास्कररावांनीं स्वतः राममोहनांच्या चरित्राची माहिती करून घेतली होती व ती माहिती महाराष्ट्रांतील लोकांस सादर केल्यानें त्यांच्या विचारांस चालना मिळेल व प्रार्थनासमाज व ब्राह्मसमाज ह्या संस्थांचें खरें स्वरूप काय असावें त्याची माहिती लोकांस सहज झाल्यानें समाजासंबंधाचे गैरसमज दूर होतील असें त्यांस वाटत होतें.

भास्कररावांनीं लिहिलेलें राममोहन रायांचें चरित्र आतां दुर्मिळ आहे. तथापि तें चरित्र वाचून असा ग्रह होतो कीं, त्यांनीं राममोहन रायांच्या चरित्राचें रहस्य जाणलें होतें, व राममोहनाच्या चरित्राच्या द्वारें भास्कररावांच्या चारित्र्याची आपल्याला चांगली कल्पना होते. ते म्हणतातः—

"राममोहन राय यानें स्वदेशीय लोकांची धर्मसुधारणा करावी म्हणून फार यत्न केले. ईश्वराच्या गुणांचें मनन करून, आपल्या उत्पन्नकर्त्याची आराधना आत्मभावानें करण्यास त्यांस प्रवृत्त करावें असा त्याचा मानस होता. हिंदूंतून मूर्तिपूजा नाहींशी करून टाकावी, आणि सर्वशक्तिमान जगन्नियंता परमेश्वर सुख आणि परमार्थ यांविषयीं सुप्रकाशक त्यांमध्यें प्रसृत करावें, हेंच तो आपल्या जिण्याचें सार्थक मानीत असे; आणि त्याच्या सिद्ध्यर्थ त्यानें आपली बुद्धि, काळ आणि धन या अवघ्यांचा खर्च केला. त्यास जितके अडथळे आले, तितक्या सर्वांचें त्यानें मोठ्या धैर्यानें आणि गांभीर्यानें निवारण केलें. या कार्यार्थ त्यानें द्रव्याचा जो व्यय केला, तो मोठ्या औदार्याचा होता. त्याची संपत्ति म्हणावी तर ती फार मोठी होती असें नाहीं, तरीही तिचा बहुत मोठा अंश त्यानें ह्या कार्यास लाविला. याच्या सारिखी उत्कंठा बाळगून श्रम घेणारा असा दुसरा सुधारणारा विरळाच झाला असेल. गृहस्थपणा, विद्वत्ता, लोकप्रीति, लीनता, उत्कंठा आणि स्वतंत्रता हे सर्व गुण त्याच्या ठायीं जसे एकत्र झाले होते, तसे दुसऱ्या थोड्या सुधारणारांमध्यें होते असतील. असा हा योग्य आणि प्रतापी पुरुष होऊन गेला."

× × × ×

"दुरभिमानापासून उपस्थित झालेल्या प्रचंड अडथळ्यांत जिनें जुमानिलें नाहीं अशी हिंमत; कधींही न थकणारी अशी उद्योगशीलता; छलनेसही न भिणारें असें नीतिधैर्य, सर्वांविषयीं सारखी अशी परोपकारबुद्धि; आणि अत्यंत परंतु आंधळी नव्हे अशी उत्कंठा, हे सर्व गुण एकत्र करून, देवभोळेपणा व दुराग्रह यांच्या दास्यापासून हिंदूंचीं मनें मुक्त करण्यास व सुयुक्त आणि उचित अशा धर्मतत्त्वांनीं तीं प्रकाशित करण्यास त्यानें ( राजा राममोहन राय ) श्रम केले."

"भारतवर्षीयांच्या स्थितींत आणि मतांत आतां जी सुधारणा होत चालली आहे तिचें बीजारोपण राममोहन रायाच्याच वेळीं होऊन, तिचा मोड आलेला त्यांनीं पाहिला. ह्या सुधारणारूप वृक्षास आतां कोंवळा पल्लव येऊन लहान लहान डहाळ्या फुटूं लागल्या आहेत. तर अशा वेळीं त्यास आपण पाणी घातलें, आणि तो जोर धरी असें केलें असतां तो लहानसा दिसतो, तरी पुढें कालानुसार मोठा होऊन सर्व देशभर विस्तारेल, आणि आपणास नाहीं तर आपल्या मुलांबाळांस तरी त्याचीं मधुर फळें भक्षावयास सांपडतील. त्याचा वाढ स्वभावतः मंदगति आहे, याजकरितां आपणास कदाचित् त्याची छाया मात्र मिळेल. त्याच्या फळाची अपेक्षा आपण करूं नये, तें काम आपल्या मुलांबाळांकडेस ठेवावें, तीं बहुत कृतज्ञतापूर्वक त्यांचा अमृतरस सेवन करितील. राममोहन राय जन्मला त्या वेळीं अशा अमृत वृक्षाचा मुळींच प्रादुर्भाव नव्हता; त्या वेळीं अंधकारमय अज्ञानरूप अरण्याचें गडप आच्छादन जन्मभूमीवर पडून तीस त्याचें एवढें घट्ट वेष्टण होतें कीं, त्यांतून ज्ञानरूप सूर्याच्या प्रखर किरणाचाही प्रवेश होण्यास बहुत प्रयास आणि काळ लागला......सूर्याच्या प्रखर किरणांमुळें बर्फ विरघळून जातें, तद्वत् ज्ञानाच्या किरणांनीं देवभोळेपणा विरघळत चालला. सुशिक्षित थोडे आणि अशिक्षित बहुत, यांच्यामध्यें भेदरूप रेघा मारिलेली राममोहन रायानें पाहिली आणि आतां तर ती रेघा फार मोठी झाली आहे व पुढें होत चालली आहे. जो अज्ञान आणि क्रूर देवभोळेपणा आज हजारों वर्षे ह्या आपल्या सुंदर देशाचें राज्य बळकावून बिचाऱ्या अनाथ लोकांच्या मनांवर पाहिजे तसा अविच्छिन्न जुलूम करीत आला, आणि जो प्राचीनकाळीं बौद्ध, मधल्या काळीं महंमदी आणि अर्वाचीनकाळीं ख्रिस्ती इ० अनेक शत्रूंच्या प्रचंड हल्ल्यांचें निमूटपणें निवारण करून, अजूनपर्यंत आपली गादी संभाळून राहिला आहे, त्याचा पाया समूळ उपटून टाकण्यास राममोहन रायानें प्रथमतः हात घातला. त्यापूर्वी कोणताही हिंदु असें करण्यास धजला नव्हता, किंवा हा विचार

कोणाच्या मनांतच आला नव्हता. आपल्या जुन्या अज्ञान समजुतींकडेस डोळे उघडून पहावयास स्वदेशीय लोकांस प्रवृत्त करणारा राममोहनराय हाच पहिला होय. त्यापूर्वी बहुतेक साधारण लोकांस वास्तविक शास्त्र काय हें जाणून घेण्याचीच मुळीं सवड नव्हती, आणि ब्राह्मण जो धर्म सांगत तो बहुधा मंत्र तंत्र पूजा अर्चा व्रतें इत्यादि बाह्योपचारापलीकडे थोडाच असे. परंतु राममोहन रायानें "एकमेवाद्वितीयं" या महान सत्याकडेस त्यांचे डोळे उघडिले, आणि अगदीं प्राकृत भाषांच्या द्वारें खरें धर्मसार समजण्यास मार्ग मोकळा करून दिला. परंतु अद्यापि झालें हें कांहींच नाहीं. सुप्रकाशाचा उदय मात्र झाला आहे. ज्यांस सुविद्या प्राप्त झाली आहे त्यांची संख्या फार थोडी आणि त्यांतूनही पुष्कळांच्या मनांत प्रकाश आणि अंधकार, सत्य आणि असत्य, यांचा एकत्र गोंधळ झालेला दिसतो. सामान्यजन अद्यापि अज्ञानसागराच्या लहरींतच डुबकळ्या खाताहेत. तथापि असो, सुप्रकाशाच्या किरणांनीं क्षितिज तर प्रकाशित करून टाकिलेंच; त्यापेक्षां तीं आज नाहीं तर उद्यां तरी चहूंकडेस पसरतील, आणि अज्ञान व देवभोळेपणाचा जो घट्ट थिजलेला जुना पर्वत आहे तो लवकरच विरघळून टाकितील. आतां शेवटीं ईश्वराजवळ आमची एवढीच प्रार्थना आहे कीं, राजा राममोहन रायासारिखे सुप्रकाशक आणि स्वदेशकल्याणेच्छु पुत्र आपल्या भरतवर्षिणी जननीच्या उदरीं पुष्कळ जन्मोत आणि आपले कोट्यवधि देशबंधु अज्ञानतिमिर, आणि देवभोळेपणा यांच्या अनुचित दास्यापासून त्वरित मुक्त होऊन खरा, सर्व शक्तिमान, अद्वैत असा जो परमात्मा त्यास ओळखून भजूं लागोत."

भास्करराव प्रार्थनासमाजाचे एक संस्थापक असल्यामुळें सर्व प्रागतिक, सामाजिक चळवळी संबंधानें त्यांची पूर्ण सहानुभूति होती हें निराळें सांगावयास नको. तथापि विधवाविवाहाच्या चळवळीकडे त्यांचें विशेष लक्ष्य होतें व बळवंतराव गोडबोले ह्यांच्या विवाहाच्या वेळीं भास्कररावांनीं त्यांस बरेंच साहाय्य केलें.

भास्कररावांचे स्नेही सर्व समाजाचे सभासदच होते. मामा परमानंदांस कचेरींतून परत येतांना रोज भेटल्यावांचून त्यांचा एकही दिवस जात नसे. तेथें समाजासंबंधानें सर्व विचारविनिमय होत असे. मामांच्या सहवासाचा लाभ जितका अधिक होईल तितका हवाच असें वाटणारांपैकीं भास्करराव होते. त्यांच्या दीर्घकाल टिकलेल्या आजाराच्या वेळींही भास्करराव मामांच्या सन्निध असत. मामांच्या निधनसमयीं त्यांच्या निकट जी अगदीं जवळची मंडळी होती तींत

भास्करराव होते. ह्यावरून त्यांचा व मामांचा संबंध कोणत्या प्रकारचा होता त्याची आपल्याला कल्पना होते. यांचे दुसरे स्नेही म्हणजे बाळ मंगेश वागळे, डा. आत्माराम पांडुरंग, रामभाऊ व दीनानाथ माडगांवकर हेच होत. त्यामुळें त्यांच्या भोंवतीं नेहमीं प्रार्थनासमाजाचेंच वातावरण असे असें म्हणावयास हरकत नाहीं. भास्कररावांमध्यें अनेक गुण लक्ष्यांत ठेवण्यासारखे होते. त्यांची समाजाच्या धर्मावर मनःपूर्वक भक्ति होती. आपल्या धर्माचा आपल्या कुटुंबांत प्रवेश व्हावा अशी त्यांची फार इच्छा होती. रोज सकाळीं भोजनापूर्वी मुलांना एकत्र करून प्रार्थना संगीतांतील पद्यें म्हणणें व प्रार्थना करणें हा त्यांचा नित्यक्रम असे. भजन, प्रार्थना केल्यावांचून ते अन्न ग्रहण करीत नसत. त्याचप्रमाणें त्यांचा परोपकाराकडे बराच कल असे. आपली स्वतःची श्रीमंती नसतांना त्यांनीं तीन चार दूरच्या आप्तांच्या मुलांस आपल्या खर्चानें वाढविलें. त्याचप्रमाणें एकदां एखादी चळवळ अगर एखादें काय चांगलें आहे अशी त्यांची खातरी झाली कीं ते सढळ हातानें पण आपल्या सामर्थ्यानुसार अशा कार्यास मोठ्या आनंदानें मदत करीत असत. त्यांनीं पुष्कळ वर्षें समाजाची सेवा निरपेक्ष बुद्धीनें केली व समाजाच्या पहिल्या व दुसऱ्या पिढींतील सभासदांमध्यें त्यांस न ओळखणारा व त्यांच्याविषयीं आदर नसणारा एकही सभासद नव्हता. त्यांचे एक चिरंजीव एम. ए. असून हल्लीं नाशिक हायस्कूलचे हेडमास्तर आहेत. ते प्रार्थनासमाजाचे हितचिंतक आहेत.

---

## (७) वामन आबाजी मोडक. *

**बाल्यवृत्त**—वामनराव मोडक यांचा जन्म कोंकणांतील एका गरीब अशा कुलीन घराण्यांत झाला. त्यांचे वडील मोरेश्वर ऊर्फ आबा हे प्रथमारंभीं श्रीवर्धन येथें आणि नंतर दापोलीजवळ जालगांव येथें राहात. हे लहानपणापासूनच वैराग्यवृत्तीचे असत. तथापि त्यांना आश्रय देणारे त्यांचे गोरे या नांवाचे आतेबंधू होते, त्यांनीं त्यांचें लग्न केलें. परंतु आबा हे संसारांत न राहतां बैरागी होऊन निघून गेले. अशा स्थितींत ते सुमारें दहा वर्षें तीर्थयात्रा करीत फिरत होते. त्यांचा कोणास शोधही नव्हता व ते घरीं परत येतील अशी त्यांच्या आप्तइष्टांस आशा नव्हती. परंतु पुढें एकाएकीं त्यांस आपल्या तरुण पत्नीची दया येऊन म्हणा किंवा कोणाच्या उपदेशानें म्हणा, वैराग्यवृत्ती धारण केल्याबद्दल उपरती होऊन ते परत संसारांत आले. तेव्हां त्यांच्या श्रीमंत आप्तांनीं त्यांस थोडी जमीन आणि व्याजबट्ट्यासाठीं थोडे पैसे देऊन घरदार थाटून दिलें. नंतर ते पत्नीसहवर्तमान दापोलीजवळ गव्हें येथें राहिले. ते संसारांत शिरले, परंतु त्यांची निरंतर साधुवृत्तीच असे. ते बहुधा स्नानसंध्येंत, पोथीपुस्तक वाचण्यांत आणि ईश्वरभजनांत काळ घालवीत. शेताभाताचें व देवघेवीचें लहानशा संसारास पुरेसें उत्पन्न येई, परंतु त्यांचा व्यापार बहुधा आंतबट्ट्याचाच असे. तथापि त्यांची पत्नी संसारदक्ष असल्यामुळें बरेंच चाललें होतें. या ठिकाणीं वामनराव यांचा जन्म ता० २१ सप्टेंबर सन १८३५ सालीं वामनद्वादशीच्या दिवशीं झाला. पुढें वामनराव आठ वर्षांचे होऊन त्यांची मुंज झाल्यावर त्यांचे वडील परलोकवासी झाले.

**अभ्यासक्रम**—वडील निवर्तल्यावर वामनराव थोडे दिवस दापोली जवळच लाडघर म्हणून गांव आहे तेथें माधुकरी मागून विद्याभ्यासार्थ राहिले होते. दोन तीन श्रीमंत आप्त त्यांस आश्रय देण्यासारखे असतां असें कां झालें हें कळत नाहीं. परंतु पुढील हकीगतीवरून कदाचित् त्यांच्या आईच्या निस्पृह स्वभावामुळें असें झालें असावें असें वाटतें. नंतर दापोली तालुक्यांतच आडें येथें बेहेरे

---

* वामनरावांचें चरित्र संपादकाला स्वतः लिहिण्याची आवश्यकता वाटली नाहीं. कारण, वामनरावांच्या नीतिधर्मपर व्याख्यानाला वामनरावांचें सुंदर संक्षिप्त चरित्र जोडलेलें आहे. तें रा. रा. रामचंद्र भिकाजी जोशी ह्यांनीं लिहिलेलें आहे. तेंच कांहीं भाग गाळून येथें दिलें आहे.

आडनांवाच्या आपल्या मावशीच्या घरीं ते व त्यांची आई अशीं जाऊन राहिलीं. यापुढें त्यांना हे बेहेरे आणि जालगांवचे गोरे यांचा चांगला आश्रय होता असें दिसतें. आडें व हर्णै येथें मिळून त्यांचा मराठी अभ्यास पुष्कळ झाला; आणि सोळाव्या वर्षीच त्यांचा विद्याभ्यास पूर्ण झाला असें ठरून ते हर्णैच्या कोर्टांत उमेदवारी करूं लागले.

या वेळीं दापोली येथें मिशनरी लोकांची इंग्रजी शाळा असे. एव्हांशींच नोकरीच्या भानगडींत न पडतां तेथें जाऊन आपण इंग्रजी शिकावें अशी वामनराव यांस इच्छा झाली. तिला गोरे यांचें पाठबळ मिळून ते जालगांवास गोरे यांकडे राहून दापोलीस इंग्रजी शाळेंत जाऊं लागले. तेथें सुमारें दीड वर्ष शिकणें झालें. मराठी भाषा, गणित, वगैरे विषय मराठी शाळेंतच चांगले झाले होते, व इंग्रजी शिकविणारे मिशनरी गुरु चांगले होते यामुळें इतक्या वेळांतच हल्लींच्या सहावे इयत्तेइतका इंग्रजीचा अभ्यास झाला. परंतु पुढें दापोलीस शिकण्याची सोय नव्हती यामुळें शिक्षणक्रम तूर्त इतकाच थांबला. आणि त्यांच्या आप्तांचे त्यांच्या इच्छेच्याविरुद्ध त्यांच्या लग्नाचे बेत होऊं लागले. लग्नासाठीं होणारा खर्च माझ्या शिक्षणासाठीं करा व माझ्या शिक्षणाची कांहीं तरी सोय करा असें त्यांनीं पुष्कळ सांगितलें, पण आईच्या वृद्धपणाच्या सबबीवर व पुढें तुझ्या शिक्षणाची व्यवस्था करूं असें त्यास आश्वासन देऊन, दापोली नजीक पालगड येथील अग्निहोत्री नारायण जोशी दीक्षित यांची कन्या मनूबाई हिच्याशीं त्यांचा विवाह केला, पण अभ्यासाची सोय झाली नाहीं! तथापि दापोली येथील मिशनरींच्या हाताखालीं असलेल्या पंडितापाशीं शिकून त्यांनीं आपल्या इंग्रजीच्या ज्ञानांत आणखी भर घातली. पण तेवढ्यानें त्यांचें समाधान झालें नाहीं व अखेरीस कित्येक हितचिंतकांच्या साहाय्यानें १८५५ सालीं ते मुंबईस आले. त्यापूर्वी त्यांच्या आईनें त्यांना मोठ्या कष्टानें जावयास परवानगी दिली व वर खर्चासाठीं १० रुपये दिले! त्या वेळीं कोंकणाहून मुंबईस येणें फार त्रासाचें होतें परंतु हाल, त्रास, कष्ट यांस न जुमानतां वामनरावांना मुंबई गांठली. कोण ही ज्ञानलालसा! दोन वर्षे मुंबईस आल्यावर त्यांस शिकवण्या वगैरे करून मोठ्या हालांत काढावीं लागलीं. १८५७ सालीं त्यांना एका पारशी विद्याफंडांतून मोठी स्कॉलरशिप मिळाली. एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्यें त्यांचें शिक्षण काळजीवांचून होऊं लागलें व १८५९ सालीं ते पहिली मॅट्रिक्युलेशन परीक्षाही उतरले.

या वेळचे वामनराव यांचे सहाध्यायी न्या. मू. रानडे, बाळ मंगेश वागळे, जनार्दन सखाराम गाडगीळ, अंबालाल साखरलाल देसाई, कृष्णाजी बापूजी

बाळ वगैरे होते. डा० भांडारकर हे या मंडळीच्या वरच्या वर्गांत होते. कुंटे, रा० विठ्ठलराव पाठक वगैरे मंडळी यांच्याच वेळीं पण अन्य कालेजांत शिकत होती. त्या वेळचे शिक्षकही मोठे विद्वान असे इंग्रज, हिंदू आणि पारशी गृहस्थ होते.

या वेळची वामनराव यांची अभ्यास करण्याची तऱ्हा कशी होती याचें थोडें वर्णन केलें पाहिजे. आरंभीं शिकवण्या शिकवाव्या लागत त्या वेळीं अभ्यासास वेळ फार कमी सांपडे; पुढें जरा जास्त वेळ मिळूं लागला. जेवण्यासाठीं खाणावळींत गेल्यानें खर्च फार होई, वेळ मोडे आणि जेवणही चांगलें मिळत नसे. यामुळें वामनराव आणि त्यांचे आप्त कृष्णाजी बापूजी व केशव बापूजी बाळ हे पुष्कळ दिवस स्वतां स्वयंपाक करीत असत. एकेकानें पाळीपाळीनें चुलीची आराधना करावी व दुसऱ्यांनीं जवळ बसून जे विषय सर्वांना सारखे असतील त्यांचीं पुस्तकें वाचावीं आणि स्वयंपाकाची आवांतर तयारी करून द्यावी असें चाले. शिवाय जिन्नसपान्नस आणणें आणि धोत्रें धुणें वगैरे ज्याचें त्यासच करावयाचें असे. ही सर्व व्यवस्था हल्लींच्या काळच्या विद्यार्थ्यांनीं लक्षांत ठेवणें योग्य आहे.

**विद्वत्ता आणि व्यासंग**—वामनराव यांची सन १८६० सालीं एफ्. ए. ची आणि सन १८६२ सालीं बी. ए. ची परीक्षा झाली. ही बी. ए. ची अगदीं पहिलीच परीक्षा होय. पुढें त्यांस पुण्याच्या कालेजांत फेलो नेमिलें. त्यांच्याबरोबरच डा० भांडारकर यांना सीनियर फेलो नेमिलें. या वेळीं पुण्याचें कालेज विश्रामबागेंत होतें. पुण्याच्या कालेजांत ते दोन वर्षें फेलो होते. त्या वेळीं त्यांनीं एम. ए. चा अभ्यास केला. त्या परीक्षेसाठीं यांनीं इंग्रजी भाषा व संस्कृत भाषा हे विषय घेतले होते. या वेळीं त्यांनीं बाळशास्त्री देव आणि गंगाधरशास्त्री दातार या दोन प्रख्यात संस्कृत पंडितांजवळ व्याकरण, साहित्य, वेदान्त आणि न्याय या शास्त्रांचा जुन्या तऱ्हेनें अभ्यास केला. त्यांत विशेषतः शारीरभाष्य व उपनिषदें यांचा अभ्यास विशेष होऊन त्या अध्यात्म विषयांची त्यांना तेव्हां जी गोडी लागली ती शेवटपर्यंत कायम होती. वेदान्त विषयाचा जुन्या व नव्या अशा दोन्ही तऱ्हेनें विचार केलेली जी आमची कित्येक मंडळी होऊन गेली त्यांतले वामनराव हे होते.

इंग्रजी ग्रंथांमध्यें त्यांच्या शिक्षकाच्या धंद्याला अनुरूप असे गद्यपद्य ग्रंथ त्यांनीं वाचले होते. इंग्रजी कवी वर्डस्वर्थ याचीं काव्यें त्यांना फार आवडत.



वामन आबाजी मोडक

शेक्सपियर कवीचीं नाटकें त्यांनीं वाचलीं होतीं. इंग्लंडदेशाच्या व ग्रीक व रोमन लोकांच्या इतिहासावरचे सर्वमान्य ग्रंथ त्यांनीं वाचले होते. युरोप खंडांतील धार्मिक व सामाजिक उलाढालींच्या इतिहासाच्या संबंधी ग्रंथांचें ते नेहमीं परिशीलन करीत. ख्रिस्ती धर्माच्या मुख्य मुख्य ग्रंथांची त्यांना आवड असे. तसेंच ख्रिस्ती ग्रंथकारांनीं अध्यात्मपर लिहिलेले ग्रंथ नेहमीं त्यांच्या वाचनांतले असत. धर्मविचारासाठीं त्यांनीं कुराण आणि यहुदी लोकांचे धर्मग्रंथ, पारशी लोकांचे धर्मग्रंथ, आणि बौद्धधर्माचे मुख्य मुख्य ग्रंथ हेही अवलोकन केले होते. मात्र हें अध्ययन इंग्रजी भाषेच्या द्वारें झालें होतें. देशभाषांपैकीं सिंधी भाषेंत त्यांनीं परीक्षा दिली होती, परंतु तिची ओळख पुढें राहिली नाहीं. बंगाली व गुजराथी या भाषा त्यांना चांगल्या येत होत्या. गुजराथीमध्यें तर वामनराव उपासना चालवीत व व्याख्यानें देत असत. बंगाली भाषेंतील ब्राह्म-धर्मविषयक ग्रंथ आणि व्याख्यानें यांतील विचार त्यांनीं आपल्या लेखांत आणिले आहेत व व्याख्यानांतही येत असत. शिक्षणाच्या कामांत अवश्य असणाऱ्या पुस्तकांखेरीज त्यांचें वाचन धर्मपर व अध्यात्मपर ग्रंथांचें चालत असे. मराठी कवींमध्यें त्यांना ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर व तुकाराम हे फार प्रिय असत. मोरोपंत, श्रीधर आणि रघुनाथपंडित यांच्या ग्रंथांचीही त्यांना आवड असे. त्यांतही ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत आणि तुकारामाचे अभंग यांचें वाचन त्यांना निरंतर प्रिय असे. तुकारामाचे बरेचसे अभंग त्यांस तोंडपाठ होते. त्यांनीं इंग्रजी, संस्कृत आणि मराठी ग्रंथांचा मोठा संग्रह केला होता.

**सरकारी नोकरी**—पुण्याच्या कॉलेजामध्यें वामनराव हे सुमारें दोन वर्षें फेलो होते. नंतर सन १८६४ सालीं त्यांस पुणें हायस्कूलमध्यें फर्स्ट असिस्टंट नेमलें. सन १८६७ सालीं ते सिंध हैदराबादच्या हायस्कूलचे हेडमास्तर झाले. तेव्हांपासून शेवटपर्यंत ते हायस्कूलच्या मुख्य हुद्यावरच होते. त्यांनीं धारवाड, रत्नागिरी, सुरत आणि पुणें येथील हायस्कुलांवर हेडमास्तरचें काम केलें. मध्यंतरीं सन १८७० सालीं त्यांस मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कुलावर व्हाईस प्रिन्सिपाल नेमलें होतें. ही जागा नेटिव गृहस्थास अशी प्रथम यांनाच मिळाली. सन १८८२ सालीं त्यांस एल्फिन्स्टन हायस्कूलचे प्रथमतः ॲक्टिंग प्रिन्सिपाल नेमलें व ते लागलेच तेथें कायम झाले. ते शेवटपर्यंत याच जागेवर होते. ही जागाही यापूर्वी नेटिव गृहस्थास कधींच मिळाली नव्हती व यांना जागा दिली हें पुष्कळांस—विशेषतः बऱ्याच युरोपियन व पारशी लोकांस—आवडलें नाहीं.

तथापि त्यांना जागा देणारे डायरेक्टर मि. चाटफिल्ड हे मोडक यांची योग्यता जाणत होते; आणि मोडक यांनीं ही जागा योग्य नेटिवास देण्यास हरकत नाहीं असें आपल्या काम चालविण्यानें उत्कृष्ट रितीनें दाखवून दिलें. या जागीं मोडक हे दहा वर्षें होते. त्यांनीं सन १८९३ च्या जानेवारींत पेनशन घेतलें आणि पुण्यास राहण्याचा संकेत केला.

**त्यांची शिस्त**—वामनराव यांस त्यांच्या कामांत उत्तम यश आलें व उत्कृष्ट शिक्षक अशी त्यांची ख्याती झाली, याला कारण त्यांची उत्तम शिस्त म्हणजे व्यवस्थेशीरपणा हें होतें. शाळेमध्यें त्यांचें नेहमीं अगदीं वरच्या वर्गापासून खालपर्यंत लक्ष असे, आणि प्रत्येक शिक्षक आणि नोकर-चाकर यांचें काम त्यांच्या ध्यानांत असे. ते स्वतां चांगलें काम करून दाखवीत, यामुळें त्यांचा सर्वांस कित्ता असे. प्रत्येक काम वेळच्यावेळीं करावयाचें, हें त्यांचें मुख्य धोरण असे. प्रत्येक शिक्षकास ते योग्य काम नेमून देत, आणि शाळेंतील सर्व मुलें व त्यांची योग्यता त्यांच्या लक्षांत असे. आपण स्वतां आणि फर्स्ट असिस्टंट यांनीं मिळून शाळेंतील सर्व वर्ग रोजच्यारोज पाहिलेच पाहिजेत, असा त्यांचा नियम होता; आणि आपण व फर्स्ट असिस्टंट मिळून अगदीं तिसऱ्या इयत्तेपयत इंग्रजी भाषांतर किंवा दुसरा एकादा विषय नियमानें घेत असत. शिक्षक आणि विद्यार्थी यांना वामनराव यांची व्यवस्था अगदीं प्रथमारंभीं कडक वाटे; परंतु त्या व्यवस्थेचें मर्म कळून आलें म्हणजे ती सर्वांस आवडत असे. त्यांचा अंमल मुलांच्या पालकांस आणि शिक्षकांस प्रिय असे. शिक्षक व मुलें यांमध्यें कांहीं तक्रार उत्पन्न झाल्यास ते बहुधा शिक्षकाचे पक्षपाती असत. परंतु यांत खरोखरी मुलाचा अपराध किती आहे, शिक्षकानें उगाच आपला अंमल गाजविला आहे कीं काय हें ते पाहात, आणि त्यांच्या अनुभविक नजरेला खरा प्रकार तेव्हांच दिसून येत असे. मग अमुक एक कामांत शिक्षकाला कांहीं सांगितलें पाहिजे असें नजरेस आल्यास ते त्याला खासगी रीतीनें सांगत. अशा वर्तनामुळें वामनरावांच्या शाळेंत सर्व ठिकाणीं शिक्षकांचा उत्तम मान राही, आणि मुलें शेफारलेलीं नसत.

वामनराव यांस कोणत्याही ठिकाणीं नेमिलें तरी ते शिस्तवार काम चालवितील अशी त्यांच्याविषयीं मि० चाटफील्ड डायरेक्टर यांची पूर्ण खात्री असे. यामुळें असा कामगार आपल्या खात्यांत निरंतर असावा, आणि ज्या जागांवर केवळ शिस्तीसाठीं युरोपियनच नेमला पाहिजे अशी समजूत असे त्या जागे-

वरही वामनराव काम करितील, अशी चाटफील्ड यांची खात्री असे. यामुळें त्यांनीं वामनराव यांस डेप्युटी कलेक्टरची जागा पत्करूं दिली नाहीं. त्याचप्रमाणें त्यांनीं पुणें ट्रेनिंग कालेजाच्या प्रिन्सिपालची आणि एज्युकेशनल इन्स्पेक्टरची जागा मागितली. तीही न देतां मि० चाटफील्ड यांनीं त्यांस हेडमास्तरच्या मोठ्या जागेसाठींच निवडून ठेविलें होतें. "या जागा तुमच्या उपयोगी नाहींत. तुम्ही हेडमास्तरच्या जागेलाच योग्य आहांत, आणि हेडमास्तराचीच बढतीची जागा मी तुम्हांस देणार आहें." असें मि० चाटफील्ड यांनीं त्यांस स्पष्ट सांगितलें. त्याचप्रमाणें प्रथमतः त्यांस एल्फिन्स्टन हायस्कूलच्या व्हाइस प्रिन्सिपालची जागा जी नेहमीं युरोपियन गृहस्थासच देत, ती दिली. नंतर सुरत हायस्कूलची जागा दिली. या जागेवरही मोडकांचे अगोदर एतद्देशीय गृहस्थ कायमचा नेमला नव्हता. त्यावेळीं चारशें रुपये किंवा त्याहून जास्त पगाराची हेड मास्तरची जागा बहुधा एतद्देशीयास देत नसत. परंतु या जागांस नेटिव मुळींच अयोग्य नाहींत असें चाटफील्ड यांनीं अनुभवानें दाखवून दिलें, आणि तो अनुभव घेण्यास वामनराव हे त्यास योग्य कामगार मिळाले. वामनराव यांस मुंबईची जागा दिली, तेव्हांच माधवराव कुंटे यांस पुण्याची जागा (ही देखील प्रथमतःच नेटिव गृहस्थास) दिली. पुढें एल्फिन्स्टन हायस्कूलची जागा रिकामी झाल्यावर त्या जागेवर वामनराव यांस प्रथमतः ॲक्टिंग व नंतर कायमचें नेमलें. त्या जागेवर एतद्देशीय गृहस्थ उपयोगी नाहीं असें पुष्कळांचें मत होतें. यामुळें वामनराव कसें काम करितात, हें पुष्कळजण उत्सुकतेनें पाहात होते. कित्येकांनीं तर त्यांच्या कामांत मुद्दाम अडचणी आणण्याचे प्रयत्नही केले. परंतु अखेरीस वामनराव हे यशस्वी झाले. एल्फिन्स्टन हायस्कूल म्हणजे वास्तविक मराठी शाखा आणि गुजराथी शाखा अशा दोन निराळ्या शाळा आहेत. त्यावर बरींच वर्षेंपर्यंत दोन प्रिन्सिपालही असत. या शाळेंतील दक्षिणी व गुजराथी मुलें यांमध्यें पोरस्वभावाप्रमाणें आपसांत बरीच चुरस असते; त्यांतही पारशी मुलें स्वाभाविकच द्वाड असतात; आणि मुंबईंतील गुजराथी मुलें आणि बरींच दक्षिणी मुलेंही बहुधा श्रीमंतांची असतात. यामुळें तेथें शाळेंतील पोरांचे तंटेबखेडे, चुरशी, आणि शिक्षकांशीं दांडगाईचें वर्तन या गोष्टी थोड्या जास्त प्रमाणावर चालतात. वामनराव यांच्या वेळीं देशी प्रिन्सिपाल आला म्हणून या गोष्टींना जास्त उत्तेजन आलें. परंतु वामनराव यांनीं हे तंटेबखेडे मुळींच मोडून टाकून सर्वांना उत्तम शिस्त लाविली. एकदां मधल्या सुटींत बराच मोठा दंगा होणार

असा धुमार दिसला. तेव्हां वामनराव जिन्यावर येऊन उभे राहिले आणि आपल्या मोठ्या आवाजानें सर्वांस आपापल्या उद्योगास जाण्याला त्यांनीं हुकूम केला. तेव्हां त्यांची ती गंभीर मुद्रा पाहून आणि सक्त आज्ञेचा आवाज ऐकून सर्व मुलें जिकडल्या तिकडे निघून गेलीं. वामनराव यांनीं लगेच असा शिस्त-वार बंदोबस्त करून टाकिला कीं त्यानंतर कधीं दंग्याचें किंवा अव्यवस्थेचें नांवही ऐकूं आलें नाहीं. वामनराव रत्नागिरीस हेडमास्तर असतांना त्यांच्या हाताखालीं विष्णुशास्त्री चिपळूणकर बदलून गेले. त्यांनीं आपल्या मित्रास लिहि-लेल्या मजकुरावरून त्यांस देखील वामनरावांची शिस्त निर्दोष वाटली असें दिसून येईल.

"येथें येऊन मला फार आनंद झाला. मी पुण्याच्या अव्यवस्थेंतून आणि घोटा-ळ्यांतून निघून येथें उत्कृष्ट व्यवस्थेमध्यें आलों आहें, असें मला स्पष्ट दिसत आहे. येथें काम करण्यास मला फार उत्साह वाटत आहे." सभ्यपणा, सौजन्य, उत्तम शिस्त आणि प्रत्येक कामाची नीटनेटकी व्यवस्था या गोष्टींच्या संबंधानें वामनराव यांचा सर्वत्र मोठा लौकिक झालेला होता.

वामनराव यांच्या शिस्तीचें जें हें वर्णन केलें आहे, त्यावरून कोणास असें वाटेल कीं ते मुलांना वारंवार शिक्षा करीत असतील अथवा छडीचा उपयोग फार करीत असतील. परंतु तसा प्रकार बिलकुल नसे. ते स्वतां छडीचा उपयोग करीत नसत. आणि त्यांस मारकटपणा आवडतही नसे. त्यांची नुसती गंभीर मुद्रा आणि करडी नजर आणि स्वतांची शिस्तवार वागणूक यांच्या योगानें सर्वांना शिस्त लागत असे.

**त्यांचे लोकोपयोगी उद्योग**—वामनराव यांनीं ग्रंथरचना वगैरे कांहीं केलेली नाहीं. शाळेंतलें काम आणि लोकहिताकरितां हातीं घेतलेले सामाजिक व धार्मिक उद्योग, ह्या गोष्टी ते अगदीं मन लावून करीत, यामुळें त्यांना व्यवस्थित ग्रंथरचनेस वगैरे फारसा वेळच कधीं मिळाला नाहीं. रत्नागिरीस असतांना त्यांनीं उपनिषदें, शारीरभाष्य, महाभारत वगैरे ग्रंथांचा अभ्यास फार केला. वामनराव आणि जनार्दन बाळाजी मोडक व नरसिंह शास्त्री घांटे यांनीं मिळून उपनिषदें आणि महाभारत हे ग्रंथ निरनिराळ्या प्रतींवरून वाचून त्यांतील विषयांची आणि नांवांदिकांची सूची करण्याचें काम चालविलें होतें. परंतु तें काम पुढें पूर्ण झालें नाहीं. उपनिषदें मराठींत सोप्या भाषेंत तयार करण्याचा त्यांचा उद्देश होता,

आणि कित्येक उपनिषदें तशा रितीनें त्यांनीं तयारही केलीं होतीं; त्यांनीं भगवद्गीतेचें श्लोकांत व ओवींत असें भाषांतर केलें होतें. या उद्योगाच्या संबंधाचे लेख लिहिलेल्या वह्या सांप्रत उपलब्ध होत नाहींत, ही दिलगिरीची गोष्ट आहे. ईश्वरप्रार्थनेला गाण्याचें साह्य मोठें होत असतें, यामुळें रत्नागिरीस असतांना त्यांनीं मुद्दाम गवई ठेवून गाण्याचा अभ्यास केला; आणि गवयाच्या साह्यानें जुन्या चिजांवरून मराठींत प्रार्थनापर आणि उपदेशपर अनेक पदें * रचलीं, तीं बहुतेक उपलब्ध आहेत. कोणतेंही पद पाहिजे त्यास ठरलेल्या खुणांवरून जसेंच्या तसें म्हणतां यावें म्हणून पदें व चिजा लिहून काढण्याची त्यांनीं पुष्कळ खटपट केली; आणि गाणें लिहिण्याची एक मोडणी ठरवून त्या मोडणीप्रमाणें आपण केलेलीं पदें लिहून काढलीं होतीं. परंतु त्या वह्याही कोठें सांपडत नाहींत. वामनराव यांचीं पदें व इतर कविता प्रार्थनासंगीत या पुस्तकांत पुष्कळ आहेत.

ते प्रार्थनासमाजाच्या उत्सवप्रसंगीं पुष्कळदां कीर्तनें करीत. त्यांना गाण्याचें अंग होतें, जुन्या संस्कृत ग्रंथांचा अभ्यास होता, व प्रेमळपणा आणि उत्सुकता आंगीं होती, यामुळें त्यांचें कीर्तन अगदीं एकाद्या जुन्या उत्तम हरिदासासारखें वठत असे. हीं कीर्तनें ते स्वतां तयार करीत व त्यांतील पुष्कळ कविता त्यांच्या स्वतांच्या असत. कीर्तनाचे विषय पुष्कळ जुन्या कीर्तनांच्या धर्तीवर रचलेले नव्या तऱ्हेचे असत. अशा कित्येक कीर्तनांची याद खालीं टीपेंत † दिली आहे. अशा कीर्तनांतील पद्यांची पुष्कळदां श्रोत्यांसाठीं पुस्तकें छापीत. असलीं सुमारें वीस पुस्तकें उपलब्ध आहेत. वामनराव सुरत येथें गेले तेव्हां तेथील प्रार्थनासमाजांत उपासना चालविण्याची वेळ आली. तेव्हां त्यांनीं लगेच गुजराथी भाषा अवगत करून घेतली. प्रथमतः शाळेंत गुजराथींतून इंग्रजींत भाषांतर

---

* वामनरावांनीं रचिलेलीं पुढील अंकांचीं पद्यें प्रार्थनासंगीतांत आहेतः—१२; १५; ३३; ३७; ३८; ४०; ४३; ४६; ५०; ७९, ८७; ९९; १०४; १०६; ११४; १३८; १४२; १४३; १५१; १६४; १७६; १९४; २३६; २६३; २८२; २९२; ३२६; ३३४; ३७८ व स्तोत्र ५ वें.

† १ एकनाथ चरित्र; २ गोपीचंद आख्यान; ३ प्रल्हाद चरित्र; ४ ध्रुवाख्यान; ५ दामाजीपंताचें आख्यान; ६ राकांबकाचें आख्यान; ७ मैत्रेयी-याज्ञवल्क्यसंवादः ८ द्रौपदी-धर्म-संवाद; ९ साक्रेटिसाचें चरित्र; १० येशुख्रिस्ताचें चरित्र; ११ गौतमबुद्धाचें चरित्र; इत्यादि.

करणें हा विषय ते स्वतां वर्गांत घेऊं लागले, यामुळें महिनापंधरा दिवसांतच भाषा बरीच येऊं लागली. पुढें समाजांत करावयाची उपासना ते लिहून घेऊन जात. पुष्कळदां एकाद्या गुजराथी मित्रास लिहावयास सांगून आपण तोंडानें सांगत; व असें लिहिणें चाललें असतां भाषेची चुकी होईल ती गुजराथी मित्र शुद्ध करून सांगे. अशा रितीनें दोन महिन्यांत ते समाजामध्यें गुजराथींत उपासना करूं लागले. रत्नागिरी, मुंबई, पुणें, सुरत येथील प्रार्थनासमाजांत त्यांच्या उपासना, उपदेश व व्याख्यानें अनेक झालेलीं आहेत. त्यांपैकीं पुष्कळांचा संग्रह जर झाला असता तर ती एक मराठी भाषेस जोडच झाली असती.

**त्यांचीं धर्ममतें**—इंग्रजी विद्येची सुरवात आमच्या इकडे झाल्यावर प्रथमारंभीं जातिभेद मोडणें आणि धर्मांत सुधारणा करणें या गोष्टींसाठीं मुंबईंत सोहंसमाज व दुसऱ्या कित्येक मंडळ्या निघाल्या होत्या, त्यांच्या मतांचा पगडा वामनराव यांच्या मनावर झाला होता, व ते जानवीं टाकून देण्यासही एकदां तयार झाले होते, असें ऐकिवांत आहे. परंतु पुढें त्यांचीं मतें तशीं नव्हतीं. आपल्या धर्मांत आणि रितीभातींत योग्य त्याच सुधारणा केल्या पाहिजेत असें ते प्रतिपादन करीत. त्यावरून वरील ऐकींव प्रकार कितपत खरा आहे हें सांगवत नाहीं. कालेजांतून सुटल्यावर त्यांचें राहाणें पुण्यास बरेच दिवस झालें होतें. त्या वेळीं ते ज्या घरांत राहात असत तेथेंच प्रख्यात विष्णु परशरामशास्त्री पंडित हेही राहात असत. यांच्या मतांचा परिणाम वामनराव यांच्या मनावर पुष्कळ झाला होता असें वामनराव हे स्वतांच सांगत. विष्णुशास्त्री हे स्त्रीपुनर्विवाह, प्रौढ विवाह, इत्यादि सुधारणांचे अभिमानी होते. तसेंच सध्याच्या परिस्थितीप्रमाणें आपल्या सामाजिक गोष्टींत अनेक सुधारणा झाल्या पाहिजेत असें ते प्रतिपादन करीत. परंतु हें सर्व जुन्याला धरून शक्य असेल तसें हळु हळु झालें पाहिजे असें म्हणणारांपैकीं शास्त्रीबुवा हे होते. ते स्वतां प्रार्थनासमाजाचे सभासद नव्हते. वामनराव हे प्रार्थनासमाजाचे अभिमानी होते. परंतु त्यांचे धार्मिक आणि सामाजिक सुधारणेच्या संबंधाचे विचार वरील प्रमाणेंच होते. प्रार्थनासमाजाचीं मतें काय आहेत हें येथें विस्तारानें सांगण्याची जरूर नाहीं. परमेश्वर एक आहे, मूर्तिपूजा या मतास विघातक आहे, ती मोडली पाहिजे, अशीं प्रार्थनासमाजाचीं मतें आहेत. तीं वामनराव यांस मान्य असून त्यांनीं ठिकठिकाणीं त्यांचा प्रसार करून प्रार्थनासमाज स्थापन करण्याचे प्रयत्न केले. ते जेथें जात तेथील समाजाच्या कामास त्यांची पूर्ण मदत असे. समाजाच्या मतांचा प्रसार करण्यासाठीं

कित्येक गृहस्थांनीं स्वतां खर्च देऊन धर्मप्रचारक नेमले होते. या खर्च देणाऱ्या गृहस्थांमध्यें वामनराव हे होते. मूर्तिपूजेच्या संबंधानें त्यांचें असें मत होतें कीं, तो अज्ञान लोकांचा ईश्वरभक्तीचा मार्ग आहे. अनाद्यनन्त, सर्वव्यापी परमेश्वराचें आकलन सर्वांसच होत नाहीं. सुज्ञ जनांनीं स्वतां मूर्तिपूजा करूं नये, परंतु अज्ञ-जनांनीं तशी भक्ति केली म्हणून त्यांची थट्टा किंवा द्वेष करूं नये. त्यांच्या व्याख्यानांत मूर्तिपूजेचा उल्लेख आला आहे. त्यांत त्यांनीं सौम्यपणें निषेध करून मन वळविण्याचा प्रयत्न केला आहे.

वामनराव हे फार धर्मशील व भाविक आणि अत्यंत प्रेमळ असे ईश्वरभक्त होते. ते प्रार्थनासमाजाच्या मतांप्रमाणें अगदीं मनोभावानें वर्तन करीत असत. परमेश्वराचें ध्यान, मनन, भजन वगैरे गोष्टी वामनराव हे एकाद्या साधूप्रमाणें नेहमीं करीत. फुरसत होईल तेव्हां परमेश्वराचें ध्यान मनन करण्यासाठीं कोठेंतरी एकांतांत जाऊन बसण्याची त्यांना आवड असे. तसेंच धर्माची आस्था वाटावी आणि मनाला व शरीराला धार्मिक वळण लागावें म्हणून नियमित वेळीं उपवासादि प्रकार पाहिजेत असें त्यांचें मत होतें, व तसे उपास वगैरे ते पाळीत असत. इतर मंडळीला एकादशी, शिवरात्र वगैरे दिवस जर सोईचे असतात तर तेच आपण पाळण्यास हरकत नाहीं असें ते समजत. मग त्या दिवशीं उपवासाचा नियमित आहार करून, आपल्या मताप्रमाणें ते परमेश्वराचें ध्यानमनन करण्यांत काळ घालवीत. इतर मंडळी जुन्या पद्धतीनें ज्या धर्मसंबंधीं गोष्टी करीत त्यांतील वेडगळपणा स्पष्ट करून दाखविण्याचा ते प्रयत्न करीत. परंतु त्या कृत्यांत दांभिकपणा नसल्यास ते तशीं कृत्यें करणाऱ्याचा निषेध किंवा त्यास अडथळा करीत नसत. त्याची समजूत झाली म्हणजे तो योग्य मार्गाला लागेल; आणि मग हल्लींच्या या दिशेच्या धार्मिकपणाला खऱ्या धार्मिकपणाचें स्वरूप येईल अशी त्यांची समजूत असे. जुन्या तऱ्हेच्या पुष्कळ धर्मसंबंधीं गोष्टी ते स्वतां करीत नसत. परंतु इतरांनीं श्रद्धेनें कांहीं केलें असतां त्यांना ते नांवें ठेवीत नसत. आपल्या अधिकारांतली गोष्ट असल्यास त्याला योग्य मार्ग दाखविण्याचा मात्र ते प्रयत्न करीत. असत्य किंवा अयोग्य भाषण, असभ्य वर्तन, शिवीगाळ, बीभत्स शब्द उच्चारणें, विचकट थट्टामस्करी वगैरे गोष्टींचा त्यांस अत्यंत तिटकारा असे हें मागें सांगितलेंच आहे. ते कांहीं वर्षे विडी ओढीत असत. याशिवाय त्यांस कोणत्याही प्रकारचें व्यसन कधींही नव्हतें.

**त्यांचीं सामाजिक मतें**—वामनराव हे एकनिष्ठ व कर्तव्यदक्ष असे सामाजिक सुधारक होते. स्त्रीपुनर्विवाह सुरू झाला पाहिजे, बालविवाह नाहींसा

व्हावा, स्त्रीशिक्षणाचा प्रसार व्हावा, जातिभेदाच्या संबंधाचे सर्व अनिष्ट प्रकार कमी व्हावे, वगैरे सुधारणेच्या संबंधाच्या ज्या मुख्य मुख्य गोष्टी त्यांसंबंधाचे त्यांचे सक्त प्रयत्न चालू होते, व चाललेल्या प्रयत्नांस त्यांची मदत असे. त्यांच्या व्याख्यानांमध्यें त्यांचीं मतें स्पष्ट झालेलींच आहेत, तेव्हां येथें जास्त चर्चा करण्याची जरूर नाहीं. त्यांनीं आपल्या मुलांमुलींचीं लग्नें लौकर केलीं नाहीत; आपल्या मुलींना शक्य तितकें शिक्षण दिलें आणि आपल्या आप्तइष्टांस आणि स्नेही मंडळीसही या गोष्टी करण्यास उत्तेजन दिलें. सामाजिक सुधारणांमध्यें विधवाविवाहाची चाल रूढ करण्याचे संबंधानें त्यांनीं विशेष प्रयत्न केले. प्रथमतः मुंबईस विधवाविवाहाचा विचार सुरू झाला तेव्हांपासूनच ते त्यास अनुकूळ होते. पहिला विधवाविवाह झाला तेव्हां ते रत्नागिरीस होते. तेथें त्यांनीं आपणास विधवाविवाह मान्य असल्याबद्दल प्रदर्शित केलें व व्याख्यानें दिलीं. एवढयावरूनच त्यांस तेथील मंडळीनें बहिष्कार घातला. हा बहिष्कार इतरस्थांनीं व धर्मगुरूंनींही मान्य केला. यामुळें त्यांस रत्नागिरीस आणि सर्वत्र कित्येक वर्षें लोकांनीं फार त्रास दिला. परंतु तो त्यांनीं शांतपणानें सहन केला. पुढें त्यांनीं विधवाविवाहाच्या संबंधानें प्रत्यक्ष प्रयत्न केले व त्या उद्योगाचे ते शेवटपर्यंत आधारस्तंभ होते. वामनराव यांजवर विधवाविवाहाच्या संबंधानें सुमारें दहा वर्षें बहिष्कार होता. परंतु पहिली उसळी निघून गेल्यावर रत्नागिरीकरांचें त्यांच्याजवळ वर्तन चांगलें असे. याचें कारण वामनराव यांचें सौजन्य व सुस्वभाव होय. पुढें अशा सत्पुरुषास त्रास देणें अयोग्य आहे असें वाटून रत्नागिरीकरांनीं आपण होऊनच हा बहिष्कार काढून टाकिला. हा बहिष्कार असतांना आणि त्यानंतरही नेहमींच ते सामाजिक सुधारणा प्रत्यक्ष करून दाखविणारे असल्यामुळें त्यांस समाजाकडून फार त्रास पोंचत असे. तसेंच ज्यांवर ते उपकार करीत असे आप्तइष्टही त्यांच्याशीं या कामांत उपकार स्मरून वागत नसत. परंतु वामनराव यांनीं आपलें कर्तव्य सोडलें नाहीं. त्यासाठीं ज्या अडचणी आल्या त्या सर्व त्यांनीं निमूटपणें सोसल्या. लोकांनीं त्यांच्यावरील बहिष्कार काढून टाकिल्यानंतरही त्यांचें सर्व सामाजिक सुधारणांच्या संबंधाचें वर्तन जसें त्यापूर्वी होतें तसेंच होतें. कितीही व कसाही त्रास झाला तरी एकदां योग्य वाटलेलें कर्तव्य एकनिष्ठेनें करावयाचें असा त्यांचा निश्चय असे. त्यांच्या अशा एकनिष्ठ वर्तनामुळें सामाजिक सुधारणेच्या अनेक गोष्टींची प्रगती होण्यास कारण झालें आहे; आणि अशा प्रसंगीं कसें वागावें हें समजण्यास त्यांचें वर्तन हें त्या उद्योगांत पडणारांस कित्यासारखें

आहे. वामनराव मोडक यांसारखे बरेच एकनिष्ठ पुरुष जर आपल्यामध्यें होण्याचें आपलें सुदैव असतें तर सामाजिक सुधारणेचीं कामें यापेक्षां जोरानें व विशेष समाधानकारक रितीनें चाललीं असतीं.

**त्यांची गृहस्थिति, राहणी, वगैरे**—वामनराव यांची मूळची फार गरीबी होती. याचें वर्णन मागें आलेंच आहे. विद्याभ्यास पुरा झाल्यानंतर त्यांस सरकारी नोकरी चांगलीच मिळाली, यामुळें त्यांचे व त्यांच्या कुटुंबाचे पुढील दिवस चांगलेच गेले, असें म्हणण्यास चिंता नाहीं. मात्र एवढया त्रासानंतर प्राप्त झालेले आनंदाचे दिवस पाहाण्यास त्यांची आई जगली नाहीं. वामनराव यांची पत्नी सुशील, संसारदक्ष, आणि त्यांच्यासारखीच धर्मशील, दयाशील अशी असे. रखमाबाईंना शिक्षण फारसें नव्हतें, तरी वामनराव यांच्या सुधारणेच्या विचारांस व वर्तनास त्यांची पूर्ण मदत असे. केव्हां केव्हां रखमाबाईंच्या मनांत साहजिकच जुन्या गोष्टींची प्रीती उत्पन्न होत असे, व जुन्या तऱ्हेचें वर्तनही घडे. परंतु "अमुक एक सुधारणेची गोष्ट करावी असें मनांत होतें, पण काय करावें, घरच्या बायकांच्या हट्टापुढें कांहीं चालेना," असले रडगाण्याचे उद्गार काढण्याचा किंवा अशी सबब सांगण्याचा व बहाणे करण्याचा प्रसंग वामनराव यांस कधींही आला नाहीं. धार्मिक आणि सामाजिक गोष्टींच्या कामांत वामनराव यांस त्यांच्या पत्नीची पूर्ण मदत होती. वामनराव यांचा त्यांच्या आप्तइष्टांस मोठा आश्रय असे. ते सर्वांस मदत करीत. गरीबगुरीब विद्यार्थ्यांसही त्यांची निरंतर मदत असे. गरीबीं-तून पुढें आलेल्या गृहस्थांचा पुढील आयुष्यक्रम बहुधा कंजूषपणाचा असतो. परंतु वामनराव यांची तशी स्थिती नव्हती. कुटुंबाचें खाणेंपिणें, राहाणी, कपडे-लत्ते यांची व्यवस्था अगदीं गर्भश्रीमंताप्रमाणें होती. त्याप्रमाणें घरांत आप्तइष्ट किंवा आश्रित मंडळी असे, त्यांचे संबंधानें पंक्तिप्रपंच मुळींच नसे. अशा राहा-णीमुळें त्यांना बहुधा आरंभापासून बराच पगार जरी मिळत होता, तरी त्यांचे-जवळ पुष्कळ पैसे नव्हते. तसेंच त्यांनीं इतर दुसऱ्या पैसे मिळविण्याच्या धंद्यांकडे लक्ष न देतां नोकरीच्या कामाबाहेर राहिलेला सर्व वेळ आपल्या लोकांची धार्मिक आणि सामाजिक उन्नति करण्याच्या प्रयत्नांत घालविला. यामुळें त्यांच्याजवळ पैशाचा संचय फारसा झाला नाहीं. वामनराव यांची शरीरप्रकृति पहिल्यापासून निकोप असे. त्यांना दुखणेंबाणें फारसें येत नसे. मुलेंबाळें व इतर कुटुंबीय मंडळी यांच्या वर्तनाकडे आणि आरोग्याकडे त्यांचें उत्तम लक्ष असे. आजा-रांत, प्रवासांत, हरएक प्रसंगीं आपल्या सर्व माणसांच्या सुखसंतोषाची

तजवीज राखण्याची ते नेहमीं काळजी घेत. पेनशन घेतल्यावर रिकामा वेळ सामाजिक गोष्टींच्या व देशकार्यांच्या उद्योगांत घालवावा असा त्यांचा विचार होता. परंतु आपल्या दुर्दैवेंकरून ते आपल्यास फार दिवस लाभले नाहींत. सन १८९३ सालीं सपटेंबर महिन्यांत पुणें प्रार्थनासमाजांत राजा राममोहन-राय यांच्या वार्षिक पुण्यतिथीनिमित्त व्याख्यानें देण्याचें काम त्यांचेकडे आलें होतें. त्यासाठीं त्यांनीं आपल्या नेहमींच्या रितीप्रमाणें पांच सात दिवस निरनिराळे ग्रंथ वाचून तयारी चालविली होती. या वेळीं त्यांचें डोकें अगोदर बिघडलेलें होतें कीं काय कोण जाणे, परंतु ही त्यांची तयारी फार जास्त चालली होती असें पुढें दिसून आलें. जसा काय त्यांना रात्रंदिवस त्या विषयाचा नाद लागून राहिला होता. त्याच वेळीं त्यांची पत्नी त्यांची नेहमींची काळजी घेण्यास जवळ नव्हती; कांहीं कामानिमित्त मुंबईस गेली होती. यामुळें त्यांची जी फाजील तयारी चालली होती ती कोणाचे लक्षांत आली नाहीं. पुढें पुण्यतिथीच्या दिवशीं अर्धे व्याख्यान उत्तम रितीनें झालें, परंतु पुढें वाचा एकदम बंद होऊन वामन-राव स्तब्ध झाले. हा त्यांस पक्षघाताचा झटका झाला. यांतून ते थोड्या दिव-सांनीं बरे झाले. परंतु त्यांची प्रकृति कायमची अशक्त झाली. पहिल्या झटक्यां-तून बरे झाल्यानंतर दोन वर्षेपर्यंत त्यांची प्रकृति साधारण बरी होती, व नेह-मींचे उद्योगही बरेच चालले होते. परंतु त्यानंतर प्रकृति जास्त बिघडत जाऊन सन १८९७ च्या सपटंबर महिन्यांत मुंबई येथें आपले परममित्र न्या. मू. रानडे यांच्या घरीं ते मृत्यु पावले.

**त्यांचा स्वभाव, वर्तन आणि गुणदोष**—वामनराव हे व्यवस्थित आणि करारी स्वभावाचे होते, आणि त्यांची मुद्रा गंभीर असे, यामुळें जवळच्या आणि हाताखालच्या मंडळीस त्यांची भीती वाटत असे, तरी त्यांचा स्वभाव सौम्य आणि ममताळू होता. त्यांचें आपल्या कुटुंबांतील मंडळीवर फार प्रेम असे. पुष्कळ मंडळींचें घरांत फारसें लक्ष नसतें, आणि जवळच्या मंडळीशीं तुसडेपणाचें वर्तन असतें. परंतु वामनराव हे खरेखुरे कुटुंबी होते आणि परमेश्वराच्या कृपेनें त्यांनीं कुटुंबसुखाचा चांगला अनुभवही घेतला, असें म्हणावयास चिंता नाहीं. मुलेंबाळें, आप्तइष्ट मंडळी, या संबंधानें त्यांस अनुकूल स्थिति होती आणि त्यांनीं स्वतां त्यांच्या संबंधानें खर्चवेच योग्य रितीनें करून त्यांस सुख देण्यास कांहीं कमी केलें नाहीं. विद्यार्थी, हाताखालचे शिक्षक आणि त्यांच्याशीं ज्यांचा संबंध येई अशा लोकांना त्यांचा स्वभाव प्रथ-

प्रारंभीं कडक असा वाटे. परंतु एकदां त्यांच्या स्वभावाचें धोरण समजून त्यांच्याशीं कसें वागलें पाहिजे हें लक्षांत आल्यावर सर्वांच्या मनांत त्यांच्याविषयीं आदरबुद्धि आणि प्रेमभाव उत्पन्न होत असे. त्यांचीं धार्मिक आणि सामाजिक मतें अगदीं नव्या तऱ्हेचीं होतीं; आणि त्यांच्या वेळीं हल्लींप्रमाणें धार्मिक आणि सामाजिक विचारांच्या संबंधानें लोकांच्या मनांत शिथिलताही उत्पन्न झाली नव्हती. असें असतांही वामनराव यांच्या सुस्वभावामुळें आणि त्यांच्या वर्तनामध्यें यत्किंचित् दिखाऊपणा नसून सर्व कांहीं मनापासून असे, यामुळें सर्वांना त्यांविषयीं आदर वाटे. त्यांचें कोणाशीं कधींही वितुष्ट नव्हतें, आणि ते सर्वांना हवेसे वाटत. त्यांच्यामध्यें स्वाभिमान पूर्णपणें वसत असे; आणि ते वरिष्ठांस किंवा कोणासही अकारण नमून नसत. हा त्यांचा स्वभाव त्यांच्याशीं ज्यांचा संबंध येई त्यांस तेव्हांच कळून येई, यामुळें त्यांच्याबरोबर सर्वांचें यथायोग्य वर्तन होत असे. या संबंधानें दोनचार लहान लहान आख्यायिका येथें सांगितल्या असतां अप्रासंगिक होणार नाहीं.

रत्नागिरी जिल्ह्यांत प्रख्यात क्राफर्ड साहेब हे पुष्कळ वर्षें असिस्टंट कलेक्टर आणि कलेक्टर या हुद्यांवर होते. यांचें लोकांच्या कल्याणाकडे लक्ष असे आणि ते रत्नागिरीस लोकप्रिय होते. त्यांनीं रत्नागिरी शहराची बरीच सुधारणा केली आणि लोकोपयोगी गोष्टी केल्या. त्यांचा आणि वामनराव यांचा चांगला परिचय असे. रत्नागिरी येथें एक लहान, सुंदर असा लायब्ररीचा बंगला होता. ही लायब्ररी प्रथमतः सर्वांची असून पुढें युरोपियन मंडळीची निराळी लायब्ररी झाली होती. रत्नागिरी शहर ज्यांनीं पाहिलें असेल त्यांच्या लक्ष्यांत येईल कीं तेथील हायस्कूलच्या पुढें गेलें कीं उच्च मैदान असून तेथें कचेऱ्या, दवाखाना व बंगले आहेत, आणि अर्थात त्या वेळीं त्या प्रदेशांतील बहुतेक वस्ती युरोपियन लोकांची होती. तेथें मध्येंच ही नेटिवांची लायब्ररी असावी व त्या ठिकाणीं नेटीव लोकांनीं येऊन रोज बसावें हें पुष्कळ युरोपियनांस इष्ट वाटत नव्हतें. तेव्हां हा लायब्ररीचा सुंदर बंगला घेऊन त्याला रहदारी बंगल्याचें स्वरूप द्यावें आणि लायब्ररी दुसरीकडे नेववावी असा क्राफर्ड यांनीं बेत केला. लोकांना चार घटका उत्तम हवाशीर ठिकाणीं बसून करमणूक करण्यास हें चांगलें स्थान आहे, तें हातचें जाऊं नये, अशी मंडळीची साहजिक इच्छा होती, यामुळें लायब्ररी द्यावयाची नाहीं, असा लोकांनीं नेट धरला. क्राफर्डसाहेब हे हवें तें करणारे असे होते, हें सर्वांस महशूरच आहे. परंतु या वेळीं वामनराव यांनीं

आपल्या मंडळींचें पुढारीपण घेऊन क्राफर्ड यांचा नेटिवांस तेथून हुसकून लाव-ण्याचा बेत तडीस जाऊं दिला नाहीं. अखेरीस अशी तडजोड झाली कीं सरका-रानें तेथें जवळच तितकीच उत्तम अशी जागा पाहून लोकांच्या संमतीनें तेथें लायब्ररीला अगदीं तसाच असा नवीन बंगला बांधून दिला, आणि मग जुनी लायब्ररी रहदारी बंगल्यासाठीं घेतली.

वामनराव यांस शाळाखात्यांतील व इतर युरोपियन कामगार फार मानीत असत. त्यांपैकीं पुष्कळांचा वामनरावांशीं फार निकट संबंध असे. असें असून वामनराव यांनीं या संबंधाचा कधीं आपल्या लोकांविरुद्ध दुरुपयोग केला नाहीं. इतकेंच नव्हे, तर पुष्कळदां वामनराव आणि युरोपियन लोक यांच्या संघट्टणाचा सदुपयोग झाला आहे. युरोपियन लोकांमध्यें त्यांच्या शब्दास मोठा मान असे; आणि देशी लोकांच्या संबंधानें कांहीं व्यवस्था करणें झाल्यास वामन-राव यांची सल्ला युरोपियन कामगार मंडळी पुष्कळदां घेत असे. वामनराव हे धार्मिक गोष्टींचा नेहमीं विचार करीत, यामुळें पुष्कळ मिशनरी लोकांची व त्यांची गांठ पडून भाषणें होत. वामनराव यांना येशूख्रिस्ताचा थोरपणा मान्य होता, परंतु ख्रिस्ती धर्ममतें मुळींच मान्य नसत. यामुळें वारंवार वादविवादाचा प्रसंग येई. परंतु अशा वादविवादांत वामनराव सभ्यपणा आणि शांतपणा कधींही सोडीत नसत, यामुळें ख्रिस्ती मिशनरी मंडळीबरोबर त्यांचा उत्तम स्नेहभाव जुळत असे. ख्रिस्ती धर्मांत घेण्यासारखें पुष्कळ आहे, पण त्यासाठीं धर्मांतर कर-ण्याची जरूर नाहीं, असें त्यांचें मत होतें. सुरत येथें त्यांचा एक गुजराथी स्नेही ख्रिस्ती झाला तेव्हां त्याचें तसें न करण्याविषयीं मन वळविण्याचा त्यांनीं फार यत्न केला, परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं.

वामनराव यांच्या स्वभावाला थट्टामस्करी, वायफळ बोलणें अथवा उगाच वटवट करणें कधींही आवडत नसे. ते स्वतां कधीं कोणास उणें उत्तर बोलत नसत, आणि दुसरें कोणीं तसें बोललेलेंही त्यांना खपत नसे. कितीही रागांत असले तरी ते हाताखालच्या मनुष्यास किंवा चाकरमाणसास वाईट शब्द बोलत नसत. शिवीगाळ तर त्यांस कधींही माहीत नव्हती. चाकरमा-णसावर फारच रागावले तर ' मूर्ख ' या शब्दाहून उच्च प्रतीचा अपशब्द त्यांच्या तोंडून कधीं आलेला नाहीं. आमच्या लोकांमध्यें विशेषतः स्त्रियांच्या संबंधानें बोलतांना पुष्कळांस हलके शब्द वापरण्याची संवय असते. त्यांत वामनराव वगैरे मंडळीनें तर गरीब बिचाऱ्या अनाथ विधवांचा कैवार

घेतलेल्या. मग अशा बायांच्या संबंधानें उच्चारलेले शेलके शब्द ऐकण्याचा प्रसंग वारंवार त्यांना येई. तथापि वामनराव कधीं रागावत नसत. एकदां एका फार सलगीच्या अशा गृहस्थानें असले शेलके शब्द वापरून आणि बरीचशी थट्टा करून वामनराव यांस म्हटलें, ' अहो, साऱ्या सुधारणा आटोपल्या, आणि आतां तुम्ही या × × × चीं लग्में लावीत सुटला आहांत ! ' हें ऐकून वामनराव मुळींच रागावले नाहींत. त्यांनीं गंभीर मुद्रेनें व संथपणें म्हटलें ' महाराज, अशा बायका तुम्हीं उच्चारलेल्या नांवाखालीं मोडत असल्या तरी त्या कोणाच्या तरी आया, बहिणी किंवा बायका आहेत. आपण सर्वच या नश्वर जगांत राहातों, तेव्हां आपणांपैकीं प्रत्येकाची आई, बहीण किंवा बायको तशा विपन्न स्थितीस जाण्याचा संभव आहे. हें लक्षांत ठेवून प्रत्येकानें बोलावें हें बरें ! ' बायकांच्या संबंधाची कोणतीही सुधारणा म्हटली असतां तिचें खंडण करणें म्हणजे गलिच्छ शब्द वापरणें अशी पुष्कळांची चाल असते. अशांनीं ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. वामनराव यांचा व कोणाचा थोडका वेळ जरी सहवास झाला, तरी तेवढयावरून ते थोर मनाचे, भाविक, साधुपुरुष आहेत अशी त्यांची तेव्हांच खात्री होत असे.

वामनराव यांचें सर्व आयुष्य सरकारी नोकरींत गेल्यामुळें त्यांचीं राजकीय विषयांवरील मतें विशेषशीं कोठें बाहेर येण्याचा प्रसंग आलेला नाहीं. या संबंधानें ते न्यायमूर्ति रानडे व तेलंग यांचे अनुयायी होते. आपल्या लोकांच्या अंगीं राजकीय उन्नती करून घेण्याची योग्यता आहे, परंतु ती त्यांनीं पाश्चात्य सुधारणांचा नीट अभ्यास करून प्रयत्नांनीं साधली पाहिजे, असें त्यांचें मत होतें. राजकीय सुधारणा होण्याच्या अगोदर कित्येक समाजिक बाबतींत आणि धार्मिक विचारांत आपली पुष्कळशी प्रगति व्हावयास पाहिजे आहे असें त्यांस वाटत असे. पेनशन घेतल्यावर पुण्यांत राहून आपल्या लोकांच्या धार्मिक, सामाजिक व राजकीय उन्नतीच्या कामीं आपला सर्व वेळ खर्चावयाचा असा त्यांचा उद्देश होता. त्यांना पुण्याच्या सार्वजनिक सभेचे अध्यक्ष करावें असें त्यांच्या स्वभावाचे पूर्ण माहितगार न्या० मू० रानडे यांनीं पुण्याच्या पुढाऱ्यांस सुचविलें होतें. तेव्हां पुण्याच्या सर्व मंडळीनें त्यांचे विचार पाहून ते त्यांस पसंत पडल्यावर त्यांना अध्यक्ष करण्याचें ठरविलें होतें, आणि एक दोन राजकीय विचारांच्या सभांमध्यें ते अध्यक्ष झाले होते. त्या वेळीं त्यांचें काम पाहून त्यांची राजकीय गोष्टींचीं मतें नेमस्त व योग्य आहेत, आणि त्यांचे संबंधानें सरकारी कामगारांचे मनांत आदरबुद्धि आणि विश्वास असल्यामुळें त्यांच्यापासून सार्वजनिक कामांत

फार उपयोग होईल असें सर्वांस वाटलें. परंतु पुढें ते आजारी पडल्यामुळें त्यांचा आणि लोकांचा हेतु तडीस गेला नाहीं. पेनशन घेतल्यावर कांहीं ग्रंथ-रचना करावी व अर्धवट राहिलेली ग्रंथरचना पुरी करावी असाही त्यांचा उद्देश होता. याच वेळीं यांनीं "उत्तर नैषध" या नांवाचें संस्कृत नटकांच्या धर्तीवर एक करुणरसप्रधान गद्यपद्यात्मक नाटक लिहिलें. तें अद्यापि छापून प्रसिद्ध झालें नाहीं. हें नाटक चांगलें साधलें आहे.

वामनराव यांस रखमाबाई या त्यांच्या प्रमाणेंच सुशील, शांत, दयाळू स्वभावाच्या अशा पत्नी मिळाल्या होत्या. वामनराव यांच्या सर्व उद्योगांस त्यांना त्यांच्या पत्नीचें उत्तम साह्य होतें. रखमाबाई या कांहीं फारशा सुशिक्षित नव्हत्या. तरी त्यांनीं वामनराव यांनीं मनांत आणलेल्या सुधारणेच्या गोष्टींमध्यें कधींही अडथळा आणिला नाहीं. कारण स्वतां वामनराव यांचें एकनिष्ठेचें वर्तन हाच त्यांना शिक्षणाचा धडा असे. रखमाबाई यांनीं आपला संसारही दक्षतेनें केला. नवामराव यांच्या दुखण्यांत त्यांनीं त्यांची कशी शुश्रूषा केली या गोष्टीचें वर्णन न्या० रानडे यांनीं वामनरावांच्या संबंधानें सुबोधपत्रिकेसाठीं लिहिलेल्या इंग्रजी लेखांत केलें आहे. हा लेख भाषांतररूपानें न्यायमूर्तींच्या व्याख्यानांत आलेला आहे. रखमाबाई या वामनराव यांच्याप्रमाणेंच पुनर्विवाहपक्षाच्या पूर्ण अभिमानी होत्या. तो अभिमान त्यांनीं वामनराव यांच्या मागेंही तसाच नेटानें कायम राखून, आपल्या एका मुलास आपण पूर्वी ज्यास मदत केली होती अशा एका पुनर्विवाहाच्या संबंधाच्या मुलीशीं विवाह करण्यास उत्तेजन दिलें ही गोष्ट सर्वश्रुतच आहे.

याप्रमाणें वामनराव यांचें थोडक्यांत चरित्र सांगून त्यांच्या लोकोपयोगी व अनुकरणीय गुणांचें संक्षेपतः वर्णन केलें. वामनराव हे मानवी प्राणीच होते यामुळें त्यांच्या मध्यें दोषही असतील आणि त्यामुळें त्यांच्याकडून चुकाही घडल्या असतील. परंतु त्यांच्या आंगच्या दोषामुळें किंवा, त्यांच्या वर्तनानें सार्वजनिक दृष्ट्या कोणाचें नुकसान झालेलें आढळत नाहीं. यासाठीं या अल्पचरित्रांत दोषांचा विचार करण्याची गरज नाहीं. शिवाय लौकिक हिताहिताच्या दृष्टीनें पाहिलें असतां त्यांच्यामध्यें गुणच फार होते, आणि त्या गुणांचा आपल्यास उपयोग झाला आहे. त्यांच्यामध्यें लक्षांत घेण्यासारखे दोष कोणाच्या दृष्टीसही पडलेले नाहींत. दुसरी गोष्ट अशी आहे कीं हा लेख लिहिणारास वामनराव हे वडिलांसारखे होते, यासाठीं त्यांच्या गुणदोषांचें विशेष रितीनें वर्णन करण्याची त्याची इच्छा नाहीं, आणि तसा अधिकारही तो आपल्याकडे घेऊं इच्छित नाहीं.

---

## (८) महादेव गोविंद रानडे.

"Earnestness of purpose, sincerity in action, originality, imagination, and above all the power of magnetism—we might call it vital or spiritual magnetism—these are the qualities which go to make a man great."

"Universal History, the History of what man has accomplished in this world, is at bottom the History of the Great Men who have worked here."

—*Carlyle.*

एका व्यक्तीच्या मृत्यूनें कुटुंबाचें, जातीचें, समाजाचें, प्रांताचें, असें फार तर नुकसान साधारणपणें होत असतें. जितकी व्यक्तीची योग्यता जास्त, जितका लोकांत आदरभाव जास्त, तितकें त्याच्या मृत्यूच्यायोगें होणाऱ्या दुःखाचें प्रमाण जास्त असतें, असा साधारण नियम आहे. परंतु नियमाला ज्याप्रमाणें अपवाद असतात, त्याप्रमाणें या व्यवहारांतील अनुभवसिद्ध नियमालाहि अपवादभूत एक विभूति ता. १६ जान्युआरी १९०१ रोजीं रात्रौ १०॥ वाजतां आपल्या आप्तइष्टांस, आपल्या मित्रांस, समाजास, प्रांतास–नव्हे तर सगळ्या हिंदुस्तान देशांतील सर्व धर्मांच्या, सर्व जातींच्या व सर्व प्रकारच्या लोकांस शोकसागरीं लोटून परलोकीं गेली. नामदार न्या. मू. रानडे यांचें नांव कोणाला माहीत नाहीं! त्यांची विलक्षण बुद्धिमत्ता, अगाध वाचन, असामान्य कर्तृत्वशक्ति, विलक्षण उद्योगीपणा, निर्मलाचरण, प्रेमळ स्वभाव, साधुवृत्ति, परमेश्वरावरील अचल निष्ठा, आत्मविश्वास, आत्मसामर्थ्याविषयीं योग्य अभिमान, स्वदेशहिताविषयीं उत्कटेच्छा यांविषयीं कमीजास्त प्रमाणानें माहिती पूर्वपिढींना सहजगत्याही असे. परंतु हल्लींच्या पिढीला न्या. मू. रानडे यांच्या एकंदर चरित्राविषयीं अस्पष्ट कल्पना असल्याचा आम्हांस अनुभव येत आहे. यासाठीं ज्यांचीं धर्मपर व्याख्यानें आतां तिसऱ्यांदा महाराष्ट्रास सादर केलीं आहेत त्या न्या. मू. रानडे यांच्या चरित्रांतील ठळक ठळक गोष्टी व त्याचप्रमाणें त्यांच्या चरित्राचें महत्त्व, रहस्य व त्यांच्या चरित्रापासून होणारा बोध वाचकांपुढें पुढील लेखाच्या द्वारें ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

## न्यायमूर्तींचें दुखणें व मृत्यूपूर्वीची हकीकत.

न्यायमूर्तींची प्रकृति मृत्यूपूर्वी असावी तशी मुळींच नसे. त्यांच्या शक्तीपेक्षां जास्त काम बरेच दिवस त्यांनीं केल्यामुळें त्याचा अनिष्ट परिणाम त्यांच्या आरोग्यावर हळुहळु होत होता. त्यांची एक बाजू बरीच दुखत असे, व त्यांना कांहीं तरी काळजाचा विकार झाला होता. मधूनमधून कांहीं वेळपर्यंत ते अगदीं बेशुद्ध पडत असत, व हें दुखणें कोणत्या वेळीं घात करील याचा नेम नाहीं, असें डाक्टरांनाहि वाटत असे; परंतु त्यांचा अंत इतका समीप आला होता, हें त्यांच्या स्वतःवांचून इतर कोणाच्या स्वप्नींहि नव्हतें, एवढेंच नव्हे, तर ज्या दिवशीं त्यांचा अंत झाला त्या दिवशीं रात्रीं दहा वाजेपर्यंत आतां थोड्या वेळानें त्यांची या जगांतील यात्रा संपणार, असें त्यांच्या जवळच्या कोणाहि माणसाला वाटलें नाहीं. माधवराव ता. १६ जानुआरी १९०१ रोजीं सायंकाळीं ७॥ वाजतां बाहेरून फिरून आले. नंतर रा. रा. भाजेकर वकील व शेट भगवानदास यांजपाशीं एका विशेष महत्त्वाच्या अशा पुनर्विवाहासंबंधानें त्यांचें बोलणें झालें. नंतर भोजनोत्तर नेहमींप्रमाणें वाचन वगैरे सर्व झालें. जस्टिन मॅकार्थीच्या इतिहासाचें त्या वेळीं वाचन होत होतें. याच वेळीं जयपूरचे दिवाण बहादूर कांतिचरण मुकरजी यांच्या आकस्मिक मृत्यूविषयीं त्यांनीं असे उद्गार काढले कीं—

"That is the best death—to die while working"

( आपलें कर्तव्य बजावीत असतां आलेला मृत्यु हा उत्तम मृत्यु होय ! ) आणि हे उद्गार काढल्यानंतर अर्ध्या तासाच्या आंतच न्या. मू. रानडे यांचा इहलोकींचा वास संपला ! निजायला म्हणून ते आपल्या नेहमींच्या ठिकाणीं गेले, तों त्यांच्या छातींत कांहीं विलक्षण प्रकारच्या कळा येऊं लागल्या व यापेक्षां मृत्यु बरा असेंहि ते म्हणाले. डॉक्टरांना टेलिफोननें बोलाविलें, तों त्यांचा अंत झाला ! रात्रीं ९ च्या सुमाराला आपली प्रकृति रोजच्यापेक्षां आज बरी आहे, आज आपण येण्याची कांहीं आवश्यकता नाहीं, असा निरोप डॉक्टराला कळविला होता. अशा रीतीनें न्यायमूर्तींचा अंत अत्यंत आकस्मिक रीतीनें झाला.

## न्यायमूर्तींच्या चरित्रांतील कांहीं ठळक गोष्टी.

रानड्यांच्या पूर्वजांचें मूळ ठिकाण रत्नागिरी जिल्ह्यांतील चिपळूण तालुक्यांत गुहागरानजीक मोभारपाचेरी या नांवाचें आहे. त्या गांवीं या घराण्याचे वंशज असून त्यांच्याकडे खोतीचें उत्पन्न अद्याप चालू आहे. तेथून भगवंतराव नांवाचे

पुरुष ( माधवरावांचे निपणजे ) कोकणांतून देशांत पंढरपुराजवळ कसबें करकंब येथें येऊन राहिले. हे जरी गृहस्थ होते, तरी त्यांना ज्योतिष फार चांगलें येत होतें.

माधवरावांचे सख्खे आजे, अमृतरावतात्या, हे प्रथम करकंबहून नगर जिल्ह्यांत नोकरीकरितां गेले. तेथें ते शिरस्तेदार होऊन पुढें मामलेदार झाले, व नगर जिल्ह्यांतून पुणें जिल्ह्यांत आले. पुण्यास व आंबेगांवास पुष्कळ वर्षे मामलत केल्यावर पाबळ तालुक्यांत त्यांची बदली झाली, व तेथेंच त्यांनीं पेन्शन घेतलें. तात्यांना चार पुत्र होते. वडील बळवंतरावदादा, दुसरे गोविंदरावभाऊ, तिसरे गोपाळराव व चवथे विष्णुपंतअण्णा. या चवघांपैकीं गोविंदराव व विष्णुपंत प्रथम निफाडास नोकरीवर असून पुढें सन १८४१–४२ त कोल्हापुरास जबाबनिशीच्या कामावर आले, व दुसरे दोघे तात्यांजवळ पाबळासच राहिले. तात्या हे आपल्या वडिलांप्रमाणेंच बांध्यानें उंच असून अगदीं मजबूत होते. हे घोड्यावर बसणारे उत्तम होते. त्यांना संस्कृताची व शास्त्रांची आवड फार असल्यामुळें त्यांचा त्यांनीं चांगला अभ्यास केला होता. पुष्कळ संस्कृत ग्रंथ वाचून त्यांनीं आपल्या हातानें कित्येक पोथ्यांच्या प्रती लिहून काढल्या होत्या.

## मुंबईस विद्याभ्यास व आरंभींची नोकरी.

माधवरावांस तेरावें वर्ष लागतांच मोरोपंत दांडेकर नांवाच्या वांईतील एका कुटुंबवत्सल सद्गृहस्थांची मुलगी सखूबाई इच्याशीं सन १८५४ मध्यें त्यांचा विवाह झाला.

कोल्हापुरच्या शाळेंत १८५६ सालापर्यंत अभ्यास झाल्यावर ‘ आतां आम्हांला पुढील अभ्यासाकरितां मुंबईस पाटवा, ’ असें म्हणून दररोज आबासाहेब कीर्तने यांचेमागें माधवरावांनीं अगदीं तगादा लावला. गोविंदराव माधवास कधींसुद्धां कडकपणानें वागवीत नसत, किंवा रागें भरत नसत. तथापि त्यांच्यापुढें आपण जातीनें जाऊन कांहीं गोष्ट विचारावयाची किंवा मागावयाची नाहीं, अशी लहानपणापासून शेवटपर्यंत माधवरांची वहिवाट असे. होतां होईतों सर्व गोष्टी निरोपानिरोपीं हुजऱ्याजवळून करावयाच्या. एखादे वेळीं समक्ष बोलण्याचा प्रसंग आलाच तर अगदीं थोड्या शब्दांत मर्यादेनें बोलावयाचें. जेवणाच्या वेळेशिवाय इतर केव्हांहि तीर्थरूपांबरोबर बसणें माहीत नव्हतें. कधीं

समक्ष बोलण्याचें काम पडलेंच, तर उभें राहून तेवढ्यापुरतें बोलावयाचें, कीं लागलीच आपल्या कामाला जावयाचें हीच तऱ्हा लहानपणीं असल्यामुळें, मुंबईस शिकावयास जाण्याचें त्यांच्या मनांत जरी इतकें भरलें होतें तरी या भिडस्त स्वभावामुळेंच वडिलांच्या समोर आपण येऊन कधींच बोलण्यास धीर झाला नाहीं. म्हणून प्रत्येक दिवशीं लवकर निजून उठल्यावर आबासाहेब कीर्तने यांच्या खोलीच्या दाराशीं जाऊन उभें रहावयाचें व ते उठून बाहेर येण्याबरोबर त्यांना म्हणावयाचें कीं "आबासाहेब, आम्हांला मुंबईला केव्हां पाठविणार ? भाऊसाहेबांना सांगून आम्हां सगळ्याजणांना मुंबईला शिकावयाला पाठवा" याप्रमाणें दोन तीन महिने अगदीं नेटानें आबासाहेबांना म्हणून त्यांची पाठ पुरविली मग त्यांनीं व गोविंदराव भाऊंनीं विचार करून, विनायकराव, बळवंतराव, निळकंठराव, त्रिंबकराव व माधवराव अशा पांच जणांस एक गडी व ब्राह्मण बरोबर देऊन १८५६ सालांत मुंबईस अभ्यासाकरितां पाठविलें.

तेथें गेल्यावर तीनच वर्षांनीं म्हणजे १८५९ सालीं मुंबई युनिव्हर्सिटीची मॅट्रिकक्युशलेन परीक्षा माधवरावांनीं दिली. १८६० पासून १८६६ पर्यंत माधवराव एल्फिन्स्टन कॉलेजांत फेलो होते. पहिलीं तीन वर्षें त्यांनीं ज्यूनिअर फेलो ह्या नात्यानें व पुढलीं तीन वर्षें सीनिअर फेलो ह्या नात्यानें काम केलें. त्यावेळीं त्यांस अनुक्रमें ६० व १२५ रुपये फेलोशिपबद्दल मिळत असत. १८६२ सालीं ते बी. ए. व १८६४ सालीं एम. ए. व १८६६ सालीं दोन्ही एलएल. बीच्या परीक्षा पास झाले. ह्या वेळीं त्यांनीं इतका अभ्यास केला, कीं, त्यामुळें पुढें त्यांना डोळ्यांचें असह्य दुखणें सोसावें लागलें, व तेव्हांपासून त्यांचे डोळे बिघडले ते बिघडले ! प्रथम जेव्हां १८६४ सालीं डोळे बिघडले त्यावेळीं सतत ६ महिनेपर्यंत माधवरावांनीं फार हाल सोसले. साहा महिने डा. भाऊ दाजी ह्यांनीं त्यांच्या डोळ्यास औषधपाणी केले, सहा महिने हिरव्या पडद्यांनीं डोळे झांकून ठेविले होते व वाचनाचें काम बिलकुल करावयाचें नाहीं अशी डा. भाऊ दाजी ह्यांची सक्त ताकीद होती. त्यामुळें कोणी तरी हातास धरून डाक्टरकडे त्यांस घेऊन जावें व नंतर डाक्टरांनीं डोळ्यांचे पडदे काढून स्वतः धुवावे असा प्रकार चालू असे. साहा महिने वाचन बंद ही शिक्षा डोळ्यांच्या आजारापेक्षांही माधवरावांस कष्टमय वाटली असावी. म्हणून ह्या वेळीं त्यांचे सहाध्यायी येऊन वाचनाचें काम करीत व माधवराव एकून आपली तहान भागवीत असत. असो.

माधवरावांनीं स्वतंत्रपणें इंदुप्रकाश पत्राच्या इंग्रजी बाजूच्या संपादकाचें काम केलें; परंतु तें ते अगदीं तरुण असतांना. १८६४ सालीं त्यांचे डोळे बिघडले; १८६४ सालीं ते सीनिअर फेलो होते व त्या वेळीं त्यांस इंदुप्रकाशाचें कामही करावें लागे. अशा स्थितींत सीनिअर फेलोचें काम करून इंदुप्रकाशाचें काम ते कसे करीत असत ह्याची कल्पनाच केली पाहिजे. अनेक अडचणी असूनही त्यांनीं तें काम केलें व तेवढ्या अवधींत त्यांच्या लेखांची छाप सर्वत्र बसली. त्यांचे स्वतंत्र विचार, भाषा व विचारसौंदर्य, विषयाची परिपूर्ण माहिती, विचारांचा पोक्तपणा, उदार धोरण, व आत्मश्रद्धा इ. गुणांचा अनुभव येऊन इंदुप्रकाशाचें महत्त्व वाढलें; सरकार दरबारांत व इतरत्र इंदुप्रकाशाच्या विचारास महत्त्व प्राप्त झालें. सारांश डोळ्यांचें व्यंग दिवसेंदिवस वाढत असतां, १९०१ पर्यंतच्या तीसपस्तीस वर्षांत त्यांनीं जें अध्ययन केलें तें पाहून त्यांच्या विलक्षण उद्योगीपणाची साक्ष कोणा-लाहि सहज पटणार आहे. १८७१ सालीं त्यांची ॲडव्होकेटची परीक्षा पसार झाली. त्यांची एम्. ए. ची परीक्षा पसार झाल्यावर सर ॲलेक्झांडर ग्रांट यांनीं एम्. ए. क्लासाचें इतिहास विषयाचें अध्यापन करणें त्यांजकडे सोंपविलें, व तेव्हां-पासून त्यांनां '**पदवीधरमुकुटमणी**' (Prince of Graduates) असें म्हणत असत, तें किती अन्वर्थक होतें तें येथें सांगावयाला नकोच. त्यांची विचार-शक्ति व इंग्रजी भाषेंत निबंध वगैरे लिहिण्याची शैली कॉलेजांत अभ्यास करीत असतांनाच अध्यापकांच्या व विद्याखात्याच्या प्रमुखांच्या नजरेला इतकी येऊन गेली होती, कीं, मि. इ. आय्. ह्रावर्ड, विद्याखात्याचे अधिपति, यांनीं यांचे कांहीं लेख एतद्देशीय विद्यार्थ्यांच्या बुद्धीची व भाषाभिज्ञतेची मजल कोठवर जाऊं शकते याच्या मासल्यादाखल ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींत असणाऱ्या आपल्या स्नेह्यांना पाठवून दिले होते. माधवरावांनीं आपल्या आयुष्यांत निरनिराळ्या वेळीं ज्यूनिअर, सीनिअर फेलो; इंग्रजी भाषेचे अध्यापक; ॲक्टिंग मराठी ट्रान्स्लेटर; अक्कलकोटचे कारभारी; कोल्हापुरचे न्यायाधीश; हायकोर्टांत असि-स्टंट रिपोर्टर; प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट; प्रिन्सिपाल सदर अमीन; फर्स्टक्लास फर्स्टग्रेड सबजज्ज; पुण्याच्या स्मालकाज कोर्टाचे जज्ज; शेतकऱ्यांच्या कामासंबंधाचे स्पेशल जज्ज; फायनान्स कमिटीचे कमिशनर व अखेरीस मृत्यूपूर्वी सहा वर्षें हायकोर्टांतील जज्जाचें, अशीं निरनिराळीं कामें केलीं आहेत. पुण्यास काम करीत असतांना हायकोर्टामध्यें त्यांच्या कामाची वारंवार फार चहा होत असे. त्यांची जजमेंटस वाचून हे गृहस्थ कोणी तरी एक असाधारण व्यक्ति आहे अशी

जज्जांची समजूत होत असे व एकदां तर त्यांच्या निकालपत्राविषयीं बोलतांना Rao Bahadur Ranade deserves to sit by us and adorn the High Court Bench असे उद्गार चीफ जस्टिस साहेबांनीं काढले होते. चीफ जस्टिस सर मायकेल वेस्टॉप हे वारंवार पत्रें लिहून माधवरावांच्या जजमेंट्सबद्दल आपला आदर व्यक्त करून त्यांची स्तुति करीत असत. नोकरीला सुरुवात झाल्यापासून सर्व कामांत, सर्व ठिकाणीं त्यांची अशा प्रकारें सारखी वाहवा व चहा होत असल्यामुळेंच एतद्देशीयांना अत्यंत मोठ्या हुद्याची व शक्य अशी जी हायकोर्ट जज्जाची जागा ती त्यांना लॉर्ड हॅरिस यांच्या कारकीर्दीत मिळाली. या वेळीं लॉर्ड हॅरिस यांनीं माधवरावांना त्यांच्या विद्वत्तेची व ज्ञानाची तारीफ करून अभिनंदनपर पत्रहि पाठविलें होतें.

## माधवरावांची वास्तविक योग्यता.

माधवरावांसारखीं माणसें कोणत्याहि देशांत व कोणत्याही काळीं वारंवार पैदा होत नसतात. इंग्लंडांत आजपर्यंत एकच ग्लॅडस्टन झाला, तसेच हे या देशांतील ग्लॅडस्टन होत. एवढेंच नव्हे, तर त्यांची योग्यता कांहीं बाबतींत त्या मुत्सद्द्याहूनहि जास्त आहे, असें आम्ही समजतों. न्यायमूर्ति रानडे हे नेहमीं म्हणत असत, कीं, ज्या देशाची पक्षघातानें आजारी झालेल्या माणसासारखी स्थिति झाली आहे, त्याचा उदयकाळ ती स्थिति नष्ट झाल्यावांचून यावयाची नाहीं. त्यांनीं लोकादराची कधी पर्वा केली नाहीं, लोकांना योग्य वाटो अगर न वाटो, आपलें कर्तव्य करण्याला त्यांनीं कधीं कसूर केली नाहीं. आज वास्तविक प्रकार असा आहे कीं, शेवटच्या तीसपस्तीस वर्षांतील माधवरावजींच्या चरित्रांतील ठळकठळक गोष्टींचा इतिहास लिहावयाचा म्हणजे सर्व सामाजिक व धर्मसंबंधीं सुधारणेच्या चळवळीचा त्या काळचा हिंदुस्थानचा इतिहास लिहिणें होय. त्यांनीं या कामीं आपणाला इतकें वाहवून घेतलें होतें कीं, आपल्या लोकांचें खरें हित तें आपलें हित, आपल्या देशाचें अहित तें आपलें अहित, हें त्यांचें धोरण असे, आणि हें हित साधण्यासाठीं व अहित टाळण्यासाठीं रात्रंदिवस त्यांचा अव्याहत उद्योग चाललेला असे. विशाल बुद्धि, चांगलें शरीरसामर्थ्य, खरी लोकहितेच्छा, द्रव्यसाधन, उद्योगाची असाधारण आवड, इतकें असलें म्हणजे एका व्यक्तीच्या हातून किती व कशीं अवाढव्य कार्यें होत असतात, तें माधवरावजींच्या चरित्रापासून शिकण्यासारखें आहे.

माधवरावांची बुद्धि जशी विशाल, तसेंच ज्ञानहि खोल होतें. त्यांचा हुद्दा जितका मोठा, तितकाच त्यांच्या आचरणांत साधेपणा होता. त्यांची वृत्ति किती निगर्वी होती हें त्यांच्याशीं कमीजास्त संबंध असणारांना सांगावयाला नको. ते स्वतःच्या गरजांविषयीं इतके बेपर्वा असत कीं, सगळया देशाच्या हितासाठीं रात्रंदिवस जपणारे जे माधवराव त्यांच्या स्वतःच्या गरजा काय असाव्यात तें घरांतील माणसांना ( विशेषेंकरून त्यांच्या पत्नीला व भगिनीला ) पहावें लागे.

न्या. मू. रानडे ह्यांच्या धर्मपर व्याख्यानांची तिसरी आवृत्ति आतां वाचकांच्या हातीं आहेच तेव्हां वाचकांस रानडे व प्रार्थनासमाज ह्यांचा किती निकट संबंध होता तें सांगण्याची जरूर नाहीं. मुंबईच्या प्रार्थनासमाजाची स्थापना १८६७ सालीं झाली. रावसाहेब रानडे पुढल्याच वर्षी म्हणजे १८६८ सालीं मुंबईच्या समाजांत दाखल झाले. तेव्हांपासून अखेरपर्यंत प्रार्थनासमाजाशीं त्यांचा अत्यंत निकट संबंध होता. धर्मपर व्याख्यानांपैकीं बहुतेक व्याख्यानें रावसाहेब मुंबईस न्यायमूर्ति होऊन आल्यानंतरचीं आहेत. अर्थात् १८९८ पासून त्यांनीं जीं व्याख्यानें दिलीं, संगत सभेंतील वादविवादाच्या वेळीं, काशीनाथपंत तेलंग, रामकृष्णपंत भांडारकर, बाळ मंगेश वागळे, मोरोबा विनोबा, भास्कर हरी भागवत, इ० मंडळी एकत्र झाल्यावर रावसाहेब निरनिराळया वादग्रस्त विषयांवर जे आपले विचार मुंबईस असतांना प्रदर्शित करीत असत त्या सर्वांस महाराष्ट्रीय समाज कायमचा अंतरला आहे हें पाहून मन अत्यंत खिन्न होतें. नाहीं म्हणावयास संगतसभेंतील एक दोन वेळां त्यांनीं प्रदर्शित केलेले विचार संगतसभा सदराखालीं आलेले आहेत तेवढेच. उपासना प्रसंगीं त्यांच्या त्या प्रेमळ प्रार्थना सुरू झाल्या कीं, ज्याच्या ठिकाणीं थोडी म्हणून धर्मबुद्धि जागृत आहे असा मनुष्य जागच्या जागीं खिळला जात असे. मनुष्य कितीही चिंतेनें व्यग्र झालेला असला तरी माधवरावांच्या त्या प्रेमळ प्रार्थना त्यानें ऐकिल्या कीं त्याचें अर्धें दुःख, चिंता नाहींशी होत असे. आणि एकदां तो उपदेश सुरू झाला कीं, ज्याप्रमाणें व्याख्याते विषयाशीं एकरूप होत असत त्याचप्रमाणें श्रोते व्याख्यात्याशीं समरस होत. सव्वा सव्वा तास उद्बोधन व प्रार्थना व सव्वा तास व्याख्यान ऐकूनही शेवटीं 'अरेरे आणखी पुढें नाहीं' असें वाटे. असो; मुंबईस आल्यापासून त्यांच्या सहवासाचा प्रार्थनासमाजाच्या मंडळीस अधिक लाभ झाला व त्यामुळेंच धर्मपर व्याख्यानें मराठी भाषा जाणणारांस लाभलीं. १८९८ सालीं प्रार्थनासमाजाचे पहिले अध्यक्ष डा. आत्माराम

पांडुरंग निवर्तले. तेव्हांपासून अखेरपर्यंत न्या. रानडेच प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष होते. मुंबईस आल्यापासून त्यांनीं समाजकार्यास उपदेशक ह्या नात्यानें आपल्याला वहावून घेतलें होतें. प्रकृति चांगली असो अगर नसो, चिटणिसांचें विनंतिपत्र जातांच सहसा ते इतर कामाची सबब पुढें आणून हें काम टाळीत नसत. बाहेरचें अतिशय काम, प्रकृति नादुरुस्त, आगाऊ सूचना न दिलेली, अशा स्थितींतही रावसाहेब प्रार्थनामंदिरांतील उपासना चालवावयास सिद्ध असत. असो. एकंदरींत त्यांच्या चरित्राकडे पाहिलें कीं, साधुवर्य तुकाराम यांनीं दोन निरनिराळ्या अभंगांत जें म्हटलें आहे:—

दया क्षमा शांती । तेथें देवाची वसती ॥

* * * *

धन्य तेचि प्राणी क्षमा ज्यांचे अंगीं । न भंगे प्रसंगीं धैर्य बळ ॥
न म्हणे कोणासी उत्तम वाईट । महत्त्व वरिष्ठ नसे तेथें ॥

हे सर्व गुण माधवरावजींत पूर्णपणें वास करीत होते असें तात्काळ पटतें. शांति व क्षमा हे दोन गुण त्यांच्या ठायीं विशेष प्रमाणानें जर नसते, तर त्यांच्या हातून देशहिताचीं एवढीं कामें होणें अशक्य झालें असतें. वर्तमानपत्रें व मासिकें यांत विरुद्ध पक्षांकडून सारखी टीका चालली असतां, प्रसंगविशेषीं टीकाकारांनीं अनुदार वृत्तीचा स्वीकार करून असभ्य टीका केली असतांहि आपली नेहमींची शांत वृत्ति कायम ठेवून, व क्षमेचा आश्रय करून, आपल्या कर्तव्यांत दक्ष असणें हें असामान्य आहे; आणि हेंच नामदार न्या. मू. रानडे तीस पस्तीस वर्षें करीत होते. त्यांचा विलक्षण साधेपणा, निगर्वी वृत्ति, शांत व क्षमाशील स्वभाव यांमुळें त्यांना आपलीं कार्यें करावयाला जास्त मदत होत असे. त्यांची क्षमाशील वृत्ति इतक्या उच्च कोटीपर्यंत गेलेली होती कीं, ती पाहून ज्यांस त्यांच्या चरित्राचें रहस्य कळत नसे त्यांस प्रत्येक प्रसंगीं रावसाहेबांचें हें आचरण अत्यंत स्वाभिमानशून्यतेचें असें वाटे. एकदां मद्रासेस जात असतां वाटेंत सोलापूर येथें गाडी उभी राहिली. त्या वेळीं रावसाहेब बाहेर प्लॅटफार्मवर फिरत होते. इतक्यांत एक साहेब बहादुर रानड्यांच्या डब्यांत बसावयास आले. पण, पाहातात तों आंत एका काळ्या माणसाचें सामान ! साहेब बहादुर एकदम गरम झाले, व रानड्यांचा बिछाना, पेट्या, ट्रंक्स वगैरे सर्व सामान प्लॅटफार्मवर फेंकून देण्यांत आलें ! रानड्यांचा शिपाई तोंड आंबट करून ही कहाणी

ानड्यांस सांगूं लागला. त्या वेळीं रावसाहेब गरम झाले काय? बूट हापटून स्टेशनमास्तराकडे त्यांनीं तक्रार नेली काय? नाहीं! त्यांनीं शांतपणें आपल्या शिपायास सांगितलें कीं, "साहेब बहादुरांना मी ह्या डब्यांत असलेलें खपत नाहीं असं दिसतें. बरें तर, माझें सामान तुझ्या डब्यांत घाल. तेथें मला वाटतें मला अधिक सुख लाभेल. जा." तथापि न्यायमूर्तींच्या बरोबर प्रवास करणारांनीं झालेला प्रकार स्टेशन मास्तरांच्या कानांवर घतला. साहेब पाहून स्टेशनमास्तरनें प्रथम कानांवर हात ठेविले! परंतु त्याला व त्या साहेबासही प्लॅटफार्मवर फिरत असलेले गृहस्थ हायकोर्ट जज्ज आहेत असें कळलें तेव्हां तात्काल सर्व कांहीं फिरलें! दोघेही नम्रपणें रावसाहेबांपुढें आले व त्यांची माफी मागितली. पण पूर्वीचा आडदांडपणा, त्याचप्रमाणें आतांची माफी रावसाहेबांना सारखीच! त्यांनीं तिकडे विशेष लक्ष न देतां तें प्रकरण तेथेंच थांबविलें. परंतु नंतर पांच वर्षांनीं एका साहेबाचें विलायतेहून रावसाहेबांस पत्र आलें. तें वरील साहेबांचेंच होतें. त्यांत ह्या साहेबांनीं रावसाहेबांनीं वरील प्रसंगीं दाखविलेल्या शांतीबद्दल त्यांची योग्य शब्दांनीं स्तुति करून व त्यांच्या बद्दल आपला असामान्य आदर व्यक्त करून म्हटलें:—I have learnt from you a lesson which was not taught to me while I was in India. अशा प्रकारें त्यांच्या क्षमाशील वृत्तीचा योग्य मनुष्यांवर अत्यंत इष्ट असा परिणाम होत असे.

न्यायमूर्तींसारखीं माणसें आपल्या देशांत पैदा होणें हें देशाचें खरें वैभव होय. देशाच्या वैभवाला असलींच माणसें कारण होत असतात. सर्व स्थितींतील लोकांना कित्ता घेण्यास योग्य अशीं अशींच माणसें होतात. अशा थोर व असामान्य पुरुषाचा आपल्या देशाला इतके दिवस सहवास घडला, हें त्यांतल्या त्यांत समाधान मानण्याजोगें आहे. आजच्या काळीं वास्तविक पहातां माधवरावजींसारख्यांची फार आवश्यकता आहे. निरनिराळ्या संस्थांचा पसारा टाकून ते तडकाफडकी निघून गेले. आतां त्यांची ती भव्य, शांत, पवित्र, साधी मूर्ति प्रार्थनामंदिराच्या व्यासपीठावर बसली आहे, व उपासना चालवीत आहे, अशी कल्पना करून ती पूर्वीची सृष्टि दृष्टीपुढें आणिली तरी अद्याप चित्त तल्लीन होऊं लागतें व तो देखावा दृष्टीपुढें येऊन मन प्रसन्न होतें! त्यांचे ते अत्यंत मधुरवाणीयुक्त उपदेश आतां कधीं ऐकावयाला सांपडावयाचे नाहींत खरे; परंतु त्यांचीं व्याख्यानें वाचीत असतां तो महात्मा आपल्याला पुन्हां एकदां उपदेश करूं लागला आहे असा भास होतो. कांहीं व्याख्यानांत इतका ताजेपणा आहे.

त्यांच्या त्या अत्यंत प्रेमळ प्रार्थनांत तल्लीन होण्याचा आतां सुप्रसंग कधीं येणें शक्य नाहीं! आपण या सर्वांला मुकलों आहों—कायमचे मुकलों आहों. हेंच अखेरीस खरें! पण, एकार्थी माधवरावांचा व आमचा वियोगच झालेला नाहीं. तो होणें शक्यच नाहीं. त्यांची पवित्र मूर्ति केव्हांही दिसणार नाहीं; पण ते आत्मिक स्वरूपानें in spirit आमच्यांत सदैव असणार. त्यांनीं स्थापिलेल्या संस्था, त्यांच्या कृति या आमच्या समोर नेहमीं राहणार. आणि धर्मपर व्याख्यानांत आलेले त्यांचे उपदेश जोंपर्यंत आपल्या दृष्टीपुढें आहेत व आपल्यास मार्ग दाखवीत आहेत तोंपर्यंत प्रत्यक्ष रावसाहेबांच्याच सहवासाचा आपल्यास लाभ होत आहे असें मानावयास कांहीं हरकत नाहीं आणि आतां यांतच समाधान मानून राहणें भाग आहे.

## कांहीं आक्षेप व त्यांच्या चरित्राचें रहस्य.

वरील भागांत माधवरावजींच्या चरित्रांतील विशेष गोष्टी, त्यांची योग्यता, त्यांच्या आकस्मिक व अकालिक मृत्यूमुळें झालेलें सर्व देशाचें नुकसान वगैरे गोष्टींसंबंधानें दोन शब्द लिहिलेले आहेत. त्यांच्या चरित्रापासून सर्वांनीं व विशेषतः नवीन पिढीनें काय बोध घेण्यासारखा आहे त्याविषयीं विवेचन करण्यापूर्वी त्यांच्याविषयीं पसरविलेल्या एका गैरसमजाविषयीं दोन शब्द लिहिणें जरूर आहे. कारण, माधवरावांचा मृत्यु हा त्यांच्या विषयीं गैरसमज उत्पन्न करण्याचें एक साधन कांहीं मित्रांस झालें! मृत्यूपूर्वी प्रार्थनासमाजाकडील त्यांचें लक्ष कमी झालें होतें व तें जुन्या धर्मविचारांकडे वळूं लागले होते असें त्यांनीं उठविलें! पण हें निखालस खोटें होतें. अगदीं अखेरपर्यंत प्रार्थनासमाज, त्यानें आरंभिलेलीं कार्यें, त्यांच्याद्वारें होत असलेला धर्मप्रसार वगैरे गोष्टी त्यांना अत्यंत प्रिय होत्या. बुधवार ता. १६ ज्यानुआरी १९०१ रोजीं सायंकाळींच त्यांनीं प्रार्थनासंगीतांतील पद्यें आपल्या भावजयीला मुद्दाम म्हणावयाला सांगितलीं होतीं. व रोज संगीतांतील पदें ते म्हणत असत. सन १८९९ सालीं प्रार्थनासमाजाच्या उत्सवाच्या वेळीं, त्यांनीं जें व्याख्यान दिलें त्या वेळीं पुढील उद्गार काढलेः—

" आजच्या दिवशीं ही सर्व हकीकत आपल्यापुढें ठेवण्यांत माझा उद्देश हा आहे कीं, ही संस्था कमजोर आहे, तींत बल कांहीं नाहीं, ती लंगडी आहे, या म्हणण्यांत अर्थ नाहीं, हें दाखवावें. संस्था बलवानच आहे. तिचा दिवसेंदिवस जयच होत आहे. आपल्या या प्रांतीं जर तशी समाधानकारक स्थिति

नसली, तर हा दोष संस्थेचा नव्हे. आपल्यामागें ज्या उपाधी आहेत त्यामुळें तसें होत असेल."

आतां एकनाथी भागवतांतील वेंचे घेऊन त्यांवर भाषण करणें, किंवा शेणव्यांच्या ठाकुरद्वारीं जाऊन तेथें एकनाथ, रामदास यांवर प्रवचनें करणें, अगर उपनिषदांतील वचनांच्या आधारें धर्मोपदेश करणें म्हणजे मतांतर होणें, असा तर त्यांच्या टीकाकारांचा समज नाहीं ना ? प्रार्थना अगर ब्राम्हसमाजांनीं वेद, उपनिषदें व भाष्यें अगदीं टाकाऊ आहेत, असें कधीं म्हटलें आहे काय ? उलट त्या ग्रंथांतील सोज्वल तत्त्वांचा स्वीकारच समाज आजपर्यंत करीत आलेला नाहीं काय ? यासंबंधानें खुद्द न्यायमूर्ति रानडे यांनीं वरील उत्सवाच्या प्रसंगीं आपल्या भाषणाच्या प्रारंभींच पुढील उद्गार काढलेः—

" पूर्वीच्या शुद्धतम अशा धर्माच्या स्वरूपास अनेक उपाधींच्या योगें हल्लीं काळिमा आला आहे, तो धुऊन टाकण्याविषयीं ज्यांचा प्रयत्न चालला आहे अशा संस्थांची गेल्या वर्षांतील हकीकत आपल्यापुढें ठेवावी असा आज विचार आहे. "

आणखी एका प्रसंगीं त्यांनीं पुढील उद्गार काढलेः—

"........We, the members of Brahma Samaj, can claim a long ancestry, as old as any of the sects prevailing in the country. The Brahma movement was not first brought into existence in 1828; we are representatives of an old race. या संबंधानें जास्त लिहिण्यांत अर्थ नाहीं. ठाकुरद्वारसारख्या ठिकाणीं त्यांनीं जाऊन प्रवचन केलें हें कोणास ठीक न वाटणें साहजिक आहे. कारण, तें एक देऊळ आहे. रावसाहेबांनीं प्रतिमापूजनावर आपला विश्वास नसल्याचें जाहीर केलें होतें, आणि असें असून तें जुन्या मंदिरांत गेले व तेथें त्यांनीं भाषणें केलीं, हें कांहीं लोकांस आवडलें नाहीं हें आम्ही जाणून आहों. पण, रावसाहेबांनीं स्थलमहात्म्याचा विचार बाजूस ठेविला होता. त्यांचें धोरण ना. गोखले यांनीं पुढील वाक्यांत स्पष्ट केलें आहेः—

" Mr. Ranade thought that the discourses were everything. The place where they were delivered was nothing. He wanted his ideas to reach his country-

men and he had no objection to going wherever they were assembled provided he got an opportunity to speak to them."

आतां, प्रथम सर्वांनीं हें विचार करण्यासारखें आहे, कीं, माधवरावजी एवढया थोर पदास चढले कसे ? त्यांच्यासंबंधानें या शहरांत नव्हे, पुण्यांत नव्हे, या इलाख्यांतहि नव्हे, तर सगळ्या हिंदुस्तान देशांत जो आदर व पूज्यभाव वसत आहे, तो कां ? ते न्यायमूर्ति होते, त्यांची बुद्धि विशाल होती, त्यांचें ज्ञान अगाध होतें, त्यांचा स्वभाव नम्र होता, त्यांची लोकहितेच्छा फार बळकट होती, त्यांनीं देशहितापुढें स्वहित तुच्छ मानलें व मरेपर्यंत स्वदेशासाठीं झटले, म्हणूनच त्यांच्याविषयीं पूज्यभाव सर्वत्र साधारण आहे काय ? ते मृत्यु पावले त्यावेळीं प्रत्येक व्यक्तीला आपला खरा हितकर्ता नष्ट झाला असं कां वाटलें ? ते मराठी भाषेसंबंधानें अंतःकरणपूर्वक कैवार घेत होते, विश्वविद्यालयाच्या अनेक कार्यांत व विद्यार्थ्यांच्या हितसंबंधांत ते अत्यंत दक्ष असत म्हणूनच सर्व पक्षांच्या लोकांस आपला देश, आपले लोक, आपला समाज, तेजहीन झाला असें वाटतें काय ? या सर्व गोष्टींविषयीं प्रत्येक विचारी व सुशिक्षित व्यक्तीनें अवश्य विचार करण्यासारखा आहे.

यासंबंधानें निरनिराळ्या ठिकाणांहून निरनिराळ्या प्रकारचीं उत्तरें मिळालीं आहेत; पण, त्यांनीं आमचें समाधान होत नाहीं. कोणाला वाटत आहे कीं, रावसाहेब उदयास आले त्या काळीं पुणें अगदीं खालावलें होतें, तें मृतप्राय झालें होतें, त्याच्यांत जागृतावस्था आणण्यास रावसाहेब सर्वांशीं कारण झाले. निरनिराळ्या प्रकारच्या संस्था त्यांनीं स्थापिल्या; राजकीय, सामाजिक, औद्योगिक सुधारणा एकसमयावच्छेदेंकरून करण्याची आवश्यकता आहे ही विचारजागृति लोकांत उत्पन्न केली; म्हणून त्यांची योग्यता इतकी थोर. कोणास वाटतें, कीं अलौकिक बुद्धिमत्ता व स्वदेशहितचिंतन व कृति हीं तिन्ही एकत्र झाल्यामुळेंच ते या पदाला चढले. पण, असल्या कारणांनीं खरें समाधान होणें शक्य नाहीं. हीं सब कारणें कमीजास्त प्रमाणानें जरी मान्य केलीं, तरी एकसमयावच्छेदेंकरून आपल्या देशाची उन्नति झाली पाहिजे, हें आधीं आणि तें मागाहून असें होतां नये, अशा प्रकारची त्यांची वृत्ति व्हावयाला काय कारण असावें ? आणि हें शोधावयाला आपण त्यांच्या उद्गारांचें साहाय्य घेतलें पाहिजे.

राजा राममोहन राय यांच्या पुण्यतिथीसंबंधानें १८९६ सालीं व्याख्यान देतांना थोर पुरुष, साधु पुरुष, कोणाला म्हणावें, या प्रश्नाचा त्यांनीं फारच चांगल्या रीतीनें विचार केला आहे. त्या व्याख्यानांत त्यांनीं थोर पुरुषाचीं लक्षणें पुढीलप्रमाणें सांगितलीं:—

" Truthfulness, great impulses, moral aims, resourcefulness to attain those aims by the bond of love and fellowship—these are the traits of character which go to make a man great, and those in whom they are best developed are the purest of men....Earnestness of purpose, sincerity of action, originality, imagination, and above all the power of magnetism–we may call it vital or spiritual magnetism—these are the qualities which go to make a man great."

न्या. मू. रानडे यांच्या मृत्यूसंबंधानें लिहितांना टाइम्सकारांनीं म्हटलें होतें कीं, माधवरावांसारखा पुरुष शोधावयास आतां राजा राममोहन रायांपर्यंत मागें गेलें पाहिजे. ! आणि हें सर्वथा खरें आहे. रावसाहेब हल्लींच्या काळचे नाना फडणीस होते, असें पाहिजे तर कोणी म्हणोत; पण आमच्या दृष्टीनें ते त्याहून थोर होते. राजा राममोहन राय व रावसाहेब यांच्या चरित्रांत पुष्कळ साम्य आहे व तें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

## राजा राममोहन राय व रावसाहेब रानडे.

राजा राममोहन राय व न्या. मू. रानडे यांच्या चरित्रांतील साम्याविषयीं विचार करितांना एक मुख्य गोष्ट अशी लक्ष्यांत ठेविली पाहिजे, कीं, ज्या व्यक्तीच्या चरित्रांतील साम्याकडे आपणांला पहावयाचें आहे त्यांतील एकीचा उदय गेल्या शतकाच्या प्रारंभीं झालेला आहे, व माधवराव राजा राममोहन रायांच्या मृत्युनंतर तीसचाळीस वर्षांनीं उदयास आले आहेत. म्हणजे राजा राममोहन यांच्या काळची स्थिति व माधवरावांच्या वेळची स्थिति आपण आपल्या नजरेसमोर ठेविली पाहिजे. त्या वेळीं शिक्षणाचा प्रसार किती झाला होता, व रावसाहेबांच्या वेळची स्थिति काय होती, हें पाहिल्यावांचून आपलें चालावयाचें नाहीं.

राजा राममोहन रायांच्या चरित्रांतील विशेष महत्त्वाच्या गोष्टी अलीकडे आपल्या प्रांतींहि बऱ्याच अवगत झालेल्या आहेत. राजा राममोहन राय यांच्या उदयाला त्यांचें अनेक भाषांचें ज्ञान बऱ्याच अंशीं कारण झालें. त्यायोगानें त्यांना निरनिराळ्या धर्मग्रंथांतील तत्त्वें पहातां आलीं. त्यांची तृप्ति भाषांतरांनीं झाली नाहीं. पण, अशा प्रकारचें कार्य माधवरावांना वर दर्शविलेल्या नियमाला अनुसरून करण्याची आवश्यकता नव्हती. राममोहन रायांना आपल्या प्रचलित हिंदुधर्माला बरेंच अवनत स्वरूप प्राप्त झालें आहे असें वाटत होतें. आपल्या पुरातन धर्मग्रंथांत अत्यंत उन्नत तत्त्वें असतां त्यांचा लोप होऊन अवनत तत्त्वांचा आश्रय केल्यामुळें लोकांच्या धर्मकल्पना अत्यंत आकुंचित झाल्या होत्या, असें त्यांना वाटत असे; म्हणून त्यांनीं ब्राह्मसमाजाची स्थापना केली. रावसाहेबांच्या मतें त्यांनीं नवें कांहीं केलें नाहीं. त्यांच्या कार्याची मर्यादा किती व्यापृत होती, तें रावसाहेबांच्याच पुढील वाक्यांवरून दिसून येईलः—

"With Raja Ram Mohan Roy the Bramha Samaj faith was not a New Dispensation, a new declaration of God's purposes. He aspired only to establish harmony between men's accepted faiths and their practical observances by a strict monolatrous worship of the One Supreme Soul, a worship of the heart and not of the hands, a sacrifice of self and not the possessions of the self. There was nothing Christian in its conception, origin or method."

आतां रावसाहेबांनीं असें काय केलें ? रावसाहेबांनीं कोणता समाज स्थापला असें प्रश्न येथें उद्भवणें शक्य आहे. रावसाहेबांनीं समाज स्थापिला नाहीं; कारण आधींच तो या प्रांतीं स्थापन झालेला होता. परंतु पूर्वीच्या शुद्धतम धर्मस्वरूपाला हल्लीं कालिमा आला आहे, असें ते वारंवार बोलून दाखवीत असत, आणि हा कालिमा घालविण्यासाठीं त्यांनीं प्रयत्न चालविले होते. आपल्या पुरातन धर्माच्या शुद्धतम स्वरूपाविषयीं त्यांना किती अभिमान होता, आणि तें स्वरूप जनांस दाखविण्यासाठीं त्यांचे कसे प्रयत्न चाललेले असत, हें त्यांनीं केलेले धर्मोपदेश पहातां कोणालाहि कळून येणार आहे. त्याचप्रमाणें त्यांचीं भागवत-

धर्मांवरील सर्व व्याख्यानें ज्यांनीं ऐकिलीं असतील, अगर प्रसिद्ध झालेलीं व्याख्यानें ज्यांनीं वाचिलीं असतील त्यांस त्यांचे या दिशेचे प्रयत्न कसे सतत चालले होते, तें दिसून येईल. त्यांनीं राममोहनांचें कार्य त्यांनीं घालून दिलेल्या मार्गाचे अनुसरण करून चालविलें.

आतां एवढयावरून न्या. मू. रानडे यांची धर्ममार्गांत आकुंचित वृत्ति होती, असा आक्षेप येण्याचा संभव आहे; परंतु वास्तविक प्रकार तसा नव्हता. माधवराव, व कोणत्याहि गोष्टींतील आकुंचित वृत्ति या दोन गोष्टी एकत्र असणेंच मुळीं शक्य नव्हतें ! ब्राम्ह अगर प्रार्थनासमाजाचें मूळ ख्रिस्ती धर्मांत आहे असें जे ख्रिस्ती लोक प्रतिपादित असतात, व ज्यांचें अनुकरण समाज ज्यांना नको आहे असे लोक अत्यंत अनुदार वृत्तीनें करीत असतात, त्यांचें म्हणणें चुकीचें आहे हें दाखविण्यासाठीं त्यांनीं भागवत धर्मावरील व्याख्यानें दिलीं व उपनिषदांतील उदात्त तत्त्वांची ओळख सर्वांस करून दिली. कोणत्याहि धर्मांतील उदात्त तत्त्वांविषयीं आदरभाव असणें निराळें, व ब्राम्ह अगर प्रार्थनासमाजांची त्या धर्मापासून-उत्पत्ति झाली असें म्हणणें, अगर त्यांत ख्रिस्ती धर्माचाच समावेश झालेला आहे असें प्रतिपादणें, निराळें. ब्राम्हधर्माचें सख्य सर्व धर्मांशीं आहे; परंतु या शुद्ध धर्माचीं सर्व मूलतत्त्वें इतर धर्मांतून घेतलीं आहेत, असें मानावयाला माधवराव कधीं तयार नसत एवढेंच केवळ नव्हे तर ब्राम्हधर्म ही हिंदुधर्माचीच एक शाखा आहे असें त्यांनीं जें प्रतिपादिलें आहे त्याची माहिती संगतसभा प्रकरणांत वाचकांस पहावयास सांपडेल. ह्यावरून असें दिसून येईल कीं, धर्मसंबंधाच्या बाबतींत त्यांच्या व राजा राममोहन राय यांच्या धोरणांत साम्य होतें. इतर धर्मांविषयीं आदरभाव असावा, पण आपल्या पुरातन धर्मांतील उच्च तत्त्वें—कीं जीं ब्राम्हधर्माचीं मूलतत्त्वें आहेत, त्यांविषयीं आदर व पूज्यभाव असून अभिमानहि असला पाहिजे, असें धर्ममार्गांत राममोहन राय व माधवराव यांचें धोरण होतें, व तेंच सर्वपरी इष्ट आहे.

## रावसाहेब रानडे यांचें धोरण व कार्य.

आम्ही हिंदु लोक अत्यंत दयाशील व कोमल हृदयाचे असे प्रसिद्ध आहों, आणि यांत जरी पुष्कळ सत्यांश असला, तरी या आमच्या सदय वृत्तीला व एकंदर कृपाशील आचरणाला पूर्ण हरताळ लावून आम्हांला धर्माच्या नांवाखालीं पक्के रानटी व क्रूर करणारी एक राक्षसी चाल आमच्यांत एकदां होती. अर्थात्

सतीच्या चालीविषयीं हे आमचे उद्गार आहेत, हें आणखी स्पष्टपणें सांगावयाला नको. हल्लींच्या पिढींतील लोकांना या विषयाविषयीं वर्तमानपत्रांतील वादच वाचावयाची संधि मिळते; परंतु ज्यांनीं हे असले प्रकार डोळ्यांनीं पाहिले आहेत, अगर ज्यांनीं अशा लोकांच्या तोंडून हकीगती ऐकल्या आहेत, अथवा या राक्षसी रूढीविषयींचीं वर्णनें ज्यांनीं वाचलीं आहेत त्यांना या बाबतींत आपल्या देशावर राजा राममोहन राय यांनीं किती उपकार केले आहेत, तें कळणार आहे. राममोहन राय यांनीं या बाबतींत जी खटपट केली ती जर केली नसती, तर आणखी किती तरी वर्षें आपल्या धर्माला व देशाला काळिमा लावणारी व आमचें मनुष्यत्वच नष्ट झालें असावें असें भासविणारी ही चाल आमच्या समाजांत राहिली असती. मग, न्यायमूर्ति रानडे यांनीं असें काय केलें, असा येथेंहि प्रश्न साहजिकपणें पुढें येतो, आणि सामाजिक चळवळींच्या संबंधानें रावसाहेबांनीं काय केलें हें पहाण्यासाठीं आपल्याला लांब जावयाला नको. आम्हीं वर एके ठिकाणीं म्हटलें आहे, कीं, त्यांच्या मृत्यू पूर्वीचा गेल्या तीसपस्तीस वर्षांतील माधवरावांच्या चरित्रांतील ठळक ठळक गोष्टींचा इतिहास लिहावयाचा म्हणजे सर्व सामाजिक व धर्मसंबंधीं चळवळींचा त्या वेळचा इतिहास लिहिणें होय. राजा राममोहन यांचा काळ निराळा होता, आणि माधवरावांचा काळ निराळा होता. तरी माधवरावांनीं ज्या चळवळी केल्या, त्यांपैकीं कांहीं तरी राममोहन रायांनींहि, अकालींच मृत्यु न येता तर, केल्या असत्या.

आतां समाजिक सुधारणेच्या बाबतींत रावसाहेबांच्या हातून कांहींच चुका झाल्या नाहींत असें आम्ही म्हणतों, असें मात्र कोणीं समजूं नये. मनुष्यप्राणी हा सदोष असणें हा त्याचा नैसर्गिक धर्म आहे. दोषांश कांहींच नाहीं, असा प्रकार कधीं होणें शक्य नाहीं, आणि या दृष्टीनें विचार केला म्हणजे त्यांच्या हातून लौकिकदृष्ट्या ज्या दोन चुका* सामाजिक सुधारणेच्या बाबतींत झाल्या, त्यासंबंधानें त्यांची आतां तरफदारी करण्याची आम्हांला आवश्यकता दिसत नाहीं. ते दोन्ही प्रसंग आपल्यासमोर आहेत. परिस्थिति, अडचणी, वगैरे सर्व-कारणांचा विचार केला तरी सुद्धां त्यांनीं दोन्ही प्रसंगी जें कांहीं केलें तेंच योग्य होतें

---

* ह्या दोन चुका म्हणजे विधवाविवाहाच्या बाबतींत त्यांनीं घेतलेली माघार व चहा प्रकरणानंतर सर्वापराधांबद्दल त्यांनीं घेतलेलें प्रायश्चित्त.

असें केव्हांही म्हणतां यावयाचें नाहीं आणि स्वतः रावसाहेब आपले दोष पूर्णपणें जाणत होते आणि हें त्यांनीं स्वतःच बोलून दाखविलेंहि आहे.

राजा राममोहन राय केवळ धर्मसंबंधीं व सामाजिक चळवळीत पुढाकार घेऊन स्वस्थ राहिले नाहींत. राजकारणांतहि त्या वेळच्या कालमानाप्रमाणें त्यांनीं मन घातलें होतें, हें न्यायमूर्ति रानडे यांच्याच पुढील उद्गारांवरून स्पष्ट होईल:—

"He was at once a social reformer, he was the founder of a great religious movement and he was a great politician. These three activities were combined in him in such a way that they put to shame the performances of the best among us at the present time."

"Anybody who wants to know what true patriotism is, had better study the evidence that he gave and the letters he wrote to men in power over sixty years age—long before our era of Congress meetings and Conferences."

न्यायमूर्ति रानडे सरकारी नोकर होते; तरी पण हा त्यांचा संबंध त्यांच्या राजकीय चळवळीच्या आड येत नसे. त्यांचा राजकीय संस्थांशीं अत्यंत निकट संबंध आहे, त्यांच्या सल्लयावांचून अनेक राजकीय चळवळींस व्यवस्थित स्वरूप येत नाहीं, हें सरकार जाणून होतें आणि असें असूनहि त्यांना आपलीं सर्व कामें करितां येत होतीं. जोंपर्यंत पुण्याच्या चळवळींवर त्यांचा दाब होता, तोंपर्यंत पुणें शहरानें आपलें नांव गाजविलें; तोंपर्यंत सरकारांत तेथील संस्थांविषयीं मानसन्मान होता; पण रावसाहेबांचें पुणें सुटल्याबरोबर तेथें कशी यादवी माजली, कसे अनेक थेर झाले, राष्ट्रीय सभेच्या वेळीं देशाभिमानाच्या कशा लाटा उसळल्या, सार्वजनिक सभेचा कसा खेळखंडोबा झाला; सारांश, पुण्यावर कसकसे प्रसंग आले, तें सर्वश्रुत आहेच. पुण्याच्या सर्व लोकांवर एकट्या माधवरावांचें जें

वजन होतें तें कमी झाल्यामुळेंच पुणेंकरांचें नांव बहु झालें, असें म्हटलें असतां मुळींच मुद्धां अतिशयोक्ति होत नाहीं.*

सारांश, आपल्या धर्मांतील अत्यंत उन्नत अशा तत्त्वांना कालिमा लागला आहे तो नाहींसा करून शुद्ध, पवित्र आणि सत्य धर्माचा प्रसार करण्यासाठीं, सामाजिक व्यंगांविषयीं विचारी लोकांत जागृति उत्पन्न करून तीं घालविण्यासाठीं, प्रजा या नात्यानें आपले जे वास्तविक हक्क आहेत ते प्राप्त व्हावे म्हणून राजा राममोहन राय झटले, व त्याचप्रमाणें हे आमच्यांत वागलेले रावसाहेब अथवा हल्लींचे राममोहन राय आपल्या देशाच्या या तिन्ही प्रकारच्या हितासाठीं अहर्निश झटले, एवढेंच नव्हे तर आपल्या शारीरिक व्यंगांकडे व वाढत्या दौर्बल्याकडे त्यांनीं मुळींच लक्ष्य दिलें नाहीं; आपल्या यातनांची त्यांनीं पर्वा केली नाहीं, आणि अखेरीला आमच्या हिताचा ध्यास असतांनाच त्यांना इहलोकींची यात्रा संपवावी लागली !

## न्या. मू. रानडे यांच्या चरित्रापासून घेण्यासारखा बोध.

Lives of great men all remind us,
We can make our lives sublime,
And, departing, leave behind us,
Foot-prints on the sands of time.

*Longfellow.*

रावसाहेबांनीं आपल्या चरित्रावरून सर्वांना असें स्पष्टपणें दर्शवून दिलें आहे कीं, व्यक्तीच्या काय अगर देशाच्या काय, खऱ्या उन्नतीला धर्मबलाची व शुद्ध धर्माची विशेष आवश्यकता आहे. तुम्ही सामाजिक चळवळी वाटेल त्या प्रमाणानें करा, राजकीय उलाढालींत आपलें सर्व आयुष्य खर्ची घाला, अगर औद्योगिक उन्नतीप्रीत्यर्थ झटा. हे तुमचे सर्व प्रयत्न शुद्ध धर्मावांचून केवळ एकदेशीय

---

*१८९१ सालीं रावसाहेबांवरून जिवावरचें दुखणें गेलें. त्या वेळीं "सुधारका" चे इंग्रजी संपादक या नात्यानें प. वा. गोपाळराव गोखले यांनीं पुढील उद्गार काढले होतेः—

To us in Poona the Rao Saheb is not an individual; he is the various institutions rolled into human form; and it has now become impossible for us to think of a Poona without him.

होणार आहेत. या सर्वांच्या मुळाशीं शुद्ध धर्म, धर्मबल व धर्मतेज हवें आहे. त्यावांचून सर्व व्यर्थ आहे. स्वीकृत कार्य विशेष स्थैर्यानें, एकनिष्ठपणें करण्यास हें बल कारण होतें. हें त्यांच्या चरित्रावरून प्रत्येकानें शिकलें पाहिजे, आणि ही गोष्ट तरुण पिढीनें आपल्या डोळ्यांसमोर रात्रंदिवस ठेविली पाहिजे. धर्मावांचून आमचा तरणोपाय नाहीं, असें त्यांचें चरित्र दाखवीत आहे; आणि तो धर्महि 'कालिमा लागलेला' धर्म नव्हे, तर पवित्र, शुद्ध व सुगम धर्म. केवळ ज्ञानाच्या योगानें आपलें कार्य व्हावयाचें नाहीं, कर्माच्या योगें आपली गति व्हावयाची नाहीं, योगानें आपला तरणोपाय व्हावयाचा नाहीं, व तो सर्वांना साध्यहि नाहीं. तर प्रेमरूप, शुद्ध, पवित्र, भक्तीनें आपलें कार्य होणार आहे. त्याचप्रमाणें "एकदां जगाची उत्पत्ति करून स्वस्थ बसणारा ज्ञान्यांचा देवहि आपल्या कामाचा नाहीं; जग हें एक अवाढव्य घड्याळ आहे, त्यास रोज नेहमीं किल्ली देणारा, नेहमीं भक्ताला साध्य असा देव आपणांला आज हवा आहे," असे उद्गार त्यांनीं भागवत धर्मावरील चवथ्या व्याख्यानांत काढिले आहेत. ते जीवंत असतांना प्रार्थनासमाजाशीं त्यांचा संबंध असल्यामुळें त्यांची किती टवाळकी झाली ? त्यांची किती निंदा झाली ? या त्यांना अत्यंत प्रिय असणाऱ्या संस्थेविषयीं लोकांनीं जाणून व अज्ञानपणें किती गैरसमज केला ? पण, त्याचा परिणाम त्यांच्यावर कधीं कांहीं झाला काय ? निंदास्त्राचा आश्रय करून प्रतिपक्षीयांस हार खावयास त्यांनीं कधीं तरी लाविलें काय ? नाहीं. असें त्यांनीं कधीं केलें नाहीं. एवढेंच नव्हे, तर आपल्या विचारांच्या वजनानें त्यांनीं आपलें कार्य करण्याचा प्रयत्न केला. ख्रिस्ती लोक आपल्या धर्माची बढाई मारतांना इतर धर्मांची निंदा करितात हें पाहून, त्या धर्माची निंदा करावयास त्यांनीं सुरुवात केली नाहीं, तर त्यांच्या धर्मांतील व उपनिषदांतील अनुशासनांची तुलना करून एक किती आकुंचित व कोतें आहे, व दुसरें किती विस्तृत व गंभीर आहे, तें त्यांनीं दाखविलें. उठल्यासुटल्या प्रार्थना व ब्राह्मसमाज यांची निंदा होत आहे, हें पाहून अशा लोकांचीं व्यंगें जगाला दाखविण्याच्या भानगडींत न पडतां भागवतधर्माची श्रेष्ठता व अत्यंत आवश्यकता त्यांनीं प्रस्थापित केली. सारांश, शुद्ध आणि पवित्र धर्माच्या प्रसाराच्याच योगें आमचा तरणोपाय होणार आहे असं त्यांना वाटे, आणि या गोष्टीची साक्ष त्यांचे अनेक उपदेश देत आहेत. विद्वान् अशा मानलेल्या लोकांचें आज धर्माकडे लक्ष नाहीं. धर्मौदासिन्य व धर्मपराङ्मुखता जिकडेतिकडे दिसत आहेत, व कित्येक ठिकाणीं शहाणे लोक स्वतः वहावले आहेत;

इतकेंच नव्हे, तर इतरांना आपल्या बरोबर नेत आहेत. अशा वेळीं रावसाहेबांच्या चरित्राचें धार्मिक ( व हेंच खरें स्वरूप होय ) प्रत्येक विचारी तरुणानें आपल्या नजरेसमोर रात्रंदिवस ठेविलें पाहिजे, व आपल्या लोकांचा तरणोपाय प्रार्थनासमाजासारख्या शुद्धधर्मप्रचारक संस्थांपासून होणार असेंच त्यांना वाटत असे. प्रार्थना अगर ब्राह्मसमाज नवीन आहेत, असें नसून या समाजांकडून होत असलेला धर्मप्रचार आज दोन हजार वर्षें होत आहे असें ते मानीत असत, आणि हें त्यांनीं १८९५ सालीं भागवतधर्मावरील आपल्या इंग्रजी व्याख्यानांत चांगल्या रीतीनें दाखविलें आहे.

आतां परिणामावरून अगर फळावरून प्रयत्नांची महती ठरावयाची नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. रावसाहेबांना जसें यश यावयास पाहिजे होतें तसें जर आलें नसलें, तर त्याला कारण त्यांनींच एकदां म्हटल्याप्रमाणें आपल्या मागच्या उपाधी होत. यश आलें नाहीं म्हणून ते कधीं निराश झाले नाहींत. त्यांनीं आपला क्रम सतत चालू ठेविलाच होता, आणि ही गोष्ट समाजांत प्रविष्ट झालेल्यांनीं व समाजमतें मान्य असणारांनीं नेहमीं मनांत वागविली पाहिजे. प्रार्थनासमाज हें केवळ खूळ आहे, त्याचीं सर्व धर्ममतें नवीन आहेत, अशा भ्रममूलक समजुतीनें वेडावून गेलेल्यांना व दुसऱ्यांचा गैरसमज करण्यास कारण होणारांना रावसाहेबांनीं आपल्या अनेक उपदेशांत जणूं काय आव्हान केलें आहे; आणि म्हणून सत्यसंशोधनाची ज्यांना विशेष चाड आहे; शुद्ध धर्मावाचून आपणांला गति नाहीं असें ज्यांना वाटत आहे; आपलें आध्यात्मिक कल्याण तेंच आपलें खरें कल्याण अशी ज्यांना आपली मनोदेवता साक्ष देत आहे; व शुद्ध धर्माला लागलेला काळिमा नाहींसा करणें व तो नाहींसा करण्यासाठीं आपापल्यापरीनें प्रयत्न करणाऱ्या संस्था स्वदेशाचें चिरस्थाई हित करणाऱ्या होत, असें ज्यांना अंतःकरणपूर्वक वाटत आहे; त्यांना आमची विनंति आहे कीं, रावसाहेबांचे उपदेश वाचा, त्यांचें मनन करा, धर्ममार्गांत निष्ठेनें प्रविष्ट व्हा; म्हणजे प्रार्थना, ब्राह्मसमाजांसारख्या शुद्ध भक्तिमार्गाचा प्रचार करणाऱ्या संस्थांची आज आपल्या देशाला किती आवश्यकता आहे तें तुम्हांला कळून येईल.

माधवरावजींच्या चरित्रापासून धर्मसंबंधानें तरुण पिढीनें जो आणखी एक अति महत्त्वाचा धडा घ्यावयाचा आहे तो असा कीं, त्यांची अचाट बुद्धि, विशाल ज्ञानसंग्रह व त्यांचा दांडगा विद्याव्यासंग त्यांच्या धर्माच्या आड आला नाहीं. म्हणजे विविध विषयांवरील विविध ग्रंथ वाचून, त्यांचें चांगल्या रीतीनें अध्ययन

करूनहि धर्माची अनवश्यकता वाटून अज्ञेय किंवा नास्तिकवादाच्या वेडानें ते वेडावून गेले नाहींत. नाहीं तर अलीकडे मिल, डारविन् व स्पेन्सर यांचे ग्रंथ वाचून, उथळ पाण्याला खळखळाट फार या म्हणीला अनुसरून, जो अज्ञेयवादाचा पसारा पदवीधर मंडळींत माजला आहे, तसला पसारा मांडून अज्ञेय अगर नास्तिक वादाचा झेंडा त्यांना उभारितां आला नसता, असें नाहीं; परंतु साधकबाधक प्रमाणें पाहून तारतम्यदृष्टीनें सर्व गोष्टींचा विचार करून मग काय तें करावयाचें असा त्यांचा बाणाच असल्यामुळें त्यांच्या हातून ही चूक झाली नाहीं. इतकेंच नव्हे, तर याच्या अगदीं उलट स्थिति त्यांची होती. केवळ धर्माच्या आवश्यकतेविषयीं खात्री होऊन, अगर शुद्ध धर्माची आवश्यकता वाटून, त्यांची मजल थांबली नाहीं, तर विवेकयुक्त श्रद्धा हा गुण त्यांच्यांत पुष्कळ प्रमाणानें होता. म्हणजे धर्माची अगर शुद्ध धर्माची आवश्यकता व्यक्तीच्या अगर देशाच्या उन्नतीसाठीं वाटणें निराळें, व या आवश्यकतेला अनुरूप असें आचरण ठेवून विवेकयुक्त श्रद्धा आपल्या सर्व आचरणांत ओथंबलेली असूं देणें निराळें. पहिली गोष्ट विचाराची सरळ बाजू दाखविते, विचारगांभीर्य फार तर दर्शविते. पहिल्या गोष्टीची आवश्यकता लोकांत प्रतिपादून आपणाला वेगळें राहतां येईल; पण दुसऱ्या गोष्टीचें तसें नाहीं. विवेकयुक्त श्रद्धेनें परिपूर्ण असा धर्ममार्ग त्यांना केवळ आवडतच नव्हता, तर त्यांच्या आचरणांत नेहमीं ही श्रद्धा दिसावयाची. धर्म म्हटला म्हणजे त्याच्यांत श्रद्धा असते. कारण, तीवांचून पुढें चालतां येत नाहीं. परंतु अंधश्रद्धा आणि विवेकयुक्त श्रद्धा असे श्रद्धेचे दोन प्रकार आहेत. आमची मंडळी धार्मिक व्हावयाला शुद्ध व " कालिमा न लागलेला " धर्म तर पाहिजेच. परंतु वर म्हटल्याप्रमाणें तो विवेकयुक्त श्रद्धेनें ओथंबलेला नसला तर व्यर्थ आहे, असें रावसाहेबांनीं आपल्या आचरणावरून सर्वांना दाखवून दिलें आहे. धर्मासंबंधाचा उत्कट आदरभाव, परमेश्वरावरील निकट श्रद्धा दाखवावयास त्यांस लाज वाटत नसे. देवाच्या सान्निध्यामध्यें नित्य रहाण्याचा त्यांचा प्रयत्न असे; आपलें हृद्गत प्रार्थनेच्या द्वारें देवाला निवेदन करणें त्यांस अत्यंत प्रिय वाटत असे; व पुष्कळ वेळां एखादें मोठें भाषण करावयास प्रारंभ करण्याच्या पूर्वी ते क्षणमात्र शांतपणें उभे रहात व देवाची आठवण करून, त्याची प्रार्थना करून मग ते आपल्या कार्याला लागत. ( Many persons must have noticed that whenever Mr. Ranade stood up from his chair to deliver a lecture or an address, he would

before commencing his speech, for a minute or two stand mute with his eyes closed, but very few know that in these few sacred moments he was silently praying—Mr. D. V. Kirtane.) आणि ज्यांनीं ज्यांनीं न्यायमूर्तींच्या बरोबर दूरदूरचे प्रवास केले आहेत त्यांस प्रातःकाळच्या वेळीं त्यांनीं तुकोबांचे अभंग घोळून घोळून प्रेमांत दंग होऊन म्हटलेले ऐकिले आहेत त्यांस न्यायमूर्तींच्या भक्तिप्रधान जीविताची चांगलीच कल्पना होत असे. त्यांच्याबरोबर प्रवास करणारीं माणसें धर्माच्या बाबतींत समविचाराचीं असतच असें नाहीं. तथापि त्यांचा तो भाव, तो प्रेमळपणा, ती अंतःस्फूर्ति व तुकोबाचा भाव आपलासा करून अभंग म्हणण्याची पद्धत यांचा कोणाच्याही मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाल्यावांचून रहात नसे. ना. गोखले एकदां असें भजन ऐकून जागे झाले व त्या वेळीं त्यांच्या मनावर झालेला परिणाम अखेरपर्यंत त्यांस स्फूर्तिकारक वाटत असे. न्यायमूर्ति प्रार्थनासमाजाचे पुढारी सभासद आहेत, हें गोपाळरावांस माहीत होतें; परंतु त्यांचा विश्वास अशा प्रकारें आचरणांत नित्य येतो याचा त्यांस अनुभव आलेला नव्हता. असो.

त्यांच्या चरित्राच्या सामाजिक बाजूपासून आपणांला काय बोध होत आहे, त्याच्याविषयीं आतां विचार करावयाचा. या वेळीं त्यांच्या चरित्रांतील विशिष्ट काळच्या विशिष्ट गोष्टींविषयीं आम्हांला कांहींहि लिहावयाचें नाहीं. लौकिकदृष्टया त्यांच्या हातून ज्या चुका* झाल्या त्यांविषयीं आम्हीं आमचे विचार वर

* मुंबईच्या आर्यसमाजाच्या मंदिरांतील एका व्याख्यानप्रसंगीं ह्या बाबतींत आलेला अनुभव ह्या ठिकाणीं आतां नमूद करणें अगत्याचें आहे. न्यायमूर्ति एका व्याख्यानप्रसंगीं अध्यक्षस्थानीं विराजमान झालेले होते. व्याख्यानामध्यें पुनर्विवाहाच्या चळवळीला यावें तसें यश आलेलें नाहीं असा एक मुद्दा होता, त्यास दुजोरा देतांना प. वा. रा. रा. गजानन भास्कर वैद्य ह्या त्या वेळीं अगदीं तरुण असलेल्या गृहस्थांनीं मोठ्या आवेशानें सांगितलें कीं, " पुनर्विवाहाच्या चळवळीला जर यश आलें नसलें, तर त्याचें सर्व खापर आजच्या सभेचे अध्यक्ष न्या. मू. रानडे ह्यांच्या डोक्यावरच फोडलें पाहिजे. आजच्या प्रसंगीं सदाशिवराव केळकरांसारख्यांची अध्यक्षस्थानीं योजना व्हावयास हवी होती. " न्यायमूर्तींनीं आपल्यावरील जाहीर रीतीनें झालेला प्रहार अगदीं शांतपणें सहन केला व उत्तर

ट केले आहेत, आणि दुसरें असें कीं, त्यांविषयीं आतां एकतर्फी चर्चा
न मोठासा फायदा होणार आहे, असें आम्हांला तरी वाटत नाहीं. गेल्या
काचा आपल्या देशाचा इतिहास लिहिणारानें सामाजिक स्थित्यंतरासंबंधानें
हितांना त्यांविषयीं सार्वत्रिक—व्यक्तिविषयक नव्हे—चर्चा करणें इष्ट होईल.
रावसाहेबांच्या चरित्राच्या सामाजिक बाजूविषयीं विचार करूं लागतां त्यांचा
; गुण विशेष प्राविण्यानें आमच्या दृष्टीसमोर येतो. हा गुण म्हणजे त्यांची
्गदृष्टि होय. विहगदृष्टीनें सामाजिक चळवळीकडे पहाणें हें एक ते निराश
होण्याचें कारण होय. सामाजिक परिषदेमध्यें झालेलीं त्यांचीं निरनिराळया
ाचीं व्याख्यानें पहा. त्यांत कधीं निराशा दिसावयाची नाहीं. फार कशाला,
.०० सालीं झालेल्या सामाजिक परिषदेच्या वेळचेंच त्यांचें व्याख्यान घ्या
! त्यांत त्यांची आशामय वृत्ति किती स्पष्टपणें दिसून येते ! या विहग
ीचा उपयोग व्यक्तीच्या उन्नतीविषयीं विचार करितांना फारसा होत नाहीं, हें
म्हांला कबूल आहे; परंतु विशिष्ट काळची, विशिष्ट लोकांची प्रगति कोणत्या
तीत आहे तें पहाण्याला या विहगदृष्टीवांचून दुसरा उपाय नाहीं. रावसाहे-
त असलेला हा गुण इतरांत नसल्यामुळें क्रांतिप्रिय मंडळीच्या खोड्या पाहून
ार धर्माभिमानाची कोरडी लाट अवलोकून ते निराश होत असतात. यावि-
ीं येथें एकच उदाहरण घेऊं. संमतिवयाच्या बिलाच्या धामधुमीच्या वेळीं
तिपक्षीयांकडून एक स्त्रियांची सभा बिलाच्या विरुद्ध होणार आहे अशी गप्प
ूनहि ते हताश झाले नाहींत. ही गोष्ट आपल्या हेतूंच्या आड येईल असें
टूनहि ते निराश झाले नाहींत. उलट त्यांनीं अशा अर्थाचे उद्गार काढले कीं,
मच्या उलट तर उलट, पण प्रसिद्धपणें आज स्त्रिया या विषयासंबंधानें चर्चा
ावयाला मोठ्या संख्येनें येत आहेत, ही एकच गोष्ट सामाजिक सुधारणेचें
ऊल कसें झपाट्यानें पुढें पडत आहे, व तिचा पगडा समाजावर कसा बसत
ाहे, तें दाखवीत नाहीं काय ?

---

तांना सांगितलें कीं, 'आपले तरुण मित्र रा. गजानन भास्कर वैद्य यांचें
णणें अगदीं बरोबर आहे; आजच्या प्रसंगीं माझे बंधु सदाशिवराव केळकर
ांचीच खरोखर अध्यक्षस्थानीं योजना व्हावयास हवी होती.' पुढें ता. १६
ानुआरी १९०१ रोजीं स्मशानांत न्यायमूर्तींसंबंधानें पहिलें भाषण रा. वैद्य
ांनीं केलें व त्यावेळीं वरील प्रसंगीं त्यांचा जाहीरसभेत उपमर्द केल्याबद्दल
द व्यक्त केला. दोन्ही प्रसंगीं हा लेखक हजर होता.

त्यांचा दुसरा विशेष लक्षांत घेण्यासारखा गुण म्हणजे माणसांची पारख. एकाद्या मनुष्यांत कांहीं गुण आहेत असें त्यांच्या अनुभवाला आल्याबरोबर, त्याच्या अंगच्या खऱ्याखोट्या दुर्गुणांचें स्तोम माजवून व त्याला अगदीं निरुपयोगी ठरवून त्याला उकिरड्यावर फेंकून देणें, ही गोष्ट त्यांच्या स्वप्नांतहि नसे. माणसें हीं सदोष असावयाचीं, हें ते पूर्णपणें जाणूनच न रहातां अशा स्थितींत आपल्या सभोंवतीं जीं माणसें आहेत त्यांच्यापासून कसें काम करून घ्यावयाचें ही कला त्यांना चांगली साधली होती. पुनर्विवाह अगर जातिभेद या सुधारणांविषयीं आपलें व दुसऱ्या एका व्यक्तीचें एकमत जर होत नसलें, तर बालविवाह, मद्यपाननिषेध व स्त्रीशिक्षण अशा गोष्टींपैकीं एका अगर अनेक गोष्टींत जर ऐक्य असलें, तर तेवढयापुरतीच त्याची मदत ते मनापासून घेत असत, आणि म्हणूनच सामाजिक परिषदेच्या कामांत त्यांना इतकें यश येत असे. सामाजिक परिषदेपुढें येणाऱ्या सर्व विषयांविषयीं आपलें व ज्यांचें एकमत होईल त्यांच्याशींच संबंध ठेवावयाचा, असा निकराचा बाणा जर त्यांनीं ठेविला असता, तर परिषदेच्या इतक्या बैठकी झाल्या त्या झाल्याच नसत्या. रावसाहेबांचें हें धोरण दोषयुक्त होतें असें आम्हांला मुळींच वाटत नाहीं. उलट सामाजिक सुधारणेसंबंधानें चळवळ करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीनें असेंच धोरण ठेविल्यास कर्त्या माणसांची फारशी वाण पडणार नाहीं, असें आम्हांला वाटतें.

आतां त्यांच्या चरित्राच्या राजकीय बाजूकडे पाहिलें असतां सर्वांना व विशेषेंकरून तरुण पिढीला बराच बोध होणार आहे, आणि तो लक्षांत घेतला असता तर मागें वर्तमानपत्रांतून वगैरे जो अतिक्रम झालेला आढळत असे तो कधींही झाला नसता. मोठ्या सरकारी हुद्द्यावर नेमणूक असून त्यांच्या राजकीय चळवळीच्या आड सरकार येत नव्हतें, ही एकच गोष्ट त्यांच्या राजकीय चळवळींची योग्यता कोणालाहि दाखविण्यास पुरेशी आहे. रावसाहेबांचें राजकीय धोरण कोणत्या प्रकारचें असे, तें विशेष प्रमाणानें सार्वजनिक सभेशीं असलेला आपला संबंध तोडून डेक्कन सभा त्यांनीं जेव्हां स्थापिली, तेव्हां चांगल्याच प्रकारें दिसून आलें. वास्तविक पाहतां सार्वजनिक व डेक्कन सभांचा हेतु एकच आहे; परंतु एकींतील माणसांचे काम करण्याचे मार्ग आणि दुसऱ्यांचे मार्ग परस्परांपासून अगदींच भिन्न असे अलीकडे झाल्यामुळें या दोन संस्था झाल्या. या मार्गांतच राजकीय चळवळींचें खरें रहस्य आहे. राजकीय चळवळी करूं नका, असें कोणी म्हणत नाहीं. कारण, खुद्द न्या. मू. रानडे यांनींच राष्ट्रीय

सभा स्थापण्याचें श्रेय घेतलें, व राष्ट्रीय सभेच्या उन्नतीसाठीं त्यांचे सतत प्रयत्न चाललेले होते; परंतु कामें करण्याच्या रीतींत फरक आहे. आपली परिस्थिति काय आहे, आपलीं साधनें काय आहेत, आपल्या अडचणी काय आहेत, याविषयीं पूर्ण माहिती मिळवून देणारांची स्थिति पाहून, मागणें करणें व तें रास्त असें असूं देणें यांत राजकीय धोरण आहे. माधवरावांनीं सरकारला केलेले सार्वजनिक सभेच्या तर्फेचे अर्ज पहा. त्यांत हें धोरण दिसेल. त्याचप्रमाणें ते इंदुप्रकाशाचे संपादक असतां त्या पत्रांत प्रसिद्ध झालेले त्यांचे लेख पहा. त्यांतहि हेंच धोरण आढळेल. परंतु या धोरणानें अवलंबन करीत असतां सत्याचा त्यांनीं त्याग केलेला नाहीं, अगर सत्य एका बाजूला ठेवून आपल्या पक्षाला जोर आणण्याचा त्यांनीं कधींच प्रयत्न केला नाहीं. हें त्यांचें धोरण राजकीय चळवळींत मन घालणारांनीं नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे.

रावसाहेबांच्या चरित्रासंबंधानें विचारी सुशिक्षित लोक जितका आस्थेनें अधिकाधिक विचार करूं लागतील, तितकी तितकी त्यांच्या ठिकाणीं रावसाहेबांसंबंधानें पूज्यबुद्धि उदित होईल. त्यांची शांति व त्यांची समाहितवृत्ति इतरत्र क्वचित् आढळते. त्यांचा आपल्या स्वतःच्या व लोकांच्या स्थितीसंबंधानें नित्य विचार चालू असे. एकदां ते राष्ट्रीय सभेहून परत येत असतां* आपल्या पहिल्या वर्गाच्या डब्यांतून उतरून गोपाळराव गोखले वगैरे मंडळी ज्या ठिकाणीं होती त्या दुसऱ्या वर्गांत जाऊन बसले. तों सोलापूर स्टेशनवर एका तरुणबांड सिव्हिलियन त्यांचें सामान बाहेर काढून आपण त्यांच्या जागेवर दिमाखानें बसला ! हें कळतांच रावसाहेब मुकाट्यानें त्या डब्यांत गेले व डॉ. भांडारकरांच्या बाकावर एका बाजूला जाऊन बसले ! डॉ. भांडारकर त्याच डब्यांत होते ह्मणून त्यांना जागा मिळाली, व रात्रीं निजण्याची सोय झाली. वरची जागा डॉक्टरांनीं घेतली व खालचीवर माधवराव निजले. हा सर्व प्रकार पाहून गोपाळराव गोखले वगैरे सर्व मंडळीला फार आश्चर्य वाटलें. दुसऱ्या दिवशीं या माणसाविरुद्ध आपण कांहीं तक्रार करणार नाहीं काय ? असा प्रश्न गोपाळरावांनीं करितांच रावसाहेब म्हणाले " असल्या बाबतींत खटले करून कांहीं फायदा होतो

---

* ही हकीकत मद्रासला एकदां जातांना घडली अस मि. कीर्तने ह्यांच्या निबंधांत आहे. ना. गोखले ह्यांनीं सांगितलेली हकीकत मद्रासहून परत येतांना पण त्याच सोलापूर स्टेशनवर घडलेली आहे.

असें मला वाटत नाहीं. मीं एक ह्मणावें, त्यानें नाहीं ह्मणावें, असेंच व्हावयाचें." पुढें ते ह्मणाले:—

" Moreover is our own conscience clear in these matters? How do we treat members of the depressed classes—our own countrymen—even in these days? At a time when they and we must all work hand in hand for our common country, we are not prepared to give up the privileges of our old ascendency, and we persist in keeping them down-trodden. How can we, then, with a clear conscience, blame members of the ruling race, who treat us with contempt? No doubt incidents like this are deeply painful and humiliating, and they try one's faith sorely. But the best use to which we can put even these unpleasant incidents is to grow more earnest and persistent in the work that lies before us."

या बाबतींत स्वतः रावसाहेबांनीं सन १९०० सालीं साताऱ्याला पुढील चिरस्मरणीय उद्गार काढले:—

" You cannot have a good social system when you find yourself low in the scale of political rights, nor can you be fit to exercise political rights and privileges unless your social system is based on reason and justice. You cannot have a good economical system when your social arrangements are imperfect. If your religions are low and grovelling, you cannot succeed in social, economical or political spheres."

अस्पृश्य वर्गासंबंधानें रावसाहेबांची सहानुभूति कोणत्या प्रकारची होती, याविषयीं येथें विशेष लिहिण्याची आवश्यकता नाहीं. वरील एका अवतरणांतील एका वाक्यावरून त्यांच्या विचारांची कल्पना होते. सामाजिक परिषदेमध्यें या विषयाला त्यांनीं प्रमुखस्थान दिलें होतें. अस्पृश्य वर्गाच्या पलटणी काढून टाकल्या, त्या वेळीं या पलटणींपैकीं कित्येक लोक रावसाहेबांचा सल्ला घेत असत, व त्यांच्या हक्कांचा कांहीं तरी विचार व्हावा म्हणून वारंवार योग्य तो सल्ला त्यांना ते देत असत. त्यांच्या हयातींत निराश्रित साहाय्यकारक मंडळीचा उदय झाला नव्हता; परंतु जे जे कोणी निराश्रितांच्या उन्नतीसाठीं अल्पस्वल्प प्रयत्न करीत त्यांना रावसाहेबांकडून प्रोत्साहन व साहाय्य मिळत असे. बारामती येथें

महाराष्ट्र व्हिलेज एज्युकेशन सोसायटीचें काम रा. रा. कळसकर हे रावसाहे-बांच्या सल्लयानें करीत असत. त्यांनीं अस्पृश्यांसाठीं शाळा काढल्या होत्या व रावसाहेबांच्या पुढाकारामुळें त्या वेळीं या सोसायटीला मदतहि बरी मिळत असे. तसेंच साताराचे रा. रा. जव्हेरे यांचें निराश्रितांच्या उन्नतीकडे लक्ष विशेष आहे ही गोष्ट लक्षांत ठेवून त्यांना प्रोत्साहन व उत्तेजन मिळत असे. सारांश इतकाच कीं, कोणी कांहीं उपयुक्त कार्य करीत आहे असें आढळतांच त्यांना राव-साहेब तत्काळ मदत करीत असत.

राष्ट्रीयसभा व सामाजिक परिषद या दोन राष्ट्रीय संस्थांच्या द्वारा त्यांनीं सर्व सुशिक्षित राष्ट्र एक केलें, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. राष्ट्रीय-सभेचें जनकत्व मि. ह्यूम यांच्याकडे देण्याची वहिवाट आहे, आणि तें पुष्कळ अंशानें खरेंहि आहे; परंतु राष्ट्रीयसभेच्या जनकांपैकीं रावसाहेब हे एक होते असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. रावसाहेबांना राष्ट्रीयसभच्या कार्यामध्यें प्रमुखत्वानें पुढाकार घेतां येत नसे; परंतु ते मागें राहून राष्ट्रीयसभे-संबंधानें सर्व सूत्रें हालवीत असत. त्यांच्या सल्लयावांचून कोणतीहि महत्त्वाची बाब घडून येत नसे व राष्ट्रीयसभा योग्य प्रकारें जितकें काम करील तितक्या प्रमाणानें हिंदी लोकांच्या हक्कांची राज्यकर्त्यांपाशीं दाद लागेल, असा त्यांचा दृढ विश्वास असे. परंतु या राजकीय चळवळीमध्यें पडण्याची आमच्या तरुणांना गोडी लावतां उपयोगाची नाहीं; सरकारपाशीं आपल्याला न्याय मागावयाचा आहे, तर आपणहि न्यायी होण्याचा प्रयत्न केला पाहिजे; सरकारपाशीं आपण जर कांहीं हक्क मागावयाचे तर आपणहि इतरांच्या हक्कांची जाणीव आपल्या ठिकाणीं ठेविली पाहिजे, आणि हीं तत्त्वें समाजामध्यें प्रचलित व्हावीं, व ज्याप्रमाणें राज-कीय चळवळ चालू आहे, त्याप्रमाणें सामाजिक बाबतींत चळवळ करून, लोकां-मध्यें विचारजागृति उत्पन्न करावी म्हणून त्यांनीं सामाजिक परिषदेची स्थापना केली.* या दोन दिशांनीं त्यांनीं प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें जी कामगिरी

* His one aspiration through life was that India should be roused from the lethargy of centuries, so that she might become a great and living nation, responsive to truth and justice, and self-respect, responsive to all the claims of our higher nature, animated by lofty ideals, and undertakiug great national tasks.

–*Gokhale.*

केली तिचा विचार केला असतां, त्या दोन चळवळींच्या द्वारें रावसाहेबांनीं सर्व राष्ट्र एक केलें, सर्व सुशिक्षित लोकांमध्यें एक प्रकारची जागृति, एक प्रकारचा आपलेपणा, एक प्रकारचा सात्त्विक स्वाभिमान जागृत केला, आणि त्यामुळें जसजसा त्यांच्या विचारांचा, त्यांच्या धोरणाचा अधिकाधिक प्रसार होऊं लागला तसतसें नवीन पिढीचें त्यांच्याकडे अधिकाधिक लक्ष्य वेधूं लागलें. रावसाहेब काय बोलतात, रावसाहेब काय लिहितात, रावसाहेब कायकाय करितात यांविषयीं माहिती करून घेणाऱ्या तरुणांची संख्या दिवसदिवस वाढूं लागली. त्यांच्या विचारांस मान देणारी, त्यांच्या सहवासाचा लाभ व्हावा म्हणून अत्यंत आतुर असलेली, त्यांनीं आपल्याला मार्ग दाखवावा अशी इच्छा धरून त्यांच्याभोंवतीं राहून कर्तव्यतत्पर असणाऱ्या तरुणांची संख्या वाढली. हीं तरुण माणसें आपापल्या उद्योगधंद्यांसाठीं जसजशीं निरनिराळ्या ठिकाणीं पांगलीं, तसतसा त्यांच्या विचारांचा प्रसार त्यांच्या ठिकाणीं होऊं लागला. अशा प्रकारें प्रांतोप्रांतीं त्यांनीं शिष्यशाखा निर्मिली. या स्थितीला अनुलक्षून प. वा. गोपाळराव गोखले यांनीं पुढीलप्रमाणें उद्गार काढिले आहेतः—

It is no exaggeration to say that younger men who came in personal contact with him felt as in a holy presence, not only uttering 'nothing base' but afraid even of thinking unworthy thoughts, while in his company.

आमच्या सुशिक्षित लोकांमध्यें इतिहासाची ज्या प्रमाणानें आवड असावयास पाहिजे तशी ती नाहीं. तथापि, महाराष्ट्राच्या इतिहासाकडे स्वाभिमानपूर्ण दृष्टीनें पण सत्याकडे लक्ष ठेवून पहाण्याची आवड आज जी थोडीबहुत दिसत आहे, व या बाबतींत कित्येकांमध्यें विवेचक शक्तीची जी वाढ दिसून येत आहे, तिचें बीज रावसाहेबांनींच पेरिलें. रावसाहेबांच्या मनांत महाराष्ट्र साम्राज्याचा संगतवार व सटीक इतिहास लिहावयाचा होता, व या दृष्टीनें त्यांनीं महाराष्ट्र साम्राज्याचा उदय या नांवानें आपला पहिला ग्रंथ प्रसिद्धहि केला. या ग्रंथानें महा- · स्वदेशाभिमान जागृत करूनहि त्याविषयीं सरकारच्या मनामध्यें आ[illegible]र उत्पन्न केला. या विधानाचा खरेपणा जे जे कोणी आपले पूर्वग्रह बाजूला सारून हा ग्रंथ वाचतील, व विकारवश न होतां त्यांतील विवेचनासंबंधानें शांतपणें विचार करितील त्यांच्या लक्षांत यावयाला वेळ लागावयाचा नाहीं.

रावसाहेबांनीं आणखी एक मोठी कामगिरी बजाविली आहे. ती ह्मणजे खऱ्या स्वदेशीचें बीज त्यांनीं पेरिलें ही होय. आपल्या देशामध्यें, विशेषतः महाराष्ट्रामध्यें स्वदेशी चळवळ सुरू होऊन पुष्कळ वर्षें झालीं आहेत. आमच्या येथेंहि खरी स्वदेशी चळवळ व खोटी स्वदेशी चळवळ आहेच. रावसाहेबांनीं खऱ्या स्वदेशी चळवळीचा पाया घातला, खऱ्या स्वदेशी चळवळीसंबंधानें उपदेश केला व आद्योगिक परिषदेची स्थापना करून या चळवळीला योग्य दिशा लाविली. या बाबतींत जें कांहीं करावयाचें तें पूर्ण विचार करून करावें, आपलीं साधनें व आपलें सामर्थ्य यांचा विचार प्रथम करावा, असा त्यांचा आग्रह असे. याविषयीं बोलतांना १८९० सालीं ते ह्मणाले:—

" What we have chiefly to avoid is the pursuit of impracticable objects. We should husband our little resources to the best of our power and not exhaust them by vain complaints against the drain of Indian money or by battling Free Trade...........The superior skill of the foreigner must be availed of freely by importing it from other countries, till we train up our own people for the work, first, in Technical Institutes here and in foreign countries and further in the far more practical discipline of Factories and Mills at work........State help is after all a subordinate factor in the problem, **our own exertion** and **our own resolutions must conquer the difficulties**, which are chiefly of our own creation. "

दुसऱ्या एका प्रसंगीं ते म्हणाले:—

" We cannot afford to be dreamy and self-contained, and turn back from our present opportunities to a past which cannot be recalled....Natural aptitudes, undeveloped but unlimited resources, peace and order, the whole world open to us, our marvellous

situation as the emporium of all Asia, these priceless advantages will secure success, if we endeavour to deserve it by striving for it."

सारांश, आपल्या देशाचे उद्योगधंदे कोणत्या दिशेनें वाढवितां येण्यासारखे आहेत हें त्यांनीं ठरवून ठेविलें होतें, व त्याप्रमाणें ते उपदेश करीत होते. आज स्वदेशी व्यापारधंद्याची व खऱ्या स्वदेशीची जी थोडी बढती दिसत आहे तिचें सर्व श्रेय रावसाहेबांच्या पहिल्या चळवळीला आहे. आजच्या कोऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायट्या, जाइंट स्टॉक कंपन्या, परस्पर साहाय्याच्या तत्त्वावर स्थापिलेले स्वदेशीचे स्टोअर्स, परदेशीं जाऊन धंदेशिक्षण घेऊन येण्याची वाढती इच्छा, सामाजिक सेवेचे संघ, इत्यादि सर्व कार्यांचा पाया प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें रावसाहेबांनीं घातला. त्यांच्या उपदेशाचीं, त्यांच्या उद्योगाचीं, त्यांच्या कर्तृत्व-शक्तीचीं, त्यांच्या योजनेचीं व त्यांच्या मेहनतीचीं हीं प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष फळें आहेत असें दूरवर विचार केला असतांना वाचकांच्या लक्षांत येईल.

---

## उपसंहार.

" But at certain times in national or world history when He sees that evolution has reached a certain point He sends—and it has so frequeutly occurred that it may be called a law–a new soul into the world charged with power; not with superhuman power, but with human power raised to the utmost point it can reach at that period of human development, a genius, as we call it, is born. A new start is given to the world, an elect soul is sent forth to do a vast work. "

—*Stopford A. Brooke.*

आपल्या अगर इतर देशांच्या इतिहासाकडे पाहिलें असतां एक विशेष गोष्ट सर्वसाधारणपणें जी दृष्टोत्पत्तीला येते ती ही कीं, ज्यांना आपण थोर पुरुष म्हणतों ते सर्व देशांत कालमानाप्रमाणें अवतीर्ण होत आले आहेत. इतिहास उपलब्ध झाल्यापासून आजपर्यंत या खंडांत प्रमाणतः जास्त थोर पुरुष झाले असतील.

पण, हा कांहीं महत्त्वाचा मुद्दा नव्हे. कालमानाप्रमाणें वस्तुस्थितीला अनुसरून, थोर पुरुषाचें आगमन होणें ही गोष्ट सर्व देशांत सर्व काळीं सर्वसाधारण आहे. मात्र सर्वांच्या कामाच्या दिशा एकच असतात असें कधीं म्हणतां यावयाचें नाहीं. कोणी राजकारणांत आपलें तेज पाडितो, कोणी सामाजिक स्थित्यंतरासंबंधानें अहर्निश झटून आपल्या देशाला ललामभूत होऊन जातो, कोणी देशांतील धर्मांत तेज उत्पन्न करून लोकांच्या ठायीं आध्यात्मिक तेज, आध्यात्मिक बल आणण्याचा प्रयत्न करितो, कोणी यांपैकीं दोन्ही अगर तिन्ही दिशांनीं एकाच वेळीं कार्याला लागून आपलें तेज पाडितो, तर कोणी निरनिराळ्या कला, शास्त्रें यांस उदयाला आणून, त्यासंबंधानें नूतन शोध वगैरे लावून आपलें नांव चिरस्मरणीय करून चालवितो. हें तत्त्व आमच्या व इतरांच्या इतिहासांत सर्वसाधारणपणें आढळून येत आहे. हा थोर पुरुषांचा उदय आतां सर्वांना इतका ज्ञात झाला आहे कीं, जगाच्या घडामोडींतील ही एक साधारण गोष्ट आहे, असेंच सर्व विचारी लोकांना वाटत असतें, इतकेंच नव्हे, तर ईश्वरी सूत्र असें आढळून येतें कीं, त्या त्या देशांत त्या त्या पुरुषांचा उदय होणें हा ईश्वरी नेमानेमच असावा. विशेष प्रकारच्या साधु पुरुषांचा अगर थोर पुरुषांचा उदय विवक्षित काळीं व स्थळीं होणें, ही आकस्मिक गोष्ट नसून जगाच्या सूत्रधाराच्या योजनेची असते, हा एक बोध जगाच्या इतिहासाचें मार्मिकपणें निरीक्षण करणारांना होण्यासारखा आहे. कोणत्याही देशांतील थोर विभूति घेतल्या असतां, विशिष्ट कार्यासाठीं त्यांचा उदय होत असावा, असें दिसून येतें.

न्यायमूर्ति रानडे यांचा आपल्या प्रांतीं ३०–३५ वर्षांत उदय होऊन प्रकाश पडणें हा एक आकस्मिक प्रसंग होय, असें आम्ही समजत नाहीं. ईश्वरी नेमानेमच तसा असावा, असा आमचा पक्का भरंवसा आहे. बंगाल्यांत राजा राममोहन राय अगर केशवचंद्र सेन यांचा उदय होणें या ज्याप्रमाणें आकस्मिक गोष्टी नव्हत, त्याचप्रमाणें हीहि गोष्ट आकस्मिक नव्हे. न्यायमूर्ति रानडे यांची आपल्या हयातींत जीं जीं कार्यें करण्याची उमेद होती, तीं तीं सर्व कार्यें पूर्णपणें त्यांच्या हातून जरी झालीं नसलीं, तरी, जेवढीं झालीं, तेवढयासाठींच त्यांचा उदय झाला होता, असें आतां म्हणतां येण्यासारखें आहे. त्यांच्या दोषांचें कांहीं लोकांनीं माजविलेलें देव्हारें जोंपर्यंत लोकांच्या स्मरणांत आहे, त्यांच्या माथीं लादलेल्या गोष्टी जोंपर्यंत लोक विसरले नाहींत, पक्षाभिमानाचें पटल जोंपर्यंत दूर झालेलें नाहीं, तोंपर्यंत त्यांची योग्यता चांगल्या रीतीनें लोकांना कळणार नाहीं.

एवढयावरून न्यायमूर्ति रानडे हे पूर्ण होते, आणि त्यांच्यांत दोष कांहींच नव्हते, असें आमचें म्हणणें आहे, असा मात्र कोणीं आपला ग्रह करून घेऊं नये. वरील लेखांत कोठेंहि आम्हीं अशा तऱ्हेचा प्रयत्न केलेला नाहीं. राजा राममोहन राय व रावसाहेब यांच्या चरित्रांतील साम्य दाखविण्याचा आम्हीं प्रयत्न केला, म्हणजे रावसाहेब आणि राममोहन यांची सर्व बाबतींत सारखीच योग्यता होती, असें आम्हीं म्हटलें, असाहि कोणी ग्रह करून घेऊं नये. अशा प्रकारची तुलना आम्हीं केलेली नाहीं. राममोहन राय तो राममोहन राय, व माधवराव ते माधवराव. दोघेहि पूर्ण नव्हते. दोघेहि सर्वांशीं सारखे नव्हते. राममोहन राय यांनीं स्वीकारलेल्या मार्गांत व रावसाहेबांच्या मार्गांत साम्य आहे, तें आम्हीं दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. असो.

न्यायमूर्तींच्या विषयीं आम्हांला जें लिहावयाचें होतें, तें आम्हीं थोडक्यांत या लेखांत आणण्याचा प्रयत्न केला आहे. हे आमचे लेख केवळ चरित्रात्मक नाहींत. टीकात्मकहि नाहींत. माधवरावांचें आमच्या दृष्टीनें जें खरें स्वरूप तें वाचकांच्या लक्ष्यांत यावें, एवढाच प्रस्तुत लेखांचा उद्देश आहे. त्यांनीं आपलें चरित्र सर्वांना सारखें बोधपर करून ठेविलें आहे; व आमचा असा समज आहे, कीं, आमची तरुण मंडळी त्यांच्या चरित्राविषयीं, त्यांनीं केलेल्या कार्याविषयीं व देशहिताच्या त्यांच्या चिंतेविषयीं जसजसा जास्तजास्त विचार करितील, तसतसें त्यांचें खरें स्वरूप त्यांना कळणार आहे. त्या वेळीं त्यांना आपल्या ३०–३५ वर्षांच्या कार्यानें न्यायमूर्तींनीं या देशावर कसे अनंत उपकार केले आहेत, तें दिसून येईल; त्या वेळीं ज्यांना त्यांचा सहवास घडला, ज्यांच्या सहवासांत त्यांनीं काळ घालविला, ज्यांना त्यांनीं आपले मित्र व बंधु मानिलें, ते कसे भाग्यशाली व ज्या देशासाठीं व लोकांसाठीं मरेपर्यंत ते झटले तो देश व ते लोक कसे धन्य, तें कळेल, आणि त्याच वेळीं निराशेचा पगडा जाऊन देशाच्या खऱ्या भाग्योदयाविषयीं तरुणांच्या ठायीं आशा प्रज्वलित होईल.

---

## ( ९ ) शेट दामोदरदास गोवरधनदास.

**" झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु परंतु यासम हा "**

" प्रपंचाच्या योगानें परमार्थाकडे लक्ष लागत नाहीं, हा आपला दोष आहे. म्हणून जनक राजासारखा प्रपंच करून दोषमुक्त व्हावें...प्रपंच म्हणजे ईश्वराची पूजा असें झालें पाहिजे...सत्कार्यें हीं पुष्पें होत. तीं पाहून संसारमंदिरीं देव पुजावा. " **रा. गो. भां.**

Understand a man by his deeds.—Talmud.

Works do follow us all unto God: there stand and bear witness.

Not what they seemed, but what they were only.

१. ज्यांनीं आपला दृढ उद्योग, सत्यनिष्ठा, शांत वृत्ति, परमेश्वरावरील अढळ विश्वास, परोपकाररतता, स्वधर्माभिमान, असामान्य औदार्य, निरपेक्ष जनसेवा, पवित्र आचरण, साधी निगर्वी वृत्ति, ह्यांहीं करून आपलें जीवन लहानापासून थोरास, दरिद्र्यापासून श्रीमंतास, अज्ञान्यास व ज्ञान्यासही आदर्शवत् केलें होतें, ते आमचे सन्मान्य बंधु, आमच्या समाजाचे सान्मान्य उपाध्यक्ष, दानशूर गृहस्थ शेट दामोदरदास गोवरधनदास ह्यांचें अल्प चरित्र येथें सादर करितों.

दामोदरभाईची इह लोकींची यात्रा ता. १३ नोव्हेंबर १९१२ रोजीं संपली. त्यांची प्रकृति चांगली सुदृढ होती. परंतु ता. २ नोव्हेंबर रोजीं जेव्हां त्यांची व सर्व बंधुभगिनींची प्रार्थनामंदिरांत भेट झाली त्या वेळीं ते थोडे अस्वस्थ दिसले. त्यांचें पाऊल जड पडत होतें. त्यांचा आजार फार दिवसांचा नव्हता. दोन तारखेनंतर पुढें दोन तीन दिवस त्यांनीं आपलीं नित्याचीं कामें उरकलीं. ता. ६ नोव्हेंबर रोजीं ते आपल्या क्लबमध्यें गेले असतां त्यांस घेरी येऊन ते बेशुद्ध झाले. त्यानंतर ते दोन दिवस जरी सावध होते, तरी आपले नित्याचे व्यवहार करूं शकले नाहींत. ता. ११ पासून ते बेशुद्ध झाले व त्या स्थितींत असतांनाच ता. १३ रोजीं त्यांचा अंत झाला.

२. शेट दामोदरदास ह्यांच्या बाळपणची वगैरे माहिती फारशी नाहीं. ज्यांस अल्पस्वल्प आहे त्यांची माहिती विश्वसनीय मानतां येत नाहीं. त्यांचें शिक्षण जुन्या पद्धतीचें झालेलें होतें. त्यांना इंग्रजी अगदीं बेताचेंच येत होतें व असें

असून इग्लंड अमेरिका, चीन, जपान इत्यादि देशांत त्यांनीं प्रवास केला होता. कोणी म्हणतात त्यांचे वडील चंदनाचे व्यापारी होते, व तोच व्यापार त्यांनींही प्रथम सुरू केला, पण तो किफायतशीर नाहीं असें पाहून कापसाची दलाली ते करूं लागले व त्याच धंद्यांत अखेरीस त्यांनीं नांव मिळविलें. तें कांहींही असो. त्यांचा व **प्रार्थनासमाजा**चा संबंध अगदीं प्रारंभापासून जडला, हें लक्षांत ठेवण्या-सारखें आहे. १८६८ सालीं झालेल्या प्रथमोत्सवप्रसंगीं दामोदरभाई मुंबईच्या समाजाचे सभासद झाले. त्या वेळीं त्यांचें वय २१–२२च्या आंतबाहेर असावें. दामोदरभाई हे **लोहाणा** जातीचे गृहस्थ. आजही त्या ज्ञातीमध्यें उदार विचा-रांचा विशेषसा प्रादुर्भाव झालेला नाहीं. कांहीं बाबतींत मात्र ही ज्ञात बरीच पुढें सरसावली आहे. परंतु ५० वर्षांपूर्वी त्या ज्ञातींत कर्मठपणा ओतप्रोत भरलेला होता. पुरुषांच्या उच्च शिक्षणास प्रारंभ झालेला नव्हता. अर्थात् स्त्रीशिक्षणाचा प्रश्न मग पुढें येतच नाहीं. मुंबईत काय चाललें आहे याची ज्ञातीला दादही नसावी. असें असतां अगदीं मागसलेल्या एका ज्ञातींतील हे तरुण गृहस्थ

## एकदम सभासद कसे झाले ?

हा प्रश्न सहजच आपल्या पुढें येतो. याचें उत्तर असें आहे कीं, दामोदरभाईंना जें कांहीं शिक्षण मिळालें होतें त्याच्यायोगें त्यांच्या ठिकाणीं जागृति उत्पन्न झाली होती. त्यांच्या बरोबर शिकत असलेले एक तरुण व आमच्या समाजाचे जुने सभासद प० वा० भगवंतराव वागळे हे नित्य समाजांत येत त्या वेळीं त्यांच्या बरोबर हेही येत असत. त्या वेळीं प्रागतिक चळवळी ज्या चालू होत्या त्यांस अनु-कूल अशी त्यांची वृत्ति झालेली असल्यामुळें १८६८ सालीं ते समाजाचे सभासद झाले. आपल्या तारुण्यांत त्यांनीं अंगमेहनतीनें सामाजाची सेवा केली. त्यांची शरीरयष्टि मजबूत असल्यामुळें उत्सवप्रसंगीं हल्लींचें मंदिर तयार होण्यापूर्वी उत्सवस्थल सुशोभित करण्यांत दामोदरभाईंनीं पुढाकार घेऊन बांबूवर चढून माळा टांगण्याचें वगैरे काम करावें. १८६८ सालीं ते सभासद झाल्याचें वर आलेंच आहे. ते त्या वेळीं सभासद झाले, आणि अखेरपर्यंत टिकून राहिले. त्यांच्या वेळीं व नंतर कित्येक गृहस्थ सभासद झाले, पण ते मागें पडले. परंतु त्यांचा विश्वास दिवसेंदिवस दृढावला, त्यांची धर्मनिष्ठा बळावली, त्यांचें कार्यक्षेत्र विस्तृत झालें व अंतीं सर्व प्रार्थना व ब्राम्हसमाजांस ललामभूत असें चारित्र्य त्यांनीं सर्वांच्या निदर्शनास आणून दिलें.

३. आपल्या व्यापारांत चांगलें यश येऊं लागलें त्या वेळीं देशाटन करून आपल्या ज्ञानांत व अनुभवांत भर घालण्याची ह्यांस प्रबल इच्छा झाली. परत आल्यानंतर ज्ञातीकडून आपला छल होईल हा विचार त्यांच्या मनांत आला नाहीं असें नव्हे. तर तो विचार मनांत येऊनही त्यांनीं माघार न घेतां आपल्या ज्ञातींतील तरुणांना उत्तम धडा घालून दिला. त्यांनीं निरनिराळ्या देशीं प्रवास केला, आणि मग परत आल्यावर त्यांच्या ज्ञातीनें ह्यांच्या पुढें त्यांस **बहिष्कृत करण्याचा बागुलबोवा** करितांच त्यांनीं त्यास बिलकुल भीक घातली नाहीं. तुम्ही मला बहिष्कृत घाला, किंवा माझा वाटेल तसा छल तुम्हांला करितां येत असेल तर करा, पण मी प्रायश्चित्त म्हणून घेणार नाहीं. मीं जर कांहीं अयोग्य केलें नाहीं, तर मग प्रायश्चित्त घेण्याच्या विचाराशीं मला काय करावयाचें आहे ? आणि मीं जर कांहीं गैर केलें असलें तर ह्या प्रायश्चित्तानें माझी शुद्धि कशी व्हावी ! हाच विचार मनांत वागवून त्यांनीं आपला करारी स्वभाव त्या वेळीं व्यक्त केला. त्याचा परिणाम त्या वेळीं म्हणण्यासाखा झाला नाहीं खरा. त्यांच्या ज्ञातीनें त्यांस बहिष्कृत केलें व हे बहिष्कृत राहिले. परंतु पुढें त्यांच्याच लोकांना आपला अविचार कळून आला व त्यांनीं ह्यांच्याशीं आपोआप पूर्ववत् सर्व व्यवहार सुरू केले, व ते आपल्या ज्ञातीचे पुढारी बनले. त्यांचें ज्ञातींत पुष्कळ वजन पडूं लागलें, इतकें कीं त्यांच्या महाजन वाडींत

**प्रार्थनासमाजाचें प्रीतिभोजन**

जरी एकदां झालें व तेथें मुसलमान, व अस्पृश्य, आणि युरोपिअन व्यक्तिही जरी भोजनास हजर होत्या, तरी त्यांची महाजनवाडी बाटली नाहीं, किंवा जेवणाचीं भांडीं, जेवण करणारे व वाढणारे ह्यांच्यावर बहिष्काराचें अस्त्र उभारलें गेलें नाहीं ! आणि हा सर्व एका धनाढ्य पुढाऱ्याच्या करारीपणाचा व बाणेदारपणाचा परिणाम होय.

४. **दामोदरदासांनीं** आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. आणि तें त्यांच्या असामान्य **दानशौर्याच्या** द्वारें होय. व्यापारांत पडल्यानंतर पुष्कळ माणसें धनाढ्य होतात. व त्यांची धनाची हांव अखेरपर्यंतही कमी होत नाहीं. आमच्या ह्या बंधूंनाही धन नको होतें असें नाहीं; परंतु तें स्वतःसाठीं नको होतें. ह्या उतारवयांत त्यांना स्वतःसाठीं व्यापारधंदा करण्याची कांहीं आवश्यकता नव्हती. त्यांची स्वतःची रहाणी तर अगदीं साधी होती. त्यांच्या गरजा अगदीं

थोड्या होत्या. परंतु ते इतरांसाठीं राबत होते. आपल्याला धन मिळावें व त्याचा व्यय बहुजनांच्या हितासाठीं आपल्याला करितां यावा हें त्यांचें ध्येय होतें. **एमर्सननें** एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें

The true thrift is always to spend on higher plane

असा त्यांचा बाणा होता. आणि हें ध्येय पुढें ठेवून त्यांनीं आपल्या संपत्तीचा विनियोग केला. त्यांनीं आजपर्यंत अशा प्रकारें **लाखो** रुपयांचा दानधर्म केला. जुन्या मतानुसार ज्ञातिभोजनें अगर ब्राम्हणभोजनें यांत त्यांनीं आपल्या धनाचा व्यय केला नाहीं. उपयुक्त संस्था, उपयुक्त कार्यें, देशहितकारी माणस त्यांच्या-साठीं आपलें धन आहे असें त्यांस वाटे व त्याप्रमाणें त्यांनीं आपला पैसा खर्चला. खरें पहातां लोकांना वाटतें तितके कांहीं ते धनाढ्य नव्हते. त्यांच्यापेक्षां अनेक-परींनीं अधिक श्रीमान लोक ह्या मुंबई शहरांत आहेत. त्यांची प्राप्ति पुष्कळ होती आणि ती बहुतेक सर्व लोकाहितासाठीं खर्च व्हावी अशी त्यांची इच्छा होती व त्या इच्छेनुसार ते वागत होते. त्यांनीं शेवटपर्यंत किती लाख रुपये अशा प्रकारें खर्चिले हें आम्हांस तरी सांगतां यावयाचें नाहीं, पण स्वतां त्यांनाही सांगतां आलें असतें असें आम्हांस वाटत नाहीं ! म्हणून आतां कोणकोणत्या मुख्य मुख्य कार्यांसाठीं त्यांनीं आपल्या अवाढव्य संपत्तीचा व्यय केला त्याचें अगदीं अल्प दिग्दर्शन येथें करण्याचा प्रयत्न करितों.

५. परदेशांत प्रवास करीत असतांना एक गोष्ट प्रामुख्यानें त्यांच्या लक्षांत आली ती अशी कीं आपण स्वतः आपल्या सामर्थ्यानुसार ज्ञानप्रसार करण्यासाठीं झटलें पाहिजे. आणि फुकट लायब्ररऱ्या स्थापणें हा ज्ञानप्रसाराचा उत्तम मार्ग होय हें ध्यानीं आणून परत आल्यावर ते त्या कामाला लागले. एकदां जी गोष्ट करावयाची असा त्यांनीं निर्धार केला ती केल्यावांचून ते स्वस्थ बसत नसत. त्यामुळें त्यांनीं प्रथम कोटांत People's Free Reading Room and Library ही संस्था स्थापन केली. फुकट लायब्ररी स्थापण्याची कल्पना मुंब-ईत प्रथम दामोदर भाईनींच मूर्त स्वरूपांत आणिली आणि एवढ्यानेंही ते थांबले नाहींत. त्यांनी जागोजाग अशा लायब्ररऱ्या स्थापिल्या. **डॉ. भांडारकर लायब्ररी**ही त्यांच्याच औदार्यामुळें समाजास लाभली. त्यांनीं आजपर्यंत १०-१२ अशा लायब्ररऱ्या स्थापिल्या आहेत व आणखीही कित्येक स्थापण्याचा त्यांचा विचार होता. परंतु ह्या सर्व वाचनालयांत कोटांत त्यांनीं प्रथम स्थापिलेली लाय-

ब्ररी ही मुख्य होय. ह्या संस्थेसाठीं जवळ जवळ **४ लक्ष रुपये** खर्चून त्यांनीं एक मोठी इमारत मृत्यूपूर्वी खरीद केली. तेथेंच एक लक्ष रुपयांची देणगी देऊन त्यांनीं **के. आर. कामा** ह्यांच्या नांवानें स्थापलेल्या संस्थेचा समावेश व्हावा अशी इच्छा दर्शविल्याप्रमाणें त्यांच्या पश्चात सर्व व्यवस्था झाली आहे. लायब्ररी व कामा इन्स्टिटयूट मुंबईशहरास सर्व प्रकारें भूषणभूत करण्याचा त्यांचा विचार होता. व त्यासाठीं त्यांनीं सर्व तयारी केली होती; परंतु आयुष्य खुंटलें, व त्यामुळें हा फारां दिवसांचा हेतु पूर्णतेस नेण्याचें काम लायब्ररीच्या ट्रस्टीजनीं उत्तम प्रकारें पार पाडलें. हें जर त्यांच्या हयातींत झालें असतें तर त्यांना किती समाधान वाटलें असतें !

## राममोहन आश्रम.

६. राजा राममोहनरायांच्या संबंधानें शेट दामोदरदास यांच्या ठिकाणीं उच्चतर अभिमान जागृत होता. राजा राममोहन हे आधुनिक हिंदुस्थानाचे जनक असें ते म्हणत. आज आपल्याला आपल्या देशांत अनेक प्रकारच्या चळवळी दिसत आहेत. त्या सर्वांचें बीज राममोहनरायांनीं पेरिलें आहे अशी त्यांची पूर्ण खात्री होती. आणि आपल्या समाजाशीं त्यांचें नांव संलग्न झालेलें असावें असा विचार त्यांच्या मनांत आल्यावर प्रार्थनामंदिराच्या आवारांत बरीच जागा रिकामी असल्याचें त्यांच्या लक्षांत आलें. समाजाला एका स्वतंत्र इमारतीची फार जरूर आहे हें त्यांस माहीत होतें. ही अडचण लक्ष्यांत घेऊन त्यांनीं स्वतःच्या खर्चानें **राममोहन आश्रम** ही इमारत समाजास बांधून दिली व तिच्या नित्याच्या खर्चासाठीं समाजापाशीं कांहीं रक्कमही त्यांनीं अनामत ठेवून दिली आहे. प्रार्थनासमाजाला उत्तम मंदिर आहे. परंतु त्याचे प्रचारक व परगांवाहून येणारी मंडळी यांस येथें राहण्यास स्वतंत्र घर नाहीं ही मोठी उणीव भासत होती. हें लक्षांत आणून दामोदरभाईनीं समाजाची ही गरज भागविली. आश्रमाची इमारत तयार झाल्यावर तिच्या उपयोगासंबंधानें कांहीं अटीही ठरल्या. राजा राममोहनरायांच्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं किती आदर वसत होता हें ब्रिस्टल येथें त्यांचें जें थडगें आहे त्याची कोणी वास्तपुस्त घेत नाहीं, त्याची डागडुज कोणी करीत नाहीं असें कळतांच दामोदरदासांनीं राजा राममोहनरायांची समाधि उत्तम रीतीनें बांधून दिली यावरून दिसून येतें. कलकत्त्यास कांहीं वर्षांपूर्वी राममोहनराय लायब्ररी स्थापन झाली. ह्या संस्थेच्या इमारतीसाठींही आमच्या बंधूंनीं बरीच मोठी देणगी दिली आहे. सारांश, राजा राममोहनरायांविषयीं त्यांच्या ठिकाणीं जो आदरभाव

वसत होता, जें प्रेम वसत होतें तें व्यक्त करण्याचे प्रसंग येतांच त्यांनीं केव्हांही माघार घेतली नाहीं व मोठ्या सढळ हातानें त्यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं द्रव्य-साहाय्य केलें.

## दादाभाई नौरोजी.

७. राजा राममोहनरायांप्रमाणेंच दादाभाई नौरोजी यांच्याविषयीं त्यांच्या ठिकाणीं जागृत आदरभाव वसत होता. दादाभाईच्या नांवें पूअर बॉयज् सेमिनरीसाठीं त्यांनीं एक इमारत बांधून दिली आहे व तेथें एक लहानशी लायब्ररी त्यांनीं स्थापिली आहे. दादाभाई कित्येक वर्षें विलायतेंत असतां त्यांस शेट दामोदरदास ह्यांनीं त्यांच्या सर्व प्रकारच्या चळवळी उत्तम प्रकारें चालविण्यास म्हणून दरमहा फार मोठें साहाय्य केलें आहे व हा त्यांचा क्रम कित्येक वर्षेंपर्यंत चालू होता.

## निराश्रित साहाय्यकारक मंडळी.

८. अस्पृश्य वर्गाच्या उद्धारासाठीं अगदीं अल्प प्रमाणावर वरील मंडळीचे उद्योग सध्यां चालू आहेत. उद्योगाचें प्रमाण पाहिलें तर यशाचें प्रमाण कांहीं वावगें आहे असें कोणासही म्हणतां यावयाचें नाहीं. आतांपर्यंत निराश्रित साहाय्यकारक मंडळीच्या द्वारें सर्वत्र पुष्कळ जागृति झाली आहे परंतु ह्या सर्व जागृतीचें बरेंचसें श्रेय आमच्या गत बंधूंस दिलें पाहिजे. खानेसुमारीचे आंकडे आपल्यापुढें ठेवून आमचे बंधु रा. विठ्ठलराव शिंदे बसले, व किती लाख लोकांना आम्ही लोक अगदीं नीच रीतीनें वागवीत आहों हें त्यांनीं आपल्या लेखाच्या द्वारें दाखविलें खरें. तथापि ह्या लोकांसाठीं कांहींतरी उद्योग स्वतंत्र रीतीनें झाला पाहिजे असें दाखवून देतांच कामास प्रारंभ करण्यासाठीं लागणारी देणगी दामोदरदासांनीं मोठ्या आनंदानें दिली व त्या देणगीच्या आधारावर हें लहानसें मिशन स्थापन झालें. मिशनला आणखीही त्यांनीं मदत केली व ते वांचले असते तर त्यांनीं मिशनला आणखी द्रव्यसाहाय्य करून त्याच्या प्रचारकांस उत्तेजन दिलें असतें. अस्पृश्य वर्गासंबंधानें त्यांची कळकळ इतकी असे कीं, ते आपण होऊन त्या वर्गाच्या लोकांस साहाय्य करावयास सिद्ध होत. एलोर येथील समाजांत उपासनेसाठीं पंचम वर्गांतील लोक येत, म्हणून तेथील लोकांस उपासनेस कोणी थारा करीत नाहीं असें शेटजींना **पत्रिकेच्याद्वारें** कळतांच त्या समाजाच्या साहाय्यासाठीं दामोदरभाई आपण होऊन पुढें आले व त्यांस उत्तेजन देण्यास समाजाच्या चिटणिसांस सांगितलें. इतकें ह्या ज्ञातीच्या कल्या-

णाकडे त्यांचें लक्ष होतें. तशांतून अस्पृश्य वर्गापैकीं असूनही त्या लोकांनीं ब्राम्ह-धर्माविषयीं आस्था व्यक्त केल्याचें कळतांच त्यांस फार समाधान वाटलें. ह्या समाजाचें मंदिर त्यांच्या हयातींत पूर्ण झालें नाहीं. याचप्रमाणें रा. गणेश आक्काजी गवई हे थूगांव येथें जें लहानसें ब्राम्हमंदिर बांधीत होते त्यासही त्यांनीं मोठ्या आनंदानें साहाय्य केलें.

## ब्राह्मसमाजास मोठी मदत.

९. दामोदरदासांनीं सर्वांत मोठी देणगी आपल्या पीपलस् फ्री रीडींगरूमसाठीं दिली आहे. पण त्याच्या खालोखाल त्यांनीं ब्राह्मसमाजास साहाय्य केलें आहे. ब्राह्मधर्माचा सर्वत्र जारीनें प्रसार झाला पाहिजे. धर्मप्रचारकांनीं सर्वत्र संचार करून ब्राह्मधर्माची ओळख खेड्यापाड्यांत जाऊन करून दिली पाहिजे. ज्यांनीं ब्राह्मधर्माचा स्वीकार केला आहे, त्यांनीं लोकांच्या ठिकाणीं आपल्या धर्माविषयीं जीवंत जागृत अभिमान स्वतःच्या उदाहरणानें उत्पन्न केला पाहिजे. कुटुंबांमध्यें भक्तिभाव जागृत झाला पाहिजे. नित्य भजन, प्रार्थना, उपासना ह्यांची त्यांस गोडी लागली पाहिजे. ह्या सर्व कार्याविषयीं उत्तम कित्ता प्रचारकांनीं घालून दिला पाहिजे. आपल्या तत्त्वांस व आपल्या सत्त्वास जागणारे लोकच समाजाचा उद्धार करितील, समाजांत जागृति करतील, मग अशी एकच व्यक्ति आढळली तरी त्यांची त्याचेविषयींची भक्ति उचंबळून येत असे. **सदाशिवराव केळकर** अशाच प्रकारचे आदर्शवत् गृहस्थ होते हें जाणून त्यांनीं आपण होऊन पुढाकार घेऊन त्यांचें स्मारक केलें. परंतु ब्राह्म मिशनरींच्या संसाराच्या कामीं आपल्याकडून कांही तरी सेवा व्हावी अशी त्यांची फार फार इच्छा होती. त्याप्रमाणें त्यांनीं मृत्यूच्या आधीं दोन वर्षांपूर्वी साधारण ब्राह्मसमाजाचे त्या वेळचे अध्यक्ष व पुढारी प्रचारक पंडित शिवनाथशास्त्री यांस पत्रद्वारें कळविलें कीं, आपल्या हवालीं मी एक लक्ष रुपये सालिना पंचवीस हजार ह्याप्रमाणें करणार आहें. सर्व रक्कम पूर्ण झाली म्हणजे मग त्याच्या अटी वगैरे ठरविण्यांत येतील. ह्या त्यांच्या मूळ हेतूस अनुसरून त्यांनीं मृत्युपर्यंत पन्नास हजार रुपये पाठविले व बाकीची रक्कम ते लवकरच पाठवून अटी वगैरे ठरविणार होते; पण, मध्येंच काळानें झडप घातली. तथापि दामोदरदासांच्या मागें त्यांच्या ट्रस्टींनीं त्यांच्या इच्छेप्रमाणें सगळ्या रकमेची भरपाई केली व आतां ह्या रकमेच्या व्याजांतून धर्मप्रचाराच्या कार्यास कलकत्त्याचा साधारण समाज मदत करीत असतो.

१०. अशाप्रकारें आपल्या संपत्तीचा त्यांनीं जो विनियोग केला त्याची यादी करावयास गेल्यास, सर्व साधनें असलीं तर, मोठा ग्रंथ होईल. कोणतेंही चांगलें पुस्तक निघालें कीं, दामोदरदासांची त्याला मदत असेच. कोणतीही चांगली संस्था निघाली कीं, दामोदरदासांनीं आपली पसंति आपल्या साहाय्यानें दाखविलीच. मागें जेव्हां फिरत्या लायब्ऱ्या निघाल्या, व कांहीं काळ त्यांच्याद्वारें इतकें चांगलें कार्य झालें त्यास प्रथम प्रारंभ शेटजींच्या उदार आश्रयानें झाला. अनेक शाळा, अनेक मुलें, अनेक गरीब कुटुंबें अनेक गरजू गृहस्थ यांस दामोदरदासांचें साहाय्य असे. आपलें नांव व्हावें, आपला बडेजाव वाढावा, मानमरातब गाजावा म्हणून ते दानधर्म करीत नसत. त्यांचें दान गुप्तदान असे. मन कळवळलें कीं त्यांच्या धनाचा ओघ तिकडे वळलाच. साऊथ आफ्रिकेच्या लढाईच्या वेळीं इजा झालेल्यांची शुश्रूषा वगैरे करण्यासाठीं दामोदरदासांनीं दोघां हिंदु डाक्टरांना पाठविलें. त्यांनीं इतका दानधर्म केला; पण त्याच्याबद्दल त्यांनीं कधीं गाजावाजा केला नाहीं. आपल्या नांवाचा जयजयकार त्यांनीं वर्तमानपत्रांत होऊं दिला नाहीं. हें त्यांचें दानशौर्य अगदीं अखेरपर्यंत होतें. शनिवार ता. ८ नोव्हेंबर १९१३ पासून त्यांच्या डोळ्यांवरची झांपड अगदींच तीव्र होती; परंतु शुक्रवारीं तितकी स्थिति नव्हती. त्या दिवशीं रा. रा. नटराजन त्यांच्या येथें गेले असतां साऊथ आफ्रिकन फंडासाठीं त्यांनीं पांचशें रुपये देण्याचें आश्वासन दिलें ! त्या वेळीं आमच्या बंधूंनीं Do you advise me to put a figure ? एवढाच प्रश्न विचारिला व त्यास होय असें उत्तर मिळतांच त्यांनीं आंकडा घातला. सारांश, आपल्याला परमेश्वरानें जी संपत्ति दिली आहे व तो जी देत आहे ती त्यास प्रिय अशा कार्यीं लावण्यासाठीं होय, ही दृष्टि नित्य ठेवून त्यांनीं आपल्या धनाचा व्यय केला.

११. दामोरदासजींचे कांहीं गुण विशेष लक्षांत घेण्यासारखे होते. पहिला त्यांचा गुण म्हणजे त्यांचा साधेपणा. आपल्याला जें धन मिळत आहे व त्याचा जो आपण व्यय करीत आहों त्याच्यायोगें आपल्याला मोठेपण येऊन चिकटलें आहे याची त्यांना जाणीवच नव्हती ! इतका पैसा मिळत असतांना ते जसे साधे होते तसेच ते शेवटपर्यंत होते. त्यांचा करारी स्वभाव, व प्रामाणिकपणा ह्यांमुळें व्यापारी लोकांत त्यांची पत फार वाढली व ज्या मोठमोठ्या कंपन्यांसाठीं ते दलालीचें काम करीत असत त्यांची ह्यांच्या सचोटीवर फार भिस्त असे व त्यामुळें दामोदरभाई आपल्या कंपनीच्या हिताचा विचार करूनच जें कांहीं करावयाचें

तें करितील अशी त्यांची खातरी असे. त्यांची धर्मश्रद्धा लेंचीपेंची नव्हती. ते वक्ते नव्हते, लेखक नव्हते; नाहीं म्हणावयास **सुबोधपत्रिका** सुरू झाली त्यावेळीं कांहीं काळपर्यंत जेव्हां गुजराती पत्रिकाही निघत असे त्यावेळीं पत्रिकेची व्यवस्था त्यांनीं पाहिली व झालेलें नुकसानही त्यांनीं सहन केलें! क्वचित् प्रसंगीं उपासना चालविल्या. पण, नित्याचें भजन व प्रार्थना ह्यांचा क्रम त्यांनीं मोडला नाहीं. कोणी सभासद एरव्हींच त्यांच्या भेटीस सकाळीं गेला कीं त्यास संगीतांतील पद्यें म्हणावयास त्यांनीं सांगावें व आपणही मोठ्या आवडीनें तीं मग घोळून घोळून म्हणत असावें. त्यांची धर्मावरील व देवावरील निष्ठा प्रबल होती; म्हणूनच त्यांच्या ठिकाणीं करारीपणा व सत्यप्रीति बाणली. देव आपल्याला धन देत आहे, देवाच्या कार्यासाठीं त्याचा विनियोग झाला पाहिजे. फोडिलें भांडार धन्याचा हा माल, ही भावना त्यांच्या ठिकाणीं रात्रंदिवस जर विशेष जागृत स्थितींत नसती तर हा दानशूरपणा त्यांच्या ठिकाणीं मुरला नसता. अलीकडे दामोदरभाईंचें लक्ष आपल्या समाजांतील तरुणांकडे फार असे. त्यांनीं पुढें यावें, त्यांनीं समाजाची सेवा उत्साहानें करावी, त्यांनीं आपलीं तत्त्वें आपल्या आचरणांत तंतोतंत आणून, हा धर्म आपल्या कुटुंबांत न्यावा, स्त्रियांनीं पुढें यावें, त्यांनीं मंदिरांत गायनाचें कार्य करावें, त्यांनीं आपल्या धर्माविषयीं अभिमान बाळगावा असें त्यांना वाटे. आणि तरुण सभासद एकनिष्ठपणें समाजाची सेवा करीत आहेत असा त्यांना अनुभव आला म्हणजे त्यांना फार समाधान वाटे. तरुणांनीं उपासना चालविली व चांगल्या प्रकारें तयारी करून धर्मपर व्याख्यान दिलें कीं, दामोदरदासजींना आनंद होत असे व उपासना संपतांच ते अशा तरुणांचें मनःपूर्वक अभिनंदन करीत व त्यांस प्रोत्साहनपर शब्द बोलत असत. सामाजिक, राजकीय, विद्याविषयक, औद्योगिक, इ० सर्व बाबतींत त्यांचे विचार प्रागतिक असत. विधवाविवाह, स्त्रीशिक्षण, परदेशगमन, प्रौढविवाह, जातिभेदखंडन, प्रायश्चित्ताची निरर्थकता, राजकीय सुधारणा, विचारस्वातंत्र्य इत्यादि सर्व बाबतींत अत्यंत उदार विचार त्यांचे झाले होते. त्यामुळें ह्या बाबतींतील सर्व चळवळींस व संस्थांस त्यांचा आश्रय असे. आपल्या देशाची उन्नति सर्व दिशांनीं झाली पाहिजे असें त्यांस वाटे व याच धोरणानें त्यांच्या औदार्याचा ओघ वहात असे. तथापि धर्मास, धार्मिक सुधारणेस, धर्माचरणास ते प्राधान्य देत. चर्व चळवळींचा पाया धर्म, उदारधर्म, झाला पाहिजे असें त्यांस वाटे. हा सर्व त्यांच्या स्वतःच्या अनुभवाचा, थोरांच्या सहवासाचा, प्रवासामुळें प्राप्त झालेल्या ज्ञानाचा परिणाम होय. असो.

१२. दामोदरदासजी मानाचे भुकेले नव्हते, त्यांचें दान गुप्तदान असे, असें आम्हीं वर म्हटलेलें आहे. सर्व लोकांना त्यांचा हा स्वभाव पूर्णपणें माहीत झाला होता. साऊथ आफ्रिकन फंडासाठीं त्यांनीं जो पांचशें रुपयांचा आंकडा घातला व जी त्यांची शेवटची सार्वजनिक देणगी, तीही त्यांनीं "एका मित्रा"च्या नांवें घाला अशी आग्रहाची विनंति करून दिली! अशा प्रकारें मान, पदव्या ह्यांपासून ते अगदीं अलग राहात असत. असें असूनही त्यांनीं 'सर' ही पदवी विकत घ्यावी असा निकराचा प्रयत्न एकदां झालाच. मागील एका गव्हर्नरसाहेबांच्या कारकीर्दीत नाइटहूडची किंमत तीन लाख रुपये झाली होती, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. गव्हर्नरसाहेबांस इष्ट अशा उपयुक्त कार्यास तीन लाख देणगी देणारांस सरकाराकडून नाइट करण्यांत येत असे. हें पाहून दोन नाईट आमच्या गरीब साध्या दामोदरभाईकडे गेले व अमुक एका संस्थेच्या लायब्ररीसाठीं आपण तीन लाखांची देणगी द्या व नाइटहूड घ्या असें सांगूं लागले! त्या वेळीं ह्या आमच्या बंधूंनीं सांगितलें, मजसारख्या गरीब माणसाला नाइटहूड कशाला पाहिजे? मी जें कांहीं देतों तें मानासाठीं नव्हे. देवाची सेवा करण्यासाठीं मी दान करितों. तुम्ही म्हणतां त्या संस्थेच्या लायब्ररीला मी मदत करावी असें मला वाटत नाहीं. आणि तीन लाख रुपये जर लायब्ररीसाठीं खर्च करावयाचे, तर माझी लायब्ररी असतांना एवढी मोठी रक्कम मी बाहेरच्या लायब्ररीला देणें योग्य आहे असें मला वाटत नाहीं. माझ्या लायब्ररीवर जितका पैसा मी खर्च करीन तितका थोडाच आहे! दामोदरभाईचें असें बाणेदार उत्तर ऐकून सद्गृहस्थ निराश होऊन गेले.

१३. दामोदरभाईची दिनचर्याही फार वाखाणण्यासारखी होती. आमच्या समाजांतील व समाजाच्या बाहेरच्या सर्व तरुणांनीं त्यांच्या दिनचर्येपासून पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. ते प्रातःकाळीं उठून नित्य नियमानें भजनप्रार्थना करीत. कांहीं धर्मपर पुस्तकांतून थोडासा भाग वाचून त्यावर ते नित्य मनन करीत. भजनपर पदें व अभंग सुस्वरांत म्हटलेलीं त्यांना इतकीं आवडत कीं, फोनोग्राफच्या द्वारें त्यांनीं अशीं पद्यें ऐकून आपल्या मनाचें समाधान करून घ्यावें. १९१३ सालीं त्यांनीं आपल्या संगितांतील कांहीं पद्यांचे रेकार्डस तयार करवून आणविले. त्यांना आपलीं सर्व कामें नेमलेल्या वेळीं करण्याची संवयच लागली होती. ठरलेल्या वेळीं भजन, प्रार्थना, मनन, ठरलेल्या वेळीं उपाहार, नेमलेल्या वेळीं भोजन, नित्य व्यायाम व ठरलेल्या वेळीं व्यापार असा त्यांचा क्रम असे. त्यामुळें त्यांस आपली प्रकृती इतकी निकोप ठेवितां आली.

१४. **दामोदरदासजीं**संबंधानें पुष्कळ वर्तमानपत्रांत मृत्युलेख आले. सर्वांनीं त्यांच्या दानशौर्याबद्दल त्यांची वाखाणणी केली. सर्वांनीं त्यांचा विनम्रभाव, साधी वृत्ति, बाणेदार स्वभाव इ. गुण असाधारण होते असें म्हटलें त्यांच्या परोपकार-विषयक कृतींचीं सुरस वर्णनें वृत्तपत्रांत आलीं. पण दामोदरदासजींच्या जीवनाची किल्ली कोणासही सांपडली नाहीं ! ती किल्ली म्हणजे प्रार्थना व ब्राम्हसमाज व ब्राम्हधर्मांवरील त्यांची निष्ठा होय ! दामोदरदासजी पंचेचाळीस वर्षें या समाजाचे सभासद होते. पंचेचाळीस वर्षें या ठिकाणीं येऊन ते उपदेश ऐकत होते. येथें त्याना उत्तमोत्तम उपदेशकांचा सहवास झाला. प्रार्थना व ब्राम्हसमाजांतील उपदेशांनीं त्यांच्या ठिकाणीं विचारजागृति केली. महर्षि देवेंद्रनाथ, केशवचंद्र सेन, प्रतापचंद्र, शिवनाथ शास्त्री ह्यांच्या उपदेशांचें श्रवण करून ब्राम्हसमाजाला ते बिलगून राहिले. डा. भांडारकरांच्या कीर्तनांची व उपदेशांची त्यांनीं किती वेळ स्तुति केली आहे. डा. भांडारकरांचें एक व्याख्यान फोनोग्राफमध्यें घेववून त्या नळकंड्या त्यांनीं समाजांत ठेवून दिल्या होत्या. परंतु पुष्कळ दिवस पडून राहिल्यामुळें त्या नळकंड्या खराब झाल्या. डा. भांडारकरांचीं सर्व कीर्तनें सर्व विवरणांसह छापून प्रसिद्ध झालीं पाहिजेत असें त्यांनीं वारंवार म्हणावें. न्या. मू. रानडे ह्यांचे उपदेश व प्रार्थना, व सदाशिवराव केळकर ह्यांचें चरित्र ह्या सर्वांचा त्यांच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला, व समाजाच्या पुढाऱ्यांतील गुणांवर लुब्ध होऊन ते समाजांत राहिले. ह्या समाजाचे एक घटक असतांना त्यांनीं पुष्कळसें धन मिळविलें. येथेंच त्यांच्या चित्तास शांति मिळत असे व समाजांत असतांनाच त्यांनीं आपल्या धनाची व्यवस्था लाविली. सारांश, ब्राम्ह व प्रार्थनासमाजामुळें **दामोदरदासजी** आपल्याला जसे माहीत आहेत तसे झाले. नाहीं तर त्यांच्याही पेक्षां अनेकपटींनी अधिक श्रीमान् पुरुष ह्या शहरांत आज कांहीं थोडे नाहींत. परंतु दामोदरदासांची जागृति त्यांच्यांत नाहीं. त्यांची सत्वशील वृत्ति ह्यांच्या गांवीं नाहीं. सारांश, दामोदरदासजींच्या योग्यतेचें माप घेतांना व त्यांच्या गुणांचें वर्णन करितांना त्यांच्या एकंदर चरित्राचा व प्रार्थना आणि ब्राम्हसमाजाचा जो संबंध आहे त्याचा जर विचार केला नाहीं तर त्यांच्या चरित्राची किल्ली हातीं आली नाहीं असें मानावयास कांहीं हरकत नाहीं.

१५. शेट दामोदरदास यांची इहलोकींची यात्रा आकस्मिक रीतीनें संपली. परंतु त्यांचें चरित्र नव्या पिढीपुढें आहे. ह्यांच्यापेक्षां अधिक धनिक लोक आपल्या देशांत नाहींत असें नाहीं. ह्या मुंबई शहरांतही पुष्कळ आहेत; परंतु त्यांच्याप्रमाणें

आपल्या स्वकष्टार्जित धनाचा केवळ सत्कार्यासाठीं विनियोग करणारे फार थोडे. त्यांच्या ठिकाणीं जी धर्मश्रद्धा वास करीत होती, त्यांच्या ठिकाणीं जो विनम्रभाव वास करीत होता त्याचा हा परिणाम होता. त्यांच्या चरित्रापासून आम्हांला हा जो धडा मिळाला आहे कीं, देव आपल्याला जें धन देतो त्याचा विनियोग त्याला प्रिय अशीं जीं कार्यें, त्यांच्याकडेच करणें हा आपला धर्म आहे, तो बहुमोल आहे. तो लक्षांत ठेवून आम्ही वागलें पाहिजे. दामोदरदासभाईसारखीं दानशूर व लीनवृत्तीचीं माणस वारंवार पैदा होत नसतात. त्यांचा सहवास ज्यांना घडतो ते धन्य! त्यांच्या औदार्याचा मनावर इष्ट परिणाम होऊन जे तो गुण आपलासा करूं लागतात ते धन्य! दामोदरदासजी धन्य झाले. प्रार्थना व ब्राह्मसमाजांतील तरुण पिढीनें त्यांच्या मार्गांचें अवलंबन करून त्यांच्या विषयींचा आपला आदर व्यक्त केला पाहिजे.

१६. शेवटीं परमेश्वराच्या चरणीं आम्ही अनन्यभावें अशी प्रार्थना करतों कीं, दयामय परमेश्वरा! तुझी योजना अतर्क्य आहे! संसारांतील कौटुंबिक पाश कांहीं नसलेल्या ह्या आमच्या बंधूंच्या ठिकाणीं तूंच विचारजागृति केलीस. त्यांच्या ठिकाणीं खरी वैराग्यवृत्ति तूंच प्रेरिलीस. त्यांचें असामान्य औदार्य, त्यांचा विनम्रभाव, त्यांची धर्मनिष्ठा, त्यांची सत्यप्रीति आम्हांस आदर्शभूत होवो! हे परमकरुणेश्वर! सत्कर्मांमध्यें सदा रत असलेले हे बंधु आम्हांस सोडून जरी गेले आहेत तरी त्यांचें चरित्र आह्मापुढें आहे; त्याच्याद्वारें ते आह्मांस अधिकाधिक प्रिय होवोत. त्यांस प्रिय जीं कार्यें तीं आमच्या हातून घडोत व त्यांस प्रिय जो धर्म त्याची वाढ अल्पस्वल्प प्रमाणानें आमच्या हातून तुझ्या कृपेनें होवो व आमच्या ह्या देशांत, आमच्या ह्या समाजांत, आमच्या ह्या बंधूसारखे दानशूर, पवित्राचरणी, विनम्रवृत्तीचे धर्मनिष्ठ बंधु व भगिनी पुष्कळ निपजोत!

## ( १० ) रा. ब. लालशंकर उमियाशंकर त्रवाडी.

नम्रत्वेनोन्नमंतः परगुणकथनैः स्वान् गुणान् ख्यापयंतः ।
स्वार्थान् संपादयंतो विततपृथुतरारंभयत्नाः परार्थे ॥
क्षांत्यैवाक्षेपरूक्षाक्षरमुखरमुखान् दुर्मुखान् दूषयन्तः
संतः साश्चर्यचर्या जगति बहुमताः कस्य नाभ्यर्चनीयाः ॥

—भर्तृहरि.

[ यांत भर्तृहरीनें सांगितलेलीं सर्व संतलक्षणें अक्षरशः परलोकवासी लालशंकरभाईंना लागू पडत होतीं. विशेषतः निरभिमानता हा गुण त्यांच्यांत विपुल होता. एकदां त्यांनीं आपण कांहीं बी. ए. एम्. ए. नाहीं असें सहज विनयानें म्हटलें होतें. तेव्हां मीही याच भावानें म्हटलें, बरें झालें. नाहीं तर इतरांप्रमाणें तुम्हांमध्येंही निरभिमानता हा गुण कठिण झाला असता. लालशंकरभाई इतका Selfless स्वार्थाची जाणीव नसणारा निःस्वार्थी पुरुष आपल्या पहाण्यांत कोणीच आला नाहीं. —डा. भांडारकर. ]

अहमदाबाद प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष, मुंबई प्रार्थनासमाजाचे एक सन्मान्य सभासद, अहमदाबाद येथील किंबहुना गुजराथ प्रांतांतील प्रत्येक लोकोपयोगी संस्थेशीं निकट संबंध असणारे, अहमदाबाद समाजाचे व त्याचप्रमाणें अनाथाश्रमाचे आधारस्तंभ व प्राणाधार, पंढरपूर आरफनेज व बालहत्याप्रतिबंधक गृहाचे जनक रावबहादुर लालशंकर यांस शुक्रवार ता. १८ आक्टोबर १९१२ रोजीं अहमदाबाद येथें देवाज्ञा झाली. ह्या उदारधी व विश्वकुटुंबी गृहस्थाचें चरित्र अत्यंत अनुकरणीय व उत्साहजनक असून सर्वांस अत्यंत बोधप्रद आहे, म्हणून तें येथें देत आहों.

सत्कृत्यें हीं सुवासिक पुष्प होत. पुष्पांच्या मधुर परिमलानें सर्वांस आनंद होतो. दुःखितांस तीं क्षणभर आपलें दुःख विसरावयास लावितात. त्याप्रमाणें सत्कृत्यरूप पुष्पांचा परिमल लपून न राहतां तीं जनांस अत्यंत सुखदायी अशीं वाटतात. मुक्तिफौजेचे आद्य जनक जनरल बूथ ह्यांच्या कार्यक्षेत्राचा जो सर्व जगभर पसारा माजला आहे, तो त्यांनीं जनसेवेचें व्रत उचललें म्हणून. प्रार्थनासमाज ही संस्था ह्या इलाख्यांत स्थापन झाल्यापासून आपल्या आचरणाच्याद्वारें बंधुप्रेम दाखविणारे जे गृहस्थ आमच्यामध्यें पुढें आले व ज्यांनीं मोठ्या प्रमाणावर जनसेवा तत्परतेनें व मोठ्या स्थिरबुद्धीनें बजाविली असे एकटे लालशंकर-

भाईच होत. इतरांचीं दुःखें व यातना तीं आपलीं दुःखें व यातना, ह्या भावनेनें प्रेरित होऊन सर्व आयुष्यभर ते कसे वागले हें त्यांच्या पुढील त्रोटक चरित्रावरून वाचकांस कळून येईल.

## जन्म व शिक्षण.

ता. २३ आगस्ट सन १८४५ मध्यें लालशंकर यांचा जन्म बडोदें प्रांतांतील नवदीपूर नामक खेड्यांत झाला. ते वीसा नागर ब्राह्मण जातीचे होते. ह्या खेड्यांत त्यांचें थोडें शिक्षण झाल्यावर त्यांचे वडील त्यांस घेऊन अहमदाबाद येथें आले व पुढील थोडें शिक्षण अहमदाबाद येथील शाळेंत झालें. यांचे तीर्थरूप याज्ञिक होते. म्हणून ते आपल्या चिरंजिवास तेंही शिक्षण देऊं लागले. तथापि लालशंकरनीं आपला गुजराथी शिक्षणाचा क्रम सोडला नाहीं. बुद्धि तीव्र असल्याकारणानें ते लवकरच त्यावेळच्या नार्मलस्कूलमध्यें दाखल झाले व तेथें त्यांस दरमहा पांच रुपयांची स्कालरशिपही मिळूं लागली. पुढें नार्मलस्कूलचें रूपांतर होऊन त्याचें ट्रेनिंग कॉलेज झालें व त्या ठिकाणीं लालशंकरना १० रुपयांची स्कालरशिप सुरू झाली. ह्या सुमारास त्यांचे शिक्षणांत मोठा अडथळा आला. वडिलांची गरिबी असल्या कारणानें मुलानें आतां शिक्षक व्हावें, उगीच अधिक शिक्षणाच्या भानगडींत पडूं नये असा वडिलांचा आग्रह पडला. परंतु लालशंकर ह्यांचें लक्ष्य सर्व पुढील शिक्षणाकडे असल्यामुळें त्यांना आपल्या तीर्थरूपांचें म्हणणें पसंत पडलें नाहीं. त्यांना अधिक शिकावें अशी मोठी उमेद होती. त्यांची आई लहानपणींच वारल्यामुळें त्यांस घरांत मातृसुख नव्हतें. इतकेंच नव्हे तर घरांत त्यांची सापत्न मातुश्री होती. शिवाय नागर ब्राह्मणासारख्या श्रेष्ठ मानिलेल्या जातींत त्या वेळीं बालविवाहाची चाल फारच जोमांत असल्या कारणानें त्यांचें लग्नही लहानपणींच उरकून घेण्यांत आलें होतें. स्वतंत्रपणें शिक्षण वाढविण्याचा किंवा स्वतंत्र होण्याच्या त्यांच्या मार्गांत ही एक मोठीच अडचण होती. वडिलांनीं तर सांगितलें कीं, आपल्या म्हणण्याप्रमाणें चालावयाचें नसेल तर मुलानें घराबाहेर निघावें.

## शिक्षणासाठीं गृहत्याग.

वडिलांनीं असें निक्षून सांगितल्यावर लालशंकरभाई मोठ्या पंचाइतींत पडले. त्यावेळीं रावसाहेब महिपतराम रूपराम, रा. ब. सर रमणभाईचे तीर्थरूप, हे ट्रेनिंग कॉलेजचे मुख्य अध्यापक होते. त्यांजकडे जाऊन लालशंकरनीं त्यांस आपली सर्व स्थिति निवेदन केली. एवढया हुशार व होतकरू विद्यार्थ्यास



लालशंकर उमियाशंकर

अशा प्रकारें केवळ वडिलांच्या दुराग्रहामुळें अभ्यास मध्येंच सोडावा लागणें हा विचार रावसाहेब महिपतरामांस मुळीं पसंत पडला नाहीं. त्यांनीं त्यांस स्पष्ट सांगितलें कीं, तुम्ही सांगतां त्या कारणांसाठीं तुमचे वडील तुम्हाला घराबाहेर निघा म्हणताहेत तर तुम्ही खुशाल घराबाहेर निघा व स्वतंत्र ठिकाणीं बिऱ्हाड करून तुम्ही सहकुटुंब रहा व ह्या अडचणीच्या वेळीं घर आपलें आहे असें समजून मजकडे बेलाशक या. लालशंकर ह्यांनीं आपल्या गुरुजींचा उपदेश पूर्णपणें अमलांत आणिला व अनेक अडचणी सोसून केवळ स्वतःच्या हिंमतीवर त्यांनीं ट्रेनिंग कॉलेजमधील आपलें शिक्षण पूर्ण केलें. गणित विषयांत ते विशेष निष्णात होते. त्यांत त्यांनीं इतकी प्रगति केली होती कीं एल्फिन्स्टन कॉलेजांतील सीनिअर स्कालरशिपचे प्रश्न त्यावेळीं व्हर्न्याक्युलर कॉलेजांतील विद्यार्थ्यांस देण्यांत आले व ते सर्व तपासतां त्यांत लालशंकर यांचा नंबर पहिला आला. त्यांनीं रचिलेलीं अंकगणितें अद्यापही गुजराथेंत चालत आहेत. त्यांनीं व्याकरण व भूगोल यांचींही पुस्तकें तयार केलीं होतीं.

## शाळेंतील शिक्षक व अधिक अभ्यास.

अशा रीतीनें त्यांची विद्यार्थिदशा पूर्ण झाली, व त्यांस कोठें गुजराथी शाळेवरील शिक्षक न नेमतां हायस्कूलमध्यें गणित विषय शिकविण्यासाठीं त्यांची नेमणूक झाली. त्यांना इंग्रजी येत नव्हतें, तरी गणित विषयांत त्यांची पारंगतता पाहून त्यांनीं तो गुजराथींत शिकवावा असा ठराव झाला. कांहीं दिवस ते गुजराथ प्राव्हिनशिअल कॉलेजमध्येंही शिकवीत होते व तेथेंही त्यांचें शिक्षण पसंत पडलें. ट्रेनिंग कॉलेजमध्यें असतांना महिपतरामभाईच्या मदतीनें ते थोडें इंग्रजी शिकूं लागले होते, आणि नोकरीवर असतांना त्या ज्ञानांत भर घालण्याची उत्कटेच्छा त्यांस झाली व त्यांनीं व त्यांच्या दोन मित्रांनीं तीन वर्षें अभ्यास करून सर्व विषय संपविले व मॅट्रिक्युलेशन पदरांत पाडून घेतली. आतां त्यांना बी. ए. पर्यंत अभ्यास करावा असें वाटूं लागलें ! परंतु नोकरी करून कॉलेजांतील टर्मस ठेवून परीक्षेला बसणें कसें साध्य होणार ? इतक्यांत त्यांस कोणीं सांगितलें कीं, शिक्षकाचा धंदा करणाराला टर्मस् न ठेवतां मद्रास युनिव्हर्सिटीच्या एफ. ए. परीक्षेला बसतां येतें. झालें. ज्या लालशंकरभाईला एका काळीं गुजराथीवरच आपली तहान भागवावी लागत असे ते मद्रास युनिव्हर्सिटीच्या एफ. ए. चा अभ्यास करूं लागले. त्यांनीं तो अभ्यास योग्य वेळीं संपविला व जलमार्गानें मद्रासला जाण्याचें ठरविलें ! त्या वेळीं हल्लीं सारखें चोहोंकडे आगगाडीचें जाळें

पसरलेलें नव्हतें. प्रवास फार कठिण असे. वेळेवर जाऊन पोंचण्याची भीति. ह्या-शिवाय त्यांच्या मार्गांत अनेक अडचणी आल्या तरी ते मुळींच डगमगले नाहींत व ही परीक्षाही ते पास झाले. ट्रेनिंग कॉलेजांत असतांना त्यांना गुजरातींत लेख लिहिण्याची आवड असे. त्यावेळीं त्यांचे लेख गुजराती शालापत्रकांत प्रसिद्ध होत असत. पुढें एका मित्राच्या साहाय्यानें त्यांनीं **टीकाकार** नांवाचें एक मासिक काढलें व तें दोन वर्षें चालल्यानंतर बंद पडलें. नंतर बी. ए. परीक्षेचा अभ्यास करण्याचा त्यांनीं निश्चय केला! ह्यावेळीं पगार व शिकवण्या वगैरे मिळून त्यांचें उत्पन्न बरें असे. इतक्यांत अहमदाबाद येथील स्मालकाज कोर्टांत क्लार्क आफ धी कोर्टची जागा रिकामी झाल्याचें त्यांस कळलें. ही जागा पत्करण्याचा प्रथम त्यांचा विचार नव्हता, परंतु त्यांच्या मित्रांच्या व हितचिंतकांच्या सल्ल्यानें त्यांनीं शिक्षणखात्याशीं असलेला आपला संबंध तोडला व १८७१ सालीं ते ह्या नव्या नोकरीवर रुजू झाले.

## क्लार्क आफ धी कोर्टचे न्यायाधीश.

नव्या नोकरीवर रुजू झाल्यावर त्यांना आतां बी. ए. चा नाद मोठ्या कष्टानें सोडावा लागला. तथापि एक अभ्यास सोडावा लागला, तर केवळ मिळालेली नोकरी करून स्वस्थ न बसतां त्यांनीं मुन्सफीच्या परीक्षेचा अभ्यास करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें ताबडतोब अभ्यासास लागून दोन वर्षांत तो अभ्यास संपवून १८७३ मध्यें ते मुन्सफीची परीक्षा पास झाले व १८७४ मध्यें प्रथमच पंढरपूर येथें मुन्सफीच्या जागीं त्यांची नेमणूक झाली. येथें असतांनाच त्यांच्या विशेष कर्तत्वास आरंभ झाला. ह्यानंतर नोकरीच्या निमित्तानें महाराष्ट्रांत सोलापूर, अहमदनगर, नाशिक वगैरे ठिकाणीं व गुजराथेंत कांहीं ठिकाणीं त्यांस जावें लागलें. सन १८९१ मध्यें ते अहमदाबाद येथें फर्स्टक्लास सबजज्ज होऊन गेले व १८९९ त ज्या ठिकाणीं ते प्रथम क्लार्क आफ धी कोर्ट होते तेथील म्हणजे स्माल काज कोर्टांतील, न्यायाधीश झाले व ह्याच हुद्यावर असतांना १९०३ च्या मे महिन्यांत त्यांनीं पेन्शन घेतलें.

## लोकसेवा.

लालशंकरभाई हे रावसाहेब महिपतराम रूपराम ह्यांच्या तालमींत तयार झाले होते. त्यामुळें बालविवाह, विधवाविवाहप्रतिबंध, यासारख्या दुष्ट चालींना आळा बसला पाहिजे व सामाजिक बाबतींत इतर इष्ट सुधारणा घडवून आणिल्या पाहिजेत; त्याचप्रमाणें आपणांमध्यें धार्मिक सुधारणा अवश्य झाली पाहिजे अशी

त्यांची खात्री झाली. आरंभीं त्यांस इंग्रजी भाषेचें ज्ञान नव्हतें व ज्याला आपण उच्चशिक्षण म्हणतों तेंही त्यांस प्राप्त झालेलें नव्हतें. तथापि आपली हीन स्थिति लक्षांत येण्यास व ती घालविण्यासाठीं मनोभावें प्रयत्न करण्याला इंग्रजी भाषेचें ज्ञान व इंग्रजी शिक्षण यांवाचून दुसरा मार्ग नाहीं असें कांहीं नाहीं, हें लालशंकरभाईच्या चरित्रावरून लक्ष्यांत येतें. त्यांस इंग्रजी शिक्षण प्राप्त होण्यापूर्वीच लालशंकरभाईचीं मतें उदार झालीं होतीं. आपण स्वतः विचार करूं लागलों व महिपतरामभाईसारखा मार्गदर्शक मिळाला म्हणजे उन्नति होते, तेंही लालशंकर ह्यांच्या चरित्रावरून शिकण्यासारखें आहे. महिपतरामभाईसंबंधानें लालशंकर यांच्या मनांत अपार आदर वसत असे, व त्यांच्यासंबंधानें बोलत असतांना ते कित्येक वेळां गहिंवरून जात. 'मला आज जी सुस्थिति प्राप्त झाली आहे त्याचें सर्व श्रेय त्याच महात्म्यास आहे; त्यांनीं मला मार्ग दाखविला, त्यांनीं मला प्रोत्साहन दिलें, त्यांनीं माझ्या ठिकाणीं कर्तव्यनिष्ठा वाढविली. माझे हातून जर कांहीं सत्कृत्यें व लोकसेवा होत असेल व झाली असेल, तर तो महिपतरावभाईचा प्रभाव. प्रत्यक्ष त्यांच्या चिरंजिवांच्या मनांत त्यांचेविषयीं आदर वसत नसेल इतका माझे मनांत वसत आहे' असें ते संभाषणांत अनेक वेळां बोलून दाखवीत असत. लालशंकर महाराष्ट्रांतून बदलून गुजराथेंत आले त्याच सुमारास रावसाहेब महिपतराम वारले. महिपतरामांनीं आपल्या लेखांच्याद्वारें सगळ्या गुजराथला जागें केलें. त्यांचा अनेक परोपकारी संस्थांशीं संबंध होता. अहमदाबाद येथें एक अनाथाश्रम स्थापावा अशी त्यांची फार दिवसांची इच्छा होती. परंतु मरणापूर्वी तिला दृश्य स्वरूप प्राप्त झालें नाहीं. तथापि आपल्या गुरुजींची अपुरी राहिलेली इच्छा लक्षांत घेऊन, रा. ब. लालशंकर ह्यांनीं पुष्कळ खटपट करून तेथें अनाथाश्रम स्थापिला. सन १८९९ च्या दुष्काळामध्यें ह्या आश्रमानें अनाथ मुलांचा प्रतिपाळ करण्याचें फार मोठें कार्य केलें. एके वेळीं आश्रमामध्यें चौदाशें मुलें मुली होत्या. इतक्यांच्या खर्चाची व्यवस्था लालशंकर भाईस करावी लागे. त्यानें आपल्या ऐपतीप्रमाणें संस्थेस स्वतः मोठमोठ्या देणग्या देऊन नोकरी संभाळून मोठा कायमचा फंड उभा केला. अखेरीस त्यांनीं आश्रमाच्या मालकीचा पन्नास हजारांचा जमीनजुमला व एक लाखाचा स्थायिक फंड केला. ह्यावरून रा. ब. लालशंकर ह्यांच्या कर्तृत्वशक्तीची साक्ष पटते.

सार्वजनिक हिताचीं कृत्यें करणें हें एक आपलें अत्यंत पवित्र कर्तव्य आहे असें समजून ते अशा कार्यास मनोभावानें लागत असत. पूर्व वयांतच मनुष्यानें

आपल्याला अशी संवय लावून घेतली तर उत्तरोत्तर त्याची प्रगति होत जाते. अद्याप आपण लहान आहोंत, सार्वजनिक कामाचा आपल्याला अनुभव आलेला नाहीं, हुशार व अनुभवी माणसें कामें करीतच आहेत, त्यांत आपल्या हातून विशेष होण्यासारखें कांहीं नाहीं असें आमच्या समाजांत तरुण मंडळीला वाटतें व ते मागें राहून आपलें स्वतःचें व समाजाचें अकल्याण करितात. अशा मंडळींनीं रा. ब. लालशंकर यांचें उदाहरण लक्ष्यांत बाळगण्यासारखें आहे. लालशंकर नोकरीनिमित्त महाराष्ट्रांत ज्या ज्या ठिकाणीं हिंडले त्या त्या ठिकाणीं लोकहिताचीं अनेक कार्यें करून, व परोपकारी संस्था स्थापून त्यांनीं जणूंकाय आपलीं स्मारकेंच जागोजाग स्थापून ठेविलीं. असें जिवंत स्मारक त्यांनीं प्रथम पंढरपुरास स्थापिलें.

## पंढरपूर येथील कार्य.

पंढरपूर सारख्या ठिकाणीं लालशंकर जाण्याच्या पूर्वी कोणाला वाळवंटामध्यें जीवंत मूल पडलेलें दिसलें नसावें, किंवा तीर्थांच्या ठिकाणीं काय अत्याचार होत असतो हें कांहीं कोणी जाणत नव्हते असें नाहीं. परंतु १८७५ सालीं ग्रीष्मऋतूंत चंद्रभागेच्या कांठीं सायंकाळीं फिरत असतां त्यांस ठेंच लागली. पायाला काय लागलें म्हणून पाहतां तें एक रक्तानें भरलेलें, नाळही न कापलेलें, लुगड्याच्या फटकुऱ्यामध्यें गुंडाळून टाकलेलें जीवंत बालक आहे असें त्यांना आढळलें! आजपर्यंत अशीं मुलें वाळवंटांत टाकलेलीं सांपडतात असें त्यांनीं ऐकिलें होतें. त्या दिवशीं त्यांना त्याचा प्रत्यक्ष अनुभव आला. पुढें अशीं मुलें सांपडलीं कीं ते आपल्या घरीं आणून त्यांचा प्रतिपाळ करूं लागले व नंतर कांहीं मित्रांच्या साहाय्यानें त्यांनीं बालहत्याप्रतिबंधक गृहाची स्थापना केली. नंतर पुढें १८७७ सालीं सोलापूर जिल्ह्यांत भयंकर दुष्काळ पडला. त्यावेळीं मुरारजी गोकुळदास ह्यांस सोलापुरास गिरणीच्या निमित्तानें वारंवार जावें लागे. त्यांच्या लक्षांत सोलापूर जिल्ह्याची केविलवाणी स्थिति आली. लोक अन्नान्न करून मरत आहेत, गांवचे गांव ओसाड पडत आहेत, असें पाहून त्यांनीं दुष्काळ फंडाची स्थापना केली. त्यांनीं गांवोगांव माणसें पाठवून तेथील स्थितीविषयीं खात्रीपूर्वक माहिती आणवून धान्य व चारा यांचा पुरवठा करण्याची व्यवस्था केली. याच वेळीं इकडे पंढरपुरास लालशंकरभाई रात्रंदिवस मेहनत घेऊन ते लोकांचे प्राण वांचविण्याची व्यवस्था करीत होते. मुलांचे केवळ प्राण वांचवून

भागावयाचें नाहीं हें त्यांच्या लक्षांत येतांच अनाथबालकगृह स्थापण्याच्या खटपटीस ते लागले. त्या वेळीं दर शनिवारीं कोर्टाचें काम आटपून त्यांनीं मुंबईचा रस्ता धरावा. येथें मोठमोठ्या शेटियांच्या भेटी घ्याव्या, पंढरपूर येथें अनाथ मुलांची संख्या किती आहे तें त्यांस सांगावें, त्यांजपासून लहान मोठ्या देणग्या दिवसभर खटपट करून मिळवाव्या व रात्रीच्या गाडीनें पंढरपुरास जाऊन सोमवारीं कामावर रुजू व्हावें; अशा एका भेटीच्या वेळीं शेट मुरारजी गोकुळदासांनीं त्यांची व नारायणराव चंदावरकरांची ओळख करून दिली. त्या वेळीं ते म्हणाले नारायणराव ! हे लालशंकरभाई, हे एक प्रतिशंकरच आहेत हो ! त्यांना थकवम्हणून कसा तो माहीत नाहीं. दुष्काळनिवारणासाठीं यंव केलें पाहिजे आणि त्यंव केलें पाहिजे अशा गप्पा लोक मारताहेत. लालशंकरभाई काय केलें पाहिजे तें करून दाखवीत आहेत. सर्व कामांत त्यांचें हें असें आहे आणि त्यांना यश येतेंही." ह्या वेळासंबंधानें सर नारायणराव ह्मणतात " शेटजींनीं जें म्हटलें तें अगदीं खरें आहे. लालशंकरभाई सुधारक मतांचे हें सर्वांस माहीत; पुनर्विवाहपक्षाचे ह्याची सर्वांना जाणीव, तरी त्यांनीं विनंति केली व चतुर्भूज मुरारजी खिमजी जीवामारख्या अगदीं जुन्या विचारांच्या शेटियांनीं पंढरपूरच्या आश्रमासाठीं मोटमोठ्या देणग्या दिल्या." सर नारायण म्हणतातः—

" His energy, his quiet ways of persuasion, his humility, above all, his doggedness won wherever he went among the shetias of Bombay, and with all the prejudice they had against him, because he was a sudharak, a religious and social reformer, a prominent member of the Theistic Church known as the Prarthana Samaj, they helped him in the cause he had espoused. At Pandharpur he became known as *Dev* Munsiff."

*Indian Social Reformer.*

अशा प्रकारें खटपट करून लालशंकरभाईनीं पंढरपूरचें आर्फनेज स्थापिलें. त्या दुष्काळाच्या वर्षी लालशंकरभाईचें घर एक अन्नछत्र होतें. त्यांनीं आपल्या कुटुंबास सांगून ठेविलें होतें कीं, कोणीही गरीब मनुष्य अन्नासाठीं आला असतां

त्यास विन्मुख लावूं नये. स्वतां भाकऱ्या करून सर्वांस पोटाला घालावें. त्या माउलीस हा विचार पसंत पडला. आपण एवढया मोठ्या हुद्देदाराची पत्नी हा विचार त्यांच्या मनाला शिवला नाहीं व जे कोणी अन्नासाठीं त्यांच्या घरीं येत त्यांस स्वतः भाकऱ्या करून त्या जेवूं घालीत असत.

## इतर ठिकाणीं.

लालशंकर नाशिक येथें गेले त्या वेळीं त्यांनीं तेथें स्त्रियांसाठीं एक दवाखाना काढला. आपल्या स्त्रियांकरितां औषधपाण्यासाठीं स्वतंत्र दवाखान्याची जरूर आहे व प्रसूतीकरितां हुशार व शास्त्रीय माहिती असलेल्या सुइणी अवश्य असाव्यात हें लक्षांत घेऊन त्यांनीं ही सर्व खटपट केली. नाशिक येथें लालशंकर येण्यापूर्वी स्मशानाजवळ धर्मशाळा नव्हती. त्यामुळें पावसाळयांत पावसाचा व उन्हाळयांत उन्हाचा फार ताप व्हावा. ही लोकांची अडचण लालशंकर यांस सहन झाली नाहीं. त्यांनीं खटपट करून धर्मशाळा बांधून घेतली व त्याबद्दल सर्व लोक आतां त्यांची आठवण करीत असतात. त्यांची बदली अहमदनगर येथें झाली त्या वेळीं तेथील प्रार्थनासमाज बाल्यावस्थेंत होता. त्यास इमारतीचीही जरूर होती. या कामींही यांची खटपट फार उपयोगी पडली. १८९१ सालीं बदलून ते अहमदाबाद येथें आले व शेवटलीं बावीस वर्षें त्यांनीं तेथेंच घालविलीं तेवढया अवधींत त्यांनीं तेथें काय केलें याची साक्ष तेथील संस्था देत आहेत. ते ज्या वेळीं परलोकवासी झाले त्या वेळीं विधवाविवाहोत्तेजक मंडळी, बालविवाह निषेधक मंडळी, गुजराथ संसारसुधार समाज, विधवाश्रम, प्रार्थनासमाज, प्रार्थनासमाजाची शाळा, देवाभाई कन्याशाळा, अत्यंज स्कूल, महिपतराम रूपराम अनाथाश्रम व बालहत्याप्रतिबंधक गृह, लेडीज क्लब, भोलानाथ इन्स्टिटयूट, केपाभाईलाल गुजराथ व्हर्न्याक्युलर सोसायटी, सेवासदन, अंजुमान इस्लाम, इतक्या गुजराथेंतील संस्थांशीं त्यांचा निकट संबंध होता।

## लोकसेवेचें धोरण.

इतक्या संस्थांशीं त्यांचा संबंध होता, परंतु तो नांवाचा संबंध असें एकही संस्थेसंबंधानें नव्हतें. ज्या ज्या संस्थांशीं त्यांचा संबंध असे, ती कशी चालली आहे, तिच्या गरजा व उणीवा काय आहेत, हें सर्व समजून घेऊन तिच्या सर्व सभांस ते हजर रहात असत. गुजराथ व्हर्न्याक्युलर सोसायटी आज चांगल्या संपन्न स्थितींत आहे, त्याचें बहुतेक श्रेय लालशंकरभाईंनाच दिलें

पाहिजे. ते संस्थेचे चिटणीस असतां सभासदांची संख्या दुपटीनें वाढली, वसूल वाढला व संस्थेविषयीं आदरभावही वाढला. प्रेमाभाई हॉल बांधणें चाललें असतां अनेक वेळां ते चार चार तास हातांत छत्री घेऊन इमारतीभोंवतीं उन्हांत फिरत. गवंडी, सुतार, मजूर काय करितात, किती काम झालें आहे, किती व्हावयाचें आहे हें सर्व स्वतः पाहून त्यांजकडून चांगलें काम करवून घेत. मुकादम किंवा मिस्त्री नेमण्याची कांहीं जरूर नसे. कारण हेच तें सर्व काम स्वतः करीत असत. सार्वजनिक इमारती होतां होईतों थोड्या खर्चांत तयार व्हाव्या असा नेहमीं त्यांचा कटाक्ष असे. विटा आल्या तर तेच पास करणार, चुना आला तर तेच पहाणार अशी व्यवस्था असे. अनेक वेळां ते गवंड्यास हुकुम देत कीं, आजच्या दिवसांत अमुक चौरस फूट काम तुमच्याकडून झालेंच पाहिजे. ते स्वतः वाकबगार व माहितगार असल्यामुळें कामकरी लोकांस टंगळमंगळ करण्यास फावत नसे.

१८९८ सालीं डायमंड ज्युबिलीचा समारंभ जेव्हां अहमदाबाद येथें झाला तेव्हां गोरगरीब लोकांस जेवण देण्यांत आलें. त्या गरीब लोकांमध्यें अर्थात धेड, भंगी, मोची वगैरे लोक होते. त्यांची कोणीच दाद घेईना. तेव्हां ते लोक कंटाळून परत जावयास निघाले त्या वेळीं ही बातमी लालशंकरभाईस कळल्याबरोबर हातचें काम टाकून ते तिकडे गेले व त्या लोकांच्या जेवणाची व्यवस्था त्यांनीं स्वतः लाविली हें जेव्हां त्या वेळचे जिल्हाजज्ज जवळच होते त्यांनीं पाहिलें तेव्हां त्यांसही सानंदाश्चर्य वाटलें.

रा. ब. लालशंकर यांची राहणी अगदीं साधी असे व मोठेपणा दाखवून लोकांस त्रास द्यावा हें त्यांस पसंत नसे. कांहीं इमारतीचें काम चालू असल्यास कुंभाराजवळून, अगर कोठलेंही सामान पुरविणाराजवळून हिशेब समजवून घ्यावयाचा असला आणि तो जर भट्टीकडे अगर वखारीकडे परत जात असला, तर त्याजबरोबर चालून चालतां चालतां ते त्याजकडून तो समजूत घेत. पण ‘ मला आतां वेळ नाहीं, बंगल्यावर येऊन मला भेट, मग तुझा हिशेब पाहूं ’ असें ते म्हणत नसत.

पाहुण्यांचें आदरातिथ्य यांच्या घरीं विशेष असे व त्यांतही सामाजिक सुधारणेसंबंधीं व प्रार्थनासमाजसंबंधीं जे जे लोक अहमदाबादेस येत ते त्यांचे कडेसच उतरत. त्यांची सर्व व्यवस्था उत्तम कशी राहील, व त्यांची गैरसोय

कशानें होणार नाहीं हें नेहमीं त्यांचें पाहणें असे. कांहीं महाराष्ट्रीय मंडळीस तर ते कित्येक वेळां कैक महिने आपणांकडे ठेवून घेत. हेतु हा कीं परक्या ठिकाणीं त्यांस अडचण भासूं नये.

१८९९ सालच्या दुष्काळांत रा. ब. लालशंकर यांच्या देखरेखीखालीं दोन हजार दोनशें गुरें जमविण्यांत आलीं होतीं. आपलें कोर्टाचें, अनाथाश्रमाचें काम व इतर सर्व सार्वजनिक कामें संभाळून त्यांनीं ह्या गुरांची उत्तम व्यवस्था ठेवविली. हीं व इतर सार्वजनिक कामें लक्षांत घेऊन सरकारनें १९०३ सालीं कैसरी-हिन्दचें सोन्याचें पदक त्यांस बक्षिस दिलें. याच सुमारास त्यांनीं पेन्शन घेतलें. पेन्शन हें विश्रांतीकरितां असा पुष्कळांचा समज असतो. पण रा. ब. लालशंकर हे आतां आपला सर्व वेळ लोकोपयोगी कामें करण्यांत किंवा त्यांसंबंधानें चिंतन करण्यास मोकळे झाले. त्यांचें कुटुंब अनेक वेळां म्हणत असे कीं नोकरी होती तोंपर्यंत लालशंकर यांची प्रकृति ठीक असे, पण पेन्शन घेतल्यावर कामाची दगदग वाढल्यामुळें प्रकृति खालावत आहे.

रा. ब. लालशंकर यांचें कुटुंब १९०९ मध्यें वारलें. त्यापूर्वी दहा बारा वर्षें त्यांची प्रकृति चांगली नसे. त्यांनीं आपल्या प्रकृतीची हेळसांड करूं नये अशी लालशंकर यांची इच्छा, व त्यासाठीं माझी वाट न पहातां प्रार्थना उरकून तुम्ही आपलें भोजन उरकून घ्या असें त्यांचें नेहमीं सांगणें असे. कारण संध्याकाळच्या वेळीं सभा वगैरे कामें ह्यांस नित्य असावयाचीं. परंतु त्या तशाच तिष्ठत बसत व मलाही आपल्या प्रकृतीची काळजी आहेच ना असा जबाब देत. लालशंकर यांस एक्झीमामुळें बराच त्रास होत असे. तथापि ते कुपथ्य वगैरे न करितां प्रकृति संभाळून रहात असत. त्यांच्या कुटुंबानें नेहमीं म्हणावें कीं ' काजी दुबळे कां, तर त्यांना सगळ्या गांवची फिकीर' तशी स्थिति आमच्या येथें आहे.

लालशंकर ह्यांस मौज मजा, सुख आराम, चैन, हें ठाऊकच नव्हतें. जें काम अंगावर घ्यावयाचें तें पुरें करावयाचें हेंच त्यांचें ध्येय असे. अनेक वर्षेंपर्यंत अनाथाश्रमांत रोज सकाळीं जाऊन तेथील व्यवस्था ते स्वतः पहात असत. अशा वेळीं एखाद्या मुलास कोणी दूध पाजीत असलें तर तेथें स्वस्थ उभें राहून न पहातां किंवा कोरडे हुकूम न सोडतां हातांत बाटली घेऊन लागलीच ते मुलांस दूध पाजावयास लागत. आपण केवळ हुकमाचे धनी नसून, आपण स्वतः काम केलें पाहिजे अशी त्यांची भावना होती व त्याप्रमाणें ते आपलें आचरण ठेवीत असत.

## सामाजिक व धर्मसुधारणा.

रा. ब. लालशंकर ह्यांनीं आपल्या खटपटीनें गुजराथेंत अनेक पुनर्विवाह घडवून आणिले. अशा वेळीं त्या लोकांस ज्या ज्या अडचणी येत त्या दूर करण्यास हे स्वतः झटत. त्यांना आपल्या घरीं ठेवून घेत व पैशाचीही झीज सोशीत. त्यांना स्वतःला अपत्य नव्हतें. म्हणून त्यांच्या वडिलांनीं द्वितीय विवाह करण्याविषयीं त्यांना फार आग्रह केला. ही गोष्ट माझ्या हातून केव्हांही घडणार नाहीं असें त्यांनीं वडिलांस निक्षून सांगितलें, 'असें जर आहे तर माझ्या जवळ जें कांहीं आहे तें मी तुला देणार नाहीं' असें वडिलांनीं म्हणतांच, 'हरकत नाहीं, देवाच्या दयेनें व आपल्या आशिर्वादानें मला कांहीं कमी नाहीं. तेव्हां आपण मला कांहीं न देणें यांत वावगें कांहींच नाहीं' असें उत्तर दिलें व त्या म्हाताऱ्यानें आपल्या द्वितीयसंबंधाच्या मुलीस आपला सर्व ऐवज देऊन टाकला ! लाल शंकर ह्यांच्या तरुणपणीं अनेक सद्गृहस्थांच्या खटपटीस यश येऊन अहमदाबादेस स्त्रीशिक्षणाच्या प्रोत्साहनार्थ एक शाळा स्थापण्यांत आली. त्या वेळीं गुजराथेंत मुलींसही शाळेंत पाठवावयास कोणी तयार नसत. मग विवाहित स्त्रियांची गोष्टच नको. परंतु लोकांस उदाहरण घालून देण्यासाठीं त्यांनीं ह्या शाळेंत आपल्या तरुण पत्नीस पाठविलें व त्याचा इष्ट असाच परिणाम झाला. अहमदाबाद येथील प्रार्थनासमाजाची स्थापना व्हावयास ज्या गृहस्थांची खटपट कारण झाली, त्यांत रावबहादूर लालशंकर हे होते. प्रत्येक सभासदानें स्वयत्नानुसार दररोज प्रार्थना करावी असा जो ह्या समाजाचा नियम आहे तो त्यांनीं आमरण चालविला. रोज प्रार्थना व भजन केल्याशिवाय ते अन्नग्रहण करीत नसत. ज्या धार्मिक सुधारणेचें काम लालशंकरभाईस अत्यंत प्रिय होतें, व जी धार्मिक सुधारणा व जो धर्म सर्व सुधारणांचा पाया आहे असें ते वारंवार प्रतिपादीत त्या धर्माचें कार्य त्यांच्या हातून शेवटीं झालें. म्हणजे ता. १ मे हा दिवस अहमदाबाद प्रार्थनामंदिराचा वास्तूचा दिवस आहे. त्या दिवशीं त्यांनीं मंदिरांत शेवटची उपासना चालविली. ती चालवीत असतांनाच त्यांस मध्यें घेरी आल्यासारखें झालें व त्याच रात्रीं हवा पालट करण्यासाठीं ते डुमस येथें गेले. त्यानंतर ते घराबाहेर केव्हां पडले नाहींत. व अखेरीस शरीर कृश होत जाऊन अहमदाबाद येथें ता. १८ अक्टोबर १९१२ रोजीं त्यांचें देहावसान झालें.

## दुःखाचे प्रसंग.

त्यांना स्वतःचें संतान कांहीं नव्हतें असें वर सांगितलें आहेच. तथापि ते आपल्या धाकट्या भावाच्या मुलांस स्वतःच्या मुलांपेक्षांही प्रेमानें वागवीत. संसारांत असतांना त्यांजवर अनेक दुःखाचे प्रसंग आले. मृत्यूच्या आधीं कांहीं वर्षांपूर्वी त्यांची पुतणी वारली. हें दुःख ताजें असतांनाच तीसएक वर्षें वयाचा होतकरू पुतण्या परलोकीं गेला; त्यानंतर त्यांची स्वतःची पत्नी त्यांस सोडून गेली आणि अखेरीस ते स्वतः आजारी असतांना त्यांना विशेष प्रिय असलेली, हुशार, शहाणी, चांगली शिकलेली अनेक कलांत निपुण अशी त्यांची दुसरीही पुतणी वारली ! पण हे सर्व आघात त्यांनीं धैर्यानें सहन केले. जोंपर्यंत सामर्थ्य होतें तोंपर्यंत त्यांनीं आपल्या लोकसेवेच्या व्रतास खळ पडूं दिला नाहीं. शेवटच्या दुखण्यांत अंथरुणावर पडल्यापडल्याही अनेक गोष्टींसंबंधानें लोकांशीं बोलत व अखेरीस त्यांस ह्यापासून त्रास होत आहे असें पाहून डाक्टरांनीं ह्या गोष्टीस मनाई केली. त्यांच्यासारखा एकनिष्ठ व निःस्वार्थी लोकसेवक केवळ अहमदाबाद शहरांतच नव्हे तर सगळ्या गुजराथेंत अद्यापपर्यंत झालेला नाहीं असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं.

## चरित्रापासून बोध.

अलीकडे लोकसेवेसंबंधानें बराच गाजावाजा होत असतो. परंतु कोणत्याही प्रकारें गाजावाजा न करितां त्यांनीं लोकसेवेचें कंकण हातीं बांधलें व परमेश्वरावर पूर्ण निष्ठा ठेवून देवाचें कार्य देवाच्या हेतूप्रमाणें करावयास निघाल्यावर त्यास सामर्थ्य कसें प्राप्त होतें, त्यास यश कसें येत जातें व त्याचें सामर्थ्यही कसें वाढत जातें हा धडा पुढें ठेवण्यासाठीं हें चरित्र येथें दिलें आहे. ईश्वरास अंतःकरणांत जागृत ठेवून, शत्रुमित्रांस सम मानून, म्हणजे दोघांवरही दया व प्रेम करून, कामादि रिपूंस विवेकानें आधीन ठेवून, भूतदया बरोबर घेऊन वागणें हें खरें जीवन होय. असे जे उद्गार त्यांनीं एकदां काढले त्यास अनुरूप त्यांचें नित्य आचरण असे. त्याचप्रमाणें त्यांचा साधेपणा, मोठ्या हुद्यावर असतांना निस्पृहतेविषयींची त्यांची ख्याती; निस्पृह माणसें पुष्कळ वेळां लोकप्रिय नसतात; परंतु निःस्वार्थबुद्धीनें त्यांनीं केलेल्या लोकसेवेमुळें लोकांचें त्यांजवरील प्रेम, कर्तव्य म्हणून कार्य करण्याची हौस, दूरदर्शीपणा, निरभिमानता, बालभाव, सत्याविषयीं आदर, इतरांचें दुःख तें आपलें दुःख, इतरांच्या गरजा त्या आपल्या गरजा, इतरांवरील प्रसंग

ते आपल्यावरील प्रसंग असें समजून इतरांसाठीं खपण्याची त्यांची उत्सुकता, अंगावर घेतलेलें कार्य झीज सोसून मुकाट्यानें करण्याची हौस; सामाजिक व्यवस्थेंतील अन्याय, घातक रूढींमुळें होणारा ताप कमी करण्यासाठीं त्यांनीं सोसलेली झीज, धर्माचें शुद्ध सात्विक स्वरूप जनास सादर करण्याची त्यांची पद्धत, परमेश्वरावरील त्यांची अचल निष्ठा, त्यांचें प्रार्थनाशील वर्तन ह्या त्यांच्या चरित्रांतील गोष्टी आमच्या तरुणांस अत्यंत अनुकरणीय अशा आहेत.

सर नारायण चंदावरकरांनीं सोशल रिफारमर मधील लेखांत रा. ब. लालशंकर ह्यांच्या चरित्रापासून काय बोध होत आहे तो फार सुंदर रीतीनें पुढीलप्रमाणें वर्णिला आहेः—

Several lessons emerge from a life so devoted to good work. Lalshankar was always busy and found time for everything which appealed to his heart of reform. What he took in hand he did to the best of his power and did it thoroughly. Everyday meant to him no respite but hours of toil in philanthropic work; and for that he spared neither time nor money of his own. Failure, difficulties, want of co-operation and help, apathy on all sides, large promises and poor performance from those around, these never soared his temper or damned his heart; but he went on doing his part; ever smiling, cheerful and hopeful. Lalshankar was not a dreamer but a doer. The idealist and the realist—the man of thought and of action—combined in him. And so, he has gone to his rest ! I have had the privilege of his company and his inspiring conversation many a time and every time I learnt what a soul of spiritual strength Lalshankar was. That formed the root of his life and lifelong activity. It was his piety, faith in God

and His work–which inspired Lalshankar and gave zest to his manifold activities. His daily ***bhajans*** and prayers, his daily hours of meditation–from these he derived strength for his daily work. Prayer with him meant the outpouring of the heart to its God in the sweetness of solitude followed by action done, life led, duties discharged, services rendered to our fellows in harmony with God's will.

Yes, it was his life of piety, his trust in God, his active faith, that made him what he was–a devoted worker, who lived for and loved his fellows and helped all good and noble causes. It is such men who teach us the lesson of true and enduring patriotism. They form the real capital and wealth of the country.

सर नारायण चंदावरकरांनीं दुसऱ्या एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें:—

We are all born to be servants of one another, service is the secret and sinew of life. To serve one's family, one's country and humanity. That is what makes true happiness. We must lose ourselves in work that absorbs us, makes us forget our petty selves. And when that spirit of service grows upon us by the light of faith in God, it makes the world beautiful and lovely and life becomes a blessing, not a burden.

आजन्म जनसेवा करीत राहिलेल्या ह्या लोकसेवकाच्या चरित्रापासून आमचे तरुण धडा घेवोत व तो घेण्याची प्रेरणा परमेश्वर त्यांस करो व लालशंकरभाईंनीं जनसेवेचें घालून दिलेलें वळण वळविणारे तरुण ह्या देशांत पुष्कळ निपजोत अशी परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे.

---

## ( ११ ) सदाशिव पांडुरंग केळकर.

True, honest life,
Holy and simple; peace; a cheerful faith
In God; and nothing spent not purely earned.

—*Festus.*

आमचें जीवित क्षणभंगुर आहे असं आम्ही म्हणतों; साधुसंत आम्हांस हाच उपदेश करीत आहेत, हें आम्ही जाणतों; रोज शेंकडों माणसें मृत्युमुखीं पडत असलेलीं आम्ही पहातों; पण, त्याच्या योगें आमच्या ठिकाणीं व्हावी तशी जागृति होत नाहीं. शेजारीपाजारी, मित्र, साधारण जवळचा आप्त मृत्युमुखीं पडला म्हणजे त्या त्या व्यक्तीवर आपलें ज्या प्रमाणानें प्रेम असेल त्या प्रमाणानें मनाला हुरहुर लागते. परंतु ज्याच्याविषयीं आपल्या ठिकाणीं अत्यंत आदरबुद्धि, किंवा ज्या व्यक्तीचें व आपलें अगदीं निकटचें नातें, अशी एकादी व्यक्ति अल्पकालच्या आजारानें किंवा कांहीं आकस्मिक कारणानें मृत्युमुखीं पडली, कीं एकदम जागृति होते; आपल्या हानीची तत्क्षणीं कल्पना होते; आपलें जीवित इतकें क्षणभंगुर असून आपण कसे निर्धास्त व कर्तव्यविन्मुख असतों त्याची आपल्याला साक्ष पटते. व कांहीं काल तरी गत आयुष्याबद्दल खंति वाटल्यावांचून राहत नाहीं. असल्या प्रसंगाच्यायोग काळाचा व आपला किती निकट संबंध आहे तें लक्ष्यांत येतें व शेले कवीच्या

Death is here and death is there,
Death is busy every where,
All round, within, beneath,
Above is death and we are death.

ह्या उक्तीची सत्यता मनास पटते. रा. रा. सदाशिव पांडुरंग केळकर ह्यांचा ता. २० दिसेंबर १९०६ रोजीं या शहरीं जो बहुतेक आकस्मिक रीतीनें अंत झाला त्याची बातमी त्या वेळीं कानीं येतांच अशा प्रकारची पुष्कळांच्या मनाची स्थिति झाली. येथील प्रार्थना समाजाच्या ३९ व्या उत्सवासंबंधीं आपल्याकडे ठेवलेलीं सर्व कार्यें उरकून उत्सव संपल्यावर पंढरपूरच्या प्रदर्शनासाठीं सदाशिवराव गेले. त्या वेळींच त्यांची प्रकृति चांगलीशी नव्हती. व त्यांनीं प्रवासांत दगदगीचें काम

सध्यां करूं नये, असें त्यांच्या कुटुंबास वाटत होतें, तरी ते गेले, व निरनिराळ्या ठिकाणीं प्रवास करून ता. १० दिसेंबर १९०६ रोजीं परत आले. आल्यानंतर त्यांनीं आपल्या मित्रांच्या भेटी घेतल्या. आपल्या प्रवासांतील हकीकत अनेकांस सांगितली; पंढरपूरच्या मौजा विदित केल्या. पुढें थोड्या दिवसांनीं त्यांस ताप आला. पण, त्यांस मुख्य विकार मधुमेहाचा होता. तोच विकोपास गेला. त्यांचें सर्व रक्त दूषित झालें व गुरुवार ता. २० दिसेंबर रोजीं रात्रौ येथें डा. भाजेकरांच्या इस्पितळांत त्यांचें प्राणोत्क्रमण झालें. ते आजारी असून अत्यवस्थ असल्याचें फारच थोड्या लोकांस माहीत होतें. त्यामुळें त्यांच्या दर्शनाचा लाभ झाला नाहीं; त्यांची अल्पही सेवा आपल्या हातून झाली नाहीं याबद्दल पुष्कळांस अत्यंत हळहळ वाटली, व सदाशिवराव आपणास एकाएकीं टाकून गेले हें पाहून त्यांची खरी योग्यता जाणणारांस अतिशयच खेद झाला.

सदाशिवरावांच्या एकंदर चरित्रासंबंधानें विचार करूं लागलें म्हणजे मन अगदीं अस्वस्थ होतें. इतका बुद्धिमान पुरुष, इतका कर्ता, इतका करारी, इतका धर्मनिष्ठ, इतका सत्त्वशील, पण एकंदर समाजाला त्यांचा व्हावा तसा फायदा झाला नाहीं. ऐहिकदृष्ट्या त्यांनींही आपलें हित साधलें नाहीं; मात्र सदोदित आपल्या मनाला जें योग्य दिसलें व आपल्या देवाला जें प्रिय असें त्यांच्या विवेकानें त्यांस सांगितलें तें अडचणींचा विचार न करितां आचरणांत आणण्यासाठीं ते सतत, अगदीं अखेरपर्यंत झटले आणि ह्यांत त्यांस पूर्ण यश आलें, आणि यांतच त्यांचें खरें थोरपण आहे हें त्यांच्या पुढील अल्प चरित्रावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल.

रा. सदाशिवराव पुणें जिल्ह्यांत खेड तालुक्यांत चाकण गांवीं सन १८४८ सालीं जन्म पावले. पांडुरंगपंतांचे चुलते हरदास होते व त्यांच्या पाठीमागें हे उभे राहण्यास असत. त्यांच्या बरोबर हे कोकणांतून पुण्यास आले, परंतु त्यांच्याबरोबर परत न जातां पुण्यासच राहिले. तेथें राहून हळुहळु पेशव्यांच्या वाड्यांतील एका कारकुनाची जागा त्यांनीं मिळविली. त्या जागेवर असतांना, त्यांची हुषारी पाहून चाकणच्या मुझुमदार नांवाच्या साधारण श्रीमंत गृहस्थांनीं त्यांस आपल्याकडे नोकरीस बोलाविलें, तेव्हां ते पुण्याहून चाकणास गेले. तेथें त्यांच्या घरचा कारभार पहात असतांना त्यांनीं स्वतःची थोडथोडी शेती करण्यास सुरवात केली. नंतर कांहीं दिवसांनीं त्या गांवची मोजणी त्यांच्याच

देखरेखीखालीं होऊन त्या वेळचे कुळकर्णी अक्षरशून्य असल्यामुळें १२ वर्षेंपर्यंत कुळकर्णीपण ह्यांनीं चालविलें. आणि गांवांत सर्व कामांत पुढारी झाले. यांनीं बऱ्याच प्रौढ वयांत लग्न केलें. त्यांची बायको नाशीक येथील प्रसिद्ध फडके घराण्यांतील होती. या दंपत्यास बरींच मुलें झालीं. त्यांपैकीं सदाशिव व वामन हे दोघे भाऊ व एक बहीण, हीं लहान असतांच मातुश्री वारली. आई वारल्याबरोबर तिघां मुलांस मावशीकडे पाठविलें होतें; परंतु मुलांच्या मुंजी झाल्यावर त्यांस शाळेंत घालण्यास चाकणेस आणिलें, व वडिलांनीं स्वतः स्वयंपाक वगैरे सर्व कामें करून त्यांचें शिक्षण पुरें केलें.

दोघांचीं लग्नें करून दिल्यावर त्यांना इंग्रजी शिकण्याकरितां पुण्यास पाठविलें. दोघांपैकीं सदाशिवराव फार बुद्धिवान असल्यामुळें त्यांनीं सर्वच विषयांत पण विशेषेंकरून गणितांत चांगला लौकिक मिळविला. लहानपणीं स्वभाव फार हूड असल्यामुळें त्यांना बंड्या हें आवडतें नांव मिळालें होतें. पुण्यांत डोलकर आळींत मावशीच्या वाड्यांत राहून बाबा गोखल्यांच्या शाळेंत इंग्रजी मॅट्रिक्युलेशन पर्यंत त्यांनीं अभ्यास केला. सदाशिवरावांचें प्रथम कुटुंब दुसऱ्या प्रसूतीच्या वेळीं निवर्तलें. पहिला मुलगा आधींच वारला होता, व दुसरें मूल तीन महिन्यानंतर गेलें. बायको मरून १५ दिवस होतात तोंच त्यांच्या मावशीनें दुसऱ्या लग्नाची तयारी केली होती, परंतु त्यांच्या कबुलीवर सर्व अवलंबून होतें, व त्यांनीं तर विवाह करणें साफ नाकारलें. त्याच सुमारास नवरी मुलगी आजारी आहे असाही निरोप आल्यामुळें लग्नाचा कांहींच प्रश्न राहिला नाहीं. सदाशिवराव पुण्याहून सन १८७० सालीं मुंबईस म्याट्रिक्युलेशनची परीक्षा देण्यासाठीं येथें आले. ते परीक्षेला बसले. परंतु त्यांची परीक्षा उतरली नाहीं.

हा काल आपल्या महाराष्ट्रांत मोठ्या चळवळीचा होता. सामाजिक, राजकीय, धार्मिक चळवळी आपल्या प्रांतीं नुकत्याच सुरू झाल्या होत्या. १८६९ सालीं मुंबई शहरांत कोकणस्थ ब्राह्मण ज्ञातींत पहिला पुनर्विवाह झाला होता. १८७० सालीं कपोल वाणी जातींतील दोन प्रसिद्ध कुटुंबांत पुनर्विवाहाचा योग घडून आला होता. १८७१ सालीं रा. रा. गंगाधरपंत गद्रे यांचा श्री. दुर्गाबाई यांजशीं पुनर्विवाह झाला. सदाशिवराव परीक्षेस आले ते येथेंच कांहीं दिवस राहिल्यामुळें त्यांनीं या नूतन दंपत्याची गांठ घेतली व त्या वेळापासून ह्या दोन कुटुंबांचा परस्पर अति निकट संबंध जडला.

## सदाशिवराव व स्वदेशी चळवळ.

आम्हीं वर म्हटलेंच आहे कीं, महाराष्ट्रांत हा काळ फार चळवळीचा होता. सदाशिवराव पुण्यास असतांना आपल्या सभोंवार काय चाललें आहे तें नीट लक्ष लावून पहात असत. त्यामुळें आपल्या प्रांतीं कोणकोणत्या चळवळी चालल्या आहेत हें त्यांस कळत असे. एवढेंच नव्हे, तर ह्या चळवळी संबंधानें आपलें स्वतःचें काय कर्तव्य आहे ह्याचा ते विचार करून काय तें करीत असत. आजच्या तरुणांस आपल्या सभोंवार काय चाललें आहे तें कळत नाहीं असें नाहीं; पण, ज्यावेळीं स्वार्थत्यागाचा प्रश्न येतो, स्वतः छळ सोसण्याची वेळ येते, त्या वेळीं आमच्या तरुणांस आपण स्वतः कांहीं केलें पाहिजे असें वाटत नाहीं. पण, सदाशिवरावांची विवेकबुद्धि तरुणपणापासून विशेष जागृत होती. आणि अखेरपर्यंत आपल्या स्वतःच्या विवेकास जें पटेल, व जें आपलें कर्तव्य होय अशी आपल्या मनाची खात्री होईल, तें निःशंकपणें, लोकांच्या टीकेचा विचार मनांत न आणतां, कर्तव्यबुद्धीनें करावयाचें हा जो त्यांचा मोठा गुण, ज्याच्यामुळें ते सर्वांच्या आदरास पात्र झाले तो गुण, त्यांच्यांत त्यांच्या भर तारुण्यांतही विशेष रीतीनें दिसत होता. आज आमच्या देशांतील स्वदेशी चळवळीस निराळेंच स्वरूप प्राप्त झालें आहे. आज ह्या चळवळींत मन घालणारांचें गौरव होत आहे. त्यावेळीं उलट प्रकार असे. तरीपण ते ह्या चळवळींत सामील झाले. त्याची हकीकत त्यांनीं आपल्या शेवटच्या प्रवासांत नगर येथें सांगितली. सदाशिवरावांचें हें व्याख्यान शेवटचेंच झालें व तें त्यांच्या मृत्युलेखाबरोबरच प्रसिद्ध झालें. त्या व्याख्यानांत त्यांनीं पुढें दिलेले विचार प्रदर्शित केले:—

पुष्कळ लोकांचा असा समज आहे कीं आपले देशांत स्वदेशी चळवळ या एकदोन वर्षांतच सुरू झाली; पण निदान महाराष्ट्रांततरी ती बरीच जुनी आहे. तिचे पहिले पुरस्कर्ते पुण्यांत रहाणारे शंकरशास्त्री गोखले व भाऊ वाडेकर हे दोन गृहस्थ होत. यांपैकीं शास्त्रीबावांचा असा दृढ समज होता कीं आपले देशांतील उद्योगधंदे शिकलेल्या लोकांनीं हातीं धरल्याशिवाय सुधारणार नाहींत. या गृहस्थांनीं पुष्कळ खटपट करून आपलेकडील उद्योगधंद्याची माहिती पूर्णपणें करून घेतली व ती सर्व माहिती त्यांनीं सन १८४६ मध्यें विश्रामबागेंत एक शिळाप्रेस होता त्यामध्यें पुस्तकरूपानें छापवून प्रसिद्ध केली. शिवाय हे दोन्ही गृहस्थ आपले घरीं माग चालवून देशी कापड काढीत असत. त्यानंतर पुण्यामध्यें

काका जोशी व रा. ब. गवंडे यांनीं ही चळवळ फिरून सुरू केली. सन १८७१ सालीं मकरसंक्रांतीचे दिवशीं या दोन गृहस्थांनीं सर्व पोषाख जाड्याभरड्या कापडाचा केला; व बाहेर तिळगूळ वांटण्यास गेले. असें करण्यांत त्यांचे दोन हेतु होते. पहिला असा कीं सणावारीं असा पोषाख केला असतां त्याचा परिणाम सर्व लोकांवर चांगला होईल; व दुसरा हा होता कीं असा साधा पोषाख करून दोन पैसे वांचवून ते हातीं घेतलेल्या कार्याकडे लावावयास सांपडतील. या दोन गृहस्थांची त्या वेळीं लोकांनीं जराशी टवाळी केली, व कांहीं अर्थशास्त्रवेत्ते असे आक्षेप आणूं लागले कीं देशी कापड जर चांगलें निघत नाहीं तर तें विलायती कापडाइतके पैसे खर्च करून घेणें वाजवी नाहीं. या आक्षेपास उत्तर रा. ब. रानडे यांनीं व्यापारोत्तेजक सभेमार्फत झालेल्या दोन व्याख्यानांपैकीं एका व्याख्यानांत दिलें. त्यांत त्यांनीं असें सांगितलें कीं, आपलेकडे नवीन कारखान्यांतून जो माल निघेल तो चांगला नसला तरी खरेदी केला पाहिजे. येवढ्याकरितांच कीं कारखानदाराला उत्तेजन येऊन त्यानें आपले कारखान्यांत सुधारणा करावी व चांगला माल काढावा; पण कांहीं दिवस अशा तऱ्हेनें मदत मिळाल्यावर जर कारखानदाराच्या मालांत सुधारणा न दिसून येईल तर अशा लबाड मनुष्याचा माल खरेदी करणें बरोबर नाहीं. काका जोशी यांनीं स्वदेशीचळवळीबद्दल फार खटपट केली व तसें कापड काढण्याकरितां आपले घरीं माग चालू केले आहेत. आमच्या सारखी इंग्रजी शिकलेली मंडळी गिरणींतील काम शिकण्यास केवळ त्यांच्या खटपटीमुळें गेली. त्यावेळीं मुंबईमध्यें ज्या गिरण्या होत्या त्यांचे मुख्य कामगार युरोपियन असत; तेव्हां काका जोशी यांनीं शेट मुरारजी गोकुळदास यांस असा प्रश्न केला कीं परके लोक तुम्ही कां नेमतां? त्यास त्यांनीं उत्तर दिलें कीं आपले लोक मिळाल्यास आम्ही नेमूं. त्यावरून जोशी यांनीं आम्हांस सांगितलें व गिरणींत कोणत्या अटींवर आम्हीं काय काम करावें याचा मसुदा न्या. रानडे यांनीं आम्हांस तयार करून दिला. त्यानंतर वाढत वाढत जाऊन स्वदेशी चळवळ सध्यां बरीच जारीनें चालू आहे. त्यावेळेची स्थिति व सध्यांची स्थिति यांमध्यें फार अंतर आहे. त्यावेळेस जोशी यांचा उपहास झाला तसा सध्यां होणें अशक्य आहे; पण त्यावेळेचे पुढारी विवेकी व सच्चे होते म्हणून शक्याशक्यतेविषयीं विचार न करितां त्यांनीं बहिष्कारासारखे प्रकार सुरू करण्याविषयीं लोकांस उपदेश केला नाहीं. सध्यांचे बहिष्कारयोगी परदेशीकागदावर परदेशी शाईनें व परदेशी यंत्रांवर वर्तमानपत्रें

छापवून बहिष्काराबद्दल लांब लांब लेख लिहीत आहेत. मागें बेळगांवास ना. खरें यांचें व्याख्यान झालें त्यांत त्यांनीं बहिष्कार घालण्याबद्दल उपदेश केला. व शेवटीं बहिष्कार घालतां येण्यासारख्या जिनसांची याद दिली आहे! हा बहिष्कार कसा होतो हें समजत नाहीं. मागल्या काळचे पुढारी होतां होईल तों स्वदेशी माल वापरा म्हणून उपदेश करीत होते; त्यापेक्षां यांत जास्त काय आहे हेंही समजत नाहीं. स्वदेशी चळवळीस सिद्धी कशी मिळेल याचा विचार करितां आपल्या असें ध्यानांत येईल कीं, आपले लोकांत व्यापारधंद्यासंबंधीं व्यवहाराचें अज्ञान फार आहे, व शिवाय सचोटीही कमी. त्यामुळें पुष्कळ कारखाने व मंडळ्या बुडून गेल्या. शिवाय उत्साहानें व कसून काम करणेंही आपलेकडे कमीच. तेव्हां पहिल्यानें उद्योगधंद्याविषयीं चांगली माहिती झाली पाहिजे. व्यक्ति जेव्हां सच्छील होतात तेव्हांच राष्ट्रास चांगला काल येतो. व व्यक्ती सच्छील होण्यास त्यांस धर्माचें ज्ञान झालें पाहिजे. परमेश्वरसाक्ष आपण प्रत्येक गोष्ट करित आहों हें त्यांच्या मनावर बिंबलें पाहिजे. असें झालें म्हणजे व्यक्ति चांगल्या होतील व एकंदर राष्ट्राचेंही कल्याण होईल. नाहींतर स्वदेशीबद्दल **सोदेशाई** माजेल.

त्यावेळीं सदाशिवराव ह्या स्वदेशी चळवळींत न पडतां, नोकरींत शिरले असते, तर खात्रीनें मोठ्या हुद्यापर्यंत चढले असते. परंतु काका जोशी यांचा उपदेश त्यांच्या मनांत इतका ठसला कीं, ते मोठ्या पगाराच्या नोकरीच्या लोभास बिलकुल वश झाले नाहींत; एवढेंच नव्हे, तर अगदीं गरिबीचा स्वीकार करून, परळ येथील शेट मुरारजी गोकुळदास यांच्या गिरणींत राहून कापड विणण्याचें काम शिकण्यास त्यांनीं प्रारंभ केला. त्या कामांत ते पूर्णपणें गढून गेले; व त्यांस त्यांत पूर्ण यश आलें. आणि ते एक उत्तम वीव्हिंग मास्तर असें ठरलें. त्यांनीं ह्या नात्यानें अनेक ठिकाणीं नोकरी केली; सर्वत्र त्यांच्या कामाबद्दल त्यांची स्तुति झाली. मात्र त्यांची सचाई, त्यांचा स्पष्टवक्तेपणा हा त्यांस वारंवार नडे, आणि त्यामुळें एकाच गिरणींत ते फार वर्षें टिकले नाहींत. तरी पण, अगदीं अखेरपर्यंत त्यांचें मन ह्या चळवळींत होतें. विणकरांच्या काय अडचणी आहेत, त्या त्यांनीं पूर्णपणें जाणून घेतल्या होत्या. कापडाला खळ लावण्याचें एक यंत्र त्यांनीं स्वतः तयार केलें. परंतु भांडवलाच्या अभावीं त्यांचा निरुपाय झाला. पॅरिसच्या प्रदर्शनाच्या वेळीं प्रदर्शन पाहून आपल्याला साह्य होईल, हातीं घेतलेल्या कार्यांत मदत होईल, व येथें परत आल्यावर नव्या कारखान्यास लोकांकडून साह्य होईल,

ह्या आशेनें ते गेले; विलायतेंत त्यांनीं कांहीं यंत्रें शेट दादाभाई यांजजवळून उसनवारी पैसे घेऊन खरेदी केलीं, येथें आल्यावर त्यांनीं शक्य ती खटपट केली; पुष्कळांनीं आशा दाखविल्या; वचनें दिलीं, अखेरीस अशा आशेच्या व वचनबद्ध स्थितींत असतांनाच त्यांचा अंत झाला; आणि तीं यंत्रें मातीच्या मोलानें विकण्याचा प्रसंग नंतर आला. सदाशिवरावांना स्वदेशी चळवळीसंबंधानें आलेले अनुभव त्यांच्या नेहमीं लक्षांत असत, आज जी चळवळ सुरू झाली आहे तिचें धोरण असावें तसें नाहीं हें त्यांच्या अनुभवास आल्यावर मुद्दाम जागृतीसाठीं व खरी स्वदेशी चळवळ म्हणजे काय हें लोकांस कळावें म्हणून १९०६ सालच्या आमच्या समाजाच्या उत्सवांत त्यांनीं **स्वदेशी चळवळीची व्याप्ति व ती फलद्रुप होण्याचे उपाय** ह्या विषयावर **धर्मपर व्याख्यान** देऊन आपल्या देशबांधवांस जणूं काय अखेरचा निरोप सांगितला. कारण, मुंबईस दिलेलें हेंच त्याचें शेवटचें धर्मपर व्याख्यान होतें. ह्या नंतर ते प्रवासास गेल्याचें वर आलें आहे. ह्या व्याख्यानांतील त्यांचा उपदेश आम्ही सतत दृष्टींपुढें ठेवण्यासारखा आहे. ते म्हणाले:—स्वदेशी वस्तु लोकांनीं वापराव्या; किंवा अशाच कांहीं दुसऱ्या गोष्टी कराव्या, एवढयानें स्वदेशी चळवळीचा प्रांत संपला असें मानणें बरोबर होणार नाहीं. मनुष्याचें मनुष्यपण कायम राहील अशा दृष्टीनें जितके व्यवहार त्यास करावे लागतात तितके सर्व उन्नत स्वरूप पावतील असा प्रत्येकाचा यत्न असला पाहिजे. आपल्या आयुष्यांतील सर्व आवश्यक गोष्टींचा ज्यांत समावेश होईल तो माझा स्वदेश व त्या सर्व प्रदेशाचें हित होईल अशी चळवळ प्रत्येकानें केली पाहिजे. सध्याच्या चळवळीचा उद्देश देशी वस्तु वापरणें व परदेशीचा त्याग करणें, तसेच नवे कारखाने काढणें एवढयापुरताच बहुतेक लोक समजतात. पण देशांतील द्रव्य बाहेर जाऊं दिलें नाहीं म्हणजे तेवढयानें देश सुखी होईल ही कल्पना चुकीची आहे. नुसत्या द्रव्यानें लोक सुखी होते, तर आज सर्व श्रीमान लोक सुखी असावयास पाहिजे होते. पण खरोखर स्थिति पाहिली तर श्रीमान लोक सुखी दिसतात तसे ते खरोखर नसतात. अंतःकरणास शांति असणें हें जें सुखाचें साधन तें नुसत्या द्रव्यानें प्राप्त होत नाहीं. ही शांति मनुष्याचें आचरण धर्मास व नीतीस अनुसरून असेल तरच प्राप्त होते. या साधनांच्या द्वारें गरीब स्थितींतील लोकही सुखी असतात. तेव्हां खरे स्वदेशी अनेक दुर्गुण आज लोकांत पसरलेले आहेत त्यांस घालवून स्वदेशी सद्गुणांची वाढ होईल असा यत्न व्हावयास पाहिजे. परदेशी मालास बहिष्कार घालण्यानें काम भागा-

वयाचें नाहीं. परदेशी दुर्गुण देशांत पसरत आहेत त्यांस प्रथम बहिष्कार घातला पाहिजे. कित्येक परदेशी सद्गुणही आम्हीं अवश्य घ्यावयास पाहिजेत. यांत्रिक व इतर बाबींत परदेशांत नित्य नवे नवे शोध होत आहेत ते आम्हांस घ्यावयास पाहिजेत. तसेंच परोपकारार्थ अनेक तऱ्हेचे उद्योग करणें, स्वार्थाला एका बाजूस सारून देणें व आपला देह व प्राण अशा कामीं खर्च करणें इत्यादि गुण जे आम्ही परदेशी लोकांत पहातों, ते आम्ही आमच्यांत वाढवावयास नकोत काय ? परोपकारार्थ केवढाल्या मोठाल्या रकमा परदेशांतील धनिक लोक देतांना आम्ही पहातों. दुसऱ्याच्या दुःखनिवारणार्थ आपले जीव धोक्यांत घालून निस्सीम भक्तीनें यत्न करणाऱ्या साधूंचीं चरित्रें आम्ही वाचतों. अशीं माणसें आमच्यांत व्हावयास नकोत काय ? आमच्या इकडे स्वार्थाचेंच सर्वत्र राज्य पसरलेलें दिसतें. दुसऱ्याचें म्हणणें काय आहे तेंही ऐकून घेण्याइतकी उदारता आमच्यांत नाहीं. त्यांनीं सर्व देशास सुखी करावयास जाणें म्हणजे लहान तोंडीं मोठा घास घेण्याप्रमाणेंच आहे. देशाचें हित साधणें तें कोणत्या तरी एक किंवा दुसऱ्या गोष्टीकडे लक्ष्य पुरवून साधावयाचें नाहीं. राजकीय, सामाजिक, औद्योगिक, धार्मिक, अशा सर्वच गोष्टींकडे आमचें सारखें लक्ष्य लागलें पाहिजे. आमच्या स्वदेशी चळवळींत स्वदेशांतीलच जीं लाखों माणसें आमच्याच हयगयीनें दुःखें भोगीत आहेत त्यांजविषयीं एक शब्द तरी ऐकूं येतो काय ? आमच्या सर्व स्त्रीवर्गाची आज काय स्थिति आहे, मागसलेल्या व नीच मानिलेल्या जातींची काय दशा आहे, याचा कधीं कोणी विचार करतो काय ? द्रव्य व राजकीय सत्ता यांजकडेच ज्याचें त्याचें लक्ष्य; पण या गोष्टी तरी प्राप्त होण्याचीं खरीं साधनें काय याचा कोणी विचार करीत नाहीं. हल्लींच्या स्वदेशी चळवळींत स्वदेशी लोक लोकांस कसे फसवून नाडीत आहेत याचें बीज काय व तें कसें नाहींसें होईल याचा कोणासही विचार करावासें वाटत नाहीं. हे दोष परदेशांत मुळींच नाहींत असें म्हणणें नाहीं, पण तिकडे ह्या गोष्टींचाही विचार चाललेलाच असतो. धर्माचा, नीतीचा, ज्ञानाचा प्रसार करण्याकडेही त्यांचे अखंड प्रयत्न चालले आहेत, त्यांकडे लोक डोळेझांक करीत नाहींत. आमचे विवेकानंद व अभेदानंद अमेरिकन लोकांना द्रव्यप्राप्तीचा मार्ग शिकवावयास गेले नव्हते, पण त्यांचाही तिकडे आदर झाला तो कशाला ? आमच्या इकडे धर्माचें ढोंग मात्र माजविण्यास यत्न होत आहे. धर्मभोळेपणा व अज्ञान यांच्याच पायावर मुळीं धर्मबुद्धीची इमारत उभारण्यांत येत आहे. ह्या प्रार्थना समाजासारख्या ज्या धर्मप्रवृत्तीच्या संस्था

आहेत त्यांच्याकडे एकंदर जनसमूहाचें किती लक्ष्य आहे हें आपण पहातों आहों. तात्पर्य सर्व स्वदेशी व परदेशी सद्गुण यांचा स्वीकार करण्याकरितां अखंड यत्न करणें हीच खरी स्वदेशी चळवळ होय.

## विधवाविवाहाची चळवळ व सदाशिवराव.

सदाशिवरावांचें पहिलें कुटुंब निवर्तल्यानंतर त्यांच्या दुसऱ्या लग्नाचा बहुतेक घाट कसा जमला होता, व अनायासेंच त्यावेळीं तो प्रसंग टळला, याची हकीकत वर आलीच आहे. त्याच वेळीं त्या मुलीशीं लग्न करण्याचा त्यांचा विचार नव्हता; याचें कारण असें कीं त्या कामीं महाराष्ट्रांत विधवाविवाहाच्या चळवळीस थोडेंसें दृश्य स्वरूप येत होतें. विष्णुशास्त्री पंडितांच्या खटपटीनें १८६९ सालीं रा. रा. **पांडुरंग विनायक करमरकर** यांचा श्री. **वेणूताई** यांच्याशीं मोठ्या थाटानें विवाह झाला होता. सदाशिवरावांचाही या वेळीं निश्चयच झाला होता कीं, विधवाविवाहासंबंधाची आपली सहानुभूति केवळ शब्दरूपानें दिसण्यांत अर्थ नाहीं. या कार्यास जर यश यावयास पाहिजे, तर ज्यांस ही गोष्ट आजच्या समाजस्थितीकडे पहातां आवश्यक वाटते त्यांनीं प्रसंग येतांच आपली सहानुभूति कृतीच्या रूपानें दाखविली पाहिजे. आपल्या एका लेखांत ते म्हणतातः—

'नुसतें ज्ञान झालें, व त्याप्रमाणें क्रिया झाली नाहीं, तर त्या शुष्क ज्ञानाचा काय उपयोग ? क्रियेच्या संबंधानें पहातां प्रस्तुत स्थिति असावी तशी नाहीं. ज्यांनीं ज्ञानाप्रमाणें क्रिया करणें अशी अपेक्षा धरणें योग्य आहे, त्यांपैकीं बहुतेकांचें वर्तन उलट दिसतें. प्रत्येक जण दुसऱ्यास दोष देण्यास तयार असतो. पण स्वतःच्या जबाबदारीचा विचार करीत नाहीं. जनरीतीच्या उलट आचरण करणारास, तें आचरण वस्तुतः कितीही शुद्ध असलें तरी, थोडा फार त्रास सोसावा लागतोच. हा त्रास सोसण्यास तयार होणारीं फारच थोडीं माणसें आढळतात. जो तो आपल्या स्वतःच्या सोयीकडे पहातो. पण ही आपली दुर्बलता कबूल करून स्वस्थ बसणेंही कित्येकांस खपत नाहीं. आपण जसे काय सर्वथा दोषमुक्त असून सर्व दोष दुसऱ्याच मंडळीचा आहे असें हें दाखवीत असतात. ' अमुक एका पुढारी गृहस्थानें प्रसंगानुरूप आपलें कर्तव्य बजाविलें नाहीं यामुळें ह्या कार्याचा सगळा घात झाला ' असें म्हणणारे आज शेंकडो लोक आढळतात. परंतु आपल्या स्वतःवर कांहीं जबाबदारी आहे किंवा नाहीं हा विचार करणारे, व " **दुसरे कांहीं करोत, आपण आपल्या कर्त-**

ध्यास जागणार" असें म्हणणारे लोक फार क्वचित आढळतात...प्रत्येक मनुष्य जर आपल्या मनुष्यपणाची किंमत ओळखील व दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाण्याचें सोडून देऊन आपल्या कर्तव्यास जागेल, तरच कोणत्याही सुधारणेचें पाऊल पुढें पडेल.'

असा हा आपल्या लोकांसंबंधानें त्यांस अनुभवच असल्यामुळें एखाद्या गतभर्तृकेसच मुक्त करावयाचें असा त्यांचा निर्धार झाला. पुनर्विवाहाच्या चळवळीचा इतिहास ज्यांस माहित आहे त्यांस हें अवगत आहेच कीं, शंकराचार्यांकडे पुनर्विवाहाच्या सशास्त्रतेसंबंधानें निकाल देण्याचें प्रकरण गेल्यावर महाराष्ट्रांत बराच गोंधळ उडाला. अनेक प्रमुख व्यक्तींना प्रायश्चित्त घेऊन पावन व्हावें लागलें होतें. 'एकजण अद्वैतवादी होऊन द्रव्यार्जनाशिवाय त्यांनीं सर्व विचार सोडले' होते; "तुम्ही प्रायश्चित्त घेऊन शुद्ध व्हा. नाहींतर तुमच्या मुलीस मी घरांत घेणार नाहीं, व मुलाचें दुसरें लग्न करितें. दुसरी मुलगी तयार आहे." अशी धमकी मुलीच्या सासूकडून मिळतांच रा. ब. गोपाळराव हरि देशमुख प्रायश्चित्त घेऊन पावन झाले होते. प्रायश्चित्त न घेतां राहिलेल्यांपैकीं रा. ब. रानडे विधवाविवाहास साह्य करण्यास नेहमीं तत्पर असत. त्यांच्यासंबंधानें सदाशिवराव म्हणतात:—"रा. ब. रानडे आज ह्या कार्यास साहाय्य करण्यास राहिले आहेत. यांजवर या कार्यास फार उत्तम रीतीनें साहाय्य करण्याचा प्रसंग ईश्वरेच्छेनें आला होता; पण तो जरी त्यांनीं दवडला, व ह्यामुळें हे अनेक लोकांकडून उलट टीका करून घ्यावयास पात्र झाले, व ह्यांच्या ह्या कृत्यामुळें ह्या कार्यास बराच मोठा धक्का बसला, तरी मूळापासून तों आजपर्यंत यांचा ह्या कामीं उद्योग सतत चालू आहे. कोणास विवाह कर्तव्य झाल्यास आज साहाय्य मागण्यास प्रसिद्ध असें हेंच एक स्थल आहे" असे ह्यांचे विचार असल्यामुळें रा. ब. रानडे ह्यांच्या साह्यानें सन १८७८ सालीं सदाशिवरावांनीं एका गतभर्तृकेशीं विवाह लाविला. ह्या विवाहाच्या संबंधानें सदाशिवरावांच्या एका जुन्या मित्रानें पुढील व फार लोकांस माहित नसलेली हकीकत लिहिली आहे:—

सदाशिवराव विधुर झाल्याचें वर लिहिलेंच आहे. त्यानंतर बरींच वर्षें त्याच स्थितींत राहून मग मुंबई मुक्कामीं दक्षिणेंतील मोठ्या दुष्काळानंतर एक दोन वर्षांनीं मिरज येथील सीतारामपंत अक्षरकर यांची गतभर्तृका कन्या दुर्गाबाई हिजशीं त्यांनीं पुनर्विवाह केला. या वेळीं दुर्गाबाई फार तरुण म्हणजे सुमारें १६ वर्षांच्या

होत्या. यांचे वडील व दोघे चुलते ह्या तिघांमध्यें दोन मुलें म्हणजे दुर्गा व तिचा भाऊ रघुनाथ. या दोघांची माता ही अगदीं तरुणवयांत विधवा झालेली. आणि ह्या आवडत्या लहान सुंदर मुलीवर वैधव्याचा दुःसह घाला पडल्यामुळें त्या विधवा आईला किती दुःख झालें असावें याची वाचकांनीं कल्पना करावी. दुर्गा तासगांवीं आपले आजोळीं, गर्गे ह्या नांवाचे यजुर्वेदी ब्राह्मण यांचे घरीं रहात असतां त्याच गांवीं आप्पाराव वैद्य ह्या नांवाचे पुनर्विवाहाचे कैवारी रहात असत. त्यांनीं ही १० व्या वर्षी विवाहित व १२ व्या वर्षी विधवा झालेली मुलगी पाहिली व तीही आपल्या तरुण विधवा आईची मुलगी. तेव्हां आप्पारावांचें मन तिच्याविषयीं फारच द्रवलें आणि ते तिला आपल्या लेंकीसारखे समजत. त्यांनीं तीस शाळेंत घातलें व स्वतांही थोडथोडें शिकवूं लागले. आप्पांनीं मुलीच्या आजाचें मन वळविलें होतें, पण आजी कदाचित् मोडता घालील म्हणून ती एक वर्षी पंढरपुरास यात्रेस गेली असतां आजोबा रा. त्रिंबकराव गर्गे यांनीं आप्पाबरोबर मुलीस पुण्यास पाठविलें व न्या. मू. रानडे यांच्या मध्यस्थीनें लग्न झालें. कन्यादानही त्यांनींच केलें. दुर्गाबाईचें वय १४ च्या वर असल्यामुळें तो विवाह कायदेशीर होतो असें पाहून व सदाशिवराव बऱ्याच वर्षांपासून उमेदवार आहेत असें ठाऊक होतें म्हणून उभयतांच्या संमतीनें हा विवाहाचा योग सन १८७८ सालीं मुंबईंतच घडून आला; त्यासाठीं हा लेखक सुरतेहून मुद्दाम मुंबईस आला होता. जनरूढीनें वैधव्य पावलेली सकेशा, सालंकृता अशी अगदीं तरुणावस्थेंत येऊन पोंचलेली सुंदर दुर्गा त्यानें स्वयंवरास तयार असलेली पाहिली, तेव्हां त्याला जो आनंद झाला तो काय सांगावा!

आपली कन्या दुर्गा इचा पुनर्विवाह मुंबईस झाला ही गोष्ट तिच्या आईला व इतर आप्तांना मिरजेस व तासगांवास वर्तमानपत्रांवरून कळली. तेव्हां त्यांनीं फारच हलकल्लोळ करून रडारड केली. बालविधवांसही पुनर्विवाहाची बंदी करण्याची रूढी त्रिंबकरावांस अनुभवाअंतीं अति कठोर भासूं लागली व कसेंही करून आपल्या विधवा नातीचें बरें व्हावें असें त्यांस वाटूं लागलें होतें. याच सुमारास आप्पाराव वैद्यांनीं त्यांस पुनर्विवाहाच्या चळवळीची हकीकत सांगून त्यांची कबुली असल्यास त्यांच्या नातीविषयीं खटपट करण्याचें कबूल केलें. म्हणून वर म्हटल्याप्रमाणें योग्य संधि साधून त्रिंबकरावांनीं दुर्गाबाईस त्यांच्या बरोबर पाठविलें. तिचा विवाह झाला हें ऐकून त्यांस बरेंच वाटलें. कांहीं वर्षे लोटल्यावर आई व भाऊ सोलापूरमुक्कामीं सदाशिवरावांच्या घरीं येऊन राहिलीं.

पुढें सदाशिवरावांच्या चांगुलपणाचा ठसा सासूबाईवर इतका वठला कीं त्यांनीं मरेपर्यंत आपल्या प्रिय दुर्गेच्या घरीं राहून तीस सर्व बाबतींत उत्तम रीतीनें साहाय्य केलें. आणि सदाशिवरावांच्या मृत्युपूर्वी इंदूर मुक्कामीं प्लेगनें त्या मरण पावल्या. इतकेंच नाहीं तर अगदीं वृद्ध झालेले यांच्या सासूबाईचे आईबाप त्यांजपाशीं येऊन पुष्कळ वर्षें राहून शेवटीं मरण पावले. म्हणून सदाशिवरावांच्या आप्तांनीं जरी त्यांना सोडलें तरी उमाबाईच्या आप्तांनीं त्यांच्या जवळ राहून पुनर्विवाह पक्षाशीं व एकंदर सुधारणा पक्षाशीं आपली सहानुभूति दाखविली हा केवढा मोठा लाभ!

## ह्या विवाहांतील एक विशेष गोष्ट.

ह्या विवाहासंबंधानें विशेषतः आमच्या समाजबंधूंनीं एक विशेष गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. सदाशिवराव १८७० च्या सुमारास विधुर झाल्याचें वर आलेंच आहे. तेव्हां पासून १८७८ पर्यंत ते योग्य वधू मिळावी म्हणून व एकंदर सर्व योग जमून यावा या हेतूनें विधुरावस्थेंत राहिले. आणि नंतरही जेव्हां विवाह केला त्या वेळीं आपण प्रार्थना समाजाचे सभासद आहों ही महत्वाची गोष्ट ते मुळींच विसरले नाहींत. विवाहासारख्या प्रसंगीं नसत्या अडचणी उपस्थित होऊं नयेत म्हणून आमचे कित्येक सभासद आपला सभासदपणा समाजाच्या दप्तरांत ठेवीत असतात. त्या वेळीं स्वतः सदाशिवरावांचाही अर्थात असाच अनुभव होता. परंतु ह्या विवाहाच्या वेळीं प्रार्थना समाजाचा सभासद ह्या नात्यानें आपलें काय कर्तव्य आहे त्याची त्यांस उत्तम प्रकारें जागृति होती. त्या वेळीं कोणीही एखाद्या गतभर्तृकेशीं विवाह करावयास सिद्ध होणें म्हणजे मोठेंच धाडसाचें कृत्य करण्यास तयार होणें असें होतें. पण, आमचे सदाशिवराव त्याच्या पलीकडे गेले. गतभर्तृकेशीं विवाह करावयाचा; पण, तो जुन्या रीतीनें काय म्हणून करावयाचा? मी जर प्रार्थना समाजाचा सभासद आपणास म्हणवीत आहें, तर ज्यांत प्रतिमापूजन आहे व ज्या प्रतिमापूजनावर आपला विश्वास नाहीं, असा विधि काय म्हणून करावयाचा? "प्रत्येक मनुष्य जर दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाण्याचें सोडून देऊन आपल्या कर्त्तव्यास लागेल, तरच कोणत्याही सुधारणेचें पाऊल पुढें पडेल" असे उद्गार ज्यांनीं पुढें काढिले व "दुसरे कांहीं करोत आपण आपल्या कर्तव्यास जागणार" असें म्हणण्यांत व त्याप्रमाणें आपलें आचरण ठेवण्यांतच खरें मनुष्यपण आहे असा ज्यांचा कटाक्ष होता,

त्यांचें समाधान ह्यांनीं घेतलेलें कार्य प्रार्थना समाजाच्या सभासदास सर्व दृष्टींनीं शोभण्यासारखें केल्यावांचून कोठलें समाधान मिळणार? म्हणून डा. भांडारकरांनीं ह्या विवाहासाठीं ज्यांत प्रतिमापूजन नाहीं असा विधि जुन्या विधीच्या आधारें तयार केला व त्याप्रमाणें त्यांनींच विधि चालविला. हा सबंध विधि ता. १३ जानुआरी १८७८ च्या सुबोधपत्रिकेंत प्रथम प्रसिद्ध झाला. नंतर ज्ञानदीपामध्यें विवाहविधि ह्या विषयाची बरीच चर्चा करून हा विधि थोडा फेरफार करून प्रसिद्ध केला होता. आमच्या समाजमतांनुसार झालेला हा दुसरा विवाह होय. आपण जें कांहीं केलें त्यांत कांहीं विशेष केलें, अशी जागृति सदाशिवरावांमध्यें केव्हांच नव्हती. आपलें कर्तव्य काय आहे तें जाणून तें आचरणांत आणण्याचा प्रयत्न सतत चालू असावा असें त्यांचें नित्य सर्वांस सांगणें असे, त्याप्रमाणें त्यांनीं केलें. पण, सदाशिवरावांनीं हा आपला विवाह १८७२ च्या कायद्याप्रमाणें रजिस्टर कां नाहीं केला? विधवाविवाह कायद्यानें कायदेशीर झाला आहे, पण, ज्या विवाहांत जुनी विवाहपद्धति कायम ठेविलेली नाहीं, होमाला फांटा दिला आहे, ती पद्धति कायदेशीर मानली जाईलच असें नाहीं हीं शंका त्यांस आली नव्हती असें नाहीं. प्रस्तुत लेखकास एकदां ते म्हणाले " मला माझी स्वतःची व त्याप्रमाणें माझ्या कुटुंबाची खात्रीच वाटत होती कीं, आम्हांला ह्या लग्नाचा प्रश्न घेऊन कोर्टांत जाण्याचा प्रसंग केव्हांच यावयाचा नाहीं. " म्हणून ते विवाह रजिस्टर करण्याच्या भानगडींत पडले नाहींत.

सदाशिवरावांनीं एका गतभर्तृकेशीं विवाह केला; आपल्या समाजमतांस अनुसरून त्यांतील विधि घडवून आणिला, हें वास्तविक पहातां त्यांनीं मोठें कार्य केलें. कर्तव्या संबंधानें उपदेश करणें जितकें सुलभ आहे त्यापेक्षां तें जाणून त्याप्रमाणें आचरण करणें अत्यंत अवघड आहे. परंतु सदाशिवरावांस कोरड्या उपदेशाचा तिटकारा असल्यामुळें त्यांनीं आपलें कर्तव्य काय आहे तें निश्चितपणें स्वतःशीं ठरवून आपल्या मनास जें योग्य वाटलें त्या प्रमाणें आचरण केलें. त्यांनीं लोकमत विरुद्ध असतां विधवाविवाह केला; त्यांतील विधि जुन्या रीतीनें न केल्यानें जुन्या मतांच्या पण विधवाविवाहास अनुकूल असणारांची सहानुभूतिही थोडी कमी करून घेतली. पण, यामुळें त्यांस कांहीं त्रास झाला नाहीं. जे कोणी आपल्या मनाला जें योग्य वाटतें त्याप्रमाणें लोकांस न रुचणारी एकादी गोष्ट आचरणांत आणितात, त्यांस त्यांनीं स्वानुभवावरून केलेला उपदेश

नेहमीं लक्षांत ठेविला पाहिजे. ते म्हणतात, "जे कोणाच्या वाटेस न जातां, आपलें कर्तव्य करून सरळ मार्गानें जातात त्यांस ज्ञातीकडून विशेष त्रास पोंचला असें फारसें आढळण्यांत आलें नाहीं. प्रसंगीं जरी कोणी त्रास देऊं लागले, तरी कांहीं दिवस मुकाट्यानें तो सहन करून आपला दृढ निश्चय कायम ठेवणारांस लोक आपोआप त्रास देण्याचें बंद करितात. लोकांस भिऊन जे त्यांच्या मर्जीप्रमाणें वागावयास जातात, त्यांस मात्र लोक अधिकाधिक दाबांत ठेवण्यास जातात. न भिणारांचें कोणी कांहीं करूं शकत नाहीं."

## प्रार्थनासमाज व सदाशिवराव.

१८७८ सालीं ज्यावेळीं सदाशिवरावांचा विवाह झाला त्यावेळीं त्यांस सोलापुरास शेट मुरारजींच्या गिरणींत नोकरी होती. व त्यांची मासिक प्राप्ति १०० रुपये होती. त्या नोकरीचा त्याग करण्याचा प्रसंग लवकरच आला. ब्राह्म समाजाचा इतिहास ज्यांस माहित आहे, त्यांच्या हें लक्षांत येईल कीं ब्राह्म समाजामध्यें हा काळ मोठ्या चळवळीचा होता. **साधारण ब्राह्मसमाज** नवीनच स्थापन झाला होता. त्याचीं सर्व कामें मोठ्या आस्थेनें व शिस्तीनें चाललीं होतीं. नवविधान पक्ष विस्कळित झाला होता, तरी पण त्याच्यांतही एक प्रकारचा जोम होता, अशा वेळीं आपला पोटाचा धंदा सोडून सर्वस्वी धर्मप्रसाराच्या कार्यास आपणास वाहून घेण्याचा सदाशिवरावांनीं निश्चय केला. अशा प्रकारचा निर्धार करून धर्मप्रचारकाचें काम करावयास तयार होणारांत आपल्या समाजासंबंधानें किती आस्था असली पाहिजे, आपल्या धर्मतत्त्वांसंबंधानें किती अभिमान असला पाहिजे, याची कल्पनाच केली पाहिजे. विवाहाच्या बाबतींत त्यांनीं इतरांस कित्ता घालून दिला, पण त्याहीपेक्षां आपलें उपजीविकेचें चांगलें साधन असतां धर्मप्रचाराचें काम करण्याचा त्यांचा निश्चय कौतुक करण्यासारखा होता. आमच्या प्रांतांत त्यावेळापर्यंत धर्मप्रचारक होण्याचें, त्या कामीं आपणास सर्वस्वीं वाहून घेण्याचें कोणाच्या मनांत आलें नव्हतें. आणि कोणीं तें काम करण्यास पात्रही नव्हतें, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति व्हावयाची नाहीं. सदाशिवराव उत्तम लेखक व उत्तम वक्ते होते. त्यांची धर्मश्रद्धा जाज्वल्य होती. त्यांची सत्यनिष्ठा प्रखर होती. आणि धर्मप्रचारकाचें काम करण्याची उत्सुकता त्यांच्यांत होती. त्यांची बिनचुक विचारसरणी तर प्रशंसनीय होती. इतके सर्व गुण एकवटलेले असून, चांगली पगाराची नोकरी सोडून, भिक्षापत्र हातीं घ्यावयास कोण तयार होतें!

कोणामध्यें तितकी पात्रता होती? कोणीं त्यांच्या सारखा निर्धार दाखविला होता? मंडळींनाही त्यांचा आतां बरीच वर्षे परिचय झाला होता. म्हणून १८८२ च्या जानेवारीपासून त्यांनीं मिशनरीच्या कामास प्रारंभ केला.

१८८१ सालीं रा. ब. रानडे येथें मॅजिस्ट्रेट असतां आपल्या समाजासाठीं एक धर्मप्रचारक असावा, हा विचार त्यांस प्रथम सुचला. नंतर वर्षभर याची चर्चा होऊन सदाशिवरावांस धर्मप्रचारक नेमण्याचें ठरलें. पहिल्या वर्षाच्या रिपोर्टांत मिशन फंडाच्या वर्गणीदारांच्या पत्रांत त्यांच्याविषयीं म्हटलें आहेः—"तूर्त त्यांच्या निर्वाहासाठीं दरमहा ४० रुपये पोंचते करावयाचें योजिलें आहे. सदाशिवराव हे सदरहू कामास फार लायक आहेत, आणि त्यांची योग्यता हीच-तर काय, हीहूनही मोठ्या रकमेपेक्षां अधिक आहे, हें सांगणें जरूर नाहीं. परंतु ते इतर धंदा सोडून हें काम हातीं घेणार, तेव्हां त्यांच्या चरितार्थाची तजवीज झाली पाहिजे म्हणून ही व्यवस्था करणें आहे." उलटपक्षीं सदाशिवराव आपल्या पहिल्याच रिपोर्टांत म्हणतातः—"मीं हें जें काम पत्करिलें आहे तें, तें करण्यास मी योग्य आहें म्हणून पत्करिलें आहे असें नाहीं. अशा कामास मजपेक्षां फारच अधिक योग्यतेचा मनुष्य पाहिजे होता, व अशा मनुष्याची योजना झाली असती तरच ह्या कामाकरितां आपल्या फंडाचे वर्गणीदार जे मोठ्या उदारबुद्धीनें द्रव्यसहाय्य करीत आहेत त्याचा यथायोग्य उपयोग झाला असता... आपल्या हातून काय होईल तेवढें काम करून पहावें अशा विचारानें मीं हें काम पत्करिलें आहे."

पुढें सुमारें दहा वर्षेपर्यंत ते आपणास प्रथम प्रार्थना व नंतर ब्राह्मसमाजाचे मिशनरी असें म्हणवीत असत. इतक्या अवधींत त्यांनीं आमची सुबोधपत्रिका उत्तम प्रकारें चालविली, अनेक ठिकाणीं प्रवास केला व तेथील लोकांस प्रार्थना व ब्राम्ह समाजाची माहिती करून दिली; पंढरपूरच्या आर्फनेजला त्यांनीं भेटी दिल्या. पुढें मंडळीचें व त्यांचें अनेक कारणांमुळें जसें जमावें तसें जमलें नाहीं; नंतर ते आपणास केवळ प्रार्थना समाजाचे मिशनरी न समजतां ब्राह्मसमाजाचे मिशनरी म्हणवूं लागले; कित्येक वर्षेपर्यंत त्यांनीं ज्ञानदीप नामक एक मासिक चालविलें. वर्तमान पत्रांतील लेखांचें जीवन अत्यल्प, म्हणजे दुसरा अंक निघेपर्यंत असें समजतात; पण आम्हांस तें सर्वांशीं खरें वाटत नाहीं; लोकांचाही आज तसाच अनुभव नाहीं. कारण, कित्येक वर्तमानपत्रांतील लेख एकत्र करून आज पुस्तक रूपानें लोकांपुढें आहेत. न्या. मू. रानडे यांचीं

बहुतेक सर्व धर्मपर व्याख्यानें आमच्या सुबोधपत्रिकेमध्यें प्रथम अग्र लेखांच्या रूपानें प्रसिद्ध झालीं आहेत. डा. भांडारकरांचे धर्मपर लेख व व्याख्यानें सुबोधपत्रिकेंतच प्रसिद्ध झालीं आहेत. तीच गोष्ट सदाशिवरावांच्या लेखांची होय. तथापि त्यांचे वर्तमानपत्रांतील लेख जरी बाजूस ठेविले, तरी ज्ञानदीप मासिकांतील त्यांचे अनेक बहुमोल लेख आतां बहुतेक दुर्मिळ झालेल्या ज्ञानदीपाच्या फैलीमध्यें राहूं देणें म्हणजे एका उत्तम ग्रंथाचा लोकांस लाभ न देणें असें होणार आहे. तो योग केव्हां येईल तेव्हां येवो; पण आज तरी अत्युत्तम, पूर्ण विचार करून, व वादग्रस्त विषयांसंबंधानें अत्यंत निर्भीडपणें लिहिलेले अनेक लेख धूळ खात पडले आहेत एवढें मात्र खरें ! त्यानंतर त्यांनीं 'कामगार,' 'हितोपदेशक आणि कामगार' अशीं पत्रें काढलीं; पण तींही अनेक कारणांमुळें त्यांस बंद ठेवावीं लागलीं; मिशनरीचें काम करणें त्यांस सोडून पुन्हा गिरणींतील कामास सुरवात करावी लागली, तरी पण त्यांनीं कित्येक वर्षेपर्यंत आपला 'कामगार' चालू ठेविला होता.

## त्यांची विलायतची सफर.

सदाशिवराव १९०० च्या सप्टेंबर महिन्यांत पॅरिसचें मोठें प्रदर्शन पाहण्याच्या निमित्तानें विलायतेस गेले. त्या पूर्वी प्रदर्शनासंबंधानें हिंदी लोकांची अनास्था पाहून लोकांत त्या विषयीं जागृति उत्पन्न करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. आमच्या पत्रांत ज्यानुआरी महिन्यांत त्यांनीं एक लेख लिहून लोकांनीं त्या वेळीं काय केलें पाहिजे तें दाखविलें. त्या लेखांत ते म्हणतातः—

" इतर देशांतील लोक जसे आमच्या देशांतील पदार्थ पाहून आपला फायदा करून घेतील, तसा आमचे लोक इतर देशांतील यंत्रें किंवा पदार्थ पाहून आपला फायदा करून घेतील काय म्हणून पाहिलें तर सर्वपरी खेदाची स्थिति दृष्टीस पडते. आमच्या देशांतील कारागीर इतके अज्ञान व कंगाल आहेत कीं, त्यांना प्रदर्शनाची खबरही नसेल व असली तरी तें पहाण्यास जाण्याची इच्छा होणार नाहीं. व झालीच तर द्रव्याची व धर्माची या दोन अडचणी येऊन उभ्या राहतील. द्रव्याची अडचण तर मोठीच आहे, पण ज्या कोणाजवळ द्रव्य आहे त्यांना परदेशास जावें कसें ही अडचण येऊन पडली आहे ! या शहरांतील भाटये जातीची कित्येक तरुण मंडळी प्रदर्शन पहाण्यास जाऊं इच्छीत आहे; यांच्या जाण्यानें कारागीर लोकांच्या जाण्याइतका जरी फायदा होणार नाहीं, तरी हे द्रव्यवान व व्यापारी लोक आहेत, तेव्हां एकादा लहानसा तरी पदार्थ करण्याचा

कारखाना यांच्या हातून नवा निघण्याचा संभव आहे. ही मंडळी जर आपल्या-बरोबर कांहीं हुशार कसबी लोकांस घेऊन जाईल तर अधिकच फायदा होणार आहे. पण स्वतः हेच जातील कीं नाहीं याची शंका आहे, तर मग कारागिरांस बरोबर नेण्याची गोष्ट तर दूरच राहिली.

पण ही श्रीमान् व्यापारी मंडळी वेळेस न गेली, तरी त्यांनीं एक दुसरी फार उपयुक्त गोष्ट करण्यासारखी आहे. त्यांनीं एक फंड करून त्यांतून कांहीं चांगले हुशार असे कारागीर लोक प्रदर्शन पाहण्यास पाठवून त्यापासून आपल्या देशास प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष असा काय लाभ करून घेतां येईल याबद्दल त्यांच्याकडून त्यांच्या माहितीवरून त्यांचा अभिप्राय घ्यावा व त्यांची ती माहितीही प्रसिद्ध करावी. अगदीं जुन्या पद्धतीचे कारागीर ह्या कामाच्या उपयोगी पडणार नाहींत; पण, हल्लीं नवीन शिकलेले असेही लोक गिरण्यांसारख्या कारखान्यांत यांत्रिक कामावर आहेत....अशा मंडळींतून कांहीं योग्य लोक निवडून जर प्रदर्शन पहाण्यास पाठविले, तर त्यांच्या माहितीचा देशास लाभ होण्यासारखा आहे. अशी मंडळी प्रत्येक प्रांतांतून पाठविण्यांत यावी व आमच्या देशी संस्थानिकांनींही आपल्या तर्फे अशी कांहीं मंडळी पाठवावी."

ह्या त्यांच्या सूचनेचा कांहीं उपयोग झाला नाहीं ! परंतु त्यांचा पारीस येथें जाण्याचा निश्चय झालेला असल्यामुळें प्रथम कित्येक महिनेपर्यंत त्यांनीं सबंध हिंदुस्थानांत जेथें जेथें हातमाग आहेत तेथील मागांची व विणकर लोकांची स्थिति प्रत्यक्ष पाहिली; विणकर लोकांच्या वास्तविक स्थितीविषयीं त्यांना जितकी माहिती होती तितकी महाराष्ट्रांत तरी इतर कोणास नव्हती असें आम्हांस वाटतें. शेवटीं कांहीं लोकांच्या मदतीनें व स्वतःजवळील कांहीं पुंजी सांचलेली एकत्र करून ता. २७ सप्टेंबर १९०० रोजीं ते **यारा** नामक फ्रेंच बोटीनें विलायतेस गेले. त्यापूर्वीं त्यांनीं एका पत्रांत लिहिलें कीं "मी येथून २७ तारखेस गुरुवारीं यारा नांवाच्या फ्रेंच आगबोटीनें प्रथम पारीस येथील प्रदर्शनांतील यंत्रें पहावयास जाणार आहें. तीं पाहिल्यावर मग युरोपांतील ज्या देशांत हातानें कापड विणण्याचें काम चालतें त्या देशांत जाऊन त्या कामाचे कारखाने पहाण्याचें माझ्या मनांत आहे. बहुधा ह्या कामाकरितां जर्मनी देशांत जावें असा तूर्त विचार आहे." पारिस येथें ते गेले, तेथील प्रदर्शन त्यांनीं पाहून जो काय लाभ करून घ्यावयाचा तो घेतला. कांहीं इतर ठिकाणींही त्यांनीं प्रवास केला; परंतु त्यांचें जर्मनी देशांत जाणें झालें नाहीं. लंडन येथें

त्यांचा बरेच दिवस मुक्काम होता. ते परदेशीं होते तेवढ्या अवधींत त्यांनीं जें जें पाहिलें, व जें जें तेथून पत्रद्वारें कळवितां येण्यासारखें आहे असें त्यांना वाटलें तें त्यांनीं पत्रिकेस पत्रें लिहून कळविलें आहे. अखेरीस लंडन येथें शेट दादाभाईच्या मदतीनें त्यांनीं कांहीं यंत्रें खरेदी केलीं. येथें येऊन लहानशा प्रमाणावर तरी एखादा कारखाना काढण्याचा त्यांचा विचार होता. पण त्यास यश आलें नाहीं. त्यांच्या सर्व आशा निष्फळ झाल्या; त्यांची उमेद खचली; त्यांना लोकांच्या अनास्थेचा चांगलाच अनुभव आला; व ते पुनः नोकरीच्या मार्गास लागले! ह्या मार्गांत असतांनाच त्यांजवर मृत्यूची झडप कशी पडली त्याची हकीकत वर आलीच आहे.

## सदाशिवरावांची खरी योग्यता.

सदाशिवरावांच्या चरित्राविषयीं आम्ही जितका अधिकाधिक विचार करितों, तितका त्यांचेविषयींचा आमचा आदरभाव वाढत जात आहे. त्यांच्या लेखांचें जितकें अधिक मनन करावें तितकें त्यांच्याकडे मन अधिक वेधतें. त्यांनीं अनेक उद्योग केले, कोठेंही त्यांस यावें तस यश आलें नाहीं. एवढा मोठा कारागीर, पण द्रव्यसंचय करावयास त्यांस जणूं काय अवकाश मिळाला नाहीं! त्यांस असें अपयश मिळालें, त्यांनीं योजिलेलीं कामें नीट झालीं नाहींत, त्यांजवर दुःखाचे प्रसंग आले, म्हणून ते कधीं हताश झाले होते काय? त्यांच्या मनाची शांति कधीं ढळली होती काय? जग हें मिथ्या, जगांत सर्वत्र दुःख, अनीति, अधर्म असें कल्पून त्यांची वृत्ति कधीं तरी तामसी अगर असमाधानपर झाली नाहीं; उलट त्यांनीं आपल्या एका लेखांत "सुख पहातां जवा पाडें, दुःख पर्वताएवढें" ही कोणा एका दुःखाच्या वेळीं काढलेली उक्ति कांहीं वस्तुस्थितिनिदर्शक नाहीं असें एका मननीय लेखांत दाखविलें आहे. त्यांत ते म्हणतातः—

"खरोखर पाहिलें तर हें जग दुःखमय मुळींच नाहीं, जगास दुःखमय म्हणणें म्हणजे ईश्वराच्या कृतींत फारच मोठा दोष आहे असें म्हणण्याप्रमाणें होतें..... हें जग सुखाचेंच स्थान आहे; व जितकें सुख मनुष्य यांत मानितो, त्यापेक्षांही यांत अधिक सुख आहे. दुःखही आहे, पण तें फार थोडें आहे, असें अनुभवास येण्याची एक दृष्टि आहे व तीच खरी दृष्टि आहे. परमेश्वरानें या सृष्टीस जे नियम लावून दिले आहेत ते असे आहेत कीं, त्यांस अनुसरून सृष्टीची उत्तरोत्तर सुधारणाच होत चालली आहे. मनुष्याचें काम सृष्टीचे नियम समजून घेऊन त्याप्रमाणें चालण्याचें आहे. तसें चालत असतां अज्ञानामुळें मनुष्याच्या हातून

चुका होऊन कांहीं प्रसंगीं त्याला दुःख भोगावें लागतें; पण त्याला एकंदरींत सुखच मिळतें. पण ऐहिक सुख हें मुख्य सुख नव्हे; तर परमेश्वराला मनुष्यानें जाणणें व त्याच्या स्वरूपाच्या दर्शनांत व सहवासांत राहण्यांत जें खरोखर सुख आहे तेंच मनुष्याचें खरें सुख आहे. ऐहिक सुख केवळ इतर प्राण्यांचें सुख होय, ह्या खऱ्या दृष्टीनें जो पाहील त्याला तर खरोखर हें जग सुखाचेंच स्थान आहे, स्वर्ग स्वर्ग म्हणतात तो येथेंच आहे, असें अनुभवास येईल. मात्र ही गोष्ट सोपी आहे असें नाहीं. सदा सर्वकाळ बाह्य जगताशीं संबंध असल्यामुळें ऐहिक सुखापलीकडे मनुष्य विचार करावयासच जात नाहीं. पण, आम्हां मनुष्यांमध्यें विशेष काय आहे, इतर प्राण्यांहून आम्ही अधिक महत्त्वाचे कां, याचा जो कोणी शांतपणें विचार करील त्याला खरोखर सुख कोणतें व तें सर्वांस सारखेंच साध्य असून तेंच चिरकाल टिकणारें सुख आहे हें सहज समजून येईल. या सुखास बाहेरचें परस्वाधीन असें साधन कोणतेंच लागत नाहीं. आपआपल्याशींच स्वस्थ चित्तानें विचार केला असतां तें सुख अनुभवास येतें व त्याची इतर सुखांशीं तुलना केली असतां इतर सुखांस क्षणिक कां म्हणतात व तें सुख चिरस्थाई कसें हेंही कळून येतें. या दृष्टीनें मनुष्यानें जगांतील सुखदुःखाचा विचार केला असतां ऐहिक सुखाबद्दल तुकारामानें जी उक्ति काढिली आहे तीच फिरवून

दुःख पहातां जवापाडें, सुख पर्वता एवढें ॥

असें मनापासून म्हणण्याचा त्यास अधिकार येईल.''

जगांतील सुखदुःखासंबंधानें ज्यांचे असे विचार होते, त्यांचा परमेश्वरावरील विश्वासही अत्यंत दृढच असला पाहिजे, हें निराळें सांगावयास नको. त्यांच्या चरित्रांतील पुढील गोष्ट देवावरील त्यांचा विश्वास किती दृढ होता तें दाखवितेः—

सदाशिवराव धर्मप्रचारक असतां १८८४ सालीं ब्राह्मसमाजाच्या उत्सवास जाण्यासाठीं निघाले. वाटेंत एक्क्यांतून ते पडल्यामुळें त्यांस दुःखापत झाली व २५ दिवस इस्पितळांत राहावें लागलें. त्यामुळें उत्सवानंतर ते कलकत्त्यास गेले. परत येते वेळीं दिनापुर स्टेशनाजवळ गाडी येत असतां आपली तिकिट व पैशाचें पाकीट कोणीं लांबविलें असें त्यांस आढळून आलें! स्टेशन मास्तरला झालेला सर्व प्रकार सांगितला तरी तो त्यांस पैसे घेतल्यावांचून सोडीना व अलाहाबादेपर्यंत जाऊं द्यावें तेथें गेल्यावर तेथून भाडें पाठविण्यांत येईल हीही गोष्ट त्यास पटेना! ह्या प्रसंगासंबंधानें सदाशिवराव लिहितातः—

"मागचें भाडें द्यावयाचें व मग पुढची वाट. परक्या प्रांतात अनोळखीच्या ठिकाणीं एकट्या मनुष्यावर अशी अडचण आली म्हणजे कठीणच प्रसंग. पण, आमच्या मनाची या वेळची आमची स्थिति आम्हांस चांगली आठवते. आम्हांला या गोष्टीचें मुळींच भय वाटलें नाहीं! हीही एक गंमतच झाली आहे, पहावें काय होतें तें, असें म्हणून आम्ही निर्धास्त होतों!" पुढें तेथील एका गरीब स्थितींतील ब्राह्म गृहस्थांची व त्यांची भेट झाल्यावर कांहीं मित्रांनीं मिळून त्यांस अवश्य लागणारे पैसे दिले. आणि त्यांचा पुढील प्रवास झाला. शेवटीं ते म्हणतातः—

" कशा तरी रीतीनें परमेश्वर आम्हांस त्या अडचणींतून पार पाडील असा आम्हांस पूर्ण भरंवसा होता, व त्याच्याच पक्या आधारावर, आम्ही एकाएकीं कफल्लक बनलों असतां, त्या गोष्टीची आम्हांस भीति वाटली नव्हती."

सदाशिवरावांचें एकंदर वर्तन अत्यंत करारी होतें. आंत एक बाहेर दुसरें; मनांत विचार एक, उच्चार निराळा, आणि कृति दोहोंहून भिन्न असा प्रकार त्यांच्या वर्तनांत केव्हांही आढळला नाहीं. इतका करारीपणा ज्यांच्यांत होता त्यांच्यांत स्पष्टवक्तेपणा हा गुण असणें अगदींच साहजिक होय. कोणतीही गोष्ट सत्य आहे, कोणाचेंही आचरण अयोग्य आहे, असें त्यांस वाटतांच, ते ती सत्य गोष्ट अमलांत आणावयास व अयोग्य आचरणावर आपली निर्भीड टीका करावयास केव्हांही कचरत नसत. यांचें लक्षांत ठेवण्यासारखें उदाहरण म्हणजे रानडे व भट ह्या उभयतां रावबहादुरांच्या प्रायश्चित्तानंतर त्यांनीं आपल्या **ज्ञानदीप** मासिकांत केलेली अति खरमरीत व सर्व प्रकारें वाजवी टीका होय. सदाशिवरावांस त्या वेळीं मोठें आश्चर्य वाटत होतें तें हें कीं, पुनर्विवाहपक्षास जाहीरपणें मिळाल्याबद्दल त्यांजवर ग्रामण्य झालें असतां, हरहमेश प्रीतिभोजनासारख्या प्रसंगीं अनेक जातींच्या लोकांच्या पंक्तीचा लाभ घेत असतां, यःकश्चित चहा प्रकरणावरून रा. ब. रानडे यांनीं आपला आजपर्यंतचा वर्तनक्रम, आपली प्रगतिपर मतें, आपला प्रार्थनासमाजाशीं असलेला संबंध सर्व विसरून जाऊन नाक मुठींत धरून प्रायश्चित्त घ्यावयास प्रवृत्त व्हावें! त्या वेळीं रा. ब. वर त्यांनीं अति कडक टीका केली खरी, पण ती कोणत्या हेतूनें केली याचें त्यांनीं आपल्या त्या टीकात्मक निबंधाच्या प्रारंभींच पुढें दिल्याप्रमाणें दिग्दर्शन केलें आहेः—

"ज्या दोन मोठ्या गृहस्थांच्या आचरणाबद्दल आम्हांस पुढील लेख लिहिण्याचा दुर्दैवानें प्रसंग आला आहे, त्यांच्याशीं धर्मसंबंधानें आमचा फार दिवसांचा संबंध आहे. सर्व लोकांस ते प्रिय आहेत, तसेच तें आम्हांस प्रिय आहेत. दोघांचींही अंतःकरणें आम्हीं चांगलीं ओळखून आहों व त्यांचेविषयीं आमचें प्रेम व पूज्यबुद्धि इतर कोणाहूनहि कमी नाहीं. देशसुधारणेच्या कामीं त्यांचे अव्याहत चाललेले सर्व यत्न आम्हांस चांगले ठाऊक आहेत. असा पूर्वसंबंध असतां आम्हीं पुढील लेख लिहीत आहों तो केवळ कर्तव्यास स्मरून निरुपायानें लिहीत आहों. ज्या धर्मसुधारणेशीं त्यांचा व आमचा संबंध आहे, तिला त्यांनीं या प्रायश्चित्त-प्रकरणांत फार मोठा धक्का दिला आहे. एकंदर सुधारणापक्षाच्या मंडळीस यांनीं दुःखी केलें आहे; पण सर्व सुधारणांत धर्मसुधारणा आम्हांस विशेष महत्त्वाची वाटत असून तिच्यावर त्यांनीं असा आघात केल्यामुळें आम्हांस त्यांच्या आचरणापासून फार दुःख होत आहे. ( पुढील लेखांत ) कोठें कडक शब्द वाचकांस आढळतील तर ते गैरसमजुतीनें किंवा विकारवश होऊन लिहिलेले नाहींत असें समजावें."

त्यांच्या स्पष्टोक्तीचा आणखी एक मासला पहाः—

" केसरीकार प्रो. टिळकासारख्यांच्या मतांची तर आम्हांस मुळींच किंमत वाटत नाहीं. या मंडळीस राजरोस सुधारणाच पाहिजे ती फक्त राजकीय सुधारणा ! सामाजिक सुधारणा यांस पाहिजे आहे, पण, ती आपोआप होईल तर; धर्माची सुधारणा तर यांस मुळींच नको. धर्म म्हणजे काय पदार्थ आहे ? हे म्हणतील तो धर्म, हे ठरवितील ती नीति, त्यांनीं हे वागवितील तसें वागावें. त्यांच्यावर हे हिंदुत्वाचें पांघरूण मात्र घालतील. आंतून त्यांनीं खुशाल कुजत व सडत पडावें. तें त्यांस इष्टच. पण वरून यांना हिंदुधर्माभिमानी म्हटलें पाहिजे. या मंडळीस आम्ही चांगले ओळखून आहों व म्हणून रा. टिळक-प्रभृति मंडळीनें कांहीं केलें, कांहीं बोललें, तर त्यांत आम्हांस आश्चर्य वाटत नाहीं ! यांच्या पत्रांत आज एक गोष्ट येईल तर उद्यां तिच्या अगदीं उलट येईल. हे आज सभेंत एक बोलतील व उद्यां तिच्या अगदीं उलट बोलतील. उपाय कसलेही योजावे, परिणामाकडे दृष्टि दिली म्हणजे झालें अशा विचाराबद्दल हे आज लोकांना दोष देतील व उद्यां आपणच असत्य विचाराचें आचरण करितील."

त्यांची समाधान वृत्ति अत्यंत दुर्मिळ होती. पण, ही समाधानवृत्ति स्वतःच्या व आपल्या कुटुंबाच्या ऐहिक स्थितीसंबंधानें होती हें लक्षांत ठेवण्यासारखें

आहे. " ठेविलें अनंतें तैसेचि राहावें । चित्तीं असों द्यावें समाधान " असें आम्ही वारंवार म्हणतों, त्यावर लांबलांब व्याख्यानें होतात, व तीं आम्हीं ऐकतों. पण, आमच्यामध्यें समाधानवृत्तीचा लवलेश नसतो. सदाशिवरावांचें तसें नव्हतें. प्राप्त स्थितींत समाधान मानून राहणें हेंच आपलें कर्तव्य, हाच आपला धर्म असें ते मानीत असत. आणि त्यास अनुसरून तंतोतंत त्यांचें आचरण असे. ह्यासंबंधानें उदाहरणें हवीं असतील तर तीं अनेक देतां येतील. कांहीं वर्षांपूर्वी प्रवास करीत असतां भर वस्तींतून त्यांची पेटी कोणी लांबविली, तींत बराच ऐवज होता. ती पेटी सांपडली नाहींच; परंतु त्यांनीं आपण होऊन ती पेटी चोरीस गेली, आपलें इतकें नुकसान झालें असें कोणास सांगितलें नाहीं, की कांहीं कुरकुर केली नाहीं ! उलट आह्मांस हें आपण कळविलेंही नाहीं असें कोणी म्हटल्यास, इतरांस कळवून हरवलेली वस्तु सांपडणें जर शक्य नाहीं, तर वस्तू हरवली, हरवली, असें जिकडे तिकडे सांगत बसण्यांत काय अर्थ आहे ? असें उत्तर मिळे ! अशा प्रकारची विलक्षण समाधानवृत्ति कोठें आढळेल ?

त्यांची सत्यनिष्ठा, त्यांचा साधेपणा, त्यांची धर्मशीलता, त्यांचा धर्माचरणाविषयीं कटाक्ष, त्यांचें आत्मपरीक्षण, त्यांचा प्रार्थनेवरील दृढ विश्वास, त्यांचा शांतपणा, त्यांचा गंभीरपणा, त्यांचा प्रेमळपणा, ह्यासंबंधानें जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच होणार आहे. अशा प्रकारचें अनेक गुणसंपन्न बहुमोल रत्न आम्हांस लाभलें होतें, पण त्यांच्या सहवासाचा व्हावा तितका फायदा झाला नाहीं. त्यांच्या बोधाचा लाभही फार झाला नाहीं, त्यांची कर्णमधुर वाणी मृत्युपूर्वी दुर्मिळच झाली होती; हें लक्षांत येऊन मन अत्यंत उदासीन होतें, व त्यांच्या अकल्पित मृत्यूमुळें आमचें जें अतोनात नुकसान झालें आहे त्याची कल्पनाही होत नाहीं ! त्यांची वास्तविक योग्यता आम्हांपैकीं कित्येक लोक जाणत होते, कित्येक जाणत नव्हते; पण एका भेटीनेंही रा. रा. नारायण वामन टिळक ह्या आमच्या ख्रिस्ती मित्रांनीं त्यांची योग्यता जाणिली. आपल्या ख्रिस्ती नागरिकांत त्यांनीं त्यांचेविषयीं पुढील उद्गार काढले:—

"अजून पुरते दोन महिने झाले नाहींत, एक साधे दिसण्यांत गंभीर गृहस्थ मुद्दाम आम्हांला भेटण्यास येतात. आम्ही त्यांना नांवानें ओळखीत आहों, ते आम्हांला नांवानें ओळखीत आहेत ह्यापलीकडे दोघांचा परिचय नाहीं. सुमारें दीड तास दोघांची बैठक होते, व त्या दीड तासांतच दीड वर्ष एकत्र राहण्यानें जितका परिचय व्हावा तितका परिचय दोघांचा होतो. एक ख्रिस्ती व दुसरे प्रार्थनासमाजी; खरे खरे, ज्यांचा विचार, उच्चार, आचार एक आहे असें प्रार्थ-

नासमाजी, इतके खरे प्रार्थनासमाजी, कीं त्यांच्या तासा दीड तासाच्या समक्षतेनेंच थोडेसे चुकलेले कां असतना, पण प्रार्थनासमाजांत नुसते तर्कवितर्क वादांतच आनंद मानणारे नव्हत, तर परमेश्वराचेठायीं लीनमति झालेले थोडे तरी लोक आहेत अशी आमची खातरी होते व या गृहस्थांचा परिचय झाला हा अलभ्य लाभ झाला असें समजून आम्ही त्या गृहस्थांना रजा देतों, आणि पुढें महिन्या दीड महिन्याच्या आंतच त्यांच्या निधनाची वार्ता आमच्या कानीं पडते ! कालचें काल राहिलें, त्या लोकींच्या उद्यांवर आमची सत्ता नाहीं, आज मात्र खरें आहे !

रा. सदाशिवराव केळकर गेले म्हणजे प्रार्थनासमाजाचे भीष्माचार्य गेले, असले सत्यप्रतिज्ञ, इतके कार्यक्षम, दीर्घोद्योगी बधु समाजांत असतील, समाजाला मिळतील; पण आज सदाशिवजींची जागा शून्य दिसत आहे.''

## उपसंहार.

सदाशिवराव गेले आणि आज त्याला वीस वर्षे संपूर्णही झालीं. त्यांच्या मृत्यु पूर्वीच्या कांहीं दिवसांची आठवण प्रस्तुत लेखकास झाली कीं अद्यापही अंतःकरणांत भडभडून येतें. स्वतः आजारी असतां घरांत प्रार्थनेची झालेली हयगय पाहून त्यांचें झालेलें अस्वस्थ मन, आजारी असतांही अर्थपूर्ण वाक्यद्वारें त्यांच्या तोंडून निघणारे उद्गार, त्यांची आपल्या स्वतःच्या वेदनांविषयीं दिसणारी बेफिकिरी, पळहून मुंबईस आणिल्यावर त्यांची झालेली आसन्नमरण अवस्था, ज्या थोड्या लोकांस त्यांच्या पवित्र दर्शनाचा मृत्युपूर्वी लाभ झाला त्यांची त्यावेळीं झालेली स्थिति इत्यादि सर्व प्रसंग आज हे आमच्या पुढें जसेच्या तसेच उभे आहेत. गेल्या वीस वर्षांत प्रस्तुत लेखकानें त्यांच्या अनेक लेखांचीं अनेक वेळां पारायणें केलीं, आणि प्रत्येक खेपेस त्यांच्या संबंधाचा आदर अधिकाधिक वाढत गेला; त्या वीस वर्षांच्या अवधींत त्यांचें खरें स्मारक आपण किती अंशानें उभारलें याचा आमच्या समाजाशीं संबंध असलेल्या प्रत्येक व्यक्तीनें आपल्या मनाशीं अवश्य विचार करावा. ऐहिक दृष्ट्या जें त्यांचें स्मारक तें उत्तम रीतीनें झालें आहे. त्याची हकीकत पुढें दिलेली आहेच. परंतु प्रत्येक व्यक्तीला त्यांचें आपआपल्या पुरतें स्मारक करितां येण्यासारखें आहे. ज्याला म्हणून सदाशिवरावांची योग्यता पूर्णपणें कळली असा मनुष्य कोणत्याही चळवळींत जरी पडला, तरी जोंपर्यंत त्यांचा उपदेश तो मनांत वागवून मनःपूर्वक वागत आहे, तोंपर्यंत तो स्वतः त्यांचें कायमचें स्मारक उभारीत आहे, असें आम्ही समजतों. अशा प्रकारचें स्मारक इतर कोणी करोत अगर न करोत;

त्याची वाट न पहातां, प्रार्थना समाजाच्या प्रत्येक सभासदानें त्यांचें हें स्मारक आपण किती अंशानें केलें कीं, त्यांनीं दर्शविलेल्या कर्तव्यापासून आपण दिवसें-दिवस पराङ्मुख होत आहोंत याचा विचार करावा. सदाशिवरावांच्या संबंधानें आदरबुद्धि वागविणें, त्यांच्या गुणांचें पुष्कळसें वर्णन करून त्यांची स्तुति करणें, त्यांचे संबंधानें लेख लिहिणें, याहून त्यांच्यांतील अनेक गुणांचें अनुकरण करणें हें अधिक महत्वाचें आहे. हें स्मारक करण्यास आम्हांस परमेश्वरानें दिवसेंदिवस अधिकाधिक साह्य करावें, व त्यांच्या प्रत्येक पुण्यतिथीच्या दिवशीं आमच्या अंतःकरणास त्यांच्या गुणाचें अवलंबन करण्याचा प्रयत्न होत आहे अशी साक्ष पटावी, त्या योगें आमचें धर्मबल अधिकअधिक वाढावें अशी आमची परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे. ब्रावनिंग कवीच्या पुढील शब्दांनीं सदाशिवरावांचें फार चांगलें वर्णन होतें:—

One who never turned his back, but marched breast forward,
Never doubted clouds would break,
Never dreamed though right were worsted–wrong would triumph,
Held we fall to rise, are baffled to fight better,
Sleep to wake.

## सदाशिवरावांचें स्मारक.

ज्यांच्या चरित्राचें अल्प वर्णन वर करण्यांत आलें आहे, त्यांचें स्मारक कोणी करीत आहेत किंवा नाहींत याची वाट न पाहतां, त्यांच्या संबंधाचा आपला आदरभाव व्यक्त करण्याकरितां आमच्या समाजाचे पूज्य उपाध्यक्ष प. वा. शेट दामोदरदास गोवरधनदास यांनीं पांच हजार रुपयांची देणगी देऊन सदाशिवरावांचें चिरस्मारक केलें आहे. आपल्या मतांनुसार मनुष्य वागत असतां गरीबीमध्येंच त्यास परलोकवास प्राप्त झाला तर मागें राहिलेल्यांची व्यवस्था नीट होत नाहीं. आमांकडून मदत न होणें शक्य आहे म्हणून अशा व्यक्तींच्या मागें त्यांच्या कुटुंबास कांहीं तरी द्रव्य साह्य मिळावें ह्या हेतूनें शेटजींनीं ५००० रुपयांची देणगी दिली असून ह्या फंडास **सदाशिवराव केळकर** स्मारक फंड असें नांव त्यांनीं दिलें आहे. त्यांच्या अटी कबूल करून समाजानें मोठ्या आनंदानें ह्या उदार देणगीचा स्वीकार केला आहे. शेट दामोदरदास यांनीं अशाप्रकारें पूजनीयांचा सन्मान केला त्याबद्दल त्यांचे कितीही आभार मानिले तरी ते थोडेच होणार आहेत.

# ( १२ ) शंकर पांडुरंग पंडित.*

सन १८९४ सालच्या ता. १८ मार्च रोजीं ह्या मुंबई शहरांत ज्यांची इह-लोकींची यात्रा संपली, त्या वेळीं जे पोरबंदर संस्थानचे अॅडमिनिस्ट्रेटर होते, त्यापूर्वी नमुनेदार डिस्ट्रिक्ट डेप्युटि, हुजुर डेप्युटि कलेक्टर, मॅजिस्ट्रेट, ओरिएंटल ट्रॅन्सलेटर, अध्यापक, ग्रंथकार, सुविचारी, बाणेदार, सत्यप्रिय, धर्मनिष्ठ व स्पष्टवक्ते म्हणून ज्यांची ख्याति होती, ते रा. ब. शंकर पांडुरंग पंडित वयाच्या १८ वर्षेपर्यंत आपल्या तीर्थरूपांस बांबुळी गांवचे कुळकर्णीपणाचे कामीं साहाय्य करीत होते व त्यांस इंग्रजीचें एक अक्षरही येत नव्हतें असें कळलें म्हणजे अशा कर्तबगार व्यक्तीचें चरित्र जाणून घेण्याची उत्कंठा मनांत उत्पन्न झाल्यावांचून राहात नाहीं.

## जन्म व शिक्षण.

सन १८४० सालीं सावंतवाडी संस्थानांतील कुडाळ पेट्यांतील बांबुळी नामक गांवीं शंकररावांचा जन्म झाला. त्यांचे वडील नारायणराव त्या गांवचे कुळकर्णी होते. व हें कुळकर्णीपण त्यांचेकडे वडिलोपार्जित आलेलें होतें. शंकररावांच्या तीर्थरूपांचें नांव जर नारायण तर मग हे शंकर पांडुरंग कसे ? असा प्रश्न येथें उद्भवतो. खरें पाहतां त्यांचें शास्त्रोक्त दत्तविधान झालेलें नव्हतें. त्यांचे तीर्थरूप नारायणराव हे फार हुशार पण जुन्या समजुतीचे भाविक गृहस्थ होते. त्यांस पांडुरंगपंत नांवाचे एक चुलत बंधु होते. ते देशांतरास गेले असतां तेथेंच वारले. त्यांना पाठीमागें कांहीं संतति नव्हती. त्या वेळेपासून कुटुंबामध्यें कांहीं दुखणेंबाणें आलें कीं, त्यांस असें वाटे कीं, पांडुरंगच समंधरूपानें येऊन आपल्या मुलांबाळांस उपद्रव देतो. ही बाधा टाळण्यासाठीं त्यांना एक उपाय सुचला. तो असा कीं, आपल्या मुलांपैकीं एक मुलगा पांडुरंगाच्या नांवें करून द्यावा; म्हणजे त्यास पिंडदान वगैरे करण्यास तो अधिकारी होईल! म्हणून एके दिवशीं आपल्या शंकराचा हात धरून त्यांनीं आपल्या मृतबंधूस गाऱ्हाणें दिलें व ते म्हणाले, "बाबारे, हा माझा शंकर मी तुला आजपासून अर्पण केला आहे; हा तुझें नांव चालवील. आतां-

---

* चरित्रविषयक कांहीं माहिती मनोरंजनाच्या १९१४ सालच्या आगस्ट महिन्याच्या अंकांतील रा. त्र्यं. गं. धनेश्वर ह्यांनीं लिहिलेल्या लेखांतून व त्याच प्रमाणें सारस्वत रत्नमालेंतून घेतली आहे.

तरी यापुढें तूं घरांतील मुलांबाळांस उपद्रव देऊं नको."* त्या दिवसापासून शंकररावांचें नांव 'शंकर पांडुरंग' असें झालें. लहानपणीं शंकररावांचें मराठी शिक्षण त्यांच्या वडिलांच्या देखरेखीखालींच झालें. त्यांच्या गांवीं त्या वेळीं शाळा नव्हती. कुळकर्ण्याच्या कामाला जरूर तेवढें शिक्षण प्राप्त झाल्यावर ते कुळकर्णीपण चालवूंही लागले होते. एकदां सावंतवाडीच्या पोलिटिकल सुपरिंटेंडेंट साहेबांची स्वारी कुडाळला आली असतां नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें आसपासच्या सर्व गांवच्या कुळकर्ण्यांना तेथें जावें लागलें होतें. त्या वेळीं साहेबांच्या आफिसचा तो थाट, प्रत्येक कारकुनाचें एकेक खुर्ची टेबल, हाताखालीं शिपाईप्यादे पाहून आपणही असेंच कारकून व्हावें असें त्यांच्या मनानें घेतलें. शंकरराव मोठे स्वाभिमानी होते व हा त्यांचा गुण लहानपणापासूनच दिसून आला होता. वरील प्रसंग घडल्यानंतर मुन्सफाच्या कचेरींत एका कारकुनाच्या जागेसाठीं त्यांनं अर्ज केला. त्यांस वशिला कोणाचा नव्हता. त्यामुळें वस्तुतः त्यांचें मोडी अक्षर चांगलें असूनही तें चांगलें नाहीं असा शेरा मिळून त्यांचा अर्ज फेंटाळला गेला! हा असला अपमान झालेला पाहून वडिलांस न कळवितां पुढील शिक्षणासाठीं एका रात्रीं त्यांनीं बेळगांवची वाट धरिली! बेळगांवीं येऊन पोंचल्यावर त्यांच्या शिक्षणाची सोय आयती झालेली थोडीच होती! आंगावरील पांघुरणानिशीं वयाच्या १८ व्या वर्षी निघालेला हा तरुण बेळगांवसारख्या शहरीं आपली सर्वप्रकारें निर्धन स्थिति पाहून मुळींच डगमगला नाहीं. प्रथमतः मोठ्या कष्टानें त्यांस माध्यान्हाची तिडीक संभाळावी लागली. त्या वेळीं कांहीं दिवस माधुकरीही त्यांस मागावी लागली. जवळ पैसा नाहीं, आणि इंग्रजी शिकण्याची इच्छा तर प्रबळ, तेव्हां प्रथम शंकररावांनीं वर्गाच्या बाहेर बसून वर्गांत काय धडे चालले आहेत ते ऐकावे व त्यांप्रमाणें आपले पाठ तयार करावे असा क्रम चालविला. त्यांची ज्ञानसंपादनाची हौस पाहून त्यांच्या शिक्षकांना मोठें कौतुक वाटलें व अशा होतकरू व बाणेदार तरुणास प्रोत्साहन देण्याच्या हेतूनें त्यांनीं त्यांच्या फीची व्यवस्था केली. पुढें शंकररावांस शिकवण्या वगैरे करून आपल्या चरितार्थापुरते पैसे मिळवून आपला अभ्यास करावा लागे. त्या वेळीं बेळगांवचे सुप्रसिद्ध वकील वासुदेवराव पुणेकर यांस ही बातमी कळल्यावर त्यांनीं त्यांस साहाय्य केलें व आश्रयही दिला. १८५८ सालीं इंग्रजीचा गंध नसलेल्या या तरुणानें १८६१ सालीं प्रवेशपरीक्षा दिली व पुढील शिक्षणासाठीं

* सारस्वत रत्नमाला.

ते मुंबईस आले. ह्यावरून त्यांच्या कुशाग्र बुद्धीची व निरलस उद्योगाची साक्ष पटते. मुंबईस आल्यावर त्यांचा पुढील शिक्षणक्रम सुरळीतपणें चालला. कारण त्यांस स्कालरशिप्स मिळत असत. पण तोही स्वतःच्या हिमतीवरच हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. १८६५ सालीं, म्हणजे कुळकर्णीपण सोडल्यापासून अवघ्या सात वर्षांनीं बांबुळी गांवचे हे कुळकर्णी मुंबई युनिव्हर्सिटीचे बी. ए दुसऱ्या वर्गांत पास झाले व पुढें ज्या तुकोबांच्या वचनांचा ते उद्धार करणार होते त्या तुकोबांच्या एका वचनाचें-निश्चयाचें बळ तुका म्हणें तेंचि फळ ।-सत्यत्व त्यांनीं स्वतःच्या बाणेदार वर्तनानें पटवून दिलें. शंकररावांचा हा बाणेदारपणा शेवटपर्यंत टिकून राहिला व त्यानें त्यांच्या कीर्तीत भर घातली. गरीब, होतकरू व हुषार मुलांनीं शंकररावांचें हें उदाहरण नित्य दृष्टीपुढें ठेवण्यासारखें आहे.

## सरकारी नोकरी व परोपकार.

बी. ए. झाल्यावर पूर्वीचा कारकून होण्याचा निश्चय अर्थात गळाला व प्राप्त शिक्षणानुसारें त्यांचें ध्येयही उच्च बनत गेलें. ते बी. ए. झाल्याबरोबर त्यांस दक्षिणा फेलो नेमण्यांत आलें. नंतर कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या जागीं दक्षिणा प्राइझ कमीटीचे सेक्रेटरी त्यांस नेमण्यांत आलें व तेथपासून त्यांच्या सरकारी नोकरीस आरंभ झाला. ह्याच वेळीं त्यांनीं एका सोलजर स्नेह्यापाशीं जर्मन भाषेचा अभ्यास केला. त्यानंतर त्यांचें इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व पाहून त्यांस डेक्कन कॉलेजांत इंग्रजी उपअध्यायक नेमण्यांत आलें. त्यानंतर १८६८ मध्यें लॅटिन व इंग्रजी घेऊन ते एम. ए. झाले. पुण्यास नोकरीनिमित्त आल्यानतर म्हणजे १८६५ सालानंतर त्यांनीं संस्कृत भाषेचें अध्ययन सुरू केलें. मध्यंतरीं एम. ए. ची परीक्षा त्यांनीं दिली, आणि हें संस्कृत भाषेचें अध्ययन त्यांनीं इतकें उत्तम प्रकारें केलें, कीं १८७१-७२ सालीं त्यांच्यावर कॉलेजांत संस्कृत शिकविण्याचें कामही सोंपविण्यांत आलें. ह्याहीपेक्षां आश्चर्याची गोष्ट ही कीं, संस्कृत भाषेचें अध्ययन सुरू झाल्यापासून एका वर्षाच्या आंत भगवानदास संस्कृत स्कालरशिपच्या स्वतंत्र परीक्षेला ते बसले! ह्यावरून त्यांचा दांडगा विद्याव्यासंग व असाधारण बुद्धिमत्ता यांची साक्ष पटते.

शंकररावांनीं डेप्युटी कलेक्टरच्या कामास सुरवात केल्यावर भयंकर दुष्काळ पडला. ह्या दुष्काळांत त्यांनीं स्वतः अतिशय श्रम केले. उपासतापास, तहानभूक ह्यांकडे न पहातां गांवोगांव ते फिरले. स्वतः ज्याप्रमाणें ते काम करीत त्याप्रमाणें हाताखालच्या लोकांसही करावयास लावीत. अशा रीतीनें त्यांनीं जिवापाड

केलेल्या श्रमांचें चीज झालें. दुष्काळग्रस्तांच्या अन्नपाण्याची त्वरित व्यवस्था झाल्यामुळें त्यांनीं त्यांस दुवा दिला व त्यांचा उत्साह, काम करण्याची शिस्त व कळकळ पाहून सरकारांतही त्यांची वहावा झाली. त्यांच्या परोपकाररततेचें हें एकच उदाहारण नाहीं. खानदेशांत डेप्युटी कलेक्टर असतांना तेथील नदीस महापूर येऊन फार नासाडी झाली, गांव वाहून गेले, नदीच्या कांठचा प्रदेश जलमय झाला व लोकांस उभें रहावयास सुकी जागा नाहीं असें झालें. पाण्याचा प्रवाह एकदम आल्यामुळें लोकांचे प्राण वांचविणें कठिण पडूं लागलें. अशा वेळीं शंकररावांनीं एक होडी पैदा करून ती स्वतः वल्हवून अनेक लोकांचे प्राण वांचविले. इतकेंच करून त्यांची तृप्ति झाली नाहीं. ते स्वतः उत्तम पोहणारे असल्यामुळें त्यांनीं स्वतः पाण्यांत उडी घातली व अनेक बुडणाऱ्या माणसांस हात देऊन त्यांस वांचविलें. असें म्हणतात कीं, धुळ्या नजीक कुसुंबें नांवाचें गांव होतें. हें गांव ह्या महापुरानें अजीबात वाहून गेलें ! हें गांव पुन्हा वसविण्याच्या कामीं शंकररावांनीं अतिशय खटपट केली व त्यांची ही कामगिरी ओळखून त्यांचें स्मारकच जणूं काय करण्याच्या बुद्धीनें गांवच्या लोकांनीं आपल्या गांवाचें **शंकरपेठ** असें नांव ठेवलें व तें अद्यापही चालू आहे असें म्हणतात.

१८७९ सालीं सरकारनीं त्यांची ओरिएंटल ट्रॅन्स्लेटरच्या जागीं नेमणूक केली व ह्या जागेवर ६ वर्षें त्यांनीं मोठ्या निस्पृहतेनें काम केलें. हें काम करीत असतांनांच सरकारची त्यांचेवर इतराजी झाली व त्यांस कांहीं दिवस घरीं बसावें लागलें. नंतर रा. ब. माधवराव रानडे व सर रेमंड वेस्ट ह्यांच्या साहाय्यानें त्यांच्यावरील सरकारचा राग गेला व त्यांस डिस्ट्रिक्ट डेप्युटि कलेक्टर करण्यांत आलें व नंतर नगर येथें कांहीं वर्षें हुजुर डेप्युटि कलेक्टर असतांनाच त्यांस पोरबंदरचे ॲडमिनिस्ट्रेटर नेमिलें व तेथें तें काम आपल्या नेहमींच्या पद्धतीनुसार अतिशय कष्ट* घेऊन मोठ्या निःपक्षपातबुद्धीनें व संस्थानाच्या कल्याणाच्या दृष्टीनें लोकहित साधून करीत असतां त्यांची प्रकृति ढांसळली व वर म्हटल्याप्रमाणें त्यांचा अंत झाला.

---

* ते पोरबंदरच्या कारभारावर असतां तें संस्थान सुधारण्यासाठीं त्यांनीं जिवापेक्षां अधिक कष्ट सोसले. त्यांचे मनांत लौकरच पेन्शन घ्यावयाचें होतें. म्हणून आपण आरंभिलेलीं कामें तशींच अर्धवट राहिल्यास आपल्या पाठीमागून येणाऱ्या कामदारास नड पडूं नये म्हणून तीं पुरीं करण्यांत अतोनात मेहनत घेतली.—सारस्वत रत्नाकर.

## वाङ्मयसेवा.

विद्याव्यासंगी, कर्ते सुधारक, प्रार्थनासमाजाचे सभासद व दीर्घोद्योगी, सरळ वृत्तीचे गृहस्थ ह्या दृष्टीनें शंकररावांचें चरित्र कसें अत्यंत अनुकरणीय व नमुनेदार आहे तें आतां येथें दाखविण्याचा आमचा विचार आहे. शंकरराव अखेरपर्यंत सरकारी नोकर होते. सरकारी नोकरी करीत असतांनाही त्यांनीं आपला दांडगा विद्याव्यासंग व लेखनव्यवसाय सतत चालू ठेविला होता. कॉलेजांतील विद्यार्थ्यां- साठीं रघुवंश व मालविकाग्निमित्र शुद्ध करून त्यांवर टीपा देऊन प्रसिद्ध केलेच, परंतु त्यांचें 'वेदार्थ यत्न' हें मासिक पुस्तक जे कोणी आजही पहातील त्यांस त्यांच्या दीर्घ उद्योगाची, चिकित्साबुद्धीची, चौकसपणाची, शोधक बुद्धीची व त्याचप्रमाणें सत्यनिष्ठेची खात्री पटल्यावांचून रहावयाची नाहीं. वेदार्थ यत्नांतील टीपा, इंग्रजी व मराठी अर्थ हीं सर्व शंकररावांच्या विद्वत्तेची साक्ष पटवीत होतीं व म्हणूनच ह्या मासिकास हिंदुस्थानापेक्षां जर्मनींतच अधिक वर्गणीदार होते ! ते अनेकभाषाकोविद होते. इंग्रजी, मराठी, संस्कृत, लॅटिन, कानडी, गुजराती, जर्मन व फ्रेंच इतक्या भाषा त्यांस चांगल्या येत होत्या. अथर्व वेदावरील भाष्याची प्रत मिळवून तें भाष्य व्यवस्थित रीतीनें छापून प्रसिद्ध करण्याचें काम सरकारनें त्यांजवर सोपविलें होतें. हें भाष्य मिळविण्याच्या कामीं जेथें युरोपीय पंडित थकले तेथें शंकररावांस पूर्ण यश आलें व शृंगेरीच्या मठांतून त्यांनीं ही प्रत मोठ्या प्रयासानें मिळविली. शंकर- रावांस आपल्या पुरातन ग्रंथांसंबंधानें योग्य तो अभिमान होता व पूर्वीच्या ऋषींनीं व ब्राम्हणांनीं ग्रंथांच्या अभावीं वेदांची जोपासना केली म्हणून त्यांच्या विषयीं त्यांस फार आदर वाटत असे. १८७४ सालीं ओरिएंटल इन्टरन्याशनल कॉंग्रेसला डॉ. भांडारकरांस कांहीं अडचणींमुळें जातां आलें नाहीं म्हणून सरका- रनें त्या कामीं त्यांची नेमणूक केली व तेथें त्यांनीं कालिदासाचा काल ह्या विषयावर जो निबंध वाचला त्यामुळें तेथें त्यांची फार वाहवा झाली. तेथें जाऊन ते केवळ आपल्या कीर्तीमध्यें भर घालून आले नाहींत, तर इंग्लिश लोकांचे विशेष गुण त्यांनीं लक्ष्यांत घेतले व ज्याज्या वेळीं संधि येईल त्या वेळीं, खासगी संभाषणांत, तसेंच जाहीर व्याख्यानांत, ते आपल्या पुरातन संस्कृतीचा अभिमान व्यक्त करीत असत. त्याचप्रमाणें ह्या अभिमानांतच गुरफटून न जातां आज आपण इंग्लंडपासून काय शिकलें पाहिजे त्याची जाणीव लोकांमध्यें उत्पन्न करण्याचे ते मनःपूर्वक प्रयत्न करीत असत.

## सामाजिक सुधारणा.

शंकरराव सामाजिक बाबतींत प्रागतिक विचारांचे होते. आपल्या देशाची सर्वांगीण उन्नति झाली पाहिजे आणि ह्या बाबतींत एकट्या पुरुषांवरच न अवलंबून राहतां स्त्रियांचेंही साह्य झालें पाहिजे. हें साहाय्य करण्याची पात्रता त्यांच्यांत आणावयाची म्हणजे त्यांस सुविचारपरिप्लुत करावयाचें, त्यांस उच्च शिक्षणाची गोडी लावावयाची व ज्ञानाचे दरवाजे उघडावयाचे. ह्या हेतूनें त्यांनीं अत्यंत परिश्रम करून व स्वतः मोठी देणगी देऊन पुण्यास High School for Indian Girls ची स्थापना केली. स्त्रीशिक्षणाच्या कामीं ह्या शाळेनें किती साहाय्य केलें आहे ह्याची कल्पना शाळेचा इतिहास पहाणारास करून येईल. तथापि हें त्यांस अत्यंत प्रिय असें कार्यच कांहीं काळ त्यांस जाचक झालें! हुजूरपागेंत नवीन शाळेच्या प्रवेशसमारंभाच्या वेळीं श्री सयाजीमहाराजांच्या हस्तें बक्षिसें वांटण्यांत आलीं, त्यावेळीं महाराजांना ताबडतोब दुसऱ्या कोठें जावयाचें असल्यामुळें ते घाईनें निघून गेले व राष्ट्रगीत म्हणावयाचें राहून गेलें. एवढयानें लिवॉरनर साहेबांची मर्जी गेली व शंकररावांवर सरकारचा रोष झाला. हा रोष सर रेमंड वेस्ट व रा. ब. रानडे ह्यांनीं घालविल्याचा उल्लेख वर आलाच आहे.

शंकररावांची प्रथम पत्नी निवर्तल्यावर जेव्हां त्यांनीं द्वितीय विवाह करण्याचा निश्चय केला त्यावेळीं योग्य गतभर्तृका मिळाल्यास तिच्याशीं विवाह करण्याचा त्यांचा निश्चय झाला होता; व साहा महिनेपर्यंत वर्तमानपत्रांत जाहिरात देऊन योग्य गतभर्तृका मिळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. हा प्रयत्न विफल झाल्यामुळें त्यांनीं सोलापूर येथील इंग्रजी शाळेचे हेडमास्तर रा. रा. रामचंद्र गणेश नाईक यांच्या मुलीशीं सोलापुर मुक्कामीं असतांना १८७८ सालीं विवाह केला. सदाशिव पांडुरंग केळकर ह्यांच्या विवाहासाठीं प्रार्थनासमाजाच्या धर्मतत्त्वांस अनुकूल असा विवाहविधि नुकताच तयार झाला होता. त्याचा फायदा घेऊन शंकररावांनीं आपल्या ह्या द्वितीय विवाहांतील सर्व विधि केला. हा विवाह गुरुवार ता. ७ फेब्रुवारी १८७८ रोजीं झाला. त्या वेळीं सुबोधपत्रिकेनें म्हटलें होतें कीं, "ह्या नवीन तयार केलेल्या पद्धतीप्रमाणें रा. रा. सदाशिवराव केळकर यांचा ता. ७ ज्यानुआरी रोजीं विवाह झाला व बरोबर एक महिन्यानें म्हणजे ता. ७ फेब्रुआरी रोजीं हा दुसरा झाला. ह्याप्रमाणेंच जर समाजांतील इतर सभासद आपल्या येथील कार्यें करितील तर बोलणें एक व करणें निराळें अशा रीतीचा दोष लोक जो त्यांस देतात त्यास जागा राहणार नाहीं."

स्त्रियांच्या शिक्षणासंबंधानें ज्याप्रमाणें त्यांची कळकळ होती त्याचप्रमाणें अस्पृश्य मानलेल्या जातींमध्यें शिक्षणाचा प्रसार झाल्यावांचून त्यांचा उद्धार होणें शक्य नाहीं असें त्यांचें निश्चित मत होतें व हें मत ते आपल्यापाशींच न ठेवितां कृतींत उतरून दाखवीत असत. शंकरराव कोणत्याही एका ठिकाणीं फार वर्षें राहिले नाहींत व पेन्शन घेऊन स्थायिक होण्यापूर्वीच काळानें त्यांचेवर झडप घातली, तरी पण नगरसारख्या ठिकाणीं ते कांहीं वर्षें होते, त्यावेळीं सामाजिक प्रगतिपर इतर कार्यें करीत असतांना अस्पृश्यांच्या शाळेकडे त्यांचें लक्ष वेधलें होतें. महारांच्या शाळेंत जाऊन तेथील मुलांना शिकवितांना यांना कित्येकांनीं पाहिलें आहे व त्याचप्रमाणें शाळेंत गेल्यावर मुलांना ते वारंवार उपदेशही करीत असत. "नगरच्या महाराच्या शाळेचे हेडमास्तर त्यांच्या कळकळीविषयीं मोठ्या भक्तीनें उद्गार काढीत असत" असें रा. धनेश्वर ह्यांनीं म्हटलें आहे. अशा प्रकारें अस्पृश्य वर्गांच्या मुलांच्या कल्याणासंबंधानें तळमळ ह्या पूर्वी कोणाही अधिकाऱ्यानें दाखविलेली नाहीं आणि आजही आपलें तें काम नसतांना महारांच्या शाळेंत मुद्दाम जाऊन त्यांना शिकविण्याचें कार्य करणारा एखादा अधिकारी महाराष्ट्रांत असल्याचें आम्हांस ऐकूनही माहीत नाहीं.

अहमदनगर येथें असतांना शंकररावांनीं दुसरी एक चिरस्मरणीय कामगिरी केली, तिचा ह्या 'सोशल सर्व्हिस'च्या काळीं प्रमुखत्वानें उल्लेख केला पाहिजे. कांहीं वर्षांपूर्वी सर नारायण चंदावरकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं शिमग्यांतील बीभत्स प्रकारांस आळा घालण्यासाठीं उत्साहाचे प्रयत्न झाले. परंतु जवळ जवळ चाळीस वर्षांपूर्वी शंकरराव पंडितांनीं नगरसारख्या मागें पडलेल्या ठिकाणीं ह्या कार्यास सुरवात केली व सर्व सुशिक्षित लोकांस एक नमुनेदार उदाहरण घालून दिलें. नगर येथें असतांना एके वर्षी त्यांनीं निरनिराळ्या पेठांत जाऊन, लोकांच्या भेटी घेऊन, शाळा मास्तरांना भेटून, शिमग्यांतील बीभत्स प्रकारांविरुद्ध लोकमत वळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. एवढा मोठा अधिकारी घरोघर जाऊन ह्या बीभत्स प्रकारांविरुद्ध संभाषणें करून लोकांचीं मनें वळवूं लागल्यावर त्या विषयाकडे लोकांचें लक्ष लागणें व त्यांच्या विचारांचा व आस्थापूर्वक केलेल्या उपदेशाचा त्यांच्या मनावर इष्ट परिणाम होणें हें अगदीं क्रमप्राप्त होतें. शंकररावांच्या ह्या प्रयत्नाला उत्तम यश प्राप्त झालें. शिमग्याच्या दिवसांतच ज्याच्यायोगें सर्व गलिच्छ प्रकारांपासून शाळांतील मुलांना दूर ठेवितां येईल असें शिमगाप्रदर्शन नगर येथें सुरू झालें. नगर शहरांत सुरू झालेल्या ह्या नवीन प्रकाराची बातमी

जिकडे तिकडे पसरतांच परगांवचे लोकही मोठ्या कौतुकानें हें प्रदर्शन पहावयास आले व ह्या संस्थेची उपयुक्तता आलेल्या लोकांस पटली व रा. धनेश्वर म्हणतात कीं, हल्लीं सर्व मोठमोठ्या शहरांतून नगरचें अनुकरण झालें आहे.

शंकरराव खरेखुरे कर्ते सुधारक होते. त्यांच्या संबंधाचा पुढील उतारा त्यांच्या धडाडीची व त्यांच्या बाणेदारपणाची साक्ष पटवून देत आहे. " पोहणाऱ्या माणसाला ज्याप्रमाणें जलौघाला न जुमानतां स्वबलावर तीरावर जावें लागतें, त्याप्रमाणें सुधारकाला जनरूढीची परवा न करितां उद्दिष्ट साधावयाचें असतें. अशा रीतीचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवून समाजसुधारणेचें कार्य करणारांपैकीं शंकरराव एक प्रमुख सुधारक होते. ज्या जनरूढींमुळें समाजाचा ऱ्हास झाला आहे आणि होत आहे, त्यांचें उच्चाटन मोठ्या शोर्यानें केलें पाहिजे. अशा मताचे राव बहादुर पंडित होते. जिच्या योगानें आपल्या प्रगतीला अडथळा होत असेल ती रूढी दुष्ट आणि घातक समजावी व तिच्या उच्छेदाला लागावें हेंच खऱ्या सुधारकाचें कर्तव्य होय......बालविवाहाला आळा पडावा, बालावृद्ध विवाहाचा प्रतिकार व्हावा अगर पुनर्विवाहनिषेधासंबंधानें जो ढळढळीत अन्याय होत आहे तो होऊं नये असें जर आपणास वाटत आहे, तर त्याप्रमाणें आपण वर्तन ठेवलें पाहिजे, असें शंकरराव म्हणत असत. एकदां एका लग्नसराईत पंचावन्न वर्षांच्या वृद्ध गृहस्थाचें लग्न बारा वर्षांच्या कुमारिकेशीं होणार आहे ही फार निंद्य गोष्ट आहे, अशी बातमी सांगण्यासाठीं कांहीं सुधारणाप्रिय तरुण मंडळी त्यांजकडे गेली असतां त्यांनीं जे उद्गार काढले, त्यांवरून शंकरराव कोणत्या प्रतीचे सुधारक होते हें दिसून येतें. " असा बालावृद्धविवाह होणें खरोखरच अनिष्ट आहे असें जर तुम्हांला वाटत असेल तर तो न होईल अशी तुम्ही पराकाष्ठा करा ! हा केवळ अन्याय होत आहे अशी जर तुमच्या मनाची बालंबाल खात्री असेल, तर तो न होऊं देणें आपलें पवित्र कर्तव्य आहे, अशी भावना मनांत बाळगून परिणामाकडे लक्ष्य न देतां त्याचा प्रतिकार करा ! तुमची दांडगाईची कृति कायद्यानें दोषार्ह आणि शिक्षेला पात्र ठरेल ह्या भीतीनें कर्तव्यपराङ्मुख होऊं नका ! प्रसंगविशेषीं तुरुंगांत जाण्याची पाळी आली, तरी फिकीर नाहीं, परंतु सदसद्विवेक बुद्धीनें न्याय्य ठरविलेलें कार्य करण्याला कसर करूं नका " अशा प्रकारचा निर्वाणीचा उपदेश करणारे आगरकर समाजसुधारणेच्या क्षेत्रांत आवेशानें येण्यापूर्वीचा शंकररावांचा हा उपदेश आहे एवढें लक्ष्यांत घेतलें म्हणजे सामाजिक सुधारक ह्या नात्यानें त्यांची योग्यता आपल्या ध्यानांत येते.

## शंकरराव व प्रार्थनासमाज.

मनोरंजनांतील रा. रा. धनेश्वर ह्यांच्या लेखांत "ते प्रार्थनासमाजिस्ट होते" एवढीच बातमी देऊन शंकररावांच्या प्रार्थनासमाजाशीं असलेल्या संबंधाची समजूत केली आहे. शंकरराव प्रार्थनासमाजिस्ट होते एवढें म्हटल्यानें कांहींही बोध होत नाहीं. केरळकोकिळ मासिकाचे संपादक महाराष्ट्रभाषाचित्रमयुर आठल्ये हेही एके काळीं प्रार्थनासमाजिस्ट होते. शंकररावांचा असा विश्वास होता कीं, धर्म हाच सर्व उन्नतीचा पाया आहे, म्हणून त्यास प्राधान्य दिलें तरच आमची सर्व प्रकारची उन्नति जशी व्हावी तशी होणार आहे. ज्याप्रमाणें सामाजिक बाबतींत ते कर्ते सुधारक होते त्याचप्रमाणें धर्मविषयक बाबतींतही त्यांचें धोरण होतें व याचा उल्लेख वर आलाच आहे. सोलापूर सारख्या ठिकाणीं आपला द्वितीय संबंध त्यांनीं घडवून आणिला आणि तोही समाजाचे सभासद नसणाऱ्या एका गृहस्थाच्या मुलीशीं. असें असून त्यांनीं विवाहविधि जुन्या रीतीनें होऊं दिला नाहीं. ह्या एका गोष्टीवरूनही समाजावरील त्यांच्या निष्ठेची वाचकांस कल्पना होईल. त्यांचें मुंबईसारख्या ठिकाणीं जर दीर्घकाळपर्यंत वास्तव्य झालें असतें, तर त्यांच्या विचारांचा प्रसार पुष्कळ अधिक झाला असता. ह्या अनुष्ठानाच्या संबंधानेंच विचार करितां १८७९ सालांतील एक गोष्ट येथें नमूद करण्यासारखी आहे. ता. १८ मार्च हा त्या वर्षी १२ व्या उत्सवाचा मुख्य दिवस होता. सकाळची उपासना रा. वामनराव मोडक ह्यांनीं चालविली होती. त्या वेळीं त्यांनीं दिलेल्या व्याख्यानाचा विषय "गेल्या बारा वर्षांत प्रार्थनासमाजाच्या लोकांनीं आपलीं विहित कर्में केलीं किंवा नाहीं याचा हिशेब" हा होता. एका तपाच्या अखेरीस हिशेब पहातां आपल्या हातून विशेष कांहींच झालें नाहीं असें त्यांनीं सांगितलें होतें. "जितकीं विहित कर्में करणें आहे तितकीं त्यांच्या हातून न होण्याचें कारण ईश्वरभक्तीची कमताई" असें त्यांनीं बजाविलें होतें. हा विषय मनामध्यें ताजा असतांनाच त्याच दिवशीं दोन वाजतां "समाजाच्या स्थितीविषयीं विचार झाला." व त्या विषयीं सर्व बाजूंनीं वादविवाद होऊन नारायणभट्टी वगैरे जे निरनिराळे सोळा संस्कारांच्या संबंधाचे ग्रंथ आहेत त्यांचें अवलोकन करून, त्यांतून गाळण्यासारखा भाग टाकून, ग्राह्य भाग घेऊन लग्न आदिकरून जे सभासदांस अनेक विधि व संस्कार करावयाचे असतात ते आपल्या मतांस अनुसरून करितां यावे म्हणून कांहीं एक पद्धत तयार करावी व हें काम करण्यासाठीं शंकरराव पंडित, वामन आबाजी मोडक, रामकृष्णपंत भांडारकर व भोलानाथ साराभाई ह्यांची कमिटी

नेमिली गेली; ह्या एका कार्यी शंकररावांचें मुख्य अंग होतें असें दिसून येतें. म्हणजे सर्व बाबतींत धर्माचें अनुष्ठान राखिलें पाहिजे, अशा मतांचे ते होते, हें ह्यावरून उघड होतें. पुढल्या वर्षीच्या उत्सवाच्या वेळीं रा. ब. पंडित मुंबईसच होते. त्यावेळीं अनुष्ठानपद्धतीसंबंधानें त्यांनीं अशी माहिती दिली कीं विवाह व अंत्येष्टी ह्या संबंधाचा थोडा भाग व्हावयाचा राहिला आहे. बाकी सर्व पद्धति तयार आहे. रा. सदाशिव पांडुरंग व डॉ. भांडारकर ह्यांनीं तयार केलेला विवाहविधि हा नव्हे. ह्या कमिटींत डॉ. भांडारकर होते. हे तयार असलेले विधि समाजाच्या ताब्यांत आले नाहींत. आजच्या काळीं नामकरण, उपनयन, अंत्येष्टी, श्राद्ध ह्या संबंधानें महर्षि देवेंद्रनाथकृत विधींच्या आधारानें तयार झालेले विधि लेखरूपानें अस्तित्वांत आहेत. त्यांचे कांहीं धर्मविषयक विचार आम्ही पुढें नमूद करणारच आहों; परंतु येथें त्यांच्या धर्मविषयक एका मोठ्या कामगिरीचा विशेष उल्लेख केला पाहिजे. ही कामगिरी म्हणजे त्यांनीं संपादिलेली तुकारामाची गाथा ही होय. ही गाथा इंदुप्रकाश छापखान्यांत छापिलेली असल्यामुळें व विष्णुशास्त्री पंडित हे शंकररावांचे सहकारी संपादक होते, म्हणून ही गाथा इंदुप्रकाश गाथा ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ह्या गाथेनें तुकारामाची सुशिक्षित लोकांस ओळख करून देण्याच्या कामीं मोठीच कामगिरी बजाविली आहे. माधवचंद्रोबा ह्यांनीं प्रसिद्ध केलेला, शिळा छापावर छापलेला व शब्द न तोडलेला असा तुकोबांच्या अभंगांचा संग्रह तत्पूर्वी होता; परंतु शंकररावांनीं अतिशय श्रम करून तयार केलेल्या दोन भागांशीं त्याची तुलना करितां यावयाची नाहीं. अनेक प्रती जवळ घेऊन, त्यांतील जी अधिक विश्वसनीय प्रत अशी अंतःप्रमाणांवरून ठरली ती मूळ घेऊन, सांपडलेल्या सर्व प्रतींत जेथें जेथें महत्त्वाचे पाठभेद आढळले तेथें तेथें ते पाठभेद व अवांतर माहिती देणारी शुद्ध प्रत हीच आज मानिली जात आहे. अलीकडे तुकोबांचे एक टाळकरी जगनाडेबुवा ह्यांनीं लिहिलेले कांहीं अभंग " तुकारामाची अस्सल गाथा " म्हणून पुढें आली आहे. परंतु ह्या गाथेचें नांव घोटाळा करणारें आहे. खरें पाहतां तुकारामाच्या अभंगांची जगनाडे बुवांनीं लिहिलेल्या अभंगांची ही अस्सल गाथा आहे. अस्सलपणा जगनाडेबुवांच्या लिखाणासंबंधाचा आहे. तेवढयावरून ती अस्सल गाथा ठरत नाहीं. शंकररावांच्या प्रतीला जोडलेली प्रस्तावना व चरित्र हीं अत्यंत काळजीपूर्वक लिहिलेलीं आहेत. आणि हें सर्व कार्य करण्याच्या कामीं प्रार्थनासमाजाच्या एका सभासदानें पुढाकार घेतला आहे. इंदुप्रकाश प्रत सर्व विद्वानांस, शोधकांस, भक्तांस व मुमुक्षूंस मान्य अशी असून तितक्या मोठ्या टाईपांत छापलेली शुद्ध प्रत तीच आहे.

प्रार्थनासमाजासंबंधाची शंकररावांची दुसरी कामगिरी अशी झालेली आहे कीं, त्यांनीं प्रथम प्रार्थनासमाज व ब्राह्म धर्म ह्यांसंबंधानें आपली स्वतःची समजूत निश्चित करून घेतली व ह्या दोहोंसंबंधानें निरनिराळ्या वेळीं आक्षेपनिरसनाचें कार्य केलें. हें कार्य आजही करावें लागतेंच, अर्थात पन्नास वर्षांपूर्वी त्याची अधिकच आवश्यकता होती हें उघड आहे. प्रार्थनामंदिरांतील उपासनांस स्त्रीपुरुषांनीं एकत्र जमणें ह्याविरुद्ध होणाऱ्या आक्षेपांस ज्याप्रमाणें पुढें डा. भांडारकरांना केसरींतील लेखांसंबंधानें उत्तर द्यावें लागलें, त्याप्रमाणें शंकररावांनींही दुसऱ्या आक्षेपकांस उत्तर दिलें आहे. १८७९ सालीं उत्सवांतील उपक्रमोपासनेच्या वेळीं ते म्हणाले:—

"कोणी अशी शंका काढतात कीं, हिंदुस्थानांत इतके अनेक भक्तीचे प्रकार असून प्रार्थनासमाज अथवा ब्राह्मसमाजाच्या लोकांनीं हा नवीन व परदेशीय प्रकार काढण्याची काय जरूर आहे? आतां नवीन ह्या शब्दाचे दोन अर्थ होतात. एक असा कीं, इतर देशांत चालू असून आपल्या देशांत पूर्वी कधीं चालू नसणारा, व दुसरा हा कीं, पृथ्वीवर कोठेंही चालू नसणारा. कोणतीही गोष्ट केवळ नवीन असून जर ती योग्य आहे, तर ती चालू करणें यांत दोष नाहीं. परंतु त्याचा ह्या ठिकाणीं विचार कर्तव्य नाहीं. सामाजिक उपासनेचा प्रकार प्राचीन काळीं चालू होता हें वेदांतील अनेक ऋचांचें प्रमाण देऊन सिद्ध करतां येतें. कण्व कुलांतल्या लोकांनीं व गौतम कुलांतल्या लोकांनीं आपल्या अभीष्ट देवतेस एकत्र जमून सामाजिक उपासना केली, याविषयीं वेदांत प्रमाण आहे. श्राद्धादिकाळीं सर्व कुटुंबांतल्या माणसांनीं एकत्र जमणें हा एक सामाजिक उपासनेचाच प्रकार आहे. गृहांत देवतांच्या ज्या मूर्ति असतात त्यांस त्याच ठिकाणीं ठेवून मोठमोठाल्या प्रसिद्ध ठिकाणच्या देवळांत एकत्र मिळून देवदर्शनास म्हणून जाणें हा एक सामाजिक उपासनेचाच म्हणून प्रकार होय. पंढरीसारख्या ठिकाणीं यात्रा भरतात हाही प्रकार त्यांतलाच होय. म्हणूनच प्रार्थनासमाज किंवा ब्राह्मसमाज यांचा प्रार्थना करण्याचा प्रकार नवीन नाहीं असें होतें, तर जुन्याचेंच पुनरुज्जीवन केलें हें सिद्ध होतें. इतर देशांविषयीं व धर्मांविषयीं पाहिलें तर हा प्रकार तेथें चालू आहेच. तेव्हां सामाजिक उपासना करणें हा प्रकार कोणत्याही अर्थानें नवीन नव्हे. परंतु इतकेंच म्हटल्यानें आपण कृतकृत्य होत नाहीं. सामाजिक उपासना ही पाहिजेच; परंतु आठवड्यांतून एकदां कार्य केल्यानें फारसें कार्य होणार नाहीं. त्रिकाल संध्या करण्याची रीत जी मागें चालू होती त्यासारखी रीत सध्या चालू

ठेविली पाहिजे. म्हणजे आपण कोठेंही असलों तरी परमेश्वराची आराधना त्रिकाल केली पाहिजे. तसें केलें असतां त्रिकाल संध्या होऊन पारमार्थिक विशेष लाभ होईल."

ब्राम्हधर्मावर निरनिराळ्या प्रकारची टीका होत असते. त्या सर्वांस उत्तर देणें कठिण आहे. परंतु सन १८८० सालीं शंकररावांनीं ब्राम्हधर्मासंबंधानें आक्षेप व त्यांस उत्तर अशा विषयावर इंग्रजींत व्याख्यान दिलें. त्याची छाया अशी आहेः आमच्या धर्माचीं तत्त्वें पाहिलीं म्हणजे पुष्कळशीं आपलींच अगर आपल्या धर्मातील तत्त्वांसारखींच वाटतात आणि म्हणून ह्या समाजाच्या निराळेपणाचें गूढ त्यांस उकलत नाहीं. विचारी हिंदु म्हणणार हीं सर्व तत्त्वेंही आमच्यांत आहेत, मग तुम्ही निराळेपणा कशाला मिरवितां ? जैन म्हणणार आम्हीही वेदांना ईश्वरप्रणीत मानीत नाहीं, आम्हीही सर्व वेदांना रजा दिली आहे; मग हे आम्हांलाच कां येऊन मिळत नाहींत ? बुद्धधर्मीयांना वाटणार, जातिभेद मानावयाचा नाहीं व सर्व मनुष्यें बंधुसमान लेखावयाचीं आणि इतकें करून बौद्धधर्मानुयायी आपल्यास म्हणवावयाचें नाहीं याचा अर्थ काय ? ख्रिस्ती म्हणणार, तुम्ही ख्रिस्ताला इतका मान देतां, त्याचें देवत्व कबूल करण्यापर्यंत जणूं काय तुम्ही येतां, तरी तुम्ही ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करीत नाहीं याला काय म्हणावें ? मुसलमान म्हणणार आम्ही एक देवाला मानतों; तुम्ही एक देवाला मानतां; आम्हीं प्रतिमापूजनाचा त्याग केला आहे, तुम्हीही प्रतिमापूजन हा ईश्वरोपासनेचा खरा मार्ग नव्हे म्हणतां तरी तुम्ही आमच्यापासून दूरच ! पाझिटिविस्ट्स म्हणणार आमच्याप्रमाणेंच पुराव्यावांचून तुमचें पाऊल पुढें पडत नाहीं, तरी तुम्ही आमच्या विचारांचा स्वीकार करीत नाहीं. पारशी धर्मानुयायी म्हणणार पवित्र विचार, पवित्र भाषा व पवित्र आचार ह्यांस आमच्याप्रमाणें तुम्हीही महत्त्व देतां; तरी तुम्ही झरदुष्ट्राचे अनुयायी होत नाहीं. एवढेंच नाहीं, तर पुष्कळ वेळां आमच्यावर अशीही टीका होत असते कीं, इकडलें थोडें, तिकडलें थोडें मिळवून ही कंथा अगर गोधडी तयार केलेली आहे, झालें. ह्या सर्वांस आमचें असें उत्तर आहे कीं, आमचा सर्व धर्मांशीं प्रेमाचा संबंध आहे. आमचीं तत्त्वें सर्व धर्मांत सांपडल्यासारखीं आहेत हें कांहीं खोटें नाहीं तथापि कांहीं तत्त्वें सर्वसाधारण नाहींतही. परमेश्वराचें पूर्णत्व, त्याचें पितृत्व व आपलें भ्रातृत्व, मनुष्यांचें अपूर्णत्व व आपल्या उन्नतीची व उद्धाराची आवश्यकता हीं सर्व तत्त्वें एकाच ठिकाणीं आहेत. आतां धर्माच्या बाबतींत हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, धर्मासही वाढ आहे,

ही गोष्ट ब्राम्हधर्मानें विशेष प्रकारें दृष्टीपुढें ठेविली आहे आणि इतर लोक ती गोष्ट लक्षांत घेत नाहींत. आमच्या ज्ञानांत दिवसेंदिवस भर पडत आहे, नवीन नवीन शोध लागून आमच्या विचारांत क्रांति होत आहे. अर्थात ह्या ज्ञानाच्या वाढीबरोबर धर्मविषयक समजुतींत फरक पडत आलाच पाहिजे. अशा प्रकारें धर्मांची व धर्मविषयक उन्नतीची वाढ करण्याचीं साधनें अनुकूल होत असतांनाही वाढीचो इच्छा वाढीस जाचक व मारक न होईल अशी तजवीज झाली पाहिजे. झाडाच्या वाढीस पाणी, खत ह्यांची आवश्यकता आहे. पण हें पाणी चांगलें, खत कसदार ज्याप्रमाणें पाहिजे त्याप्रमाणें तीं जितकीं आपल्या हाताशीं असतील तितकीं चांगलीं; आणि हीं हाताशीं असतांना दूरचीं शोधण्यांत व आणण्यांत कालक्षेप करणें वेडेपणा आहे. हीच गोष्ट धर्मवृक्षास लागू आहे. सर्व धर्मांविषयीं आम्हांस आदर आहे व सर्व धर्मांचे ग्रंथ हे आमचेच होत असेंही आम्हांस साभिमानपूर्वक म्हणतां येतें. कारण सर्वांतील जें सत्य त्याचा आदरपूर्वक स्वीकार करावयास आम्ही सिद्ध असतों. तथापि आपल्या धर्मपुस्तकांत तीं प्रमेयें असलीं तर त्यांतूनच तीं आमच्या लोकांपुढें ठेविलीं असतां अधिक लवकर मनावर परिणाम करितात व त्यांचे विषयीं आपलेपणा उत्पन्न होतो. आणि आपल्या पुरातन धर्मग्रंथांनीं महत्कार्य केलेलें आहे; लक्षावधी जनांस धर्माची गोडी लाविली आहे. ह्यासाठीं सर्व धर्मांच्या ग्रंथांचें आस्थापूर्वक अध्ययन करून त्यांतील सत्य ग्रहण करण्याची व आपल्या ग्रंथांतील तींच प्रमेयें लक्षांत घेऊन असा सार्वत्रिक धर्म लोकांपुढें आपल्या वळणास अनुकूल अशा रीतीनें ठेवणें हें आपलें कार्य आहे.

त्याचप्रमाणें पहिल्या अकरा वर्षांत प्रार्थनासमाजानें बजाविलेली कामगिरी आणि पुढें करावयाचें कार्य ह्यासंबंधानेंही त्यांचे विचार किती निश्चित व प्रौढ होते ते पहाः—

"शेंकडों आणि हजारों वर्षांपासून आपल्या हतभाग्य देशबांधवांना जरी धर्मासंबंधीं, जनव्यवहारसंबंधीं आणि राज्यसंबंधीं जें सत्य त्याचें दर्शन यथार्थ झालें होतें, तथापि आपल्या लोकांनीं त्या सत्यदर्शनापासून लाभ करून न घेतां ते अयोग्य मार्गी प्रवृत्त झाले. त्यावरून धर्मांच्या गोष्टींविषयीं, जनव्यवहाराच्या गोष्टींविषयीं आणि राजकीय गोष्टींविषयीं आम्हास मोठेंच दैन्य आणि निकृष्टत्व प्राप्त झालें. तें इतकें कीं सत्याचें दर्शन वारंवार होत असतांही त्याचा स्वभावच जणूं असावा त्याप्रमाणें आपण वागूं लागलों. खरें काय आणि खोटें काय ह्याविषयीं आम्हांस कधींच ज्ञान प्राप्त झालेलें नाहीं अशा रीतीनें आमची प्रवृत्ति झालेली आहे. तर धर्म, जनव्यवहार

आणि राजकीय स्थिति ह्यांविषयीं आपलें योग्य कर्तव्य असेल तें जाणणें, त्याप्रमाणें वागणें, आणिं त्या प्रकारची इतर जनांची प्रवृत्ति करविणें हें जें पर्वतप्राय महत्कार्य आपण आपल्या माथीं घेतलें आहे, त्यांतून ह्या दाहा वर्षांत किती सिद्धीस गेलें असा प्रश्न केला तर फार कांहीं झालेलें असें जरी सांगतां येत नाहीं तरी हें कार्य कर्तव्य आहे, आणि तें सत्य आहे, अशी जर आमची खात्री असेल तर आपण निरुत्साह आणि निराश होण्याला कांहीं कारण नाहीं. अशा प्रकारचीं मोठमोठीं कार्यें सिद्धीस नेणें म्हटलें म्हणजे जगाच्या इतिहासांतील प्रसिद्ध उदाहरणें पाहिलींतर एकाच जन्मींचें काम नसतां जन्मजन्मांतरें घालविलीं तरच घडत असतें. आपण जीवंत असों तोंपर्यंत ह्या त्रिविध कर्तव्याच्या सिद्धीसाठीं झटलों तर आमचे पुत्रपौत्रादि वंशज होतील तेही तें काम आपल्या हातीं घेतील आणि पुत्रपौत्रादि आपली पिढी होते हें आपलें दुसरें जन्मच समजलें पाहिजे. अशीं आपलीं अनेक जन्मान्तरें होतील तेव्हां हें महत्कार्य तडीस गेलें तर फार दिवस लागले असें म्हणतां येणार नाहीं. कारण जे मनुष्य पुष्कळ वेळ वाट चुकून आडरस्त्यानें जातात त्यांस परत सत्यमार्गी जाण्यास फार वेळ लागत असतो. धर्म, जनव्यवहार आणि आपल्या ऐहिक गोष्टींची व्यवस्था करणारी जी राजकीय स्थिति ह्या त्रिविध वस्तूंच्या संबंधानें आपले कोट्यवधि लोक खरा मार्ग सोडून खोट्या मार्गानें हजारों वर्षेंपर्यंत चालत आले आहेत त्यांस निवृत्त करणें हें महत्कार्य अकरा वर्षांत आपणां दुर्बळांकडून सिद्धीस गेलें नाहीं इतक्याचमुळें निरुत्साह, निरुद्योगी, आणि निराश होणें हें अयोग्य आहे. परंतु हें जें कार्य आपण हातीं घेतलें आहे, तें खरें आहे, तें सत्यरूप आहे, तें निष्कपट आहे, तें शुद्ध आहे, तें ईश्वरास प्रिय आहे, तें करणें यांतच आपलें सर्व पर्यवसान असणें योग्य होय, अशी जर आमची मनापासून खात्री असेल, आणि तें सिद्धीस नेण्यासाठीं आपण एक भावानें, अनन्य प्रेमानें झटलों तर तें सिद्धीस कसें जाणार याविषयीं आपण संशयग्रस्त असूं नये. कारण जर कार्य खरें आणि ईश्वरास प्रिय आहे तर तें सिद्धीस नेण्याला ईश्वराला मोठमोठीं साधनें लागत नसतात. तो यःकश्चित, लोकनिंदित आणि दुर्बळ अशा साधनांनीहि तें सिद्धीस नेतो ह्याविषयीं पुष्कळ उदाहरणें जगाच्या इतिहासांत सांपडतील......तर आम्ही दुर्बल आणि थोडीं माणसें हें पर्वतप्राय कार्य सिद्धीस नेण्यास असमर्थ आहों असें समजून आपण निरुत्साह आणि निरुद्योगी आणि निराश होऊं नये, तर ईश्वरावर भार घालून मोठ्या उत्साहानें आणि आस्थेनें अप्रतिहार्य व्यासंग करीत राहिलें

पाहिजे; आणि व्यासंग करितां करितां जरी आपणास यश प्राप्त झालें तरी आपण जितलों असें मानतां नये. कारण जोंपर्यंत पूर्णदशेला आलेला वृक्षहि मोठें एखादें वादळ आलें असतांही हालला नाहीं असें आपणास दृष्टीस न पडेल तोंपर्यंत त्या वृक्षाच्या अंगीं जोर आहे, असें समजूं नये. मोठें वादळ नाहीं आलें तोंपर्यंत मोठ्या डौलानें उभे असणारे पुष्कळ वृक्ष असतात, पण वादळाला जो न हालला, अत्युष्णतेपासून जो न सुकला, अतिशैत्यापासून जो न कोमेजला आणि पाणी न मिळालें असतांही जो न वाळला तो वृक्ष सबळ खरा. त्याप्रमाणें आपल्या ह्या महत्कार्यवृक्षाला अनेक आणीबाणीचे प्रसंग आले असतांही तो अधिकाधिक प्रबळ, अधिकाधिक प्रवृद्ध होईल तेव्हां आपण जिंकलों असें म्हणतां येईल."

अशा प्रकारें पुष्कळ वर्षेपर्यंत शंकररावांनीं समाजाची सेवा केली. अहमदनगर येथें असतांना त्यांनीं तेथील समाज नांवारूपास आणिला. त्यांचे उदार विचार, त्यांचा निस्पृहपणा व त्यांची विद्वत्ता यांचा तेथील लोकांवर इतका परिणाम झाला कीं, त्यांनीं शंकररावांच्या अज्ञानाचा लाभ आपल्याला मिळावा म्हणून एक व्याख्यान माला सुरू केली व तेथें शंकररावांचींच व्याख्यानें झालीं. सकृद्दर्शनीं त्यांचा चेहरा थोडा उग्र दिसे; परंतु थोडा परिचय होतांच त्यांची सत्यनिष्ठा व त्यांचा करारीपणा त्यांच्या चर्येवर प्रतिभात झाला असल्याचा अनुभव येई. संभाषणामध्यें ते थोडे घाईघाईनें बोलत आहेत असें वाटे; तथापि व्याख्यानाच्या वेळीं त्यांचा लहान पण स्पष्ट आवाज, प्रत्येक शब्द विचारपूर्वक व तोलून जणूं काय उच्चारलेला, पाहून त्यांचें व्याख्यान अत्यंत परिणामकारक होत असे.

---

## ( १३ ) दीनानाथ विष्णु माडगांवकर.

अवघी चित्तवृत्ति एकवटोनि जेणें ।
अवघा धरिला मनें देवराव ॥
अवघें सुख एक तयासी फावलें ।
अवघें सफल झालें जन्म त्याचें ॥ १ ॥

आपला दीर्घोद्योग, समाजकार्याविषयीं परम आस्था, असामान्य सरल वृत्ति व साधेपणा, व दुर्मिळ विनयशील स्वभाव ह्यांच्यामुळें जे सर्वांस प्रिय झाले होते, महाराष्ट्र काव्यवाङ्मयाशीं झालेला त्यांचा परिचय; ज्ञानेश्वर, तुकाराम रामदास, एकनाथ, देवनाथ, तुळशीदास, नानक, कबीर ह्यांच्या कृतीशीं समरस होऊन कित्येक वर्षे त्यांच्या सहवासाचा जे आनंद भोगीत होते, ज्यांची चिकित्साबुद्धि मोठमोठ्या पंडितांस लाजविणारी होती, जवळ जवळ पन्नास वर्षे ( बहुतेक स्थापनेपासून ) प्रार्थनासमाजाशीं ज्यांचा अत्यंत निकट संबंध होता, पायाशुद्ध आचरण, गोड स्वभाव, धर्मावरील अचल निष्ठा, ह्यांच्यायोगें जे सर्वांस आदरणीय झाले होते, ते आमचे सन्मान्य बंधु रा. रा. दीनानाथ विष्णु माडगांवकर, बी. ए. ह्यांस वयाच्या ७० व्या वर्षी रविवार ता. ७ जानेवारी १९१७ रोजीं प्रातःकाळीं ७ वाजतां देवाज्ञा झाली. त्यांच्या चरित्राचा अल्प परिचय ह्या लेखाच्याद्वारें करून देण्याचा प्रयत्न करितों.

मृत्युपूर्वी कित्येक महिने दिनानाथरावांची प्रकृति मधुमेहाच्या विकारानें बिघडली होती. कलकत्त्यास असतांना ते अत्यवस्थ होते व त्या दुखण्यांतून उठतील असें कांहीं वाटलें नव्हतें. परंतु त्यांच्या हातून समाजाची आणखी सेवा व्हावयाची होती. त्यांच्या मोठ्या कुटुंबाला, त्यांच्या पवित्र सहवासाचा आणखी लाभ व्हावयाचा होता. म्हणूनच कीं काय ते दुखण्यांतून वांचले व डिसेंबर महिन्यांत रा. रा. कृष्णराव माडगांवकर ह्यांच्या मुलीच्या विवाहाच्या वेळीं त्यांस येथें आणिलें, त्याचवेळीं त्यांची प्रकृति फार क्षीण झालेली होती व विवाहाच्या दिवशीं त्यांचें ज्यांना दर्शन झालें त्यांस ' दीना नाना ' या दुखण्यांतून उठत नाहींत असें वाटलें असावें. मध्यंतरीं त्यांस थोडासा आराम वाटूं लागला होता व तेवढ्या अवधींत त्यांच्या आवडीच्या विषयांकडे ते लक्ष लावूं लागले होते; शनिवारीं रात्रीं त्यांचा अंत समीप आल्याचा संशय कोणास आला नाहीं. शनिवारीं सायंकाळीं आमचे बंधु रा. कोरगांवकर ह्यांच्याशीं त्यांचें नेहमीं प्रमाणें

संभाषण झालें, प्रार्थना संगीताच्या त्यावेळीं तयार होत असलेल्या नव्या आवृत्तीचा एक भाग रा. कोरगांवकरांच्या स्वाधीन केला व दुसऱ्या कांहीं विषयांसंबंधानें भाषण झाल्यावर आपले कनिष्ठ पुत्र केशवराव यांची समाजाचे सभासद होण्याची तयारी आहे असें दिसतें, तर त्यांस सभासद करण्याची व्यवस्था करा असें सांगून त्यांनीं कोरगांवकरांस रजा दिली. पण त्या वेळीं हा आपल्या मित्राचा अखेरचा निरोप होय असें रा. कोरगांवकरांस वाटलें नाहीं.

पण सकाळीं सात वाजतां सर्व शक्तीचा ऱ्हास झाल्यामुळें एकाएकीं दीनानाथरावांचा अंत त्यांच्या शांत वृत्तीस शोभेल अशा रीतीनें झाला.

प्रार्थनासमाजाची स्थापना १८६७ सालीं झाली. त्या वेळीं दीनानाथराव माडगांवकर, बी. ए. च्या वर्गांत होते. त्यांनीं १८६८ सालीं बी. ए. ची पदवी घेतली. ते विद्यार्थी होते व त्यांचा विनयशील स्वभाव ह्या कारणांसाठीं समाजाच्या स्थापनेच्या वेळीं ते सभासद झाले नाहींत. पण आणखी चार महिन्यांनीं म्हणजे १८६७ च्या जुलै महिन्यांत म्हणजे ज्या वेळीं समाजाचे सर्व नियम व घटना कायम झाली त्या वेळीं ते मुंबईच्या समाजाचे सभासद झाले.

दीनानाथरावांचा प्रार्थनासमाजाशीं जो संबंध होता तो अति निकट होता हें वर आलेंच आहे. त्यांच्या विनयशील स्वभावामुळें ते कधीं लोकसमूहापुढें आले नाहींत. समाजाच्या व्यवस्थापक मंडळीच्या किंवा साधारण सभेमध्यें ते जें काय बोलले असतील तेवढेंच, परंतु एखादें व्याख्यान देणें अगर एखाद्या विषयावर मोठ्या सभेमध्यें वादविवाद चालविणें हें कार्य त्यांच्या हातून झालें नाहीं.

प्लेगची साथ जेव्हां प्रथमच मुंबईस आली व ज्या वेळीं बहुतेक सभासद शहर सोडून गेले होते, त्या वेळीं एका मेजाभोंवतीं तीन चार मंडळी जमून उपासना उरकून घेत असत, त्या वेळीं व एकदां दुसऱ्या एका प्रसंगीं दीनानाथरावांनीं उपासना चालविल्याचें आम्हांस स्मरतें. परंतु मुंबईत असतील तेव्हां नियमानें उपासनेला येऊन अत्यंत भाविकपणानें उपासनेचा लाभ घेतांना पाहिलें म्हणजे त्यांच्या त्या भाविक वृत्तीचा पहाणाऱ्याच्या मनावर अत्यंत इष्ट परिणाम होत असे. त्यांनीं आपणास प्रिय असलेल्या प्रार्थनासमाजाची सेवा अनेक प्रकारें केली आहे. आणि आतां इतक्या वृद्ध वयांतही प्रार्थना संगीतासंबंधानें त्यांचा जो उद्योग चालू होता त्याचा विचार मनांत आला व त्यांनीं केलेलें कार्य दृष्टीपुढें आणिलें कीं, त्यांच्यासंबंधानें मनामध्यें जितका आदर उत्पन्न होतो, तितकीच स्वतःविषयीं

लाज वाटूं लागते! मृत्युनंतर त्यांच्या बिछान्याच्या उशाशीं असलेलीं पत्रें प्रस्तुत लेखकानें जीं काढिलीं तीं प्रार्थनासंगीतासंबंधाचीं होतीं.

दीनानाथरावांनीं प्रथम थीईस्टिक असोसिएशनच्या चिटणीसाचें, समाजाच्या हिशेबतपासनीसाचें, चिटणिसाचें, उपाध्यक्षाचें वगैरे कामें उत्तम प्रकारें केलीं.

कांहीं वर्षे ते सुबोधपत्रिकेचे संपादक होते. ह्या वेळच्या ह्यांच्या कार्यासंबंधानें लिहितांना एका गोष्टीचा विशेष उल्लेख केला पाहिजे. प. वा. रा. ब. रानडे ज्यावेळीं मुंबईंत न्या. मू. होऊन आले त्या वेळीं न्यायमूर्तीनीं भागवतधर्मावरील व्याख्यानांस प्रारंभ केला. दीनानाथरावांची स्मरणशक्ति तको तरतरीत होती कीं हीं व्याख्यानें चालू असतां त्यांतील महत्त्वाचे शब्द त्यांनीं उतरून घ्यावेत, नंतर सबंध व्याख्यान घरीं गेल्यावर लिहून काढावें.

अशा प्रकारें न्या. मू.चीं व डा. भांडारकरांचीं बरींच व्याख्यानें त्यांनी उत्तम प्रकारें लिहून काढिलीं, व त्यांच्याच उदाहरणाचा त्यांच्या मागून आलेल्या संपादकानें कित्ता पुढें ठेवून धर्मपर व्याख्यानें अस्पष्ट रूपानें तरी कायम ठेवण्याचा प्रयत्न केला. दिनानाथरावांनीं मार्ग दाखवून उदाहरण घालून दिलें नसतें, तर अगदीं पूर्वीच्या अत्यंत महत्त्वाच्या व्याख्यानांस ज्याप्रमाणें आपण मुकलों, त्याचप्रमाणें पुढेंही अनुभव आला असता. ही त्यांची सेवा अत्यंत महत्त्वाची होय. दीनानाथरावांनीं प्रार्थनासंगीतासंबंधानें जी कामगिरी केली ती सर्वांत श्रेष्ठ होय. संगीताची ७ वी आवृत्ति हल्लीं प्रसिद्ध आहे. ६ वी आवृत्ति तयार होत असतांनाही त्यांनीं अतिशयच परिश्रम घेतले होते; परंतु तींत राहिलेल्या चुका, अपपाठ, शब्दांचे चुकीचे अर्थ, ह्या आवृत्तींत ठेवावयाचे नाहींत म्हणून त्यांनीं नवी आवृत्ति सर्व प्रकारें उत्तम करण्याचा निश्चय केला. ह्यासाठीं त्यांनीं निरनिराळे ग्रंथ मागवून त्यांचें वाचन केलें. तुकारामाच्या अभंगांचा अत्यंत आस्थापूर्वक अभ्यास केला. तुळशीदासाचीं फारच थोडीं पदें संगीतामध्यें आहेत हें जाणून त्या पद्यांचा त्यांनीं इतक्या बारकाईनें व शोधक बुद्धीनें अभ्यास केला कीं, हा त्यांचा उद्योग पाहून उत्तर हिंदुस्थानांतील एखाद्या पंडितासही आश्चर्य वाटावें! इतकें काम करूनही त्यांचें समाधान झालेलें नव्हतें. अद्याप कितीतरी कार्य व्हावयाचें आहे हें पाहून त्यांस फार चिंता वाटत असे. त्यांचा कलकत्त्यास मुक्काम असतांना ज्यांना त्यांची भेट त्यांच्या खोलीमध्यें घेण्याचा योग आला असेल त्यांना प्रार्थना संगीतासंबंधानें त्यांच्या चाललेल्या उद्योगाची चांगलीच कल्पना होत असावी. जवळपास तुकाराम, कबीर, नामदेव, एकनाथ इत्यादि साधूंचे ग्रंथ, डिक्शनऱ्या,

अनेक बारीक अक्षरांनीं लिहिलेले कागद, दांडगा पत्रव्यवहार पाहून त्यांचें जीवन कसें प्रार्थनासंगीतमय झालें होतें त्याची कल्पना होत असे. दीनानाथरावांना पद्यें रचण्याचा नाद असे. त्यांचीं कांहीं गोड पद्य ( प्रीति जडो, दाखवि तव दिव्य पाय, मम येऊ दया प्रभुराया रे, शाश्वत ऐहिक, बहु करुणा भाकिली, शोध करीं तूं, अनुदिन तूं इ० ) आपल्या प्रार्थना संगीतामध्यें असून त्यांतील कांहीं फार लोकप्रिय झालेलीं आहेत. शिवाय त्यांनीं श्लोक वगैरे पुष्कळ रचलेले आहेत. डॉ. भांडारकरांनीं जी संध्या संस्कृतमध्यें तयार केलेली आहे व जी बालधर्मानुशासन नामक पुस्तकांत दिलेली आहे. तिचें श्लोकबद्ध रूपांतर दीनानाथरावांनींच केलेलें आहे. ह्याशिवाय त्यांच्या बंधूंनीं तुकाराम, रामदास, ज्ञानेश्वर, ह्यांच्या समग्र ग्रंथांसंबंधानें जे उद्योग केले ते सर्व दीनानाथरावांच्या साहाय्यानें. रामदास स्वामींच्या समग्र ग्रंथांची आवृत्ति तयार होत असतांना बहुतेक सर्व काम त्यांनींच केलें व ज्ञानेश्वरी संबंधानेंही त्यांचा उद्योग दांडगा होता. त्याच प्रमाणें त्यांच्या संग्रहीं असलेल्या एकनाथी भागवताच्या पोथीवरील त्यांच्या टीपा पाहून कोणीही थक्क झाल्यावांचून रहाणार नाहीं. इतकी महाराष्ट्र सारस्वताची निस्सीम सेवा करूनही कांहीं परिचित माणसांच्या पलीकडे बाहेरच्या लोकांस, त्यांच्या परिश्रमांची, त्यांच्या चिकित्सक स्वभावाची, त्यांच्या उत्कट भक्तीची, त्यांच्या उद्योगाची फारशी माहिती नव्हती !

## त्यांचे विशेष गुण.

दीनानाथरावांच्या ठिकाणीं, अनेक अमोलिक गुण वसत होते, त्यांची थोडीशी ओळख येथें करून दिली पाहिजे. त्यांचा सर्वांत मोठा गुण म्हणजे त्यांची निगर्वी वृत्ति व त्यांचा साधेपणा. प. वा. मामा परमानंद ह्यांस ते गुरुस्थानीं मानीत असत. त्यांच्याविषयीं बोलतांना त्यांचा दिसून येणारा आदर पाहूनच त्यांच्या गुरुभक्तीची कल्पना होत असे, व निगर्वी वृत्ति व साधेपणा हे दोन गुण त्यांनीं आपल्या गुरूपासूनच घेतले होते. त्याचप्रमाणें त्यांचे बंधु रामभाऊ ह्यांचे विषयीं त्यांच्या ठिकाणीं उत्कट आदरभाव दिसून येत असे. रामभाऊ त्यांचे जेष्ठ बंधु परंतु दीनानाथराव त्यांस वडिलांप्रमाणें मान देत असत व रामभाऊंचेंही त्यांच्यावर तशाच प्रकारचें प्रेम होतें. त्यांच्याकडे समाजांतील कोणी तरुण सभासद जरी गेला तरी त्याच्याशीं ते प्रेमानें, आदरानें व विनयानें वागत असत. त्यांचा दुसरा मोठा गुण म्हणजे त्यांचें आपल्या स्वतःच्या गुणांविषयीं व केलेल्या कार्या-

विषयीं संपूर्णपणें अज्ञान! हा गुण अगदीं विरळा आहे, असें म्हटलें तरी चालेल. दिनानाथराव स्वतःविषयीं लिहावयास लागले म्हणजे आपल्याकडे इतकें हीनत्व घेत असत कीं, तें पाहून मोठा विस्मय वाटावा. पण ह्यांत कृत्रिमपणा बिलकूल नसे. स्वतःसंबंधानें त्यांचा तसाच समज असे. संगीतासंबंधानें त्यांनीं जी अमोल सेवा करून ठेविली आहे, तिचे संबंधानें कोणी कांहीं बोललें तर त्याकडे पूर्ण दुर्लक्ष्य करून, दुसऱ्याच्या उद्योगाची त्यांनीं स्तुति करावी व आपले हातून आतां कांहीं काम होत नाहीं असे मोठे निराशेचे उद्गार काढावे! याविषयीं एक अनुभवाचीच गोष्ट येथें नमूद करितों. संगीतासंबंधानें त्यांनीं सांगितलेलें काम आमच्या हातून व्हावयास थोडा विलंब लागला. त्या वेळीं विलंबाबद्दल त्यांची आम्हीं क्षमा याचिली. त्या पत्रास उद्देशून ते लिहितातः–" माझी माफी कोणीही मागणें नलगे. मीच हातीं घेतलेलें काम शारीरिक दुर्बलतेमुळें संपूर्ण करूं शकत नसल्याकारणानें लोकांस त्रास देत असतों; पण नाइलाज आहे. माझा नाकोटा फार होता तो उतरविण्यासाठींच जें कांहीं या संगीताच्या संबंधानें घडलें आहे ती ईश्वरी योजनाच आहे असें मी समजतों. अस्तु. माझ्या हातून संगीताच्या सातव्या आवृत्तीची संपूर्ण तयारी निदान सर्व पदांची अभंगांची व तत्संबंधी कोशाची झाली पुरे. सध्या चालत असलेला घनघोर संग्राम लवकर आटपला नाहीं तर ' संगीत ' बाहेर पडेपर्यंत वांचण्याची मी आशा बाळगीत नाहीं. एर-व्हींही देहाची नश्वरता आहेच, परंतु क्षीण होत चाललेला व मुळचाच दुबळा गाडा आणखी पुष्कळ वर्षें टीकाव धरील अशी आशा करणें केवळ मूर्खपणा होय. प्रारंभापासून काम करणें बरें पण एकानें आरंभिलेलें अधुरें राहिलेलें काम पुरें करणें प्रयासाचें व त्रासाचें असतें म्हणून उपरिनिर्दिष्ट आशा प्रदर्शित केली आहे." त्यांचें असामान्य निश्चयाचें बल हा त्यांचा तिसरा गुण तरुण पिढीनें लक्षांत ठेवण्यासारखा आहे. कोणतेंही कार्य हातीं घेतलें म्हणजे मग तें कसें बसें उरकून टाकावयाचें हा विचार त्यांस केव्हांही शिवला नाहीं. ते समाजाचे चिटणीस होते, पत्रिकेचे संपादक होते, व व्यवस्थापक मंडळीचे सभासद होते. त्या वेळीं त्यांनीं जीं जीं कार्यें केलीं तीं तीं वेठ वळण्याच्या बुद्धीनें केव्हांही केलीं नाहींत आणि आपल्या हातून जें कार्य व्हावयाचें नाहीं तें केव्हांही करण्यास पुढें आले नाहींत; परंतु एकदां कार्य हातीं घेतलें कीं, तें उत्तम प्रकारें करण्याचा निश्चय करून तशा प्रकारें ते तें करून दाखवीत असत. त्यांचा चवथा विशेष गुण म्हणजे त्यांची चिकित्सक बुद्धि. कोणताही प्रश्न व्यवस्थापक मंडळी पुढें आला कीं, त्याचा सांगो-

पांग विचार करून ते निकाल लावण्याचा प्रयत्न करीत. त्यामुळें त्यांच्या सल्ल्याचा नेहमीं फार उपयोग होत असे. समाजकार्यासंबंधाची त्यांची आस्थाही अप्रतिम होती. कित्येक वर्षे ते परगांवीं रहात असत. परंतु समाजामध्यें काय काय चाललें आहे, त्याविषयीं सर्व माहिती मिळवून योग्य वेळीं योग्य उपदेश करून ते आपली परम आस्था सर्वांच्या अनुभवास आणून देत असत. तरुणांविषयीं व विशेषतः जे कोणी समाजकार्यांत थोडें बहुत लक्ष घालीत आहेत त्यांचेविषयीं त्यांच्या ठिकाणीं जागृत प्रेम व आदर वसत असे. व कोणीही त्यांच्याकडे गेल्यास त्यास योग्य तो सल्ला देऊन त्याला मार्गाला लावावयाची त्यांची तयारी असे. त्यांची परमेश्वरावरील निष्ठा अनुकरणीय होती. तरी जुन्या धर्मभोळ्या लोकांची व विशेषतः त्यांच्या स्वतःच्या पत्नीची श्रद्धा व धर्मासाठीं स्वार्थत्याग करण्याची त्यांची तयारी पाहून आपणास लाज वाटते असे ते म्हणत असत. धर्म ही वादविवादाची बाब नव्हे, तो आचरणांत आणिला पाहिजे, ही गोष्ट नेहमीं त्यांच्या दृष्टीपुढें असे, व त्याप्रमाणें त्यांचें वर्तन असे. पुष्कळ वेळां असें होतें कीं, प्रार्थना अगर ब्राह्मसमाजाशीं संबंध जडला कीं, जुनें वळण अजीबात सुटतें. दीनानाथरावांचें तसं झालं नव्हतें. त्यांना कीर्तनश्रवणाचा फार नाद असे. त्यासाठीं चातुर्मास्यामध्यें व इतर वेळीं उत्तमोत्तम हरिदासांचीं कीर्तनें जेथें होत असतील तेथें दीनानाथराव आपल्या पत्नीबरोबर मोठ्या आदरबुद्धीनें व उल्हासानें जात असत. आपण प्रार्थनासमाजाचे सभासद, प्रतिमापूजनाचा आपण त्याग केलेला, असें असतां देवळांमध्यें कीर्तनश्रवणास कसें जावें हा विचार त्यांस केव्हांही शिवला नाहीं. कांहीं लोकांचा त्यामुळें थोडा गैरसमज प्रथम प्रथम होत असे, पण त्याची त्यांनीं पर्वा केली नाहीं. त्यांचें म्हणणें असें असे कीं, आपल्याला कीर्तनश्रवणासाठीं जावयाचें आहे, माझ्या जाण्याचा लोक काय अर्थ करीत आहेत हें मी पहावयाची आवश्यकता नाहीं. आपण गुणग्राहक असावें आणि ही मधुकर वृत्ति त्यांच्यांत उत्तम प्रकारें बाणलेली होती. पुष्कळ वेळां असें होतें कीं, एखाद्या मनुष्याविषयीं एकाद्या कार्यासंबंधानें आपला वाईट ग्रह झाला कीं, मग त्याच्याकडे आपण दुर्लक्ष करीत असतों. दीनानाथरावांचें तसें नव्हतें. कोणीही चांगलें कार्य केलें कीं, त्याच्याबद्दल त्यास उत्तेजन द्यावयास त्यांची तयारी असे.

दीनानाथरावांचा आपल्या साधुसंतांविषयींचा, विशेषतः तुकारामाविषयींचा अभिमान अत्यंत अनुकरणीय होता. पुण्यास तुकाराम मंडळी स्थापन झाल्याबरोबर त्या संस्थेच्या चालकांशीं त्यांचा पत्रव्यवहार सुरू झाला. त्यांनीं त्यांच्या

दप्तराची प्रत मागवून त्याच्यापासून फायदा करून घेतला. जेथें जेथें त्यांचे विचार त्यांस पटले नाहींत तेथें त्यांनीं आपले विचार कळविले. तुकारामाच्या अभंगांची चर्चा हा विषय सुबोधपत्रिकेमध्यें पुष्कळ वर्षें येत असे. त्यांतील अभंगांची चर्चा ज्यांनीं मधून मधून वाचली असेल त्यांस ह्या चर्चेमध्यें माडगांवकरांच्या अर्थांचा वारंवार उल्लेख आढळेल. सर्व महत्त्वाच्या अभंगांचे अर्थ त्यांनीं वासुदेवराव पटवर्धनांस लिहून कळविले होते. त्यांत ज्या वेळीं शब्दांचा, चरणांचा अर्थ निराळा केलेला आढळे त्या वेळीं प्रो. पटवर्धन माडगांवकरांचा अर्थ पुढें करीत असत. परंतु दीनानाथरावांचा हा प्रचंड उद्योग पाहून कोणाच्या ठिकाणीं त्यांच्याविषयीं आदरभाव जागृत झाल्यावांचून राहील बरें? पण इतकेंच करून ते कोठें थांबत असत? संगीतांतील नवे जुने अभंग, व गाथेंतील अभंग ह्यासंबंधानें रा. दीनानाथराव, प्रो. पटवर्धन व बेळगांवचे एक गृहस्थ यांचे महिनोमहिने व त्याहीपेक्षां अधिक काळ चाललेला पत्रव्यवहार पाहिला कीं मन स्तंभित होतें. प्रो. पटवर्धनांनीं अर्थ लिहून कळविलेलीं पांचशें पृष्ठें परवां आम्हीं प्रो. केळकरांच्या हवालीं केलीं. तसाच दांडगा पत्रव्यवहार बेळगांवच्या गृहस्थाशीं असे. आणि हें सर्व अभंगांचा अर्थ बरोबर आपल्याला कळावा म्हणून! अशा प्रकारें किती तरी वेळां त्यांनीं तुकारामाच्या अभंगांचें चिकित्सक व आदरबुद्धीनें अध्ययन केलें. ही त्यांची जागृत आदरबुद्धि आमच्या तरुणांना अवश्य अनुकरणीय आहे.

दीनानाथरावांनीं प्रथम ग्राहम कंपनींत व फ्लेमिंग कंपनींत सेल्समनची नोकरी केली. आणि शेवटीं स्वतःची कंपनी काढली, परंतु त्यांत त्यांस यश आलें नाहीं. तथापि व्यापारी लोकांमध्यें त्यांचे वडील बंधु रामभाऊ यांच्याप्रमाणें दीनानाथरावांचेंही वजन फार असे व ते त्यांच्या शब्दांस मान देत असत. त्याचप्रमाणें ज्यांची नोकरी करण्याचा त्यांस प्रसंग आला त्यांचाही पूर्ण विश्वास त्यांच्यावर असे. प. वा. जॉन फ्लेमिंग, ज्यांचे ते एकदां नोकर होते ते तर त्यांस आपल्या मित्राप्रमाणें लेखीत असत. आणि दीनानाथरावांचे वडील चिरंजीव गोविंदराव हे विलायतेंत सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेची तयारी करीत असतां फ्लेमिंगसाहेबांनीं आपल्या मुलाप्रमाणें त्यांच्यावर देखरेख ठेवून हरएक प्रसंगीं त्यांस साहाय्य केलें. धनसंचय करण्याकडे त्यांचें लक्ष कधींही नसे. प्रपंच चालला म्हणजे त्यांत ते समाधान मानीत असत; आणि मुलांना धनापेक्षां ज्ञानसंपन्न करणें हें आपलें कर्तव्य असें ते समजत असत. व त्याप्रमाणें त्यांनीं कृति केली. त्यांनीं मुलांच्या

शिक्षणाच्या बाबतींत पैशाकडे पाहिलें नाहीं. याची साक्ष त्यांच्या सुशिक्षित पुत्रांकडे पाहिलें म्हणजे पटते.

येथील आणि बाहेर गांवच्या कोणत्याही समाजाच्या कोणत्याही कामाकरतां जेव्हां जेव्हां पैशांची गरज लागे, तेव्हां तेव्हां ते आपल्या आप्तांस किंवा मित्रांस भीड घालण्यास कधींही मागें घेत नसत. त्यांचे मेहुणे प. वा. बळवंतराव वागळे वारले तेव्हां त्यांच्या पुत्रांकडून त्यांच्या स्मरणार्थ म्हणून ५०० रु. समाजाकरितां घेऊन त्या रकमेनें 'समाज रिपेअर' फंड काढला. तसेंच आपल्या बंधूंकडूनही या कामासाठीं ५०० रु. मिळविले. या सर्व गोष्टींवरून समाजावर त्यांचें निस्सीम प्रेम कसें होतें हें सहज लक्षांत येईल. असा तनमनधनानें झटणारा सभासद नाहींसा झाल्यानें समाजाचें जें मोठें नुकसान झालें आहे, तें भरून येणें अशक्य आहे.

## दीनानाथरावांचें स्वाशयनिवेदन.

प्रार्थनासमाज अप्रिय असल्यास तो कां अप्रिय आहे याची जाहीर चर्चा १९०६ सालीं सुबोधपत्रिकेच्या संपादकांनीं केली होती. त्या वेळीं कांहीं सभासदांचे अभिप्राय विचारिले होते, त्यांत अर्थात दीनानाथराव एक होते. त्यांनीं आपला सविस्तर अभिप्राय कळविला, पण तो फक्त संपादकाच्या माहितीसाठीं! अर्थात् हा अभिप्राय संपादकांनीं दीनानाथरावांच्या मृत्यूनंतर बाहेर काढला! त्यांतील कांहीं भाग वर्तमानपत्राच्या फाइलींत ठेविल्यानें कांहींही कार्यभाग होणें नाहीं. म्हणून हल्लींच्या व पुढील पिढीच्या जागृतीसाठीं कांहीं ह्या चरित्रलेखांत आम्ही ग्रथित करितों.—

"मी फार जुना सभासद असल्यामुळें पंधरा वीस वर्षांमागें ( १८८६ च्या मागें पुढें ) सभासदांचें परस्परांवर प्रेम कसें असे व त्यांच्यांत दळणवळण किती असे व आतां प्रकार कसा आहे याची तुलना केली म्हणजे बरीच पिछेहाट झाली आहे असें म्हटल्याशिवाय रहावत नाहीं. मागें समाजांतील प्रमुख मंडळी परस्परांशीं स्नेहबद्ध असे इतकेंच नव्हे तर, त्यांच्यांपेक्षां पुष्कळ कमी दर्जाचे सभासद असले तरी दुःखाच्या व संकटाच्या वेळीं त्यांना भेटून त्यांचें सांत्वन ती मंडळी करीत असे......आपलें प्रार्थनामंदिर ह्या अनुकरणीय प्रेमाची व जुटीची साक्ष देत आहे......थोड्या दिवसांपूर्वी एका सभासदानें जुन्या प्रमुख मंडळीस त्यांनीं आपला धर्म मंदिरापुरताच ठेवला, आणि आपापल्या कुटुंबामध्यें त्याचा प्रसार केला नाहीं म्हणून ठपका दिल्याचें वाचल्याचें स्मरतें. पण त्या वेळच्या

परिस्थितींत व हल्लींच्या परिस्थितींत कितीतरी फेर पडला आहे, तो मनांत घेतां सामाजिक व्यवहारांत बोलण्याप्रमाणें वर्तन होण्याच्या बाबतींत सांगण्यासारखें पाऊल पुढें पडलें आहे काय, हा प्रश्न पुढें येतोच. प्रत्यहीं कौटुंबिक उपासना प्रेमानें व आवडीनें ज्यांच्या घरीं होत असते असे सभासद किती आहेत? मोठ्या शहरांत तरी जातींचें बंड बरेंच मोडलें आहे. तसा प्रकार पूर्वी नव्हता. असें असूनही आपणांपैकीं बरेच मित्रेपणा दाखविणारे नसतात काय? मोठ्या नांवाजलेल्या घराण्यांतील सुशील व सुविचारी मुलांची आपल्या नामांकित वाडवडिलांचा कित्ता गिरवावा, त्यांस शोभेल, त्यांच्या कीर्तीस कलंक लागणार नाहीं व आपण हास्यास्पद होणार नाहीं असें वर्तन ठेवण्याची प्रवृत्ति असते; तथापि ज्यास आपण आपली व जगाची प्रेममयी माता, प्रमघन पिता असें मानितों त्या परमेश्वराचीं लेंकरें असें नांव आपणांस शोभण्यासारखी सृष्टींतील इतर मनुष्यांशीं राहो, परस्परांशीं आपली वृत्ति असते काय? बंधुभाव, प्रेम, दया, सहिष्णुता आपण एकमेकांविषयीं किती दाखवीत असतों? फार दूर जाणें नलगे. आपल्या धर्मतत्त्वांप्रमाणें आपणास धार्मिक उन्नति व सामाजिक व्यवहारांत सुधारणा करणें आपलें कर्तव्य आहे. प्रत्यहीं प्रार्थना, मनाचें औदार्य, सत्यनिष्ठा, भूतदया वगैरेंच्या द्वारें आपली अंतःकरणाची धार्मिक उन्नति आपण केली पाहिजे. त्याच प्रमाणें सर्व मनुष्यें एका परमेश्वराचीं लेकरें असें एकदां मानल्यावर जातिभेदास मुळींच जागा नाहीं असें असतां मानसिक उन्नति व सामाजिक बाबतींत आपल्या विचारांस अनुसरून कृति ठेवणें ह्यांतून कोणास प्राधान्य द्यावें ह्या मुद्यावर आपणामध्यें परस्पर विरोध किती होत असतो? आणि एक पक्ष दुसऱ्यास तुच्छ किती मानीत असतो? वस्तुतः दोन्ही सुधारणांची सांगड असली पाहिजे, अथवा समाजिक सुधारणा धार्मिक सुधारणेच्या पर्यवसानरूपानें झाली पाहिजे. सत्याची चाड, शांति, क्षमा, दया इ० सद्गुणांचा उत्तरोत्तर विकास होत नसला, तर जानवें काढून टाकलें, सर्व संस्कार नव्या पद्धतीनें केले, नीच मानलेल्या जातीशीं अन्नव्यवहार व लग्नसंबंध केला तर पुरें नाहीं. उलट पक्षीं प्रत्यहीं प्रार्थना केली, सत्यभाषण केलें म्हणजे झालें; सामाजिक सुधारणा करणारांमध्यें एक प्रकारचें नीतिधैर्य असतें तें आपणामध्यें जर नाहीं, तर सामाजिक सुधारणा व्यर्थ, अशा विधानामध्यें चूक होत असते. तसेंच, शांति, परोपकार बुद्धि, ह्या सद्गुणांची गोष्ट एकीकडेस ठेवून चित्तशुद्धि अथवा शुद्ध अंतःकरण आपणांमध्यें परस्परांविषयीं किती असतें, म्हणून पाहूं गेल्यास आपल्यास काय आढळतें? एकमेकांविषयीं

कुकल्पना, अथवा निव्वळ गरसमज यांचा आपल्या मनांत उद्भव झाला तर प्रांजलबुद्धीनें व खऱ्या बंधुभावानें त्यांविषयीं खुलासा न करितां तीं कुजत ठेवण्याच्या व तेणेंकरून मनाचा बिघाड करून घेण्याच्या मार्गाचें आपणापैकीं बहुतेक अवलंबन करीत नाहींत काय ? तेणेंकरून प्रेमाचा व बंधुत्वाचा विकास न होतां त्यांच्या मुळाशींच कुऱ्हाड घालण्यासारखें आपलें वर्तन होत नाहीं काय ? आपली अशी कृति होत असतां मनुष्य जातीच्या बंधुत्वाचा डांगोरा आपल्या धर्ममतांच्या द्वारें आपण कितीही पिटला तरी त्यावर लोकांचा विश्वास कसा बसावा ?"

"मूर्तिपूजा व जातिभेद यांचे परिणाम हानिकारक असले आणि हीं दोन्ही आपणास त्याज्य असलीं तरी पापवासनांसारखीं तीं मनाच्या उन्नतीस आड येणारीं नाहींत हें आपण लक्षांत ठेवून आपले धर्मविचार श्रेष्ठ व उदार आहेत इतक्यानेंच मूर्तिपूजकांपेक्षां अथवा जातिभद पाळणारापेक्षां आपण कृतकृत्य झालों आहों अशी आपल्या मनाची फसवणूक न करितां आपल्या मनांत निरंतर खरी धर्मजागृति राहील व आपलें आचरण निर्मळ असेल अशी खबरदारी आम्हांतून प्रत्येकानें ठेविली तर आपली संख्या थोडी असली तरी आपलीं धर्ममतें लोकांस अधिक ग्राह्य होतील व आपल्या समाजाची छाप लोकांवर अधिकाधिक बसल्यावांचून राहणार नाहीं. सारांश, आमचा समाज लोकांस अप्रिय आहे असें म्हणण्यापेक्षां अनिर्बद्ध स्थिति लोकांस बंधनापेक्षां सामान्यतः आवडत असते म्हणून ते बऱ्याच अंशानें समाजास येऊन मिळत नाहींत असा प्रकार वस्तुतः आहे. तथापि समाजियांनीं धर्मजागृतीविषयीं जागृत राहून कर्तव्यदक्ष असावें आणि धर्मध्वजी कदापि न होतां जें कांहीं करणें तें कर्तव्य म्हणून निष्काम बुद्धीनें करून फलप्राप्ति परमात्म्याच्या इच्छेप्रमाणें होईल असा भरिभार जगन्नियंत्यावर ठेवणें हेंच समाजीयांस उचित व श्रेयस्कर आहे."

*अशाप्रकारें अनेक गुणसंपन्न असे आमचे हे मित्र होते. त्यांच्या सहवासास समाज अंतरला, हा विचार मनांत आला कीं, मन उद्विग्न होतें; त्यांच्या प्रेमळ संभाषणाचा,* प्रेमळ संगतीचा, लाभ होणें नाहीं हा विचार मनाची अस्वस्थता अधिक वाढवितो; त्यांच्यासंबंधानें विचार करितां त्यांची ती शुभ्र वस्त्र परिधान केलेली, मागें मंदिरांत व इतरत्र नित्य दिसणारी मूर्ति दृष्टीपुढें उभी राहते. त्यांची खरी योग्यता पुष्कळांनीं जाणली नाहीं, त्यांच्या गुणांची पारख पुष्कळांना झाली नाहीं हा

विचारही मनांत उद्विग्नता उत्पन्न करितो. तथापि समाजांतील त्यांच्या मित्रांनीं, त्यांच्या सर्व आप्तांनीं त्यांनीं जें कार्य केलें आहे, त्यांनीं आपल्या गुणांचा जो लाभ करून दिला आहे त्यांकडे पाहून त्यांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न करावा. त्यांनीं जो प्रेमळपणा आपल्या नित्याच्या आचरणांत दाखविला त्याचें अनुकरण करून सर्वांशीं प्रेमाचें वर्तन करून आपल्या आचरणाच्या द्वारें त्यांचें उत्तम स्मारक उभारावें. त्यांची समाजकार्यासंबंधाची आस्था कोणत्या प्रकारची होती त्याचें वर्णन वर आलेंच आहे; तशी आस्था दाखवून समाजाशीं त्यांच्या सर्व आप्तांनीं निकट संबंध जोडून घेणें, व त्यांना जीं कार्यें प्रिय होतीं, तीं तशा प्रकारें चालविणें हें त्यांचें उत्तम स्मारक होय. आमच्या समाजांतील तरुणांनीं त्यांचा दीर्घ उद्योग, त्यांचा संतपरिचय, त्यांची चिकित्सक बुद्धि व त्यांची धर्मनिष्ठा हीं आदर्शवत् आपल्या पुढें ठेवून समाजकार्यामध्यें मन घालणें हें त्यांचें उत्तम स्मारक होय.

---

# श्रीधर रामकृष्ण भांडारकर.

Though this earthly form of ours must perish, all that was good and pure and unselfish in us will live. Death has no power over what is of God within us. Death changes and purifies us. Death brings us nearer to God where we shall meet again that are of God's and love them with that Godly love which can never perish.

—*Max Muller.*

मानवी जीविताची क्षणभंगुरता लक्ष्यांत आणून द्यावयास मृत्यूसारखें दुसरें साधन नाहीं. त्याचप्रमाणें मृत्यूसारखा घोर प्रसंग ओढवला असतांही दृष्टिआड झालेलें शरीर वस्तुतः अनित्य होतें, पण त्या शरीरस्थ जो आत्मा तो नित्य आहे, ही गोष्टही मृत्युच व्यक्तिमात्रास शिकवितो. ता. २२ फेब्रुआरी १९१६ रोजीं ज्या-वेळीं गुरुवर्य सर रामकृष्णपंत भांडारकर ह्यांचे ज्येष्ठ चिरंजीव प्रो. श्रीधरपंत हे परलोकवासी झाले त्या वेळीं ही गोष्ट विशेष रीतीनें पुन्हा एकदां मनास पटली. उत्तम प्रकारची शरीरयष्टि, व्यायामाची लहानपणापासून आवड व नेहमीं व्यायाम घेण्याची संवय, मित आहार, दीर्घ उद्योगतत्परता, निकोप शरीरप्रकृति, निर्व्यसनता, आनंदी स्वभाव, उल्लसित वृत्ति, प्रेमळपणा, ईश्वरावरील दृढ निष्ठा व बालभाव इ० गुणांनीं युक्त अशा ह्या श्रीधरपंतांना त्यांच्या मृत्यूपूर्वी चारच महिने आधीं ज्यांनीं पाहिलें होतें, त्यांस त्यांचा ह्या जगांतील वास संपण्याचा काळ नजीक आला आहे असें कोणीं सांगितलें असतें तरी खरें वाटलें नसतें. इतकी त्यांची शरीरप्रकृति निकोप होती. असो.

**जन्म व शिक्षण.**—श्रीधरपंतांचा जन्म ता. १९ डिसबर सन १८५८ रोजीं झाला व आपल्या पित्याच्या देखरेखीखाली त्यांचें शिक्षण झालें. ते १८७५ सालीं मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाले. त्या वेळीं त्यांस जगन्नाथ शंकरशेट संस्कृत स्कालरशिप मिळाली. पुढें बी. ए. व एम्. ए. च्या परीक्षांत त्यांस सुयश प्राप्त झालें. संस्कृत भाषेच्या नैपुण्याबद्दल त्यांस तिन्ही परीक्षांत बक्षिस अगर स्कालरशिप मिळत गेली. १८७९ सालीं ते बी. ए. ची परीक्षा प-

दिल्या वर्गांत पास झाले. त्या वेळीं तत्त्वज्ञान हा ऐच्छिक विषय त्यांनीं घेतला होता. ह्यावरून संस्कृत व तत्त्वज्ञान ह्या दोन्ही विषयांत त्यांनीं नैपुण्य मिळविलें होतें असें दिसून येतें. १८८१ सालीं ते एम. ए. ची परीक्षा दुसऱ्या वर्गांत पास झाले, व तींत त्यांस संस्कृत भाषेच्या नैपुण्याबद्दल भगवानदास पुरुषोत्तमदास ही स्कालरशिप मिळाली. नंतर प्रथम संस्कृत भाषेच्या अध्यापकांस मदतनीस म्हणून त्यांची डेक्कन कालेजांत नेमणूक झाली. तीर्थरूप अध्यापक व चिरंजीव मदतनीस अध्यापक असा हा योगायोग तेथें जमून आला होता. त्या जागेवर असतांना त्यांस आपल्या ज्ञानांत पुष्कळ भर घालण्यास पुष्कळ अवसर सांपडला. तेथें असतांनांच १८८७ सालीं त्यांस रावसाहेब गणपतराव पितळे ह्यांनीं पेन्शन घेतल्यामुळें युनिव्हर्सिटीचे असिस्टंट रजिस्ट्रार नेमण्यांत आलें. हें फार जोखमीचें काम त्यांनीं तेरा वर्षें केलें. ते ह्या आफिसांत तेरा वर्षें होते; तेवढ्या अवधींत त्यांनीं फार परिश्रम करून आफिसला उत्तम शिस्त लाविली. परिक्षेच्या निकालांच्या बाबतींतील कडकपणा उत्तम प्रकारें कसा राखतां येतो हें त्यांनीं आपल्या स्वतःच्या उदाहरणानें दाखवून दिलें. हें काम पूर्ण नेकीनें, कोणाच्याही भिडेस अगर मुरवतीस बळी न पडतां कसें करितां येतें त्याचा कित्ता आफिसच्या लोकांना व इतरांना त्यांनीं घालून दिला. जेथें जेथें पूर्वी फटी होत्या त्या ह्यांनीं बुजविल्या व अशा प्रकारें युनिव्हर्सिटी हें एक नमुनेदार आफिस करून त्यांनीं १९०० सालीं तें सोडलें. त्या वर्षी त्यांची डेक्कन कॉलेजमध्यें संस्कृत भाषेच्या अध्यापकाच्या जागीं नेमणूक झाली. परंतु पुण्यास ते फार वर्षें राहिले नाहींत. प्रो. काथवटे ह्यांनीं पेन्शन घेतल्यानंतर श्रीधरपंतांची त्यांच्या जागीं मुंबईस नेमणूक झाली, तेथूनच त्यांनीं १९१५ मध्यें पेन्शन घेतलें. श्रीधरपंतांचा विद्याव्यासंग फार दांडगा होता व त्यांची विद्वत्ताही श्रेष्ठ दर्जाची होती. अत्यंत परिश्रम करून ते आपलें काम करीत असत. कोणतेंही पुस्तक शिकवितांना त्याच्या वरील सर्व टीकापर विषयांचें अत्यंत काळजीपूर्वक मनन करून नंतर ते त्या पुस्तकांतील अवश्य तो भाग शिकवावयास हातीं घेत. आपल्या कर्तव्यासंबंधानें त्यांची जाणीव इतकी तीव्र असे कीं, त्या बाबतींत त्यांच्या कडून केव्हांही टंगळमंगळ होत नसे. ह्या त्यांच्या पद्धतीमुळें आस्थेवाईक, उद्योगी व हुशार मुलांचें कल्याण होत असे व त्यांस आपल्या अध्यापकांच्या श्रमांची कल्पना होत असे. आपल्या विद्यार्थ्यांस साहाय करावयास श्रीधरपंत सदैव तत्पर असत. कोणत्याही वेळीं एखाद्या विद्यार्थ्यानें त्यांच्या साहाय्याची अपेक्षा केल्यास त्यांस ते मोठ्या



श्रीधर रामकृष्ण भांडारकर.

आनंदानें सहाय करीत असत. अशा प्रकारचे त्यांचे एक शिष्य जे स्वतः अध्यापनाचें कार्य करीत होते ते एकदां प्रस्तुत लेखकापाशीं म्हणाले कीं, प्रो. भांडारकर जर हेंच काम परदेशीं करते तर त्यांच्या श्रमांचें चीज झालें असतें व त्यांच्या कीर्तीत भर पडली असती. अध्यापक ह्या नात्यानें त्यांचा दुसरा गुण म्हणजे त्यांचें आपल्या विद्यार्थ्यांवरील प्रेम व त्यांचा त्यांचे कडील ओढा. आपला कोणी विद्यार्थी आजारी पडला आहे असें कळलें कीं श्रीधरपंतांनीं रेसीडेन्सीमध्यें स्वतः जाऊन त्याची विचारपूस करावी व त्यास धीराचे दोन शब्द सांगावेत. त्याचप्रमाणें कोणत्याही प्रकारें गाजावाजा न करितां ते कित्येक विद्यार्थ्यांस साहाय्य करीत; आपल्या साहाय्यानें त्यांचें भागत नसल्यास कांहीं परिचित मित्रांकडून मदत मिळवून विद्यार्थ्यांस ते उपकृत करीत. अशा प्रकारच्या गरजू विद्यार्थ्यांस आपल्यास अधिक प्रमाणानें सहाय्य करितां येत नाहीं याची त्यांस फार हळहळ वाटत असे. अध्यापक ह्या दृष्टीनें प्रो. श्रीधरपंतांनीं आपल्या तीर्थरूपांचे अनेक गुण आपलेसे केले होते. त्यांचा दीर्घ व्यासंग, हातीं घेतलेलें काम उत्तम रीतीनें करण्याची इच्छा, संस्कृत भाषेसंबंधानें पुढें ठेविलेला उच्च आदर्श, वेदांताच्या नांवावर प्रस्तुतकाळीं होत असलेले विचार व खरा वेदांत यांची भेसळ न करणें इ० गुण श्रीधरपंतांनीं आपल्या तीर्थरूपांपासूनच घेतले होते.

## गुणसमुच्चय.

श्रीधरपंतांच्या ठिकाणीं अनेक अनुकरणीय गुण होते. ते सर्व त्यांच्याशीं निकट संबंध येणाऱ्यांच्याच त्वरित लक्षांत येत असत. त्यांच्याशीं जसजसा अधिक परिचय व्हावा, तसतसा त्यांचेविषयीं आदर वाढत असे व त्यांचे अनेक गुण अनुभवास येऊन त्यांच्यावर प्रेम बसत असे. त्यांचा साधेपणा असामान्य होता. लहानमोठा, विद्वान अविद्वान, उच्चनीच, श्रीमंत गरीब, हा भाव मनांत न आणितां, त्यांनीं सर्वांशीं प्रेमानें वागावें. कधीं कधीं त्यांचा सरल भाव अनुभवून आपली आपल्यालाच लाज वाटावी! त्यांच्यासारखी निगर्वी वृत्ति फारशी अनुभवास येत नाहीं असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांचें वाचन इतकें दांडगें होतें, त्यांचा उद्योगही इतका दीर्घ होता, त्यांची विद्वत्ता इतकी थोर होती, त्यांची विवेचकशक्ति इतकी जागृत होती, तरी त्यांबद्दल त्यांच्या ठिकाणीं जाणीव बिलकुल नव्हती आणि अभिमान तर त्यांस कधीं शिवलाच नाहीं. प्रस्तुत लेखकासारख्या लेखकाचें, अगर कामचलाऊ उपासकाचें मनोभावें अभिनंदन करून

आपल्या स्वतःपेक्षां त्याची योग्यता विशेष असल्याचें वारंवार सांगावें, व ह्या त्यांचा बालभाव पाहून ऐकणाराच्या ठिकाणीं आपल्या स्वतःच्या वैगुण्याची प्रखर जागृति व्हावी! श्रीधरपंतांचें पवित्र आचरण, त्यांचा निष्कपटपणा, त्याची सत्यप्रीति व करारी बाणा ह्यांचें तरुण पिढींतील विद्यार्थी जर अनुकरण करितील तर महाराष्ट्रांतील सुशिक्षित तरुणांची पिढी आदर्शवत् व्हावयास वेळ लागावयाचा नाहीं. श्रीधरपंतांची आपत्ति सहन करण्याची शक्तिही असामान्य होती. त्यांच्यावर कांहीं विकट प्रसंग ओढवले; तशा प्रकारचे प्रसंग एकाद्या साधारण मनुष्यावर जर आले असते, तर त्याखालीं तो दडपूनच गेला असता. परंतु श्रीधरपंतांनीं ते शांतपणें, अंतःकरण समाहित ठेवून सहन केले. परमेश्वरावरील आपली श्रद्धा बिलकुल ढळूं न देतां, त्यांनीं उपाययोजना केली व प्रसंगांस धैर्यानें पाठ दिली. त्यांच्याशीं सर नारायण चंदावरकर यांचा निकट संबंध येत असे. त्यांनीं त्यांचें चरित्र पाहिलें होतें. त्यांनीं त्यांचें आपल्या अननुकरणीय पद्धतीनें केलेलें वर्णन येथें दिल्यानें त्यांच्या योग्यतेची आणखी स्पष्ट कल्पना होईलः—

It was not merely the spirit of scholarship that he imbibed from his father, our Maharshi Sir Ramkrishna Bhandarkar. The Venerable Rishi's home, as those can say who have been privileged to enter it and observe, has been a home of order and discipline with the worship of God as its resting point. It was amidst those influences of paternal piety that Shridharpant was brought up and to the last he lived true to those influences. Fearlessly standing for truth, frank in his conversation and dealings, he carried with him the devotional spirit. The best fruit of it in his case was his enviable power of silent endurance in the midst of worries and anxieties, of which he had his share in life. Candid to a degree in conversation, he never wore a sour face, nor ever let fall a word of complaint in the midst of suffering or distress or loss.

He met trouble with a smile and bore it with calmness. Those only know who knew the man intimately.....An ardent lover of literature, especially devotional that he was, the purchase of healthy books formed the ruling passion of his life, and his home was a sight to see—all good books and true, standing on shelfs, arranged on tables, and scattered about in rooms seemed as it were to play and roll about as if they were among the children of his quiet home contributing to his pleasure and nursing his faith.

श्रीधरपंत खरे व कर्ते सुधारक होते, पण ह्याची जाणीव मात्र त्यांच्या ठिकाणीं नव्हती. सुधारणेस अनुकूल असें कार्य आपण सुधारक आहोंत म्हणून करावयाचें हा विचार त्यांस शिवला नाहीं. आपल्या मुलांना उत्तम प्रकारचें शिक्षण देणें हें आपलें कर्तव्य आहे, हा आपला धर्म आहे हा विचार दृष्टीपुढें ठेवून त्यांनीं आपल्या मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न सोडविला व तेथें मुलगा व मुलगी हा भेद मनांत आणिला नाहीं. त्यांच्या दोन्ही मुली पदवीधर असून एक एम. ए. आहे व आज ती इंदुर येथील अहल्याश्रम व चंद्रावती हायस्कूल ह्या संस्थांचा सर्व कारभार पहात आहे. त्यांनीं आपल्या ज्येष्ठ कन्येचा विवाह ती बी. ए. झाल्यानंतर घडवून आणिला. त्यांनीं आपल्या दोन्ही मुलांना उच्च शिक्षणासाठीं परदेशीं जें पाठविलें तें त्यांनीं कर्तव्य बुद्धीनें पाठविलें. त्यांचा ज्येष्ठ मुलगा पुढें त्यांच्या मागें जर्मनीमध्येंच परलोकवासी झाला. त्यांचें ब्राम्ह धर्मावरील प्रेम, त्यांचा प्रार्थनासमाजाविषयींचा अभिमान, प्रार्थनासमाजाचें उच्च ध्येय आपलेंसें करण्यासंबंधाची त्यांची तळमळ, त्यांचा आत्मस्थिती संबंधाचा नित्याचा विचार, त्यांचें प्रखर आत्मपरीक्षण, केवळ आत्मनिर्भत्सन न करितां, स्वदोषजागृति करून घेऊन, स्वदोषनिवृत्तीकडे लक्ष्य देणें हा आपला धर्म होय असा त्यांचा उपदेश व तदनुसार वर्तन, प्रार्थना समाजाची जे जे कोणी निरपेक्ष सेवा करीत आहेत त्यांच्या विषयींचें त्यांचें अकृत्रिम प्रेम व त्यांच्या विषयींचा त्यांचा आदर, त्यांची निष्कपट वृत्ति, त्यांचा बालभाव, त्यांची सरळ वृत्ति, हे त्यांचे गुण निरनिराळ्या वेळीं, निरनिराळ्या प्रसंगीं अनुभवास येत आणि ते ज्यांच्या अनुभवास येत त्यांचा त्यांचे संबंधाचा आदरभाव अधिक वाढूं लागे.

## श्रीधरपंतांचे धर्मविषयक विचार.

श्रीधरपंतांनीं आपल्या स्वतःला इतकें कांहीं कमी लेखून घेतलें होतें कीं, हा त्यांचा विनय पाहून कधीं कधीं सखेदाश्चर्य वाटे. असिस्टंट रजिस्ट्रार असतांना सुबोधपत्रिकेसाठीं ते वारंवार इंग्रजी व मराठीमध्यें धर्मपर विषयांवर लेख लिहित असत. हे मराठी लेख एकत्र करण्याचा आग्रह डा. प्रभाकरपंतांनीं जेव्हां केला, तेव्हां कोठें असे कांहीं एकत्रित केलेलें पुस्तक प्रसिद्ध करण्यास ते कबूल झाले. पण, तेंही सुबोधपत्रिकेच्या संपादकास पुढें करून ! **सुबोधसंग्रह** ह्या पुस्तकांतील सर्व लेख श्रीधरपंतांनीं सुबोध पत्रिकेसाठीं लिहिलेले आहेत. त्यांतील विचारांचें जे कोणी आस्थेनें मनन करितील त्यांस श्रीधरपंतांच्या ठिकाणीं कोणत्या प्रकारची तळमळ सतत जागृत होती, त्यांचा आदर्श किती श्रेष्ठ होता, त्यांची भक्ति किती शुद्ध होती; तुकारामाचे निरनिराळे अभंग पुढें करून त्यांनीं आपली स्वतःचीच तळमळ कशी व्यक्त केली याची चांगली कल्पना होईल. आम्हांला तर अनेक प्रसंगीं असें वाटलें कीं, श्रीधरपंतांनीं आपलें स्वतःचें आध्यात्मिक जीवन ह्या आपल्या लेखांत ग्रथित केलें आहे. त्यांना एकांतामध्यें बसून मनन करण्याची आवड असे. अनेक प्रसंगीं अशा प्रकारें ते स्वतःशींच विचार करीत असत. ह्या वृत्तीसंबंधानें आपल्या एका लेखांत ते म्हणतात 'एकांतामध्यें जाऊन विचार करून, ईश्वराचें ध्यान करून, आणि त्याच्या स्वरूपाचें अवलोकन करून, त्या विचाराच्या धारेस पाजळून, पुन्हा पूर्ववत्, व होईल तर पूर्वीपेक्षां अधिकही तीक्ष्ण केलें पाहिजे. शिक्षणाच्या कामास आपण सदा योग्य रहावें म्हणून शिष्यास शिकवून बरोबर आपल्याही अभ्यासाचा क्रम ज्याप्रमाणें शिक्षकानें ठेविला पाहिजे, त्याप्रमाणें आपणास जें कांहीं बरें वाईट कळतें, त्याचा लोकांस लाभ करून देणें हें ज्यांस आपलें कर्तव्य वाटलें त्यांनीं एकान्तामध्यें जाऊन ईश्वराचें मनन व निदिध्यास करून आपल्या आध्यात्मिक ज्ञानाचा व अनुभवाचा अभ्यासक्रम अव्याहत चालू ठेविला पाहिजे." आमच्या ह्या बंधूंचें वर्तन अगदीं ह्याप्रमाणें होतें. आम्हीं वर दर्शविलेंच आहे कीं, त्यांच्या वर प्रसंग ओढवले असतां त्यांनीं ते शांतपणें सहन केले. आणि स्वतःवर आपत्ति येण्यापूर्वी त्यांनीं काय लिहून ठेविलें होतें पहाः— "संपत्तीचा व ऐश्वर्याचा योग्य रीतीनें उपभोग घ्यावा. दुःख किंवा विपत्ति प्राप्त झाली असतांना, न डगमगतां, कोणत्याही रीतीनें आपली मति अशुभ होऊं न देतां त्यांचा यथाशक्ति परिहार करण्याचा प्रयत्न करावा. सर्व संसार करावयाचा तो देवानें लावून दिला म्हणून करावयाचा. ईश्वर आपल्या संनिध आहे हें सर्व

काल लक्षांत बाळगून तो जेणेंकरून संतुष्ट होईल अशा रीतीनें सर्व कृत्यें करावयाचीं, असा उपदेश केव्हांही करणें फार सोपें असतें; पुष्कळ वेळां अनुभव येतो कीं, अशा प्रकारचा उपदेश करणारांवर प्रसंग आले असतां, पूर्वीच्या सर्व उक्ति केवळ बोलाचा भात व बोलाची कढीच ठरतात." श्रीधरपंतांनें तसें झालें नाहीं हें स्वानुभवानें आम्ही सांगू शकतों. त्यांनीं संसार उत्तम रीतीनें केला हें त्यांचे परिचित मित्र सांगू शकतील; परंतु धर्म व संसार ह्यासंबंधानें जें ध्येय तें रोजच्या आचरणाच्या द्वारें आपलेंसें ते करीत होते, तेंच त्यांनीं इतरांस उपदेशिलें; धर्म आणि संसार ह्यांस एकमेकांपासून दूर राखिलें असतां आपल्या धर्मश्रद्धेपासून आपलें कोणतेंही कल्याण होणार नाहीं हें लक्षांत बागवून जर स्वतःच्या संबंधाचीं किंवा इतरांच्या संबंधाचीं सर्व कृत्यें न्यायानें, विवेकानें, व शुद्ध अंतःकरणानें केलीं तर आपलें स्वतःचें आध्यात्मिक कल्याण होईल यांत कांहीं संशय नाहीं. त्यांस मननाचा संचय होती असें आम्हीं वर म्हटलेंच आहे. ह्या त्यांच्या मननाचा परिणाम अशा विचारांस ते नेहमीं स्फुरण देत असत. आणि कित्येक प्रसंगीं ते सर्व विचार जरी अगदीं नवीन नसले, तरी त्यांची मांडणी अगदीं नवीन असे. आपलें मन निश्चल करण्यासाठीं मूर्तिपूजेची आवश्यकता आहे हा नेहमींचा विचार पुढें येतांच एकदां त्यांनीं म्हटलें—"पुढें एखाद्या मुलास उद्योगाची संवय लावावयाची असल्यास, तूं आळसामध्यें राहण्याचा अभ्यास कर म्हणजे तुला उद्योगाची संवय लागेल, असा आम्ही त्यास उपदेश करीत नाहीं व तशा प्रकारचा अभ्यासही आपण त्यास करावयास लावीत नाहीं. ज्या प्रकारची संवय लावावयाची त्याच प्रकारचा अभ्यास पाहिजे. देव आहे अनादि, अनंत, त्यास हस्तपादादि अवयव नाहींत, तरी त्या अवयवांनीं करावयाचीं सर्व कांहीं कृत्यें तो करितो; तो चिन्मय आहे. या व अनेक दुसऱ्या गोष्टींनीं, मूर्ति याच्या अगदीं उलट आहे. तर मूर्तीच्या ठायीं मन निश्चल करावयाचा अभ्यास केल्यानें देवाच्या ठायीं निश्चळ रहाण्यास तें कसें समर्थ होईल? मन निश्चळ करणें कांहीं कठिण नाहीं. आपणा सर्वांचें मन विषयांच्या ठायीं निश्चळ आहेच. कांहीं प्रापंचिक कार्यांमध्यें आपण कधींकधीं इतके दंग होतों कीं, दुसऱ्या कशाचें भान रहात नाहीं. देवाच्या ठायीं त्यास निश्चळ करणें कठीण, कारण कीं, देवाचें सान्निध्य व्हावें तितक्या स्पष्ट रीतीनें आम्हांस प्रतीत होत नाहीं."

अशा प्रकारें श्रीधरपंत आपलें आदर्शवत् आयुष्य कंठित होते, स्वतःच्या ज्ञानांत व इतरांच्या ज्ञानांत भर घालीत होते. स्वतःच्या अनुभवाच्या जोरावर

न कळत इतरांस मार्गदर्शक होत होते. त्यांचा आनंदी स्वभाव विशेष परिचितांस आनंदित करीत होता. त्यांचा उपासनांसंबंधाचा नियमितपणा इतरांस नियमित करीत होता; त्यांची उपासनेची गोडी इतरांस उपासनेसंबंधों विचार करावयास लावीत होती. त्यांचा सुखाचा, समाधानाचा संसार इतरांस आपल्या स्वतःच्या स्थितीसंबंधानें विचार करावयास लावीत होता; त्यांचो ज्ञानाभिरुची इतरांस लाजवीत होती; त्यांचा दांडगा ग्रंथसंग्रह, त्यांचें सद्ग्रंथवाचन कोणासही क्षणभर आपला संग्रह व त्याचें वाचन ह्यासंबंधानें विचार करावयास लावीत होतें; आणि इकडे निर्घृण काळ लपून छपून मजल दरमजल करीत होता! एल्फिन्स्टन कॉलेजमधील त्यांचें अध्यापकाचें काम १९१५ सालीं सुटलें व त्यांनी पेन्शन घेतलें. वास्तविक पहातां ह्यानंतर विश्रांति घेऊन त्यांनीं आपल्या तीर्थरूपांप्रमाणें विद्याव्यासंगामध्यें पुढील कालक्रमणा करावयाची; परंतु त्यांस तें शक्य नव्हतें. कांहीं वर्षांपूर्वी त्यांचें जें कांहीं थोडेंसें संचित धन होतें तेंही बुडालें होतें व त्यांत ह्या वेळीं त्यांचे दोघेही चिरंजीव परदेशीं अभ्यास करीत होते. अर्थात् त्या दोघांच्या शिक्षणाची व्यवस्था करून स्वतःच्या कुटुंबाचा योगक्षेम चालविण्यासाठीं उद्योग करणें जरूर होतें म्हणून त्याच वेळीं प्रो. भडकमकर ह्यांच्या आकस्मिक मृत्यूमुळें रिकामी झालेली वुइल्सन कॉलेजांतील संस्कृत भाषेच्या अध्यापकाची जागा त्यांस पत्करावी लागली होती. ज्या वेळीं त्यांनीं ही जागा पत्करली, त्याच वेळीं काळाचें बहुतेक कार्य झालें होतें! प्रथमतः कमरेच्या भागीं मधुनमधुन वेदना येऊं लागल्या, त्या वेळीं त्यांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. प्रकृति सुदृढ असल्यामुळें, अगर ती तशी दिसत असल्यामुळें, कांहीं दिवस त्यांस आपले नित्याचे व्यवसाय चालवितां आले. वेदनांचें प्रमाण अधिक होतांच डाक्टरांची सल्ला विचारिली. त्यांनींही त्या वेळों विशेष कांहीं नाहीं असेंच सांगितलें. पण पुढें विश्रांति घेणें जरूर झालें. नंतर अनेक डाक्टर व त्यांचे अनेक उपाय झाले, पण तिळमात्र आराम न वाटतां, प्रकृति मात्र ढांसळूं लागली. अंतीं त्यांस कॅन्सरचें असाध्य दुखणें झाल्याचें आढळून आलें! अशा स्थितींतही शक्य ते सर्व उपाय चालू होते, परंतु त्यांचा कांहीं उपयोग न होतां, ता. २२ फेब्रुवारी १९१६ रोजीं आमचे हे सन्मान्य बंधु व प्रार्थनासमाजाचे व्हाइस प्रेसिडेंट इहलोक सोडून गेले. श्रीधरपंतांशीं ज्यांचा निकट संबंध होता त्यांस आजही त्यांची आठवण झाली कीं, आमच्या समाजांतील एक मोहरा गेला असें वाटून मन दुःखित होतें. त्यांच्या मृत्यूनंतर दुःखवट्याचा ठराव घेऊन सर नारा-

यण चंदावरकर व दुसरे कांहीं सभासद पुण्यास सर रामकृष्णपंत यांस भेटावयास गेले होते. त्या वेळीं कांहीं बंधूंना मुद्दाम पाठवून मुंबईच्या समाजानें जी सहानुभूति व प्रेम व्यक्त केलें त्याबद्दल सर रामकृष्ण ह्यांनीं आपल्या कुटुंबांतील सर्व मंडळीच्या व विशेषतः श्री. रमाबाईच्या वतीनें आभार मानतांना त्यांचा कंठ दाटून आला. आपणा सर्वांस पुढें करून स्वतः परमेश्वरच ह्या प्रसंगीं आमच्या दुःखाचा वांटेकरी होत आहे असें आम्ही समजत आहों असें ते म्हणाले.

आमच्या समाजांतील तरुणांस ह्या अल्प लेखांत दर्शविलेल्या श्रीधरपंतांच्या गुणांचें अनुकरण करण्यास तो प्रवृत्त करो अशी लेखकाची परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे.

---

## ( १५ ) नारायण गणेश चंदावरकर.

जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती ।
चालविसी हातीं धरोनियां ॥
चालों वाटे आम्ही तुझाचि आधार ।
चालविसी भार सवें माझा ॥

—तुकाराम.

" Death is not a breaker, but renewer of ties. "

——:o:——

सतत पंचेचाळीसशेचाळीस वर्षें ज्यांनीं आपल्या देशाची व देवाची सेवा एकनिष्ठेनें करण्याचा प्रयत्न केला; सत्यनिष्ठा व धर्मनिष्ठा यांस विसंगत अशा कार्यामध्यें मन घालण्याचा विचारहि ज्यांस कधीं शिवला नाहीं; ज्यांचें उत्तम शील ज्यांच्या पवित्र जीवनाची प्रत्यक्ष साक्ष पटवीत होतें, देवाचा विसर ज्यांना केव्हांच पडला नाहीं व ज्यांनीं आकांक्षा, विचार, उच्चार व आचार यांच्याद्वारें देवाची सेवा केली; जाज्वल्य सत्यनिष्ठा, कोमल अंतःकरण व प्रेमळ स्वभाव यांचें विलक्षण संमिश्रण ज्यांच्या जीवनांत स्पष्ट रीतीनें दिसत असे; ज्यांची कर्तव्यनिष्ठा केव्हांहि ढळली नाहीं व अखेरपर्यंत ज्यांची कर्तव्यरति कायम होती, ' उत्कृष्ट बुद्धिमत्ता, अप्रतिम सौजन्य, अतिशयित शुद्ध आचरण, खरी देशभक्ति व वर्णनीय धर्मशीलता हे गुण एकवट झालेले " असें ज्यांचें वर्णन एका चरित्र-लेखकानें केलें आहे, ते सर नारायणराव चंदावरकर अत्यंत आकस्मिक रीतीनें तारीख १४ मे १९२३ रोजीं बंगलोर येथें कालवश झाले. सर नारायणराव हे त्या वर्षी एप्रिल महिन्यांत मुंबई शहर सोडून हवाफेर करण्यासाठीं व आपली एकुलती कन्या बंगलोर येथें आजारी असल्याचें कळल्यावरून तेथें गेले. त्या वेळीं ते कौन्सिलच्या कामामुळें अगदीं त्रासलेले होते; मार्च महिन्यांतील कौन्सिलची बैठक फार महत्त्वाची झाली व त्या वेळीं त्यांना मानसिक त्रास फार झाल्याचें त्यांनीं सांगितलें होतें; तरी पण, कन्या आजारी नसती तर ते बंगलोरास गेले नसते, कारण बंगलोरास जाण्यास ते उत्सुक नव्हते. परंतु ईश्वरी नेमानेम निराळाच असल्यामुळें कन्येचा आजार हें निमित्त होऊन सर नारायणराव बंगलोरास गेले; व ज्या शहरांत राहून जवळ जवळ पन्नास वर्षें त्यांनीं देशसेवा केली त्या शहराचा त्याग करून त्यांनीं बंगलोरास देह ठेविला ! लोकमान्य

टिळक पुणें सोडून कांहीं महत्त्वाच्या कामाच्या निमित्तानें मुंबईस आले, पण येथील सरदारगृहांत देह ठेवण्यासाठीं जणूं काय ते आले होते, त्याप्रमाणें सर नारायणरावांचें झालें. तशांत त्यांचा मृत्यु अत्यंत आकस्मिक रीतीनें झाल्यामुळें या नेमानेमाचें गूढ लोकांस अधिकच बुचकळ्यांत पाडीत आहे. सर नारायणराव यांचा मृत्यु ही आपल्या देशावरील घोर आपत्ति आहे, ती कशी हें जाणण्यापूर्वी व त्यांच्या विशेष गुणांविषयीं अल्पस्वल्प माहिती करून घेण्यापूर्वी त्यांच्या चरित्रांतील कांहीं ठळक ठळक गोष्टी लक्षांत ठेवण्याचा आपण प्रयत्न करूं या.

नारायणरावांचा जन्म १८५५ च्या डिसेंबर महिन्याच्या दुसऱ्या तारखेस होनावर मुक्कामीं झाला. नारायणरावांस आपल्या आजोबांचा विशेष लळा असल्याकारणानें त्यांच्या शिक्षणाला होनावर येथेंच प्रारंभ झाला. तेथील त्यांचें शिक्षण पूर्ण झाल्यावर पुढील शिक्षणासाठीं ते कारवारास आले. त्या वेळीं रा. रा. त्रिंबक नारायण कीर्तने नांवाचे एक गृहस्थ त्या शाळेवर प्रमुख शिक्षक होते. नारायणरावांची कुशाग्र बुद्धि, शिकण्याची हौस, व अभ्यासावरील लक्ष पाहून त्यांच्यावर त्यांचा फार लोभ जडला. आपल्या वयाच्या १४ व्या वर्षापर्यंत नारायणरावांचें कारवार येथें शिक्षण झालें. परंतु मुंबईसारख्या ठिकाणीं नारायणरावांसारख्या तैलबुद्धीच्या मुलाच्या शिक्षणाची सोय होणें इष्ट व अवश्य आहे, असें दिसतांच त्यांचे मामा व मुंबईकरांच्या चांगल्या परिचयाचे गृहस्थ प. वा. शामराव विठ्ठल कायकिणी ह्यांनीं त्यांस शिक्षणासाठीं मुंबईंत आणिलें. येथें आल्यानंतर त्यांच्या खऱ्या शिक्षणास प्रारंभ झाला. त्यांच्या मामांनीं त्यांस सहजासहजीं अनेक संस्थांची माहिती द्यावयास प्रारंभ केला. ह्या लहान वयांतच त्यांचा व प्रार्थनासमाजाचा संबंध जडला. शामराव विठ्ठल हे प्रार्थनासमाजाचे सभासद केव्हांही झालेले नव्हते, परंतु अनेक कारणांमुळें त्यांचा व प्रार्थनासमाजाचा निकट संबंध असे. ते पुढें स्थापन झालेल्या थिइस्टिक असोशिएशनचे सभासद व एकदां सेक्रेटरीही होते. समाजाच्या उपासनांस ते वारंवार जात. एके रविवारीं ते आपल्या भाचास उपासनेस घेऊन गेले. ह्या प्रसंगाची आठवण सर नारायण ह्यांस शेवटपर्यंत होती. डॉ. भांडारकर यांच्या धर्मपर व्याख्यानांच्या उपोद्घातामध्यें हा प्रसंग आठवून सर नारायण स्वतः म्हणतातः–

" आज ( १९१३ ) त्या गोष्टीला ४० वर्षें होऊन गेलीं. त्या वेळीं मी अगदीं लहान होतों व नुकताच आपल्या विद्याभ्यासासाठीं मुंबईंत आलों होतों. एके

रविवारीं सायंकाळीं माझे प्रिय मामा प. वा. शामराव विठ्ठल मला सहज शिक्ष
मिळावें, ह्या हेतूनें प्रार्थनासमाजांत घेऊन गेले. त्या वेळीं गाइलेलीं पदें, किं
त्या वेळच्या प्रार्थना अगर उपदेश ह्यांची आतां मला चांगलीशी आठवण ना
व मी अगदीं पोरवयाचा असल्यामुळें मला त्यांचा अर्थही कळला नाहीं. प
त्या वेळीं डॉ. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या घराच्या दिवाणखान्यांत उपासनेच
पूर्वी जमलेलीं तीं तेजस्वी चेहऱ्याचीं सतेज माणसें व सर्वांच्या मध्यें बसलेल
त्या मिस मेरी कारपेंटर, हा देखावा पाहून माझ्या मनावर अत्यंत इष्ट अ
परिणाम झाला, व त्यांची ओळख होऊन त्यांचेपासून ज्ञानप्राप्ति करून घेण्या
संधि कधीं येईल असा विचार माझ्या मनांत आला. हे असे विचार माझ्या म
मध्यें घोळत असतांना जणूं काय माझ्या मनांतील विचार ताडून व मा
जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं माझे मामा म्हणाले, ' हे पहा ! डॉ. आत्माराम पां
रंग, नारायण महादेव परमानंद, प्रो. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, बाळ मं
वागळे, महादेव गोविंद रानडे, मोरोबा विनोबा, भास्कर हरि भागवत व वासु
बाबाजी नवरंगे, ही सर्व एकेश्वरी मंडळी आहे.' माझे मामा ही माहिती
असतांना मोठ्या शहरांत आलेला एखादा नवीनच माणूस मोठ्या उत्सुकतेनं
आदरबुद्धीनें आपल्या भोंवतीं जमलेल्या मंडळीकडे पाहत असतो, त्याप्रमाणें
त्यांच्याकडे पहात होतों......पुढें त्या गृहस्थांशीं माझा झालेला समाग
त्यांच्याशीं झालेलीं संभाषणें, त्यांचे उपदेश, त्यांचीं एकंदर चरित्रें यांपा
मला जो सर्वांत मोठा धडा मिळाला, तो हा कीं व्यक्तीची काय किंवा राष्ट्रा
काय उन्नति होण्यासाठीं सत्य व न्याय ह्यांचा जणूं काय प्रवाहच अंतःकरणां
वाहूं लागला पाहिजे. "

ह्या उताऱ्यावरून आमच्या चरित्रनायकाच्या उदार शिक्षणास लहानपणापा
कशी सुरवात झाली, तें वाचकांच्या लक्षांत येईलच. मुंबईंत आल्यावर शाम
वांनीं त्यांस प्रथम ' सेंट मेरी ' स्कूलमध्यें घातलें. सर नारायण ह्यांचें इंग्र
भाषेवरील स्वामित्व आज कोणास मान्य नाहीं, असें नाहीं. पण त्यांच्या इंग्र
भाषेच्या पारंगततेस वरील शाळेंतील भक्कम पाया कारण झाला, हें लक्षांत ठे
पाहिजे. येथें डॉ. विली ह्यांच्या देखरेखीखालीं त्यांच्या शिक्षणास प्रारंभ झा
नारायणरावांची हुषारी, शिकण्यासंबंधानें उत्सुकता व तरतरी पाहून डॉ. वि
ह्यांची त्यांचेवर फार प्रीति जडली. ते स्वतः त्यांस लॅटिन भाषा शिकवूं लाग
येथें असतांना उत्तम विद्यार्थि म्हणून जी त्यांची ख्याति झाली, तिची आठ

यांच्या वेळच्या विद्यार्थ्यांस अद्याप आहे. सर नारायण ह्यांचा एक मोठा गुण म्हणजे त्यांची शिस्त. ह्या शिस्तीचें महत्त्व त्यांस वरील शाळेंत असतांनाच कळूं लागलें. ह्या शाळेंत असतांनाच एक विशेष गोष्ट त्यांच्या लक्षांत आली व ते ती अद्यापही योग्य प्रसंगीं निवेदन करीत असत. त्यांनीं त्या वेळीं हें लक्षांत ठेविलें होतें कीं, आपल्या सर्व शिक्षकांची शिस्त असामान्य आहे. आज वरिष्ठ शिक्षक असणारा उद्यां इतर शिक्षकांचा नोकर बनतो, किंवा अगदीं खालच्या वर्गांतील मुलांचा शिक्षक होतो; पण त्याचा कोणी तिरस्कार करीत नाहीं, किंवा त्याच्याविषयीं कोणाचीही आदरबुद्धि नष्ट होत नाहीं. सर्व शिक्षक सर्व प्रकारच्या स्थितीचा अनुभव घेत असत व आपण सर्वांनीं एका शिस्तीनें वागलें पाहिजे, ह्याचें ते आपल्याला वळण लावून घेत होते, असें ते वारंवार म्हणत. अशा प्रकारें नारायणरावांचें शिक्षण होत असतां १८७० सालीं त्यांस एल्फिन्स्टन हायस्कुलांत घालण्यांत आलें. पूर्वीच्या शाळेंतील एक उत्तम विद्यार्थि अशी त्यांची कीर्ति झालेली असल्यामुळें नव्या शाळेंतील शिक्षकांचें त्यांच्याकडे विशेष लक्ष लागलें. प्रो. आबाजी विष्णु काथवटे त्या वेळीं त्या शाळेंत शिक्षक होते. त्यांनीं नारायणरावांचे इंग्रजी भाषेंतील निबंध तपासावेत. त्या वेळीं नारायणरावांसारख्या हुशार विद्यार्थ्यांचें आपल्या हाताखालीं कांहीं प्रत्यक्ष शिक्षण झालें पाहिजे, असें त्यांस वाटून त्यांनीं नारायणरावांस लॅटिन सोडून संस्कृत भाषा घ्यावयास सांगितलें व आमच्या चरित्रनायकांस तें सहज पटलें, व त्यांनीं एका वर्षांत आपला सर्व संस्कृत अभ्यास संपवून १८७१ सालीं प्रवेशपरीक्षेंत उत्तम रीतीनें यश संपादिलें.

## पुढील शिक्षण.

प्रवेशपरीक्षा पास झाल्यावर नारायणराव एल्फिन्स्टन कॉलेजांत जाऊं लागले. त्या वेळच्या स्थितींत व आजच्या स्थितींत जमीनअस्मानाचें अंतर आहे असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. म्हणजे त्या वेळचे विद्यार्थि विशेष कुशाग्र बुद्धीचे होते व आतां त्या प्रकारच्या तैलबुद्धीचे विद्यार्थि आढळून येत नाहींत असें म्हणण्याचा भाग नाहीं. तथापि एवढें मात्र खरें कीं, अध्यापक व विद्यार्थि यांचा त्या वेळीं निकट संबंध येत असे. विद्यार्थ्यांची संख्याही लहान असल्यामुळें अध्यापकांचें प्रत्येक शिष्याकडे लक्ष असे. विद्यार्थ्यांविद्यार्थ्यांत अधिक निकटभाव असे. आपल्या अध्यापकांविषयीं विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं आदरभाव असे आणि अध्यापकांची योग्यताही अशीच असे कीं, त्यांच्याशीं संबंध

जडला कीं, त्यांच्याविषयीं आदरयुक्त प्रेमभाव जागृत व्हावा. अशी स्थिति असतांना नारायणराव कॉलेजांत जाऊं लागले. शाळेंत असतांनाच इंग्रजी हा विषय त्यांचा उत्तम असल्याचें जाहीर झालेंच होतें. कॉलेजांत जाऊं लागल्यानंतर चार महिन्यांनीं इंग्लंडांतील मठ Monasteries हे कसे मोडले गेले ह्या विषयावर एक निबंध लिहिण्याची त्यांस संधि मिळाली. हा विषय त्यांच्या आवडीचा. मुळापासून त्यांचा धर्मपर विषयाकडे ओढा असल्यामुळें त्यांनीं ह्या विषयाचा ऐतिहासिकदृष्ट्या सांगोपांग विचार आपल्या निबंधांत केला व त्यांस निबंध उत्तम लिहिल्याबद्दल बक्षीसही मिळालें. ह्या निबंधामुळें प्रो. वर्डस्वर्थ ह्यांचें नारायणरावांकडे विशेष लक्ष गेलें व त्यांची विषयाची मांडणी, विवेचनशैली, विचार व प्रमाणांसहित विवेचन पाहून प्रो० वर्डस्वर्थ यांचे नारायणराव आवडते शिष्य बनले. वर्डस्वर्थ काव्यविषय शिकवीत असत. इंग्रजी काव्याची सर नारायण ह्यांस खरी अभिरुची लावावयास प्रो० वर्डस्वर्थसारखे अध्यापक कारण झाले. ही त्यांची आवड शेवटपर्यंत कायम होती. सुमारें पांच सहा वर्षे त्यांनीं स्टूडंट्स ब्रदरहूडच्या वर्गांना टेनिसन व वर्डस्वर्थचीं काव्यें शिकविलीं त्या वेळीं काव्य हा विषय त्यांच्या किती आवडीचा आहे तें चांगलें प्रत्ययास आलें. सहज भाषणांत उत्तमोत्तम काव्यांतील निवडक वेंच्यांचा ते जसा उपयोग करीत तसा करणारे फारच थोडे पदवीधर आढळतात. असो. अशा प्रकारें कॉलेजांत त्यांचें शिक्षण चालू असतांना सर्व परीक्षांत इंग्रजींत त्यांचा नंबर पहिला असे. १८७६ सालीं पहिल्या वर्गांत बी. ए. ची परीक्षा ते उतरले. बी. ए. साठीं त्यांनीं इतिहास व तत्त्वज्ञान हे ऐच्छिक विषय घेतले होते. इतिहास व अर्थशास्त्र ह्या विषयांत ते सर्वांत वर आल्यामुळें त्यांस 'जेम्स टेलर प्राइझ' त्या वेळीं मिळालें होतें. सर नारायण ह्यांच्याबरोबर ह्याच वर्षी पहिल्या वर्गांत जे दुसरे गृहस्थ आले होते, त्यांत प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष रा. रा. वासुदेव गोपाळ भांडारकर, रा. रा. मनोहर विष्णु काथवटे, रावजी भवानराव पावगी, बाळ गंगाधर टिळक हे होते, व दुसऱ्या वर्गांत रा. रा. विष्णुपंत भाटवडेकर, गोविंदराव कानिटकर, डॉ० जीवनजी जमशेटजी मोदी, रा. रा. गणेश गोपाळ पंडित, घनश्यामपंत पंडित, शिवराम सीताराम वागळे, गंगाराम बापसोबा रेळे, इ. मंडळी होती. ही सर्व मंडळी महाराष्ट्राच्या चांगल्या परिचयांतील आहे. ह्यांतील प्रत्येक गृहस्थ लोकसमूहापुढें आलेला असून, प्रत्येकानें निरनिराळ्या प्रकारें समाजसेवा केलेली आहे, ही एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी असल्यामुळें ही

नांवांची यादी येथें आम्हीं दिली आहे. बी. ए. झाल्यानंतर एक वर्षपर्यंत नारायणरावांनीं आपल्या कॉलेजांत दक्षिणा फेलोचें काम केलें, व तें काम करीत असतांनाच सार्वजनिक विषयांकडे त्यांचें लक्ष लागूं लागलें, व ते इंदुप्रकाशांत लेख लिहूं लागले.

## नारायणराव व इंदुप्रकाश.

माधवराव रानडे **इंदुप्रकाशा**चे संपादक असतांना त्या पत्राचा जो लौकिक झाला, तो पुढें त्यांच्या पश्चात् कांहीं काळपर्यंत राखतां आला नाहीं. आमच्या येथें वर्तमानपत्रांची इभ्रत व वजन सर्वस्वीं त्याच्या संपादकाच्या कौशल्यावर अवलंबून असतें. माधवराव रानडे ह्यांचें धोरण, त्यांची विद्वत्ता, त्यांचें विचारौदार्य, त्यांच्या मागून आलेल्या संपादकांत नव्हतें. एवढेंच नव्हे, तर कधीं कधीं इंदुप्रकाशाचें धोरण प्रागतिक आहे, याचीहि संपादकांस विस्मृति पडे! अशा वेळीं नारायणरावांचा व इंदुप्रकाशाचा संबंध जडला, व १८७७ सालीं ते इंग्रजी बाजूचे संपादक झाले. त्यांचे लेख येऊं लागल्यापासून रानडे त्यांचे लेख आस्थापूर्वक वाचूं लागले. त्यांचा व नारायणरावांचा पूर्वी दृढ परिचय नव्हता, तरी पण न्या. मू. रानडे यांचा जो मोठा गुण कीं, जे कोणी गुणवान् असतील त्यांस जवळ करावयाचें, प्रोत्साहन द्यावयाचें, त्यांस मार्ग दाखवावयाचा, त्यास अनुसरून इंदुप्रकाशांतील लहानमोठ्या लेखांसंबंधानें नारायणरावांनीं सल्ला विचारतांच, त्यांनीं सूचनापर व प्रोत्साहनपर पत्र लिहून त्यांस सांगितलें कीं, " आपले अग्र व स्फुट लेख मी नित्य वाचतों. आपले स्फुट लेख लांबलचक असतात, ते तसे नसावेत; आपल्या अग्रलेखांत फार अघळपघळपणा असतो, तो टाळवेल तितका टाळा व स्फुट लेखांवर भर ठेवा. आजकाल लोकांना लांबलचक लेख वाचण्यास फुरसत नसते. आपले स्फुट लेख लहानच, परंतु व्यापक अर्थानें भरलेले, आणि चटकदार असावेत, व पार्थिअन लोकांच्या शरसंधानाप्रमाणें आपल्या स्फुटांचा नेम बिनचूक साधावा. " स्वतः न्या. मू. च्या लेखांत अघळपघळपणाचा दोष नव्हता, असें जरी कांहीं म्हणतां यावयाचें नाहीं, तरी नारायणरावांनीं ह्या उपदेशानुसार आपलें काम चालविलें, व वर्तमानपत्रांतील लेखांसंबंधानें त्यांचा अभिप्राय कोणी विचारावयास गेल्यास ते त्यास हाच उपदेश करीत. नारायणरावांनीं इंदुप्रकाशाच्या कीर्तींत चांगलीच भर घातली; इंदुप्रकाशाच्या मतांना सरकारदरबारांत व लोकांमध्यें विशेष मान मिळूं लागला, व योग्य रीतीनें वर्तमानपत्र चालविलें असतां त्याच्याद्वारें

लोकहित कसें साधतां येतें, तें त्यांनीं आपल्या सुमारें पंधरा वर्षांच्या कारकीर्दींत उत्तम प्रकारें सर्वांच्या प्रत्ययास आणून दिलें.* या वेळीं त्यांचा एक गुण विशेष रीतीनें अनुभवास आला. आपल्या हातून जें काम होण्यासारखें नाहीं तें नारायणराव कधीं अंगावर घेत नसत, पण एकदां त्यांनीं आपण होऊन कोणतेंही काम अंगावर घेतलें, कीं मग त्यांत ते कधीं टंगळमंगळ करीत नसत. इंदुप्रकाशाचे संपादक असतांनाच त्यांनीं कायद्याच्या अभ्यासास प्रारंभ केला व परीक्षेस बसले, आणि त्या परिक्षेंत पहिल्या वर्गांत पास होऊन हिंदु लॉ ह्या विषयांत पहिले आल्यामुळें ऑर्नोल्ड स्कालरशिपही त्यांस मिळाली. परंतु अभ्यासाच्या धांदलींत त्यांनीं इंदूची हेळसांड केली नाहीं. हा त्यांचा गुण त्यांनीं आणखी एक वेळ लोकनिदर्शनास आणून दिला. १८८८ सालीं ते गिरगांव वार्डाच्या तर्फे म्युनिसिपल कॉर्पोरेशनचे मेंबर झाले. परंतु पुढच्या निवडणुकीच्या वेळीं त्यांनीं उमेदवार राहण्याचा विचार मुळींच मनांत आणिला नाहीं ! त्याचें कारण असें कीं, त्यांचा वकिलीचा धंदा आतां उत्तम प्रकारें चालूं लागला होता; इंदुप्रकाश पत्र हातीं होतेंच. अशा स्थितींत जें काम आपल्याला करावयास फुरसत नाहीं, तें करण्याचा आव घालणें त्यांस बिलकुल पसंत पडलें नाहीं. केवळ मानासाठीं मेंबर होण्याचा विचार त्यांस केव्हांच शिवला नाहीं. वकिली सुरू केल्यावर त्यांना नोकरींत ओढण्याचे प्रयत्न झाले; परंतु त्यांनीं आपल्या धंद्यांत यश मिळवावयाचें, त्यांत नांवलौकिक मिळवून राहिलेला वेळ देशकार्यासाठीं खर्चावयाचा असा निश्चय केला होता, व त्यामुळें नोकरी धरावी हा विचार त्यांस केव्हांच त्या वेळीं महत्वाचा वाटला नाहीं. नारायणराव अल्प काळांतच उत्तम

---

* Under his Editorship the paper acquired the reputation of a first class Journal. While there was an agreeable variety of subjects in the articles appearing in the paper, each one of them was generally the result of considerable thought and information. Few native papers have been edited with the ability and knowledge displayed by Mr. Chandavarkar during the time that he was in charge of the paper. Its opinions received their due weight in the highest quarters, where it was looked upon as a leading liberal organ of educated native thought.

—*Eminent Indians.*

वकील म्हणून प्रसिद्ध झाले. त्यांच्या भोंवतीं कांहींसें वकिली वातावरण होतें. त्यांचे तीर्थरूप मुक्काम सिरसी येथें वकिली करीत होते. स्वतः नारायणराव मुंबईस शिक्षणासाठीं आले तेही आपले मामा जे वकील होते त्यांच्या येथें. नारायणरावांनीं निरनिराळ्या बाबतींत देशहित साधण्यास कसें साहाय्य केलें त्याचा विचार पुढें थोडा सविस्तरपणें करावयाचा असल्यामुळें येथें त्यांच्या आयुष्यांतील विशेष प्रसंगाचें टांचण करितों.

## लोकसेवा.

१८८५ सालीं पार्लमेंटची पुनर्घटना व्हावयाची होती. त्या वेळीं हिंदुस्थानाविषयीं खरी खुरी माहिती इंग्लंडांतील मतदारांस करून द्यावी, हिंदुस्थानच्या ज्या मागण्या आहेत, त्या किती न्याय्य आहेत, तें त्यांस दाखवावें, इंग्लंड व हिंदुस्थान यांचा हितसंबंध सारखा आहे, नव्हे एक आहे, असें समजण्यानें व इंग्लंडनें हिंदुस्थानाविषयीं आपलें जें कर्तव्य आहे, त्याची जागृति ठेविल्यानें इंग्लंडच्या इभ्रतींत कशी भर पडणार आहे, तें सांगण्यासाठीं हिंदुस्थानांतून निरनिराळ्या भागांतून नांवाजलेले पुढारी पाठविण्याचा विचार जेव्हां मुक्रर झाला, तेव्हां नारायणरावांस मुंबईच्या लोकांच्या तर्फे पाठविण्याचें ठरलें. त्यांनीं मनमोहन घोस व मि. मुदलिआर यांच्या मदतीनें तेथें व्याख्यानांच्या द्वारें जागृति केली. १८८५ सालांतील ती गोष्ट. त्या वेळीं परदेशगमनाविषयीं आजच्या सारखें अनुकूल मत झालेलें नव्हतें. आतां तर भाटियासारख्या पुरातन मताभिमानी जातींतही या बाबतींत उदार विचारांची पुष्कळच वाढ झाल्याचा अनुभव येत आहे; पण त्या वेळीं तशी स्थिति नव्हती. आपल्याला सर्व आप्तांकडून जाहीर रीतीनें परवानगी मिळेल किंवा आपल्याला कांहीं हरकत येणार नाहीं, अशी कांहीं खात्री त्यांना नव्हती, म्हणून अगदीं निकटच्या मंडळीसही प्रवासास प्रारंभ करीपर्यंत त्यांच्या प्रयाणासंबंधानें कांहीं माहिती नव्हती ! विलायतेंत गेल्यावर आपली माहिती, आपलें वक्तृत्व व आपलें साधार विवेचन यांच्या द्वारें त्यांनीं नांव मिळविलें. त्यांनीं ब्राइट, जोसेफ चेंबर्लेन, चर्चिल वगैरे मोठमोठ्या मुत्सद्यांच्या गांठी घेतल्या, त्यांच्याशीं संभाषणें केलीं, त्यांच्या भाषणांची तेथील पत्रांनीं खूप स्तुति केली. आपला विषय व्यवस्थितपणें लोकांपुढें ठेवून आपलें जें कांहीं म्हणणें आहे, तें सर्वांस पटविणें हें नारायणरावांस उत्तम प्रकारें साधलें आहे, असें तेथील नांवाजलेल्या पत्रकारांनीं म्हटलें. विला-

यतेहून परत आल्यानंतर पार्लमेंटच्या निवडणुकीच्या वेळीं इंग्लिश लोकांच्या राजकीय चळवळींचें खरें स्वरूप कसें काय असतें; तें त्यांनीं एका लेखाच्या द्वारें दाखविलें. ह्यांत फार महत्त्वाची माहिती आलेली आहे.

यानंतर नारायणराव सर्व प्रकारच्या देशहिताच्या चळवळींत पुढाकार घेऊं लागले. ते उत्तम वकील, उत्तम वक्ते, उत्तम लेखक, विद्वान्, धर्मशील, प्रागतिक विचाराचे म्हणून प्रसिद्धीस आले. शिक्षणाकडे त्यांचें पूर्वीपासून लक्ष असल्यामुळें त्यांना लॉर्ड रे ह्यांनीं १८८६ सालीं युनिव्हर्सिटीचे फेलो निवडलें. तेव्हांपासून इंदुरास जाईपर्यंत, नंतर तेथून परत आल्यावर अखेरपर्यंत त्यांनीं शिक्षणविषयक अनेक चळवळींत मन घातलें, व पुष्कळच काम केलें आहे. १८८९ पर्यंत ते नित्य नियमानें राष्ट्रीय सभेस हजर राहत व जें कांहीं काम करावयाचें असेल तें ते मनापासून करीत. १८९६ सालीं त्यांस कराची येथील प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष निवडण्यांत आलें व १८९७ सालीं विश्वविद्यालयाच्या तर्फे ते कौन्सिलचे जादा सभासद झाले. १९०१ पर्यंत ते काउन्सिलचे सभासद होते. एवढया अवकाशांत त्यांनीं तेथें पुष्कळ महत्त्वाचें काम केलें. कोणत्याही बिलासंबंधानें सांगोपांग विचार करण्यासाठीं जी सिलेक्ट कमिटी नेमिली जाते, तिचेवर फार मोठी जबाबदारी असते व लोकांची बाजू काय आहे, तें स्वतंत्र सभासदांस ह्या वेळीं अधिकाऱ्यांच्या नजरेस शांतपणें आणून देतां येत असतें. सभासद असतांना नारायणरावांची अनेक सिलेक्ट कमिटींमध्यें निवडणूक झाली होती. त्या वेळीं त्यांनीं जी कामगिरी केली, ज्या सूचना केल्या, जी माहिती दिली, तीबद्दल सर चार्लस ऑलिव्हंट ह्यांनीं त्यांची फार तारीफ केली होती.

## राष्ट्रीयसभेचे अध्यक्ष व न्यायाधीश.

अशा प्रकारें आमचे चरित्रनायक काम करीत असतां १९०० सालीं हिंदी राष्ट्राच्या तर्फे जो सर्वांत मोठा मान मिळावयाचा तो त्यांस मिळाला. लाहोर येथील राष्ट्रीय सभेचे त्यांस अध्यक्ष निवडण्यांत आलें, व ते अध्यक्ष ह्या नात्यानें भाषण करणार आहेत असें माहीत असूनही सरकारनें त्यांची न्या. मू. रानडे हे रजेवर जाणार म्हणून सहा महिन्यांपुरती हायकोर्ट जज्जाच्या जागीं नेमणूक केली. म्हणजे बहुतेक एकाच वेळीं लोकांनीं व सरकारानें नारायणरावांवर आपला किती विश्वास आहे, तो दाखविला. न्या. मू. रानडे यांचें अत्यंत आकस्मिकपणें देहावसान झालें व पुढें सरकारनें न्या. मू. चंदावरकर ह्यांचीच त्या जागीं काय-

मची नेमणूक केली. त्या जागेवर इंदुरास दिवाण होऊन जाईपर्यंत ते होते. ह्या बारा तेरा वर्षांत त्यांनीं जी कामगिरी केली आहे, तिचाही आम्ही पुढें उल्लेख करणार आहों, म्हणून त्याविषयीं येथें विशेष कांहीं लिहीत नाहीं. डॉ. सेल्बी ह्यांची व्हाइसचॅन्सेलरची मुदत संपल्यावर नारायणरावांची त्या बहुमानाच्या जागीं नेमणूक झाली. हे मुंबई युनिव्हर्सिटीचे तिसरे एतद्देशीय व्हाइस चॅन्सेलर होत. त्यांची योग्यता, विद्वत्ता, त्यांनीं बजाविलेली सेवा, त्यांचें शील हीं जाणून सरकारनें त्यांस १९१० सालीं नाइट केलें. न्यायाधिशाचें काम १२ वर्षें केल्यानंतर पेन्शन घेऊन आपल्या समाजाची सेवा करण्याचा त्यांचा विचार होता; परंतु त्यांनीं आपल्या वयाचीं ६० वर्षें होईतों पेन्शन घेऊं नये, असा प्रमुख न्यायाधिशांचा आग्रह पडल्यामुळें ते त्या जागीं राहिले. तरी इंदूरच्या महाराजांच्या अत्याग्रहावरून त्यांनीं आपल्या न्यायाधिशाच्या जागेचा राजीनामा देऊन व आपल्या विद्वत्तेचा, आपल्या अनुभवाचा, आपल्या उद्यमशीलतेचा, त्या संस्थानास लाभ देण्यासाठीं ते तेथें गेले. तेथें ते सर्वांचे अति आवडते दिवाणसाहेब झाले व गोरगरिबांस ते मायबाप वाटत होते. अशा प्रकारें ज्यांच्या चरित्रांतील विशेष प्रसंग घडून आले आहेत, त्यांनीं निरनिराळ्या रीतीनें आपल्या देशाचें हित कसें साधलें आहे, त्यांच्या राजकीय, सामाजिक, विद्य विषयक व धर्मविषयक, विचारांचें स्वरूप कसें आहे, त्याचा आतां विचार करणें आहे.

## राजकीय व सामाजिक सुधारणा.

सर नारायण चंदावरकर यांचे सर्व लेख व व्याख्यानें ह्यांचें जो कोणी अवलोकन करील, त्याच्या हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे कीं, राजकीय विषयांवर त्यांचीं जीं व्याख्यानें व जे लेख आहेत ते, त्यांच्या सामाजिक, शिक्षणपर, नैतिक व धार्मिक या विषयांवरील व्याख्यानांच्या किंवा लेखांच्या मानानें कमी आहेत. याचें कारण काय ? राजकीय चळवळीसंबंधानें त्यांची सहानुभूति नव्हती, असें कोणालाही म्हणतां यावयाचें नाहीं. एक तर न्यायमूर्ती असतांना १२-१३ वर्षे त्यांच्या मोठ्या हुद्यामुळें त्यांना राजकीय चळवळींत प्रत्यक्षपणें पडतां येणें शक्य नव्हतें. दुसरें असें कीं, सरकारानें आपल्याला हक्क द्यावेत व आपण त्यांचा उपभोग घेऊं लागावें, ह्या पलीकडे आपल्या कर्तव्याची मजल जावयाची आवश्यकता नाहीं, अशा विचाराचे ते नव्हते. आपल्या देशाची सर्व बाजूंनीं उन्नति व्हावयास पाहिजे. कोणत्याही एक बाजूची हेळसांड करून देशहित साधण्याचा प्रयत्न

केव्हांही यशस्वी होण्याची आशा करणें हा केवळ अविचार आहे. जेव्हां आम्ही सरकारपाशीं न्याय मागतों, आम्हांला न्यायानें वागवा, नीतीनें वागवा, विवेकाचा त्याग करूं नका, समतेच्या तत्त्वाचा त्याग करूं नका, असें आम्ही सरकारला सांगतो, त्याच वेळीं अशाच प्रकारें वागण्याची आपल्यावरही जबाबदारी आहे हें विसरून चालावयाचें नाहीं, असें त्यांचें स्पष्ट मत* होतें. त्यांनीं एकदां विद्यार्थ्यांना सांगितलें कीं, आपल्यामध्यें नीतिधैर्य आलें पाहिजे, असें म्हटलेलें आपण वारंवार ऐकतों. पण नीतिधैर्य म्हणजे काय, याचा कोणी स्पष्ट खुलासा करीत नाहीं. एकदां विचारपूर्वक जें मत बनलें, त्याप्रमाणें वागण्याचें धैर्य ज्याच्या ठिकाणीं आहे, कशाही प्रकारच्या अडचणी आल्या तरी ज्याचा निश्चय तिळमात्र ढळत नाहीं, आपल्या कार्यावरील ज्याची निष्ठा कमी होत नाहीं, आपली निंदा झाली किंवा आपल्यावर स्तुतीचा वर्षाव झाला, तरी तिकडे ज्याचें बिलकूल लक्ष जात नाहीं, जो कर्तव्यविन्मुख न होतां सत्य व न्याय्य तेंच आचरितो, त्याच्या ठिकाणीं नीतिधैर्य वास करीत आहे असें म्हणावें.† अशा प्रकारचीं त्यांचीं मतें होतीं, व पुष्कळ पुढारी म्हणविणारांचा केवळ राजकीय चळवळीवरच सर्व भर असल्यामुळें अशा एकाच बाजूला झुकलेल्या मंडळीचें व नारायणरावांचें सर्व बाबतींत जमलें नाहीं, किंवा अशा मंडळींत मिसळून त्यांस विशेषसें काम

---

* Political activity, political agitations are certainly good. They have their value and I do not for one moment mean to ignore their value. But what we do with one hand, let us not undo with the other. Let not the principle of elevation which we try to infuse into our people by means of our political activities, be allowed to be counteracted by the principle of fatalism which our present social arrangements and our present religious beliefs teach them. Let us reform and correct the latter, so that our political activities may be helped and supported, instead of being opposed by them.

† To have moral courage means, "that a man who thinks and feels that a certain thing is right, stands by his opinions and convictions, adheres to them faithfully and unflinchingly, looks to no public applause or favour, but does his best to act up nobly and fearlessly to his principles."

come here, we meet in this place not for the purpose of embarrassing the administration, subjecting it to criticism from any selfish end or unworthy motive. Our object is to *help* the administration as far as we can. In *claiming* rights and asking for the redress of grievances from Government on behalf of the people we recognise our own *responsibilities* and *duties*—the duty we owe to our countrymen of devoting ourselves to the cause of their welfare and progress. It is the due sense of that duty that has brought us here together."

ह्या उताऱ्यांत त्यांच्या एकंदर राजकीय चळवळीचें धोरण उत्तम प्रकारें ग्रथित झालें आहे. लोकांच्या वतीनें सरकारापाशीं हक्क मागणें हें कार्य नारायणरावांच्या दृष्टीनें सोपें नाहीं. हक्क मागणारांनीं आपल्या कर्तव्याचा विचार प्रथम केला पाहिजे. आपण जें मागत आहों, तें कितपत न्याय्य आहे, तें ठरविलें पाहिजे. जे अन्याय, जो जुलूम दूर करा, असें आपण सरकाराला सांगणार तशाच प्रकारचा अन्याय आपण इतरांसंबंधानें करीत आहों, किंवा कसें, आपण कोणावर जुलूम करीत आहों किंवा नाहीं याचा विचार झाला पाहिजे. सारांश, हक्क मागणें व कर्तव्य बजावणें यांचा संबंध अत्यंत निकट आहे. हीं एकमेकांला चिकटलेलीं आहेत. हें उच्च ध्येय पुढें ठेवून ते राजकारण साधण्याचा प्रयत्न करीत असत.

१९०० सालीं राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षस्थानीं त्यांची योजना बऱ्याच उशिरां झाली. त्या वेळीं सरकार व प्रजा ह्यांच्यापुढें दुष्काळाचा प्रश्न होता. म्हणून नारायणरावांनीं त्या विषयाचें सांगोपांग विवेचन आपल्या भाषणांत केलें आहे. हें भाषण सर्वतोपरी त्यांच्या विद्वत्तेस, अनुभवास, कीर्तीस व प्रसंगास अनुरूप असेंच होतें. त्या वेळीं त्यांनीं केवळ कर्तव्यबुद्धीनें प्रेरित होऊन राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें कबूल केलें. आपल्या देशबांधवांचा आपल्यावर विश्वास आहे, व ते आपल्याला आमंत्रण देत आहेत, तर त्यांच्या आमंत्रणाचा अनादर करण्याचा आपल्याला अधिकार नाहीं, असें त्यांस मनःपूर्वक वाटत होतें. म्हणून ते म्हणाले:—

"Your summons calling me to this duty, was served on me rather late when there was not much time left for me to get ready for the work, but I have obeyed your call, for I regard it as

स्वार्थबुद्धीनें झाल्याचें व कर्तव्यबुद्धीचा लोप झाल्याचें आढळून आलें, तेव्हां जणूं काय परमेश्वरानेंच असल्या जुलमी राष्ट्रांना बाजूस सारल्याची साक्ष इतिहास देत आहे. असें दिसलें एका राष्ट्राचा दुसऱ्यानें पाडाव करणें हें सोपें काम आहे, व जुलमी राज्यसत्ता असूं देणें हें तर त्याहीपेक्षां सोपें आहे, त्यामध्यें कोणाला थोरपणा व वैभव दिसत आहेत; परंतु जित जें राष्ट्र त्यांतील लोकांना उत्तम प्रकारचें शिक्षण देऊन त्यांस सुविचारसंपन्न करणें हें खरें थोर कृत्य होय, यांत खरें वैभव आहे, व राष्ट्राचा मोठेपणा आहे. आज हिंदुस्थान जें कांहीं मागत आहे, तें इतकेंच कीं, आजपर्यंत जुलमी राज्यसत्तेचा शेवट काय होतो, त्याचा पुष्कळ वेळां प्रत्यक्ष अनुभव आल्यामुळें आतां तरी राज्यकारभार असा असावा कीं, सर्व हिंदी लोकांची अशी खात्री व्हावी कीं, आपण व आपले राज्यकर्ते यांचा हितसंबंध सारखा आहे, एक आहे. असें जेव्हां लोकांना वाटूं लागेल, त्या वेळीं हिंदुस्थान व इंग्लंड ह्यांचा हा जो संबंध जडला आहे, तो दृढतर होईल. अशा प्रकारें भाषणें करून त्यांनीं विलायतेंत जी कामगिरी बजाविली, तिच्यांत हिंदुस्थानांत आल्यावर त्यांनीं अनेक व्याख्यानें, अनेक लेख व संभाषणें ह्यांच्या द्वारें भर घातली. परंतु पुढें ते राष्ट्रीय सभेच्या दर बैठकीस जातनासे झाले. तथापि राजकीय चळवळींची त्यांस आवश्यकता भासत नव्हती, असें मात्र नाहीं. लाहोर येथें राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना ते म्हणाले:—

" This is the first Congress that I attend after an absence of ten years, having attended all the previous Congresses, and though *I have never been* alienated from it, I cannot conceal from you my feeling that I return to my old love. "

१८९६ सालीं कराचीस जी प्रांतिक परिषद भरली, तिच्या अध्यक्षस्थानीं नारायणरावांची योजना झाली असतां त्यांनीं जें भाषण केलें, त्याच्या अखेरच्या भागाचें जे कोणी आस्थापूर्वक मनन करितील, त्यांस राजकीय चळवळींत पुढाकार घेतल्यानंतर नारायणराव आपल्यापुढें कोणता आदर्श ठेवीत असत, ह्याची कल्पना झाल्यावांचून राहणार नाहीं. त्यांचे शब्दच पहा:

" I am sure that we all feel that our strength lies in our *facts*, in our *moderation*, and above all in the *righteousness* of our cause. We are all animated by the conviction that we

come here, we meet in this place not for the purpose of embarrassing the administration, subjecting it to criticism from any selfish end or unworthy motive. Our object is to *help* the administration as far as we can. In *claiming* rights and asking for the redress of grievances from Government on behalf of the people we recognise our own *responsibilities* and *duties*—the duty we owe to our countrymen of devoting ourselves to the cause of their welfare and progress. It is the due sense of that duty that has brought us here together."

ह्या उताऱ्यांत त्यांच्या एकंदर राजकीय चळवळीचें धोरण उत्तम प्रकारें ग्रथित झालें आहे. लोकांच्या वतीनें सरकारापाशीं हक्क मागणें हें कार्य नारायणरावांच्या दृष्टीनें सोपें नाहीं. हक्क मागणारांनीं आपल्या कर्तव्याचा विचार प्रथम केला पाहिजे. आपण जें मागत आहों, तें कितपत न्याय्य आहे, तें ठरविलें पाहिजे. जे अन्याय, जो जुलूम दूर करा, असें आपण सरकाराला सांगणार तशाच प्रकारचा अन्याय आपण इतरांसंबंधानें करीत आहों, किंवा कसें, आपण कोणावर जुलूम करीत आहों किंवा नाहीं याचा विचार झाला पाहिजे. सारांश, हक्क मागणें व कर्तव्य बजावणें यांचा संबंध अत्यंत निकट आहे. हीं एकमेकांला चिकटलेलीं आहेत. हें उच्च ध्येय पुढें ठेवून ते राजकारण साधण्याचा प्रयत्न करीत असत.

१९०० सालीं राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षस्थानीं त्यांची योजना बऱ्याच उशिरां झाली. त्या वेळीं सरकार व प्रजा ह्यांच्यापुढें दुष्काळाचा प्रश्न होता. म्हणून नारायणरावांनीं त्या विषयाचें सांगोपांग विवेचन आपल्या भाषणांत केलें आहे. हें भाषण सर्वतोपरी त्यांच्या विद्वत्तेस, अनुभवास, कीर्तीस व प्रसंगास अनुरूप असेंच होतें. त्या वेळीं त्यांनीं केवळ कर्तव्यबुद्धीनें प्रेरित होऊन राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें कबूल केलें. आपल्या देशबांधवांचा आपल्यावर विश्वास आहे, व ते आपल्याला आमंत्रण देत आहेत, तर त्यांच्या आमंत्रणाचा अनादर करण्याचा आपल्याला अधिकार नाहीं, असें त्यांस मनःपूर्वक वाटत होतें. म्हणून ते म्हणाले:—

"Your summons calling me to this duty, was served on me rather late when there was not much time left for me to get ready for the work, but I have obeyed your call, for I regard it as

the country's call. I am in your hands; take me as I am with all my defects."

अशा भावनेनें, अशा विनयानें, त्यांनीं आपल्या भाषणास त्या वेळीं प्रारंभ केला. दुष्काळाच्या प्रश्नाचें सांगोपांग विवेचन ज्यांस पहावयाचें असेल, त्यांनीं हें भाषण अवश्य वाचावें अशी आमची शिफारस आहे. ज्या वेळीं नारायणराव राजकीय चळवळींत प्रमुखपणें भाग घेत होते, त्या वेळीं आधीं राजकीय सुधारणा कीं सामाजिक सुधारणा ह्या प्रश्नास बरेंच महत्त्व आलें होतें. एकच सुधारणा हातीं घ्या, ती पूर्ण झाल्यावर मग दुसरी, असला वेडगळ विचार देशाची बिघडलेली घडी सुधारण्याच्या कामीं अगदीं निरुपयोगी आहे, असें त्यांस वाटत होतें. आपलें म्हणणें त्या वेळीं बहुजनांपुढें ठेवतांना त्यांनीं सांगितलें कीं, एकदां विवेक जागृत झाला, अन्यायाची चीड येऊं लागली, म्हणजे ती फक्त अमुक एक शाखेपुरतीच, असें होत नाहीं. राजकीय बाबतींत विवेक जागृत झाला तर सामाजिक बाबतींत तो अगदींच निद्रितावस्थेंत राहणें शक्य नाहीं. ज्या वेळीं फक्त राजकारणांत पडणारे आपले हक्क, होणारा अन्याय, आपल्या राष्ट्रीय भावना, न्यायानें व नीतीनें राज्यकारभार चालवून घेण्याचा आपला हक्क असल्या विषयांत गढून गेलेले असतात, जेव्हां ते आग्रहानें प्रतिपादीत असतात कीं, पूर्वीचा वेळ आतां राहिलेला नाहीं; आतां तो बदलत चालला आहे. त्याच वेळीं सामाजिक सुधारणेविषयीं झटणारा मनुष्य ह्या सर्व विचारांचा फायदा घेऊन हीच विचारसरणी स्वीकारा व आपल्या समाजाच्या स्थितीचा विचार करा, अस आग्रहानें सांगतो व पर्यायानें राजकीय चळवळ करणारांचें काम पुढें ढकलतो. तथापि नारायणरावांनीं सामाजिक, शिक्षणविषयक व धार्मिक सुधारणांकडे विशेष लक्ष पोंचविलें आहे, ही गोष्ट केव्हांही नाकबूल करितां यावयाची नाहीं. राजकीय चळवळ ही परावलंबी आहे. योग्य प्रकारच्या चळवळींचाच विचार जरी मनांत घेतला तरी काय ? सर्व चळवळींचा इत्यर्थ हाच कीं, लोकांनीं चळवळ करावयाची, हक्कांसाठीं भांडावयाचें, आणि मग राज्यकर्त्यांना योग्य वाटेल तर किंवा त्यांची मर्जी लागली तर, ही चळवळ अंशतः फलद्रूप व्हावयाची. सामाजिक किंवा धर्मविषयक चळवळीचें तसें नाहीं. येथें प्रत्येक व्यक्तीला पुष्कळच कार्य करितां येतें. दुसऱ्या कोणाची वाट पाहत बसावें लागत नाहीं, जें आपल्याला योग्य वाटेल तें करावयास कोणाची आडकाठी नसते. म्हणून नारायणरावांचें लक्ष समाजसुधारणेकडे लागलें, व त्यांनीं आपल्या उदाहरणानें, पवित्र आचरणानें, परिपक्व विचारांच्या प्रसारानें, व व्याख्यानांच्या

द्वारा सामाजिक सुधारणेची मनोभावें सेवा केली. आंत एक आणि बाहेर दुसरेंच, असले प्रकार नारायणरावांना माहीत नव्हते. सर्व प्रकारच्या सुधारणांचें कार्य त्यांनीं आपलेंसें केलें.

## परदेशगमन व प्रायश्चित्त

१८८५ सालीं ते विलायतेस गेले. परत आल्यानंतर त्यांस बहिष्कृत करण्यांत आलें. त्यांच्या स्वामींस नारायणराव कोणत्या प्रकारचे गृहस्थ आहेत, हें माहीत होतें, व ते प्रायश्चित्तासारख्या खुळाला भीक घालणारे नाहींत, हेंही त्यांना ठाऊक होतें. म्हणून नारायणरावांनीं आपल्याला येऊन भेटावें, नुसती दिलगिरी प्रदर्शित करावी, अशी स्वामींची इच्छा होती; पण नारायणरावांस अशाप्रकारें आपलें विचार व आचारस्वातंत्र्य गमवावयाचें नव्हतें. त्यांनीं आपल्या स्वामींना त्यांच्या इच्छेप्रमाणें वागण्यास पूर्ण अवसर दिला ! त्यांच्या जातीचे लोक प्रथम कांहीं वर्षें दूर दूर राहिले, पण आतां त्यांच्या येथें उघड उघडपणें सर्व व्यवहार सर्व जात करीत असते व स्वामींना ही गोष्ट माहीत नाहीं, असें नाहीं. एखाद्याला त्याच्या जातीनें बहिष्कृत केलें म्हणजे त्याचें आपल्या जातीवरील प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष वजन सर्व नष्ट होतें, असें नाहीं. लोक त्याला दूर ठेवतात, पण त्याच्या वर्तनाचा, त्याच्या विचारांचा, व त्याच्या शीलाचा त्यांचेवर परिणाम होत असतोच असें त्यांचें मत असे.

## सामाजिक सुधारणा व धोरण.

आपल्या इलाख्यांत सामाजिक सुधारणेच्या चळवळीस प्रारंभ झाल्यापासून सुधारणेच्या प्रवर्तकांमध्यें निरनिराळ्या मतांचें प्राबल्य झालेलें आहे. सुधारणा हवी, पण ती लोकांना बरोबर घेऊन व्हावयास हवी; असें म्हणणारे लोक पूर्वी होते व आतां आहेत. कृतीचा वेळ अद्याप आलेला नाहीं, आज नुसती विचारजागृति होऊं द्या, कृतीची जबाबदारी आपल्या मागून येणारांवर आहे, असें म्हणणारे कांहीं लोक आजही आढळतात; जितका लोकांकडून प्रतिबंध कमी, तितकें सुधारणेचें पाऊल पुढें पडावयास सोपें ह्या वादानें नारायणरावांच्या तरुणपणीं सर्वांस भंडावून सोडलें होतें. हें मत एका गृहस्थांनीं एका व्याख्यानांत १८८६ सालीं प्रतिपादिलें व नंतर नारायणरावांपाशीं त्याविषयीं असा खुलासा केला कीं, ' आपल्या व्याख्यानांत आपल्याला विशेष सांगावयाचें होतें तें हेंच कीं, व्यक्तीची किंवा समाजाची साधारणतः अशी प्रवृत्ति असते कीं, शक्य तेवढें करून विरोध आणि

गैरसोई चुकवून सुधारणा घडवून आणतां येईल तर आणावयाची.' यावर नारायणरावांनीं त्यांस असा स्पष्ट प्रश्न केला कीं, 'जे सुधारक विरोधास किंवा अडचणीस न जुमानतां साधारण लोकांच्या पुढें जाऊन व विरोधास मागें लोटून आपल्या ठाम समजुतीप्रमाणें चालवयास डगमगत नाहींत ते लोक आपल्या वेळेचा व शक्तीचा व्यर्थ व्यय करीत आहेत असें म्हणण्याचा आपला उद्देश आहे काय? व्यक्तींनीं आपली उन्नति घडवून आणिल्याशिवाय समाजाची उन्नति सहसा होत नसते, हा जो समाजोन्नतीचा सर्वसाधारण नियम तो आपल्याला संमत नाहीं काय?' असा प्रश्न नारायणरावांनीं त्यांस करण्याचें मुख्य कारण असें कीं, सामाजिक सुधारणेच्या बाबतींत लेंचेपेंचेपणा बिलकुल उपयोगाचा नाहीं असें त्यांचें ठाम मत आहे. तेलंगांवरील आपल्या व्याख्यानांत ते म्हणतातः—

"उन्नतीचा मार्ग संकटमय आहे. पदोपदीं आपल्याला विरोधाशीं टक्कर दिल्यावांचून पुढें पाऊल टाकणें शक्य नाहीं, ही गोष्ट आपण पूर्णपणें लक्षांत बाळगली पाहिजे. एकदां समाजास जर प्रतिकाररहित सुधारणेच्या कल्पनेचा आधार दिला, तर त्याच्या श्रेष्ठ प्रकारच्या धनसंचयावरच आपण घाला घातला, त्याच्या भावी उन्नतीच्या सर्व आकांक्षा नष्ट केल्या, सर्व राष्ट्राची बौद्धिक शक्ति ज्यांना मानतात अशीं नेकीचीं, थोर व उदात्त बुद्धीचीं, धैर्याचीं आणि सोशीक माणसें उत्पन्न करण्याचें सामर्थ्य समाजांतून आपण नाहींसें केलें असें होईल. लोकांना एक वार आपण असें सांगितलें म्हणजे पुरे कीं, 'बाबांनों, तुम्हीं आपली उन्नति करून घ्या; पण तुमच्या करण्यानें तुम्हांला विरोध उत्पन्न होत असेल, तर त्याशीं टक्कर देण्याचें जितकें टाळतां येईल तितकें करून तुम्ही स्वतःचें कार्य साधतां येईल तर पहा.' आपल्या उपदेशाचा परिणाम काय होतो, हें आपल्यास लागलेंच कळून येईल. प्रत्येकजण आपापली सुखसोई प्रथम पाहील व थोडीशी गैरसोय होण्याचा किंवा जनसमूहाशीं विरोध करण्याचा प्रसंग आला कीं, सुधारणेच्या सर्व कल्पना तो गुंडाळून ठेवील." म्हणून त्यांनीं वारंवार आपल्या व्याख्यानांत इषारे दिले आहेत कीं, ह्या बाबतींत समाजाचे जे पुढारी आहेत, त्यांच्यावर फार मोठी जबाबदारी असते. केवळ लोकांचा कल पाहून चालणारे हे कांहीं खरे पुढारी नव्हत. "राष्ट्रावर काय किंवा समाजावर काय केव्हां केव्हां असे प्रसंग येतात कीं, त्या वेळीं जो पुढारी म्हणून म्हणवितो, त्याला लोकांना तुम्हीं भलत्या मार्गानेंच चाललां आहां, असें स्पष्ट

सांगावें लागतें. आणि ज्या देशांत अशा प्रकारचीं धीट व सत्य बोलणारीं माणसें आहेत, तोच देश खरोखर धन्य होय." ह्याच आदर्श पुढें ठेवून नारायणराव शेवटपर्यंत चालले. संमतिवयाच्या बिलाच्या चळवळीच्या वेळीं त्यांनीं पुढाकार घेऊन असें स्पष्टपणें दाखवून दिलें होतें कीं, शास्त्रांमध्यें कांहींही आज्ञा असल्या, पण त्या अमानुष आहेत, असें जर सिद्ध झालें, तर धर्माला धोका बसेल, ह्या ओरडीकडे लक्ष देणें हा अविचार आहे. खुद्द सरकारनें आजपर्यंत तसें केलेलें नाहीं. सरकारनें आजपर्यंत असे पुष्कळ कायदे केले आहेत कीं, ते धर्मशास्त्राच्या विरुद्ध आहेत. सरकारला नीति, दया, न्याय, समत्व हीं तत्त्वें दृष्टीपुढें ठेवून कायदेकानू रचावयाचे असतात. खुनी मनुष्य ब्राम्हण असला तर त्याला फाशीं द्यावयाचें नाहीं, असें शास्त्र सांगतें; म्हणून काय सरकारनें सर्व खुनीं ब्राम्हणांसाठीं निराळा कायदा करावा ? सतीची चाल काय पुन्हां सुरू करावी ? गुलामांचा व्यापार पुन्हां होऊं द्यावा ? सारांश, पुरातन शास्त्रांसंबंधानें त्यांच्या ठिकाणीं जरी पूर्ण आदर आहे, तरी धर्मगुरु व शास्त्री ह्यांच्याच तंत्रानें चालून जाण्याचा काल आजचा नाहीं, असें त्यांनीं वेळोवेळीं स्पष्टपणें सांगितलें आहे. आपल्या स्वतःचा अनुभव, आपला विवेक, आपली परिस्थिति, व प्रसंग ह्यांकडे पाहून जें न्याय्य, जें सत्य, तेंच आचरणांत आणिलें पाहिजे. मग मार्गामध्यें कशाही अडचणी आल्या तरी हरकत नाहीं. ज्या वेळीं धर्मगुरु, स्वामी व शास्त्री ह्यांच्या साहाय्यानें सुधारणा घडून आणविली पाहिजे ह्या मताचा पुरस्कार होत होता, त्या वेळीं पुरातनमतवाद्यांचें असें म्हणणें होतें कीं, "बाबांनो, आपले स्वामी, धर्मगुरु आणि शास्त्री यांची अवहेलना करून त्यांचीं मतें धाब्यावर बसवून किंवा अन्य कोणत्याही रीतीनें त्यांना चिडवून सुधारणा घडवीन म्हटलें तर तें इष्ट नाहीं व शक्यही नाहीं. त्यांच्याकडे जाऊन सौम्यपणें त्यांचीं मनें आपल्याकडे वळविलीं पाहिजेत, व अशा रीतीनें त्यांना अनुकूल करून घेतल्यावर, त्यांची सहानुभूति मिळविल्यावर मग त्यांच्याच साहाय्यानें, आपल्यास इष्ट त्या सुधारणा घडवून आणविल्या पाहिजेत. हा सरळ व सोपा मार्ग टाकून तुम्ही जर भलत्याच मार्गानें जाऊं लागलां, तर तुमची कार्यसिद्धि व्हावी कशी ? योग्य रीतीनें जर तुम्ही चाललां तर कोणाचीं मनें दुखणार नाहींत आणि जिकडे तिकडे शांतता राहील." आणि हा सोपा व सरळ उपाय रा. सा. मंडलीकांनीं करून पाहिलाही ! रावसाहेब वरील मतांचे होते. त्यांच्याविषयीं नारायणरावांच्या ठिकाणीं अत्यंत पूज्यबुद्धि होती. (रा. सा. मंडलिकांवरील व्याख्यान पहा.) परंतु

सामाजिक बाबतींत एकाचीं मतें एका टोंकाला, तर दुसऱ्याचीं दुसऱ्या टोंकाला असा प्रकार होता. एक ब्राह्मण गृहस्थ विलायतेहून जाऊन आल्यावर शास्त्री लोकांच्या साहाय्यानें त्यास पावन करून घेण्याच्या उद्योगाला रावसाहेब लागले. नारायणराव आदिकरून प्रागतिक ही मौज दुरून पाहत होते. झळकीकर शास्त्र्यांनीं खरा शास्त्रार्थ दाखविला व सांगितलें कीं कालमानाप्रमाणें तुम्ही काय वाटेल तें करा, पण शास्त्रार्थासाठीं आमच्यापाशीं येऊं नका. रावसाहेबांचा हा सर्व प्रयत्न पाहून शास्त्री लोकांना वाटलें कीं, आपणा सर्वांना व आपल्या धर्माला विकून टाकण्याचा रावसाहेबांचा हा उद्योग आहे! अखेरीस विलायतेहून जाऊन आलेल्या गृहस्थाला प्रायश्चित्त देऊन मेजवानी द्यावयाची तयारी झाली, पण त्या वेळीं कोणी शास्त्री आले नाहींत व रावसाहेबांना पानसुपारी घेऊन घरीं जावें लागलें! १८८४ पासून १८८७ पर्यंत ही जी चळवळ झाली, तिचेविषयीं नारायणराव म्हणतात, "सुधारक व दुर्धारक ह्या दोघांनींही एकमेकांपासून शिकण्यासारख्या पुष्कळ गोष्टी शिकून घेतल्या. असल्या विरोधाच्या योगानें रावसाहेबांनीं सुधारकांस आत्मशोधन करावयास शिकविलें. आपण बोलतों काय व वागतों कसें हें प्रत्येकानें आपापल्या मनाशीं शोधावें, हें सुधारकांस त्यांनीं दाखवून दिलें. त्याचप्रमाणें अखेरीस जर कार्यसाफल्य साधावयाचें असेल, तर आपण प्रत्यक्ष कृति करून दाखविण्यास व प्रसंग पडल्यास स्वार्थत्याग करावयास सिद्ध असलें पाहिजे, ही गोष्ट पूर्वींपेक्षां अधिक स्पष्टपणें या वेळीं सुधारकांच्या प्रत्ययास आली. शास्त्री लोकांना व बहुजनसमाजाला सांगातीं घेऊन सुधारणेस हात घालावा, या तत्त्वांवर रावसाहेबांचा फाजील विश्वास होता. परंतु वर सांगितलेला प्रयोग जो त्यांनीं केला त्यावरून हें सिद्ध झालें कीं, ज्यांचें मन सुधारणांच्या कल्पनांनीं सुप्रकाशित झालेलें आहे, त्या कल्पनांचें ज्यांनीं नीट आकलन केलेलें आहे, आणि तदनुरूप ज्यांनीं आपला वर्तनक्रम ठेवलेला आहे, अशा जाणत्या व जबाबदार पुढाऱ्यांनीं आपल्या कृतींनीं उदाहरण घालून दिल्यावांचून शास्त्री काय किंवा बहुजन समाज काय आपल्या स्थानापासून तिळमात्रही हालणार नाहीं. पुढाऱ्यांनीं पुढाकार घेतल्यावर त्यांना अनुयायी मिळण्यास कदाचित् कांहीं काल लागेल, परंतु पुढारी व्यक्तिशः जर आपल्या अंगीकृत कार्यास बिलकुल न सोडणारे असतील तर त्यांना अनुयायी वर्ग हा केव्हांना केव्हां तरी मिळालाच पाहिजे...बहुजनसमाज आणि शास्त्री यांच्यामध्यें जागृति झाली म्हणजे समाजाची प्रगति होईल. व्यक्तींनीं प्रत्यक्ष उदाहरण घालून देण्याची कांहीं आवश्य-

कता नाहीं, अशा प्रकारचे विचार गवताच्या विच्छिन्न काडीप्रमाणें निरुपयोगी आहेत. सकृद्दर्शनीं असे विचार शहाणपणाचे दिसले तरी, त्यांमध्यें धोकाच आहे. ज्यांनीं ज्यांनीं समाजामध्यें क्रांत्या घडवून आणिल्या, अशा आपल्या देशांतील किंवा इतर कोणत्याही देशांतील व कोणत्याही काळांतील शहाण्या व धोरणी समाजधुरीणांचें मत जर असेंच होतें, तर तें प्रस्तुत प्रसंगींही कां लागू नसावें ? अशा प्रकारच्या पुरुषांनीं, शास्त्र्यांनीं आणि धर्मगुरूंनीं आपला मार्ग निष्कंटक करीपर्यंत कधीं वाट पाहिली काय ? घातक किंवा अहितकारी आणि अनवश्यक अशी पुरातन वहिवाट झुगारून देण्याविषयीं आपण बोलत असतांना ज्या विचारांनीं आपलें मन भीतिग्रस्त होतें, तसल्या विचारांना त्यांनीं कधीं तरी थारा दिला काय ? पूर्वसंस्कारांचें वर्चस्व प्रस्तुत कालामध्यें फार आहे. कांहींहि झालें तरी, भूतकालाचें प्राबल्य आपल्यांतून कमी होणारें नाहीं. आपल्यास जी वाण आहे, ती प्रस्तुत काळाच्या वस्तुस्थितीस व्यवस्थित रूप देणाऱ्या शक्तीची. आणि ह्या शक्तीचा, ह्या सामर्थ्याचा उद्भव आंतून झाला पाहिजे. अंतःकरणांत तळमळ उत्पन्न होऊन मनुष्य कार्यास प्रवृत्त झाला पाहिजे. परंतु आपोआप अनुकूल अशी संधि मिळाली म्हणजे आपण समाजोद्धाराच्या कार्यास हात घालूं. अशा कल्पनांनीं जोंपर्यंत सूज्ञ व सुशिक्षित स्त्रीपुरुष स्वस्थ बसून राहतील तोंपर्यंत हें सामर्थ्य प्राप्त होणें नाहीं. सुधारणेच्या कामीं पुढाकार घेणारांचा छळ हा होणारच व पुढाऱ्यांनीं तो सोसण्यास तयार असलें पाहिजे.'' नारायणरावांनीं सामाजिक प्रगतीच्या बाबतींत जी काय चळवळ केली, जो काय उद्योग केला, जीं भाषणें केलीं, ज्या सभा भरविल्या, जे लेख लिहिले त्या सर्वांचें धोरण हें होतें. त्यामुळें बालविवाहनिषेधापासून तों जातिभेदनिर्मूलनापर्यंत सर्व सात्त्विक सुधारणांस त्यांचें साहाय्य असे. न्यायाच्या, सत्याच्या, प्रेमाच्या व धर्माच्या दृष्टीनें जी चळवळ, जें कार्य योग्य आहे, त्याचा पुरस्कार नारायणरावांनीं केला आहे.

## सर नारायण व अंत्यजोद्धाराची चळवळ.

आपल्या महाराष्ट्रांत अंत्यजोद्धाराची जी निग्रहाची चळवळ सुरू झाली तीस रा. रा. विठ्ठल रामजी शिंदे यांनीं १९०६ सालीं प्रारंभ केला खरा, पण सर रामकृष्णपंत भांडारकर, न्या. रानडे, सर नारायणराव चंदावरकर ह्यांचें ह्या प्रश्नाकडे पूर्वीपासून लक्ष होतें. १८७० सालीं केशवचंद्र सेन ह्यांनीं इंग्लंडहून परत आल्यावर जें व्याख्यान दिलें, त्यांत कनिष्ठ वर्गाच्या उन्नतीसाठीं कांहीं तरी

करा, अशी आग्रहाची विनंति मुंबईकरांस केली होती. १८९० सालीं प्रार्थना-समाजानें अस्पृश्य वर्गांतील विद्यार्थ्यांसाठीं रात्रींची शाळा स्थापिली. १८९४ सालीं नारायणरावांनीं भागवतधर्माचें अर्वाचीन स्वरूप ह्या विषयावर जें व्याख्यान दिलें, त्यांत अंत्यज मानिलेल्या लोकांविषयीं त्यांची कळकळ त्यांनीं विदित केलेली होती. ह्या व्याख्यानांत ते एके ठिकाणीं म्हणतात, " हा आपला देश ज्ञातिबंधनांनीं जरी अगदीं बद्ध झालेला आहे, तरीसुद्धां अगदीं खालच्या वर्गाचें म्हणून ज्यांना मानिलें जातें, त्या महारांत सुद्धां अशीं माणसें आढळतात कीं, त्यांचा भाव, त्यांची भक्ति, आपल्या अंतःकरणास अगदीं तल्लीन करून सोडणारीं पदें घोळून घोळून म्हणणें व भक्तांच्या व साधूंच्या पद्यांचें अगदीं साध्या रीतीनें त्यांनीं केलेलें निरूपण ऐकून मनाला फार फार समाधान वाटतें. कांहीं वर्षांपूर्वी खंडाळयास एका महारबुवानें हरिकीर्तन केलें, त्या वेळीं साधुसंतांची आठवण करितांना त्यानें अगदीं कळवळ्यानें म्हटलें " अहो संतहो ! आपण आमच्यावर फार उपकार केले आहेत. ज्या वेळीं वेदांनीं आह्मांला टाकिलें, ब्राह्मणांनीं झिडकारिलें व लोकांनीं आम्हांस बहिष्कृत केलें, त्या वेळीं आम्हीं जे अगदीं पतन पावलेले, सर्वांस तिरस्करणीय वाटणारे महार त्यांना आपण जवळ केलें; आपण आम्हांला आमच्या उद्धाराचा मार्ग दाखविला व आमच्या ठिकाणीं आशा उत्पन्न केली, त्या आपले आम्ही उतराई कसे होणार ? "

सर नारायण यांनीं या चळवळींत जो पुढाकार घेतला व ह्या चळवळीसंबंधानें ते जी आस्था दाखवीत होते, ती आपण कांहीं तरी एक मोठें परोपकाराचें कृत्य करीत आहों, ह्या बुद्धीनें बिलकुल नव्हे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. ह्या लोकांच्या हितासाठीं झटणें हा आपला धर्म आहे; आजपर्यंत आपण त्यांचेसंबंधानें घोर अन्याय केला आहे, त्यांतून आपण मुक्त झालें पाहिजे, ही भावना त्यांच्या ठिकाणीं सतत जागृत असे. एवढेंच नव्हे, तर त्यांनीं एकदां असें स्पष्ट म्हटलें कीं, आपली परिस्थिति, सरकारचे प्रयत्न, आधुनिक काल सर्व कांहीं हे माणसामाणसांमधील भेदभाव नष्ट होणार, लवकरच नष्ट होणार असें सुचवीत आहेत, आणि जरी आमच्या देशांतील श्रेष्ठकनिष्ठपणाचे भेद संपूर्णपणें नष्ट होण्याचें लक्षण आजच दिसत नाहीं, तरी हे निराश्रित लोक यापुढें मागच्याप्रमाणेंच अस्पृश्य, तिरस्कृत राहतील असें कोणीही समजूं नये. ह्या लोकांच्या उन्नतीसाठीं झटल्यानें आपणच आपली उन्नति केल्यासारखें होणार आहे. अंत्यजोद्धाराचे प्रयत्न चालविणारांस त्यांनीं फार महत्त्वाच्या व सावधगिरीच्या सूचन

केल्या आहेत. अस्पृश्यवर्गांच्या उन्नतीसाठीं झटतांना आपल्याला कोणाशींही चढाओढ करावयाची नाहीं, हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. त्याचप्रमाणें ब्राह्मणांनीं ही सर्व घाण केली, ब्राह्मणांनीं ह्या लोकांवर जुलूम केला, आपल्या स्वतःच्या लाभासाठीं त्यांना खालीं दडपलें, अशी ओरड वेळीं अवेळीं केल्यानें ह्या चळवळीचें कांहीं हित होईल, असें मुळींच नाहीं. ही चळवळ आपण जर योग्य रीतीनें चालविली, सर्व कामें सहानुभूतीनें प्रेरित होऊन केलीं, व शांतपणें प्रयत्न करीत राहिलों तर आपण उच्च किंवा कनिष्ठ वर्गांतील असलों तरी त्यायोगें आपली स्वतःचीच उन्नति झाल्यावांचून रहाणार नाहीं. पुढील त्यांचे शब्द जसेच्या तसेच उतरून घेण्यासारखे आहेत. ते म्हणतातः—

"So long as we have the untouchables among us we shall bring to ourselves the contamination of untouchableness. He who tries to lower and degrade others and treat them as cast-aways, ends in the long run by lowering and degrading himself... and in applying ourselves to the task of educating and enlightening the depressed classes we are not only teaching them but ourselves to make our lives brighter and purer than they are or will be so long as we allow any portion of the community to lie before us as the despised of the earth."

अशा प्रकारचें अत्यंत उदात्त ध्येय आपल्यापुढें ठेवून सर नारायणराव निराश्रित साहाय्यकारक मंडळी स्थापन झाल्यापासून तिचें काम अध्यक्ष ह्या नात्यानें पाहात होते व मंडळीच्या सर्व प्रचारकांनीं ह्याच धोरणानें आपलें काम चालवावें, असें त्यांचें नित्य सांगणें असे. पुढें कांहीं गैरसमज झाले, म्हणून त्यांनीं ह्या मिशनशीं असलेला आपला संबंध सोडला. पण तें कार्य त्यांस प्रिय होतेंच.

## सर नारायण व तरुण पिढी.

एका व्यक्तीविषयीं लिहितांना दुसऱ्या कोणाशीं त्या व्यक्तीची तुलना करणें, हें शिष्टाचाराविरुद्ध आहे. आणि तशी तुलना करण्याच्या आम्ही भानगडींत पडतही नाहीं व ह्या लेखांत तशा प्रकारच्या तुलनेची कांहीं आवश्यकताही नाहीं. परंतु एक गोष्ट येथें विशेष रीतीनें नमूद करणें आम्हांला अगत्याचें वाटतें, ती ही कीं, सर नारायण चंदावरकर ह्यांचें आमच्या तरुण पिढीकडे जितकें लक्ष होतें, त्यांच्या कल्याणाची ते जितकी आस्था दाखवीत असत, त्यांना उद्देशून ते

जितकीं व्याख्यानें देत किंवा आपल्या व्याख्यानांत त्यांना उद्देशून जितका उपदेश करीत, तितका दुसऱ्या कोणत्याही पुढाऱ्यानें केल्याचें आम्हांस माहीत नाहीं. इतकें त्यांचें तरुणांकडे लक्ष असे. स्टूडंट्स ब्रदरहूड ही संस्था उपयुक्त आहे. येथें अनेक तरुण कांहीं तरी आपल्याला उपयुक्त ज्ञानाचा लाभ व्हावा म्हणून दर आठवड्यास जमत असतात, असें पाहून सर नारायणराव स्वतः त्यांचे साप्ताहिक वर्ग शिकवूं लागले आणि हा क्रम त्यांनीं सतत पांच वर्षेपर्यंत चालविला. आधींच वर्डस्वर्थ व टेनिसन ह्यांच्या काव्यांची त्यांना आवड, तशांतून आपल्या साहाय्याची अपेक्षा करणारा तरुणसमाज, असा योग जमल्यामुळें नारायणरावांनीं मोठ्या आनंदानें पांच वर्षे हें काम नियमितपणें केलें. तरुण मुलांच्या कल्याणाची त्यांना ज्याप्रमाणें काळजी त्याचप्रमाणें तरुण मुलींकडे त्यांचें लक्ष. येथील स्टूडंटस लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीच्या शाळेंतील सातव्या इयत्तेंतील मुलींना दर शनिवारीं त्यांच्या शाळेंत जाऊन इंग्रजी विषय ते शिकवीत असत ! न्यायाधिशाचें काम करून अनेक सार्वजनिक संस्थांची काळजी पहावयास त्यांस फुरसूद सांपडत तर असेच, पण वरील ह्या दोन वर्गांना आपल्या अनुभवाचा लाभ द्यावयास त्यांना वेळ सांपडत असे ! इतकें असून कितीही काम केलें तरी ते कधीं थकत नसत. ते तीन वर्षे येथील युनिव्हर्सिटीचे व्हाइस चॅन्सलर होते. ही जागा बहुमानाची तर खरीच, परंतु आपल्या तरुण पिढीचें कल्याण करण्याची संधि आपल्यापुढें आली आहे, ती व्यर्थ न दवडणें हेंच आपलें कर्तव्य होय, ह्या भावनेनें ते तें काम पाहत असत; आणि त्यांच्या काळीं युनिव्हर्सिटींत जितक्या घडामोडी झाल्या, जितक्या सभा झाल्या, जितके वादविवाद झाले, जितक्या कमिट्या व पोटकमिट्या नेमल्या गेल्या, तितक्या गेलीं तीन वर्षे सोडल्यास दुसऱ्या कोठल्याही व्हाइस चॅन्सलरच्या कारकीर्दींत नेमल्या गेलेल्या नाहींत. त्यांनीं व्हाइस चॅन्सलर ह्या नात्यानें जीं भाषणें केलीं, तीं जे कोणी आस्थापूर्वक वाचतील त्यांस सर नारायण यांचें तरुणांच्या कल्याणाकडे कसें सर्वदा लक्ष असे, तें लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. तरुणांच्या ठिकाणीं जागृति उत्पन्न करण्याचा त्यांचा सतत प्रयत्न असे. आपल्या एका चिरस्मरणीय व्याख्यानांत ते म्हणतातः—

*"लोक काय म्हणतात त्याला भलतेंच महत्त्व देणें हा अविचार आहे.* **व्यक्तिमात्राचा श्रेष्ठतम धर्म जो आहे, तो हाच कीं, पूर्णपणें विचार करून जें कांहीं आपल्याला योग्य, सत्य, न्याय्य वाटेल तें कर्तव्यबुद्धीनें आचरणांत आणावयाचें,**

मग त्याच्यायोगें कोण राजी होतो व कोणाची इतराजी होते हा विचारच मनांत आणावयाचा नाहीं. ह्यालाच म्हणतात नीतिधैर्य. कर्तव्य नीतिधैर्यावर अवलंबून असतें, व त्याच्याचमुळें मनुष्याला मानवजातीची सेवा करण्याचें व सत्यशोधन करण्याचें धैर्य प्राप्त होतें. सुशिक्षित पुरुष ह्या नात्यानें तुम्हांला नेत्यांचा मान प्राप्त होणार आहे, ह्यासाठीं तरी निदान हा अमोलिक गुण मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हल्लीं आपल्या असें ऐकिवांत येतें कीं, सुशिक्षितांचें कर्तव्य, लोकमत सरकारापुढें मांडणें हें होय. हल्लींचा प्रवृत्ति अशी आहे कीं, पुढाऱ्यांनीं लोकमताप्रमाणें वागावें. धुरीणत्व प्राप्त करून घेण्यासाठीं सुशिक्षित पुरुष साधारण जनतेच्या विरुद्ध वागण्यास भितात; व तिला वळण लावण्याच्या ऐवजीं आपणच वळले जातात. माझ्या मतें लोकमत प्रदर्शित करणें, हें सुशिक्षितांचें कर्तव्य नसून तें बनविणें व त्याला वळण लावणें, हें त्यांचें कर्तव्य आहे. लोक कोठें चुकत असतील तर त्यांची चूक त्यांना दाखविणें, त्यांच्या चुकीच्या चालीरीति सुधारण्याचा प्रयत्न करणें, हें त्यांचें कर्तव्य आहे. ज्यांना शिक्षणाचा प्रकाश मिळाला आहे, त्यांनीं जर तो इतरांना द्यावयाचा नाहीं, तर जनतेला मार्ग दाखविण्याचें काम कोणीं करावें? जगाची प्रगति लोकाराधनेचा प्रयत्न करणाऱ्यांकडून झालेली नसून प्रसंगीं लोकांच्या विरुद्ध जे गेले, जे विवेकाला व परमेश्वराला साक्षी ठेवून कर्तव्य करिते झाले, त्यांच्यामुळेंच झालेली आहे. आम्हांमध्यें अशी बरीच लेखक मंडळी आहेत कीं, तीं समाज व धर्मसुधारकांना लोकमत तुमच्या बाजूला नाहीं, लोकांना तुमची जरुरी नाहीं, असें सांगण्याचा आव घालते. त्यांना वाटतें कीं, आपण लोकांत मिसळून असलों, त्यांच्या मर्जीप्रमाणें भाषणें केलीं, त्यांच्या चालीरीतींची अंधभक्तीनें स्तुति केली म्हणजे आपण मोठें सत्कृत्य केलें. अशा प्रकारें वागून प्राप्त करून घेतलेल्या लोकप्रियतेचें ही मंडळी इतरांपुढें प्रदर्शन करीत असते."

त्यांचें तरुणांकडे इतकें जें लक्ष असे, त्याचें मुख्य कारण असें होतें कीं, त्यांच्या मतें देशाला चांगली अगर वाईट स्थिति प्राप्त करून देण्याचें सामर्थ्य तरुणांच्या ठायीं आहे. त्यांचें शील, त्यांचें कर्तृत्व, त्यांचें ज्ञान, त्यांची उद्योगाची आवड, त्यांची सत्यप्रीति व न्याय बुद्धि, त्यांचें आचरण, त्यांचें धार्मिक जीवन, त्यांचा विवेक ह्या सर्वांवर देशहित अवलंबून असतें, ह्याची जागृति सर नारायण ह्यांच्या ठायीं फार असे. ती किती प्रबळ असे, याची कल्पना लेखाच्या द्वारें करूनही देतां येत नाहीं। त्यासाठीं त्यांचीं भाषणें ऐकिलीं पाहिजेत,

त्यांच्याशीं वारंवार संभाषणांचे योग जमवून आणिले पाहिजेत, म्हणजे मग तरुणांचें कल्याण, तरुणांचें हित व तरुणांच्या ठिकाणीं कर्तव्यनिष्ठा जागृत करण्याची आवश्यकता, ह्यांविषयीं त्यांना कशी चिंता लागून राहिलेली होती, त्याची कल्पना होते. अशी त्यांच्या मनाची स्थिति नित्य असे, म्हणूनच आपल्या एका व्याख्यानाच्या अखेरीस कळकळीनें ते म्हणतातः—

" आपल्या ह्या देशावर, मित्रहो, तुमचें जर खरें प्रम असेल व तें आहे ह्याविषयीं मला बिलकुल संशय नाहीं, व आपल्या देशाची जर तुम्हांला काळजी असेल, आणि ती आहे अशी माझी खात्री आहे, तर आपल्या ह्या देशाला थोर पद प्राप्त करून देण्यासाठीं तुम्ही प्रथम आपली नैतिक व बौद्धिक उन्नति करा. मुत्सद्दी होण्याची हांव धरण्यापूर्वी गुणसंपन्न पुरुष होण्याची हांव धरा. कर्तव्याचें उच्चतम ध्येय आपल्या पुढें ठेवून तें स्वावलंबनानें व नीतिधैर्याच्या साहाय्यानें प्रत्यक्ष कृतीमध्यें आणा. " अशा प्रकारें तरुण पिढीच्या कल्याणाविषयीं ते उत्सुकता दर्शवीत.

## सर नारायण यांचें खरें स्वरूप.

" आम्ही सर्वांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, धर्माच्या सुधारणेचा प्रश्न ह्या सर्व प्रकारच्या चळवळींना पायाभूत झाला पाहिजे, आणि लोकांच्या सुधारणेसाठीं त्यांच्या धर्मविषयक समजुतींत सुधारणा करण्याचा प्रयत्न न करितां व धर्मास प्राधान्य न देतां दुसऱ्या मार्गानें प्रयत्न करणें म्हणजे विहिरींतून चाळणीनें पाणी काढण्याच्या प्रयत्नासारखें निष्फळ होणारें आहे " असा सर नारायणरावांचा दृढ विश्वास असल्यामुळें, धर्मबुद्धीनें प्रेरित होऊन सर्व प्रकारच्या उद्योगास प्रारंभ झाला पाहिजे असें ज्या संस्थेचें ध्येय आहे त्या प्रार्थनासमाज नामक संस्थेशीं सर नारायणरावांचा अत्यंत निकट संबंध असणें, हें अगदीं साहजिक आहे. प्रार्थनासमाज ह्या संस्थेविषयीं लोकांमध्यें अनेक प्रकारच्या समजुती आहेत. त्यांचा येथें उल्लेख करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. परंतु प्रार्थनासमाजाचीं तत्त्वें जे कोणी लक्षांत घेऊन त्यांवर शांतपणें विचार करितील त्यांस प्रार्थनासमाज ह्या संस्थेविषयीं निदान भ्रामक कल्पना तरी होणार नाहीं. कारण, प्रार्थनासमाज ह्या संस्थेचा उद्देश मुळीं असा आहे कीं, त्याचीं जीं तत्त्वें आहेत, त्यांची प्रवृत्ति होऊन प्रपंचांतील सर्व कृत्यें त्यांस अनुसरून घडावीं, ह्या तत्त्वांविषयीं वादविवाद करण्याचें हें स्थळ नव्हे; परंतु एवढें मात्र येथें सांगितलें पाहिजे कीं, सर्व विचारी

जनांना हीं सर्व तत्त्वें मान्य होण्यासारखीं आहेत, आणि जाणून बुजून अगर न जाणतां, आज कित्येक सुशिक्षित लोक ह्याच तत्त्वानुरोधानें वागत आहेत. असो.

आमचे चरित्रनायक सर नारायणराव यांची प्रार्थनासमाजाशीं कशी ओळख झाली तें ह्या लेखाच्या प्रारंभींच आम्हीं सांगितलें आहे. परंतु लहानपणापासून त्यांचा व समाजाचा जरी संबंध जडला होता व समाजांतील पुढाऱ्यांच्या सहवासांत ते कित्येक वर्षें जरी होते तरी सन १८८१ पर्यंत सभासद ह्या नात्यानें ते समाजांत दाखल झाले नव्हते. सभासद झाल्यानंतर कांहीं वर्षांनीं त्यांनीं समाजाच्या चिटणीसाचें काम केलें व न्या. मू. रानडे यांच्या निधनानंतर १९०१ सालापासून १९२३ पर्यंत ते मुंबईच्या प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष होते. सर नारायण यांचीं बरीचशीं धर्मपर व्याख्यानें भाषांतररूपानें संकलित केलीं आहेत. तीं वाचून त्यांच्या आध्यात्मिक जीवनाची व त्याचप्रमाणें प्रार्थनासमाजानें जो आदर्श आपल्यापुढें ठेविला आहे, त्याची केवळ मराठी जाणणाऱ्या वाचकांस कल्पना होईल. परंतु त्यांच्या एकंदर उपदेशांतील कांहीं मुख्य गोष्टींचा येथें उल्लेख करणें अगत्याचें आहे. प्रथम हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, समाजाचीं धर्मतत्त्वें आपल्या नित्याच्या आचरणांत आणण्याचा सर नारायण यांचा जरी सतत प्रयत्न असे तरी त्यांच्या ठिकाणीं आपल्या आध्यात्मिक जीवनासंबंधानें अभिमान म्हणून कसा तो मुळींच नव्हता. सर्व प्रकारचे व्यवहार करीत असतांना प्रत्यक्ष परमेश्वराला आपल्या सांगातीं ठेवण्याचा त्यांचा प्रयत्न असे. पुष्कळांना वाटतें कीं, हें आपल्याला साध्य नाहीं. परंतु सर नारायणराव सांगतात कीं आम्हांससुद्धां ‘ आशेस पुष्कळ अवकाश आहे, आम्ही अगदींच निराश व्हावयास नको. आम्ही जरी कितीही पापी असलों, आमचीं अंतःकरणें कितीही कठिण, अगदीं पाषाणासारखीं झालेलीं असलीं, तरीसुद्धां प्रत्येकाच्या अंतःकरणांत परमेश्वराची दिव्य ज्योति वसत आहे. तिचा प्रकाश, तिचें तेज आमच्या कधीं तरी अनुभवास येतें.’ ‘ परमेश्वराचें खात्रीचें वसतिस्थान असें जर कोठें असलें, तर तें मनुष्याचें अंतःकरण होय. ज्या ज्या वेळीं आपल्या हातून जें घडूं नये तें घडतें, आपण जें बोलूं नये तें बोलून जातों, त्या त्या वेळीं आमच्या अंतःकरणामध्यें गूढरूपानें असणारा तो लहान, शांत मंजुळ ध्वनि आमची निर्भर्त्सना करितो, किंवा आम्ही मार्ग चुकलों असें सांगतो. आमच्या हातून सत्कृत्य घडलें किंवा आम्ही लोभास बळी न पडतां, त्याचेवर जय संपादिला म्हणजे हा मंजुळ ध्वनि आमचे धन्यवाद गातो, आम्हांस उत्तेजन देतो, आम्हांस शाबासकी देतो.’ म्हणून त्यांचें नित्य

असें सांगणें असे कीं, "आपण पापी आहों, पापी आहों, असली जपमाळ हातीं धरून बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मनुष्यप्राणी क्षुद्र आहे, दुर्बळ आहे, असें म्हणतांना त्या क्षुद्रपणांतच त्याची महती आहे, हें विसरूं नका. श्रद्धा ठेवणें, प्रेम करणें, उच्च सात्त्विक आकांक्षा बाळगणें आणि दुःखपरंपरा सहन करणें, हीं ईश्वराचें सान्निध्य–संगती संपादण्याचीं शिफारसपत्रें आहेत. परद्वेष व स्वसुखाभिलाष याचा मार्ग लांब जाऊं शकत नाहीं. केव्हां तरी मनुष्याला एकदां अशी वेळ येतेच कीं, द्वेषबुद्धि, विषयलोलुपता, आणि परपीडा आदिकरून पापकृत्यें यांच्याबद्दल प्रायश्चित्त भोगावें लागतें, आणि अशा वेळीं पापकर्माचा पश्चात्ताप झाला असतां त्याची दृष्टि परमेश्वराकडे वळते. प्रेमाची त्याला तहान लागते, अंतर्बाह्य भरलेल्या परमेश्वराला तो हुडकूं लागतो, परमेश्वराची महती त्याला दिसूं लागते. त्याला समाधान पाहिजे असतें व तें प्राप्त होण्यास परमेश्वरावांचून दुसरा आधार नाहीं, अशी त्याच्या मनाची खात्री पटते. अखेरीस तें समाधान त्याला प्राप्त होतें. कारण प्रेम अमर्याद आहे. प्रेमरूप अमृताच्या सागरामध्यें बुडून मृत्यु येत नाहीं. प्रेमाचा परिणाम झाल्याखेरीज राहत नाहीं. प्रेमाचा कधीं वीट येत नाहीं. मात्र हें प्रेम दैवी पाहिजे–ईश्वरावर जडलें पाहिजे."

प्रार्थनासमाजाचीं धर्मतत्त्वें माहित असणारांचा व नसणारांचा असा समज असतो कीं, प्रार्थनासमाजाला आपल्या धर्मग्रंथांचा, आपल्या पूर्व ऋषींचा, त्यांनीं प्रतिपादिलेल्या तत्त्वांचा कांहींही अभिमान नाहीं, हें सर्व पाश्चात्यांचें केवळ अनुकरण आहे. सर नारायण ह्यांचीं व्याख्यानें वाचण्याची जे कोणी मेहनत घेतील, त्यांस हा समज वस्तुस्थितीस पूर्णपणें सोडून कसा आहे, तें अगदीं सहज कळून येईल. सर नारायणराव आपल्या एका व्याख्यानांत निक्षून सांगतातः—

"प्रार्थना व ब्राह्मसमाजांतील भागवतांस आज असें वाटत आहे कीं, पुरातन काळाची कोणतीहि राजकीय, सामाजिक अगर धर्मविषयक संस्था एखाद्या सुधारकाला, अगर सुधारकांना, जशीच्या तशी आज उठवितां येईल, असें म्हणणें अगदीं अन्यथा आहे. त्या काळच्या जुन्या संस्थांच्या संजीवनाचा किंवा पुनर्जीवनाचा विचार करणें व्यर्थ आहे. पूर्वीचें जें कांहीं आहे, त्याचा आज सर्वस्वी त्याग करितां येणें ज्याप्रमाणें अशक्य, त्याप्रमाणें इतर धर्मांचे जे प्रवर्तक त्यांच्याकडे अगदींच दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं. पूर्वींचे कित्येक सुंदर विचार, आचार व संस्थाही, विलक्षण धर्मभोळेपणाच्या वेष्टनांनीं अगदीं झांकून गेलेल्या आहेत; आणि न्या.मू.

रानडे यांनीं सामाजिक परिषदेंतील आपल्या एका व्याख्यानांत म्हटल्याप्रमाणें आपण तर आज असा काळ पाहत आहों कीं, ज्यावेळीं आपलें एकंदर जीवन विस्तृत झालें पाहिजे. त्यास अधिकाधिक विस्तृत होण्यास अवकाश ठेविला पाहिजे. पूर्वीचे सिद्धान्त व मार्ग जितक्या अंशानें त्यांत सत्यांश आहे, तितक्या अंशानें ठीक आहेत; आणि त्या सत्यांशाचा परम आदरानें स्वीकार करून भावी सुधारणायुग अवतरणार आहे. तथापि आज जी परिस्थिति आहे, तीस अनुरूप अशी पूर्वीच्या मार्गाची घडी बसविली पाहिजे. आमच्या गरजांचा विचार झाला पाहिजे. असें झालें तरच सुधारणेच्या कामीं त्यांचा कांहीं उपयोग होण्याचा संभव आहे. खरें पाहिलें तर भक्तिपंथाचे जे प्रवर्तक त्यांचे विचार, त्यांचे उपदेश, त्यांच्या आकांक्षा सर्व कांहीं पवित्र जीवनास पोषक अशा आहेत, परंतु हें मात्र खरें कीं, आमचे साधुसंत जगाला, संसाराला अगदीं कंटाळलेले होते, व त्यांची अशी शिकवण आहे कीं, हें सर्व व्यर्थ आहे, ही माया आहे, म्हणून संसाराचा त्याग केला पाहिजे; तरच आपली धडगत. आपण दैवावर सर्व हवाला ठेवून असलें पाहिजे; प्रयत्नशील असावयाची कांहीं आवश्यकता नाहीं, असा सर्वसाधारण समज आहे. म्हणून आजच्या व भावी सुधारकाला जें कांहीं करावयाचें आहे, तें हें कीं, ज्या विश्वांत आपण नांदत आहों, त्याचा हेतु काय, त्याचा व आपला संबंध काय, हें सांगून लोकांच्या असेंही लक्षांत आणून द्यावयाचें कीं, आपण जर सन्मार्गानें चाललों, प्रामाणिकपणें वागलों, देवाची व पापाची भीति मनांत वागवून वर्तलों व सत्कृत्यांत वेळ घालविला, तर आपल्याला आपला स्वर्ग हा येथें, आपल्या हयातींत सांपडेल. म्हणूनच न्या. मू. रानडे व त्यांचे मित्र ज्या पक्षाचे आहेत त्या पक्षाचा नित्याचा मंत्र संजीवन नसून सुधारणा, प्रगति आहे. सारांश, राजा राममोहनरायांचाच अनुवाद करून सर नारायणराव सांगत आले कीं, आपले धर्मग्रंथ आस्थेनें वाचा, त्यांची हेळसांड करूं नका; त्यांची काय शिकवण आहे ती पहा व तसें करीत असतांना आपल्याला जें सारासार विचारसामर्थ्य देवानें दिलें आहे त्याचा उपयोग करा व देवासंबंधानें आपलें काय कर्तव्य आहे याचा विचार करून शास्त्रांच्या आज्ञा पाळा. पुष्कळांना प्रार्थनासमाजमंदिरांतून ज्या उपासना होत असतात, त्या वेळीं काय होत असतें त्याची कांहींच कल्पना नसते. मग ते कांहीं तरी कल्पना करून तर्क चालवीत असतात. अशांच्याच माहितीसाठीं सर नारायणराव, डॉ. भांडारकर व न्या. रानडे हयात असतांना एकदां म्हणाले कीं, ह्या ठिकाणीं डॉ० भांडारकर किंवा न्या. मू. रानडे

ह्यांच्या सारखीं व इतर कमी अधिक अधिकाराचीं माणसें, आपल्या व इतर धर्मग्रंथांतील वचनांच्या आधारें धर्माचीं प्रमेयें व आपला नित्याचा व्यवहार यांचा कसा निकट संबंध आहे, व त्यांचा आपल्याला आपल्या नित्याच्या संसारांत कसा उपयोग करितां येईल, हें सांगत असतात. त्याचप्रमाणें सत्यनिष्ठा, व्यवहारांतील प्रामाणिकपणा, आपापसांतील नेकीचे व्यवहार, दीनांविषयीं अंतःकरण कळवळून त्यांच्या साहाय्यासाठीं धावणें, व कितीही थोर माणसाशीं संबंध आला तरी न्याय व सत्यनिष्ठेपासून मुळींसुद्धां न ढळणें ह्या सर्व गोष्टींचा धर्मामध्येंच कसा अंतर्भाव होत असतो, हेंही नित्य त्यांच्या सांगण्यांत येत असतें. वरील सर्व विवेचनावरून सर नारायणराव ज्या संस्थेचे एक सभासद ४२ वर्षें होते व ज्या संस्थेशीं त्यांचा फार निकट संबंध ५० वर्षें होता, त्या प्रार्थनासमाज संस्थेचें ध्येय काय आहे, व त्या संस्थेच्या द्वारें कोणत्या प्रकारचा उपदेश होत असतो त्याची स्पष्ट कल्पना वाचकांस झाली असेलच; पण हें विवेचन पाहून कोणास असेंही वाटण्याचा संभव आहे कीं, सर नारायणराव ह्यांच्या ठिकाणीं आपल्या संस्थेच्या प्रवर्तकांतील व आपल्या स्वतःतील न्यूनांची जागृति नव्हती. हा समज अगदीं निराधार आहे. त्यांच्या स्वतःच्या ठिकाणीं स्वदोषजागृति अत्यंत प्रखर स्वरूपानें असे. आत्मपरीक्षण करा, आत्मपरीक्षण करा, असला उपदेश करून ते कधींही स्वस्थ बसणारांपैकीं नव्हते. त्यांचं आत्मपरीक्षण नित्य चालू असे.

एके दिवशीं प्रातःकाळीं ते एक धर्मविषयक ग्रंथ वाचीत व त्यावर मनन करीत बसले होते. त्या वेळीं ज्या कोणाला जनतेची सुधारणा करावयाची आहे त्यांनीं सत्याच्या आश्रयानें परंतु प्रेमानें, सौम्यपणानें व लीनतेनें हें कार्य केलें पाहिजे असें त्यांच्या वाचनांत आलें. ह्याविषयीं ते काय लिहितात पहा—

"To win man by the winsome beauty of truth is necessary for *me whose great short-coming is want of gentleness.*

आणखी एक उदाहरण. एकदां सर नारायण तुकोबांच्या एका अभंगाचें मनन करीत होते. एखादा अभंग अगर एखाद्या अभंगाचा एखादा चरण घेऊन त्यावर मनन करण्याची त्यांना सवय होती. त्यांचें मनन संपल्यावर त्यांनीं जें लिहून ठेविलें आहे तें अंतःकरण हलवून टाकणारें आहे.

"ज्या वेळीं दुसऱ्याचे मला दोष दिसून येतात, त्या वेळीं मी क्रोधवश न होतां, त्याला दोषांपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. काय करावें! कोणींहि खरोखर कांहीं गैर गोष्ट केली, अगर चूक केली असें माझ्या मनानें

घेतलें, तरी मी माझें देहभान विसरतों व क्रोधास वश होतों. माझ्या स्वतःच्या हातूनसुद्धां चुका होतातच हें मी विसरतों. मी जर स्वतः दोषरहित नाहीं व हें मी जाणून आहें तर मग इतरांचे लहान मोठे दोष पाहून मीं एवढें कां खवळून जावें ? आणि म्हणून मी पुनः एकवार निश्चय करितों कीं, इतरांशीं सौम्यपणें वागावयाचें; जो कांहीं कोणास उपदेश करावयाचा तो ताठ्यानें करावयाचा नाहीं व कोणाचाहि तिरस्कार न करितां त्यास दोन हिताच्या गोष्टी सांगावयाच्या व त्याच्या दोषाबद्दल प्रेमानें—सौम्यपणें त्याची कानउघाडणी करावयाची. प्रेमानें इतरांस जिंकण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. अशा रीतीनें जीवित कंठणें हेंच माझें कर्तव्य आहे आणि परमेश्वरासहि हाच मार्ग संमत आहे."

किती ही प्रखर स्वदोषजागृति! आमचे साधुसंत आपल्या स्वतःची जी वारंवार विदारणा करीत असत त्यापेक्षां ही कमी योग्यतेची मानण्यासारखी आहे काय ?

सर नारायण फिरावयास जात तेव्हां एकादा ग्रंथ वाचून त्यावर ते मनन करीत आणि इतर शांत वेळीं व स्थळीं त्यांचें स्वतःविषयींचें परीक्षण नित्य चालू असे. तें इतकें प्रखर असे कीं, आपल्या हातून कांहीं आगळिक झाली असा त्यांचा समज झाला, कोणास लागण्यासारखें आपण बोललों असें त्यांच्या लक्षांत आलें कीं, सर्व गैरसमज दूर करून घेतल्यावांचून ते स्वस्थ बसत नसत. आपली चूक झाली असल्यास ते ती कबूल करावयास एका पायावर तयार असत; मग त्यासाठीं आपलें घर, आपलें काम सोडून ते त्या माणसाकडे जाऊन आपलें काय म्हणणें आहे, तें सांगावयास सिद्ध असत. अशी ज्यांची नित्याची वृत्ति असे. त्यांच्या ठिकाणीं आपल्या समाजांतील जे प्रमुख त्यांच्या दोषांची जागृति नव्हती असें नाहीं. उलट एके ठिकाणीं ते म्हणतात ' एका लहानशा संस्थेचा मी मोठा बडेजाव सांगत आहें. असें माझे कित्येक मित्र म्हणतील, हें मी जाणून आहें; संख्येनें आम्ही अगदीं अल्प आहों व आमच्यापुढें जें ध्येय आहे, जीं तत्त्वें आहेत, त्यांस अनुरूप आमचें आचरण नसतें, ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट आहे हेंही मी कबूल करितों. आमचें जें उच्चतम ध्येय त्यास शोभण्यासारखें आमचें आचरण नसतें, हें जरी खरें आहे; तरी आमची दृष्टि पुढील काळाकडे आहे, त्या काळासंबंधानें आमच्या ज्या अपेक्षा त्या स्वप्नवत होत, असें जरी कित्येकांस वाटलें, तरी त्या काळीं आमच्या आशा फलद्रूप होणार; अशी आमची खात्री आहे.'

सर नारायण चंदावरकर यांचीं व्याख्यानें जे आस्थापूर्वक वाचतील व ज्यांनीं त्यांच्या चरित्राचें अवलोकन केलें आहे, त्यांच्या हें लक्षांत येईल कीं, नारायणराव हे निराशावादी नव्हते. निराशाजनक जरी कधीं स्थिति असली, तरी पुढील प्रकाशाचीं हीं सर्व चिन्हें आहेत, असा त्यांचा नित्य कटाक्ष असे व असा उपदेश त्यांनीं आपल्या व्याख्यानांत जागोजाग केलेला आढळेल. दुसरें, आपले थोर पुरुष ह्यांच्याविषयीं त्यांची भक्ति किती असे, ह्याची साक्ष त्यांचीं व्याख्यानें जागोजाग देत आहेत. त्यांचें तरुण पिढीस असें आग्रहानें सांगणें असे कीं, तरुणांनीं थोर पुरुषांविषयीं आपल्या ठिकाणीं उत्कट आदरभाव ठेवावा हें ठीक आहे. परंतु असे पुरुष आपल्याला रोज मार्गदर्शक असावयास पाहिजेत, असा एकदां समज झाला कीं, मग आपण सर्वस्वी त्यांच्यावर अवलंबून रहावयास शिकतों. आपला आपलेपणा जातो, आपण आपलें सारासार विचार करण्याचें सामर्थ्य गमावून बसतों ! कारण, आपल्यासाठीं विचार करण्याचें सर्व काम आपला मार्गदर्शक करीत असतो ! पण आपल्या स्वतःच्या ठिकाणीं जो थोरपणाचा अंश आहे, त्याच्याविषयीं विचार न करितां, त्याची जोपासना न होतां व त्याच्या वाढीचा प्रयत्न न होतां, सभोंवतालच्या मोठ्या लोकांच्या थोरपणांत आपण गढून जाऊन आपणास पंगू करून घेत असतों ! म्हणून सर्वस्वी थोरपुरुषांवर अवलबून राहूं नका, असें सांगतांना सर नारायणरावांनीं पुढील उद्गार काढले आहेतः—

This world can go on by us, by you and me. We are the bulk of the world and God has not been so ungenerous as to leave us entirely at the mercy of the great man. The world has to be carried on by average men......It is we who have to carry on its business. Let us see that we get planted in us those powers by the development of which we can do what lies in our power in order to make the world move onwards, and towards the goal which we have all at heart.

सर नारायण हे प्रार्थनासमाजाचे खरेखुरे सभासद होते. ह्मणजे प्रार्थनासमाजाचीं तत्त्वें आपल्या आचरणांत आणण्याचा प्रयत्न करणारांत ते प्रमुख होते. प्रार्थनेचें महत्त्व व रहस्य जाणणारे ते होते. देवाच्या सहवासांत शांत वेळीं, शांत स्थळींच नव्हे, तर सर्व वेळीं व सर्व स्थितींत असतांना शांत रहाण्याचा ते प्रयत्न करीत. उच्च धर्मनिष्ठा व देवावरील विश्वास यांच्यायोगें त्यांच्या अखिल जीवितास

मनोरम सौंदर्य प्राप्त झालेलें होतें. प्रार्थनेवरील त्यांचा विश्वास इतका उत्कट होता कीं तो केव्हांहि व्यक्त करावयास ते मागेंपुढें पहात नसत. न्यायमूर्ति असतांना एकदां एका खटल्याच्या दोन्ही पक्षाकडील वकील बॅरिस्टरांचीं भाषणें ऐकून, यांचें स्वतःचें मत निश्चित झालें नव्हतें. घरीं आल्यावर त्यांनीं पुष्कळ विचार केला, पण मनाचें समाधान होईना; अखेरीस नेहमींचीं कार्यें करून ते निद्रावश झाले; पहांटेस देवाची प्रार्थना करून ते कार्यास सिद्ध झाले व आपला निकाल लिहूं लागले व तो त्यांनीं सहज स्फूर्तीनें लिहिला. ह्याच प्रसंगाला उद्देशून स्वानुभवाच्या जोरावर स्वतःच्या लाभासाठीं त्यांनीं लिहून ठेविलें:—

Always pray, especially in doubt and difficulty and God will help you, provided the prayer is earnest and mind is pure.

कोणीहि, प्रार्थनेवर आपला विश्वास नाहीं, आपल्या सामर्थ्यानुसार सत्कार्यरति कायम ठेवण्याचा प्रयत्न केला म्हणजे झालें असें म्हटलें म्हणजे ते उलट सांगत कीं, सत्कार्यांनीं भागत नाहीं.

"Work alone without the consciousness and the inspiration that it is God's narrows us; it is apt to degenerate into mere routine; and difficulties, disappointments, temptations mar it. But pray to God and accustom yourself to the idea that you are doing God's work and the prayerful habit becomes an inspiration, making men's drudgery divine."

सर नारायण यांच्याशीं अल्प परिचय होतांच जी एक गोष्ट प्रथम लक्ष्यांत येत असे ती ही कीं, ते एक ज्याप्रमाणें विवेकसंपन्न गृहस्थ होते, त्याचप्रमाणें ते विवेकमग्न पुरुष होते. विवेकसंपन्न व्यक्ति विवेकमग्न असलीच पाहिजे असें कोणास वाटण्याचा संभव आहे. पण तसें नाहीं. विवेकसंपन्नता व विवेकमग्नता या गुणांचा परिपोष एकाच ठिकाणीं झालेला पहावयास सांपडतोच असें नाहीं. लेखन चालू असतांना विवेकमग्न असणें निराळें व बाहेर व्यवहारांत वावरतांना, बाहेर फिरत असतांना, शांत ठिकाणीं बसलें असतांना, परस्परांशीं संभाषण करतांना विवेकमग्न असणें निराळें. सर नारायण यांची आपणांस नेहमीं विवेकमग्न स्थिति पहावयास सांपडे. सर नारायण पुष्कळ वेळां एकटेच फिरावयास जात असत. रस्त्यानें चालतांना थोडें एकाच बाजूला कललेलें त्यांचें तें शरीर व त्यांची मान यांकडे लक्ष्य जात असतांना त्यांची विचारमग्न स्थिति इतरांस जागृत करीत असे. अशा वेळीं ते नित्य आपल्यापुढें त्या दिवशीं घडलेल्या, ऐकलेल्या, दिसलेल्या

अगर वाचनांत आलेल्या गोष्टींविषयीं विचार करीत असत. ही त्यांची विचारमग्न स्थिति त्यांच्या ठिकाणीं विचारजागृति उत्पन्न करून त्यांना नेहमीं जागृत ठेवीत असे. सर नारायण हे दोषविरहित होते असें कोणी म्हणणार नाहीं, आणि स्वतः त्यांच्या लेखांची साक्ष जे घेतील त्यांस त्यांच्या ठिकाणीं आपल्या दोषांची प्रखर जागृति असल्याचें दिसून येईल. तथापि ते आपल्या स्वतःला जागृत ठेवण्याचे प्रयत्न निरनिराळ्या दिशेनें व निरनिराळ्या वेळीं कसकसे करीत असत याची माहिती मोठी बोधप्रद आहे.

वाचनाची आवड ही पुष्कळांना असते व न्या. मू. रानडे यांच्याप्रमाणें ज्यांस जें आपण वाचलें त्याचा सारांश लिहून काढण्याची, अगर सर नारायण यांच्याप्रमाणें, ग्रंथांतील विशेष भाग उतरून घेण्याची, अगर त्याचें मर्म लिहून ठेवण्याची संवयही पुष्कळांस असण्याचा संभव आहे. परंतु एखादें नवें अगर जुनें पुस्तक वाचीत असतांना, एखादा उद्बुद्ध करणारा विचार आढळतांच त्या जागृतीचा उपयोग आपल्या स्वतःचें परीक्षण करण्याकडे करून, आपण तो विचार व तदंगभुत जागृति यांपासून काय बोध घ्यावयाचा त्याचें टिपण करून ठेवण्याची संवय फक्त सर नारायणराव यांनींच साध्य केली होती असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. एकदां सर नारायणराव रोमियो ॲन्ड ज्यूलिएट हें नाटक वाचीत होते. वाचीत असतांना The more I give, the more I have, it is infinite. हें वाक्य त्यांच्या वाचनांत येतांच त्यांच्या मनांत अनेक विचार आले असावेत. ते म्हणतात, "शेक्सपिअरनें हें मनुष्यामनुष्यांतील प्रेमासंबंधानें म्हटलेलें आहे. पुरुषाचें स्त्रीवर, स्त्रीचें पुरुषावर जें प्रेम असतें त्यास उद्देशून हे उद्गार आहेत. परंतु हें प्रेम अपार, तर मग देवाचें मनुष्यावर जें प्रेम आहे ते याहीपेक्षां अपार नाहीं काय ? आणि मनुष्य जर असें प्रेम देवावर करूं लागेल, तर प्रेम करण्याचें सामर्थ्य तरी त्याचें किती वाढीस लागेल आणि चित्ताची प्रसन्नता व मनाची धन्यता त्याला किती लाभेल ? असा लाभ झाला म्हणजेच नाहीं का आपलें हें जीवित आपणांस सह्य होतें ?" इतकेंच लिहून ते थांबले नाहींत, तर अशा प्रकारें मन जागृत व प्रसन्न असतांनाच ते देवाची प्रार्थना करितातः—

"देवा ! बापा ! मला प्रथम तुझ्यावर प्रेम कसें करावयाचें तें शिकीव आणि तूं निर्माण केलेले जे प्राणी त्यांच्यावर प्रेम करावयाला मला शिकीव. देवा, तुझ्या प्रेमाच्याद्वारें इतरांतील चांगुलपणा माझ्या ध्यानीं येऊन त्यांची योग्यता

मला कळेल असें कर आणि मला स्वतःला शुभाच्या मार्गांत नित्य ठेव व शुभाकडेच माझी प्रवृत्ति कर. सर्व मनुष्यवर्गाचें कल्याण होवो. देवाचें प्रेम असीम आहे." इतकी प्रार्थना करूनहि त्यांची तृप्ति झाली नाहीं. दुसऱ्या दिवशीं They are beggars that count their worth हें शेक्सपीअरच्या त्याच नाटकांतलें वाक्य त्यांच्या अवलोकनांत आलें. त्या वेळीं या जागृत साधकास कोणत्या विचारांची जागृति झाली आहे ती पहा: "आज सकाळीं उठतांच पहिला विचार जो मनांत आला तो हा कीं, स्वतः शुभ वृत्ति आपल्याशा कराव्या व शुभ कार्यांमध्यें नित्य रति असावी. यापेक्षां खरें पहातां, मनुष्याची उच्चतर आकांक्षा, अगर इच्छा असणें शक्यच नाहीं. परंतु हें साधावयाचें कसें? परमेश्वर सर्व शुभाचें उगमस्थान आहे. Goodness व godliness यांचा खरें पाहतां अगदीं निकट संबंध आहे. सर्व शुभ कार्यें किती शांतपणें व निश्चितपणें होत असतात? तो किती दयाळू आणि प्रेमस्वरूप आहे? देवा, माझ्या हातून जें जें कांहीं कार्य होईल तें प्रेमानें व्हावें. दुसऱ्याशीं प्रेमाचें, आदराचें, उदार भावाचें वर्तन ठेवावयास मला शिकीव. माझे विचार व माझा आचार नेहमीं पवित्र असावा. पावित्र्याचें कवच नेहमीं माझ्या भोंवतीं असावें व कांहींतरी दयेचें, प्रेमाचें कार्य केल्याशिवाय, अगर एखाद्यातरी दुःखिताचें दुःख हरण केल्यावांचून माझा दिवस जाऊं नये. (आपल्या आत्म्यास उद्देशून) बाबारे, जें कांहीं करशील तें लीनतेनें कर; गर्वानें फुगून जाऊं नकोस व लक्षांत ठेव कीं तुझ्यांतहि बहुत दोष आहेत. तूंहि दुबळा व सर्वस्वी पराधीन आहेस."

दुसऱ्याला उपदेश करणें फार सोपें असतें, परंतु सर नारायण यांनीं हा स्वतःलाच उपदेश करून घेतला आहे; व बहुजनसमाजाला तो सहसा कळणार नाहीं अशा ठिकाणीं लिहून ठेविला आहे आणि स्वतःला मात्र तो वाचावयास मिळावा अशी त्याची योजना आहे. येथेंहि इतकीच आपल्या स्वतःला जागृति करून ते थांबलेले नाहींत. लागलाच देवाच्या चरणांचा त्यांनीं आश्रय केलेला आहे; आणि तो करितांना ते म्हणतात—

"देवा! सर्वसमर्थ परमेश्वरा! मला चांगलें (good) होण्यास व नित्य सर्वांचें शुभ करण्यास शिकीव. (God Almighty, teach me to be good and to do good.) जर देवा, माझ्या स्वतःच्या योग्यतेचें मापन घेण्याची मला बुद्धि झाली तर मी दरिद्री, भिकारी तुझ्या प्रेमास अगदींच अपात्र ठरणार! नाहीं, नाहीं, देवा माझी स्वतःची अशी योग्यता कांहींच नाहीं हें मला

कळूं दे, अथवा हें तूंच मला शिकीव. माझी कसली योग्यता ? जीं कांहीं शुभ कार्यें नम्रभावानें माझ्या हातून घडतील त्यांच्या योगेंच माझी किंमत, माझी योग्यता कळूं दे," किती हा बालभाव ! किती ही जागृति ! आणि किती हा मनाचा कोंवळेपणा ! देशामध्यें अशीं किती माणसें आजपर्यंत झालीं आहेत कीं ज्यांनीं आपल्या मनाला अशा प्रकारें शिकवण देण्याचा प्रयत्न केलेला आहे ? कोण आपले स्वतःचे दोष काय आहेत ते जाणून घेण्याचा प्रयत्न करीत असतात व कोण देवापुढें आपल्या दोषांचा पाढा वाचून त्यांतून आपणांस मुक्त करण्यासाठीं देवाची प्रार्थना करीत असतात ? आपले स्वतःचे दोष झांकण्याचाच नेहमीं प्रयत्न होत नाहीं काय ? सर नारायण यांचा प्रकार मात्र निराळा. आणखी एक अशाच प्रकारचें उदाहरण देतों. एकदां ते जुलीयस सीझर नाटकें वाचीत असतांना

Into what dangers would you lead me Cassius that you would have me seek into myself for that which is not in me ? हें वाक्य त्यांच्या वाचनांत आलें. वरवर पहाणारास यांत विशेष कांहीं वाटण्यासारखें नाहींही. ते ह्मणतात ब्रुटस हा प्रामाणिक मनुष्य व आपलें कर्तव्य योग्य प्रकारें व्हावें ही त्याची इच्छा. परंतु कॅशस लुचा, तो द्वेषभावानें पूर्ण भरलेला, त्यानें ब्रुटसची खूप स्तुति करून तो त्याचेवर नसत्या सद्गुणांचा आरोप करूं लागला. हें लक्ष्यांत आल्यावर ब्रुटसनें वरील वाक्य उच्चारिलें आहे. पण त्यावरून सर नारायण आपल्या मनाला काय शिकवण देत आहेत पहा.

" जगामध्यें **कॅशास**सारखीं माणसें पुष्कळ आहेत, परंतु आपल्या स्वतःमध्यें त्यांचे दुर्गुण कांहीं थोडे नसतात. त्यांपासून आपण आपला बचाव केला पाहिजे. मनुष्य स्तुतिप्रिय आहे आणि कोणी त्याची पुष्कळशी स्तुति केली कीं तो लागलाच चढून जातो व त्याला स्वर्ग दोन बोटें रहातो. देवा ! स्तुतीच्या घावांना मी बळी पडूं नये, किंवा कितीहि स्तुति झाली तरी तिचा माझ्या मनावर कांहींहि परिणाम होऊं नये असें कर."

'रात्रंदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जन आणि मन ॥' हे तुकोबांचे उद्गार त्यांना यावेळीं आठवूनच त्यांनीं देवापाशीं वरील प्रार्थना केली नसेल ना ? अशा रीतीनें ज्या ज्या वेळीं आपल्या मनाला जागृत करण्याची संधि येत असे त्या त्या वेळीं ते ती व्यर्थ जाऊं देत नसत.

' निंदा स्तुतिवर लावुनी कांटी ' कर्तव्य करणें हा आपला अधिकार आहे अशी त्यांनीं स्वतःशीं खूणगांठ बांधून ठेविली होती. एकदां स्वतः त्यांच्यावरच असा निंदा अगर स्तुतीचा प्रसंग आला त्या प्रसंगास उद्देशून ते म्हणतातः—

' स्तुति अगर निंदा यांचा मनावर परिणाम होऊं देणें हा किती दुबळेपणा आहे ? स्तुति अगर निंदा यांचा मनावर बिलकुल परिणाम होऊं न देतां, परमेश्वर व अनंत काळ यांकडे दृष्टि ठेवून आपलें कर्तव्य करतां येणें हें किती सुखकारक आहे ? लोकांनीं आपण जें कांहीं केलें त्याबद्दल आपले धन्यवाद गाइले काय, किंवा आपल्यावर टीकेचा वर्षाव केला काय, त्याशीं आपल्याला काय करावयाचें आहे ! जें कांहीं आपल्या हातून होत आहे तें आपल्या विवेकास मान्य व आपल्या विश्वासास अनुरूप असून तें प्रेमानें व श्रद्धापूर्वक झालें म्हणजे झालें. '

एकदां जुन्या करारांतील एक स्तोत्र वाचीत असतांना

" Who can discover his errors ! Cleanse Thou me from *secret* faults. " ही प्रार्थना त्यांच्या वाचनांत आली. स्वतःला शिकविण्याची ही संधि त्यांनीं फुकट घालविली नाहीं.

ते म्हणतातः—

This was the prayer of the Psalmist; how much more should it be of those who are apt to forget God and be caught by the snares of the world rather than led by the *will* of Him who made us ?

Parmeshvar ! Teach me to discover my secret faults and correct them.

जे कोणी सर नारायण यांच्या चरित्राचा बाहेरला वेष पहात त्यांनाहि त्यांचा थोरपणा लक्षांत आल्यावांचून रहात नसे. त्यांचें वक्तृत्व, त्यांचें इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, त्यांचा आवेश, त्यांची स्फूर्तिपूर्ण विचारसरणी, त्यांचा सतेज चेहरा एवढें पाहिलें तरी मन त्यांच्याकडे ओढ घेई. परंतु त्यांतहि त्यांचें चारित्र्य, त्यांची धर्मनिष्ठा, त्यांचा ईश्वरावरील विश्वास, त्यांची उल्हासाची वृत्ति, त्यांची प्रेमळ वृत्ति, त्यांचें तेज यांचेकडे लक्ष गेलें म्हणजे, इतरांहून पुष्कळ श्रेष्ठ व्यक्तीच्या सन्निध आपण आहोंत असें वाटल्यावांचून रहात नसे. हा जो परिणाम आपल्या दृष्टीपुढें

समुच्चयरूपानें दिसत होता तो कशाचा परिणाम होता? त्यांच्या 'भीतर' झालेल्या अगर होणाऱ्या सिद्धीचा आपणास दिसणारा पाकरूपी परिणाम होता. आपल्या मनाची ते किती व कशी शिकवण चालू ठेवीत असत, याचा विचार मनांत आला कीं, धन्य हा साधक, धन्य हा भक्त असे उद्गार निघाल्यावांचून रहात नाहींत. पहाटेस उठून भजन, प्रार्थना व ध्यान केल्यावांचून त्यांचा दिवस जात नसे. नंतर कांहीं सद्ग्रंथवाचन, हें कोणत्या प्रकारचें तें आपण पाहिलेंच आहे. एकेका वेळीं त्यांनीं जी निरनिराळ्या ग्रंथांची यादी दिलेली आहे ती पाहिली म्हणजे मन थक्क होऊन जातें. कोणकोणतीं पुस्तकें केव्हां वाचावयाचीं हें ते कधीं कधीं ठरवीत असत. त्याचप्रमाणें मुलें लहान असतांना त्यांच्या खोलींत कांहीं काळ घालविण्याचा त्यांचा संकल्प असे. तोहि स्वतःच्या शिक्षणाकरितां! अशा प्रकारें त्यांनीं आपल्या स्वतःला शिस्त लाविली होती. पुष्कळ वेळां ही शिस्त निर्जीव होते. घड्याळाच्या कांट्याप्रमाणें सर्व कांहीं चालत असतें. परंतु सर नारायणांचें तसें नव्हतें. तें त्यांत ओलावा घालीत असत. व प्रत्येक वृतींत देवाचा हस्त ते पहात असत. एकदां त्यांनीं लिहिलें—

I am greatful to God for the *impulse* to work methodically and resolve to work rather than weary myself in indolence. I feel so peaceful, so happy when I have spent the day in good hard work.

त्याचप्रमाणें अशा रीतीनें आपल्या कामाला शिस्त लाविली व देवाचे आभार मानले म्हणजे आपलें कार्य संपलें असेंहि सर नारायण समजत नसत. रोज काय घडलें तें सटीक लिहिणें म्हणजे धन्यता प्राप्त झाली असेंहि त्यांना वाटत नसे. उलट ते आपल्या स्वतःला अशी आठवण करून देत कीं, ज्या अर्थीं मी आतां रोजचा कार्यक्रम लिहून ठेवीत असतों, त्या अर्थीं मी रोज स्वतःला असा प्रश्न केला पाहिजे कीं,

Have I been industrious ?
Have I been true, just and prudent ?

असा क्रम चालू असतांना इतकेंहि आपल्या मनाच्या जागृतीला पुरेसें नाहीं असें त्यांना वाटलें व त्याबरोबर आपल्या मनाला आणखी तीव्र कातरीमध्यें ते पकडूं लागले.

How have I employed my time ?

How far have I succeeded in my resolution to practice virtue of patience ?

What good have I done ?

What notable thing have I observed ?

व मग ज्याप्रमाणें अनुभव येईल त्याप्रमाणें ते नमूद करूं लागलेः—Went through my daily programme pretty well and faithfully. No time ill spent.

सर नारायण यांच्या अंतरंगाचा आतां ठाव लागलेला आहे व त्यांनींच आपलें अंतःकरणरूपी कपाट उघडून त्याची खरी स्थिति जणूं काय दाखविली आहे. ती दाखवितांना ते म्हणतातः—

'आपली नेहमीं अशी कुरकुर असते कीं, येथें दुःख पर्वताएवढें आहे, नेहमीं संकटें व अनेक अडचणी यांचा सारखा वर्षाव होत असतो. त्यामुळें जीवित अगदीं असह्य होतें. परंतु आपलें अखिल जीवित हें एक शिक्षणालय आहे. येथें निरनिराळ्या रीतींनीं आपल्याला आपले धडे शिकावयाचे असतात. त्याचप्रमाणें नियोजित कार्यें आपल्या हातून व्हावयाचीं असतात. याला सामर्थ्य लागतें. हें सामर्थ्य आपला जो जीवनहेतु त्यासंबंधानें आपली विश्वासाची वृत्ति असली म्हणजे लाभतें. आणि सर्वसमर्थ जो परमेश्वर त्याच्याकडूनच आपणांस हें सामर्थ्य प्राप्त व्हावयाचें असतें. ( स्वतःस उद्देशून ) बाबा नेहमीं हें ध्यानांत ठेव कीं, तूं केवळ या पृथ्वीवरचा एक प्राणी नाहींस. तुजमध्यें देवाच्या दिव्य तेजाचा अंश आहे. त्या अंशाला चिकटून रहा, त्याची जोपासना कर, त्याचा प्रकाश आंतबाहेर सारखा पडूं दे. सर्व शुभ कार्यांची स्फूर्ति तिकडून तुला प्राप्त होऊं दे व त्याच्या साहाय्यानें सर्व कार्यांस प्रवृत्त हो. जीवितगिरीचें टोंक धुक्यानें वेढलेलें असेल, परंतु तेथें चढून स्थिर उभा रहा. सर्वसमर्थ परमेश्वरा ! धैर्यानें व स्थिर बुद्धीनें हें टोंक गांठण्यास तूंच मला साहाय्य कर. येथें वेठ मारून चालावयाचें नाहीं.'

त्यांच्या दुःखसुखसमी वृत्तीची किल्ली ह्यांत होती हें पाहून किती धन्यता वाटते !

सर नारायण हे २२ वर्षें प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष होते, असें वर आम्हीं म्हटलें आहे. परंतु त्यावरून स्वतः सर नारायण यांची प्रार्थना समाजावरील

ेम व भक्ति यांची कल्पना होत नाहीं. त्यासाठीं त्यांचें सर्व जीवन व त्यांच्या अनेक लेखांची साक्ष घेतली पाहिजे. आपल्या एका लेखांत ते म्हणतातः—

" What do I not owe to my Samaj? What it has done for me during the years that I have been priveleged to be one of its members is far more than anything by way of humble service I can claim to have done for it. I have with the growth of my manhood come to look upon it as the centre of my best thoughts and affections and I have learnt to measure all my actions by the standard of its rules and ideals."

आपले विचार, आपल्या आकांक्षा, आपलें शांतीचें स्थान, आपलें साधन ह्या सर्वांचा उगम प्रार्थनासमाज ही संस्था, प्रार्थनासमाजाचा इतिहास, त्याचे पुढारी, पुढाऱ्यांचे उद्गार, पुढाऱ्यांशीं झालेला सहवास, त्यांचीं चरित्रें ह्यांत आहे अशी त्यांची दृढभावना होती, व त्याप्रमाणें त्यांस अनुभव आलेला होता. ब्राह्मधर्माच्या ध्येयापलीकडे त्यांचें ध्येय नव्हतें. राजकारण, सामाजिक सुधारणा, दीन जनांचा उद्धार, अस्पृश्योन्नति, कायद्याची सुधारणा, सुधारणांची सुधारणा, इ० कोणत्याही प्रश्नांत त्यांचें चित्त गुंतलेलें असलें, तरी प्रार्थनासमाजाच्या ध्येयाचा त्यांस कधीं विसर पडत नसे व त्या ध्येयाच्या पूर्ततेला आनुषंगिक हीं कार्यें आहेत असाच त्यांचा समज होता व ह्याच भावनेनें ते निरनिराळीं कार्यें करीत असत. त्यांचा असा दृढ विश्वास असे कीं, व्यक्तिमात्रापुढें अति उच्च अशीं ध्येयें असलीं पाहिजेत व तीं गांठण्याचे त्याचे प्रयत्न सतत चालू असले पाहिजेत. व्यक्तिमात्रानें ध्येयविरहित राहूं नये. वेळ येईल त्याप्रमाणें वागावयाचें, जशीं माणसें भेटतील त्याप्रमाणें व्हावयाचें, व परिस्थितीचा गुलाम होऊन स्वत्व घालवावयाचें असल्या नादानपणाची छाया त्यांच्यावर केव्हांही पडली नाहीं, त्यामुळें त्यांचें धीरोदात्त वर्तन सर्व व्यक्तींस सर्व प्रकारच्या परिस्थितींत आदर्शवत् झालेलें आहे. ते म्हणतातः—

" Men must have an ideal to live by. And nothing regulates individual life better than a settled consciousness that the individual is attached to a religious body as a member. Such attachment brings with it a sense of responsibility and the individual knows by what measure or rule of conduct he is to be judged in all his relations. Life ceases in such a case to be an aimless affair." आणि ह्या ध्येयानुसार त्यांचें वर्तन होतें.

सर नारायण यांची उपासना भक्ति अत्यंत थोर दर्जाची होती. प्रार्थनामंदिरांतील उपासना म्हणजे आपल्या ध्येयाची जागृति करून देण्याचें साधन अशा विश्वासानें ते मंदिरांत पाऊल टाकीत. ( I have come to regard attendance at the service as one of the best preparations for life's duties and works in a spirit of correct manhood in this world of distractions. ) उपासक कोणत्याही दर्जाचा असला तरी त्यानें केलेली प्रार्थना, त्याचा उपदेश, त्यांस जागृतिकारक वाटे. उपासना चालविणारा व उपासनेस येणारे ह्यांच्यामध्यें समरस जर उत्पन्न व्हावयाचा तर सर्वांचें ध्येय एक असलें पाहिजे ही जाणीव त्यांच्या ठिकाणीं असे. उपासनेस हजर असलेल्या माणसांची उपासनेस अनुकूल वृत्ति व्हावी म्हणजे त्याचा परिणाम उपासकावर होतो. सर नारायण यांची उपासना भक्ति उपासकास उत्तेजित करीत असे. त्याचप्रमाणें कोणीही उपासक असला तरी त्याचेपासून कांहीं तरी शिकण्याची त्यांची तयारी असेः—

There is not a single preacher in the pulpit from whose discourse I have not caught some inspiration of hope, some lesson of light which I have not learnt.

सर नारायण ह्यांनीं आपली ध्येय भक्ति बिकट प्रसंगींही दाखविली आहे. इंदुर येथें दिवाण असतांना महाराजांना दुसरें लग्न करावेंसें वाटलें. त्याच्या आड येण्याचा अधिकार सर नारायण ह्यांस नव्हता. परंतु एक पत्नी असतांना दुसरी पत्नी करणें हें नीति व धर्माच्या विरुद्ध आहे असा त्यांचा बाणा होता, व महाराज झाले म्हणून काय झालें, त्यांनीं एका पत्नीच्या हयातींत दुसरें लग्न करूं नये असें त्यांस वाटत होतें म्हणून तिकडे इंदुरास लग्नाचे सोहाळे होत असतांना, महाराजांचे दिवाणसाहेब मुंबईत आलेले होते! त्याच प्रमाणें आपल्या दोघांही मुलांचे विवाह त्यांनीं ब्राह्म विवाहविधीनुसारेंच केले हें सर्वांस आतां विदित आहे. अशा प्रकारें आपली ध्येयस्मृति नेहमीं जागृत ठेवण्यासाठीं ते झटले. परमेश्वर करो व सर नारायण यांच्या ह्या सर्व गुणांचें अनुकरण करून त्यांचा उपयोग आपल्या लोकांच्या कल्यासाठीं करणारे तरुण पुढें येवोत.

## ( १६ ) प्रभाकर रामकृष्ण भांडारकर.

How frail a thing is health and what a thin envelope protects our life against being swalled up from without or disorganised from within......The only certainty in this world of vain agitations and endless anxieties is the certainty of death.

AMIEL.

मनुष्य मात्र गाढ झोपीं रोज जातो, त्यावेळीं वस्तुतः प्रत्यक्ष मृत्यूच्या किती जवळ जवळ तो जात असतो! जीवन व मृत्यु ह्यांच्यामध्यें खरें पहातां किती झिरझिरीत पडदा आहे याची साक्ष प्रभाकरपंत भांडारकर ह्यांच्या मृत्यूची बातमी ज्या वेळीं प्रथम कानीं आली त्या वेळीं पुन्हा एकवार पटली असें म्हटलें असतां अतिशयोक्ति व्हावयाची नाहीं. प्रभाकरपंतांच्या ठिकाणीं आपल्या परम पूज्य पित्याचे अनेक गुण उतरले होते; तुकोबांच्या अभंगांचा त्यांनीं अत्यंत सूक्ष्मरीतीनें अभ्यास करून त्यासंबंधानें अधिकारयुक्त विवेचन करण्याचा अधिकार प्राप्त करून घेतला होता. विस्तृतवाचन, बिनचूक विचारसरणी, पायाशुद्ध विवेचन पद्धति, पूर्वपक्ष उत्तरपक्ष करून वादांत जय मिळविण्याचें सामर्थ्य, अस्खलित वाणी, ज्ञान लालसा, परमनिष्ठावंत असा भाव, त्याचप्रमाणें स्वभावाचा करारीपणा, स्पष्टवक्तेपणा, दूरदर्शित्व, इ० गुणांमुळें ते सर्वांस आदरणीय वाटत होते. त्यांच्या मृत्यूची बातमी येईल असें वाटावयास कांहीं कारण नव्हतें. प्रभाकरपंत ह्यांची इहलोकींची यात्रा ता. १५ जून १९२५ रोजीं रात्रौ एकाएकीं संपली. त्यांच्या अल्प चरित्राच्या द्वारें त्यांच्यांतील विशेष गुणांचा अल्प परिचय करून देण्याचा प्रयत्न करितों.

प्रभाकरपंतांचा जन्म १८६२ सालीं झाला. आपले वडील बंधु श्रीधरपंत ह्यांच्या प्रमाणेंच त्यांचें शिक्षण झालें. १८८२ सालीं ते बी. ए. ची परीक्षा पास झाले. डा. भांडारकरांचें असें एक तत्त्व असे कीं, मुलांना पुढें एखाद्या धंद्याचें जरी शिक्षण द्यावयाचें झालें तरी प्रथम त्यानें आपलें सर्वसाधारण शिक्षण मिळवून पुढील विशेष शिक्षणाची तयारी करणें बरें. त्याप्रमाणें त्यांनीं प्रभाकरपंतांच्या शिक्षणाच्या बाबतींत केलें असावें. स्वतः प्रभाकरपंतांनीं आपल्या ज्येष्ठ चिरंजिवाच्या बाबतींत हेंच तत्त्व आचरणांत आणिलें. असो. प्रभाकरपंतांना परीक्षांमध्यें केव्हांच सुयश प्राप्त झालेलें नाहीं. तें त्यांच्या दोघां बंधूंनीं उत्तमप्रकारें

साधिलें. परंतु संसारांत पडल्यावर त्यांनीं जी सर्व बाजूंनीं कमाई केली ती तोंडांत बोटें घालावयास लावणारी आहे यांत कांहीं संशय नाहीं. १८८७ सालीं एल. एम. एस.ची परीक्षा पास झाल्यावर कांहीं वर्षे मुंबईत काढून डाक्टरीचें काम केलें, परंतु ज्या प्रकारचा जम बसणें इष्ट आहे असें त्यांस वाटत होतें, तसा जम न बसल्यामुळें त्यांनीं इंदुर संस्थानांत नोकरी पत्करिली. मात्र ती वैद्यकी खात्यांत नव्हे, तर इंदुर येथील होळकर आर्टस कॉलेजमध्यें शास्त्रीय विषय शिकविण्याच्या अध्यापकाची. त्यांनीं मुद्दाम वैद्यकीचें शिक्षण संपादिलें, तरी प्रथम त्यांस अध्यापकाचें कार्य हातीं घ्यावें लागले. तें त्यांनीं उत्तम प्रकारें केलें व उत्तम अध्यापक असा लौकिक प्रथम मिळविला. येथें त्यांचा पहिला मोठा गुण प्रत्ययास आला. एकदां काम हातीं घेतलें कीं मग ते त्याच्याशीं समरस होत, व त्यांत पारंगतता मिळविल्यावांचून त्यांस स्वस्थ बसवत नसे. जो काय विचार करावयाचा तो प्रथम कार्य शिरावर घेतेवेळीं. एकदां तें घेतलें कीं, मग सर्व लक्ष त्यांत वेधावयाचें असें त्यांचें धोरण असे. अशा प्रकारें अध्यापक ह्या नात्यानें उत्तम यश मिळविल्यावर कर्नल राबर्टसन यांच्या हाताखालीं डाक्टरीचें काम करण्याची संधि त्यांस प्राप्त झाली. ही संधि यावी अशीच त्यांची इच्छा होती व त्यांनीं ह्या दिशेनेंच विशेष शिक्षण प्राप्त करून घेतलें होतें. हें काम सुरू करितांच तेथेंही त्यांनीं उत्तम कीर्ति संपादिली. उत्तम अध्यापक जे होते ते अल्पावधींत उत्तम डाक्टर झाले. लोकांचा त्यांचेवर पूर्ण विश्वास बसला. इंदूरच्या अधिपतींचें त्यांचेकडे विशेष लक्ष गेलें. त्यांची योग्यता त्यांनीं जाणिली व राजवाड्यांतील डाक्टर, स्टेट सर्जन, राजपुत्राचे पालक, असे अनेक हुद्दे त्यांनीं मिळविले. निरनिराळ्या प्रकारचीं कामें करून दाखविण्याचे प्रसंग त्यांस आले. भिन्न प्रकृतीच्या, स्वभावांच्या, मनोवृत्तींच्या माणसांशीं त्यांचा संबंध झाला. परंतु सर्व वेळीं त्यांनीं आपला भांडारकरपणा कायम राखिला. अखेरीस पेन्शन घेऊन पित्याच्या सहवासांत राहून त्यांची शुश्रूषा करण्यासाठीं ते इंदूरचा आपला सर्व संसार मोडून पुण्यास आले. परंतु इंदूरच्या महाराजांना आपल्या संस्थानांतून भांडारकर गेले हें बरें वाटलें नाहीं. त्यांच्यासारख्या गुणी माणसाचा सहवास असणें इष्ट आहे, आपल्या संस्थानाला ते भूषण आहेत, त्यांचें शील, त्यांचें ज्ञान, त्यांचा बाणेदारपणा, त्यांची सरळ दृष्टि ह्या गुणांचा लाभ संस्थानाला आणखी व्हावा म्हणून महाराजांनीं त्यांना पुन्हां इंदुरीं नेलें व त्यांस एक दिवाण करून टाकलें! मृत्यूपूर्वी कांहीं महिने आधीं ते नोकरी सोडून पुण्यास यावयाचे होते, परंतु पुन्हां महाराजांच्या आग्रहानें ते

राहिले. अखेरीस ता. १४ जून १९२५ रोजीं आपल्याला आतां मोकळें करावें अशी त्यांनीं केलेली विनंति महाराजांनीं मान्य करावयाच्या पूर्वीच प्रत्यक्ष मृत्यूनेंच त्यांजवर अचानक झडप घातली ! ता. १४ जून १९२५ रोजीं प्रभाकरपंत इंदूर येथील ब्राम्हमंदिरांतील उपासनेस हजर होते, आणि पुढल्या रविवारची उपासना त्यांच्या स्मरणार्थ झाली ! त्याच रात्रीं त्यांच्या हृदयांत वेदना सुरू झाल्या. सर्व प्रकारचे उपाय झाले पण ते सर्व व्यर्थ होऊन ता. १५ जून १९२५ रोजीं त्यांचें देहावसान झालें.

## प्रभाकरपंतांचे विशेष गुण.

साधारणपणें गेलीं तीस वर्षें प्रभाकरपंतांचें चरित्र हा लेखक अवलोकन करीत आहे. कांहीं काळ अगदीं दुरून, कांहीं काळ त्यांच्या कार्याच्याद्वारें व कांहीं काळ प्रत्यक्ष परिचयाच्याद्वारें हें अवलोकन झालें. तेवढया अवधींत अधिकाधिक परिचयानें त्यांच्या विषयींचा आदरभाव अधिकाधिक वाढत गेला. त्यांची अध्ययनतत्परता पाहून आम्हांस सादर कौतुक वाटावें. डाक्टरीच्या धंद्यांत पडलेला माणूस परंतु वाङ्मय व तत्त्वज्ञान ह्या विषयांशीं रात्रंदिवस दीर्घपरिचय ठेवून त्यांमध्येंच रुळणाऱ्या माणसाइतका ह्या विषयाशीं त्यांचा निकट भाव, इतकेंही करून आपल्या व्यवसायांत पहिल्या प्रतीची पारंगतता ! तेथें कोणत्याही प्रकारची हयगय नाहीं. नेहमींच्या औषधपाण्याच्या योजनेपासून तों वैद्यशास्त्रांतील अत्यंत आधुनिक जी पद्धति तिचेविषयींही त्यांस माहिती असे; ते नित्य आपल्या ज्ञानांत भर घालीत होते. त्यांचे तीर्थरूप जगप्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधक, चिकित्सक, अध्यापक व आधुनिक काळांतील भागवोत्तम होते आणि ते सर्व गुण प्रभाकरपंतांत पूर्णपणें उतरले होते असें जें वर ध्वनित केलें आहे त्याचा अनुभव त्यांच्याशीं परिचय झालेल्यांस आलेला आहे. तुकारामाच्या अभंगांचें त्यांचें अध्ययन इतकें सूक्ष्म होतें कीं, पुष्कळ अधिकारी जनांस त्यांची चिकित्साबुद्धि व त्यांचा उत्कट भक्तिभाव पाहून अचंबा वाटे. त्यांनीं तुकोबांच्या अभंगांचें निष्ठेनें, अगदीं कसून, मार्मिकपणें व आदरबुद्धीनें अध्ययन केलें होतें; इतकें कीं, ज्या ज्या वेळीं कोणासही तुकारामाच्या अभंगांचें आधुनिक पद्धतीनें अध्ययन करण्याची इच्छा होईल त्या त्या वेळीं सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी त्यांनीं दिलेलें Two Masters—Jesus and Tukaram ह्या विषयावरील व्याख्यान व साहा वर्षांपूर्वी पांगारकर कृत तुकारामाचें चरित्र वाचून त्यांनीं लिहिलेला विस्तृत निबंध हीं मननपूर्वक वाचल्याशिवाय त्या अध्ययनाची पूर्तता व्हा-

वयाची नाहीं. त्यांनीं तुकारामाचें आध्यात्मिक चरित्र तरी लिहावें असा त्यांस आम्ही एकदां आग्रह केला होता, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं व ही पात्रताच आपल्यांत अद्याप आलेली नाहीं अशी सबब त्यांनीं त्यावेळीं पुढें केली. ह्या बाबतींत हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, तुकोबाच्या अभंगांकडे त्यांचें जें विशेष लक्ष वेधलें तें त्यांच्या तीर्थरूपांच्या तुकोबावरील निस्सीम भक्तीमुळें. आपलें वरील व्याख्यान प्रसिद्ध करते वेळीं प्रभाकरपंत म्हणतातः–

I owe a still greater debt to him ( to his father ) as much as but for his influence Tukaram's works would in all probability have remained almost a sealed letter to me as to many another educated Maratha of to-day.

महाराष्ट्र भाषेंतील काव्यवाङ्मयास सागराची उपमा देतात. ह्या सागराचें प्रभाकरपंतांनीं उत्तम प्रकारें मंथन करून, त्यांतील उत्तमोत्तम भाग आत्मसात् केला होता, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. महाराष्ट्र भाषेचें काव्य-वाङ्मय हा ज्याप्रमाणें त्यांचा आवडीचा विषय होता, त्याचप्रमाणें इंग्रजी काव्य वाङ्मयावरही त्यांची भक्ति होती. वर्डस्वर्थ, टेनिसन, शेक्सपिअर इ० च्या कृति त्यांच्या अत्यंत आवडीच्या असत. मराठी भाषेवरील त्यांचें प्रेम व प्रभुत्व ह्यांचा अनुभव, त्यांचीं धर्मपर व्याख्यानें, त्यांचीं कीर्तनें व पुराणाच्या वेळचीं त्यांचीं प्रवचनें, ह्यांच्या द्वारें उत्तम प्रकारें येत असे. पुराणिकाच्या नात्यानें एकदां ते प्रवचन करूं लागले कीं, जन्मभर पुराणिकाचा धंदा करणारासही त्यांच्यामध्यें व्यंग काढतां येत नसे. तोच प्रकार कीर्तनाच्या वेळचा. जुन्या साधुसंतांच्या वचनांशीं ते किती एकजीव झाले होते, संस्कृत वाङ्मय त्यांनीं कसें चिकित्सक बुद्धीनें अध्ययन केलें होतें, त्यांची अस्खलित, जोरदार, विनोदप्रचुर वाणी किती परिणामकारी होती, त्यांचें संगीताध्ययन कसें मार्मिक होतें, त्यांची विवेचनपद्धति कशी तर्कशास्त्रास धरून असे, त्यांचा भाषेचा ओघ कसा सरळ, मनोरम व सुस्पष्ट असे; निरनिराळे स्वभाव, प्रसंग व वृत्ति ह्यांच्याशीं कीर्तनप्रसंगीं ते कसे एकजीव होऊन विवरण करीत याचा विचार आजही मनांत आला कीं मन अत्यंत अस्वस्थ होतें; अशासाठीं कीं ती भावनायुक्त, पायाशुद्ध वाणी आतां कानीं पडावयाची नाहीं; हरिश्चंद्राचें आख्यान लावून श्रोत्यांच्या डोळ्यांतून अश्रु आणणारें शोकरसप्रधान विवरण, व त्याचप्रमाणें प्रसंग येतांच विनोदात्मक भाषण आतां ऐकावयास सांपडावयाचें नाहीं. एखाद्या तर्कशास्त्रज्ञास लाजविणारें त्यांचें विवेचन,

एकाद्या नाणावलेल्या कीर्तनकारासही मागें सारणारा त्यांचा आवेश, त्यांच्या बहुश्रुतपणाची साक्ष पटविणारी त्यांची विवरणशैली व त्यांची समयसूचकता ह्या सर्वांस प्रार्थना व ब्राह्मसमाज कायमचे अंतरले आहेत हा विचार मनांत आला म्हणजे आपल्या हानीची कल्पना होऊं लागते. मंदिरामध्यें उपासना चालवीत असतां ब्राह्मधर्माच्या ध्येयाशीं एकजीव झालेल्या जीवनाची साक्ष त्यांचें प्रत्येक वाक्य पटवून देत असे, व कधीं कधीं प्रभाकरपंतांच्या मुखाच्या द्वारें त्यांचे तीर्थरूपच बोलत आहेत कीं काय असा भास होत असे. १९१७ सालीं मुंबईच्या प्रार्थनासमाजानें स्थापनेस पन्नास वर्षें पूर्ण झाल्याचा महोत्सव केला, त्या वेळीं उत्सवांतील हरिकीर्तन पिता व पुत्र ह्या दोघांनीं केलें. म्हणजे प्रथम गुरुवर्य रामकृष्णपंत भांडारकर ह्यांनीं कीर्तनास आरंभ केला व प्रकृति आतां दिवसेंदिवस क्षीण होत आहे. आवाजही क्षीण होत आहे, अधिक वेळ बोलणें, उभें राहणें, होत नाहीं, असें सांगून कीर्तनकार ह्या नात्यानें आपली माळ आपण स्वतः आपल्या चिरंजिवाच्या गळ्यांत घातली ! तो देखावा इतका परिणामकारक, अंतःकरणामध्यें खेदाची व आनंदाची वृत्ति जागृत करणारा होता कीं, त्या प्रसंगाची आठवणही आज आम्हांला अश्रु ढाळावयास लावीत आहे. खेद अशासाठीं झाला कीं, कीर्तनजान्हवीचा ओघ प्रथम हरिमंदिरांमध्यें आणून, सतत ४०–४५ वर्षें त्या ओघाच्या द्वारें बहुजनसमाजाची आध्यात्मिक तृषा ज्यांनीं शांत केली ते आतां पुढें आपल्या हरिकीर्तनाचा लाभ जनांस देणार नाहींत; आणि आनंद अशासाठीं झाला कीं, आपलें काम उत्तम रीतीनें चालविणारें पुत्ररत्न ह्या कार्यासाठीं ते समाजाच्या हवालीं करीत आहेत. परंतु आम्हां दुर्दैवी जनांचें इतकें कोठें सौभाग्य कीं, आम्हांस त्यांच्या कीर्तनांचा व सहवासाचा दीर्घकाळ लाभ व्हावा ? आठ वर्षें झालीं नाहींत तोंच काळानें आपला डाव साधला व आतां ह्या लाभास सर्व समाज अंतरले आहेत. दाहा वर्षांपूर्वी पितापुत्र कीर्तनकार म्हणून प्रार्थन मंदिरांत उभे राहिले पण आज दोघेहि दृष्टिआड झाले आहेत ! अस्खलित विवेचनप्रवाह, समयसूचकता व विनोद ह्या बाबतींत प्रभाकरपंतांनीं आपल्या तीर्थरूपांवर मात केली होती असें म्हटलें असतां, गुरुवर्यांविषयींचा आमचा आदर कमी होता असा आरोप आमच्यावर कोणी करील असें आम्हास वाटत नाहीं. ब्राम्हधर्म, ब्राह्मसमाज व ब्राह्मजीवन हीं प्रभाकरपंतांनीं आपलीं शांतीचीं, समाधानाचीं साधनें करून ठेविलीं होतीं. त्यांचें साधन उच्च कोटीचें होतें. त्यांच्या सर्व विवरणामध्यें विद्वत्तेपेक्षां अनुभवावरच

विशेष जोर असे. 'अनुभवें अनुभव अवघा साधियेला' असा त्यांचा प्रकार असे. त्यांच्या प्रार्थना, त्यांचे उपदेश व त्यांचीं मतें सर्वप्रकारें ब्राह्मधर्मास पोषक व साधकास सहाय्यक अशीं असत.

प्रार्थना व ब्राह्मसमाजाची आपल्या प्रांतांतील मंडळी साधारणपणें साधुसंतांच्याच ध्येयाचें अनुसरण करीत आहे असा त्यांचा दृढ विश्वास होता. साधुसंतांच्या ध्येयाविषयीं त्यांस जागृत अभिमान होता. ते नवयुगांतील निबंधांत म्हणतातः—

"वस्तुतः भागवतधर्माच्या बहुतेक शाखांचें व त्यांतही वारकरी पंथाचें एक ध्येय जातिभेद मोडणें हें होतें असें प्रत्येक निष्पक्षपाती मनुष्याच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे. अतिशूद्राखेरीज सर्व जातींच्या लोकांना विठोबाच्या मूर्तीस प्रत्यक्ष स्पर्श करण्यास परवानगी असणें, ब्राह्मणानें शूद्राच्या पायां पडणें, एकाच माणसानें एकाच स्वयंपाकांतून वाढलेलें अन्न निरनिराळया जातींच्या माणसांनीं एकाच स्थळीं जेवणें, ब्राह्मणानें चांभाराच्या हातचें, तीर्थ म्हणून कां होईना, पाणी पिणें, श्राद्धासाठीं तयार केलेलें अन्न अंत्यजांस वाढणें, हे प्रकार व्यवहारांत जातिभेद अवश्य पाळला पाहिजे अस म्हणणारांकडून होणें कधींतरी संभवनीय आहे काय ? या सत्पुरुषांनीं आपल्या आचरणांत परमार्थ व व्यवहार असा खोटा भेद कधींच केला नाहीं, व तो त्यांजवर लादणें म्हणजे आपल्या जोडीस त्यांना आणून बसविण्यासारखें आहे.......

भागवतधर्म व त्याचे अनुयायी—चांभाराच्या हातचें तीर्थोदक घेणारे देवमुरारि, मलिंगाबरोबर एकांतांत जेवणारे जनार्दनपंत, श्राद्धाचें अन्न अंत्यजांस वाढणारे एकनाथ व त्यांची अनुकूल पत्नी गिरिजाबाई, मूर्तिपूजेचे उच्छेदक विसोबा खेचर, आधीं मूर्तिपूजक व अंतीं मूर्तिपूजेविषयीं उदासीन तुकोबा, हिंदुमुसलमानांच्या धर्माविषयीं समभाव असलेले बहिरंभट, हेडीच्या स्त्रीबरोबर विवाह करणारे मालोपंत, स्वजातींतच मुलींचीं लग्नें करून देणारे तुकोबा इत्यादि मंडळी यांच्यांत व अलीकडील धर्मसुधारकांत पूर्ण साम्य आहे. आणि त्यांच्यामध्यें भेद दाखविण्याचा खटाटोप व्यर्थ आहे."

अशा प्रकारें साधुसंतांविषयीं व विशेषतः तुकोबाविषयीं त्यांच्या ठिकाणीं उत्कट आदरभाव होता तरी तुकोबांवर त्यांची अंधभक्ति नव्हती व तुकोबा जें कांहीं सांगतील तें शिरसावंद्य मानावयास ते तयार नव्हते. विशेषतः स्त्रियांसंबंधानें तुकोबांचे अनुदार विचार व कोत्या कल्पना ह्यांकडे कानाडोळा करण्याकडे

समुच्चयरूपानें दिसत होता तो कशाचा परिणाम होता? त्यांच्या 'भीतर' झालेल्या अगर होणाऱ्या सिद्धीचा आपणास दिसणारा पाकरूपी परिणाम होता. आपल्या मनाची ते किती व कशी शिकवण चालू ठेवीत असत, ह्याचा विचार मनांत आला कीं, धन्य हा साधक, धन्य हा भक्त असे उद्गार निघाल्यावांचून रहात नाहींत. पहाटेस उठून भजन, प्रार्थना व ध्यान केल्यावांचून त्यांचा दिवस जात नसे. नंतर कांहीं सद्ग्रंथवाचन, हें कोणत्या प्रकारचें तें आपण पाहिलेंच आहे. एकेका वेळीं त्यांनीं जी निरनिराळ्या ग्रंथांची यादी दिलेली आहे ती पाहिली म्हणजे मन थक्क होऊन जातें. कोणकोणतीं पुस्तकें केव्हां वाचावयाचीं हें ते कधीं कधीं ठरवीत असत. त्याचप्रमाणें मुलें लहान असतांना त्यांच्या खोलींत कांहीं काळ घालविण्याचा त्यांचा संकल्प असे. तोहि स्वतःच्या शिक्षणाकरितां! अशा प्रकारें त्यांनीं आपल्या स्वतःला शिस्त लाविली होती. पुष्कळ वेळा ही शिस्त निर्जीव होते. घड्याळाच्या कांट्याप्रमाणें सर्व कांहीं चालत असतें. परंतु सर नारायणांचें तसें नव्हतें. तें त्यांत ओलावा घालीत असत. व प्रत्येक वृत्तींत देवाचा हस्त ते पहात असत. एकदां त्यांनीं लिहिलें—

I am greatful to God for the *impulsc* to work methodically and resolve to work rather than weary myself in indolence. I feel so peaceful, so happy when I have spent the day in good hard work.

त्याचप्रमाणें अशा रीतीनें आपल्या कामाला शिस्त लाविली व देवाचे आभार मानले म्हणजे आपलें कार्य संपलें असेंहि सर नारायण समजत नसत. रोज काय घडलें तें सटीक लिहिणें म्हणजे धन्यता प्राप्त झाली असेंहि त्यांना वाटत नसे. उलट ते आपल्या स्वतःला अशी आठवण करून देत कीं, ज्या अर्थी मी आतां रोजचा कार्यक्रम लिहून ठेवीत असतों, त्या अर्थी मी रोज स्वतःला असा प्रश्न केला पाहिजे कीं,

Have I been industrious ?
Have I been true, just and prudent ?

असा क्रम चालू असतांना इतकेंहि आपल्या मनाच्या जागृतीला पुरेसें नाहीं असें त्यांना वाटलें व त्याबरोबर आपल्या मनाला आणखी तीव्र कातरीमध्यें ते पकडूं लागले.

याचें ! स्त्रियांना एका पातिव्रत्यधर्माशिवाय दुसऱ्या कशाची गरज नाहीं, तोच एक त्यांस सद्गति देणारा मार्ग म्हणून बोकेसंन्याशी पुरुषांनीं त्यांना उपदेश करावा व सध्यांचाच पति जन्मोजन्मीं मिळावा म्हणून त्यांना विशेष व्रतें आचरावयास सांगावीं आणि आपला मार्ग आपणाला मोकळा आहे तो आहेच. पुरुषांनीं राजरोस वाटेल तसें दुराचरण करावें, जनसमाज त्यासंबंधांत ब्रही काढीत नाहीं. तेंच एखाद्या स्त्रीचें वांकडें पाऊल पडूं द्या, म्हणजे ' व्रगार्त पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे ' हे जन तिला टोंचण्यास तयार असतात. त्यांत स्त्रीजातच अधिक पुढाकार घेते. वांकडें पाऊल पडण्यांत विशेष दोषी साथीदार जो पुरुष तो अचानक सुटून जातो. असा भेदभाव कां म्हणून विचारल्यास स्त्रियाच सांगतील कीं, झालें तरी पुरुष हें तांब्याचें भांडें व स्त्री हें मातीचें भांडें आहे ! सारांश, हिंदु समाजामध्यें स्त्री म्हणजे मोल देऊन घेतां येण्याजोग्या भोग्य वस्तूंपैकीं एक असें मानलें जातें. हें रेखाटलेलें चित्र खोटें आहे, यांत कोळशाचाच रंग जास्त आहे, व्यवहारामध्यें पुरुष नेहमीं स्त्रीचा सल्ला घेत असतो, लग्नामुंजींत तर पुरुष स्त्रियांचें म्हणणें निमूटपणें ऐकून घेत असतात इत्यादि अनेक आक्षेप या म्हणण्यावरतीं येण्याचा संभव आहे. परंतु थोडा विचार केला असतां कोणासही सहज कळण्यासारखें आहे कीं, या प्रकारचा थोडाबहुत मान जो पुरुषांकडून स्त्रियांस मिळतो तो त्यांचा हक्क म्हणून नव्हे, तर सर्व सूत्रें आपल्या हातांत ठेवून एखाद्या मुत्सद्यानें नांवाचा राजा गादीवर बसवावा व त्याला मान द्यावा त्यांतला हा प्रकार आहे. अशा राजाला किती तरी मोकळीक असते. त्यानें खावें प्यावें, शिकार करावी, विलास करावे, महाल बांधावे, घोषवती वाजवावी, हत्ती धरावे, आणि असें करतां करतां राजाच एक दिवस चोरीला गेला म्हणजे त्या मुत्सद्यानें त्याचा शोध लावून पुनः त्याला आणून गादीवर बसवावें ! अशा राजाला काय म्हणावयाचें ? परंतु जनसमाजांतील जो कोणी वर्ग दुसऱ्या वर्गास दास्यांत ठेवतो त्याला तत्काळ कांहीं फायदा झाला तर होईल, परंतु अंतीं त्यायोगें त्याचा स्वतःचा नाश झाल्यावांचून राहत नाहीं ही गोष्ट उत्तरोत्तर विचारी माणसांच्या निदर्शनास येत चालली आहे. स्त्रियांस भोग्यवस्तुरूपी अवनत दशेस पोहोंचविण्याचें फळ हिंदुजनसमाजास मिळाल्यावांचून राहिलें नाहीं.

रा. पांगारकर म्हणतात कीं, ' परमार्थाला मारक असे जे कनक आणि कांता हे दोन्ही विषय तुकोबांच्या चित्तीं केव्हांही बुसले नव्हते, त्यामुळें या बाबतींत मनोनिग्रहाचें त्यांना कारणही पडलें नाहीं. ते उपजतांच सद्गुणी व विरक्त होते '

आपल्या साधारण वहिवाटीला अनुसरून ग्रंथकारांनीं आधारावांचून ही कहाणी सांगितली आहे. परंतु तुकोबा म्हणतातः—

स्त्रियांचा तो संग नको नारायणा । काष्ठा या पाषाणा मृत्तिकेच्या ॥ १ ॥
नाठवे हा देव न घडे भजन । लांचावलें मन आवरेना ॥ २ ॥
दृष्टिमुखें मरण इंद्रियांच्या द्वारें । लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ ३ ॥

“ नारायणा, स्त्रियांचा संग नको; लांकूड, धोंडा, माती यांच्या केलेल्या स्त्रिया असल्या तरीसुद्धां त्यांचा संग नको. नुसत्या दर्शनानें सुद्धां मन लांचावतें आणि आवरत नाहीं. ” रा. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणें जर तुकोबा उपजतांच स्त्रियांच्या संबंधांत विरक्त होते तर हा अनुभव त्यांना कसा आला ? हा भाडोत्री अनुभव नव्हे हें खास. मंडनमिश्राच्या स्त्रीनें शंकराचार्यांस कामशास्त्रांतील एक प्रश्न विचारला. शंकराचार्यांनीं गृहस्थाश्रम न करतां एकदम संन्यास घेतला असल्यामुळें उत्तर देतां येईना. म्हणून मुदत मागून घेऊन परकायाप्रवेश करून विचारलेल्या गोष्टीचा अनुभव घेऊन प्रश्नाचें उत्तर दिलें अशी कथा आहे. त्याप्रमाणेंही तुकोबांनीं केल्याचें कोणी सांगत नाहीं. तेव्हां वरील अभंगांतील व त्यासारख्या दुसऱ्या अभंगांतील अनुभव तुकोबांचा स्वतःचा असला पाहिजे हें उघड आहे. आपल्या अंतःकरणांतील कोनाकोपऱ्यांत लपून असलेले दोष शोधून काढून ते प्रकाशांत आणण्याची हातोटी तुकोबांसारखी दुसऱ्या साधूंत फारच विरळा आढळेल. तेव्हां एका काळीं तुकोबांची या प्रकारची चंचल स्थिति होती असें दिसतें. हीच मनःस्थिति हिंदुसमाजांतील बऱ्याच पुरुषांची असण्याचा संभव आहे. आणि या दुर्दशेचें कारण, स्त्री म्हणजे एक भोग्य वस्तु ही नीच दृष्टि. गार्गीला पाहून याज्ञवल्क्याला म्हणावें लागलें नाहीं कीं ‘ नको रे बाबा इचें दर्शन, इच्यायोगें माझें पतन होईल, ’ कारण त्याच्या दृष्टीनें गार्गीची योग्यता अगदीं भिन्न, उच्च प्रतीची होती. हिंदुस्थानांतील ज्या प्रदेशांत स्त्रियांस थोडी बहुत मोकळीक आहे व व्यवहारांत निरनिराळ्या स्त्रीपुरुषांचा रोज थोडा बहुत संबंध येतो, तेथील लोकांत स्त्रीदर्शनानें मनाची चलबिचल झाल्याचें सामान्यतः कमी दिसून येतें. परंतु ज्या प्रदेशांत स्त्रियांना पडदा आहे तेथील पुरुषांचें या गोष्टींत मानसिक दौर्बल्य दृष्टोत्पत्तीस येतें. तुकोबांनीं आपल्या मनावर जय मिळविला, आणि परक्या स्त्रिया त्यांस रखुमाईसमान दिसूं लागल्या. याबद्दल ते अत्यंत स्तुतीस पात्र आहेत. परंतु त्यांनीं यासंबंधांत उपदेशिलेला ‘ एकांतीं लोकांतीं स्त्रियांसीं भाषण ।

प्राण गेल्या करूं नये ॥ ' हा मार्ग जननीच्या उदरांत बारा वर्षे लपून जन्मतःच वनांत पळून जाणाऱ्या अननुभवी शुकाचा मार्ग होय. खरें वैराग्य समजण्याकरितां ज्ञात्यांच्या सांगण्यावरून त्याला जनक राजापाशीं जावें लागलें. परंतु ' नव्हे ब्रम्हचर्य बाइलेच्या त्यागें ' असें म्हणणाऱ्या अनुभवी तुकोबांनीं स्त्रियांपासून पळून जाण्याचा मार्ग सांगावा हें सत्कृद्दर्शनीं विचित्र भासतें; तथापि विचाराअंतीं असें दिसून येईल कीं तुकोबा या मार्गानें जाऊन यशस्वी झाल्यामुळेंच त्यांनीं असा उपदेश केला. परंतु तुकोबांची गोष्ट अगदीं वेगळ्या प्रकारची होती. त्यामुळें त्यांचा अनुभव सर्वांस सर्व प्रसंगीं उपयोगीं पडण्याचा संभव नाहीं. त्यांचा परकी स्त्रियांशीं संबंध यावयाचा तो नेहमींचा व्यवहारांतला नसून भजनकीर्तनादि प्रसंगींच येणारा होता. त्यामुळें कांहीं काळ स्त्रियांपासून दूर राहून देवास साक्ष ठेवून, परकी स्त्री रखुमाईसमान ही शिकवण आपल्या चित्तास देणें फारसें कठीण नव्हतें. परंतु साधारण जनांची स्थिति याहून अगदीं भिन्न आहे. प्रत्यहीं अनेक वेळ परकी स्त्रियांशीं व्यवहारांत संबंध येणार. सध्यांचा काळ तर असा आहे कीं, स्त्रिया व पुरुष यांनीं खांद्याला खांदा लावून सामाजिक व राष्ट्रीय कार्यें केलीं पाहिजेत. अशा प्रसंगीं तुकोबांचा मार्ग पुरा कधींही पडणार नाहीं. या सर्व रोगाच्या मुळाशीं जाऊन पोहोंचणारा असा एकच उपाय आहे तो हा कीं स्त्री ही भोग्यवस्तु आहे, ही सध्यांची बुद्धि नष्ट होऊन तिच्या ठायीं पुरुषांप्रमाणेंच मानसिक व आध्यात्मिक शक्ति आहेत व त्यांच्यायोगें पुरुषांप्रमाणेंच या जगांतील बरेवाईट विविध अनुभव स्वतंत्रपणें घेण्याची, आत्मानुभव ( self-realisation ) घेण्याची, व स्वतःची व इतरांची उन्नति अथवा अवनति करण्याची योग्यता तिच्यामध्येंही आहे, ही जाणीव पुरुषांसच नव्हे तर स्त्रियांसही—विशेषतः स्त्रियांसच—झाली पाहिजे. रा. पांगारकर सांगतात कीं " तुकोबा किंवा समर्थ असल्या वैराग्यशिखामणी साधु पुरुषांनींच स्त्रीवर्गाच्या उन्नतीकडे लक्ष पुरवावें, बाकी अर्धवटांनीं उन्नतीच्या नांवाखालीं स्वतःच अधोगतीस जाऊं नये हें उत्तम. " तुकोबांनीं उपदेशिलेल्या मार्गानें स्त्रीवर्गाच्या उन्नतीचें काम कधींही होऊं शकणार नाहीं. हें वर सांगण्यांत आलेंच आहे. परंतु दुसरा जो एकच मार्ग या कामीं उपयोगी पडण्यासारखा आहे म्हणून दाखविण्यांत आला तो एका दृष्टीनें जरी स्त्रियांच्या उन्नतीसाठीं आहे तरी वस्तुतः तो पुरुषांच्या स्वतःच्या उन्नतीसाठींच आहे हें उघड आहे. कारण स्त्रियांच्या संबंधांत पुरुषाचा दृष्टिकोण बदलणें हें त्यांतील वर्म आहे. तेव्हां रा. पांगारकर

यांचा उपदेश म्हणजे ‘ बुडत्यास हात देतां यावा या इच्छेनें पोहावयास शिकूं म्हणतां, परंतु ही शहाणपणाची गोष्ट नव्हे, न जाणों एखादे वेळीं पोहावयास शिकत असतां आपणच बुडून जाल ’ असें म्हणण्यासारखा आहे. येथवर परकी स्त्रियांची गोष्ट झाली. परंतु स्वस्त्रीसंबंधानेंसुद्धां जें पुरुषाचें वर्तन असावें असें तुकोबा म्हणतात त्यावरून त्यांची स्त्रियांविषयीं बुद्धि किती अयोग्य होती हें सहज कळून येण्यासारखें आहे. साधु नाहीं महासाधु झाला तरी तो सर्वांगपरिपूर्ण होणें अशक्य आहे. आणि तुकोबांच्या ठायीं जीं न्यूनें होतीं त्यांत स्त्रियांविषयींची तुच्छ बुद्धि हें एक विशेष लक्षांत येणारें न्यून आहे. तुकोबांनीं म्हटलें आहे कीं, “ पत्नी राखावी जैशी दासी । देतां लाड तियेसी वांटा पावे कर्माचा ” यापलीकडे आपलपोटेपणा तो कसा असतो ! आणखी तुकोबा म्हणतात—‘ पतनासि जे नेती । तिचा खोटा स्नेह प्रीती ॥ १ ॥ विधिपुरतें कारण । बहु वारावें वचन ॥ २ ॥ सर्वस्वाची नाडी । ऐसी लाघवाची बेडी ॥ ३ ॥ तुका म्हणे दुरी । राखतां हे तोंचि बरी ॥ ४ ॥ ’ परंतु तुकोबांचा काळ निराळा होता. स्त्रियांची योग्यता केवढी मोठी आहे, एका काळीं आपल्या देशांतही त्यांची योग्यता किती मोठी मानली जात असे, या गोष्टीविषयीं त्यांस ज्ञान नव्हतें. परंतु प्रस्तुतच्या काळीं “ नारीओंको निंदो नहीं नारी नरका खान । जिस खानमें पैदा हुवे भीष्म राम हनुमान् ” हा दोहरा आपल्या ग्रंथाच्या आरंभाच्या भागांत (पृ. ७५) देऊन नंतर तुकोबांच्या वचनांच्या आधारें रा. पांगारकरांनीं स्वतःच स्त्रियांची मनसोक्त निंदा करावी या प्रकारास काय म्हणावें ? ‘ वंदिलें वंदावें निंदिलें निंदावें । एक गेले जावें त्याचि वाटा ॥’ याप्रमाणें आचरण करीत असतां आपण पूर्वी काय बोललों व आतां काय बोलत आहों याचा विचार करायला फुरसद कोणाला ? रा. पांगारकर म्हणतात—“संसारांतही कार्याकारण विधिपालनापुरता स्त्रीसंबंध जो ठेवील त्याच्याच हातून कांहीं पुरुषार्थ होईल.” संतान उत्पन्न करणें हें स्त्रीपुरुषांचें कर्तव्य आहे, असा एका काळीं योग्य समज होता; ‘ प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः ’ अशी आचार्यांची आज्ञा असे; आणि त्यामुळें विवाहाच्या वेळीं स्त्रीला पुरुष बिनदिक्कत म्हणत असे कीं, ‘ प्रजां प्रजनयावहै ’ परंतु त्याच प्रसंगीं पुरुष स्त्रीला आपला सखा म्हणजे मित्रही करून घेत असे. म्हणून साधु तुकाराम व हरिभक्तिपरायण पांगारकर बुवा जेव्हां सांगतात कीं, स्त्रीशीं स्नेहप्रीति करूं नये ‘ विधिपालनापुरता संबंध ’ ठेवावा, तेव्हां ‘ विधिपालन ’ या लापनिक शब्दानें कोणीही फसणार नाहीं आणि चाणाक्ष स्त्रीवर्ग तर या शब्दाचा खरा अर्थ

तत्काळ ताडल्यावांचून कधींही राहणार नाहीं. हिंदु स्त्रियांची सर्वपरी अत्यंत दुर्दशा झाली आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु एका गोष्टींत मोठेपणा दाखविणें त्यांच्या हातांत अझून राहिलें आहे. आपलपोट्या अन्यायी पतीच्या सुखासाठीं आपली सर्वस्वी आहुति त्या देऊं शकतात. ज्या कोणी स्त्रिया जाणूनबुजून प्रमपुरःसर याप्रमाणें आत्मयज्ञ करीत असतील त्या सर्वथा वंद्य होत. त्यांना ऐहिक फळाची इच्छा नसते, पारलौकिक फळाची इच्छा नसते; सती सुलोचनेचें यश कवींनीं गाइलें, परंतु या सतींचीं नांवेंही जगास कळण्याचा संभव नसतो. स्वतःला म्हणाल तर आपल्या ठायीं कांहीं विशेष योग्यता आहे या गोष्टीचें भानही त्यांना नसतें. अशा महासती कोणास पूज्य होणार नाहींत? परंतु अशा स्त्रिया अत्यंत विरळा, आणि प्रस्तुतच्या काळीं सामाजिक उन्नतीच्या कार्यास त्यांच्यापासून प्रत्यक्ष साह्य मिळणें शक्य नाहीं. त्यांनीं आपला गळा जरी उगवून घेतला असला, तरी आपल्या पतीच्या व बंधुभगिनींच्या उद्धारार्थ त्यांच्या हातून प्रयत्न होऊं शकत नाहीं. परंतु आपल्या समाजांतील बहुतेक स्त्रिया अशा आहेत कीं, ज्यांचें आत्मसमर्पण ‘ संविदा देयम् ’ या प्रकारचें म्हणजे बुद्धिपुरःसर नसतें, तर ‘ चालीचाची वाहो बहुतेक ’ या प्रकारचें एखाद्या विकत घेतलेल्या दासीसारखें अथवा घास घालून पाळलेल्या जनावरासारखें असतें. अशा स्त्रियांस माझें एक स्पष्ट विचारणें आहे. हरिभक्तिपरायण पांगारकर बुवा म्हणतात त्याप्रमाणें पतीनें ‘ विधिपालना ’ पुरता मात्र तुमच्याशीं संबंध ठेवणें तुम्हांला मान्य आहे काय? मान्य असल्यास ‘ आह्मांमध्यें व पोटासाठीं देहविक्रय करणाऱ्या आमच्या हतभागिनी भगिनींमध्यें फरक तो काय? ’ हा विचार तुमच्या मनांत कधींही आला नाहीं काय? अग्नीच्या साक्षीनें, शिष्टांच्या समक्ष, वेदोक्त विधीनें, रजिस्ट्रारच्या समोर सह्या करून, वाटेल त्या प्रकारें तुमचा विवाह झाला असो, तुमची व त्या हतभागिनींची स्थिति सारखी आहे. फरक एवढाच कीं तुमच्या मुलांना तुमच्या पतीची धनदौलत मिळेल. ही स्त्रियांची दुर्दशा व तिच्यापायीं होणारी समाजाची दुर्दशा नाहींशी व्हावी एतदर्थ सत्पुरुषांनीं आजवर बरेच परिश्रम केले आहेत त्याबद्दल स्त्रीवर्गानें त्यांचे आभार मानणें अत्यंत उचित आहे. परंतु हें काम जेव्हां स्त्रिया स्वतः आपल्या हातांत घेतील तेव्हांच तें नीट मार्गास लागलें असें म्हणतां येईल. अनेक चुक्या होतील. कांहीं काळपावेतों समाजाची घडी बिघडेल, दुर्जन टवाळक्या करतील, सज्जन संशयारूढ होतील, परंतु जागृत झालेली स्त्री हातांतील काम पुरें केल्याशिवाय विश्रांति घेणार नाहीं.

मोठ्या आनंदाची गोष्ट ही आहे कीं या प्रकारची जागृति होण्याचा काळ समीप आल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

## धर्म व संसार

स्त्रियांसंबंधानें त्यांचे विचार हे असे असल्यामुळें संसार व धर्म यांच्या परस्पर संबंधाविषयीं त्यांचे विचार अत्यंत मननीय होते. आपल्या एका व्याख्यानांत त्यांनीं असें दाखवून दिलें कीं, संसार व धर्म अशा शब्दयोजनेच्या द्वारें ध्वनित होणारा जो दुजेपणा तो आपल्याला संमत नाहीं ! त्यांना जर कोणी असें म्हटलें कीं, देवाचें स्मरण करीत करीत संसारांतील आपलीं कर्तव्यें करून देवाशीं सहवास करा, तर तें त्यांस बिलकुल पसंत नसे. कारण, त्यांनीं एकदां असें सांगितलें कीं, समजा मजकडे कांहीं आपरेशन करण्यासाठीं कोणी रोगी आला, तर त्यावेळीं नारायण नामाचा जप करून त्या कार्यीं लागण्याचा व आपरेशन करीत असतां नारायण नामाचा जप करण्याचा प्रयत्न केला तर तें काय उपयोगाचें ? माझा रोगी म्हणेल साहेब आपण मला एवढें आपरेशन करून उठवा मग तुम्ही व मी आपण दोघें भजन करूं ! म्हणजे जीं जीं कार्यें ज्या ज्या वेळीं करणें जरूर आहे तीं तीं त्या त्या वेळीं योग्यरीतीनें सर्व साधनांचा उत्कृष्ट उपयोग करून करणें हें त्या वेळचें धर्मसाधन. संसाराच्या बाहेर, संसार कृत्यांच्या बाहेर धर्मकृत्य म्हणजे एक अगदीं निराळेंच कांहीं तरी आहे असें त्यांस वाटत नसे व त्यांचें म्हणणें असें कीं, संसार व धर्म ह्यासंबंधाची ही दृष्टि हाच ब्राह्मधर्माचा विशेष आहे.

अशा प्रकारें आपलें चरित्र सर्व बाजूंनीं आदर्शवत् करण्याचा प्रयत्न करणारे हे आमचे बंधु संस्थानाच्या वातावरणांत–आणि तेंही अलीकडे विशेष प्रमाणानें लोकांच्या दृष्टीपुढें आलेल्या संस्थानांत–इतकीं वर्षें टिकून कसे राहिले याचें कित्येकांना मोठें आश्चर्य वाटतें. परंतु प्रभाकरपंतांच्या एकंदर चरित्राकडे जे पहातील त्यांस तसें आश्चर्य वाटणार नाहीं. ते जवळ जवळ तीस वर्षें संस्थानांत राहिले, पण संस्थानी रंगाचें पुट त्यांनीं आपल्यावर चढूं दिलें नाहीं. संस्थानांत निरनिराळे पक्ष अगर तट असतात, आणि परिस्थितिपरत्वें कोठला तरी एक पक्ष पुष्कळांस उचलावा लागतो. परंतु प्रभाकरपंत सर्व पक्ष व तट ह्यांपासून अलिप्त राहिले व त्या त्या वेळीं नेमून दिलेल्या कार्याविषयीं मात्र शक्य ती दक्षता त्यांनीं दाखविली. त्यामुळें जनता व राजघराणें ह्या दोहोंमध्यें

त्यांच्याविषयीं आदराची भावना दृढावली व डा. भांडारकर ( इंदुरप्रांतीं त्याच नांवानें ते परिचित होते) हे मोठे निस्पृह, करारी व धर्मनिष्ठ गृहस्थ असा त्यांचा तिकडे लौकिक झाला. प्रभाकरपंतांची डाक्टरीच्या धंद्यांतील कुशलता जशी विशेष होती त्याचप्रमाणें चिकित्सक बुद्धि, त्यांचें वाचन, त्यांचें महाराष्ट्र सारस्वतावरील प्रेम असाधारण होतें. ज्या वेळीं त्यांच्यासारखी महाराष्ट्र भाषेंतील जुन्या कवींच्या कृतीविषयीं सक्रिय अभिमान असलेली तरुण पिढी पुढें येईल, त्यांची ज्ञानलालसा, धर्मतृष्णा तरुणपिढींतील माणसें आपलीशी करितील, त्यांनीं दर्शविलेली विवेचकबुद्धि स्वीकारून आदर भावानें आपले विचार जनतेपुढें मांडितील, त्यांचें महाराष्ट्र भाषेवरील अनुकरणीय प्रभुत्व व महाराष्ट्र काव्याविषयीं मधुकर वृत्ति यांकडे त्यांचें विशेष लक्ष जाईल व त्यांस मान्य असलेल्या धर्मसिद्धान्ताचा ते आदर करितील त्या वेळीं महाराष्ट्राचा उदयकाल समीप आला असें म्हणावयास कांहीं हरकत राहणार नाहीं. परमेश्वर परमात्मा असा दिवस लवकर दाखवो.

---

## (१७) भोलानाथ साराभाई.

Lives of great men all remind us
We can make our lives sublime
And, departing, leave behind us
Foot-prints on the sands of time
Foot-prints, that perhaps another,
Sailing over life's solemn main,
A forlorn and shipwrecked brother,
Seeing shall take heart again.

—*Longfellow.*

स्वतः देवाची भक्ति करणें, त्याच्या सहवासांत नित्य राहण्याचा प्रयत्न करणें व त्यांत यश मिळविणें आणि इतरांसही त्या मार्गाची गोडी लावण्यास कारणीभूत होणें, देवाच्या वैभवाचें, प्रेमाचें, सामर्थ्याचें व आनंदस्वरूपाचें स्वतः वर्णन करणें व इतरांस त्या वर्णनाच्या द्वारें आपलाच अनुभव घेतां येणें शक्य करणें हें कांहीं सर्वांस साधत नाहीं, सर्वांस कांहीं ही देणगी मिळालेली दिसून येत नाहीं. परंतु अहमदाबाद समाजाचे उत्पादक, मार्गदर्शक, पुढारी, व पहिले अध्यक्ष, मुंबईसमाजाचे १८७८ सालीं झालेले सभासद भगवद्भक्त भोलानाथ साराभाई ह्यांस हा अधिकार, हें भाग्य प्राप्त झालें होतें. प्रार्थनासमाजाचे सभासद ह्या नात्यानें त्यांचें चरित्र मननीय आहे म्हणून त्याचें साधारण स्वरूप वाचकांस सादर करण्याचा प्रयत्न करितों.

भोलानाथभाई हे अनेक दृष्टींनीं अलौकिक पुरुष होते. ज्या वेळीं त्यांचा उदय झाला त्या वेळीं गुजराथ प्रांत आणि बडोदें शहर निबिड अज्ञानांधकारांत चांचपडत होतें. भोलानाथभाईचें खानदानी घराणें त्यांच्या तीर्थरूपांच्या वेळीं साधारणपणें खालावलें होतें. तथापि दीर्घोद्योग, प्रामाणिकपणा, चाणाक्षपणा, अपूर्व धोरण, विद्वत्ता ह्यांच्यायोगें साराभाई अगदीं लहान पगाराच्या नोकरीवर असतांना वर चढले व शेवटीं बडोद्यास रेसिडेंट साहेबांचे दफतरदार झाले. तेथें सन १८२२ सालीं जुलै महिन्याच्या तेवीस तारखेला भोलानाथभाईचा जन्म झाला. साराभाई हे मोठे विचारी व निस्पृह वृत्तीचे गृहस्थ होते. त्यांनीं आपल्या चिरंजिवाचें शिक्षण स्वतःच्या देखरेखीखालीं घरींच करावयाचें मनांत

आणिलें. त्यांस घरीं शिकविण्यासाठीं एक मुनशी ठेविला होता तो पार्शिअन भार्षेत शिक्षण देई; त्यांत साराभाई स्वतः भर घालीत. त्याचा परिणाम असा झाला कीं, वीस वर्षांचें वय झालें त्या वेळीं भोलानाथभाईंना पर्शियन, संस्कृत, मराठी, गुजराथी व इंग्रजीही चांगलें येत असे. पुढें त्यांनीं आपलें इंग्रजीचें ज्ञान पुष्कळ वाढविलें. खरें पहातां देवाच्या कृपेनें साराभाईंना इतकी सुस्थिति प्राप्त झालेली होती कीं, भोलानाथभाईनीं आपल्या चरितार्थासाठीं कांहीं उद्योग करण्याची जरुर नव्हती. परंतु आपल्या चिरंजीवानें ऐतखाऊ व्हावें अशी ज्याप्रमाणें साराभाईंची इच्छा नव्हती, त्याचप्रमाणें केवळ वडिलांच्या नांवावर विकलें न जातां आपण स्वतः आपलें नांव काढावयाचें अशी स्वतः भोलानाथभाईंची उमेद होती. म्हणून त्यांनीं प्रथम अमदाबाद येथील डिस्ट्रिक्ट कोर्टामध्यें केवळ उमेदवारी पत्करिली व लवकरच घरींच अभ्यास करून ते मुन्सफीची परीक्षा पास झाले व लागलीच त्यांची अहमदाबाद येथेंच मुन्सफाच्या जागीं नेमणूक झाली. पुढें ते ह्याच जागेवर वाढत जाऊन शेवटीं फर्स्टक्लास सबजज्ज ह्या हुद्यावर अहमदाबाद येथें असतांनाच सरकारी नोकरींतून मोकळे झाले. गुजराथेंत व महाराष्ट्रांतही निरनिराळ्या ठिकाणीं त्यांनीं नोकरी केली. ठाण्यासही ते कांहीं काळ मुन्सफ होते. सरकारी नोकरींत असतांना कर्तव्यदक्ष, करारी, न्यायाच्या बाबतींत समतोलपणा दाखविणारे, शांतवृत्तीचे न्यायाधीश असा त्यांचा लौकिक होता.

परंतु त्यांना नोकरींत कशा बढत्या मिळाल्या व त्यांनीं आपलीं कामें कशीं चोख केलीं एवढें सांगण्याच्या हेतूनें त्यांचें चरित्र लिहावयास आम्ही सिद्ध झालों नाहीं व तसें असतें तर ह्या चरित्रपर लेखांत त्यांचा चरित्राचा समावेश होण्याची कांहीं अवश्यकताही नव्हती. तथापि नोकरी करीत असतांही आपल्या हातून होईल तितका परोपकार करावयाचा, लोकांच्या ज्ञानांत भर घालण्याचीं साधनें ज्या शाळा त्यांची संख्या वाढविण्यासाठीं खटपट करावयाची, लायब्ररी नसेल तेथें लायब्ररी स्थापण्याचा प्रयत्न करावयाचा असे त्यांचे प्रयत्न चालू होतेच. परंतु त्यांच्या चरित्राचा विचार करितां जी गोष्ट प्रथम लक्ष्यांत येते ती ही कीं, तरुणपणापासूनच ते मोठे सत्वशील वृत्तीचे गृहस्थ होते. ते पूर्वीपासून धर्मनिष्ठ गृहस्थ होते. नव्या विचारांचा, प्रागतिक धोरणाचा त्यांनीं पुढें अंगीकार केला; पण, धर्मनिष्ठा त्यांच्या ठिकाणीं पूर्णपणें मुरलेली होती. इंग्रजी शिक्षणाचा पहिला परिणाम आजूबाजूला जरी अनिष्ट असा त्यांना दिसत होता तरी त्याचा त्यांच्या

वर्तनावर अनिष्ट परिणाम झाला नव्हता. ते अगदीं कर्मठ ब्राम्हण होते. त्यांनीं रोज पार्थिव पूजा करावी, सर्व व्रतें वैकल्यें मोठ्या निष्ठेनें करावीं, शिव व शक्ति-पूजा ह्यांच्यासंबंधाचे सर्व आचार अगदीं नियमानें पाळावे व हें सर्व त्यांनीं निष्ठापूर्वक करावें. असा ज्यांचा प्रामाणिकपणें वर्तनक्रम चालला होता. त्यांच्या विचारांचें प्रतिमापूजनाचा त्याग करण्यापर्यंत परिवर्तन होईल व ते स्वतः प्रतिमापूजन हा ईश्वरोपासनेचा खरा मार्ग नव्हे असें प्रतिपादणाऱ्या संस्थेचे आद्य स्थापक व प्रवर्तक होतील असें कोणासही त्या वेळीं वाटलें नसेल. परंतु देवाची योजना व इच्छा तशी होती व त्या दिशेनें तो सर्व जुळवाजुळव करीत होता. त्यांच्या विचारांचें परिवर्तन व्हावयास जीं अनेक कारणें झालीं त्यांत Blair चीं धर्मपर व्याख्यानें ह्या पुस्तकाचें आस्थापूर्वक अध्ययन हें तात्कालिक कारण होतें. त्यांचे मित्र रणछोडलाल छोटालाल ह्यांनीं त्यांना हें पुस्तक वाचण्याची शिफारस केली; ह्या पुस्तकाचें वाचन, उदार विचारांच्या लोकांशीं त्यांचा झालेला परिचय, त्यांची स्वतःची सत्यनिष्ठा, धर्मपुस्तकांचें अध्ययन करीत असतां विवेचकबुद्धीचा त्यांनीं केलेला उपयोग ह्या सर्वांचा असा परिणाम झाला कीं, रुद्राक्षाच्या माळा घालून भस्माचे पट्टे ओढलेले, गोमुखींत हात घालून बसणारे, रोज पार्थिवपूजा करणारे, प्रतिमापूजनाचा त्याग करणारे व प्रार्थनासमाजाची स्थापना करून त्याच्या वेदीवरून अपाणिपाद, अचक्षु, अकर्ण पण ह्या सर्व अवयवांचीं कार्यें करणाऱ्या परमेश्वराची उपासना करूं लागले. त्यांनीं आपला जुना भाव एकदम सोडला नाहीं. हळु हळु त्यांच्या विचारांत परिवर्तन होऊं लागलें.

सन १८४८–४९ सालीं असें म्हणतात कीं त्यांचे मित्र रणछोडलाल छोटा-लाल व भोलानाथ भाई ह्यांनीं एक धर्मसभा नांवाची संस्था स्थापिली. ही संस्था परमहंस सभेच्या धोरणावर स्थापिली होती किंवा कसें, किंवा परमहंस सभेचा अनुभव लक्षांत घेऊन त्या प्रयत्नाचीच ही सुधारलेली आवृत्ति होती किंवा कसें हें कळण्यास आज साधनें नाहींत. ह्या संस्थेच्या सभा दर आठवड्यास भरत; येथें धर्मपर विषयांवर वादविवाद होई, व शास्त्री लोकांस ह्या ठिकाणीं आणून त्यांस भाषणें करावयास सांगत; त्याचप्रमाणें कांहीं लहान लहान पुस्तकें, भक्ति-पर जुनीं काव्यें व भक्तांचीं चरित्रें ह्या संस्थेच्या विद्यमानें प्रसिद्ध झालीं; परंतु ही असली अर्धवट सुधारणा भोलानाथभाईच्या प्रकृतीला मानवणें शक्य नव्हतें. सुमारें १० वर्षें ही संस्था चालली व नंतर प्रार्थनासमाजाची स्थापना झाली. ही स्थापना व्हावयास ब्राम्हसमाज कारण झाला किंवा कसें त्याचा पत्ता भोलानाथ

भाईच्या गुजराती चरित्रकारास लागलेला नाहीं. परंतु प्रस्तुत लेखकाचा असा पूर्ण विश्वास आहे कीं, मुंबईचा प्रार्थना समाज व आदि ब्राम्हसमाज ह्यांच्या वळणावर भोलानाथभाईनीं १८७१ सालीं प्रार्थना समाजाची स्थापना केली. ते उत्तम भक्त व कवि होते हें नंतर सर्व गुजरात प्रांताच्या लक्षांत आलें. परंतु त्यांच्या भक्तिपर कविता १८६६ सालींही झालेल्या आहेत. त्यांच्या विचारांस नवें वळण लागत असतां १८६९ सालीं ते मुंबईस आले असतां डा. आत्माराम पांडुरंग ह्यांच्या येथें प्रार्थनासमाजाच्या विद्यमानें होणाऱ्या उपासनेस ते हजर होते. त्याचप्रमाणें त्यांनीं जेव्हां १८७१ सालीं संस्था स्थापिली तेव्हां तीस प्रार्थना-समाज हें नांव दिलें. जेव्हां तत्त्वांस निश्चित स्वरूप देण्याचा वेळ आला त्यावेळीं आदि ब्राह्मसमाजाच्या तत्त्वांवर गुजराती पेहराव चढवून इकडे तिकडे थोडी सुधारणा केली. यावरून आमचा असा ग्रह झाला आहे कीं, ह्या दोन समाजा-विषयीं त्यांस माहिती होती व त्यांच्याच धोरणानें त्यांनीं अहमदाबाद समाजाची स्थापना केली. ह्याच पुस्तकांत अहमदाबाद समाजाच्या स्थापनेची जी माहिती दिली आहे तिचे वरूनही वाचकांस आतां हें कळून चुकलें आहे कीं, अहमदावाद येथील ट्रेनिंग कॉलेजमध्यें समाजाच्या उपासनांस प्रारंभ झाला. प्रथमपासूनच भोलानाथ भाईच्या कविता उपयोगांत येऊं लागल्या. भोलानाथ भाईना स्वतः गायनशास्त्राचें ज्ञान असल्यामुळें त्यांनीं प्रथमपासून उपासनेच्या वेळीं कोणतीं तरी आणि कशीं तरी पद्यें म्हणावयाचीं हा प्रकार चालू केला नाहीं. ताल सुरावर गवयानें शास्त्रोक्त पद्धतीनें तेथें पद्यें म्हणण्याचा प्रथमपासून प्रघात पडला आहे. अशा प्रकारें उपासना चालू असतां समाजाच्या तत्त्वांची भोलानाथभाईंनीं घटना केली. समाजाचें काम अशा रीतीनें चालू असतांना समाजाच्या कार्याची दिशा एकंदर बदलते कीं काय अशी भीति उत्पन्न करणारा प्रसंग १८७४ सालीं घडला. त्या वेळीं भोलानाथ भाई अध्यक्ष व सर रमणभाईंचे तीर्थरूप रा. सा. महिपतराम रूपराम हे सेक्रेटरी असतांना आर्यसमाजाचे संस्थापक स्वामी दयानंदजी अहमदाबाद येथें गेले. दयानंदांचे मार्ग भोलानाथभाई व महिपतराम भाई ह्यांस पसंत नव्हते. केवळ लोकमत अनुकूल करून घेण्यासाठीं दयानंदांनीं पत्करलेलें वेदांचें अभ्रांतत्व ह्या दोघां पुढाऱ्यांना बिलकूल मान्य नव्हतें व दयानंदजींचे डाव-पेंच त्यांस मुळींच नको होते. तथापि दयानंदजी हे धर्मसुधारकच होते. त्यांनाही प्रतिमापूजन मान्य नव्हतें. एका परमेश्वराची आराधना त्यांसही पसंत होती म्हणून ते अहमदाबाद येथें आले असतांना प्रार्थनासमाजाच्या पीठावरून त्यांस व्याख्यानें

द्यावयास त्यांनीं स्वामीजींस संधि दिली. व अहमदाबाद येथें स्वामी दयानंद यांचीं वक्तृत्वपूर्ण व्याख्यानें झालीं. त्याच वेळीं खाजगी रीतीनें समाजाचे अध्यक्ष व सेक्रेटरींना स्वामीजींनीं एक लहानशी गोष्ट सुचविली आणि ती म्हणजे अहमदाबाद समाजानें आर्यसमाज हें नांव घेणें ही होय ! भोलानाथ भाईनीं ह्याचा शांतपणें विचार करण्याचें अभिवचन दिलें व सर्व रात्र त्यांनीं खरोखरच विचारांत घालविली व अखेरीस तसें होणें शक्य नाहीं असें ह्या दोघांनीं ठरविलें.* त्यानंतर स्वामीजींनीं अहमदाबाद येथें आर्यसमाज स्थापण्याचा प्रयत्न केला, पण त्या वेळीं तरी हें बीं तेथें रुजलें नाहीं. त्याला सुपीक जमीन स्वामीजींस पंजाबांतच सांपडली. स्वामी दयानंदांविषयीं रा. ब. रानडे यांचा आदर असे. त्यामुळें १८८१ सालीं त्यांनीं आर्यसमाज व प्रार्थनासमाज ह्यांच्यामधील भेदभाव नाहींसा होणें शक्य आहे किंवा कसें तें पाहिलें. पण वेदांचें अभ्रांतत्त्व हें तत्त्व आर्यसमाज सोडण्यास व आर्यसमाजाचें तत्त्व पत्करण्यास प्रार्थनासमाज जोंपर्यंत तयार नाहीं तोंपर्यंत भेदभाव नष्ट होण्याच्या गोष्टी व्यर्थ होत हें भोलानाथभाई १८८१ सालीं मुंबईस आले असतांना पुन्हां एकदां त्यांच्या लक्षांत आलें. असो.

१८७७ सालीं प्रार्थनासमाजाचीं तत्त्वें कांहींशीं प्रचारांत आणण्याचा प्रयत्न भोलानाथ भाईनीं करविला. म्हणजे ( १ ) आजारी नसलों तर मी रोज प्रार्थना करीन. ( २ ) सर्व व्यवहारांत नीतीच्या तत्त्वांस अनुसरून वागेन. ( ३ ) रोजच्या उपासनेच्या वेळीं मूर्ति अगर असाच पदार्थ ह्यांचा आश्रय मी करणार नाहीं व ( ४ ) कोणाही मध्यस्थावर मी विश्वास ठेवणार नाहीं. ही सूचना लालशंकर भाईना पुढें करून सर्वांपुढें ठेवण्यांत आली. वास्तविक पहातां ह्या चारही कलमांत पळवाटा पुष्कळ आहेत व अनुष्ठानाच्या दृष्टीनें हीं कलमें दुबळीं आहेत. उपासनेच्या वेळीं मात्र प्रतिमापूजन मी करणार नाहीं असें म्हटलें व एवढीच प्रतिज्ञा

---

*ह्यावेळीं भोलानाथ भाईनीं स्वामीजींना सांगितलें " स्वामीजी ! आप वेदको ईश्वरप्रणीत बतानेका प्रयत्न करते हो, सो बुद्धिमान लोकके सामने तो व्यर्थ है ।" त्यावर दयानंदजी म्हणाले, " ए सब बात तो सच है, परंतु भोलानाथजी, ऐसे समजाये सिवाय सब लोक अपनी संग कैसे आनेवाले ? " यावर गुजराथी चरित्रकार लिहितात *" आथी धार्मिक सत्यने गौण गणनार समाजमा निमग्न थवानी* अनिष्ट दशामांथी प्रार्थनासमाज बची, ए ईश्वरनो आभार मानवानी वात छे. "

—पृ. ११८

केली म्हणजे इतर वेळीं मला हरकत असूं नये. अर्थात् सर्व विधि जुन्या रीतीनें करावयास हरकत नाहीं असें यावरून होतें आणि आजही अहमदाबाद येथें असाच अर्थ प्रचारांत आहे ! परंतु ही सूचना पुढें येतांच बरीच चळवळ उडाली. कांहीं मंडळीची समाजासंबंधाची सहानुभूति कमी झाली ! भोलानाथ भाईनीं मात्र जणूं काय आपलें सर्व लक्ष त्याच चळवळींत घातलें होतें. ते उत्तम कवि होते. त्यांनीं उत्तम अभंग व प्रार्थना रचून अहमदाबाद समाजाची व एकंदर गुर्जर समाजाची जी सेवा बजाविली आहे तिचें मोल केव्हांही होणें शक्य नाहीं. भोलानाथ भाई हे मंदिरांत उपासनेसाठीं आले म्हणजे एकंदर उपासनेला असें गांभिर्य प्राप्त होत असे कीं, सर्वांचें लक्ष त्यांच्याकडे गेल्यावांचून रहात नसे. त्यांची शांतवृत्ति, त्यांची आस्था व त्यांचा विश्वास त्यांच्या चर्येवर स्पष्ट उमटलेला दिसे. आणि ते उपासना चालवूं लागले म्हणजे एक अधिकारी पुरुष उपासना चालवीत आहे याची जाणीव तात्काल झाल्यावांचून रहात नसे. ते केवळ अहमदाबाद येथेंच स्वस्थ बसून राहिले नाहींत.त्या वेळीं गुजराथेंत कित्येक ठिकाणीं समाजांची स्थापना झालेली होती. तेथें त्यांनीं वारंवार जाऊन व्याख्यानें द्यावीं. पदांचीं व प्रार्थनांचीं पुस्तकें त्यांनीं समाजालाच देऊन टाकिलीं होतीं. जो कांहीं फायदा होईल तो समाजालाच मिळावा अशी त्यांची दृष्टि असे. महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर, ब्रह्मानंद केशवचंद्र सेन, बाबू प्रतापचंद्र मुझुमदार व पंडित शिवनाथ शास्त्री ह्यांच्या सहवासाचा लाभ झाल्यामुळें ह्यांच्यांतील धर्मभाव, त्यांची आस्था व त्यांचे उपदेश यांचा त्यांचे मनावर अत्यंत परिणाम झालेला होता. एके काळीं त्यांचा कल केशव बाबूंकडे बराच वळलाही होता. १८७७ सालीं ते कलकत्त्यास गेले होते. त्या वेळीं केशव बाबूंचे उपदेश व त्यांच्या प्रार्थना ह्यांचा त्यांचे मनावर इतका परिणाम झाला कीं, त्यानंतर कुचबिहार विवाह प्रकरण जेव्हां उपस्थित झालें त्या वेळीं साधारण ब्राह्मसमाजानें समाजाचें मत विचारिलें असतां जरी समाजानें तिऱ्हाईतपणाचें धोरण स्वीकारिलें तरी स्वतः भोलानाथ भाईंचा कल केशव बाबूंकडेच होऊं पहात होता. पुढें केशव बाबूंचे निरनिराळ्या विधींना नवविधानी स्वरूप देण्याचे जे प्रयत्न झाले त्या वेळींही त्यांच्या चित्तवृत्तींत थोडी चलबिचल झाली होती, पण थोडक्याच वेळांत त्यांस आपली चूक लक्ष्यांत आली. त्यांचा प्रार्थनेवर उत्कट विश्वास होता. आणि ह्या बाबतींत प्रतापचंद्र मुझुमदार ह्यांच्या सहवासाचा त्यांच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला होता. प्रताप बाबू दोन तीन वेळां अहमदाबाद येथें गेले, त्या वेळीं ते भोलानाथ भाईंच्या येथेंच उतरत

असत. त्यांच्या कुटुंबामध्यें त्यांनीं चालविलेल्या उपासना, त्या वेळच्या त्यांनीं केलेल्या प्रार्थना ह्यांचा भोलानाथ भाईंच्या मनावर झालेला परिणाम ते मृत्यु-शय्येवर पडलेले असतांनाही नाहींसा झाला नाहीं. त्यांच्या अखेरच्या आजारी-पणांत कर्मधर्मसंयोगानें प्रतापबाबू अहमदाबाद येथेंच होते. त्या वेळीं भोलानाथ भाईंनीं प्रताप बाबूंना वारंवार आपल्या सन्निध बोलावून प्रार्थना करावयास सांगावें व सर्व मंडळींना सन्निध बोलावून त्यांच्या प्रार्थनेचा लाभ स्वतःबरोबर घ्यावयास लावावें. ह्या काळास उद्देशून प्रतापचंद्र लिहितातः—

Lying on his last bed of illness when I was with him in April (1886) he repeatedly requested me to offer prayer at his bedside and devoutly joined in the services held. His son who was attending upon him sang the hymns so well known, he had composed and altogether the dying man seemed to be at peace with God and with man."

अहमदाबाद समाजाच्या इतिहासांत त्याचप्रमाणें भोलानाथभाईंच्या चरित्रां-तील एका महत्त्वाच्या गोष्टीचा येथें उल्लेख केला पाहिजे. बाबू सत्येंद्रनाथ अह-मदाबाद येथें बरींच वर्षें होते हें आपल्याला माहीत आहे. त्यामुळें भोलानाथ भाई ज्या वेळीं कलकत्ता येथें गेले त्या वेळीं महर्षींच्या सहवासाचा त्यांस लाभ झाला व महर्षींच्या आध्यात्मिक जीवनाचा अत्यंत इष्ट असा परिणाम भोलानाथ भाईंच्या जीवनावर झाला. १८८६ सालीं प्रारंभीं महर्षि देवेंद्रनाथ अहमदाबाद येथें आले असतां त्यांनीं आपल्या सहवासाचा व आपल्या आध्यात्मिक अनुभ-वाचा अहमदाबाद समाजाला लाभ दिला ही अहमदाबाद समाजाच्या इतिहासां-तील महत्त्वाची गोष्ट होय. त्या वेळीं महर्षींचें वय ७० वर्षांचें होतें. तरीसुद्धां त्या उपासनेच्या वेळीं त्यांनीं जो उपदेश केला तो इतका सुस्पष्ट, इतका उदात्त व गंभीर विचारांनीं भरलेला होता कीं त्याचा सर्वांच्या व विशेषतः भोलानाथ भाई व महिपतराम भाई ह्यांच्या मनावर अत्यंत इष्ट असा परिणाम झाला. एकाच वेदीवर हे दोघे वृद्ध गृहस्थ त्या वेळीं बसले होते व महर्षींच्या मुखांतून निघणारा प्रत्येक शब्द त्यांचे मनावर कायमचा परिणाम करीत होता. त्या वेळीं जे कोणी हजर होते त्यांस ह्या उपासनेचा व त्या वेळच्या दृश्याचा केव्हांही विसर पडला नाहीं.

पण ते अप्रसिद्ध आहेत. अशा प्रकारें स्त्रियांचें शिक्षण, स्त्रियांची एकंदर उन्नति, बालविवाहनिषेध, प्रौढविवाह, वगैरे सर्व बाबतींत त्यांचे विचार प्रागतिक होते. न्या. मू. रानडे ह्यांच्या विचारांप्रमाणेंच ह्यांचे विचार असत. परंतु एका बाबतींत न्यायमूर्तींच्या पुढें हे गेले होते. १८८१ सालीं रा. ब. रानडे ह्यांनीं आर्यसमाज व प्रार्थनासमाज ह्यांच्या एकीकरणाची चळवळ मुंबईस केली होती. त्यावेळीं सभेमध्यें भरपूर वादविवाद झाल्यावर माधवरावांनीं संध्याकाळच्या उपासनेंतही हा विषय आणिला होता. परंतु सर्व वादविवाद व उपदेश ऐकून भोलानाथभाई रानड्यांच्या मतांस अनुकूल झाले नाहींत व मुंबईच्या इतर सभासदांसही ही कल्पना मुळींच पसंत पडली नाहीं, असें भोलानाथभाईंनीं आपल्या रोजनिशींत लिहून ठेविलें आहे.

अशा प्रकारें सर्व प्रकारच्या उन्नतीस व सुधारणेस त्यांची वृत्ति जरी अनुकूल होती तरी धर्मसुधारणेकडे त्यांचें लक्ष विशेष होतें ह्याविषयी कांहीं संशय नाहीं; व ह्याची साक्ष त्यांच्या अभंगांच्या द्वारें उत्तम प्रकारें पटते. त्यांचे अभंग भक्तिपर, परीक्षणपर व उपदेशपर आहेत. त्यांचे दोन अभंग येथें घेतों:—

नहिं गंगास्नाने, नहिं जलपाने । नहिं व्रत दाने, पाप जाय ॥
मन मलिनता शुद्ध कीधा विना । ध्यान उपासना सर्व वृथा ॥
वृथा सर्व तीर्थ वृथा सर्व तप । वृथा सर्व जप कर्म वृथा ॥
घरदार छोडी जाय वनवास । आपी अतित्रास कुटुंबने

———o———

साधु बनवाने बदले छे वेश । नहि ए उद्देश ईश्वरनो ।
हस्तपादादितां मळ्यां छे साधन । जीवनोपार्जन करवाने ॥
साचा साधुजन न तजे संसार । करे व्यवहार यथा शास्त्र ॥
विहित विधिथी भोगवीने भोग । करे छे उद्योग सत्कर्मनो ॥
परम प्रभुना पाळीने विधान । करे छे कल्याण लोकनुं ते ॥
धन्य एवा साधु पुरुषनो जन्म । करे शुभ कर्म निष्काम थी ॥
प्रभु मने प्रेरो एवां शुभ कर्म । न धरूं अधर्मपंथे पाय ॥

अशा प्रकारें सेवा करीत असतां, भोलानाथभाई १८८६ च्या प्रारंभीं महर्षींनीं चालविलेली उपासना अनुभवल्यानंतर पुढल्याच महिन्यांत आजारी झाले व मध्यंतरीं जरी त्यांस थोडा आराम वाटूं लागला होता तरी त्यांची प्रकृति

घातक रूढींनीं आमच्या मनांवर इतका जबर पगडा बसविलेला आहे कीं, आम्ही आपल्या हिताहिताचा विचार न करितां, अनेक रूढींचे दास झालों आहों. विवेक आणि प्रत्यक्ष धर्माज्ञा ह्यांच्या विरुद्ध जरी रूढि असली, तरी ती प्रचलित आहे, जनसमूहास मान्य आहे, एवढयाच सबबीवर आम्हांस तिचा त्याग करितां येत नाहीं, हें पाहून ज्यांच्या ठिकाणीं विवेक विशेष प्रमाणानें जागृत झाला, रूढीस बळी पडून आपण आपल्या उन्नतीस अवरोध करीत आहों असें ज्यांच्या लक्षांत आलें, व कित्येक घातक रूढींचा त्याग केल्यावांचून अनेक बाबतींत आपल्या समाजाचें पाऊल पुढें पडणें शक्य नाहीं अस ज्यांना वाटलें त्यांनीं त्या चालीं-विरुद्ध समाजामध्यें जागृति करण्याचे प्रयत्न सुरू केले. त्या प्रयत्नांचा ज्यांच्या मनावर इष्ट परिणाम झाला, व ज्यांनीं आपली पाळी येतांच कायावाचामनेंकरून घातक रूढींच्या विरुद्ध चळवळ केली त्यांत डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांची प्रमुखत्वानें गणना होत असे. डॉ. भांडारकरांनीं सामाजिक सुधारणेच्या बाबतींत जें कांहीं कार्य केलें, त्यांना जो त्रास झाला, सत्यासाठीं, न्यायासाठीं, नीतीसाठीं ते भांडत असतांना त्यांचा जो छळ झाला त्याची वाचकांस कल्पना करून देण्या-पूर्वी, सामाजिक सुधारणांतर्गत अनेक विषयांविषयींचे त्यांचे विचार संकलितपणें वाचकांपुढें ठेवणें जरूर आहे. म्हणजे मग त्या विचारांस अनुसरून त्यांचें आचरण कसें झालें, आपलें जें उच्च ध्येय तें राखण्यासाठीं त्यांनीं कसे श्रम केले, जें जें त्यांनीं केलें तें तें फलाशेनें कसें केलें नाहीं तें कळावयास बरें पडेल. म्हणून त्यांच्या कित्येक व्याख्यानांमध्यें व लेखांत त्यांनीं जे विचार प्रदर्शित केले आहेत त्यांच्या आधारें अनेक विषयांवरील त्यांचे विचार आम्ही येथें सादर करितों.

## स्त्रीशिक्षण.

सामाजिक सुधारणा हा विषय विचारासाठीं पुढें घेतला कीं, स्त्रीशिक्षण ह्या विषयाकडेच प्रथम लक्ष द्यावें लागतें; कारण, ह्या विषयाचें महत्त्वच तसें आहे. आम्हां पुरुषांना कितीही शिक्षण मिळालें, आमचे विचार कितीही उदार झाले, अनेक अन्यायमूलक, अनीतिप्रवर्तक रूढींचा आम्हांला अतिशय तिटकारा आला, तरी जोंपर्यंत स्त्रियांचीं मनें सुसंस्कृत झालेलीं नाहींत, त्यांच्या ठिकाणीं हा तिटकारा उत्पन्न झालेला नाहीं, अनेक रूढींचे हानिकर परिणाम पाहून त्यांच्या ठिकाणीं त्वेष उत्पन्न होत नाहीं, तोंपर्यंत आमचे सर्व प्रयत्न, आमच्या सभा, आमचे वादविवाद, आमचे ठराव, आमचा त्वेष सर्व कांहीं व्यर्थ आहे. परंतु

" आपल्या देशांत शिक्षणविषयक, नीतिपर, धर्मविषयक उन्नतीचीं जीं साधनें, किंवा मार्ग आहेत, त्यांतील अर्धा भाग आम्ही अगदीं निरुपयोगी करून ठेविला आहे. आमच्या स्त्रियांना जर शिक्षण देण्यांत येईल, त्यांचीं मनें जर संस्कृत करण्यांत येतील, तर आपल्या देशाची सर्व प्रकारची उन्नति करितांना त्यांचें पुष्कळच साह्य होईल. अशा स्त्रिया पुढल्या पिढीचें शिक्षण उत्तम प्रकारें करून पुढील पिढीला आपल्या अनेक प्रकारच्या कर्तव्यांची ओळख पटवून तीं चांगल्या रीतीनें पार पाडण्याची योग्यता त्या त्या पिढींत आणितील आणि अशा स्त्रियांचे ठिकाणीं स्वभावतःच असलेल्या व शिक्षणामुळें विकसित झालेल्या सद्गुणांचा बहुजनसमाजावर सुपरिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं." आज जरी आमच्या समाजाचा हा अर्धा भाग आम्ही निरुपयोगी करून ठेविला आहे तरी हीच स्थिति हिंदुस्थानांत नेहमीं नव्हती. 'पुरातनकाळचें आमचें सामाजिक ध्येय किंवा उद्दिष्ट श्रेष्ठ व विवेकास पटण्यासारखें होतें.' "अगदीं जुन्या काळचा जरी विचार केला, तरी त्या वेळचें जें अति श्रेष्ठ शिक्षण त्याचा त्यांस लाभ होऊं नये अशी कांहीं त्यावेळीं व्यवस्था नव्हती."[1] आज ऋग्वेदी ब्राह्मण रोज गुरूंची नामावली म्हणतांना तीन स्त्रियांचीं नांवें घेत असतो. म्हणजे गार्गी, वाचक्नवी, सुलभामैत्रेयी, व वडवा प्रातिथेई ह्या त्यांच्या काळीं शिक्षकवर्गामध्यें मोडत असून त्यांचें नांव अजरामर होण्याइतक्या विद्वान् होत्या. पुराणांमध्यें तर सर्व मुलींना इतर शिक्षणाबरोबर गायनवादननर्तन ह्या विषयांचेंही शिक्षण मिळत असे. पुरुषांच्या समाजामध्यें त्या स्वतंत्रपणें वावरत व अनेक मोठमोठ्या बिकट विषयांवर त्या पुरुषांशीं वादविवादही करीत असें म्हटलें आहे.[2]

बौद्धधर्मीय ग्रंथांचें अवलोकन केल्यास आपल्याला असें आढळून येईल कीं, ज्या प्रकारच्या उद्योगामध्यें स्वतः श्रीगौतम बुद्ध गुंतले होते त्यामध्यें त्यांस स्त्रियांचें भरपूर साह्य असे.[3] व नीति, सद्गुण, कर्तव्य,

1 The social ideal was much higher and more national in ancient times......There is no question that in the very olden times, they ( women ) were not debarred from the highest education.

2 Women are represented as mixing freely with men and taking part in conversation on the highest subjects.

३ बुद्धाच्या काळीं त्यांस स्त्रियांकडून किती साह्य होत असे व त्यांची मानमान्यता किती राखण्यांत येत असे त्याची माहिती Social History of India ह्या लेखामध्यें डा. भांडारकरांनीं दिली आहे ती जिज्ञासूंनीं अवश्य पहावी.

निर्वाण वगैरे महत्त्वाच्या विषयांवर त्या त्यांच्याशीं वादविवाद करीत असत. पुढें पुढें स्त्रिया मागें पडल्या व ज्या काळीं नाट्य ग्रंथ प्रचारांत आले त्या काळीं तरी सर्व स्त्रिया संस्कृत शिकत नसत असं वाटतें. तरी पण एवढयावरून त्या अक्षरशत्रु असत असें मात्र नव्हे, तर त्या त्या वेळच्या ज्या प्रचलित भाषा त्यांतील ग्रंथांशीं त्यांचा चांगला परिचय झालेला असे व कित्येक स्वतः कविताही रचीत असत. अगदीं अकराव्या शतकापर्यंत जरी आपण आलों तरी असें आढळतें कीं, त्या काळपर्यंतही स्त्रियांना अनेक कला शिकविण्यांत येत असत. एका राजकन्येनें मोठमोठ्या सरदारांच्या सभेमध्यें एक पद्य उत्तम रीतीनें म्हटल्याबद्दल सर्वांनीं तिची स्तुति केल्याचा व तिच्या पतीनें तीस कांहीं जमीन इनाम करून दिल्याचा उल्लेख जो एका ताम्रपटामध्यें आढळतो त्याचेवरून असें उघड दिसतें कीं, उच्च कुलांतील स्त्रियांच्या गोषाला त्या कालींही प्रारंभ झालेला नव्हता[1]. स्त्रियांचें अज्ञान व त्यांस पडद्यांत वगैरे ठेवणें ह्यांस ह्या कालानंतर प्रारंभ झाला असून मुसलमानी अमदानींत हा प्रघात विशेष प्रमाणानें पडला असला पाहिजे.[2]

हिंदु समाजांतील स्त्रियांची पूर्वकालीं ही अशा प्रकारची स्थिति होती. आणि आज अर्ध्या समाजाला समाजाच्या उद्धाराच्या कामीं आम्हीं बहुतेक निकामी करून ठेविलें आहे. म्हणून त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था होणें फार अगत्याचें आहे. पण, त्यांना शिक्षण जें द्यावयाचें तें सर्व प्रकारें पुरुषांसारखेंच असावें काय? ह्या प्रश्नाचा अद्यापपर्यंत आमच्या हिंदुसमाजानें निकाल लाविलेला नाहीं. स्वतः डॉ. भांडारकरांच्या कुटुंबामध्यें स्त्रियांच्या उच्चप्रकारच्या शिक्षणास प्राधान्य मिळालेलें सर्वांस श्रुत आहे. त्यांच्या चार नाती बी. ए. असून एक एम्. ए. आहे व ती इंदुर येथें अहल्याश्रमामध्यें स्त्रीशिक्षणाचेंच कार्य करीत आहे. त्यांनीं एकदां असें म्हटलें आहे कीं "व्यावहारिक दृष्टीनें पाहिलें असतां ही १६ वर्षांची मर्यादा ( मुलींच्या लग्नाची ) १८

---

१ मद्रास येथें १८९४ सालीं ' मद्रास हिंदु सोशल रिफार्म अॅसोसिएशन'च्या तर्फें झालेलें भाषण पहा.

2 The seclusion of women and their ignorance is a custom that was introduced in later times, and the Mussalman domination contributed to render it very rigid.

वर्षांपर्यंत वाढविली पाहिजे. कारण, १६ वर्षांमध्यें मुलींचा व्हावा तितका विद्याभ्यास होत नाहीं.''[1] १८९५ सालीं, त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, "स्त्रियांना एम्. ए. पर्यंतचा अभ्यास करूं देणें इष्ट आहे कीं नाहीं, हा जरी वादग्रस्त प्रश्न असला, तरी हायस्कुलांतील त्यांचा सर्व शिक्षणक्रम होणें इष्ट आहे. मग ज्यांना पुढील शिक्षणाचा लाभ घेणें असेल व ज्यांना सर्व शिक्षणक्रमाची आवश्यकता वाटत नसेल त्यांनीं आपापल्या आवडीच्या विषयाचा पाहिजे तर अभ्यास करावा. ''[2]

स्त्रीशिक्षणासंबंधानें त्यांनीं अगदीं अलीकडे काढिलेले उद्गार म्हणजे ता. १५ जून १९१९ रोजीं महिला विद्यापिठाचे चॅन्सलर ह्या नात्यानें पहिल्या पदवीदान प्रसंगीं त्यांनीं केलेलें भाषण होय. त्यावेळीं ते म्हणालेः—

स्त्रियांना प्रथमतःच पदवी देण्याचा आपला उपक्रम व स्त्रियांच्या अंगीं असलेल्या उच्च बौद्धिक प्रवृत्तीचें प्रकटीभवन या दोन्ही गोष्टी समकालीनच आहेत. ज्या भयंकर महायुद्धांतून आपण नुकतेच पार पडलों त्या युद्धाच्या अनेक हितावह परिणामांपैकींच हें एक फळ आहे. आपल्या साम्राज्याचा नाश होऊं द्यावा किंवा तत्संरक्षणार्थ खांद्यावर बंदूक घेऊन शत्रूशीं लढावें असा प्रश्न इंग्लंडच्या जनतेपुढें उभा राहिला, तेव्हां जर इंग्लंडांतील सर्वच पुरुष समरांगणावर गेले तर युद्धोपयोगी दारूगोळा वगैरे सामान पाठीमागें कोणीं करावें अशी मोठी अडचण उद्भवली, त्या वेळीं इंग्लंडांतील स्त्रीवर्ग त्यांच्या मदतीस धांवून आला व त्यानें ती जोखीम पत्करून उत्पन्न झालेली काळजी दूर केली. अंगीकृत कार्य इंग्लंडांतील स्त्रीवर्गानें किती चोख बजावलें याचा परिपूर्ण अनुभव आल्यावरच आतां इंग्लंडांतील स्त्रियांना व्यापारधंद्यांत पुरुषांच्या बरोबरीनें कामकाज करण्याचा अधिकार मिळून त्या आतां पुरुषवर्गाच्या बरोबरीनेंच वेतन व मुशाहिरा मागण्यास पात्र झाल्या आहेत. पौर्वात्य राष्ट्रांतील स्त्रियांपेक्षां पाश्चात्य राष्ट्रांतील स्त्रियांना अधिक सन्मानानें वागविण्यांत येत असे हें जरी खरें आहे, तथापि धनोत्पादक उद्योगधंद्यांच्या बाबतींत त्यांना पुरुषांपेक्षां

---

१ मनोरंजन—दिवाळीचा अंक.

२ ह्याच धोरणास अनुसरून प. वा. सौ. शांताबाई पाणंदीकर, डा. भांडारकरांची ज्येष्ठ कन्या, ह्यांना अभ्यासक्रम झाला होता.

कमी योग्यतेच्या असेंच मानण्यांत येत असे. दाक्षिण्य हा जो पाश्चात्य स्त्रियांचा विशिष्ट हक्क तोच या त्यांच्या कमीपणाचा अंशतः निदर्शक आहे. पौर्वात्य राष्ट्रांत स्वतंत्र व्यक्ति या दृष्टीनें स्त्रियांना मान नसून त्यांच्या अंगच्या गुणांचा उपयोग काय तो गृहकृत्यांतच करून घेण्यांत येतो. भगवद्गीतेंत ज्ञानी मनुष्यास मुक्तीचा जो मार्ग उपदेशिला आहे तोच मार्ग स्त्रियांनाही सांगितला आहे. साहित्यशास्त्रांत स्त्रियांच्या नैपुण्याबद्दलचे कित्येक उल्लेख आहेत. चिंताग्रस्त स्थितींत स्त्रीसारखा दुसरा मित्र नाहीं, रुग्णावस्थेंत मातेप्रमाणें, धर्मसंबंधीं ज्ञानांत पित्याप्रमाणें त्या उपयोगीं पडतात. नाटकांत सूत्रधाराची सर्व मदार आपल्या स्त्रीवर म्हणजे नटी-वर अवलंबून असते, असें दाखविलेलें आहे. सारांश, कल्पकतेची खाण, संस्थेस चिरस्थायिकत्व आणण्याची पात्रता व आपलें घराणें ऊर्जितावस्थेस नेण्याची दूरदृष्टि इत्यादि अनेक गुणगण भारतीय स्त्रियांच्या अंगीं असल्याचा पूर्वापर लौकिक आहे. हा लौकिक कायम राखण्याचें धोरण या विद्यापीठाच्या पद-वीधर विद्यार्थिनींनीं पुढें कायम ठेवावें. स्त्रियांच्या ठिकाणीं गुप्त रीतीनें वसत असलेले हे बिनमोल गुण त्यांनीं समाजहिताभिवृद्ध्यर्थ प्रसंग पडेल तेव्हां प्रगट केले तरच त्यांच्या शिक्षणाचें त्यांनीं चीज करून दाखविलें असें म्हणतां येईल.

या विद्यापीठांत भारतीय धर्तीवरच स्त्रियांना शिक्षण देण्यांत यावें. कांहीं विशिष्ट विषयांसंबंधानें पाश्चात्य धोरणाचा अंगीकार करावा लागेल; परंतु तो तेवढ्या-पुरताच असावा. युनिव्हर्सिटीचा जीवनक्रम व घरगुती जीवनक्रम यांची ताटातूट व फारकत होऊं नये. घरगुती जीवनक्रम हिंदु धर्तीचा असावा. आपल्या मुलां-बाळांचें संरक्षण व संवर्धन करण्याचें काम आयांवर किंवा दायांवर सोंपवूं नये. आपल्या मुलांच्या शिक्षणाचें काम या पदवीधर स्त्रियांनीं आपल्या स्वतःच्या अंगावरच घ्यावें. आपण या विद्यापीठाची कल्पना जपानी विद्यापीठावरून घेतली आहे. तेव्हां गेल्या साठ वर्षांत जपानी लोकांनीं या पीठाच्या निरनिराळ्या अंगांत कसकशी सुधारणा केली आहे त्याचें निरीक्षण करणें जरूर आहे. ५०।६० वर्षां-पूर्वी जपान हें एक क्षुल्लक राष्ट्र होतें; परंतु आज साऱ्या जगाची भवितव्यता ठरविणाऱ्या राष्ट्रपंचकापैकीं तें एक घटकावयव होऊन बसलें आहे. आपली उन्नति करून घेण्यासाठीं जपाननें पहिली जी गोष्ट केली ती ही कीं, एकवटलेली राज-सत्ता एकाच खंबीर व्यक्तीच्या म्हणजे मिकॅडोच्या हातीं दिली. आमच्याप्रमाणेंच जपानांतही जातिवैमनस्य होतें; परंतु लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशीं तें पार लयास गेलें. अशा प्रकारें विस्कळीत जपान संघटित सुराष्ट्र बनलें. शेकडों जपानी

पुढारी इंग्लंड, अमेरिका इत्यादि सुधारलेल्या पाश्चात्य राष्ट्रांत गेले व तेथील मुख्य मुख्य ठिकाणीं कांहीं काल राहून पाश्चात्य आधिभौतिक शास्त्रें, विद्या, कला, रीतिभाति, संस्था, राजनीति इत्यादिकांचें त्यांनीं सूक्ष्म निरीक्षण व अध्ययन केलें. तीं शास्त्रें व त्या कला आपल्या लोकांना शिकविण्यासाठीं त्यांनीं आरंभीं इंग्लिश, फ्रेंच, जर्मन इत्यादि तज्ज्ञांची नेमणूक केली. जपानी लोक शिकून जसजसे तरबेज होत चालले तसतसे ते युरोपियन लोकांना कामावरून दूर करूं लागले. निस्सीम स्वार्थत्याग, विमुक्तता, व पुराणप्रियत्वोत्सर्ग इत्यादि गुणांनीं जपान हें बलाढ्य राष्ट्र बनलें. हें जपानचें उदाहरण आपण आपल्या दृष्टीसमोर ठेविलें पाहिजे. ब्रिटिश साम्राज्य बनविणाऱ्या घटकावयवांच्या योग्यतेस आपलें राष्ट्र चढवावें असें जर तुह्मांला अंतःकरणपूर्वक वाटत असेल तर विशेषतः स्वार्थत्याग व इतरांशीं न्यायानें वागणें या गोष्टी आपण शिकणें अत्यंत जरूर व इष्ट आहे.

## जातिनिर्बंध व जागृति.

हिंदु समाजामध्यें जितके व ज्या प्रकारचे जातिनिर्बंध आहेत तितके व त्या प्रकारचे दुसऱ्या कोणत्याही एका देशांत नाहींत असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. मागें मुंबई शहरांत रा. रा. शामराव विठ्ठल ह्यांच्या अध्यक्षतेखालीं जी प्रांतिक सामाजिक परिषद् भरली होती त्या वेळीं प. वा. मार्कंडराय मेहता ह्या वकिलांनीं असे उद्गार काढिले कीं, गुजराथेंत एका विशिष्ट जातीचे भेद, पोटभेद, पोटभेदांचे अनेक पोटभेद होतां होतां आतां एक कुटुंब म्हणजे एक जात झालेली आहे! अशा प्रकारें आमच्या समाजाच्या ज्या चिंधड्या होत आहेत त्यांस मुळामध्यें काय आधार आहे म्हणून पहूं जातां 'पुरातन कालीं जातिभेद प्रचलित नव्हता; हा भेद फारतर वैदिक कालाच्या अखेरीस सुरू झाला असावा,'* असा पुरावा सांपडतो. आपलाच धंदा आपल्या मुलानें चालवावा अशी इच्छा आपणाला असणें हें अगदीं साहजिक आहे. आणि ह्यामुळेंच जातिभेद उत्पन्न झाला असें डा. भांडारकरांचें मत होतें. कांहीं माणसें नवीन ऋचा तयार करण्यांत अगदीं पारंगत असत. जे कोणी अशा ऋचा तयार

---

* In the very early times the system of caste did not prevail and it seems to have developed about the end of the Vedic period.

करीत व गात त्यांजवर व ज्या राजांसाठीं त्या रचल्या जात त्यांचेवर देवीची कृपा असे असा समज होता. अशा ह्या लोकांना जिकडून तिकडून आमंत्रणें येत. त्यामुळें त्यांचा तो धंदाच बनला व तोच धंदा चालविणारांची पुढें ब्राह्मण ही जात झाली. त्याचप्रमाणें राजे, राजपुत्र, सरदार वगैरे लढायांमध्यें वंशपरंपरेनें तोच धंदा चालवूं लागल्यामुळें क्षत्रिय बनले. शेती करणारे वैश्य झाले. जेव्हां आपणास आर्य म्हणविणारी जात पंजाब सोडून उत्तर हिंदुस्थानाकडे गेली, तेव्हां तेथील मूळच्या ज्या जाति त्यांची आर्य जातींत भेसळ झाली व ह्या भेसळ जातीला शूद्र मानिलें गेलें. परंतु अशा प्रकारें चार मुख्य जाती जरी बनल्या तरी त्यांच्या संबंधाचे उच्चनीचपणाचे नियम आजच्यासारखे त्यावेळीं खात्रीनें नव्हते. ब्राह्मणांचा क्षत्रिय व वैश्यांशीं रोटीव्यवहार होत असे व त्यांत कांहींही कमीपणा मानला जात नसे. उच्च जातींतील पुरुषांचा खालच्या जातींतील मुलींशीं संबंध ज्याप्रमाणें होत असे त्याचप्रमाणें खालच्या जातींचा मुलगा व वरच्या जातीची मुलगी यांचा शरीरसंबंध झालेलीं उदाहरणें पुष्कळ आहेत; परंतु आतां काय स्थानभेद, देशभेद, प्रांतभेद खाण्यापिण्यांतील भेद, उद्योगधंद्यांतील भेद, पोषाखांतील भेद ह्यांच्यामुळें निरनिराळ्या जाति झाल्या असून जेथें पूर्वी चार जाती होत्या तेथें आतां चार हजार जाती झाल्या आहेत आणि ह्यांच्यांत परस्पर रोटी व बेटीव्यवहार होण्याचें नांव घेणें नको ! ह्या सहस्र भेदांमुळें आम्ही आमच्या घातास कारणीभूत होत आहों ह्याची आमच्या ठिकाणीं जागृति नाहीं. अविचारामुळें जे अन्यायमूलक प्रचार आमच्यांत आले आहेत त्यांच्याविषयीं कित्येक शतकेंपर्यंत आमच्या ठिकाणीं तिरस्कार उत्पन्न झाला नाहीं. कोणत्याही कारणामुळें कां होईना, आम्ही आमच्या स्त्रियांना जीवंतपणीं जाळूं लागलों, बालविधवांचें वपन करून त्यांच्या सर्व आयुष्याचें मातेरें करून टाकूं लागलों, मुली जन्मास येतांच त्यांचा प्राणघात होऊं लागला, तरी आम्ही हे सर्व प्रकार धर्माच्या नांवावर खुशाल चालूं दिले. आमच्या ठिकाणीं कोणत्याही प्रकारचा त्वेष उत्पन्न झाला नाहीं कीं, आमचें अंतःकरण हें जीवंत माणसांचे बळी घेतलेले पाहून भडभडून आलें नाहीं, किंवा हा सर्व अन्यायाचा, अनीतीचा प्रकार पाहून आम्ही आमच्या भगिनींच्या तर्फे भांडावयास धावलों नाहीं. इतकेंच नाहीं, तर हे सर्व प्रकार रूढीस मान्य आहेत म्हणून सर्वमान्य झाले. रूढी हा आमचा प्रत्यक्ष देव असल्यामुळें ह्या आमच्या देवास संतुष्ट राखण्यासाठीं ह्या अमानुष प्रकारांवर धर्माज्ञांचेंही आवरण

घालण्यांत आलें !* आजपर्यंत रूढीचे आम्ही पूर्णपणें गुलाम झालों, पण आतां शिक्षणाचा इतका प्रसार झाला आहे, तरी आम्ही हेच प्रकार चालूं देणार काय ? जर हेच सर्व प्रकार आम्हीं ह्यापुढेंही चालू दिले तर आमचें तें सर्व शिक्षण व्यर्थ गेलें असें समजावें ! जोंपर्यंत आमच्यामध्यें ही नैतिक जागृति झालेली नाहीं, जोंपर्यंत आमच्या समाजाची बिघडलेली घडी सुधारली जात नाहीं, आमचें नैतिक बल वाढत नाहीं, न्याय अन्याय ह्या विषयींच्या आमच्या कल्पना उदात्त होत नाहींत, तोंपर्यंत राजकीय बाबतींत आमची खात्रीनें प्रगति होणें नाहीं ![1] [2]

तथापि आमचे हे जातिभेद सर्वांना आजच सुटणें शक्य आहे, किंवा सर्वांनीं ते एकदम सांडावे असाच आग्रह आहे असें मात्र नाहीं.[3] " परंतु आपलें उच्च ध्येय नित्य आपल्या दृष्टीपुढें असलें पाहिजे. जातिभेद हा मोठा राक्षस आहे, आणि त्याचा आपल्याला नाश करावयाचा आहे हें आपण नित्य लक्षांत ठेविलें पाहिजे. आम्हांला कितीही शिक्षण मिळालें, खाण्यापिण्याचा भेदाभेद आम्ही न मानूं लागलों तरीसुद्धां हा राक्षस नाहींसा होत नाहीं. मध्येंच डोकावतो ! आणि वर म्हटल्याप्रमाणें खाण्यापिण्याचे भेद न मानण्यापर्यंत जरी आमची मजल गेली असली, तरी मी अमुक एका जातीचा आहें व दुसरा अमुक जातीचा असून, ती जात निराळी आहे, ही भावना कोणत्या ना कोणत्या रूपानें तरी मनांत उत्पन्न होतेच होते ! आणि म्हणून त्या राक्षसाला दूर करावयाचें आहे, त्याचा नाश करणें आहे हें ध्येय नित्य पुढें ठेवून जर आम्ही वागलों नाहीं तर

---

* Custom is a god whom our race devoutly worships and religious sanction was accorded to these practices by the insertion of texts in the later books......Custom has been and is our authority,—custom is our religion. Our previous history has shown to my mind that custom is the spiritual potentate that sanctifies, and sanctifies even horrid deeds.

1. There can be no advancement politically, I firmly assert, without social and moral advancement.

2. There should spring up in our hearts a sense of justice, a keen sympathy for the sufferings of others and a love for our own country and an anxiety for their future well-being.

3. I do not wish you to obliterate all distinctions at once.

एकराष्ट्रीयत्व[1] साधणें हें जें आमचें साध्य तें दिवसेंदिवस अधिकाधिक दूर गेल्या वांचून राहणार नाहीं."*

जातिभेद व जातिमत्सर ह्यांचा विचार करीत असतां आज आपण हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, पूर्वींच्या स्थितींत आणि आजच्या स्थितींत जमीन अस्मानाचें अंतर पडलें आहे. सर्वच परिस्थिति बदलल्यामुळें लोकांच्या समजुतींत पुष्कळ फेरफार झाले आहेत. आजच्या काळांत कोणा आरोपीला तो केवळ शूद्र आहे म्हणून तसाच अपराध केलेल्या ब्राह्मणापेक्षां अधिक शिक्षा देण्यास कोणी धजणार नाहीं. या बाबतींत मनु, याज्ञवल्क्य ह्यांच्या स्मृति बाजूस पडल्या आहेत. सुमारें सत्तर वर्षांपूर्वी रत्नागिरीस खून केल्याबद्दल एका ब्राह्मणास दिलेली फांशीची शिक्षा जेव्हां अमलांत आली तेव्हां लोकांमध्यें कितीतरी गडबड उडाली; परंतु कायद्याचें स्वरूपच बदललें असल्यामुळें पुढें विशेष कांहीं झालें नाहीं. आज वेदांतील एकाद्या अक्षराचा उच्चार केल्याबरोबर शूद्राची जिव्हा कापून टाकण्यांत येत नाहीं ! उलटपक्षीं एकादा सोंवळा ब्राह्मण शिक्षक वेदांतील मंत्र शूद्रास शिकविण्यास कांकूं करूं लागला, तर त्यास नोकरीवर पाणी सोडावें लागावयाचें ! अशा प्रकारें जरी आमच्या समजुतींत अनेक फेरफार झाले आहेत, तरी कांहीं बाबतींत तरी फार निराशेची स्थिति आज अनुभवास येत आहे. "जात्यभिमान हा आम्हां हिंदु लोकांच्या हाडास खिळला आहे, आमच्या रक्तांत भिनून गेला आहे, म्हणून कांहीं उपाय चालत नाहीं. पाश्चात्य ज्ञानाचा पहिल्यानेंच जेव्हां आम्हांमध्यें प्रवेश झाला तेव्हां जातिभेद हा वाईट आहे असें आमच्या लोकांस वाटून जें कांहीं सार्वजनिक काम करावयाचें तें सर्व जातींचे गुजराथी व मराठी हिंदु व मुसलमान एकजुटीनें करीत असत, पण थोडक्याच काळानें ही जी नवीन उत्पन्न झालेली वृत्ति हिचा लोप झाला आणि आतां तर जातिभेदाचें साम्राज्य चाललें आहे ! प्रथमतः मुसलमान हिंदूंपासून विभक्त झाले आणि सध्य-

1. Instead of there being a feeling of sympathy between different castes, there is often a feeling of antipathy. As long as this state of things lasts, I shall feel greatly obliged to any one who will explain to me how it is possible to form a united Hindu Nation.

* निरनिराळ्या जातींची कशी उत्पत्ति झाली ह्याविषयीं अधिकारयुक्त विवेचन डॉ. भांडारकरांनीं Social History of India या निबंधांत केलें आहे.

हिंदूमध्यें जिकडे तिकडे भिन्न भिन्न परिषदा होत आहेत. जैनांची परिषद, वीर-शैव म्हणजे लिंगायत यांची परिषद, ब्राह्मण परिषद, गौड सारस्वत परिषद, कायस्थप्रभु परिषद, दैवज्ञ परिषद, मराठा परिषद, नामदेवशिंप्यांची परिषद आणि शेवटली माळ्यांची परिषद अशा किती परिषदा जिकडे तिकडे भरत आहेत व हिंदु समाजाचे तुकडे तुकडे होत आहेत. भिन्न भिन्न जातींच्या अशा परिषदा झाल्या म्हणजे अवश्यमेव अभिमान व भेदबुद्धि हीं जागृत होऊन परस्परांमध्यें वैमनस्य उत्पन्न करणार."

## विवाहविचार.

विवाहविधींतील मंत्रांच्या अर्थाचा थोडा विचार केला तरी सुद्धां कोणाच्याही लक्षांत येऊन चुकण्यासारखें आहे कीं, विवाहकालीं वधू व वर त्या मंत्रांचा अर्थ समजण्याच्या स्थितींत असतांना त्यांचा विवाह होत असे. वरानें कांहीं प्रतिज्ञा करावयाच्या, वधूनेंही कांहीं करावयाच्या त्या, हीं दोघेंही अज्ञान स्थितींत असतां कशा करणार ? तेव्हां पूर्वकालीन स्थितीचा विचार करितां मुली वयांत आल्या-नंतर त्यांचा विवाह होत असे ह्याविषयीं कांहीं संशय रहात नाहीं.[1] निरनिराळीं सूत्रें, कांहीं विधि व प्रतिज्ञा ह्या इतक्या स्पष्ट आहेत कीं, अल्पवयस्क मुलींचे विवाह त्या त्या कालीं प्रचारांत असावेत अशी शंकाही येत नाहीं. नाटकें वगैरे ग्रंथ जरी पाहिले तरी त्यांचेवरून मुलींचे विवाह प्रौढपणींच होत, असें निःसंशय म्हणतां येतें. कांहीं सूत्रकारांनीं मुली प्रौढ झाल्यावांचून कोणीही त्यांच्याशीं विवाह करूंच नये, असें स्पष्टपणें म्हटलें आहे. अशा प्रकारची अनुज्ञा देतांना अप्रौढ मुलीशीं विवाह करूं नये असें दोघांनीं म्हटलें आहे. ह्यावरून असें वाटतें कीं, त्या काळीं अप्रौढ मुलींच्या विवाहास प्रारंभ झालेला असावा व त्यास आळा बसावा ह्या हेतूनें वरील आज्ञा देण्यांत आल्या.[2] अशी जरी स्थिति होती तरी अनेक कारणांमुळें ही वयाची इयत्ता कमी कमी होत गेली, ती इतकी कीं

---

1. It admits of no question whatever that girls were married after they came of age.

2. After the completion of his study the student shall marry a girl who is not immature. Evidently when these Rishis wrote, the practice of early marriages was coming in; but they set their face against it as irrational.

आज कित्येक ठिकाणीं एका वर्षाच्या आंतील मुलांचे विवाह होत आहेत! प्रथम प्रथम बालविवाहाच्या ह्या चालीचे अनिष्ट परिणाम दिसून आले नाहींत. आणि रूढीचे आम्ही संपूर्णपणें दास झालेलों असल्यामुळें त्यांत अनिष्ट असें आह्मांला न दिसण्यापर्यंत आमची मजल येऊन पोंचली![1]

"वैद्यक ग्रंथांच्या आधारें जर वधुवरांच्या वयोमर्यादेचा विचार केला तर असें आढळतें कीं, सुश्रुत व वाग्भट यांनीं वर २५ वर्षांचा असावा आणि वधु १६ वर्षांची असावी असा नियम घालून ठेवला आहे. अर्वाचीन वैद्यकशास्त्रासही हा नियम संमत होईलसें वाटतें. धर्मशास्त्र पाहिलें असतांना यद्यपि अर्वाचीन निबंधकार व कांहीं स्मृतिकार यांचें मत प्रतिकूळ दिसलें तथापि हें निर्विवाद आहे कीं प्राचीन जे गृह्यसूत्रकार आश्वलायन, आपस्तंब, हिरण्यकेशी, गोभिलपुत्र, आणि पारस्कर यांचा अभिप्राय अनग्निका म्हणजे वयांत आलेल्या स्त्रीशींच विवाह करावा असा आहे. हें शास्त्र देऊन गोभिल मात्र म्हणतात कीं नग्निकेशीं विवाह केला असतां बरें. एकंदरींत प्रौढ वयाच्या मुलींचाच विवाह करावा, असें सूत्रकारांनीं घालून दिलेलें शास्त्र आहे, असें समजलें पाहिजे. तेव्हां प्राचीन शास्त्राचा आणि प्राचीन अर्वाचीन वैद्यकाचा याविषयीं विरोध नाहीं. म्हणून माझेंही मत असेंच आहे कीं १६ वर्षांचे आंत कोणाही मुलीचें लग्न करूं नये आणि सुमारें २५ वर्षांच्या आंत कोणाही मुलाचे लग्न करूं नये. व्यावहारिक दृष्टीनें पाहिलें असतां ही १६ वर्षांची मर्यादा १८ वर्षांपर्यंत वाढविली पाहिजे. कारण १६ वर्षांमध्यें मुलीचा व्हावा तितका विद्याभ्यास होत नाहीं."[2]

सामाजिक सुधारणेकडे ज्यांचें लक्ष लागलें आहे त्यांचें केवळ बालविवाहाच्या विरुद्ध चळवळ करून कांहीं भागत नाहीं. हिंदुसमाजामध्यें दुसरी एक अत्यंत अनिष्ट रूढि पडून गेली आहे, आणि तिच्यामुळें स्त्रियांची किंमत कांहींच नाहीं असें समाज मानितो, असें विचार करितां म्हणावें लागतें. हिंदुसमाज पुरुषांना वाटेल तेव्हां आणि वाटतील तितकीं लग्नें करावयास पूर्ण मुभा देतो. एक पत्नी मेली कीं दुसरी, दुसरीची वाट लागली कीं तिसरी, तिसरी जातांच चौथी असा प्रकार सारखा चालूं देणारा समाज किती वयापर्यंत पुरुषानें विवाह करावा याचा

1. Here is an instance of the fact that our people through the influence of custom lost all sense of the utter absurdity of the practice.

२ मनोरंजनाचा दिवाळीचा अंक.

कांहीं विचारच ठरवीत नाहीं ! " ज्या समाजामध्यें ५०-६० वर्षांच्या माणसाला ११-१२ वर्षांच्या मुलीशीं विवाह करण्यास पूर्ण स्वातंत्र्य आहे, असे प्रकार होतांच जो समाज कोणत्याही प्रकारें तिरस्कार दर्शवीत नाहीं, तो समाज स्त्रियांची कांहींच किंमत ओळखीत नाहीं व त्यांना गुरांढोरांच्या योग्यतेस नेऊन पोंचवितो असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं."[1] " पुष्कळ प्रसंगीं अशा स्थितींत मुलीचें लग्न होणें म्हणजे तिच्या मृत्यूचें वारंटच तिच्या हातीं देणें होय असा अनुभव येतो." आणि " अशा ह्या प्रकारांना जिवंत माणसांचे बळी घेणें असें न म्हणावें तर आणखी काय म्हणावें तें मला कळत नाहीं !"[2] अशा प्रकारच्या विवाहाविरुद्ध एकंदर समाजानें तक्रार केली पाहिजे; पण तशी तक्रार तर होत नाहीं आणि कित्येक प्रसंगीं स्वतः सुशिक्षित लोक अशा प्रकारचे विवाह बेलाशक करितात ![3] आणि ह्या चालीचा आतां इतका अतिरेक झाला आहे कीं, एका बायकोच्या शरीराची राख होत असतां दुसऱ्या लग्नाची जुळवाजुळवी होत असते व तीहि प्रत्यक्ष स्मशानांत ![4]

## विधवाविवाह.

डॉ. भांडारकर विधवाविवाहाचें समर्थन केवळ शास्त्राधाराच्या जोरावर करीत नसत. न्याय, नीति, दया ह्यांच्या दृष्टीनेंही ह्या प्रश्नाचा विचार केला पाहिजे

1 Presidential Address—Poona Social Conference.

2 I do not know how else to characterise these cases except as cases of human sacrifice.

3 A great many instances are now before my mind's eye in which when a man married a second girl-wife he had soon to marry a third and a fourth. The husband thus causes the death of the poor girl. And still even highly educated men of the present day, do not scruple to resort to the practice.—

*Social History of India.*

४ गुजराती हिंदूंतील एका जातींत पत्नीच्या मृत्यूनंतर पहिल्या १५ दिवसांच्या आंत जर दुसरा विवाह ठरला नाहीं तर तो कमीपणा समजतात ! बाई आजारी पडून अत्यवस्थ झाली कीं उपवर मुलीच्या पालकांचें आजारी बाईच्या नवऱ्याकडे लक्ष असतें व आपली सहानुभूति दाखविण्यासाठीं प्रेतयात्रेबरोबर गेल्यावर स्मशानांत आपल्या येथील स्थळाची सूचना गंभीरपणें करण्यांत येते ! ( सं. )

असें त्यांचें मत असे. आणि शास्त्राधाराचा जरी विचार केला तरी विधवाविवाहास अत्यंत अनुकूल असा शास्त्राधार आहे असें त्यांनीं अनेक व्याख्यानांमध्यें व लेखांत प्रतिपादिलें आहे. सती जाण्याची चाल ज्या आर्य जातींनीं युरोपांत वसाहत केली त्यांच्यापैकीं पुष्कळ जातींत ( races ) होती. परंतु ऋग्वेदामध्यें सतीच्या चालीचा कोठें उल्लेखही नाहीं. त्यावरून त्या वेळीं ही चाल प्रचारांत नव्हती असें होतें. तथापि अग्निहोत्र्याच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी त्याच्या शवावर पडली असतांना, तिला मुलें व धन मिळेल असा आशीर्वाद द्यावा, अशी त्या शवास विनंति करण्याच्या चालीचा उल्लेख अथर्ववेदांत सांपडतो. त्याचप्रमाणें "हे बाई ऊठ, तूं अद्यापपर्यंत मृत मनुष्याच्या जवळच काय पडून आहेस ? तुला आतां लवकरच दुसऱ्या पुरुषाची पत्नी होऊन पत्नीधर्म पाळावयाचा आहे"[1] अशा अर्थाचे जे उद्गार काढण्यांत येत असत, त्यांचेवरून त्या काळीं विधवाविवाह रूढ होता असें सहज अनुमान करितां येतें. अथर्व वेदांत एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, एखाद्या स्त्रीनें आपल्या प्रथम पतीच्या निधनानंतर दुसऱ्याशीं विवाह केल्यावर तीं दोघेंही जर 'अज पंचौदन' हा विधि करितील, तर तीं पुढें केव्हांही विभक्त होणार नाहींत.'[2] ऐतरेय ब्राह्मणामध्यें एके ठिकाणीं[3] असा स्पष्ट उल्लेख आहे कीं, पुरुषाला पुष्कळ स्त्रिया असल्या तर हरकत नाहीं, परंतु एका स्त्रीला एकाच वेळीं एकाहून अधिक पति असतां कामा नये. याच्यावरून त्या काळीं एका पतीच्या निधनानंतर तिला दुसरा पति करण्याची मुभा होती असे स्पष्ट होतें. अशा स्त्रीला पुनर्भू असें म्हणत असत. हा 'पुनर्भू' शब्द अथर्ववेदामध्यें व

---

१. इयं नारी पतिलोकं वृणाना निपद्यत उप त्वा मर्त्य प्रेतम् । विश्वं पुराणमनुपालयन्ती तस्यै प्रजां द्रविणञ्चेह धेहि । उदीर्ष्व नार्यभि जीवलोकमिता सुमेतमुप शेष एहि । हस्तग्रामस्य दिधिषोस्त्वमेतत्पत्युर्जनित्वमभिसम्बभूव ।

अथर्व, १८; ३, १–२.

२. या पूर्वं पतिं वित्त्वाथान्यं विन्दतेऽपरम् । पंचौदनं च तावजं ददातो न वि योषतः । अथर्व, ९–३–५–२७.

३. तस्मादेकस्य बह्वयो जाया भवंति नैकस्यै बहवः सहपतयाः ।

ऐतरेय ब्राह्मण, ३, २, २३.

4 The fact appears to be that in ancient times, the practice of widow-marriage did exist and it continued to be followed up to the time when the metrical Smrities were composed—

*Social History of India.*

कित्येक स्मृतींत आढळतो. परंतु सर्व स्मृतींमध्यें विधवाविवाहास अनुकूल मत दर्शविलेलें नाहीं. ह्यावरून असें दिसतें कीं, पुरातन काळीं विधवाविवाह रूढ होता व ही चाल स्मृतिकाळापर्यंत आह्मांमध्यें रूढ असावी. आतां पुष्कळ स्मृतींमध्यें व पुराणांत विधवाविवाहाच्या विरुद्ध वचनें आहेत त्यांवरून त्या त्या काळीं विधवाविवाहाच्या विरुद्ध मत बनत चाललें होतें असें जरी होतें, तरी इ. स. च्या बाराव्या शतकापर्यंत समाजामध्यें ही चाल रूढ असल्याचा उल्लेख सांपडतो. १११४ सालीं एक जैन संन्यासी इतर संन्याशांबरोबर भोजनास बसतांच इतर संन्यासी उठून गेले; तसें करण्याचें कारण असं सांगण्यांत आलें कीं, संसाराश्रमाचा लाभ न घेतां तो जैन संन्याशी झाला ही गोष्ट त्यानें शास्त्राविरुद्ध केली. त्या वेळीं ह्या संन्याशाला विवाह करून येण्यास सांगितलें. त्याच्यासारख्या वृद्धाला कोणी मुलगी देईना, म्हणून त्यास विधवेशीं विवाह करावयास सांगितलें व तो त्यानें केला; तरी पण पुढें असे विवाह रूढ असल्याचा उल्लेख सांपडत नाहीं.

### अंत्यजोद्धार.

" आजपर्यंत आपल्या इकडील महार मांग, चांभार वगैरे जातींची व मद्रासेकडे पारिया वगैरे अगदीं नीच मानलेल्या जातींची आम्हीं सर्व प्रकारें हेळसांडच केली आहे, त्यांना आम्ही दूर दूर ठेवितों, आणि अगदीं पुरातन काळापासून ही चाल पडलेली दिसते. " एकदां एका महार कीर्तनकारानें आमच्या येथें कीर्तन करितांना म्हटलें " आम्हां दीनांना वेदांनीं आणि शास्त्रांनीं दूर केलें, परंतु साधुसंतांना आमची कींव आली व त्यांनीं आम्हांला जवळ केलें. आणि आमच्या महाराष्ट्रामध्यें एकनाथांसारख्या ब्राह्मणसंतांना व ह्या व इतर प्रांतांतील इतर संतांना ह्या दीनांची कींव आली, ते आम्हांशीं प्रेमानें वागले, व त्यांनीं आमच्या धर्मशिक्षणाचा मार्ग मोकळा करून दिला हें त्यांस अत्यंत भूषणावह आहे ह्यांत बिलकुल संशय नाहीं. " त्या जुन्या काळीं ह्या आमच्या साधुसंतांनीं अंत्यजांच्या उद्धारासाठीं अशा प्रकारचे प्रयत्न करावेत, आणि आज सर्व प्रकारें परिस्थिति बदलली असतां, व आमचीं मतें अनेक कारणांनीं उदार होत असतां ह्या लोकांना अज्ञानांधकारांतून बाहेर काढण्यासाठीं म्हणण्यासारखे प्रयत्न न करणें हें आम्हांस शोभतें काय ? ह्या लोकांची मला जी माहिती आहे, त्यांच्या बुद्धिबलासंबंधानें माझा जो अनुभव आहे त्यावरून मला असें स्पष्टपणें म्हणतां येतें कीं, अगदीं तिरस्कृत जे महार त्यांच्यामध्यें बुद्धिमान माणसें पुष्कळ

असतात व त्यांना उत्तमप्रकारचें शिक्षण सहज देतां येईल. त्यांना असें अज्ञानांतच ठेवणें म्हणजे इतक्या बुद्धीला आमच्या देशानें मुकणें होय !"[1]

एकंदरींत पहातां अनेक बाबतींत आमचें पूर्वीचें ध्येय व आतांची स्थिति ह्यांत जमीन अस्मानाचें अंतर पडलें आहे.

" पुरातन कालीं मुली वयांत आल्यानंतर त्यांचा विवाह होत असे, आतां त्यांचें लग्न आधीं झालें पाहिजे; पूर्वी विधवाविवाह प्रचारांत होता, समाजास तो संमत होता, आतां त्याच्या उलट प्रकार अनुभवास येत आहे; पूर्वी आमच्या स्त्रियांना उच्च प्रकारचें शिक्षण मिळत असे, त्या गहन विषयांवर पुरुषांशीं वादविवादही करीत, त्यांना गायन व नृत्य ह्याही कला शिकवीत असत; आतां, त्यांना अज्ञानांधकारामध्यें खिचपत पडावें लागतें व गायन वादन व नर्तनासारखी कला शिकणें हें कमीपणाचें समजलें जातें; पूर्वी फार तर चार जाति होत्या, आतां ह्या असंख्य झाल्या आहेत; पूर्वी ह्या जातींत रोटीव्यवहाराची बंदी नव्हती; आतांच्या हजारों जातींत ह्या व्यवहाराचें नांव घ्यावयास नको; " अशी आज आमची स्थिति झाली आहे.

## सामाजिक प्रगति इच्छिणारांचें कर्तव्य.

"आमच्या समाजाची स्थिति पुरातनकालीं आजच्यापेक्षां श्रेष्ठ प्रकारची होती. आतां ती सारखी खालावत चालली आहे. हें असें कां होत आहे याचा विचार करितां असें दिसतें कीं, आम्हां हिंदुलोकांना अनेक शतकांपासून अनेक प्रकारच्या जुलमाखालीं रहावयाची संवयच झाल्यामुळें आमच्या समाजांतील नीतिबल अगदीं नाहींसें झालें आहे. राजकीय जुलूम, आचार्यांचा जुलूम आणि सामाजिक, किंवा जातींचा जुलूम अशा तीन प्रकारच्या जुलमाखालीं आम्ही इतके दडपून गेलों आहों कीं, आम्हांस मान वरच करितां येत नाहीं. आपल्या विचारांप्रमाणें चालल्यास रूढीच्या विरुद्ध वागल्याचा दोष येईल म्हणून धर्मसुधारकांनींही ती दिशा टाळण्याचाच प्रयत्न केला आहे. आमची सदसद्विवेकबुद्धि, आपली विवेचकबुद्धि जो काय बोध करिते तो ह्या तीन प्रकारच्या जुलमांना भिऊन आजपर्यंत बाजूस सारल्यामुळें आतां सदसद्विवेकबुद्धि टोंचणीच करीनाशी झाली आहे !" म्हणून " आतां आम्ही आमच्या विवेकाला जागृत केल्यावांचून, आमच्या उदार भावांची वाढ

1. To continue to keep him in ignorance is to deprive the country of an appreciable amount of intellectual resources.

केल्यावांचून व त्यांच्या साह्यानें भिक्षुक व जातींचा जुलूम ह्यांच्या विरुद्ध धैर्यानें चाल करून गेल्यावांचून ह्या अधोगतीस अवरोध करितां येणार नाहीं." यासाठीं प्रथमतः आमच्या ठिकाणीं सत्य व न्याय ह्यांच्याविषयीं प्रीति उत्पन्न झाली पाहिजे, इतरांच्या यातना, क्लेश, अडचणी ह्यांच्यासंबंधानें आमच्या ठिकाणीं ठिकाणीं सहानुभूति उदित होऊन स्वदेशाविषयीं खरें प्रेम व स्वदेशोद्धारासंबंधानें काळजी हीं आमच्या ठिकाणीं उत्पन्न झालीं पाहिजेत,[1] त्याचप्रमाणें सुधारणा कालानुरोधें होईल, आपोआप होईल, लोकांचीं मनें काल तयार करीतच आहे असें म्हणून चालावयाचें नाहीं. आमचे निर्धाराचे प्रयत्न झाले पाहिजेत. आणि ह्या आमच्या सर्व प्रयत्नांचा पाया न्यायाविषयीं, नीतीविषयीं, सत्याविषयीं आवड, व आपल्या देशांतील क्लेश व यातना ह्याविषयीं सहानुभूति व आपल्या देशाच्या उन्नतीविषयीं तळमळ हीं झालीं पाहिजेत." "खऱ्या सुधारकाच्या अंतः-करणांतील तळमळीची नीटशी कल्पना न झाल्यामुळें कित्येक वेळां लोक त्याला उतावळा सुधारक वगैरे नामाभिधानानें संबोधितील; किंवा सुधारकांचे मार्गच नीट नाहींत असें म्हणतील; परंतु ज्यांनीं सुधारणेसंबंधानें आजपर्यंत कांहींच केलेलें नाहीं, किंवा फारच थोडी कृति ज्यांच्या हातून झाली आहे त्यांनीं अशा प्रकारची टीका केली म्हणजे त्यांच्या संबंधानें संशय उत्पन्न होतो. तरी पण, सर्व कांहीं सुधा-रणा एकदम तडकाफडकी करून टाकाव्यात असें मी म्हणत नाहीं. आमच्या अंतः-करणांतून सुधारणेच्या कार्यास जोराची स्फूर्ति झाली पाहिजे आणि आपल्या पुरातन संस्था, पुरातन ग्रंथ ह्यांच्याशीं असलेला संबंध ताडकन् तोडून टाकून आपलें चालावयाचें नाहीं हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. फ्रेंच रेव्होल्यूशनची रीत आ-म्हांला नको आहे. इंग्रज लोकांनीं फ्रेंच रेव्होल्यूशननें झालेल्या कार्यासारखींच कार्यें करून दाखवितांना वर्तमान आणि भूत ह्यांची परंपरा राखिली आहे. आम्हींही तसेंच केलें पाहिजे. आणि तसें आम्हांस करितां येण्यासारखें आहे. विलायतेहून परत आलेल्या गृहस्थानें आपल्या समाजांतील इतर साधारण लोकांप्रमाणेंच राहावें, पुनरूढा स्त्रीनें आपल्या समाजांतील इतर स्त्रियांप्रमाणें राहावें, परंतु एकदां सुधा-रणेला मागें टाकली म्हणजे मग ज्या अंतःस्फूर्तीमुळें प्रथम आपली जागृति झाली होती, ती स्फूर्ति अंतःकरणांतील तळमळ नष्ट झाल्यामुळें मंदावते आणि मग

1. We must cultivate a sense of justice and a love and sympathy for others, relieve the poor widow of her sufferings, remove the disabilities of womankind and of the lower classes, and allow free play to the energies and capacities of all.

सुधारणेची अवश्यकताही आम्ही विसरून जातों. म्हणून आपलें जें ध्येय, जें उद्दिष्ट तें नित्य दृष्टीपुढें ठेवून तें साधण्याचे प्रयत्न सतत झाले पाहिजेत."
" माझे मित्र ना. न्या. मू. रानडे ह्यांनीं म्हटल्याप्रमाणें सामाजिक सुधारणे-संबंधानें लोकांमध्यें जागृति झाली आहे, हें मला मान्य आहे. ही जागृति पाहून समाधान मानावयाचें कीं असमाधान मानावयाचें हें त्यांनीं ज्याच्या-त्याच्यावर ठेविलें आहे. म्हणून मी म्हणतों कीं ही जागृति पाहूनही माझें समाधान होत नाहीं. आमच्यांतील पुष्कळ शिक्षित लोकांचीं मनें मुळींच उदार झालेलीं नाहींत, कित्येकांना आम्हीं योजिलेल्या सुधारणा पसंत आहेत, परंतु आपण स्वतः कांहींही करावयास ते बिलकुल तयार नाहींत. आणि दुसरे पुष्कळच असे आहेत कीं जे सुधारणेसंबंधानें पूर्णपणें उदासीन ( indifferent ) आहेत. ( तेव्हां ) जागृतिरूपी दिवा पेटला आहे खरा, पण त्याची ज्योत इतकी मंद आहे कीं, कांहीं अगदीं सुशिक्षित लोकांची सुधारणेसंबंधाची दृष्टि पाहून मला असें वाटूं लागलें आहे कीं, ह्या ज्योतीचा प्रकाश अधिक सतेज होणें हें जितकें शक्य आहे तितकीच शक्यता हा मंदमंद जळणारा दिवा अजीबात विझून जाण्याचीही आहे. आणि म्हणून आम्हीं सर्वांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं आम्हांला जें योग्य, जें न्याय्य व जें अवश्य वाटत आहे तें सर्व शांतपणें आणि विशेष गवगवा न करितां आम्ही आचरणांत आणिलें पाहिजे. म्हणजे त्या त्या सुधारणा प्रचारांत येतील आणि त्याच नव्या रूढी बनून जाऊन लोकमान्य होतील."

सामाजिक सुधारणांतर्गत अनेक विषयांसंबंधाचीं डॉ. भांडारकरांचीं हीं अशीं मतें व हे असे विचार होते. हीं किंवा अशीं मतें त्यांनीं पंचावन साठ वर्षे सतत प्रतिपादिलीं आहेत; परंतु हीं मतें प्रतिपादून ते केव्हांही स्वस्थ बसले नाहींत. आपल्या महाराष्ट्रामध्यें बोलके सुधारक आणि कर्ते सुधारक असे भेद दुर्दैवानें झाले. परंतु डॉ. भांडारकरांची मजल सुधारणेसंबंधानें लोकांना पुष्कळसा उपदेश करून तेथेंच केव्हांहि थांबली नाहीं. विशेष गाजावाजा न करितां, आपण कांहीं मोठें शतकृत्य करीत आहों असें न दाखवितां, सुधारकांनीं अनेक सुधारणा प्रचारांत आणण्यासाठीं, कर्तव्यताबुद्धीनें न्याय, नीति व सत्य आपल्या दृष्टीपुढें ठेवून झटलें पाहिजे, असें जें त्यांचें मत त्या बरहुकूमच त्यांचें आचरण झालें आणि हें त्यांचें धोरणच जर सर्व सुधारकांनीं स्वीकारिलें असतें, तर मग बोलके सुधारक आणि कर्ते सुधारक असें वर्गीकरण फार दिवस टिकलें नसतें. असो.

ज्यांना केवळ शास्त्राधारच हवा असेल, त्यांच्या समाधानासाठीं विधवा-विवाहास अनुकूल असा शास्त्राधार त्यांनीं दाखवून दिला आहे. परंतु हा शास्त्राधार लोकांस दाखवून, किंवा त्याची सयुक्तता प्रतिपादून ते बसले नाहींत. त्यांना पसंत असणारें स्थळ आढळतांच त्यांनीं आपल्या गतभर्तृका मुलीचा पुनर्विवाह १८९१ सालीं घडवून आणिला. आपल्या जातीला हा विचार पसंत पडणार नाहीं, जातीच्या स्वामींची आपल्यावर अधिक वक्रदृष्टि होईल, आपल्या जातीची अद्याप तयारी झालेली नाहीं, असल्या विचारांस प्राधान्य न देतां आपल्या मुलीसंबंधानें आपलें जें कर्तव्य तें कर्तव्यताबुद्धीनें त्यांनीं १८९१ सालीं बजाविलें. त्यावेळीं डा. भांडारकरांस जातिबहिष्कृत करण्याविषयीं मुंबईस सारस्वतांची एक सभाही भरली होती; परंतु तींत अखेरीस कांहींही न ठरतां सर्व लाथाळें मात्र माजलें; आणि सभा बरखास्त करणें भाग पडलें, हें त्यावेळचीं वर्तमानपत्रें वाचणारांस आज सांगावयास नको. ह्या सभेंतील प्रसंगासंबंधानें लिहितांना प. वा. आगरकर ह्यांनीं म्हटलें आहे कीं, " डॉ. भांडारकर ह्यांना वाळींत टाकण्यासाठीं भरलेल्या सभेचें ऑफस झालेलें ऐकून कोणाहि विचारी मनुष्यास आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं, असें आमचें मत आहे. डा. भांडारकरांसारख्या सत्यनिष्ठ, विद्वान्, थोर मनाच्या पुरुषास जातींतून बाहेर टाकण्याचा खटाटोप करण्यास तयार होणाऱ्या अविचारी अदूरदृष्टि असमंजस लोकांनीं सुधारणापक्षावर हा एक मोठा अनुग्रहच केला, असें समजलें पाहिजे." असो. हीच गोष्ट दुसऱ्या सुधारणांची आहे. बालविवाहाचा त्याग होण्याची आवश्यकता आहे असें केवळ प्रतिपादित न राहतां आपल्या कुटुंबांत प्रौढविवाहच त्यांनीं चालू ठेविला. कन्याविक्रयासारख्या गोष्टीची त्यांच्या येथें गोष्टच काढावयास नको. आपल्या प्रांतांतील स्त्रीशिक्षण देणाऱ्या लहानमोठ्या अनेक संस्थांशीं त्यांचा अखेरपर्यंत संबंध होता. त्यांनीं आपल्या कुटुंबामध्यें स्त्रीशिक्षणाचा भक्कम पाया घातलेला आहे. विलायतेहून परत आल्यानंतर प्रायश्चित्त घेऊन पावन होण्याचा विचार त्यांस केव्हांही शिवला नाहीं. अशा रीतीनें सामाजिक सुधारणेसंबंधानें त्यांनीं आपल्या आचरणानें लोकांस अत्युत्तम कित्ता घालून देऊन आपलें धैर्य कोणत्या प्रकारचें आहे व आपली सत्यप्रीति कोणत्या प्रकारची आहे तें जगास दाखवून दिलें आहे.

## सामाजिक सुधारणा व तडजोड.

सामाजिक सुधारणेच्या बाबतींत कांहीं तरी तडजोड केली पाहिजे असें वारंवार प्रतिपादण्यांत येतें. **मनोरंजनाचे** संपादकांनीं डा. भांडारकरांस एकदां हा

प्रश्न विचारलाही होता. त्या प्रश्नांस त्यांनीं दिलेलें समर्पक उत्तर तडजोडीच्या भक्तांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ते म्हणाले:—

" सामाजिक सुधारणा ही नीतीच्या, भूतदयेच्या आणि सत्याच्या पायावर करावयाची आहे. नीति, भूतदया, सत्य यांत तुम्ही तडजोड कोणती व कशी करणार ?...नीति, भूतदया वगैरे गोष्टींत तडजोड मुळींच उपयोगी नाहीं ! आपल्या विवेकवाणीला स्मरून न्याय्य वाटणारी सुधारणा प्रत्येकानें अवश्य आणि धैर्यानें अमलांत आणिलीच पाहिजे. परदेशांत जाऊन येणारांना आपण मुळींच पाप केलें नाहीं असें वाटत असल्यास, त्यानें समाजाला खूष करण्यासाठीं प्रायश्चित्त घेण्याच्या भानगडींत पडूं नये ! असेंच प्रत्येक बाबतींत वर्तन ठेवावें. आपल्या सदसद्विवेकबुद्धीविरुद्ध, सत्याविरुद्ध, नीतीविरुद्ध आणि भूतदयेविरुद्ध जी जी गोष्ट असेल, त्या त्या गोष्टींत तडजोड कोणीहि आणि केव्हांहि करूं नये !"

## डॉ. भांडारकर व संमतिवयाचें बिल.

१८९१ सालीं संमतिवयाच्या बिलाच्या धामधुमीच्या वेळीं डॉ. भांडारकरांनीं आपल्या देशाची जी सेवा केली ती अप्रतिम आहे. ह्या त्यांच्या सेवेबद्दल पुण्याच्या कृतघ्न लोकांनीं त्यांस कोणतें बक्षिस दिलें त्याचा उल्लेख आतां पुढें होणारच आहे. त्यावेळीं महाराष्ट्रांत व इतरत्रही धर्माभिमानी म्हणविणारांनीं मोठा कल्होळ मांडला होता; धर्मबाह्य असणारी गोष्ट ह्या कायद्यामुळें लोकांवर लादली जाणार आहे असा टाहो फोडला जात होता; बायकापोरें, कोळीमाळी, विद्यार्थी, अज्ञान लोकसमूह अशा सर्वांच्या कशा तरी बिलाविरुद्ध अर्जांवर सह्या घेण्यांत येत होत्या. आणि शास्त्रार्थासंबंधानें तर फारसा निश्चितपणा नव्हता. अशा ऐन आणीबाणीच्या वेळीं डॉ. भांडारकर आपल्या शास्त्राधारांसह पुढें आले आणि त्यांनीं असें सिद्ध करून दाखविलें कीं, कायद्यानें जी वयाची अट संभोगकालासंबंधानें घालण्याचें घाटत होतें त्यापेक्षांही कितीतरी जास्त वयाची अट खुद्द शास्त्रांत आहे. हा लेख फारच मोठा आहे व तो तयार करण्यास श्रम किती लागले असतील ह्याची कल्पना व्हावयास तो एकदां तरी वाचलाच पाहिजे. प्रथम तो सुधारकांत प्रसिद्ध झाला. त्यावेळीं आगरकरांनीं ह्या लेखासंबंधानें लिहितांना म्हटलें आहे, कीं, ' या संमतीच्या कायद्यास आपल्या लोकांनीं पूज्य मानिलेल्या धर्मशास्त्रकारांची पूर्ण संमति आहे, असें सिद्ध करून दाखविल्यानें हा प्रस्तुत वाद मिटण्यासारखा असेल तर तेवढी कामगिरी आपले परमपूज्य धर्मनिष्ठ गुरु डाक्टर

भांडारकर यांनीं वेळीं बजाविली आहे. जे कोणी हा निबंध निरभिमानानें लक्षपूर्वक वाचतील त्यांस स्पष्टपणें असें दिसून येईल कीं, विवाहकालाची व संभोगकालाची जी मर्यादा अलीकडील समंजस व सुशिक्षित लोकांस प्रशस्त वाटूं लागली आहे तीच मर्यादा आमच्या पुरातन प्रमुख स्मृतींस व ऋषींस पूर्ण मानवली होती; इतकेंच नाहीं, तर त्या मर्यादेचें उल्लंघन करणें त्यांनीं मोठें पाप मानिलें होतें.'

वरील उताऱ्यावरून डॉ. भांडारकरांच्या लेखाची व त्याचप्रमाणें त्या वेळच्या लोकमताची साधारण कल्पना वाचकांस सहज होणार आहे. वास्तविक पहातां डॉ. भांडारकरांचा हा लेख प्रसिद्ध झाल्यावर निदान शास्त्रार्थासंबंधानें तरी बिलाच्या विरुद्ध असणाऱ्या शहाण्या लोकांची वाचाळता बंद व्हावी, पण तसें कोठून व्हावयाला ? मग धर्माभिमान तो कसला ? देशाभिमान तो कसला ? हा लेख बाहेर पडल्यानें आतां जणूकाय आपल्या शास्त्रार्थाच्या कल्पनांवर एकदम गदाच येऊन पडली आहे असें वाटून धर्माभिमान्यांच्या रक्षणासाठीं रा. रा. बाळ गंगाधर टिळक धांवून पुढें आले; टाइम्सकारांनीं त्यांच्या शास्त्राधाराच्या पत्राला आश्रय न दिल्यामुळें तें पत्र नेटिवओपिनियन पत्रांत प्रसिद्ध झालें. त्यांतील मुद्यास डा. भांडारकरांनीं समर्पक उत्तर दिलें. डॉ. भांडारकरांचा मूळ शास्त्राधाराचा विस्तृत लेख, रा. रा. टिळकांचें उत्तर व डॉ. भांडारकरांचें प्रत्युत्तर हीं जिज्ञासूंनीं अवश्य वाचावीं. डॉ. भांडारकर हे अनेक महत्त्वाच्या विषयांवर १८६४ सालापासून वाद लढत आहेत; परंतु हे वाद सशास्त्ररीतीनें चालवावयाचे असा त्यांचा बाणा आहे. त्याचप्रमाणें असे वादविवाद चालू असतां लोकरंजनास बळी न पडतां शास्त्रोक्त रीतीनें वाद चालवावयाचा व व्यक्तिपर टीका, खाजगी गोष्टींचा संबंध, प्रतिस्पर्ध्यासंबंधानें कुत्सित वृत्ति व अनादर असा न दाखवितां वाद चालविण्याचा त्यांचा बाणा असल्यामुळें रा. टिळकांचा व्यक्तीवरील हल्ला त्यांस बिलकूल पसंत पडला नाहीं. त्यास उद्देशून ते म्हणतातः—

One point more and I have done. I have been carrying on literary controversies since 1864, but never did I hitherto meet with an opponent who treated me with such studied discourtesy as Mr. Tilak has been doing. This circumstance has rendered my task

disagreeable and even painful, and I should have much preferred to remain silent now, were it not for the fact that the silence was likely to be misconstrued.

पण, संमतिवयाच्या बिलाच्या वेळीं डॉ. भांडारकरांनीं निरपेक्षबुद्धीनें जी लोकसेवा बजाविली, जे त्रास सोसले, त्यांचेबद्दल त्यांना फळ काय मिळालें ? अपमान ! चेष्टा ! दगडांचा मार ! लोकांच्या घरांत कोंडून घेण्याची आवश्यकता ! जीव घेण्याची धमकी ! ह्यावेळीं पुण्यांतील धर्माभिमानी म्हणविणारे शहाणे लोक आपलें मनुष्यपण विसरून पशुवृत्तीस शोभण्यासारखींच कृत्यें करीत होते; तरी पण, आगरकरांनीं म्हटल्याप्रमाणें "विद्येनें, वयानें, स्वभावानें व आचरणानें अत्यंत पूज्य अशा डॉ. भांडारकरांसारख्या गृहस्थाला पुण्याच्या लहानमोठ्या लोकांनीं दिवसाढवळ्या दगड मारावे, आणि संध्याकाळ होतांच भल्या मनुष्याच्या घरांत कोंडून घातल्यासारखें करून, त्यांचेवर वाळूचा, दगडांचा व कुशब्दांचा वर्षाव करावा व पोलिसानें कांकणें घालणाऱ्या स्त्रियांहून स्त्रैण होऊन असल्या गोष्टी धडधडीत आपल्या दृष्टीसमोर होऊं द्याव्या, याहून पुण्याच्या लोकांच्या आणि पुण्याच्या पोलिसाच्या नांवास कलंक आणणारी शोचनीय व लज्जास्पद गोष्ट कधींही घडली नसेल."

संमतिवयाच्या बिलाच्या वेळीं आपली मानहानि झाली, आपला छळ झाला, आपल्या स्पष्टोक्तिबद्दल आपल्या जीवावर येऊन बेतलें, हें पाहून त्यांनीं आपली स्पष्टोक्ति सोडून दिली, अगर सुधारणेसाठीं जे श्रम करणें आपल्या हातचे आहेत ते देखील करण्याचे थांबविले, असें मात्र कोणीं समजूं नये. तिकडे बिल पास व्हावयाचें तें झालें; डॉ. साहेबांचा नेहमींप्रमाणें व्यासंग चालू राहिला, मात्र पुणेकरांनीं आपलें नांव कायमचें बद्दु करून घेतलें !

## व्हाइसचॅन्सलर डॉ. भांडारकर.

१८९२ सालीं लॉ. हॅरिस ह्यांनीं मुंबईच्या युनिव्हर्सिटीच्या व्हाइसचॅन्सलरच्या जागीं प. वा. काशिनाथपंत तेलंग ह्यांची योजना केली. ह्या वेळेपर्यंत नेहमीं ह्या जागीं कोणातरी युरोपियन गृहस्थाचीच नेमणूक करण्याची चाल असे. परंतु लॉर्ड हॅरिस ह्यांस ह्या जागेवर केवळ युरोपियनाचीच नेमणूक करण्यांत यावी, आणि एतद्देशीय मनुष्य कितीही ज्ञानी, विद्वान्, लोकमान्य व राजमान्य असला, तरी तो केवळ एतद्देशीय आहे म्हणून त्याची ह्या जागीं

नेमणूक होऊं नये, हा विचार नापसंत पडल्यामुळेंच त्यांनीं ह्या बाबतींत स्वतः उदाहरण घालून दिलें. आणि लॉर्ड हॅरिस ह्यांनीं जी योजना केली ती साहजिकपणें सर्वांस पसंत पडली. परंतु पदवीदानसमारंभाच्या वेळीं काशीनाथपंतांची प्रकृति नादुरुस्त असल्यामुळें त्यांस आपलें भाषण करितां आलें नाहीं; आणि हा लाभ आपल्याला पुढील सालीं होईल, अशी आशा त्यावेळीं लॉ. हॅरिस ह्यांनीं प्रदर्शित केली होती. परंतु ईश्वरी नेमानेम कांहीं निराळाच असल्यामुळें न्या. मू. तेलंग हे अकालीं मृत्युमुखीं पडले आणि त्यांच्या जागीं लॉ. हॅरिस ह्यांनीं पुन्हां एतद्देशीयाचीच, म्हणजे डॉ. भांडारकरांची, योजना केली. डॉ. भांडारकरांसारख्या जगन्मान्य विद्वान्, ज्ञानी, सत्यप्रिय, स्वदेशाच्या हिताप्रीत्यर्थ झटत असणाऱ्या, विद्याखात्यांतच आपलें सर्व आयुष्य घालविलेल्या बाणेदार गृहस्थांची ह्या जागीं नेमणूक झालेली पाहून सर्व सुशिक्षित, विचारी व समंजस लोकांस आनंद झाला. त्यांनीं आपल्या दोन वर्षांच्या कारकीर्दींत जें काम केलें त्याचें स्वरूप दाखविण्याचें हें स्थळ नव्हे. तथापि व्हाइसचॅन्सलर ह्या नात्यानें त्यांनीं जें भाषण ता. २० फेब्रुवारी १८९४ ह्या दिवशीं केलें तें एतद्देशीय व्हाइसचॅन्सलरांनीं केलेलें पहिलेंच भाषण होय. त्या भाषणांतील कांहीं भाग सामाजिक सुधारणेस अनुलक्षून होता. हें त्यांचें भाषण अत्यंत कळकळीचें असें होतें व त्यांत सुधारणेचा संबंध असल्यामुळें त्याचेवर अनुकूल प्रतिकूल बरीच टीका झाली होती.

एतद्देशीय व्हाइस चॅन्सलर यांनीं केलेलें तें पहिलेंच भाषण, आणि त्यांत लोकांच्या नावडीच्या सामाजिक सुधारणेच्या प्रश्नाचें विवरण! मग त्याचेवर वर्तमानपत्रांतून टीका व्हावयास अवकाश कसा लागावा! कोणीं म्हणूं लागले कीं हें फारच लांबलचक चऱ्हाट झालें. कोणी म्हणाले व्याख्यानांतील बऱ्याच गोष्टींचा विश्वविद्यालयाशीं कांहींच संबध नाहीं. कोणाचे असेही आक्षेप आले कीं, डॉ. भांडारकरांस आपलें सामाजिक सुधारणेचें घोडें नेहमीं पुढें ढकलल्यावांचून चैनच पडत नाहीं. कोणास असेंही वाटूं लागलें कीं, ह्यांचीं अनुमानें चुकीचीं आहेत. आणि कांहीं विचारी, शांत, विद्वान् लोक ह्या अत्यंत कळवळ्यानें केलेल्या भाषणाचा शांतपणें विचार करूं लागले. ह्यांत डॉ. भांडारकरांच्या मताचेच सर्व लोक होते असें नाहीं. डॉ. भांडारकर व न्या. मू. रानडे हे स्नेही. सामाजिक आणि धर्मविषयक सुधारणेसंबंधानें दोघांचेही विचार बहुतेक सारखेच. तरुण पदवीधरांत मृत्यूचें प्रमाण असावें त्याच्यापेक्षां अधिक आहे ही गोष्ट दोघांसही मान्य; परंतु डॉ. भांडारकरांचें म्हणणें कीं, जरी लोक श्रीमंत

नसले, गरीब असले, अभ्यासाच्या वयांत खाण्यापिण्यासंबंधानें हयगय होत असली, तरी बालविवाह हें ह्या परिणामाचें प्रमुख कारण आहे. न्यायमूर्तीचें म्हणणें असें असे कीं, तरुण पदवीधरांत मृत्यूचें प्रमाण फार आहे खरें, पण डॉ. भांडारकरकरांनीं तें दाखविलें आहे तितकें नाहीं, आणि बालविवाहाचा व ह्या परिणामाचा फारसा संबंध नाहीं. दक्षिणी लोकांच्या दारिद्र्याचा हा सर्व परिणाम आहे. दक्षिणी लोकांपेक्षां गुजराथी हिंदु पदवीधरांत मृत्यूचें प्रमाण कमी असतें, ह्यावरून दारिद्र्य हेंच प्रमुख कारण ठरतें. ह्यास उत्तरादाखल डॉ. भांडारकरांचें असें म्हणणें कीं, आपले मित्र रानडे ह्यांनीं मृत्यूचें प्रमाण कमी करण्याचा जो प्रयत्न केला आहे तो ठीक नाहीं, प्रमाण ठरविते वेळीं आजपर्यंतच्या पधवीधरांची सरसकट नोंद घेणें चुकीचें आहे. २५–३० वयाच्या दरम्यान आपले विद्यार्थी साधारणपणें पदवीधर होतात; आणि चाळिसांच्या आंत त्यांतील कित्येकांस मृत्यु येतो. अर्थात् आज ज्यांचें वय इतकें झालेलें नाहीं त्यांस प्रमाण काढितेवेळीं धरतां येत नाहीं. असो.

डॉ. भांडारकरांचें हें भाषण व ग्रॅज्युएट्स् ॲसोसिएशनच्या विद्यमानें झालेलें न्या. मू. रानडे ह्यांचें भाषण ह्यांचा आतां इतक्या वर्षांनीं जे शांतपणें विचार करितील त्यांस प. वा. आगरकरांनीं त्यावेळीं जें म्हटलें होतें कीं, दोघांच्या दृष्टिभेदाचा हा परिणाम होय, तेंच विशेष रीतीनें पटणार आहे.

## सुशिक्षित तरुणांची जबाबदारी.

डा भांडारकरांनीं धर्मविषयक सुधारणेसंबंधानें जें कांहीं कार्य केलें त्याची कल्पना येथें करून देणें अत्यंत अगत्याचें आहे. पण त्यापूर्वी दुसऱ्या एका विषयांचा येथें उल्लेख केला पहिजे. डॉ. भांडारकरांची सर्व नोकरी शिक्षणखात्यांत झाली. शेकडों, हजारों तरुणांचें शिक्षण त्यांच्या हातून झालें. त्यांच्या आकांक्षा, त्यांचे विचार, त्यांच्या आशानिराशा, त्यांच्या अडचणी, त्यांची कालक्षेप करण्याची रीत, त्यांचें वाचन, सारांश त्यांचें एकंदर जीवन ह्याचे विषयीं त्यांना निरनिराळ्या प्रकारचे अनुभव आले होते आणि सर्व देशाचें बरें वाईट करणें हें सर्वस्वी तरुणांच्या कर्तबगारीवर अवलंबून आहे असें त्यांस वाटत असल्यामुळें तरुणांचें ध्येय उच्च असावें, त्यांच्या ठिकाणीं आपल्या जबाबदारीची जागृति असावी, असें त्यांस वाटत असे. परंतु तरुणांच्या विचारांना जर भलतेंच वळण लागलें, ते जर केवळ एककल्ली झाले, असत्य, अन्याय, अनीति

त्यांच्याविषयीं चीड येणें हें चांगलेंच आहे, परंतु आपल्या स्वतःच्या समाजांत असत्याची, अन्यायाची, अनीतीची बजबजपुरी माजलेली पाहूनही, परक्यांना असत्य, अन्याय व हक्क त्यांच्याविषयीं जर व्याख्यानें द्यावयास लागले, तर हें असलें धोरण घातक होणार अशी त्यांची दृढ श्रद्धा असल्यामुळें कोणत्याही हक्कांची मागणी करण्यापूर्वी आपण त्या हक्कास कितो पात्र आहों हें आधीं पाहिलें पाहिजे असें त्यांचें नेहमीं सांगणें असे. हा विचार दृष्टीपुढें ठेवूनच पेन्शन घेतेवेळीं त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांचा निरोप घेतांना जें लहानसें भाषण केलें त्या वेळीं म्हटलें कीं:—

" हिंदुस्थानच्या लोकांत आपल्या देशबांधवांविषयीं कळकळ नाहीं असें नाहीं. व्यक्तिविशेषास साह्य करण्याचा प्रसंग आला कीं आपली परोपकारबुद्धि जागृत झाल्यावांचून रहात नाहीं. व्यक्तिविशेष संकटांत पडलेला पाहिला कीं, आपल्या मनोवृत्ति कळवळून जातात; परंतु सार्वजनिक कर्तव्यासंबंधानें पाहिलें तर त्या बुद्धीचा मात्र आपल्यांत अभाव आहे. सार्वजनिक अन्यायासंबंधानें जी मनास चीड यावयाची ती केवळ आपल्या लहरीवर अवलंबून असून क्षणिक अशी असते. ज्या गोष्टीचा संबंध केवळ व्यक्तिमात्राच्या हिताशीं नसून सार्वजनिक हिताशीं जडलेला असतो, अशा गोष्टींत नेटानें श्रम करण्याची अद्याप आपणांस सवय झालेली नाहीं. जनता, देश, राष्ट्र या कल्पना जितक्या स्पष्टपणें आपल्या मनांत बिंबल्या पाहिजेत तितक्या त्या बिंबलेल्या नाहींत. राष्ट्रीय हिताविषयीं आपणास जितकी कळकळ वाटावयास पाहिजे तितकी वाटूं लागली नाहीं. राष्ट्रीय हितार्थ झटणें हें आपलें कर्तव्य आहे, ही बुद्धि अद्याप आपल्यांत व्हावी तशी जागृत झालेली नाहीं. राष्ट्राचें हित म्हणजे ज्याच्याशीं आपण बोलतों चालतों, ज्याच्या कृतज्ञताबुद्धीचा आपणास अनुभव घेतां येतो, अशा व्यक्तिविशेषांच्या हिताप्रमाणेंच आहे ही कल्पना अद्याप आमच्यांत दृढ झालेली नाहीं; व अशाप्रकारें राष्ट्रत्वाचें किंवा समुदायस्वरूपाचें आपणास पूर्ण आकलन न झाल्यामुळें राजकीय गोष्टींत स्वार्थ किंवा व्यक्तिविशेषाचें हित यांचाच आपल्या मनावर परिणाम होतो व त्यांच्याच धोरणानें आपलें आचरण होत असतें. अशी स्थिति असल्यामुळें अर्थातच सार्वजनिक कामांत जेथें दोन पक्ष ( Parties ) व्हावयाचे त्यांच्या जागीं तट ( Factions ) होतात व व्यक्तिविशेषाच्या आवडीनावडीपुढें सार्वजनिक हिताकडे दुर्लक्ष होतें; व जोंपर्यंत ही स्थिति अशीच चालू राहील तोंपर्यंत प्रातिनिधिक संस्थांपासून हित होण्याचें

एका बाजूस राहून अहित मात्र होईल, हें उघड आहे. याकरितां कोणताही राजकीय हक्क मागण्यापूर्वी त्यास आपण कितपत पात्र आहों व तो मिळाल्यानें राष्ट्राचें चिरकाल हित होण्याचा संभव आहे किंवा नाहीं, याचा प्रत्येकानें आपापल्या मनाशीं निःपक्षपातबुद्धीनें विचार करावा."

डॉ. भांडारकरांच्या भाषणांतील हे उद्गार केवळ राजकीय चळवळीच्याच मागें लागलेल्या व वर्तमानपत्ररूपी हत्यारें आपल्यापाशीं घेऊन बसलेल्या कांहीं मंडळीस मुळींच रुचले नाहींत, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. त्यांच्या दृष्टीनें हा भाग अगदींच अप्रासंगिक ठरला; हा उपदेश 'नामर्दपणाचा' होय असेंही सर्टिफिकिट एका 'जवानमर्द' लेखकानें दिलें ! परंतु ह्यांत कांहीं विशेष नाहीं. आपल्या वळणांतले जे विचार नाहींत अशा विचारांस कोणीं महत्त्व दिलें, तर एकतर तशा विचारांवर खरमरीत टीका व्हावयाची, नाहीं तर त्या विचारांस जितकी कमी प्रसिद्धि मिळेल तितकी बरें असें वाटून ते दाबण्याचा प्रयत्न करावयाचा; असें धोरण महाराष्ट्रांतील कांहीं वर्तमानपत्रांचें असल्यामुळें डॉ. भांडारकरांच्या विचारांवर अप्रस्तुत टीका व्हावयाची हें ठरलेलेंच असे. त्याप्रमाणें वरील उपदेशाच्या वेळीं प्रकार झाला ! तो त्यांच्या टीकाकार मंडळीच्या शीलास अनुसरूनच झाला ! परंतु आपणास न पटणारे विचार आपल्या वळणांतील व्यक्तीनें प्रदर्शित केल्यास ते दाबून टाकण्यांत येतात ही आमची टीका कदाचित् कोणास अनुदार वाटण्यासारखी आहे. त्यांच्या माहितीसाठीं इतकें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं, १८९४ सालीं मुंबई सोडून जातांना मि. ह्यूम साहेबांनीं मुंबईकरांचा शेवटचा निरोप घेतला त्यावेळचें त्यांचें भाषण सर्वत्र प्रसिद्ध झालें, परंतु वरील धोरणाच्या पत्रकर्त्यांनीं त्यांतील कांहीं विचार अजीबात दाबून टाकले ! ते विचार पुढील आशयाचे होतेः—

" हिंदुस्थान स्वतंत्र व्हावा अशी तुह्मांप्रमाणें माझीही फार इच्छा आहे, परंतु स्वातंत्र्य मिळण्यास अंगीं पात्रता लागते ही गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं. अद्यापि तुमच्या अंगीं तो पूर्णपणें आली आहे असें माझ्यानें म्हणवत नाहीं. ती येण्यास तुमची शारारिक, मानसिक व नैतिक स्थिति सुधारली पाहिजे. तुम्ही जीं मुलांमुलींचीं लग्नें लावतां त्यांपासून तुमच्या शारीरिक स्थितीवर अनिष्ट परिणाम घडल्यावाचून राहतील असें तुह्मांस वाटतें काय ? शरीर सुदृढ तर मन सुदृढ. तेव्हां तुम्ही आपली शारीरिक स्थिति सुधारल्यावांचून तुमची मानसिक शक्ति सुधारावी कशी ? तसेंच स्त्रीशिक्षण हें तर समाजसुधारणेचा मूळ पाया होय,

त्याचा प्रसार झाल्यावांचून तुमचा समाज सुधारेल ही आशा व्यर्थ होय." मि. ह्यूम ह्यांचे हे विचार, किंवा पदवीदानसमारंभाच्या वेळीं डॉ. भांडारकरांनीं केलेलें भाषण, व त्यांचीं इतर व्याख्यानें ह्यांत कितीतरी साम्य आहे. परंतु हे विचार आमच्या कित्येक विद्वान् पत्रकर्त्यांना रुचत नसल्यामुळें व ह्यूमसाहेब राजकीय बाबतींत आपल्याच वळणांतले म्हणून त्यांच्यावर टीका न करितां ते विचारच अजीबात गाळून टाकण्यांत आले ! असो.

डॉ. भांडारकरांनीं आपल्या शिष्यांना व त्या कालच्या विद्यार्थ्यांना अशा प्रकारें जागृत करण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यापूर्वी विद्यार्थ्यांनीं विद्यार्थीदशेंत असतांना कसें वागावें, ज्याला सुशिक्षण प्राप्त झालें आहे त्याचें वर्तन कसें असावें ह्याविषयीं त्यांनीं मननीय विचार आपल्या विद्यार्थ्यांपुढें ठेवण्याचा नित्य प्रयत्न केला. आमच्या शिक्षणाचा हेतु म्हणजे केवळ परीक्षा पास होऊन नंतर दोन पैसे मिळविण्याची पात्रता अंगीं आणणें एवढाच होऊन बसला आहे; परंतु अशा शिक्षणानें जें साध्य त्यास आपण मुकल्यासारखे होतों हें जाणून त्यांनीं एकदां सांगितलें कीं, ' आपल्या मनाला जणूं काय एखाद्या उच्चासनीं अधिष्ठित करून तेथून सर्व स्थिति आपले जे पूर्वग्रह झालेले असतील त्यांच्या धोरणानें न पहातां जशी आहे तशी पहाण्याची पात्रता आणणें, हा शिक्षणाचा एक हेतु आहे. ' एकंदरींत पहातां, 'अनेक विषयांसंबंधानें स्पष्ट विचार प्राप्त करून घेणें, निरीक्षण करण्याचें सामर्थ्य संपादणें व तुलनात्मक दृष्टीनें चिकित्सा करण्यास शिकून आपल्या पूर्व ग्रहांच्या ताब्यांत मनास न ठेवतां स्वतंत्रपणें सर्व विषयांचा विचार करण्याची पात्रता व औदार्य आणणें आणि कांहीं विषयांसंबंधानें निश्चित ज्ञान संपादणें हे शिक्षणाचे हेतु होत. '* परंतु अशा प्रकारच्या शिक्षणानेंच सर्व कांहीं साध्य होतें असें मात्र समजतां नये. अशा प्रकारें आपलें मन किंवा बुद्धि यांची तयारी करणें हें एक साधन आहे, परंतु हें साधन प्राप्त झालें म्हणजे त्याच्यावरून ज्याला तें प्राप्त झालें तो स्वतः चांगला आहे असें कांहीं होत नाहीं ' मनुष्याच्या ठिकाणीं अनेक प्रकारच्या वृत्ती व भावना आहेत व त्यांचा त्याच्या

---

* "The acquisition of clear ideas and of the power of observation, comparison and criticism, the freeing of the mind from the narrowness consequent on prepossession or prejudice and a positive knowledge of subjects constitute the aim of mental education."

इच्छाशक्तीवर सतत परिणाम होत असतो; ह्या इच्छाशक्तीच्या द्वारेंच कार्यस्फूर्ति होत असते, म्हणून सत्य व न्याय ह्यांस एके बाजूस सारून स्वतःच्या सुखाची इच्छा बलवत्तर होऊं देतां नये. परोपकाराच्या आड स्वार्थ येतां उपयोगाचा नाहीं. आपली सदसद्विवेकबुद्धि, किंवा आपल्या अंतःकरणांतील मंजुळ ध्वनि, अगर अंतरींचा ज्ञानदिवा जो मार्ग दाखवील त्याच मार्गानें आपल्या सर्व वृत्तींस जाण्याची संवय लावणें हें शिक्षणानें जें कांहीं साध्य आहे त्यांत अत्यंत श्रेष्ठ होय. ' " ज्याला आपल्या स्वतःवर योग्य दाब ठेवतां येत नाहीं, ज्याला सत्य व न्याय ह्यांस अनुसरून आपल्या आचरणास स्वरूप देतां येत नाहीं, किंवा ज्यास आपली विकसित झालेली जी सदसद्विवेकबुद्धि ती ज्या प्रकारचा उपदेश करील त्याप्रमाणें वागतां येत नाहीं, त्यास आपल्या स्वतःला सुशिक्षित असें म्हणवून घेण्याचा कांहीं अधिकारच नाहीं."*

अशा प्रकारें आपल्या मनाची तयारी करावयास कालेजांत शिक्षण होत असतां पुष्कळच संधि मिळत असते. कॉलेजामध्यें जीं पुस्तकें शिकविण्यांत येतात त्यांचा योग्य रीतीनें जर अभ्यास केला, केवळ परीक्षेसाठींच तीं जर वाचलीं नाहींत, तर त्यांच्यायोगें मनावर इष्ट परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं. जीं नाटकें किंवा ज्या कादंबऱ्या कॉलेजांत वाचाव्या लागतात त्यांच्यांत चांगलें व वाईट, सद्गुण व दुर्गुण, ह्यांच्यांत चाललेली जी स्पर्धा ती पुष्कळ वेळां दाखविण्यांत येते; ह्या नाटकांचें व कादंबऱ्यांचें योग्य रीतीनें जर अध्ययन केलें, तर चांगल्यांकडे, सद्गुणांकडे, सद्वृत्तींकडे प्रवृत्ति झाल्यावांचून राहणार नाहीं. आणि प्रत्येक कॉलेजामध्यें जे कित्येक सुशील, सदाचरणी अध्यापक असतात ते विद्यार्थ्यांना जीवंत चालते बोलते कित्तेच होत.

आंमच्या तरुणांना कॉलेजांमध्यें जें शिक्षण मिळतें त्याच्यायोगें आपल्या रीतिभाति, आपल्या संस्था, युरोपिअनांच्या रीतिभाति आणि संस्था ह्यांची तुलना करून आपलें जें कांहीं वाईट व अनिष्ट आहे तें शोधून काढून त्याचा त्याग करण्याची इच्छा अंतःकरणांत उत्पन्न झाली पाहिजे. कारण हें आम्हीं

* A man has no right to be called an educated man if he has not acquired the habit of controlling himself and shaping his action in accordance with truth and justice, the dictates of an enlightened or cultured conscience.

*Ends and Aims of College Education.*

नित्य आपल्या दृष्टीपुढें ठेविलें पाहिजे कीं, आपल्या एकंदर समाजामध्यें जें कांहीं अनिष्ट किंवा वाईट आहे तें पाहून तें काढून टाकल्यावाचून आमची उन्नति होण्याची आशा करणें हें अगदीं व्यर्थ आहे, आणि ह्या बाबतींच्या विचारांत दोन प्रकारचें वळण लागण्याची भीति आहे. "कोणास असें वाटण्याचा संभव आहे कीं, ह्या ज्या नवीन सुधारणेशीं त्याचा परिचय होत आहे, तिच्यामध्यें जें जें कांहीं आहे तें सर्व चांगलें. आणि त्याचा स्वीकार करणें अवश्य आहे. अशा रीतीनें इतरांच्या लहानसहान चालीरीतींचा व संवयींचा सरसकट स्वीकार करणें हें कोत्या बुद्धीचें दर्शक होय; परंतु आपल्या ठिकाणीं जी जागृति झाली आहे, आपल्याला जें शिक्षण मिळालें आहे त्याच्यायोगेंही आपल्या समाजांतील दुष्ट चालीरीति कळत नाहींत असें दाखविणें, किंवा जें कांहीं आपलें जुनें व पूर्वापर आहे तें सर्व चांगलेंच आहे असें आग्रहानें प्रतिपादणें हा केवळ मूर्खपणा व आपल्या चालीरीति व संस्था ह्यांच्या संबंधानें खोटा अभिमान होय; आणि दोन्ही समाजांतील स्थितींची तुलना करूनही आपल्या स्थितीप्रमाणें वरील प्रकारचा आग्रह धरणें ह्मणजे भावी उन्नतीविषयींची सर्व आशा खुंटविणें होय." हा असा परिणाम होतो म्हणून त्यांनीं तरुणांस मोठ्या कळकळीनें असा उपदेश केला आहे: "स्वदेशाभिमान व स्वातंत्र्य ह्यांच्या वृथा कल्पनांना तुम्ही भुलून जाऊं नका. जें कांहीं चांगलें आहे, सत्य आहे, मग तें स्वदेशीयांकडून प्राप्त होवो किंवा परदेशीयांकडून होवो, त्याचा आदरानें स्वीकार करण्याची तुमची तयारी पाहिजे. आपल्याला अनुभव बिलकूल नसून तो आहे असें लटकेंच दाखवून इतरांना दोन गोष्टी सांगण्याचा आव एव्हांच घालूं नका. तुम्हांला अनुभव प्राप्त होईपर्यंत त्याला अवकाश आहे. आज तुम्ही आपले सर्व शिक्षक, आपलीं मातापितरें ह्यांच्यासंबंधानें मनामध्यें अत्यंत आदरबुद्धि राखा म्हणजे त्याच्यायोगें जें जें कांहीं सत्य व चांगलें आहे, त्याच्यासंबंधानें आदर राखण्याचा गुण तुम्हांस प्राप्त होईल. विद्यार्थीदशेंत असतांना केवळ अभ्यासाकडील लक्ष कमी न करणें हें आज तुमचें मुख्य कर्तव्य आहे, हें लक्षांत ठेवा. चैनीच्या, ऐषआरामाच्या कोणत्याही गोष्टीकडे तुमचें लक्ष जातां नये. अशा रीतीनें जर तुम्हीं वागाल तरच तुमच्या मानसिक शक्तींची वाढ होईल, नीतिबल वाढून तुमचें शील बनलें जाईल. अशा रीतीनें आपली तयारी जर तुम्ही कराल तरच ह्या पतित देशाचा उद्धार करण्याची व इतर राष्ट्रांशीं टक्कर मारण्याची पात्रता त्याच्यामध्यें तुम्हीं आणूं शकाल."

## डॉ. भांडारकर व प्रार्थनासमाज.

" येथील प्रार्थनासमाज ह्यांच्या जाण्यामुळें केवळ उघडा पडल्यासारखा झाला आहे, ह्यामुळें मात्र खेद वाटतो. आज सुमारें दहा वर्षे हे ( डॉ. भांडारकर ) या समाजाचे उपाध्यक्ष असून समाजसंबंधीं बहुतेक कामांचा पुढारीपणा ह्यांच्याकडे होता. धर्मसंबंधीं विचारांचा सर्व बोजा यांनीं आपल्या शिरावर घेतला होता आणि त्या कामांत यांची बरोबरी करणारा किंवा ह्यांच्या जवळ जवळ पोंचणारासुद्धां सभासद आज आम्हांमध्यें नाहीं, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. समाजाविषयीं अनेक गैरसमज कित्येक सभासदांच्या व इतर लोकांच्या मनांत होते ते बहुतेक अंशीं घालवून त्याच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान ह्यांनींच करून दिलें; तसेंच समाजाची हल्लीं जी स्थिति आहे ती मुख्यत्वेंकरून ह्यांच्याच योगानें प्राप्त झाली असें म्हटलें पाहिजे. समाजाचे सर्व सभासद यांची विद्वत्ता, योग्यता, आस्था व उद्योग जाणून यांस मोठा मान देत असत. अशा पुरुषाच्या जाण्यामुळें समाजाच्या एकंदर सभासदांस आतां समाजाचें कसें होईल म्हणून चिंता उत्पन्न झाली आहे, ह्यांत कांहीं फारसें आश्चर्य नाहीं " असे उद्गार १८८२ सालीं ज्या वेळीं डॉ. भांडारकर डेक्कन कॉलेजमध्यें संस्कृताचें अध्यापक होऊन गेले त्यावेळीं सुबोधपत्रिकेनें काढिले. त्याला आतां जवळ जवळ ४५ वर्षे झालीं. तेव्हां गेलीं पन्नास पंचावन्न वर्षे सतत कोणा एका संस्थेची डा. भांडारकरांनीं जर सेवा बजाविली असली तर ती **प्रार्थनासमाज** ही संस्था आहे. ह्या एवढ्या अवधींत त्यांचीं जीं शेंकडों धर्मपर व्याख्यानें झालीं त्यांचा अत्यल्प भाग व तोही साररूपानें त्यांच्या व्याख्यानांच्या संग्रहांत आलेला आहे. परंतु त्यांनीं ह्या दीर्घ काळांत प्रार्थनासमाजाची जी सेवा बजाविली आहे, जें धर्मप्रचाराचें काम केलें आहे, आपलीं व्याख्यानें, आपले लेख, आपलीं कीर्तनें, आपली विद्वत्ता, आपली सत्यप्रीति व आपलें धर्माचरण ह्यांच्या द्वारें जो कित्ता घालून दिला आहे त्याचें जसेंच्या तसें वर्णन करण्याची पात्रता प्रस्तुत लेखकामध्यें बिलकूल नाहीं. तसा त्याचा अधिकारही नाहीं, हें तो पूर्णपणें जाणून आहे. गेलीं तीस वर्षे त्यानें ह्या समाजांत जीं घालविलीं आहेत, तेवढ्या अवधींत त्याला समाज, समाजकार्य व समाजाचे पुढारी ह्यांच्यासंबंधानें जी माहिती झाली आहे, त्याचप्रमाणें प्रत्यक्ष सहवास व समाजाच्या वर्तमानपत्राच्या जुन्या अंकांचें लक्षपूर्वक वाचन ह्यांच्याद्वारें प्रार्थनासमाजाचे पुढारी व प्रधान आचार्य गुरुवर्य डॉ. भांडारकर ह्यांनीं प्रार्थनासमाजाच्या द्वारें केलेल्या धर्मसेवेची कल्पना

त्याला जी झाली आहे तिची अस्पष्ट छाया तरी वाचकांपुढें ठेवण्याचें धाडस तो येथें कर्तव्य म्हणून करीत आहे. डॉ. भांडारकरांच्या योग्यतेनुरूप पुढील छायाचित्र वठलें नाहीं असा जर अनुभव आला तर तो अनधिकारी लेखकाचा दोष असें समजून वाचकांनीं त्यास क्षमा करावी.

प्रार्थनासमाजासंबंधानें डॉ. भांडारकरांकडून झालेल्या कार्याविषयीं वाचकांस कल्पना करून देण्यापूर्वी खुद्द प्रार्थनासमाजाची मूळपीठिका येथें दिली पाहिजे. प्रार्थनासमाज "स्थापन होण्यास वास्तविक कारण म्हटलें असतां ह्या देशांतील इंग्रजी विद्येचा प्रसार हें होय. ह्या विद्येचा प्रसार झाल्यापासून सुशिक्षित लोकांमध्यें सत्यासत्य, योग्यायोग्य, कर्तव्याकर्तव्य ह्यांविषयीं विचार करण्याची शक्ति वाढत चालली. लोकरूढीस अनुसरून व धर्माच्या नांवानें ज्या शेकडों गोष्टी आपण नेहमीं करितों, त्यांत कित्येक अगदीं निरर्थक आहेत, व कित्येक तर हानिकारक आहेत. याकरितां त्यांचा त्याग केला पाहिजे व कित्येक गोष्टींचा प्रचार आपणांत नाहीं, पण त्यांची फार आवश्यकता आहे, याकरितां त्या चालू केल्या पाहिजेत, असें कित्येक सुशिक्षित लोकांस वाटूं लागलें. कांहीं दिवसपर्यंत असे नुसते विचार मनांत येतां येतां पुढें त्या विचारांप्रमाणें प्रत्यक्ष आचरण घडलें पाहिजे असें मनांत येऊन जेथें इंग्रजी विद्येचा विशेष फैलाव झालेलीं अशीं ह्या देशांतील मुख्य कलकत्ता, मुंबई व मद्रास हीं शहरें तेथें वरील उद्देशाच्या सिद्ध्यर्थ प्रथम मंडळ्या स्थापित होऊं लागल्या. सन १८३० सालीं कलकत्ता येथें ब्राह्मसमाज ह्या नांवाची मंडळी राजा राममोहन राय यांनीं स्थापन केली." पुढें १८४० सालीं मुंबईत परमहंस सभा कशी स्थापन झाली, ती बंद कशी पडली व त्यानंतर प्रार्थनासमाजाची कशी स्थापना झाली, स्थापना झाल्यानंतर डा. भांडारकरांनीं तत्वांची पुनर्घटना कशी केली ह्याचें सविस्तर विवेचन ह्या इतिहासांत आल्यामुळें तेंच येथें देत नाहीं.

पूर्वीच्या तत्त्वांमध्यें परमेश्वरविषयक सिद्धांत विशेष सविस्तर रीतीनें नव्हता; परंतु, समाज स्थापन करणारांची जरी समजूत झालेली असली, व त्यांचे विचार जरी ठरलेले असले तरी भावी प्रजेच्या हितासाठीं समाजाची परमेश्वर संबंधाची समजूत सूत्ररूपानें ठरलेलीच असणें जरूर होतें; म्हणून सर्व देशींच्या उदार धर्मास शोभण्यासारखाच पहिला सिद्धांत ठरविण्यांत आलेला आहे, हें तो मननपूर्वक वाचणाऱ्यांच्या लक्षांत येईल. ह्यांत कांहीं वर्षांमागें "प्रेमस्वरूप" ह्या शब्दाची भर घालण्यांत आली. दुसरें असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, प्रार्थनास-

माजाचा धर्म हें केवळ हिंदुधर्मांचें नव्हे तर ख्रिस्ती, मुसलमान, वगैरे म्हणजे मनुष्यमात्रास जडलेला जो धर्म त्याचें विकसित झालेल्या बुद्धीनें शोधित असें स्वरूप आहे. पूर्वीच्या सिद्धांतांमध्यें प्रतिमापूजनासंबंधानें फार कठोर उद्गार आहेत, तितक्या कठोरतेची धर्मसिद्धांत ठरवितेवेळीं आवश्यकता नाहीं. व्यक्तिशः डॉ. भांडारकरांचें ह्या बाबतींत असें मत आहे कीं, "प्रतिमापूजन हें पाप आहे असें नाहीं; तो ईश्वरोपासनेचा खरा मार्ग नव्हे. म्हणून खरा जो मार्ग नव्हे त्याचें अवलंबन लौकिकासाठीं करणें हा प्रकार अत्यंत लघुता आणणारा आहे. पाप आहे असें मला वाटत नाहीं. मात्र **मूर्तिपूजेवर श्रद्धा नसून श्रद्धा आहे असें भासविलें तर तें पाप होईल.**" पूर्वीच्या तत्वांत अवतारवाद, ग्रंथांचें ईश्वरप्रणीतत्व ह्यांसंबंधानें कांहीं उल्लेख नाहीं. अशीं हीं तत्त्वें ठरल्यानंतर तीं ज्यांच्या बुद्धीस पटतात, ज्यांच्या विचारांस पटतात, त्यांस केवळ तेवढयाच कारणावरून समाजांत दाखल करावयास हरकत नाहीं असें मात्र डॉ. भांडारकरांस वाटत नाहीं. त्यांनीं एके ठिकाणीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, "ज्यांस मतें मान्य आहेत आणि जे प्रतिज्ञेप्रमाणें शुद्ध निष्कपट भावानें त्यांस अनुसरून आचरण करण्याचा यत्न करण्यास सिद्ध असतील त्यांसच सभासद करावें. समाजांत प्रविष्ट होऊन मारुति व गणपति ह्यांसारख्या देवतांची जो पूजा करितो आणि त्यांस नवस करितो तो समाजाचा योग्य सभासद नव्हे."

अशा प्रकारें तत्त्वांची सिद्धता झाल्यापासून जवळजवळ ५० वर्षेपर्यंत ह्या तत्त्वांचा प्रसार करण्याचें थोर कार्य डॉ. भांडारकरांनीं सतत केलें.

## धर्मप्रसाराचें कार्य.

प्रार्थनासमाजाचीं जीं सहा तत्त्वें १८७३ सालीं निश्चित करण्यांत आलीं त्यांचा प्रसार करण्याचें काम गेलीं जवळ जवळ पन्नास वर्षे डॉ. भांडारकरांनीं केलें असें वर म्हटलें आहे. आतां विशेषतः तीन साधनांच्या द्वारें कोणत्याही धर्माचा अगर धर्ममतांचा प्रसार करितां येतो. पहिलें, व सर्वांत मोठें साधन म्हणजे व्यक्तीचें शील, व्यक्तीचें आचरण. दुसरीं साधनें व्यक्तीचे विचार व उद्गार म्हणजे व्याख्यानें वगैरे. प्रत्येक व्यक्तीच्या शीलाचा, मग ती व्यक्ति श्रीमंत असो, गरीब असो, विद्वान् असो अगर नसो, एकंदर समाजावर कमी अधिक प्रमाणानें परिणाम होत असतो. म्हणून आपल्या विचारांस शोभण्यासारखें जर आपलें शील नसलें, तर त्या विचारांची योग्यता कमी ठरतेच; परंतु ह्या

विसंगतीमुळें त्या मनुष्याचा आमच्या एकंदर समाजावर अत्यंत अनिष्ट असा परिणाम होत असतो. ह्या दृष्टीनें पहातां प्रार्थनासमाजाचा प्रत्येक सभासद कसा प्रचारक आहे तें उघड होतें. डॉ. भांडारकरांनीं आपण प्रार्थनासमाजाचे एक प्रचारक आहोंत ही गोष्ट आपल्या तरुणपणापासून आपल्या मनांत बिंबविली होती व त्या बरहुकूम त्यांचें आचरण असल्यामुळें त्यांच्या एकंदर आचरणाचा, त्यांच्या तेजेस्वी शीलाचा परिणाम समाजावर अत्यंत इष्ट असा झालेला आहे. त्यांची असामान्य सत्यप्रिति, त्यांचा करारीपणा, त्यांचें अत्यंत प्रखर आत्मपरीक्षण, त्यांची भक्ति, त्यांचा परमेश्वरावरील दृढभाव, परमेश्वराच्या मंगल योजनेवरील त्यांची निष्ठा इ० त्यांच्या अलौकिक गुणांचा प्रकाश त्यांच्या आचरणाच्या, त्यांच्या विचारांच्या व त्यांच्या उच्चारांच्या द्वारें पडत आहे. मनुष्य व देव ह्यांचा संबंध अशा विषयांसंबंधानें डॉ. भांडारकरांशीं एक तास अर्धा तास ज्या कोणास संभाषण ऐकण्याची संधि मिळाली असेल त्यांस परमेश्वराची अघटित योजना, मनुष्याचें कर्तव्य, त्याची पापाकडील प्रवृत्ति, आपल्या अंतःकरणाला वारंवार जागृत करण्याची आवश्यकता ह्यासंबंधाच्या त्यांच्या स्वानुभवपर विचारांचा तुकोबा, नामदेव, कबीर, नानक आदिकरून साधुसंत व पुरातन ऋषींचीं वचनें ह्यांच्या आधारें सारखा वहाणारा ओघ पाहून त्यांच्या जागृतीचा प्रत्यक्ष अनुभव पटून त्याच वेळीं आपली निद्रितावस्था आपल्या अनुभवास येऊन आपली आपल्याला लाज वाटूं लागे. आपण प्रार्थनासमाजाचे एक सभासद आहोंत, प्रार्थनासमाजाचीं सहा तत्त्वें स्वतः आपल्या अनुभवास पटवून त्यांचा प्रसार करणें हें आपलें कर्तव्य आहे, हा आपला थोर अधिकार आहे, अशी त्यांच्या ठिकाणीं सतत जागृति असे. ह्या जागृतीमुळें गेल्या पन्नास वर्षांत त्यांनीं जी देवाची सेवा केली आहे तिची यथार्थ कल्पना प्रस्तुत अनधिकारी अननुभवी लेखक कशी करून देणार ? आणि हें धर्मप्रसाराचें कार्य त्यांनीं वर म्हटल्याप्रमाणें आपलें स्वतःचें शील, आपले लेख, उपासना, व्याख्यानें व उपदेश व कीर्तनें ह्यांच्याद्वारें केलें आहे. त्यांनीं **सुबोधपत्रिके**साठीं लिहिलेले बहुतेक लेख आतां एकत्र प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचीं कांहीं व्याख्यानें साररूपानें आतां जनसमूहापुढें आहेतच. परंतु त्यांच्या नित्याच्या प्रार्थना, नित्याचें आत्मपरीक्षण ह्यांच्यायोगें त्यांना आपलें हें धर्मप्रसाराचें कार्य करण्यास सामर्थ्य प्राप्त होत असतें, हें आमच्या तरुण पिढीनें लक्षांत ठेविलें पाहिजे. ह्या त्यांच्या घरगुती उपासनांस अनुलक्षून रा. रा. कोरगांवकरांनीं आपला अनुभव पुढीलप्रमाणें लिहून ठेवला आहेः—

"दादांनीं मूर्तिपूजा आपल्यासारख्या शिकलेल्या विचारी माणसांना पापमूलक म्हणून तिचा त्याग केला होता पण देवपूजा ते नित्यनेमानें करीत असत. लोणावळें येथें असतांना फिरून येऊन थोडी विश्रांति घेतल्यावर आमचें स्नान व्हावयाचें. त्यानंतर दादांनीं स्नान करून स्वच्छ कपडे घालून प्रार्थनेच्या खोलींत आपली तंबुरी घेऊन बसावयाचें. आम्ही मुलगे समोर व बाजूला बायका मंडळी बसल्यावर दादांनीं तंबुरीच्या सुरांत निरनिराळ्या रागांत-विशेषतः भैरव, भैरवी, भूप, असावरी, तोडी, केदार व जोगी या रागांत आपल्या आवडीच्या अभंगांपैकीं चार पांच अभंग एका मागून एक असे म्हणावे व आम्ही ते पुस्तकांत पाहून त्यांच्याबरोबर म्हणावे. याप्रमाणें भजन झाल्यावर गाइलेल्या एकाद्या अभंगाच्या आधारें दादा प्रार्थना करीत. ती प्रार्थना स्वाशयनिवेदनपर, किंवा आत्मपरीक्षणपर असून स्वतःला उद्देशून असे. प्रार्थना होत असतां दादांच्या डोळ्यांतून कधीं आनंदाचे तर कधीं खेदाचे अश्रुबिंदु हलुहलु गालांवरून खालीं पडत. आधींच तें स्थळ अत्यंत रम्य, नैसर्गिक सौंदर्यानें चारी दिशा पूर्ण भरलेल्या, खिडक्यांतून दरवाजांतून बाहेर दृष्टि गेली तर एकापेक्षां एक उंच अशा गगनचुंबित पर्वतांच्या रांगा दिसावयाच्या, आंगावरून स्वच्छ शीतल वायु वाहावयाचा, अशा त्या रमणीय स्थळीं दुपारचे अकरा वाजण्याच्या शांतवेळीं हे महर्षि आपल्या परिवारासह बसून जगत्पित्याचें नामगान करून त्याच्यापुढें आपलें हृद्गत मोकळ्या मनानें निवेदन करीत असलेले पाहून एकाद्या नास्तिकाच्याही मनांत आस्तिक्यभाव उत्पन्न झाल्यावांचून राहावयाचा नाहीं. मग आमच्यासारख्यांच्या कोमल अविकृत मनावर सुपरिणाम झाला तर नवल काय ?

ही त्यांची नित्याची उपासना केवळ सुटीच्या दिवसांत वेळ पुष्कळ असतो म्हणून ते करीत असत असें नाहीं. प्रार्थनासमाजाच्या कुटुंबांमध्यें धर्मजागृति कशी राहील याविषयीं समाजाच्या प्रस्थापक मंडळीमध्यें ऊहापोह होऊन यास मुख्य उपाय म्हटला म्हणजे कौटुंबिक उपासना असें ठरल्यापासून दादांनीं जी ही उपासनापद्धति आपल्या कुटुंबांत सुरू केली ती त्यांच्या वाचेंत बोलण्याची शक्ति होती तेथपर्यंत अव्याहत चालविली इतकेंच नाहीं तर वाचा बंद झाल्यावर ही आंतरिक रीतीनेंही त्यांची उपासना नियमानें चालू होती."

त्यांच्या धर्मप्रसाराच्या कार्यासंबंधानें दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं, मंदिरामध्यें ते ज्या उपासना चालवीत त्या विशेषतः स्वतःच्या लाभासाठीं अस-

तात आणि म्हणून मंदिरांतील साप्ताहिक अगर विशेष उपासना चालवावयाची त्यांची नेहमीं सिद्धता असे. १८८२ सालीं मुंबई सोडून ते जेव्हां पुण्यास गेले त्यावेळीं त्यांच्या सन्मानार्थ जो एक लहानसा समारंभ करण्यांत आला होता त्यांत त्यांनीं सांगितलें कीं, " मी प्रथम धर्मोपदेश करूं लागलों तेव्हां मला तें मोठें ओझें वाटत असे, परंतु मी धीर न सोडतां सतत यत्न चालविला. तसतसें तें काम मला सुलभ व आनंददायक होऊं लागलें आणि आतां मला असें वाटतें कीं, या अभ्यासापासून इतरांला जो कांहीं लाभ होत असेल त्यापेक्षांही मला स्वतांला मोठा लाभ झाला आहे.'' आणि ही तरुणांस अत्यंत अनुकरणीय व लाभदायक अशी त्यांची वृत्ति सामर्थ्य होतें तोंपर्यंत कायम होती.

## आक्षेपांचें निरसन.

प्रार्थनासमाजावर आजपर्यंत अनेक प्रकारचे आक्षेप आले आहेत व नित्य येत आहेत. त्यांपैकीं अनेक आक्षेपांचें त्यांनीं निरसन केल्याचा उल्लेख या भागाच्या प्रारंभींच्या अवतरणांत आलाच आहे. हें निरसनाचें कार्य त्यांचें नित्य चालू असे. धर्मपर लेखांत व व्याख्यानांत त्यांनीं अनेक आक्षेपांस समर्पक उत्तरें दिलीं आहेत. धर्मपर विषयांसंबंधानें आस्था असणारांचा प्रार्थनासमाजासंबंधानें जर कांहीं गैरसमज झालेला आहे असें त्यांच्या अनुभवास आलें, तर त्यांचा गैरसमज तात्काळ दूर करण्याचा ते प्रयत्न करीत. त्यांचा गैरसमज दूर करणें त्यांच्या हातांत नसे. परंतु वास्तविक स्थिति त्यांच्या निदर्शनास आणून प्रार्थना-समाजाचा आपल्याला असलेला योग्य अभिमान ते व्यक्त करीत. प्रार्थना-समाजावर एक वारंवार असा आक्षेप घेण्यांत येत असतो कीं, ही संस्था ' निर्गुणोपासक' आहे. खरें पहातां 'निर्गुणाची' 'उपासना' होणें शक्य नाहीं आणि प्रार्थनासमाजाचा पहिला सिद्धान्त पाहिला म्हणजे प्रार्थनासमाज निर्गुणो-पासक नाहीं हें व्यक्त होतें. परंतु प्रार्थनासमाज जर निगुणोपासक नाहीं, तर तो अर्थात् सगुणोपासक आहे, आणि सुगुणोपासनेंत प्रतिमापूजनाचाही अंतर्भाव होतो, म्हणून प्रर्थनासमाजास मान्य असणारी जी

## सगुणोपासना

तिच्यासंबंधानें त्यांनीं आपला अभिप्राय स्पष्टपणें कळविला. हा अभिप्राय इतिहा-साच्या पृ. ८५-८६ वर दिला आहे.

अशा प्रकारें त्यांनीं अनेक आक्षेपांचें निरसन करून प्रार्थनासमाजास मान्य असलेल्या धर्मतत्त्वांचें वास्तविक स्वरूप लोकांपुढें ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

आणि ह्या प्रयत्नांची साक्ष त्यांचे लेख व व्याख्यानें उत्तम रीतीनें पटवून देत आहेत. * त्यांची अशी दृढ श्रद्धा असे कीं, " सगळया हिंदुस्थान देशाची उन्नति करणारा असा हा धर्म आहे...तूर्त हिंदुस्थानांत नीतीची उचल झाली पाहिजे आणि ही उचल ब्राह्मसमाजाच्याच हातून होईल. नुसती हिंदुलोकांची स्तुति केल्यानें त्यांना नैतिक उन्नति प्राप्त होणार नाहीं...हिंदुस्थानांत अखेरीस

**एकेश्वरी धर्मच**

लोकांचा धर्म होणार असें माझें मत आहे. हा धर्म विचारास धरून आहे. इतकेंच नाहीं, तर त्याप्रमाणें आचरणही करतां येण्यासारखें आहे. म्हणून ब्राह्म-प्रार्थनासमाजाच्या सभासदांनीं आपलें वर्तन कित्ता ठेवण्यासारखें ठेविलें पाहिजे. आमच्यामध्यें अत्यंत शुभ असें कांहीं तरी नवीन आहे, आमचें वर्तन नीतीला अनुसरून आहे व आत्म्यास उन्नत करण्यासारखीं तत्त्वें आमच्या धर्मांत आहेत असें लोकांच्या दृष्टीस आम्हीं आणून दिलें पाहिजे. कारण, आज व्यक्तीला किंवा राष्ट्राला जसा धर्म पाहिजे तसा आमचा धर्म आहे." अशा प्रकारचा जो हा श्रेष्ठ धर्म त्याच्या साधनास प्रपंच, आमचा नित्याचा व्यवहार, आमचे ऐहिक उद्योग आड येतात अशी साधारण समजूत आहे. परंतु ही मोठी चूक आहे. **प्रपंच परमार्थास जाचक नसून** वास्तविक पहातां पोषक आहे. तसा तो पोषक आम्हांस करितां येण्यासारखा आहे हें आम्हीं नित्य लक्षांत ठेविलें पाहिजे, असा इषारा **संगत सभेतील**† वादविवादाच्या वेळीं १८८१ सालीं त्यांनीं दिला आहे; तो असाः—

" प्रपंच आणि परमार्थ यांमध्यें हल्लीं विरोध आहे; कारण, प्रपंचांतील ऐहिक सुखांच्या साधनार्थ अति परिश्रम करतां करतां हल्लीं कित्येक विद्यासंपन्न, ज्ञानसंपन्न व ऐश्वर्यवान् अशाही यूरोपीय राष्ट्रांमध्यें स्वार्थपरतेमुळें एकमेकांविषयीं दुरभिमान, वैरभाव वगैरे वाढून एकमेकांच्या नाशार्थ जसे काय अधिकाधिक शोध चालले आहेत. असें पाहिलें म्हणजे प्रपंच करूं नये असें वाटतें. परंतु मनुष्यांमध्यें राहून मनुष्याचें देवधर्माविषयीं ज्ञान वाढतें हें खरें. तेव्हां प्रपंच करणें हें आपलें कर्तव्य होय. आणि हा लाभ ज्यापेक्षां सर्वांस होण्यासारखा असावा त्यापेक्षां सर्वांनीं

---

* आक्षेपनिरसन असें त्यांचें एक धर्मपर व्याख्यान आहे तें पहावें.

† हा भाग संगत सभा प्रकरणांत दिलेला नाहीं.

संसार करून राहावें हें योग्य दिसतें. आतां तुकोबासारखा निर्मोहापुरता करावा म्हटलें तर त्यांच्याप्रमाणें सर्वांच्या बुद्धीचा तशानें उत्तरोत्तर प्रकाश होणार नाहीं. तेव्हां संसार, शोध, सुधारणा यांची होईल तितकी वृद्धि करावी हें उचित. परंतु ह्यांच्यायोगें कामक्रोधादिक प्रबल होतील हें खरें आहे. तर मग हा विरोध दूर करण्याचा प्रयत्न अशा रीतीनें आपण केला पाहिजे. ज्या रिपूंशीं युद्ध करून त्यांस दुर्जय करण्याच्या संधी संसारांत आल्याच पाहिजेत, ते असे प्रबल असतां त्यांस जिंकणें यांतच पराक्रम आहे. त्यांच्या भीतीनें आपलें एवढें मोठें कार्य सोडूं नये. मात्र स्वार्थाचा त्याग करावा. प्रपंचाच्या योगानें परमार्थाकडे लक्ष लागत नाहीं हा आपला दोष आहे. म्हणून जनकराजासारखा प्रपंच करून दोषमुक्त व्हावें, प्रपंचांतच उन्नति होते. कामक्रोधादिकांचा व विवेकाचा प्रपंचांत झगडा दिसतो खरा. पण सर्वप्रकारें सद्वृत्तींची वृद्धि करून या रिपूंचा पराजय तें अत्यंत प्रबळ असतील तेथें त्यांस गांठून करणें हेच शौर्य व वैभव होय. आपण कामक्रोधादिक जेणेंकरून प्रबळ होण्याचा संभव आहे असा संसार मात्र करितों; त्याबरोबर त्यांस जिंकण्याचीं साधनें जशीं प्रबळ असावीं तशीं योजित नाहीं. तर असें करूं नये. प्रपंच म्हणजे ईश्वराची पूजा असें झालें पाहिजे, म्हणजे मग प्रपंचाकडेस विशेष लक्ष देणारे परमार्थास मुकणार नाहींत. व परमार्थाकडे विशेष लक्ष देणारे प्रपंचास मुकणार नाहींत. ते ईश्वराची इच्छा दोन्ही पक्षीं सिद्धीस नेऊन प्रपंच आणि परमार्थ ह्यांचें एकीकरण करीत आहेत असें होईल. यूरोपीय लोकांप्रमाणें प्रपंच आणि आपल्या लोकांप्रमाणें परमार्थ ह्यांचे ऐक्य झालें म्हणजे ठीक होईल. जन्मास येऊन ईश्वरप्राप्ति करणें आहे, आणि धर्मानें प्रपंच केला असतांना त्यानें परमार्थास मोठें साहाय्य होतें. तेव्हां मनुष्यानें कर्मयोगी व्हावें म्हणजे प्रपंच करावा हेंच उचित आहे. क्रियासामर्थ्य ईश्वरानेंच आपणास दिलें आहे, तर त्याचा सदुपयोग करणें आपलें मोठें कर्तव्य होय. पुन्हा असें कीं, कर्म कोणी सोडूं म्हणतील तर तें सुटणार नाहीं व सोडणें योग्यहि नव्हे, **सत्कार्यें हीं पुष्पें होत, तीं वाहून संसारमंदिरीं देव पुजावा.** भगवद्गीतेचा व ज्ञानोबांचा याविषयीं असाच सिद्धांत आहे. प्रपंच व परमार्थ ह्यांत जो विरोध होतो तो आपला दोष आहे आणि तो ज्या प्रकारचा प्रपंच आपण करितों, म्हणजे केवळ स्वार्थासाठीं जो प्रपंच करितों त्यानें होतो. प्रपंच म्हणजे केवळ परमार्थ बुद्धीनेंच करावा. सत्समागम, भजन, कीर्तन इत्यादि साधनांनीं हें साध्य होईल आणि मग प्रपंच आणि परमार्थ हे

एकमेकांच्या पूरणार्थ साहाय्यार्थ होतील. सारांश, खरा प्रपंच व खरा परमार्थ यांत विरोध नाहीं; इतकेंच नव्हे, तर एक सोडून दुसऱ्याचें साधन करणें संपूर्ण धर्म नव्हे व मनुष्याचें अखिल कर्तव्य नव्हे, आणि एकानेंच ईश्वरप्राप्ति पुरी होणें नाहीं, म्हणून दोहोंचें साधन केलें पाहिजे आणि असें केल्यानें दोन्हींच्या पूर्ण सुखाचा मनुष्यास अनुभव येईल."

प्रपंच आणि परमार्थ ह्या दोहोंचें साधन केलें पाहिजे असा त्यांचा उपदेश असे आणि ह्या दोहोंचेंही साधन त्यांस झालें हें त्यांच्या चरित्राचा विचार केला असतांना कोणासही आढळून येण्यासारखें आहे. परंतु ह्या मार्गांतील अडचणी त्यांच्या लक्षांत आलेल्या नाहींत, असें त्यांचीं धर्मपर व्याख्यानें वाचणारा कोणीही म्हणणार नाहीं. अडचणी वारंवार येतात, केलेले निश्चय क्षणार्धामध्यें आम्ही विसरतों. 'स्मरणींच विस्मरण' असें आमचें वारंवार होतें. सत्कार्याच्या द्वारेंच अहंतेचें पुष्टीकरण होतें आणि एकदां अहंता बळावली कीं धर्मोन्नतीची वाढ खुंटलीच असें त्यांचें वारंवार सांगणें आहे. आणि म्हणून तर

## एकांतवास व आत्मपरीक्षण

ह्यांची अत्यंत आवश्यकता आहे. कारण, "एकांतवासांत असतां आपण स्वतः विचार केल्यानें जो आपल्याला अनुभव येतो, तसा अनुभव प्रपंचांत राहून आपल्याला आला पाहिजे. तेथें ( एकांतवासांत ) आपल्याला परमेश्वराचें जें सामर्थ्य दिसतें तें आपण येथें पाहिलें पाहिजे. तेथें आपल्या कल्पनासुसरीच्या मिठीनें कोण अनर्थ होत आहेत त्यांची इतरांची प्रपंचांतील स्थिति पाहून साक्ष पटली तर येथें ( संसारांत ) त्या सुसरीपासून लांब राहण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. तेथें परमेश्वराच्या व्यवस्थेंत सर्वत्र नियम, सर्वत्र व्यवस्था, सर्वत्र आनंद, प्रेम, सुयोजना हीं आपल्याला आढळलीं, तर तो अनुभव प्रपंचांत आणून त्याच्या अनुरोधानें आपण वागलें पाहिजे. मत्सर, क्रोध, अविवेक ह्यांचा परित्याग करून, येणेंप्रमाणें अविवेकाचा आपल्यावर ताबा होणार नाहीं अशा रीतीनें आपण वागलें पाहिजे. आपणासारख्यांना हेंच उचित आहे, हाच सत्य मार्ग आहे, आणि हाच देवाला प्रिय आहे यांत कांहीं संदेह नाहीं."

## अनधिकारी माणसें.

धर्मतत्त्वाविषयीं त्यांचा अभिप्राय वर एके ठिकाणीं दिला आहे; परंतु त्या तत्त्वांचा प्रसार करावयास जी पात्रता लागते ती आपणा सर्व सभासदांत नाहीं

ह्याची प्रखर जागृति त्यांच्या ठिकाणीं असे, म्हणून तर त्यांनीं एकदां म्हटलें कीं, "समाजांत प्रविष्ट झालेल्या लोकांत आपण स्वीकारलेल्या धर्माचा प्रसार करण्याची योग्यता असावी तशी नाहीं, परमेश्वराच्या ठायीं दृढनिष्ठा नाहीं, स्वार्थत्यागाची तयारी नाहीं, धर्माचा प्रचार करूं लागलों असतां त्यापासून होणारीं सर्व प्रकारचीं दुःखें सहन करण्याची तयारी नाहीं, भूतदया अंतःकरणांत वास करीत नाहीं; यामुळें समाजाचा धर्म व्हावा तसा जयशाली होत नाहीं." आणि ही पात्रता नसल्यामुळें सत्कार्यांच्या द्वारेंही अहंता जतन होण्याचा संभव आहे याची जागृति विशेषतः तरुण सभासदांस ते वारंवार करून देत असत. वारंवार उपासना, वारंवार भजन, उत्सवांतील कार्यें वगैरे अत्यंत स्तुत्य उद्योगांत समाजांतील तरुण जरी गुंतले, जरी त्यांचा इष्ट उद्योग पाहून समाधान प्रदर्शित करीत असतांनाही तरुणांस ते जागृत करीत असत कीं, संभाळा, जें कांहीं करीत आहां, त्यांत धर्मबुद्धि जागृत ठेवा, केवळ लोकांना दाखविण्यासाठीं पसारा मांडूं नका. ह्या उद्योगामुळें चित्ताला समाधान प्राप्त होऊन समाधानाची वृत्ति कांहीं काळपर्यंत तरी राहील तर बरें.*

धर्मप्रसाराच्या ह्या कार्याची सर्व जबाबदारी आतां तरुणांवर, नव्या पिढीवर, येऊन पडली आहे, म्हणून त्या पिढीकडे त्यांचें सतत लक्ष असे. आणि जेव्हां जेव्हां त्यांच्यांत जागृति उत्पन्न करण्याचे प्रसंग येत तेव्हां अत्यंत प्रेमानें व कळवळ्याचा उपदेश त्यांस करण्याचा त्यांचा प्रघात आहे. डॉ. भांडारकरांचे सहकारी मित्र वामनराव मोडक अकालीं परलोकवासी झाले. त्यांच्या मनामध्यें समाजसेवा करण्याचें पुष्कळ होतें. परंतु शारीरिक दुर्बलतेमुळें तें झालें नाहीं. त्यावेळीं आपले बहुतेक सर्व मित्र गेले, व कार्य तर अद्याप पुष्कळ व्हावयाचें आहे हें लक्षांत आणून अगदीं सद्गदित कंठानें तरुणांस उद्देशून ते म्हणाले "महान् प्रभु पुराणपुरुष सत्वाची उत्तरोत्तर अधिकाधिक प्रवृत्ति प्रपंचांत करितो ती आह्मांसारख्या मनुष्यांच्याच हातें करवितो. तेव्हां त्याचे मंगल उद्देश सिद्धीस नेण्यास त्याच्या हातचीं साधनें तुम्ही होणार कीं त्यांच्या कार्यास प्रतिबंधक होणार ह्याविषयीं

---

* Allow me to express an earnest hope that there is in all this pure and sincere spirituality and little or no show and at the end you really feel elevated and the elevated condition lasts for some time. *( From a personal letter. )*

विचार करा. प्रतिबंधक झाला, तर तुमची व तुमच्या राष्ट्राची काय दशा होईल हें सांगावयास नको. ईश्वराचें कार्य सिद्धीस नेण्याकरितां त्याच्या हातचीं साधनें होणें, ह्यासारिखें दुसरें महाभाग्य कांहीं नाहीं. देवानें तें भाग्य जमला दिलें असतें, तर माझा जन्म सफळ झाला असें मीं मानिलें असतें. तेव्हां ह्या गोष्टीविषयीं विचार करा. पूर्वींच्या गतप्राय पिढीनें ही संस्था उभारली, त्या पिढीनें मोठे कष्ट सोसून, एखादें महत्कार्य केलें असें म्हणणें अगदीं नाहीं. माझें मन मला सांगतें कीं, आमचें कर्तव्य आम्हीं निष्ठेनें आणि आस्थेनें केलें नाहीं. आम्ही देवापाशीं अपराधी आहों. परंतु आह्मांमध्यें जीं न्यूनें होतीं त्यांचें पूरण करून, दोष होते त्यांचें निरसन करून, ह्या संस्थेचा उत्कर्ष करणें तुमचें कर्तव्य आहे. त्याचेबद्दल अपकर्ष जर होईल तर तुमच्या पिढीस डाग लागेल."

## कीर्तनें.

प्रार्थनासमाजास मान्य असलेल्या शुद्ध धर्ममतांचा प्रसार करण्याचें आणखी एक साधन आहे. हें साधन म्हणजे हरिकीर्तन हें होय. अगदीं जुन्या वळणाच्या लोकांना प्रार्थनासमाज हें कांहीं तरी बंड आहे असें क्षणभर वाटणें शक्य आहे; परंतु प्रार्थनामंदिरांत जीं कीर्तनें होतात त्यांचा लाभ घेण्यासाठीं अगदीं जुनीं जुनीं माणसें मोठ्या आवडीनें येत असतात.

## त्यांचीं पहिलीं दोन कीर्तनें.

डॉक्टर भांडारकरांनीं पहिलें हरिकीर्तन शनिवार ता. ३० मार्च १८७८ रोजीं समाजाच्या ११ व्या वार्षिकोत्सव समयीं केलें. प्रार्थनासमाजाच्या वतीनें झालेलें व एका सभासदानें केलेलें हें पहिलें कीर्तन होय. त्याचें वर्णन सुबोध-पत्रिकेच्या एका वाचकानें पुढील प्रमाणें केलें आहेः—

"प्रो. रामकृष्णपंत ह्यांची विद्वत्ता, त्यांचें गाण्याचें अंग, त्यांची कीर्तनपद्धति, बोलण्याची शैली, विषयाची रचना आणि येणेंकरून उत्पन्न होणारें माधुर्य व श्रोत्यांच्या अंतःकरणावर उमटणारा ठसा, व त्यांच्या मागील गाणारांची (ह्यांत रा. रा. रामभाऊ माडगांवकर होते.) योग्यता आणि या सर्वांच्या संयोगानें सदरील प्रसंगीं जमून गेलेला कीर्तनाचा थाट इतर कीर्तनप्रसंगीं क्वचितच नजरेस पडतो. परमेश्वराचे गुणानुवाद गाण्यास कीर्तन हा उत्तम मार्ग आहे व परमेश्वर-प्राप्ति हा जर आमच्या प्रार्थनासमाजाचा स्तुत्य उद्देश आहे, तर समाजापैकीं कित्येक विद्वान् गृहस्थांनीं प्रो. रामकृष्णपंत यांचा योग्य कित्ता घ्यावा."

१२ व्या वार्षिकोत्सवांत बुधवार ता. १८ मार्च १८७९ रोजीं रात्रीं रामकृष्णपंतांनीं दुसरें हरिकीर्तन केलें. सुबोधपत्रिकेच्या त्या वेळच्या संपादकांनीं त्या प्रसंगाचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहेः—

"कीर्तन सुमारें ८ वाजतां सुरू झालें व बरोबर १२ वाजतां आटोपलें. मंडळींची गर्दी फारच झाली होती. माडीची जागा स्त्रियांकरितांच मुद्दाम ठेविली होती व ती सर्व जागा स्त्रियांनींच व्यापून टाकिली होती. सुमारें १५० वर तरी स्त्रिया आल्या होत्या. त्यांत कित्येक पोक्त वयोवृद्धहि होत्या. मंदिराच्या खालच्या मध्यभागांत पाऊल ठेवण्यासहि रीघ नव्हती, इतकी लोकांची गर्दी झाली होती. सर्व दरवाजे व खिडक्या लोकांनीं भरून गेल्या होत्या. आणि उभें रहाण्यास जागा नसल्यामुळें पुष्कळ लोक निघून गेले. इतक्या लोकांचा जमाव मंदिरांत फारच थोड्या प्रसंगीं होतो."

प.वा. वामनराव मोडकांच्याही कीर्तनाचा लाभ घेण्यासाठीं शेंकडों स्त्रियाही मोठ्या आतुरतेनें येत असत. वामनरावांच्या मृत्यूनंतर मुंबईच्या समाजामध्यें उत्सवप्रसंगीं नित्य डा. भांडारकरांचेंच कीर्तन व्हावें व शरिराची दुर्बलता अनावर होईपर्यंत त्यांनीं हा आपला प्रिय उद्योग केला व अखेरीस समाजाच्या पन्नासाव्या वार्षिकोत्सवसमयीं त्यांनीं उत्सवांतील कीर्तनास प्रारंभ करून दिला व तें पुढें त्यांचे चिरंजीव रा. ब. डा. प्रभाकरपंत भांडारकर ह्यांनीं केलें. मुंबई व पुणें येथील समजांच्या उत्सवासाठीं डॉ. भांडारकरांनीं आजपर्यंत तेवीस कीर्तनांचीं पुस्तकें तयार केलीं आहेत. डॉ. भांडारकर कीर्तनांतील आख्यान हा साधारणपणें गौण भाग समजत. त्यामुळें प्रत्येक कीर्तनासाठीं त्यांनीं नवीन आख्यान तयार न करितां दहाच नवीं आख्यानें रचिलीं. कीर्तनांतील पूर्वरंग हाच महत्त्वाचा भाग असल्यामुळें त्याच्यासाठीं बराच परिश्रम करून तयारी करण्याची त्यांची वहिवाट असे. ह्या तेवीस कीर्तनांसाठीं त्यांनीं ( १ ) अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान; ( २ ) कृपावंत किती । दीनें बहु आवडती; ( ३ ) हा तो नव्हे कांहीं निराशेचा ठाव; ( ४ ) हेचि थोर भक्ति आवडती देवा; ( ५ ) काय तो विवाद असो भेदाभेद; ( ६ ) कैसें असोनि ठाउकें नेणा; ( ७ ) म्हणऊनि शरण जावें; ( ८ ) सकळिकांच्या पाया माझी विनवणी, ( ९ ) पवित्र सोवळीं । एक तीच भूमंडळीं; ( १० ) आठवे तो देव करावा उपाय; ( ११ ) हिरा ठेवितां ऐरणीं; ( १२ ) येथूनियां ठाव; ( १३ ) आतां तरी पुढें हाचि उपदेश; ( १४ ) ऐसें भाग्य कई लाहाता होईन; ( १५ )

विश्रांतीची शांति; ( १६ ) नको सांडूं अन्न; ( १७ ) हा गे आलों कोणी म्हणती युवतिया; ( १८ ) बहुतां छंदांचे बहुवसे जन; ( १९ ) जाऊं देवाचिया गांवा; ( २० ) नावडावें जन नावडावा मान; ( २१ ) कृपावंत ऐशा सोडूनी निदाना; ( २२ ) माझी निर्फल वासना, ( २३ ) हेंचि जतन करा दान, ह्या चरणांनीं प्रारंभ झालेले तेवीस अभंग घेतले होते. ह्या तेवीसही प्रसंगीं त्यांनीं जें विवरण केलें तें जर व्याख्यानरूपानें आज उपलब्ध असतें तर त्यापासून कितीतरी लाभ झाला असता.

## प्रार्थना

डॉ. भांडारकर उपासनेच्या प्रसंगीं ज्या प्रार्थना करीत त्या फार प्रेमळ असत व न्या. मू. रानडे ह्यांच्याप्रमाणें प्रार्थना हाच उपासनेचा मुख्य भाग असें त्यांस वाटत असे. मुंबईच्या प्रार्थनासमाजानें '**प्रार्थनासंग्रह**' ह्या नांवाचें जें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे त्यांत त्या पुस्तकासाठीं निरनिराळ्या प्रसंगांस व वृत्तींस अनुलक्षून डॉ. भांडारकरांनीं रचिलेल्या ३२ प्रार्थना आहेत. ह्यांनीं केलेलीं अत्यंत प्रेमळ अशीं कांहीं पद्यें * प्रार्थनासंगीतामध्यें असून, पुण्याच्या उत्सवप्रसंगीं जें स्वतंत्र भजनांचें पुस्तक छापवीत असत त्यांपैकीं कित्येक वर्षांच्या पुस्तकांत त्यांनीं रचिलेलीं भजनें आलेलीं आहेत. असो.

अशा प्रकारें आपलें शील, आपले उद्गार व उदात्त विचार, आपले लेख व व्याख्यानें, आपलीं कीर्तनें, उपदेश, खासगी संभाषणें, व आपल्या नित्याच्या उपासना ह्या सर्वांच्याद्वारा डॉ. भांडारकरांनीं आज ५० वर्षे धर्मप्रचाराचें कार्य केलें. आणि जेव्हां वाढतें वार्धक्य, अशक्तता, कोता आवाज ह्यांमुळें तें काम पुढें चालविणें अशक्य झालें तेव्हां त्यांनीं म्हटलें "यानंतर आणखी नवीन व्याख्यानें तयार होण्याचा संभव नाहीं. कारण, माझा आवाज आतां फार कोता झाला आहे आणि बोलण्याचें सामर्थ्यही राहिलें नाहीं. तेव्हां ह्या ग्रंथाची येथेंच समाप्ति झाली असें समजावें." हे उद्गार वाचून कंठ दाटून येतो व मनामध्यें अत्यंत उद्वेग उत्पन्न होतो. परंतु शरीराच्या दुर्बलतेपुढें कोणाचा इलाज आहे ?

* त्यांनीं रचलेल्या पद्यांचे पुढील प्रमाणें अंक आहेत ११, १९, ५६, ५७, ७३, ७४, ९३, ९४, ९७, ९८, १०९, १२३, १२४, १७९, २११, २८७, २८८, २८९, ३०९, ३३६, ३५५.

तथापि अखेरपर्यंतचा त्यांचा समाजाच्या सर्व कार्याविषयींचा उत्साह, धर्मकार्याविषयींची त्यांची आस्था व कळकळ हीं ज्यांनीं पाहिलीं त्यांस तरुणांचा उत्साहही कमी वाटत असे.

## यश कां येत नाहीं ?

डॉ. भांडारकरांच्या अनेक धर्मपर व्याख्यानांत वाचकांस थोडी निराशेची झांक आढळून येते. * प्रार्थनासमाजाला यावें तसें यश कां येत नाहीं याचा खल वारंवार आपल्या व्याख्यानांमध्यें त्यांनीं अगदीं स्पष्टपणें केला आहे. त्यांच्या दृष्टीनें धर्मप्रसार करण्याचे मार्ग कोणते त्यांचा उल्लेख त्यांनीं कित्येक व्याख्यानांत केला आहे. कांहीं वर्षांपूर्वी ' प्रार्थनासमाज अप्रिय असल्यास तो कां आहे', ह्या विषयाची चर्चा जेव्हां सुबोधपत्रिकेमध्यें झाली तेव्हां त्यांनीं या विषयाचा पुढीलप्रमाणें ऊहापोह केलाः—

---

* ही निराशेची झांक त्यांच्या धर्मपर व्याख्यानांत जागोजाग आढळून येते. परंतु बेळगांव मुक्कामीं १९०८ सालीं त्यांचें जें एक व्याख्यान झालें त्या वेळीं त्यांनीं पुढील आशयाचे उद्गार काढले होतेः—

प्रस्तुतचा काळ भंजनाचा ( Destruction ) दिसतो. पुनर्घटनेचा (Reconstruction ) दिसत नाहीं. पुनर्घटनेचें काम सुरू होण्याचे अगोदर हा ऱ्हासकाळ बराच लांबत राहणार असें दिसतें. आम्ही हिन्दी लोकांनींही पुनर्रचनेचें काम आरंभिलें आहे. बंगाल्यांत ब्राह्मसमाज व मुंबईत प्रार्थनासमाज आहे, पण फारच थोडे सुशिक्षित लोक ह्या पंथास सामील आहेत. या लोकांचा जुन्या धर्मावरील विश्वास जरी अगदीं जात आहे, तरी ह्या समाजापासून ते अलग राहतात, आणि औदासिन्य व बाह्य संमति यांतच ते संतुष्ट राहतात. युरोपांतील व हिंदुस्तानांतील एकेश्वरी पंथ म्हणजे एक ठिणगी होय. जगाची प्रगति झाली पाहिजे, तर ह्या ठिणगीच्या योगानें शुष्क धर्मपंथांचा नायनाट होऊन मनुष्यास जास्त माणुसकीनें वागतां आलें पाहिजे, पण हल्लीं पहावें तों जिकडेतिकडे एकच गोंधळ माजून राहिला आहे. "

सुशिक्षित लोकांच्या विचारांच्या आजच्या स्थितीविषयीं ते जरी थोडे निराश झालेले दिसत, तरी प्रार्थना किंवा ब्राम्हसमाजासारख्या धर्मसंस्थांद्वारें प्रसृत होणारा जो धर्म तोच अंतीं सर्वमान्य होणार अशी त्यांची खात्री असे हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे.

" इंग्रजी शिकलेल्या लोकांमध्यें दोन वर्ग आहेत. त्यांपैकीं एकाची सामाजिक संबंधानें मतें फारच पुढें गेलेलीं आहेत. त्याचें म्हणणें आज ३०–३५ वर्षें हें आहे कीं, प्रार्थनासमाजाचे लोक बोलल्याप्रमाणें कृति करीत नाहींत. म्हणजे सर्व ज्ञातिबंधनें मोडून टाकून ब्राह्मण, मराठे, भंडारी इत्यादिकांमध्यें परस्पर अन्नसंबंध, किंवा शरीरसंबंध घडवून आणित नाहींत म्हणून त्याची प्रगति होत नाहीं. परंतु मला तर हें कारण सबळ दिसत नाहीं. ह्याप्रमाणें व्यवहार करण्याला समाजाची कोणाला मनाई आहे असें नाहीं. खुशाल समाजांत प्रविष्ट होऊन अशा प्रकारचा व्यवहार करावा. दुसऱ्या वर्गामध्यें सर्व सुधारणेचे जे द्वेष्टे त्यांचा समावेश होतो. त्यांना तर प्रार्थनासमाज हा सुधारलेला पंथ आहे म्हणून तो अप्रियच आहे. आणि तो अप्रिय असल्यामुळें त्याविषयीं नाना प्रकारचे खोटे अपवाद ठरवून बऱ्याच लोकांस समाज त्यांनीं अप्रिय करून सोडला आहे. परंतु ह्या कारणांची कालेंकरून आमचे यत्न सुरळीतपणें चालले असतां निवृत्ति होण्याचा संभव आहे. तिसरा वर्ग आहे तो समाजाच्या उपासनापद्धतीमध्यें ख्रिस्ती धर्माचें अनुकरण आहे, आणि आतां जरी इतकें नसलें तरी पूर्वीं पुष्कळ होतें, म्हणून विमुख झाला आहे. कांहीं तर शुद्ध नास्तिक आहेत; त्यांना प्रार्थनासमाज प्रिय होण्याचा संभवच नाहीं. मनुष्याच्या सामान्य स्वभावास अनुसरून कित्येकांस अलौकिक, गूढ, सामान्य लोकांच्या अनुभवास न येणारें असें जें असेल तें आवडतें; म्हणून ते योगाकडे वळतात, किंवा थिआसफीचें अवलंबन करितात. कित्येकांची बुद्धि एकेश्वरधर्मास अनुकूल जरी असली तरी आपल्या मतांस नियत आकार देऊन त्याप्रमाणें वागण्याचा निश्चय किंवा धैर्य त्यांस नसतें; असे लोक समाजापासून दूर रहातात.

सामान्य लोकांच्या संबंधानें विचार केला असतां मला असें वाटतें कीं, विशेषतः ब्राह्मसमाजामध्यें ख्रिस्त व बायबल ह्यांचेवर फार भरिभार ठेवून विचारसरणी व भाषासरणी चालते म्हणून तो समाज अप्रिय झाला आहे. हें कारण आज इतकीं वर्षें आमच्या प्रार्थनासमाजामध्यें जी सरणी चालत आली आहे तिजवरून त्या समाजाला लागू होत नाहीं. तथापि त्याही समाजास आणि ब्राह्मसमाजास लागू असे देवताबहुत्व, प्रतिमांची अर्चा, जातिभेद यांचा अव्हेर या कारणांनीं हे दोन्ही समाज सामान्य लोकांस अप्रिय झाले आहेत. आम्हीं असें पाहिलें आहे कीं, तुकोबांसारख्यांचे अभंग व भगवद्गीता आणि उपनिषदें यांतील वचनांच्या आधारें आम्हीं उपदेश केला असतां तो यावत् सर्व हिंदूंस मान्य

होतो आणि ते माना डोलावतात आणि असले उपदेश वारंवार ऐकण्याची त्यांस इच्छा होते; परंतु हा उपदेश प्रार्थनासमाजाचा आणि तो समाज जाति मानीत नाहीं, आणि गणपती, राम, कृष्ण इत्यादि देवतांची अर्चा करीत नाहीं, असें समजतांच ती इच्छा नाहींशी होते. हीं कारणें अप्रतिकार्य आहेत. समाजाचीं जीं प्रधान मतें तीं समाजाला सोडतां येत नाहींत. आणि सामान्य जनांच्या संबंधानें तुकोबांनीं जें सांगितलें कीं, "देवधर्म सांदीं पडिला सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥ रात्रीदिस न पुरे कुटुंबाचें समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥" "जन तरी देखें गुंतलें प्रपंचें । स्मरण तें त्याचें त्यास नाहीं ॥" "इंद्रियांचा गाजे गोंधळ ये ठायीं । फोडितसे डोई अहंकार ॥" हें समाजाच्या अप्रियतेला, किंवा प्रियतेच्या अभावाला मोठें सबळ कारण झालें आहे.

परंतु माझा असा अभिप्राय आहे कीं, सध्यां आमची जो उपासनापद्धति पुष्कळ वर्षें चालू आहे तीस अनुसरून म्हणजे उपनिषदांपासून कबीर, नानक, नामदेव, तुकाराम ह्यांजपर्यंत ह्या देशांत धर्मसंबंधी विचारांचा जो एकसारखा भरपूर प्रवाह चालत आला आहे त्याच्या आधारें आम्ही उपदेश करूं लागलों तर त्या दोन कारणांचें महत्त्व नाहींसें होईल. मात्र उपदेशक जे आहेत त्यांनीं एकनिष्ठमनानें स्वात्मपरीक्षण करून हृदयस्थ दोषांची निवृत्ति करण्याविषयीं जपून, परमेश्वराच्या ठायीं निष्कपट प्रेम आणि भक्ति हीं दृढ केलीं पाहिजेत आणि सर्व जनांविषयीं निरभिमानता आणि आदर बुद्धि हीं संपादिलीं पाहिजेत. असें झालें असतां हिंदुधर्माच्या चालू समजुतींविरुद्ध जरी समाजाचीं मतें असलीं, आणि जनांमध्यें देवधर्म जरी सांदींत पडला आहे, तरी तो समाज ग्राह्य होईल. एकंदरींत मला असें वाटतें कीं, खरोखरी नम्र, प्रेमळ, देवास ज्यांनीं 'हारीं आणिलें' आहे असे उपदेशक, आह्मांमध्यें झाले तर समाज लोकांमध्यें अधिक प्रिय होण्यास कांहीं बाधक दिसत नाहीं."

## कांहीं सावधगिरीच्या सूचना.

डॉ. भांडारकरांनीं जागोजाग आपल्या व्याख्यानांत प्रार्थनासमाजाच्या सभासदांस व इतरांस सावधगिरीच्या सूचना केल्या आहेत. म्हणजे समाजावरील आक्षेप, सभासदांचें आचरण, त्यांच्या विचारांचें स्वरूप व त्यांची आस्था इ॰ सर्वांचें निरीक्षण करीत असतां वेळोवेळीं त्यांच्या जे दोष ध्यानीं आले ते दृष्टीपुढें ठेवून त्यांनीं त्या सावधगिरीच्या सूचना केलेल्या आहेत. बंगाल्यांतील ब्राम्हसमाज-

ळीमध्यें एकंदर हिंदु समाजापासून आपण अलग आहोंत, स्वतंत्र आहोंत, असें समजण्याचा प्रघात फार आहे. हें धोरण डॉ. भांडारकरांस बिलकुल पसंत नाहीं. ते ह्या धोरणाचा वारंवार संभाषणामध्यें निषेध करीत असतात. वरिष्ठ कौन्सिलचे मेंबर असतांना एकदां त्यांनीं म्हटलें "येथील ( बंगाल्यांतील) ब्राह्मधर्मीय लोकांची अशी एक चूक होत आहे कीं, ते हिंदु व ब्राह्म असे स्पष्ट भेद करितात. मुंबई इलाख्यांतील प्रार्थनासमाजाची मंडळी असा स्पष्ट भेद करीत नाहीं. कारण, असा स्पष्ट भेद करणें बरोबर नाहीं असें आमच्या मंडळीचें मत आहे. तूं हिंदु आहेस, मी ब्राम्ह आहें, असें म्हणणें बरें नाहीं. यामुळें ब्राह्मधर्माच्या प्रसारास हरकत येत आहे. असा तुटकपणा मनांत ब्राह्म लोकांनीं वागवूं नये." कारण, "घरोघर, झोंपड्यांतून जाऊन त्या धर्माचा उपदेश" आपल्याला करणें आहे. दुसऱ्या एका प्रसंगीं ते म्हणाले, "इतर लोकांना आम्हांला टाकावयाचें नाहीं. समाजाचीं धर्मतत्त्वें अशीं आहेत कीं, तीं कोणत्याही धर्मांच्या लोकांस मान्य व्हावीं. परंतु पूर्वीपासून आपल्या हिंदु लोकांची धर्मसंबंधानें आस्था विशेष दिसत आहे. आज आपल्याच प्रचलित धर्मांत घाण झाली आहे असें नाहीं. पारशांच्या, मुसलमानांच्या धर्मांनाही अवनत स्वरूप प्राप्त झालें आहे. पण, त्यांना आपापल्या धर्माची सुधारणा करावी अशी कोठें आस्था नाहीं, ती हिंदूंनाच आहे. हिंदूंनींच प्रथम ही धर्मसुधारणेची चळवळ सुरू केली आहे. अशी वस्तुस्थिति असतां आम्ही ब्राह्म आणि तुम्ही हिंदु असा प्रकार केल्यास साधारण जनसमूहावर वजन राहणें शक्य नाहीं." परंतु जनसमूहावर वजन ठेवण्यासाठीं लोकाराधना करावी, सत्याचा, न्यायाचा विचार करूं नये असें मात्र केव्हांही ते म्हणत नाहींत. उलट त्यांचा असा आग्रह आहे कीं, "आपण आपला पक्ष तर सदोदित कायम ठेवलाच पाहिजे, आणि सर्व धर्मांतील विकसित तत्त्वांचा आदर करावयास तयार असलें पाहिजे. विशेष रीतीनें जीं तत्त्वें इतर धर्मांत विकास पावलीं आहेत, त्यांचा अवश्यमेव स्वीकार केला पाहिजे; परंतु आपला धर्मप्रचार जो आहे तो एतद्देशीय ग्रन्थांच्या आधारेंच विशेषेंकरून झाला पाहिजे. हिंदु लोकांच्या झोंपड्यांत जाऊन तेथें त्यांस बायबल, अगर कुराण सांगत बसावयाचें नाहीं. त्यांना उपनिषदें भगवद्गीता वगैरे ग्रन्थांतील तत्त्वांस अनुसरूनच उपदेश केला पाहिजे." मात्र " जेथें स्वधर्मग्रन्थांत तत्त्वांसंबंधानें गौणत्व असेल तेथें दुसऱ्या कोणत्याही परक्या धर्मग्रन्थांचें साह्य घेण्यास कांहींच हरकत नाहीं. एवढेंच नव्हे तर अशा वेळीं तसें न करणें हा अविचार होणार

आहे. " डॉ. भांडारकरांच्या मतें इतक्या तयारीनेंही भागत नाहीं. " समाजांत प्रविष्ट झालेल्यांनीं आपलीं निषेधपूर्वक जीं तत्त्वें आहेत त्यांसंबंधानें पूर्ण कटाक्ष ठेविला पाहिजे. मूर्तिपूजा, जातिभेद ह्यासंबंधानें पूर्वीच्या साधुसंतांनीं ठिकठिकाणीं निषेध केलेला आहे. परंतु त्यांत त्यांची दृढता दिसून आलेली नाहीं. मुरारिदासांनीं, ' याति संतांसी असेना ' असें म्हटलें आहे, परंतु त्या तत्त्वावर त्यांनीं विशेष लक्ष दिलेलें नाहीं. एकनाथांनीं महारांस आपल्या पंक्तीस घेतलें खरें, परंतु त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यांस विभक्त केलें आणि आज एकनाथी ब्राम्हणांची लहानशी जातही आढळते ! आपलें हें निषेधाचें तत्त्व निश्चयानें पुढें ढकलण्याचा प्रयत्न पूर्वीच्या साधुसंतांनीं केलेला नाहीं. तो आपण केला पाहिजे. विधिस्वरूप जीं तत्त्वें आहेत त्यांपेक्षां निषेधात्मक तत्त्वांविषयीं आपण सदोदित फारच जागृत असलें पाहिजे, ह्यासंबंधानें आपल्या आचरणांत, व्यवहारांत ढिलेपणा आणिला कीं, मग आटोपलेंच ! " सारांश, आमच्या ह्या मार्ग उत्तम आहे असें म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तर प्रथम ' सेवितों हा रस ' असें झालें पाहिजे. आणि त्यानंतर ' वांटितों आणिकां' ही कामगिरी आपल्यावर येते. जोंपर्यंत आम्हांला स्वतःला पक्वान्नाची गोडीच कळणार नाहीं, तोंपर्यंत इतरांस तें वांटण्याची किती आवश्यकता आहे तें आपल्या लक्षांत येणार नाहीं. "

वास्तविक पहातां " जो मार्ग अवलंबिला असतांना देवाच्या सन्निध मनुष्य न जातां त्यापासून दूर जातो त्या मार्गाचा प्रार्थनासमाजानें त्याग केला आहे. नित्य देवाची भक्ति करून त्याचें ध्यान करून त्यास प्रिय होतील अशीं कर्मे करून, त्याजविषयीं अनन्यभाव अंतःकरणामध्यें परिपुष्ट करून तोच प्रमाण, दुसरें कांहीं प्रमाण नाहीं, या तत्त्वाचा स्वीकार करून वागण्याचा जो मार्ग तो ईश्वराच्या सन्निध नेणारा मार्ग आहे. हा आमचा मार्ग आजपर्यंत जें म्हणून मनुष्यास धर्मसंबंधीं ज्ञान प्राप्त झालें आहे त्याचें एकीकरण करून सिद्ध केला आहे आणि पुढेंही मनुष्यास जें अधिक ज्ञान प्राप्त होईल त्याचाही समावेश या मार्गामध्यें होणार. अशा प्रकारचा प्रार्थनासमाजाचा मार्ग असून जर जनांमध्यें त्याचा प्रसार होत नाहीं, तर त्या गोष्टीचा बोजा आमच्या शिरावर आहे. आम्हींच त्या मार्गाचें अवलंबन करून आपली स्थिति सुधारली नाहीं, आपल्या अंतःकरणाचें परीक्षण करून त्यांतील दोष काढून टाकण्याविषयीं यत्न केला नाहीं, देवाच्या स्वरूपाचें चिंतन, त्याजविषयीं उत्पन्न होणारी जी पूज्यबुद्धि आणि जें प्रेम तें जर आम्हीं

आपल्या अंतःकरणामध्यें परिपुष्ट केलें नाहीं आणि असें परिपुष्ट करून चोहींकडे जाऊन लोकांस या धर्माचा उपदेश केला नाहीं; लौकिकापेक्षां, धनद्रव्यापेक्षां आम्हांस देव अधिक आवडतो हें आपल्या कृतीनें लोकांस जर दाखविलें नाहीं, तर आमच्या मार्गाकडे लोक वळतील कसे ? आज चाळीस वर्षेपर्यंत धर्मप्रचारक नेमून समाजधर्माचा प्रसार करण्याविषयीं यत्न करीत आहों; पण त्याचेंही फळ तादृश दिसून येत नाहीं; परंतु ह्या धर्माचा प्रसार होऊन त्याचा जय होणारच; मनुष्य परमेश्वराच्या सन्निध जाणारच; त्याशीं सरूप होणारच. पण हें काम सिद्धीस नेण्याविषयीं आम्हीं आपणांस अयोग्य करून टाकिलें तरी तें काम मागें पडावयाचें नाहीं. आम्ही जाऊन आमच्या स्थानीं दुसरे या कामास योग्य असे लोक येतील. कदाचित् युरोपियन लोक अशा प्रकारचा मार्ग गृहीत करून त्याचा प्रसार करण्याविषयीं त्यांचा नेहमींचा जो अप्रतिहत उद्योग तो करतील; परंतु हें श्रेय आमच्या हातांतून दवडावयाचें नाहीं अशी जर इच्छा असेल, तर आम्हांस सावध झालें पाहिजे आणि निश्चयपूर्वक आपलें अंतःकरण, आपली कृति सुधारून एकसारखा देवाच्या नांवाचा जयजयकार करण्याच्या उद्योगास आम्हीं लागलें पाहिजे. ''

अशा प्रकारें समाजांत जे प्रविष्ट झाले आहेत त्यांस त्यांनीं आपल्या व्याख्यानांत जागोजाग सावधगिरीच्या सूचना केल्या आहेत. आणि जे समाजांत प्रविष्ट झालेले नाहींत त्यांसही त्यांनीं सावध करण्याचा प्रयत्न आपल्या लेखांत व व्याख्यानांत केलेला आहे. The Position of the Prarthana Samaj in the Religious World ह्या १९०३ सालच्या व्याख्यानाच्या अखेरीस त्यांनीं असें विचारलें आहे कीं, उपनिषदें, भगवद्गीता, साधुसंतांचे उद्गार ह्यांच्यांतील जो उत्तमांश त्याचा तुम्ही स्वीकार करणार कीं, ज्या प्रचलित धर्मामध्यें अज्ञ लोकांस शोभण्यासारखे सर्व प्रकार आहेत त्यांसच चिकटून राहणार ? *

* Will you then accept the best portions of the Upanishads, the Bhagavadgita, and of the teachings of the medieval Saints, supplemented by certain ideas from Buddhism or from the Bible; or will you adhere to all the religions that go under the name of ordinary Hinduism, the religions which represent all the stages of evolution beginning from the most primitive such

अशा प्रकारें त्यांनीं प्रार्थनासमाजाच्याद्वारें धर्माची जी एकनिष्ठ सेव बजाविली आहे ती—

सर्वांग सुंदर

आहे. ह्मणजे विद्वत्ता, अनेक अमोलिक गुण, असामान्य धर्मनिष्ठा व सत्यप्रीति ह्यांच्या योगें धर्मप्रचाराचें कार्य करण्यास त्यांच्या इतका लायक दुसरा कोणी नव्हता. परंतु धर्मपर लेख लिहिणें, धर्मपर व्याख्यानें देणें, संभाषणांमध्यें धर्मविषयक चर्चा करणें व लोकांस जागृत करणें, सतत आत्मपरीक्षणपर वृत्ति ठेवून स्वतः जागृत राहून आपल्या विचारांप्रमाणें इतरांस अनुकरणीय असें वर्तन ठेवणें, इतकेंच करून ते थांबले नाहींत. तर मुंबई व पुणें ह्या ठिकाणीं भावी प्रजाजनांच्या लाभासाठीं सुंदर प्रार्थनामंदिरें उभारण्याच्या कामीं त्यांनीं अत्यंत परिश्रम केले आहेत. मुंबईच्या मंदिराकरितां द्रव्यसाह्य जमविण्यासाठीं त्यांनीं बरेच श्रम घेतले; परंतु पुण्याचें नवें हरिमंदिर हें त्यांची आस्था, त्यांचा दृढ उद्योग, ह्यांची सतत आठवण करून देणारें साधन झालें आहे. डॉ. भांडारकरांनीं जर ह्या कामीं पुढाकार घेतला नसता तर पुण्याला अशा सुंदर व भव्य मंदिराचा लाभ झाला नसता. ता. २७ जुलै १९०५ रोजीं नवें मंदिर उभारण्याचा निश्चय मुकरर झाला व तेव्हांपासून मंदिर संपूर्ण होईतों डॉक्टर भांडारकर तनमनधनेंकरून झटले. त्याचें फळ हल्लींचें दगडी मंदिर आहे.

---

as the worship of trees and stones, serpents and cows, and of fetishes? Will you accept mere mechanical ceremonial which can have no connection with your moral advancement as your worship of God, or take up the spiritual mode chosen by the Prarthana Samaj which alone is calculated to purify the heart and elevate it and prepare you to perform your duties in life? The existing forms of religion belonging as they do to earlier stages of civilization are destined, if India is to advance, to disappear, and along with their disappearance all that is good in the higher religious thought of the country is also in danger of disappearing, unless we deliberately choose it and make it alone our religion. And the existing mechanical modes of worship must be entirely thrown away and the spiritual mode substituted to bring about the moral reformation of the country which is so urgently needed.

